॥ श्रीः ॥

# विविधज्ञानविस्तार.

## A MONTHLY MAGAZINE
OF
## MARATHI LITERATURE
FOR
**Ladies and Gentlemen.**

कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरितां.

पुस्तक ३०. जानेवारी १८९९. अंक १.

अनुक्रमणिका.



मुंबईत

गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत छापिलें.

वर्षाची वर्गणी रुपये ३; टपालखर्च आणे ६.

# विविधज्ञानविस्तार.

## वर्षारंभ.

मागच्या अंकांत सुचविल्याप्रमाणें या अंकापासून ८ पृष्ठें जास्त देण्याची सुरवात केली आहे. यामुळें खर्चाचें मानही स्वाभाविकच जास्त वाढणार आहे. तेव्हां त्याच प्रमाणानें आमच्या आश्रयदात्यांच्या संख्येचेंही मान वाढणें अवश्य आहे. महाराष्ट्रभाषेची आमची ही सेवा महाराष्ट्रभाषेच्या कैवाऱ्यांस आवडून त्यांच्याकडून आम्हांस योग्य प्रोत्साहन मिळेल अशी आशा आहे.

प्रस्तुतची आठ पृष्ठांची वाढ रा. रा. माधवराव लेले यांचे संस्कृत नाटकांसंबंधाचे लेख चालू असेपर्यंतच असणार. परंतु ती कायम होणें हें केवळ लोकाश्रयावर अवलंबून आहे, ही गोष्ट गेल्या अंकांत नमूद करण्यांत आलीच आहे.

गेल्या वर्षीं या मासिकास आठ पृष्ठें जास्त जोडण्यांत आलीं—अशा हेतूनें कीं, पुस्तकाची उपयुक्तता जास्त वाढून तें जास्त लोकाश्रयास पात्र व्हावें. ही व्यवस्था बऱ्याच विद्वान् लोकांस मान्य झाली हें आम्ही आनंदानें कबूल करितों. परंतु मराठी भाषेच्या अभिमानास ऊत आल्याचें जें वर्तमानपत्रांमध्यें आणि विद्वान् लोकांच्या भाषणांत आढळून येतें त्याचा यावा तसा अनुभव अजून आम्हांस आला नाहीं, असें दिलगिरीनें ह्मणणें प्राप्त आहे. ज्या विद्वान् आणि श्रीमान् गृहस्थांनीं या पुस्तकास आपला उदार आश्रय दिला त्याबद्दल आह्मी त्यांचे भारी आभारी आहों; आणि ज्यांच्या आश्रयास हें अजून पात्र झालें नसेल त्यांच्या आश्रयास पात्र होण्याचा अजूनही सुयोग येईल ह्मणून उमेद बाळगून आहों.

वि. ज्ञा. विस्तार मासिक पुस्तक पहिल्यानेंच जेव्हां अस्तित्वांत आलें तेव्हां त्याची पृष्ठसंख्या १६ असून वर्गणी ३ रुपये होती. पुढें क्रमानें पृष्ठांची संख्या २० आणि २४ होऊन, गेल्या वर्षी ३२ पृष्ठें वाचकांस दरमहिन्यास मिळूं लागलीं. तथापि वर्गणीच्या रकमेंत कांहीं फेरफार करण्यांत आला नाहीं. यंदांपासून तर वाचकांस ४० पृष्ठें तेवढ्याच किंमतींत देण्याची सोई केली आहे. तेव्हां या सोईचा पुष्कळ लोक फायदा घेतील अशी आशा आहे.

गेल्या वर्षांत प्रसिद्ध झालेल्या विषयांची अनुक्रमणिका, आणि ज्यांचे लेख प्रसिद्ध झाले त्यांची नामावलि या अंकासोबत पाठविण्यांत येत आहे. चालूसालची कामगिरी गेल्या सालच्याहीपेक्षां विशेष श्रेयस्कर होण्यासाठीं आमच्याकडून होतील तितके आह्मी प्रयत्न करूं ह्मणून अभिवचन देतों. तें सिद्धीस नेणें शक्तिदात्या परमेश्वराच्या स्वाधीन आहे.

सामाजिक, राजकीय वगैरे वादग्रस्त विषयांवर लेख वि. ज्ञा. विस्तारांत प्रसिद्ध होण्यास कांहीं प्रतिबंध नाहीं ह्मणून गेल्यासालीं कळविलें होतें. यासंबंधानें आम्हांस अमुकच ह्मणून पक्ष नाहीं. विद्वान गृहस्थांकडून लिहून आलेल्या लेखांस, त्यांत व्यक्तिविषयक आणि सभ्यपणास सोडून मजकूर नसल्यास, सवडीप्रमाणें स्थल देण्यांत येईल. आपल्या मतांविरुद्ध लेख प्रसिद्ध झाल्यास त्याबद्दल रागावण्याचें कोणास कारण नाहीं.

२९ व्या पुस्तकांत अपूर्ण राहिलेले विषय, शक्य असेल त्याप्रमाणें, चालू सालांत पुरे करण्यांत येतील.

प्रकरणाविषयीं निर्देश करण्याचें कारण इतकेंच कीं, १८६९ सालच्या आरंभीं रत्नागिरी जिल्ह्यांतील कांहीं खोतांनीं सरकारावर आपल्या हक्कांसंबन्धानें फिर्याद केली. या कज्यांत खोतांच्या तर्फे रावसाहेब वकील होते. या प्रसंगीं रावसाहेबांच्या एका विशेष गुणाची परीक्षा झाली. एकदां कोणतेंही काम हातीं घेतलें ह्मणजे मग त्याची सर्व व्यवस्था यथास्थित लागल्याशिवाय त्यांस चैन पडत नसे. मग तसें करण्यांत कितीही कष्ट व नुकसान सोसावें लागलें तरी त्याची ते परवा करीत नसत. या खोतीकज्यांत सरकारच्या तर्फेही एका वकिलाची योजना करण्यांत आली होती. हे वकील एकाएकीं रत्नागिरीस निघून गेले. हे वकील कोर्टांत उभे रहातील तेव्हां रावसाहेबांनीं तेथें असणें अगदीं जरूर होतें. नित्य जाणाऱ्या आगबोटीनें जाऊन वेळेवर कोर्टांत हजर रहाणें अशक्य होतें. असा एकंदर प्रकार असतां रावसाहेब मुळींच भग्नोत्साह झाले नाहींत. दुसऱ्या कोणीही अशा प्रसंगीं तारायंत्रद्वारा आपली तक्रार रुजू केली असती व आपण येईपर्यंत प्रतिपक्षाच्या वकिलाची कोणत्याच प्रकारची सूचना कोर्टानें ऐकूं नये अशी विनंती केली असती; परंतु ही तोड रावसाहेबांच्या शीलास अनुरूप नव्हती. त्यांनीं एका स्वतंत्र आगबोटीनेंच जाण्याची शक्कल काढिली व तसें केल्यानें त्यांस वेळेवर न्यायसभेंत हजर राहतां आलें. असाच प्रकार १८७० सालीं एकदां घडला. पुणें येथें सेशन कोर्टांत एक खटला चालावयाचा होता, त्यांत आरोपीतर्फे रावसाहेब वकील होते. ज्या दिवशीं खटला चालावयाचा त्याच्या पूर्व दिवशीं संध्याकाळच्या गाडीनें मुंबईहून निघण्याचा रावसाहेबांचा संकल्प होता; परंतु त्या दिवशीं अकल्पित अशा कारणामुळें हायकोर्टांतून निघण्यास उशीर झाला, त्यामुळें संध्याकाळची गाडी चुकली. या प्रसंगींही त्यांनीं रेलवेच्या अधिकाऱ्यांस पत्र लिहून स्वतःसाठीं एक स्वतंत्र गाडी काढविली व तसें केल्यामुळें त्यांस केलेला संकेत पाळतां आला.

वर ज्या दोन प्रसंगांविषयीं उल्लेख करण्यांत आला आहे त्यांपैकीं पहिल्या प्रसंगाच्या हकीकतींत ज्या कारणाचा निर्देश केला आहे त्याचें समर्थन तत्कालीन दैनिक वृत्तावरून होत नाहीं. दैनिक वृत्तांत पुढें लिहिलेला मजकूर आहे:—"२० जानेवारी १८६९—पत्नी
"व मित्रमंडळी यांसमवेत रत्नागिरीला जा-
"ण्यासाठीं मुंबईहून निघालों. पत्नी विक-
"लांग असल्यामुळें तिला तशा स्थितींत परकी
"लोकांच्या दृष्टीस पडणें बरें वाटेना ह्मणून एक
"स्वतंत्र आगबोटच ठरविण्यांत आली होती."
या उताऱ्यांतील मजकुराचा वर निर्दिष्ट केलेल्या कारणाशीं मेळ घालतां येत नाहीं. कदाचित् दोन्ही कारणांमुळें तें कार्य घडून आलें असेल असा संभव आहे. दुसऱ्या प्रसंगाची हकीकत यथार्थ असल्याविषयीं मात्र दैनिक वृत्तांत प्रमाण आहे. पहिला प्रसंग जमेस न धरिला तरी केवळ दुसऱ्या प्रसंगावरून रावसाहेबांची संकेतपालनाची उत्कट इच्छा व्यक्त होण्यासारखी आहे.

आतां आपण प्रकृत कालीं सार्वजनिक संस्थांच्या संबंधानें रावसाहेबांनीं केलेल्या उद्योगाकडे वळूं. 'स्टूडंट्स लिटररी सोसायटी' नांवाच्या सभेसाठीं रावसाहेबांनीं यापूर्वीं बरेच श्रम घेतले होते हें याच भागाच्या आरंभीं सांगण्यांत आलें आहे. तो क्रम त्यांनीं तसाच चा-

श्री.

# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ३०. अंक १.

रावसाहेब

## विश्वनाथ नारायण मंडलिक.

### भाग पांचवा.

स्वतंत्र व्यवसाय.

(१८६३—१८७१)

मागील अंकांत वर निर्दिष्ट केलेल्या कालांत रावसाहेबांनीं राजकीय विषयांवर लिहिलेल्या लेखांपैकीं दुसऱ्या लेखाविषयीं मजकूर आला आहे. त्या लेखाची या देशांत व इंग्लडांत संभावना कशा प्रकारची झाली याविषयींही उल्लेख करण्यांत आला आहे; परंतु संभावनेच्या एका प्रकाराचा निर्देश करणें राहिलें आहे त्याविषयीं दोन शब्द लिहून पुढील कथाभागाकडे वळूं.

इंदूर संस्थानचे माजी अधिपति महाराज तुकोजीराव होळकर यांची एकंदरीनें चतुरलपणा व गुणग्रहणशीलता या गुणांविषयीं ख्याति होती. रावसाहेबांचा दत्तकप्रकरणीं लेख प्रथम प्रसिद्ध झाला तेव्हां तिकडे महाराजांचें लक्ष्य गेलें नाहीं असें दिसतें. पुढें १८६८ सालीं दुसरी आवृत्ति निघाली तेव्हां तो लेख महाराजांच्या अवलोकनांत आला व त्यांतील विषयविवेचनाची शैली पाहून ते खुष झाले. त्याच सुमारास महाराजांचे वकील गणेशशास्त्री गोळवलकर हे मुंबईस होते. त्यांस रावसाहेबांची भेट घेण्याविषयीं महाराजांकडून लिहून आलें. गणेश शास्त्र्यांनीं रावसाहेबांची भेट घेतली व त्यांस असें कळविलें कीं, त्यांचा लेख वाचून महाराज प्रसन्न झाले व त्यांची भेट घेऊन त्यांस पोषाक वगैरे देऊन त्यांचा सन्मान करण्याची महाराजांची इच्छा आहे. राजकीय प्रकरणीं अशा रीतीचा लेख लिहिणाराची उघडपणें संभावना करण्याचें धैर्य महाराज तुकोजीराव यांस होतें ही गोष्ट विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. निमंत्रणाचा स्वीकार रावसाहेबांनीं केला किंवा नाहीं याविषयीं दैनिक वृत्तांत उल्लेख नाहीं. असो.

प्रकृत कालामध्यें सार्वजनिक संस्थांसंबंधीं रावसाहेबांनीं जो उद्योग केला तद्विषयक कथानकाचा उपक्रम करण्यापूर्वीं एका महत्त्वाच्या प्रकरणाविषयीं निर्देश करणें आवश्यक आहे. कोंकणांतील खोती वतनदारांचा पक्ष घेऊन तन, मन व धन या तिहींचा उपयोग करून रावसाहेबांनीं अक्षय्य अशा कीर्तीचा लाभ करून घेतला ही गोष्ट सर्वविश्रुत आहे. या बाबतींत त्यांनीं जे अश्रान्त परिश्रम केले त्यांचा उल्लेख पुढील भागांत योग्य स्थलीं येईलच. येथें त्या

लू ठेविला होता. सभेच्या आश्रयानें अनेक मुलींच्या शाळा स्थापण्यांत आल्या होत्या. त्यांची व्यवस्था कायमची सुरळीत चालावी ह्मणून पारशी व गुजराथी श्रेष्ठिजनांच्या साहाय्यानें त्यांनीं बरीच रक्कम उभी केली. महाराष्ट्रीय मुलींच्या शिक्षणासाठीं गुर्जर व पारसीक यांनीं द्रव्याचें साहाय्य द्यावें ही गोष्ट विलक्षण तर खरीच. त्यांच्या ज्ञातीमध्यें शिक्षणानिमित्त द्रव्याचा व्यय करण्याची आवश्यकता राहिली नव्हती ह्मणून त्या श्रेष्ठिजनांनीं महाराष्ट्रीयांस साहाय्य केलें असा भाग नव्हता. तर केवळ रावसाहेब व डाक्टर भाऊ दाजी यांच्या भिडेखातर या लोकांनीं मोठमोठया रकमा दिल्या. सर बार्टल फ्रियर यांच्या वशिल्यानें सरकारांतून फुकट जागा मिळवून तिच्यावर एक जंगी इमारत उभारण्याचाही रावसाहेबांनीं घाट घातला होता, व त्या कामीं प्रेमचंद रायचंद यांनीं एक लाख रुपये देण्याचें कबूल केलें होतें; परंतु अखेरीस तें कार्य सिद्ध झालें नाही. शाळांची व्यवस्था पहाणें, खर्चाची व्यवस्था लावणें, बक्षिसें वांटण्याचे समारंभ करून लोकांमध्यें सभेनें केलेल्या उद्योगाची प्रसिद्धि करणें, या व अशा अनेक निमित्तांनीं रावसाहेबांचा बराच वेळ सभेच्या सेवेंत खर्च होई. पुढें पुढें अन्यव्यवसायव्याप्ततेमुळें त्यांस पूर्वीप्रमाणें सर्व कार्यांचा निर्वाह करण्यास सवड होईना, ह्मणून त्यांनीं बाळ मंगेश वागळे यांची मदत घेतली.

दुसरी संस्था 'ज्ञानप्रसारक सभा' होय. या सभेस ऊर्जित दशेस आणण्यासाठींही रावसाहेबांनीं बरेच परिश्रम केले. निबंध लिहिणें, व्याख्यानें देणें, इत्यादि सभेची उपयुक्तता वाढविण्याचे जे प्रकार आहेत ते अव्याहत चालू ठेवण्याविषयीं ते नेहेमी जागरूक असत. स्वतःच्या हातून जेवढें होण्यासारखें होतें तेवढेंच करून ते स्वस्थ रहात नसत, तर योग्य अशा गृहस्थांना वारंवार विनंती करून त्यांच्याकडून लेख लिहिण्याचें किंवा व्याख्यानें देण्याचें काम ते करून घेत.

तिसरी संस्था 'वकिलांची सभा' रावसाहेबांस वकिलीची सनद मिळाल्याबरोबर त्यांनीं प्रयत्न करून ही सभा स्थापण्याचा योग जुळवून आणिला हें मागें सांगितलेंच आहे. हायकोर्टांतील वकिलांची मानमान्यता वाढविण्यासाठीं व त्यांस युरोपियन बारिस्टरांप्रमाणेंच सर्व प्रकारच्या सवलती मिळवून देण्यासाटीं त्यांनीं पुष्कळ श्रम केले. हायकोर्टाच्या दोन शाखा आहेत: (१) ओरिजिनल व (२) अपिलेट. हायकोर्टांतील वकिलांस ओरिजिनल शाखेकडे काम चालविण्याची परवानगी नसते. ती मिळविण्यासाठीं रावसाहेबांनीं बरेच श्रम केले; परंतु त्यांस यश आलें नाहीं. मेहेरबानीखातर त्यांना व दुसऱ्या एक दोन वकिलांना अशी परवानगी देण्यास अधिकारी कबूल झाले होते; परंतु या सर्वांनीं अशी सवलत अह्मांपुरतीच नको ह्मणून नाकारली असो. या सभेचें काम रावसाहेब त्यांच्या एकंदर तऱ्हेप्रमाणें आस्थापूर्वक करीत, व दुसऱ्या समव्यवसायी मंडळीच्या अनास्थेबद्दल त्यांना अत्यंत खेद होई, असें त्यांच्या दैनिक वृत्तावरून समजतें. त्यांच्या आस्थेचें एकच उदाहरण येथें देतों. स्टूडंट्स सोसायटीच्या एका वार्षिक सभारंभाला रावसाहेबांनीं सर बार्टल फ्रियर यांस निमंत्रण केलें होतें. समारंभ झाला त्याच दिवशीं वकिलांची सभा भरावयाची ठरलेली होती. समारंभास सुरवात झाल्यावर रावसाहेबांनीं वर्षाची हकीकत वाच-

ली. पुढें कांहीं गृहस्थांचीं भाषणें होऊन अखेरीस गव्हर्नर साहेबांचें भाषण व्हावयाचें होतें; परंतु सभेला जाण्याची वेळ झाल्यामुळें रावसाहेब पुढील व्यवस्था एका स्नेह्यास सांगून चालते झाले. सभास्थानीं जातात तों तेथें एक दोनच वकील कायते हजर होते. यावेळीं रावसाहेबांस किती खेद व उद्वेग झाला असेल याची कल्पना सहज होण्यासारखी आहे.

याशिवाय गुजराथी ग्रंथप्रसारकसभा, भूगोलविषयक ज्ञानप्रसारकसभा, ( जिऑग्राफिकल–सोसायटी ) कृषिकर्मविद्या व उद्यानविद्या यांचा प्रसार करणारी सभा ( आग्रिहॉर्टिकल्चरल सोसायटी ) या संस्थांशींही रावसाहेबांचा संबंध होता. यांपैकीं पहिल्या सभेचे कांहीं गृहस्थांच्या आग्रहामुळें ते चिटणीस झाले होते.

आतां राहिल्या दोन संस्था, युनिव्हर्सिटी व म्युनिसिपालिटी. १८६२ सालीं रावसाहेबांस युनिव्हर्सिटीचे 'फेलो' नेमण्यांत आलें. तेव्हांपासून त्या संस्थेसंबंधानें जेवढीं म्हणून कार्यें त्यांनीं करण्याचीं असत तेवढीं त्यांच्याकडून आस्थापूर्वक बजाविलीं जात. शिवाय मराठी, सिंधी व गुजराथी या भाषांसंबंधानें परीक्षकाचें कामही अनेक प्रसंगीं त्यांच्याकडे होतें. एल्. एल्. बीच्या परीक्षेंतही परीक्षक असण्याचा मान त्यांनीं सतत चवदा वर्षें भोगिला. परीक्षक या नात्यानें त्यांनीं आपलें काम वेळेवर व निःपक्षपातानें केलें. हायकोर्टामार्फत होणाऱ्या वकिलीच्या व मुन्सफीच्या परीक्षांतही ते परीक्षक असत. उमेदवारांना छळण्याचा त्यांचा स्वभाव नसे; परंतु त्यांनीं संपादन केलेलें ज्ञान कसास लावण्याचा त्यांचा मोठा कटाक्ष असे. यावेळीं युनिव्हर्सिटीमध्यें ज्या प्रश्नांचें विवेचन झालें त्यांमध्यें विशेष महत्त्वाचा प्रश्न म्हटला म्हणजे वरिष्ठ अभ्यासक्रमांतून एतद्देशीय भाषांचें उच्चाटन हा होय. रावसाहेब पाठशाळेंत शिकत होते तेव्हां संस्कृत, लॅटिन, ग्रीक इत्यादि भाषांचा अभ्यासक्रमांत समावेश केलेला नसे. पुढें युनिव्हर्सिटीची स्थापना झाली तेव्हां या भाषांच्या अध्ययनास पाठशाळेंत चालू असलेल्या अभ्यासांत स्थळ मिळालें; तथापि देशीभाषांचें विद्यापीठामधून केवळ निष्कासन झालें नाहीं. नंतर कांहीं कालानें प्राचीन भाषांविषयीं विशेष अभिमान बाळगणाऱ्या अशा कांहीं अधिकाऱ्यांनीं देशीभाषांस विद्यापीठांतून बहिष्कृत करण्याचा प्रश्न उपस्थित केला. या बहिष्काराविरुद्ध जी कांहीं थोडी मंडळी होती त्यांपैकीं रावसाहेब एक होते. त्यांनीं मोठ्या नेटानें देशीभाषांचा पक्ष स्वीकारून प्रतिपक्षास विरोध केला; परंतु अखेरीस प्रतिपक्षाचा जय झाला. विद्यापीठांतील अभ्यासक्रमांत सर्व विषयांचा समावेश असावा असें रावसाहेबांचें मत होतें. सर्व विषयांचें थोडें बहुत ज्ञान सर्वांस असणें आवश्यक आहे असा त्यांचा आग्रह असे; परंतु परीक्षांची संख्या वाढवून किंवा परीक्षा दिवसानुदिवस अधिक कठिण करून विद्यार्थिजनांस जिवापाड श्रम करावयास लावणें त्यांस अभिमत नव्हतें.

१८६३ सालीं रावसाहेबांस 'जस्टिस ऑफ ध पीस ' हें पद प्राप्त झालें. तेव्हांपासून त्यांचा मुंबईंतील म्युनिसिपालिटीशीं संबंध जडला. १८७२ सालचा कायदा होण्यापूर्वीं मुंबई शहरांत स्वच्छता ठेवण्याची व तत्रस्थ जनांच्या आरोग्याचें रक्षण करण्याची सर्व व्यवस्था नांवाला ' जस्टिस आफ धि पीस ' हा मान पावलेल्या गृहस्थांकडे असे. ' नांवाला ' असें म्हणण्याचें कारण हेंच कीं, सर्व कारभार त्यां-

च्या तंत्रानें चालत नसून त्या संबंधाची हकीकत त्यांच्या कानावर मात्र घालण्यांत येत असे. वास्तविक सर्व अखत्यार ह्मटला ह्मणजे सरकारानें नेमलेल्या युरोपियन अधिकाऱ्याकडे असे. रावसाहेब ' जस्टिस आफ ध पीस ' झाल्यावर थोड्याच काळांत प्रसिद्ध क्राफर्ड साहेब यांच्या हातीं सर्व अधिकाराचीं सूत्रें आलीं. बुद्धिमत्ता, श्रमशीलता व उत्साहशालिता या गुणांविषयीं साहेबमजकुरांची पहिल्यापासूनच प्रसिद्धि होती; परंतु या गुणांसमवेत उच्छृंखलपणा व उधळेपणा हे दोषही त्यांच्या अंगीं होते. शहराची सुधारणा करण्याचे कामीं क्राफर्ड साहेब अत्यंत दक्ष असत. परंतु उद्दिष्ट कार्य सिद्धीस नेतांना अवाचा सवा खर्च करण्याची त्यांची चाल असे. जस्टिस आफ ध पीस मंडळीचें सामर्थ्य त्यांनीं पूर्णपणें ओळखलें होतें. शिवाय युरोपियन अधिकाऱ्यांविरूद्ध आचरण करणें ह्मणजे महापातक समजणाऱ्या कांहीं पारशी व गुजराथी गृहस्थांस क्राफर्ड साहेबांनीं आपलेंसें करून घेतलें होतें. युरोपियन ह्मटला ह्मणजे त्याच्याशीं विरोध करावयाचा असा रावसाहेबांचा स्वभाव नसे. इतकेंच नव्हे तर अध्ययनपरता, परिश्रमशीलता, संकेतपालन इत्यादि गुणांमुळें युरोपियन लोकांविषयीं रावसाहेबांच्या चित्तांत पूज्यबुद्धि वसत असे, व विशेष कारणाशिवाय त्यांचें मन दुखविण्याची त्यांची इच्छा नसे. क्राफर्ड साहेब मुंबईंत आले त्यापूर्वींच त्यांचा व रावसाहेबांचा परिचय होता; परंतु १८६९ सालापर्यंत दोघांनींही एकमेकांस चांगलें ओळखिलें नव्हतें असें दिसतें. त्यावर्षीं क्राफर्ड साहेबांचा अव्यवस्थित कारभार व त्यांची बेसुमार अरेरावी सहन न होऊन रावसाहेबांनीं त्यांच्याशीं विरोध आरंभिला. कोणतेंही कार्य हातीं घेतलें ह्मणजे त्याचा पुरता शेवट करण्याचा रावसाहेबांचा बाणा असे व तसाच प्रकार या बाबतींतही घडून आला. जस्टिस आफ ध पीस हें उपपद धारण करणारांपैकीं जेवढे ह्मणून लोक त्यांच्या उद्देशास अनुकूल असण्याचा संभव होता त्यांच्या वारंवार सभा भरवून भावी कार्याचा क्रम ठरविण्याचा प्रयत्न रावसाहेबांनीं केला. आतां अनुकूल असावी अशा समजुतीनें जमविलेली सर्वच मंडळी खरोखरच अनुकूल होती असें मात्र नव्हतें. कांहीं गुजराथी व पारशी गृहस्थ आंतून क्राफर्ड साहेबांच्या पक्षाचे असून वरकरणीं मात्र रावसाहेबांस त्यांनीं आरंभिलेला उद्योग नेटानें चालविण्यास भर देत होते. हा प्रकार प्रथम रावसाहेबांच्या लक्ष्यांत आला नाहीं. या ज्या खासगी सभा भरत त्यांजमध्यें क्राफर्ड साहेबांच्या वर्तनावर मनसोक्त टीका करण्यांत येत असे व ही टीका करण्यांत रावसाहेब अग्रेसर असत. अशा प्रसंगीं क्राफर्ड साहेबांच्या पक्षाचे जे गृहस्थ हजर असत ते मागाहून सर्व हकीकत साहेबमजकुरांस तिखटमीठ लावून सांगत. त्यामुळें क्राफर्ड साहेबांच्या चित्तांत रावसाहेबांविषयीं द्वेषबुद्धि अधिकच वाढत चालली. हा प्रकार डाक्टर भाऊ दाजी यांच्या कानावर आला, तेव्हां त्यांनीं रावसाहेबांस सावध करण्याचा प्रयत्न केला. त्यावेळीं रावसाहेबांनीं उत्तर केलें कीं, अशा गृहस्थांनीं त्यांच्या कृष्णकारस्थानाची शिकस्त केली तरी आपल्यास भिण्याचें मुळींच कारण नाहीं. अशा रीतीनें निर्भयपणें रावसाहेबांनीं क्राफर्ड साहेबांशीं विरोध आरंभिला. यानंतर प्रथमच जेव्हां जस्टिस मंडळीची सभा भरली तेव्हां क्राफर्ड साहेबांनीं रावसाहेबांस ' लोकांनीं नेमलेले प्रतिपक्षी ' या

अभिधानानें आव्हान केलें. शिवाय त्या दिवशींच्या सभेंत क्राफर्ड साहेबांनीं कांहीं गृहस्थांचा उपमर्द केला. आपल्याशीं जो कांहीं मंडळीनीं विरोध आरंभिला तो केवळ आपण युरोपियन ह्मणून; बाकी वस्तुत: आपल्या आचरणांत लोकांस गैर वाटण्यासारखें कांहीं नाहीं अशा प्रकारचा कोटिक्रम त्यांनीं लढविला. याप्रसंगीं ज्या गृहस्थांचें क्राफर्ड साहेबांस पाठबळ होतें त्यांमध्यें डाक्टर बर्डवुड हेही होते. क्राफर्ड साहेबांविरुद्ध असणाऱ्या गृहस्थांचें आचरण प्रतिष्ठितपणास शोभण्यासारखें नाहीं असें बर्डवुडसाहेब ह्मणाले. ही गोष्ट रावसाहेबांस फारच विलक्षण वाटली, व त्यांनीं बर्डवुड साहेबांस अप्रशस्तरीतीनें वर्तन केल्याबद्दल दोष दिला. याच सुमारास रावसाहेब एकदां टक्कर साहेबांस भेटावयास गेले, त्याप्रसंगीं सहजच वरील विषय निघाला. तेव्हां टक्कर साहेब ह्मणाले कीं, या प्रकरणीं क्राफर्ड साहेब व त्यांचे प्रतिपक्षी या दोघांचेंही करणें रास्त नाहीं; परंतु त्यांनीं अशी मात्र विनंती केली कीं, मुंबई शहराची सुधारणा व्हावी एवढ्याच साठीं सर्वांनीं क्राफर्ड साहेबांस मदत करावी. रावसाहेब ह्मणाले कीं, क्राफर्ड साहेब आपलें वर्तन सुधारतील तर सर्व कारभार मौजेनें चालेल. परंतु जोंपर्यंत अविचाराचें व अरेरावीचें आचरण सुधारण्याविषयीं साहेबमजकुरांची प्रवृत्ति होणार नाहीं तोंपर्यंत हा प्रकार बंद पडणार नाहीं. टक्कर साहेबांची जशी समजूत होती तशीच दुसऱ्याही कित्येक युरोपियन गृहस्थांची होती. तथापि क्राफर्ड साहेब कोणत्याच रीतीनें आपलें आचरण सुधारण्यास तयार होईनात. त्यांस सरकारचें पूर्ण पाठबळ होतें असें दिसतें; कारण कीं, जस्टिस आफ ध पीस मंडळीमध्यें जेव्हां क्राफर्ड साहेबांविरुद्ध कट झाला तेव्हां त्यांच्या तर्फे बहुमत व्हावें ह्मणून सरकारानें नवे जस्टिस आफ–ध–पीस बनविले. तथापि रावसाहेबांनीं व त्यांच्या पक्षाच्या मंडळीनें आपला क्रम सोडिला नाहीं. रावसाहेबांस कांहीं पारशी व कांहीं युरोपियन गृहस्थांचें पूर्ण साहाय्य होतें. या पारशी गृहस्थांमध्यें प्रमुख ह्मटले ह्मणजे प्रसिद्ध **नवरोजी फरदुनजी** हे होत व युरोपियन गृहस्थांमध्यें **फार्बस** नांवाचे गृहस्थ होत. क्राफर्ड साहेबांनीं शहरसुधारणेचा एक प्रचंड काल्पनिक व्यूह रचिला होता, व संकल्पाची सिद्धि करण्यासाठीं म्युनिसिपालिटीच्या तिजोरींत पैसा नव्हता ह्मणून त्यांनीं लाखों रुपये कर्ज काढिले. तेव्हां दिवाळें निघण्याची पाळी आली. कसें झालें, तरी असा प्रकार फार दिवस चालणें अशक्य होतें. अखेरीस सरकारानेंही आपले हात टेंकले व क्राफर्ड साहेबांना आपलें चंबूगवाळें आटपून पळून जावें लागलें. त्यांच्या मागून होप साहेबांची नेमणूक झाली. त्यांनीं काटकसर करून खर्च बेतांत आणिला आणि सर्व बाबतींत नेमस्तपणाचें धोरण ठेविलें. असें झालें तेव्हां पूर्वीप्रमाणें कुरकुर करण्यास लोकांना जागा राहिली नाहीं खरी; परंतु मूळ कारभाराच्या पद्धतींतच फरक केल्याशिवाय पूर्व प्रकाराचें निवारण होण्याचा संभव नव्हता, ही गोष्ट प्रमुख मंडळीच्या लक्ष्यांत येऊन चुकली होती; व तत्संबंधीं कांहीं तरी नीट व्यवस्था लावण्याकडे त्यांचें चित्त वेधलें होतें. ही जी वाटाघाट सुरू झाली तिची परिणति १८७४ सालीं झालेला म्युनिसिपालिटीचा कायदा होय. क्राफर्ड साहेबांशीं विरोध करण्यांत रावसाहेबांनीं जे श्रम केले ते केवळ व्यक्तिविषयकद्वेषबुद्धीनें प्रेरित नव्हते. सार्वजनिक हित हा त्यांत मुख्य

हेतु होता व तो हेतु साधतांना रावसाहेबांस म्युनिसिपालिटीच्या कारभारासंबंधानें जी माहिती मिळवावी लागली तिचा त्यांस पुढें फार उपयोग झाला. म्युनिसिपालिटीसंबंधानें रावसाहेबांनीं केलेलीं विधानें प्रमाणभूत मानण्यांत येऊं लागलीं व कायदा करण्यापूर्वी खुद्द गव्हर्नर साहेबांनींही त्यांची सल्ला घेतली. त्यावेळीं **सर सेमोर फिट्झरल्ड** हे गव्हरनर होते. तारीख २९ आक्टंबर १८७१ रोजीं त्यांनीं रावसाहेबांस विनंती केल्यावरून ते त्यांच्या भेटीस गेले. रावसाहेब व गव्हर्नर साहेब यांचा संवाद सव्वा तीन तास झाला. म्युनिसिपालिटीच्या व्यवस्थापक मंडळीमध्यें नगरनिवासिजनांचे प्रतिनिधि असणें अगदीं आवश्यक आहे असें रावसाहेबांनीं निक्षून सांगितलें. गव्हर्नर साहेबांनीं स्पष्टपणें असें कळविलें कीं, त्यांच्या मंत्र्यांना ही योजना बिलकुल संमत नाहीं. तेव्हां रावसाहेबांनीं उत्तर केलें कीं, हिंदुस्थानाची हवा त्यांच्या अंगीं फार दिवस मुरून गेल्या कारणानें प्रतिनिधिसत्ताक व्यवस्थेचें श्रेयस्करत्व त्यांच्या लक्ष्यांतून मुळींच गेलें असावें. हें उत्तर गव्हर्नर साहेबांना फारच समर्पक वाटलें. असो. या एकंदर प्रकरणांत रावसाहेबांनीं जी कार्यनिष्ठा, कर्तव्यपरता, श्रमशीलता, व अभीरुता दाखविली त्यामुळें त्यांची प्रतिष्ठा विशेष वाढली, व सार्वजनिक हितासाठीं झटणाऱ्या प्रमुख मंडळींत त्यांची गणना होऊं लागली.



[ लि. आ. वि. ]

## विषवृक्ष.

ही एक कादंबरी आहे. वंग-देशस्थ प्रख्यात कादंबरीकार **बंकीमचंद्र चतरजी** यांनीं ही मूळ बंगाली भाषेंत लिहिली. तिचें **मिसेस नाइट** नामक एका आंग्लस्त्रीनें इंग्रजींत रूपांतर केलें. त्याच्या आधारानें रा. रा. **विष्णु सिताराम देव** यांनीं ही मराठींत उतरली आहे.

**बंकीमचंद्र चतरजी, रमेशचंद्र दत्त, तारकनाथ गांगोल** आणि **जोगेंद्रनाथ चतरजी,** वगैरे वंग-देशस्थ ग्रंथकार यांच्या ग्रंथांचीं भाषांतरें प्रथमतः इंग्रजींत होऊन मग त्यांवरून त्यांचें मराठींत रूपांतर होऊन यावें ही गोष्ट अत्यंत असमाधानाची आहे; इतकेंच नव्हे पण आमच्या मतें ती अत्यंत लांछनाची आहे. आमच्या आचारविचारांचें व रीतीभातींचें ज्या लोकांस फारसें ज्ञान असण्याचा संभव नाहीं त्या ५००० मैलांपलीकडील लोकांनीं येऊन आमच्या देशांतील ग्रंथांचीं इंग्रजींत भाषांतरें करावींत व नंतर त्यांवरून आमच्या पैकीं कोणीतरी तीं मराठींत उतरावींत हें लांछनास्पद नव्हे तर काय ? मोठमोठ्या तात्विक विषयांवरील शास्त्रीय ग्रंथांसंबंधानें एक असो, पण नाटकें कादंबऱ्या यांसारख्या गोष्टींसंबंधानेंही हाच प्रकार असावा ही मोठ्या दिलगिरीची गोष्ट आहे. या संबंधाच्या सद्यःस्थितिकडे पाहतां आस्था व उत्साह यांचा पूर्ण अभाव असल्याचें स्पष्ट दिसत आहे. आंग्लदेशीय लोकांनीं, हिंदुस्थानांतील बारिक बारिक प्रांतिक भाषांचाही अभ्यास व व्यासंग करावा, आणि आम्हीं इतके जवळ जवळ असूनही आम्हांस एक-

मेकांच्या भाषाही येऊं नयेत, ही केवढी असमाधानाची अर्थात् खेदाची गोष्ट आहे ? परंतु त्यांत मोठेंसें आश्चर्य आहे असेंही नाहीं. कारण आपल्या प्रांताची—अथवा देशविभागाची मर्यादा सोडून जाण्याचेंच अगोदर फार थोड्या मंडळीच्या नशीबीं येतें. कारण आमच्या सुशिक्षीत मंडळींपैकीं बहुतेक सारी मंडळी नोकरीच्या मागें लागलेली; दुसरी काबाडकष्ट करणारी मंडळी शेतीभाती व इतर आपल्या उद्योगधंद्याच्या मागें लागलेली; तिसरा सधन असा व्यापारीवर्ग तोही मुंबई, अमदाबाद यांच्या पलीकडे जातो कशाला ! गेलाच तरी तो भाषाध्ययनाच्या पंचाइतींत आणि यातायातींत पडतो कशाला ? एकदरींत ह्या प्रकारच्या परिस्थितीमुळें आमच्या शेजाऱ्या स्वदेशबंधूच्या भाषेसही आपण असे अगदीं परके झालों ह्मणून फार वाईट वाटतें. यापुढें तरी आमच्यापैकीं नाटक व कादंबरी यांच्या भजकांनीं—साधल्यास थोडे परिश्रम करून—मूळ भाषेंतूनच त्या महाराष्ट्र भाषेंत आणल्यास महाराष्ट्रीयांवर, अर्थात् महाराष्ट्रभाषेवर, त्यांचे फार उपकार होतील. प्रकृत ग्रंथाचे रूपांतरकार रा. रा. देव यांनाही आमची हीच विनंती आहे. कारण बंगालीचें इंग्रजींत रूपांतर होत असतां इंग्लिशांच्या देशरिवाजाला साजतील असे योग्य फेरफार एडविन आर्नोल्ड यांनीं करून तें १८८४ मध्यें लंडनमध्यें छापल्याचें देव आपल्या प्रस्तावनेंत लिहितात यावरून इंग्रजी रीतरिवाजांचा छटा यांत कोठें येतो कीं काय ह्मणून आह्मांस फार भीति वाटत होती; व आमच्या दुर्दैवानें अंशतः ती खरीही झाली आहे, ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. आमच्या मतें तरी निदान रा. देवांनीं असा प्रकार फारसा न होऊं देण्यासंबंधानें बरीच सावधगिरी ठेविली आहे यांत बिलकुल संशय नाहीं; तरी देखील मूळ इंग्रजी भाषांतर पुढें असल्यामुळें कांहीं ठिकाणीं आंग्लदेशीय रीत. रिवाजांची झांक उतरली गेली आहे.

असो, ही एक गोष्ट. आतां दुसरी गोष्ट ह्मटली ह्मणजे ही कीं, विषवृक्षाचें मूळ बंगालींत लिहिलें गेल्यावर त्याचें इंग्रजी भाषांतर ७८ वर्षांनीं होतें, व त्यानंतर १३ वर्षांनीं त्याचें मराठींत रूपांतर होउन तें आमचे हातीं पडतें ! ह्मणजे मूळ ग्रंथ झाल्यापासून सुमारें १९।२० वर्षांनीं त्याची प्रतिकृति आह्मांस मराठींत मिळते, ही किती असमाधानाची गोष्ट ! व यांत द्राविडीप्राणायाम तरी किती ! शिवाय मूळ ग्रंथावर इंग्रजी पेहेराव चढला, किंवा त्याच्या रीतीभातीसंबंधाचे फेरफार त्यांत आले कीं मुळच्या अव्याजमनोहर स्वरूपाची थोडीबहुत हानि ही झालीच पाहिजे; त्यास थोडीबहुत कुरूपताही आलीच पाहिजे; देशरिवाज, लोकस्थिति, वगैरेचाही थोड्या बहुतप्रमाणानें त्यांत लोप झालाच पाहिजे. ह्या गोष्टी सर्वथा टाळणें बिलकुल शक्य नाहीं; आणि ह्मणूनच मूळ ग्रंथावरूनच अशीं रूपांतरें अथवा भाषांतरें इतर प्रांतिक भाषांत होणें हेंच सर्व दृष्टीनें प्रशस्त होय. एवढ्यानें इतर प्रांतिक भाषा शिकण्याकडे आमच्या कांहीं सुशिक्षित वर्गांतील मंडळीचें जरी लक्ष्य पोंचलें तरी तो आह्मांस मोठाच लाभ होईल यांत बिलकुल संशय नाहीं. आणि आमच्या सुशिक्षित वर्गापैकीं कांहींनीं जर मूळ ग्रंथांशीं आपल्या महाराष्ट्रभाषाभिज्ञ वाचकवर्गांचा आपल्या भाषांतरांहीं परिचय करून देण्याचें कांहीं काळ मनावर घेतलें तर वाचकांसही मूळ ग्रंथ कसेकाय लिहिले आहेत

ते पहावें अशी साहजीकच केव्हांना केव्हां तरी जिज्ञासा उत्पन्न होईल; व ह्या जिज्ञासावृत्ती-करितां मूळ हृदयंगम निर्झराकडे धांव घेण्यासही कोणी उद्युक्त होतील; व ह्या सर्वांचें श्रेय अर्थातच रा. देव अथवा त्यांच्या सारख्या दुसऱ्या सुशिक्षित मंडळीसच मिळणार, हें उघड आहे. पण हा आनंदाचा दिवस येईल तो सुदिन. इतका प्रस्ताव करून आह्मी प्रकृत "**विषवृक्षा**"चें निरीक्षण करण्यास सरसावतों.

कवि काय, नाटककार काय, अथवा कादंबरीकार काय, त्याच्या अथवा त्याच्या कल्पनेच्या सभोंवार जी परिस्थिति असते तिच्यांतूनच तो भिन्न भिन्न प्रकृति, स्थिति व प्रसंग निवडून काढून मग त्यांची यथायोग्य जिथल्या-तिथें मांडणी करून ते तो लोकांच्या पुढें मोठ्या ठाकठिकीनें मांडतो. कवि व कादंबरीकार आपल्या अद्भुत कल्पनाशक्तीच्या जोरावर उंच उंच भराऱ्या मारून केव्हां विलक्षण कल्पनांनीं, केव्हां अजब कृतींनी, आणि केव्हां अलौकिक आणि आल्हादकारक अशा प्रयुक्तींनीं वाचकांच्या मनास आल्हाद देतील, त्यांच्यांत कौतुक उत्पन्न करतील, व प्रसंगीं त्यांस ते ज्ञानामृताचे चषकही पाजून अगदीं तल्लीन करून सोडतील; व हें करावयास त्यांस अतिशयोक्तीच्या व असंभाव्य अशा गोष्टींचाही अवलंब करावा लागेल. अशी गोष्ट नाटककारांची नाहीं. तेही अशाच तऱ्हेचे कांहीं प्रसंग घेऊन, त्यांत कल्पनेची, अतिशयोक्तीची, असंभाव्य गोष्टींची, इतर वर्णनाची, अथवा तदितर निरर्थक अलंकारांची वगैरे कांहीं एक भर न घालतां, त्यांनीं नाटकास जो प्रसंग घेतला असेल तो जसा कांहीं घडतच आहे अशा रीतीनें लिहून ते त्याची मांडणी करीत असतां, त्या प्रसंगाच्या परिस्थितीचें हुबेहुब प्रतिबिंब आपल्या कृतींत उमटवून देऊन, लोकवृंदांत आढळून येणाऱ्या भिन्न भिन्न स्वभावांच्या पात्रांचीं त्यांत चित्रें रेखाटून, लोकांस जागजागीं जागृत करून, आपल्या आयुष्यक्रमांत जागे राहण्याची इशारत देतील. अशा प्रकारें मनोरंजन करितां करितां वाचक, श्रोतृवृंद, अथवा प्रेक्षक यांस शिक्षण देण्याचा—अथवा जागे करण्याचा ह्मणा—अजब राजमार्ग या मूर्तित्रयाच्या हातांत आहे. आतां या मूर्तित्रयापैकीं कोणी जर ह्या राजमार्गाचें फाटक अजीबात बंद करून टाकलें अथवा ह्या मार्गांत इतस्ततः कांटेकुटे पसरून दिले, व त्या योगें लोकांची वाटमार झाली, अथवा ते त्या कांट्याकुट्यांत पडले, तर ज्याच्या हातीं त्या फाटकाच्या किल्ल्या आहेत अथवा ज्यानें हे कांटेकुटे पसरले तोच या सर्व घातपाताबद्दल जबाबदार धरला जाईल हें अगदीं उघड आहे. आणि ह्मणूनच कवि, कादंबरीकार, व नाटककार या त्रयीवर लोकशिक्षणाची—अर्थात् लोकहिताची—बरीच जबाबदारी आहे. ही जबाबदारी ओळखून प्रकृत कादंबरीकारांनीं आपलें कर्तव्य कसें काय उरकलें आहे तें आपल्यास पाहिलें पाहिजे.

प्रकृत कादंबरी वाचून, कादंबरीच्या नांवासंबंधानें विचार करूं लागतां तें अगदीं यथायोग्य दिलें आहे असें वाटतें. प्रकृत कादंबरींतील नायक **नगेंद्रनाथ** ह्याच्या अंतरंगांत **कुंदनंदिनीच्या** प्रथम दर्शनानेंच ह्या भयंकर व सर्वव्यापी विषवृक्षाचें कसें बीजारोपण झालें त्या विषवृक्षाचा पुढें कसकसा विस्तार झाला, व त्याला लटकणाऱ्या कडू जहर फळांच्या सेवनामुळें त्यांच्यावर कसकसे भयंकर प्रसंग आले, व शेवटीं **कुंदनंदिनीस** विष खावें लागून आप-

ला कसा अंत करून घ्यावा लागला, ह्याचें; व तिकडे उपनायक **देवेंद्रनाथ** ह्याच्या ठिकाणीं ह्याच विषवृक्षाचें बीजारोपण होऊन त्याच्या कटुतर फलांच्या आस्वादानें त्यास कोणच्या प्रकारचें कौटिल्य करावें लागलें; इष्ट हेतु साध्य करण्याकरितां त्यास किती नीचपणा पत्करावा लागला, व ह्या विषवृक्षावरच–पण जरा उंचावर-लटकणारें फळ त्यास प्राप्त न होतां आपण होऊनच त्याच्या हातीं पडणाऱ्या फळाच्या चाखण्यानेंच त्याजवर कसकसे प्रसंग ओढवले व त्यांतच त्याला व त्याची वांटेकरीण जी **हिरा**-कुंदनंदिनीच्या हातीं भयंकर विषाची जालीम गोळी टाकणारी **नगेंद्रा**च्या पदरीं असलेली दुष्ट मत्सरी दासी–तिला वेड लागून भ्रम होऊन आपापल्या प्राणांचे कसकसे बळी द्यावे लागले, याचें मोठें मनोहर चित्र काढून, ग्रंथकारांनीं आपल्या अजब लेखनचातुर्यानें व मनुष्यस्वभावाच्या योग्य ज्ञानानें निरनिराळ्या प्रकृतींचीं पात्रें निर्माण केलीं आहेत; आणि त्यांच्यावर वरील विषवृक्षाच्या फलांच्या सेवनानें कसकसे भयंकर प्रसंग आले हें दाखवून, आपल्या ग्रंथांच्या वाचकवृंदाच्या व श्रोतृवृंदाच्या ठिकाणीं त्या सर्वव्यापी विषवृक्षासंबंधानें प्रतिकूल ग्रह व शहारे येण्याजोगे स्पृहणीय भीतिविकार जागृत करून, प्रस्तुत कादंबरीकार त्यांचेवर असलेल्या लोकशिक्षणाच्या जबाबदारींतून मोठ्या सौकर्यानें पार पडले आहेत, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे.

मंजुघोषा, मोचनगड, वसंतमाधव, विश्वासराव, विचित्रपुरी आदीकरून कादंबऱ्यांची जी एकदां एक जबरदस्त लाट उसळून गेली तिचा प्रकार कांहीं वेगळा, व अलीकडे "आजकालच्या गोष्टी" "पण लक्ष्यांत कोण घेतो", "जग हें असें आहे" इत्यादि कादंबऱ्यांचा प्रकार कांहीं वेगळा. पहिल्या प्रकारच्या कादंबऱ्यांत पुष्कळ असंभाव्य गोष्टी संभवनीय कल्पून ग्रंथकार त्या आपापल्या ग्रंथांतून ग्रथित करितात; पण वाचकांचा अथवा श्रोत्यांचा त्या गोष्टींवर क्वचितच विश्वास बसतो. दुसऱ्या प्रकारच्या कादंबऱ्यांत सर्व संभाव्य अशाच गोष्टी ग्रथित केलेल्या असतात. त्यांत असंभनीय व अशक्य गोष्टी क्वचित् येतात, आणि ह्याचमुळें वाचकांस अथवा श्रोत्यांस त्या सहज विश्वास्य अशाच असतात. एका प्रकारांत कल्पना अधिक, आणि दुसऱ्यांत खरेपणा अथवा हुबेहुबपणा अधिक; यामुळें अर्थातच लोकशिक्षणाचें काम उरकण्यास दुसरा प्रकारच जास्त सोईचा व हिताचा. आणि ह्मणून पहिल्या प्रकारापेक्षां दुसरा प्रकारच–आमच्या मतें तरी–श्रेष्ठ होय. पहिल्या प्रकारच्या कादंबऱ्यांत असंभाव्य गोष्टी ग्रथित केलेल्या असतात ह्मणून त्यास आपण आपल्या सोईकरितां कादंबरीचा "**असंभाव्य**" व दुसऱ्यास "**संभाव्य**" प्रकार असें ह्मणूं. ह्मणजे प्रकारांसंबंधानें उल्लेख करितांना प्रत्येक वेळीं त्यांची व्याख्या करीत बसायास नको. अस्तु.

वर '**संभाव्य**' कादंबरीचा जो प्रकार सांगितला त्या प्रकारांत प्रकृत कादंबरी मोडते. तेव्हां ही गोष्टही एक प्रकारानें आनंदाचीच आहे.

प्रकृत कादंबरींत प्रसंगानुसार ग्रंथकारांनीं सृष्टिवर्णनाचेही कांहीं प्रसंग आणले आहेत, व ते मोठ्या बहारीचे साधले आहेत. कादंबरीच्या आरंभींचेंच ग्रीष्मकालचें वर्णन; दर्या, तुफान व नगेंद्राची होडी याचें वर्णन,–हा वर्णनप्रकार आमच्या महाराष्ट्र वाचकमंडळास तरी नवीनच होय;—**कुंदेस** स्वप्नांत दृष्टीस पडलेलें तें

विलक्षण चंद्रबिंब; त्याच्या सभोंवतीं असलेलें तें खळें आणि त्यांतून दिसणारी तिच्या आईची ती तेजस्वी मूर्ती;—हा सर्व प्रकारही महाराष्ट्र वाचकांना नवाच आहे. आमच्या एका मित्रानें **सरोजिनी** नामक एका बंगाली नाटकाचें मराठींत केलेलें रूपांतर आमच्या पाहण्यांत आलें, त्यांतही अशाच प्रकारच्या चंद्रबिंबाच्या भोंवती असणाऱ्या प्रकाशमान खळ्यांतून वाचकांस एका देवीचें दर्शन होत आहे. ह्या नाटकाचा कर्ता कोणी **ज्योतींद्रनाथ** अथवा **जोतेंद्र** असल्याचें त्यांनीं सांगितल्याचें स्मरतें. यावरून असें एक अनुमान होतें कीं, वंगदेशस्थ कादंबरीकार, नाटककार, व कवि यांच्या ग्रंथांत नभोमंडलांतील आत्यद्भुत गोष्टींपैकीं मनुष्यास एकदम थक्क करून सोडणारी अशी एखादी तरी गोष्ट असतेच असते; व त्यामुळें त्यांच्या कृतीस एक प्रकारचें गांभीर्य व एका प्रकारची उदात्तता प्राप्त होते, असें आह्मांस यदृच्छेनेंच वाटूं लागतें. असें कां वाटूं लागतें असें जर कोणी विचारील तर त्यास आह्मांस कांहीं चांगलेसें समाधानकारक उत्तर देतां येणार नाहीं हें जरी खरें आहे, तरी अशीच कांहीं त्यांत जादू आहे एवढें मात्र खरें. एकाच ग्रंथांत अशा प्रकारच्या पुष्कळ कल्पना येत्या तर मात्र मग आह्मीं अशा कादंबऱ्यांस '**असंभाव्य**' प्रकारांत ओढलें असतें. पण प्रस्तुत कादंबरीसंबंधानें तसें करणें कधींही न्याय्य होणार नाहीं; कारण अशा प्रकारचे अदृष्टपूर्व सृष्टिचमत्कार आपण स्वप्नांत केव्हां केव्हां पाहतोंही. आणि ह्मणूनच ज्या कादंबऱ्यांत असे प्रकार क्वचित् आणले असतात त्या कादंबऱ्यांस '**संभाव्य**' प्रकारांत ओढण्यास कांहीं हरकत नाहीं. असो, वर सांगितलेल्या सृष्टिवर्णनाशिवाय, तिसऱ्या भागांतील नगेंद्राच्या वाड्याचें वर्णन; ८ व्या भागांतील तलाव, फुलबाग व तेथें असणारी कुंदा, व तिचे "माझी आई मला स्वप्नांत भेटल्यानंतर आकाशांत एकादी चांदणी झाली असेल काय"? ह्मणून यदृच्छेनेंच तिच्या तोंडांतून बाहेर पडणारे कोमल अंतःकरणाचे **सहज** उद्गार; **कुंदा सूर्यमुखी**च्या बोलण्यामुळें मध्यरात्रींच नगेंद्राचें घर सोडून जात आहे (भाग १० वा) त्या वेळचें रात्रीचें वर्णन; त्याचप्रमाणें ती हिरेचें घर सोडून एका भल्या पहांटेस नगेंद्राच्या वाड्याकडे परत येत आहे (भाग १२ वा) त्या प्रसंगाचें वर्णन; **शिवप्रसाद** ब्रह्मचाऱ्यास **मधुपुरा**जवळ **सूर्यमुखी** चिखलांत पडलेली सांपडत आहे त्या वेळचें वर्षाकालचें वर्णन (भाग १७); १९६ व्या पृष्ठांतील पाण्यांत प्रतिबिंबित झालेल्या आकाशाचें वर्णन; नगेंद्र सूर्यमुखीकरितां गोविंदपूर सोडून गेल्यानंतर त्याच्या त्या अफाट वाड्यांत पसरलेली ती शून्यता, व कोणाही पाहणारास उदास करून सोडणारें तें त्या वाड्याचें भयाण औदासिन्य याचें वर्णन; व सूर्यमुखीच्या खोलीचें व तेथें असणाऱ्या मनोहर व मार्मिक प्रसंगांच्या चित्रपटांचें वर्णन; हीं सर्व चांगलीं साधलीं आहेत. ह्या वर नमूद केलेल्या सृष्टिवर्णनाच्या प्रसंगांत क्वचित् प्रसंगीं जेथें एखादी नवीन कल्पना घातली आहे तेथें तर बहारच झाली आहे. हें सृष्टिवर्णनासंबधानें झालें.

आतां आपल्यास कादंबरींत आणलेल्या निरनिराळ्या पात्रांच्या स्वभावांचे जे विविध चित्रपट रेखले आहेत त्यांच्याकडे जरा लक्ष पोंचविलें पाहिजे; कारण कोणच्याही कादंबरीचें जीवित याच भागांत असावयाचें. वरील सृष्टि-

वर्णनाचे प्रकार केवळ बाह्य अलंकारांदाखल होत. यापेक्षां त्यांना जास्त किंमत देतां येत नाहीं.

सूर्यमुखीचें आपल्या पतीवरील निष्कपट व अढळ प्रेम; कुंदनंदिनी नगेंद्राच्या दृष्टीस पडल्यापासून त्याच्या वृत्तींत पडत चाललेला पालट व त्यायोगें सूर्यमुखीस लागणारा हृद्रोग; तिनें नगेंद्राच्या विनोदी बहिणीस अर्थात् कमलेस वारंवार पाठविलेलीं पत्रें; त्यांवरून नगेंद्राच्या वृत्तींत घटकोघटकीं पडत जाणाऱ्या फरकाचें तिनें लक्ष्यपूर्वक केलेलें अवलोकन व तिच्या मनोवृत्तींत त्यायोगें होणारी खळबळ; कुंदेच्या संबंधानें सूर्यमुखी जे कांहीं संशयात्मक उद्गार उच्चारते त्यापासून घडून येणारे अंतःकरण विदारण करणारे अनेक प्रसंग व ओढवून आलेली संकटपरंपरा—या सर्वांचें चित्र फारच सुरेख रेखाटलें गेलें आहे.

देवेंद्रासारखे नरपशु सुधारणेच्या व ब्रह्मसमाजाच्या पडद्याखालीं वाटेल तें साहस व हवें तें पापाचरण करण्यास कसे प्रवृत्त होतात; हिरेसारख्या चंचल, मत्सरी, अनिश्चयी मनाच्या स्त्रिया असल्या नरपशूंच्या वरील बेगडी सौंदर्यासच भुलून जाऊन विषवृक्षाच्या भयंकर जाळ्यांत अडकून भयंकर व घोर अशा पापकर्मास कशा प्रवृत्त होतात; शेवटीं दोघांचेही अंत किती हृदयद्रावक व किती चमत्कारिक होत आहेत, व त्यांपासून वाचकांचे मनावर कसकसे ठसे उमटत आहेत; ह्या सर्व गोष्टींचें निरीक्षण करणें अत्यंत आल्हादकारक आहे. त्याचप्रमाणें इकडे सुरेंद्रासारखा निस्पृही, बाणेदार व निश्चयी माणूस देवेंद्रानें आपला योग्य सल्ला न ऐकल्यामुळें त्याच्याशीं असलेल्या मित्रत्वाची एकदम फारकत करून आपल्या सद्वर्तनानें वाचकांस दिपवून सोडीत आहे; त्याचप्रमाणें देवेंद्राची कजाग, तोंडाळ व दुष्ट स्त्री—जिच्यायोगें देवेंद्राला आपलें घर स्मशान वाटूं लागलें—तिचा स्वभाव; व इकडे सूर्यमुखीचा अगदीं आनंदी, हंसतमुख चेहरा व गोड मनमिळाऊ, समाधानी आणि सदासर्वकाल नवऱ्याची मर्जी धरण्याचा स्वभाव—ज्या स्वभावानें स्मशान देखील घर वाटूं लागावयाचें—अशीं दोन परस्परविरोधी स्वभावाचीं पात्रें रेखाटून ग्रंथकारांनीं एक प्रकारचें कौतुक उत्पन्न केलें आहे. त्याचप्रमाणें नगेंद्राची विनोदी, सरळ व कोमल मनाची बहीण कमला हिचे व श्रीशचंद्राचे प्रेमकलहाचे प्रसंग दाखवून त्यांचें व्यक्त केलेलें प्रेम वाचकमंडळीपैकीं अवलोकनशील मंडळीस जागजागीं खचित पहावयास मिळेल; त्याचप्रमाणें कुंदनंदिनीचा मुग्ध, प्रेमळ, भिडस्त व सहजमनोहर स्वभाव; प्रसंगानुसार त्या स्वभावास हेलकावे बसून तिच्या अंतरंगाचें जागजागीं होणारें प्रदर्शन; ती दुःखार्त झाली असतां तिच्याशीं वाचकवृंदाचें तादात्म्य होणें; ह्या गोष्टींचें लौकर विस्मरण होणें अगदीं अशक्य आहे.

" आपल्या पतीचें सुख तेंच आपलें सुख " असें मानणारी सूर्यमुखी नगेंद्राचा व कुंदनंदिनीचा पुनर्विवाह लावून देऊन मग आपण घर सोडून जात आहे तो प्रसंग; त्या वेळची तिच्या मनाची स्थिति; त्या प्रसंगानंतर नगेंद्राच्या वृत्तींत एकदम होणारा पालट; सूर्यमुखी व कुंदनंदिनी या दोघींत त्यास ह्या प्रसंगीं दृश्य होऊं लागणारें अंतर; नगेंद्राचें घर सोडून सूर्यमुखीच्या शोधार्थ निघणें; सूर्यमुखीची संकटपरंपरा व आपल्यास लौकर मरण यावें ही तिची इच्छा; त्यांतही पतिदर्शनाची

उत्सुकता; नगेंद्राचें तिच्या शोधार्थ येणें; त्याची चुकामुक; नगेंद्राचें परत आपल्या गांवीं जाणें; तेथें गेल्यावर कुंदेशीं त्यानें धरलेलें मौन; त्यामुळें कुंदेच्या मनाची झालेली निराशा; इकडे सूर्यमुखीच्या महालांत नगेंद्राचें रजनीक्रमण व पूर्वविलासस्मरण, व तेथेंच सूर्यमुखीची एकदम अचानक गांठ व दुसरीकडे निराशेची कर्तबगारी—अर्थात् हिरेनें कुंदनंदिनीस दिलेल्या विषाचें कुंदनंदिनीकडून सेवन; त्यापासून ओढवणारा कुंदनंदिनीचा तो अवसानकाल, व नगेंद्राजवळ काढलेले अत्यंत हृदयद्रावक असे तिचे उद्गार; आपल्या पतीच्या—अर्थात् नगेंद्राच्या पायांवर डोकें टेंकलें असतांच होणारें प्राणोत्क्रमण; असेंच पतीच्या पायांवर डोकें टेंकलें असतां आपल्यास मरण यावें ही सती सूर्यमुखीची अत्युत्कट इच्छा व ह्या प्रसंगीं तिच्या तोंडांतून आलेले तशा आशयाचे उद्गार; कुंदनंदिनीच्या प्राणोत्क्रमणाचें वृत्त ऐकल्याबरोबर हिरेचें फरारी होणें; तिचें वेड; तिनें देवेंद्राची घेतलेली गांठ; त्यापासून त्याला झालेला भ्रम व नंतर त्या भ्रमांतच त्याचा झालेला अंत; व त्या वेडया झालेल्या हिरेला एका बागेच्या कोपऱ्यांत आलेला मृत्यु; त्या सर्व गोष्टी कथेंघांत इतक्या मार्मिकपणानें, कुशलतेनें व बहारीनें मिश्र झाल्या आहेत कीं त्यायोगें सर्व कथौघ अत्यंत रम्य, दर्शनीय व आल्हादजनक झाला आहे; व वरील गोष्टी लौकर विस्मृतिपथगत होणें केवळ दुरापास्त झालें आहे. कादंबरीकारांनीं निर्माण केलेल्या विविध पात्रांच्या भिन्न भिन्न स्वभावांचे चाललेले अंतर्व्यापार, त्यांत प्रसंगानुसार होणारे पालट, त्यायोगें त्यांची चाललेली धडपड, या गोष्टींचे ठसे मनावर विशेष जोरानें उठतात; व यांतच कौशल्यसर्वस्व आहे असें म्हटलें असतां रास्त होईल. अस्तु.

ब्रह्मसमाज, स्त्रीशिक्षण, विधवाविवाह, स्त्रीदास्यविमोचन इत्यादि केवळ सुधारक वर्गासच प्रिय समजल्या जाणाऱ्या विषयांसंबंधानें कादंबरीकारांनीं केलेले उल्लेख व जागजागीं दर्शविलेले विचार विचार करण्याजोगे आहेत. वरची बाजू आणि खालची बाजू यांजमधील दाखविलेलें अंतर बरेंच रमणीय असून फार मार्मिकतेनें काढलें आहे. शिवाय कथौघांत योग्यस्थळीं क्वचित् सार्वत्रिक सिद्धांत ग्रथित केले आहेत तेही बहारीचे व पुनः पुनः वाचण्यायोग्य असेच आहेत. त्या सर्वांचा येथें उल्लेख करूं लागल्यास हें प्रकरण बरेंच लांबेल म्हणून तसें करितां येत नाहीं.

कांहीं ठिकाणीं पाश्चिमात्य कवींच्या कल्पनांना सदृश अशा कल्पनाही प्रसंगविशेषीं आल्या आहेत.

कुंदा तळावाच्या स्वच्छ पाण्यांत आपलें रूप पाहण्याकरितां तळावाच्या पायऱ्या उतरूं लागते, तो प्रसंग अंध कवि **मिल्टन यांनीं पॅरेडाइज लॉस्टमध्यें** वर्णन केलेल्या खालील प्रसंगाची स्मृति देतो:—(पाण्यांतच आपलें प्रतिबिंब पाहिल्यावर येणारे उद्गार )

Eve—As I bent down to look just opposite A shape within the watery gleam appeared, Bending to look on me, I started back; It started back; but pleased I soon returned, Pleased it returned as soon with answering looks Of sympathy and love;......

किती गोड प्रसंग आहे हा! अगदीं प्रथम निर्माण केलेल्या स्त्रीचा हा निसर्गनिर्मित दर्पण-ज्यांत ती आपला मुखचंद्रमा पहात आहे तो—किती मजेदार आहे बरें ? असो.

त्याचप्रमाणें **नगेंद्रा**च्या भेटीस आतुर झालेल्या **कुंदेस** नगेंद्राच्या खिडकींतून त्याच्या खोलींत शिरणाऱ्या हजारों लहान किड्यांस पाहून वाटे कीं; "त्या किड्यांचा जन्म मला येऊन मला त्यांच्या सारखा नगेंद्राच्या खोलींत जाण्यास मार्ग मिळेल काय ?" हा मनोविकार आणि पाश्चिमात्य कविकुलगुरूंच्या "रोमिओ आणि ज्युलिअट" नामक नाटकांतील नायक **रोमिओ** ह्याच्या तोंडीं—

O, that I were a glove upon that (Juliet's) hand, that I might touch that cheek.

हा उद्गार यामध्यें किती साम्य आहे ? असो.

एकमेकांस विरोध आणणारीं व युक्तिबाह्य व सारासार विचारांस न मिळणारीं अशीं कांहीं स्थळें या पुस्तकांत आढळतात. पण तीं मुळांतच असल्यास रूपांतरकारांचा त्यांत काय दोष ? कुंदेशीं कमलेचें पहिल्याच प्रसंगीचें लघाळ वर्तन (पृ. १९); तिला मोरींत ढकलून देणें; केवळ सूर्यमुखीच्या सांगण्यावरून नगेंद्राच्या प्रकृतीची कांहींच कल्पना नसतां वैद्यबोवांनीं त्यास औषध देणें (९५ पृ.); "**मध्यरात्र उलटून गेली आहे;** घरांतील सर्व माणसें भरझोंपेंत घोरत पडलीं आहेत. × + अशा वेळेस कुंदेनें × × **पहांटेच्या समयास** सूर्यमुखीचें घर सोडलें." (मध्यरात्र उलटून गेली–सर्व माणसें भरझोंपेंत–अशावेळीं पहांटेचा समय! कोण काळाचें चापल्य हें !); कुंदनंदिनीचा द्वेष करण्याची हिरेची कारणपरंपरा; **परोत्कर्षद्वेषा**मुळें हिरा कुंदेवर खवळून जात आहे तो प्रकार; संभाव्य कादंबरीच्या प्रकारास न शोभेशी "मत्सकलसुखनिधान प्राणेश्वरा," या सारखी भाषणपद्धति; ज्या **रामकृष्णराज** वैद्यानें औषधपाणी देऊन सूर्यमुखीस वांचविलें त्या वैद्याचा निरोप न घेतां सूर्यमुखीचें मधुपूर सोडून निघून जाणें; ज्या कुंदनंदिनीला आपली धाकटी बहीण समजून सूर्यमुखी वेणीफणी, न्हाणेंधुणें व देवदर्शन झाल्यावर भेटूं इच्छिते, तिची आठवण तिला वेणीफणी करितांना होऊं नये हें किती विचित्र दिसतें ! असे कांहीं कांहीं दोष दिसतात, पण चंद्रिकेंत मृगांकाचें जसें निमज्जन होतें त्याचप्रमाणें ह्या दोषांचें प्रकृत कादंबरींत आढळून येणाऱ्या गुणसंघांत निमज्जन होतें.

भाषांतरांत कांहीं ठिकाणीं इंग्रजी प्रकार आले असल्याबद्दल आम्हीं वर उल्लेख केला आहे, त्याचीं थोडीं स्थळें दाखवून परीक्षण येथेंच संपवूं:—

"देवेंद्र कुंदेशीं **मोकळिकीनें** वागतो," (पृ ३४. takes much liberty. **सलगीनें** ह्मटलें असतें तर ?); सूर्यमुखीनें कमलेला पाठविलेल्या एका पत्रांत नगेंद्राचे संबंधानें ह्मणलें आहेत:– "ज्या मला त्यांचेशिवाय ह्या जगांत दुसरी कांहींच वस्तु दिसत नाहीं, जी मी इतके दिवस × × त्यांच्या समागमाला राहिलें आहें, जिला अंतर्बाह्य कायतें तेच दिसतात, त्या मला त्यांचें हृद्गत समजतें" (पृ ९१ ; हा इंग्रजी वाक्यरचनेचा मासला); सूर्यमुखी याच पत्रांत पुढें:— "इतक्यांत **तुमच्या बंधूची** स्वारी तेथें आली." (पृ. ९२; हा इंग्रजी प्रकार. हिंदु स्त्री "इतक्यांत तिकडून येणें झालें" असें लिहावयाची); पत्राचे शेवटीं सूर्यमुखी लिहिते–"तुमचा अमूल्य वेळ व्यर्थ घालविला, याबद्दल मला माफी असावी" (पृ. ९३) हा प्रकार; "आपल्या यजमानाला हें पत्र दाखवूं नका हें मी तुह्माला शपथ घालून सांगतें"–(ही इंग्रजी तऱ्हा. "हें पत्र आपल्या यजमानाला दाखवाल तर शपथ आहे तुह्माला माझ्या

मळ्याची" ह्मणून जर सूर्यमुखी कमलेला शपथ घालती तर जास्त गोड दिसलें असतें.) कमला व श्रीशचंद्र यांची "विनोदयुक्त झटापट चालली;" कमला कुंदेस ह्मणतेः—"तुझी माझ्या दादावर फार **माया** लागली आहे, नव्हे का?" "**प्रेमाचा तडाखा;**" "**अग भोळ्या मनाचे** कुंदे;" "हिरेच्या नांवानें **त्रिवार जयजयकार** असो;" "सखे, दुसऱ्यांचीं अंतःकरणें कशी **जिंकावीं** हें मजजवळ चांगलें शिकून घे;" "वाड्यांत जाण्यापूर्वी त्यांना **घेण्याकरितां** (to receive) ह्मणून घाटावर आलेली दासी;" "सूर्यमुखीला परत घरीं येण्याचें **मन होईल**, अशाविषयीं काय उपाय करावा?" वगैरे स्थलें इंग्रजी रूपांतराच्या मानगडीचीं सूचक चिन्हें आहेत!

स्वभावविकाससंबंधानेंही कांहीं दोष आढळतात; पण कादंबरीला आटपशीरपणा आणण्याकरितां तसे दोष राहिले असावेत असा आमचा अजमास आहे. तरी पण अशीं स्थलें थोडीं आहेत. एकंदरींत प्रस्तुत कादंबरी महाराष्ट्र वाचकांनीं एकवार वाचावी, ह्मणजे त्यांस वंगदेशस्थ देशबंधूंच्या सद्यःकालीन गृहस्थितीचें, समाजाचें, आचारविचारांचें व चालीरीतींचें बरेंच ज्ञान होईल. रा. रा. देव अथवा वंगभाषाभिज्ञ कोणीतरी दुसरे कादंबरीप्रिय ग्रंथकार वंगदेशस्थ कादंबऱ्यांस जर महाराष्ट्रीय पेहेराव देऊन तद्देशस्थ ग्रंथकारांशीं आमचा परिचय करून देण्याचा सुयोग जमवून आणतील तर तो प्रसंग आह्मी मोठ्या उत्सवाचा व आनंदाचा समजूं.

---

# फिरंग्यांची इकडील हकीकत.

("डान्वर्स"च्या अगदीं अलीकडल्या इंग्रजी ग्रंथाच्या आधारानें.)

## ४. गोंवें हातीं येईपर्यंतची.

वास्कोनें लिस्बनची दिशा धरल्यानंतर, कलिकतकरानें लौकरच कोचीनकराशीं लढाई करण्याच्या हेतूनें जय्यत तयारी चालविली. फिरंग्यांशीं तह केल्यामुळें कोचीनकराचा पुष्कळ फायदा झाला होता, तो डोळ्यांत सलूं लागला आणि ह्मणूनच कलिकतकरानें कंबर बांधली, असें फिरंगी ह्मणतात. हें कारण वावगें दिसत नाहीं. शेजारी जास्त मातब्बर होऊं लागला कीं शेजाऱ्याच्या डोळ्यांत सलूं लागतो, हें खरें आहे. तरी कोचीनकराचा फायदा झाला होता तो डोळ्यांनीं पहावेना, इतकेंच कारण तंट्याचें असूं नये. फिरंग्यांनीं आरंभापासून कलिकतकरास जसें आपल्या बरोबरीच्यास वागविणें योग्य होतें, तसें वागवलेलें नव्हतें; इतकेंच नव्हे, तर एखाद्या दुस्मनाप्रमाणें किंवा दुस्मनाहूनही वाईट अशी वागणूक फिरंग्यांकडून कोचीनकरास देण्यांत आली होती. अशी वागणूक दिल्यामुळें देणारांस पहातांच किंवा तो देणारांची आठवण होतांच कलिकतकराच्या पायांची आग मस्तकीं गेल्यास नवल कोणतें? कनानूरकर, कलिकतकर, कोचीनकर या तिहींमध्यें कलिकतकरच बराच बलाढ्य दिसतो. जर कलिकतकर बळी होता, तर कोचीनकराचा कान त्यास प्रसंगीं पिळण्याची हौस झाल्यास नवल नाहीं. बळ असलें, ह्मणजे तें दाखवणारे सगळे कांहीं फंद आपोआप सुचतात. जर कोचीनकर समसमान बळी असता, तर

कलिकतकरानें कदाचित् जास्त मुत्सद्दीपणा लढवला असता व बरेच धिमेपणानें काम चालवलें असतें. पण कोचीनकराचें बळ कमी पडलें. व जर फिरंगी पाठ राखण्यास तयार नसते तर कोचीनकरास चिरडणें कलितकरास भारी न जातें. फिरंग्यांचें पाठबळ मिळाल्यामुळें कोचीनकराचा पुढें टिकाव लागूं शकला, तो भाग निराळा. आरबांचाही हातभार या लढाईच्या मसलतीस लागलेला असण्याचा संभव आहे. कलिकतचाच नव्हे तर मलबारच्या किनाऱ्यावरचा सगळा व्यापार बरींच वर्षे आरबांचे हातीं होता व इतकीं वर्षे तो निर्विघ्नपणें त्यांनीं भोगला होता. या काळीं फिरंग्यांचें विघ्न एकाएकीं व अगदीं अतर्कित असें आरबांची वाट मारण्यास सरसावलें. याप्रमाणें जें हें अकस्मात् आड आलें तें कापल्याशिवाय आरबांस दुसरी गत नव्हती. जर हें आड आलेलें कापूं नये, तर हा वेळपर्यंत हातीं लागलेल्या व्यापाराच्या कामधेनूस मुकावें—याप्रमाणें इकडे आड इकडे विहीर अशी आरबांची स्थिति झालेली दिसते. आरबांनीं मांडीवाळ करण्यास यत्न केलेले नव्हते, असें समजूं नये. आरबांनीं आपणाकडून जे बरेच यत्न केले, त्यांत यश मुळींच न येतां, उलट फाटत मात्र जास्त गेलें. आरब पाहिला कीं फिरंग्यांचा कपाळशूळ उठला, इतका दोघांचा बारावा बृहस्पति पडला होता. झणून फिरंग्यांस हांकवून देण्याच्या मसलतींत आरबांचेंही आंग बरेंच असलें पाहिजे. या प्रकारचा योग या काळीं आला व कोचीनचा राजा त्रिमम्पर याची मस्ती जिरवण्याची मसलत वास्को जातांच तंबूरिनानें केली.

ही हकीकत बरीच वेधक आहे; तशांत हिंदुस्थानांतल्या ऐतिहासीक घडामोडीस हिच्यापासून बरीच मदत झालेली आहे; झणून ही थोडी तपशीलवार देण्यांत येत आहे. आपलें ब्रीद हिंदूंनीं राखावें तसें राखलें, हें फिरंग्यांच्याच लेखावरून सिद्ध होत आहे. विपत्तींतही सत्त्व जाऊं न देणारीं आणि शब्द परत न घेतां देवावर सगळा भार टाकून आपलें ब्रीद जसेंच्या-तसेंच राखणारीं माणसें हिंदूंमध्यें पूर्वीं बरींच होतीं. याच्या उलटींही माणसें असतील; किंवा "असतील" असा संभाव्नार्थ कशास हवा? "होतीं" असा खचितार्थ वापरला, तरी काय गेलें? काळींही मेंढरें असतात, हें सुप्रसिद्ध आहे. हीण असलें, तर असलें; तें असूंद्या बापडें. सगळेंच हीण, अव्वल माल कानांत—अशी बरीक स्थिति खेद उत्पन्न करणारी होईल. अशी खेद उत्पन्न करणारी स्थिति हिंदुस्थानांत पूर्वीं खचित नव्हती. तंबुरीन लढाईची जय्यत तयारी करीत आहे, या हकीकतीचा वास येतांच कित्येक दर्वाऱ्यांनीं फिरंग्यांस तंबुरिनाचे ताब्यांत देऊन तंटा मिटविण्याची मसलत त्रिमम्परास दिली. मसलत देणारे हिंदू, मसलत घेणाराही हिंदू. पण मसलत देणारे उघड अगदीं खालच्या पायरीवरच्या टीचभर चिखलांत लोळण्याच्या लायकीचे होते; मसलत घेणारा होता तो उघड अगदीं वरच्या पायरीवर खेळणारी खुली हवा खाणारा होता. तमोगुण व सत्वगुण, अगर काळोख व उजेड, यांचो सांगड पडणार कशी? अर्थातच असली भिकार मसलत थोर मनाच्या त्रिमम्परानें भिरकावून दिली.

अशा प्रसंगीं सोड्रे मन्वारांसहित कोचीन मुक्कामीं आला होता, त्यास वखारनीस कोरिआनें त्रिमम्परास मदत करण्यासाठीं झणून कोचीन बंदरांत मुक्काम करण्यास विनंती केली. पण चांचेपणा करून आरबांचीं गलबतें लुट-

ण्याचीं कारस्थानें करणें सोद्रेस जास्त आवडत असे. अर्थातच त्यास वखारनिसाची सल्ला पसंत पडली नाहीं, आणि तो चांचेपणाची स्वारी करण्यासाठीं ह्मणून चालता झाला. सोद्रे जितका मतलबांत पूर्ण बुडालेला दिसतो, तितकाच कोरिआ फिरंग्यांचें नांव उजळ रहावें ह्मणून यत्न करणारा दिसतो.

याप्रमाणें आणीबाणीचा प्रसंग कोसळला, तरी न डगमगतां व धीर खचूं न देतां कोचीनकरानें आपल्या किरकोळपणास अनुसरून आपली किरकोळ तयारी चालविली.

इ० १५०३ मार्च ३१ रोजीं कोचीनपासून १६ मैलांवर रेपेली' नांवाच्या गांवापुढें तंबुरीन आला. त्रिमम्पुरास या दांडग्या संकटांतून सोडविण्याच्या स्तुत्य हेतूनें कनानूरास जाण्याची आपली इच्छा फिरंग्यांनीं दर्शविली व तयारीही चालविली. फिरंग्यांस परवानगी दिली असती ह्मणजे त्रिमम्पुराचें दर्बारी गलबत वावटळींतून सहज वटावतें. पण अशा प्रसंगीं असें करणें कोचीनकरास नामर्दपणाचें लक्षण भासलें व अर्थातच त्याच्याकडून कनानूरीं जाण्याची परवानगी फिरंग्यांस देण्यांत आली नाहीं. आपला वारस नारायण यास त्रिमम्पुरानें सेनापतीचा हुद्दा दिला. एक बरीच अरेतुरेची चकमक झडली, तींत नारायण ठार झाला; त्यामुळें कोचिनी लश्करास वैपिन नांवाच्या बेटावर हटावें लागलें. अशा प्रसंगीं " फिरंग्यांस ताब्यांत दिल्यास आपण परत जातों " असा निरोप तंबुरीन कोचीनकरास धाडतो. " हें दगलबाजपणाचें काम आपले हातून होणें नाहीं " असा निर्वाणीचा संकल्प केला होता, तो त्रिमम्पुर निरोप आणणारांस कळवतो. तेव्हां तंबुरीन कोचीन जाळून खाक करतो, व वैपिनास वेढा घालतो. दोनदां तीनदां तंबुरीन हल्ला करतो; पण यश येत नाहींसें पाहून व पावसाळाही जवळ आला हें लक्षांत घेऊन तो वेढा उठवतो व कोचीन मुक्कामीं छावणी करून राहतो.

या सगळ्या गोष्टी मलबार प्रांतीं घडत असतां, पुर्तुगालच्या मन्वेल राजानें आणखी कांहीं मन्वारें चांगल्याशा सरदाराच्या हवालीं करून हिंदुस्थानाकडे पाठविण्याची तयारी जोरानें चालविली होती. जोंपर्यंत आरबांची नांगी साफ मोडून टाकली नाहीं, तोंपर्यंत फिरंग्यांची डाळ मलबाराच्या पट्टीमध्यें चांगलीशी शिजणें नाहीं, हा मुद्दा मन्वेलच्या लक्षांत येऊन चुकला होता. कोचीन मुक्कामीं होतां होईपर्यंत एक मजबूत वखार बांधण्यास हुकूम देऊन, मन्वेलनें ९ मन्वारें रवाना केलीं. ३ मन्वारांची सारंगकी अल्फांसो अलबुकर्क यास मन्वेलनें देऊन, तिहींची सारंगकी अल्फांसोचा चुलतभाऊ फ्रांसिस अलबुकर्क यास दिली. राहिलेल्या ३ मन्वारांचा सारंग अंतोनिओ साल्दाना यास तांबड्या समुद्राच्या नाक्यावर राहून आरबांच्या गलबतांची वाट मारण्यास हुकूम सोडला.

इसवी १५०३ मध्यें ६ एप्रील रोजीं आल्फांसो निघाला होता. फ्रांसिसनें १ आठवड्यानंतर ह्मणजे १४ एप्रील रोजीं प्रस्थान ठेवलें होतें. कनानूर मुक्कामीं लागतांच कोचीनवर जो आणीबाणीचा प्रसंग कोसळला होता त्याची बातमी कळली आणि फ्रांसिस ताबडतोब निघाला, तो सप्तेंबर २ रोजीं कोचीन मुक्कामीं येऊन दाखल झाला.

फिरंगी आलेले दिसतांच कोचीन मुक्कामीं छावणी केलेल्या कलिकतकरांची पांचांवर धारण बसली आणि गांव सोडून ते पाठीं हटले. फ्रांसिसनें त्रिमम्परास कोचीन मुक्कामीं नेलें

आणि पुन्हा गादीवर बसविलें. पुढें बऱ्याच तुंबळ लढाया झाल्या, त्यांत कलिकतकरांचा मोड होत गेला. लौकरच फ्रांसिसनें मजबूत वखार बांधण्यासाठीं जागा मागितली, ती उपकार आठवणाऱ्या त्रिमम्परानें दिली, आणि सप्टेंबर २७ रोजीं मजबूद अशा वखारीचा पाया पडला. या गडास फिरंग्यांनीं आपल्या राजाचें "मन्वेल" नांव दिलें. या कामास सुरवांत होऊन चार दिवस झाले आणि आल्फांसोही कोचीन मुक्कामीं येऊन पोंचला. पुढें किलोन मुक्कामीं जाऊन आल्फांसोनें परवानगी मिळवून तेथेंही एक वखार बांधली.

लौकरच फ्रांसिसनें ४ कलमांचा एक तह कलिकतकराशीं केला. तीं ४ कलमें खालीं लिहिल्याप्रमाणें होतीं.

१. पाठीमागच्या नुकसानीबद्दल ९०० खंडी काळीं मिऱ्यें फिरंग्यांस देणें.

२. कलिकतच्या आरबांस आरबस्थानाशीं व मिसर देशाशीं व्यापार सोडूं लावणें.

३. कोचीनकराशीं स्नेहानें वागणें.

४. कोचीनला वेढा घातला होता,तेव्हां दोघे इताल्ये फिरंग्यांची बाजू सोडून कलिकतकराकडे गेले होते, त्यांस फिरंग्यांच्या हवालीं करणें.

याप्रमाणें ४ कलमें होतीं. या कलमांपैकीं चवथें कलम मात्र कलिकतकरास मान्य नव्हतें, तें ठीक होतें. जे शरण आले, त्यांस पुन्हा शत्रूंच्या हवालीं करणें हें अधमपणाचें काम. आणि त्याविषयीं शत्रूनें आग्रह धरणें हेंही अधमपणाचें काम. कलिकतकरानें हवालीं करण्याचें कबूल केलें नाहीं, हें योग्य केलें; फिरंग्यांनींही हवालीं देण्याविषयीं आग्रह केलेला दिसत नाहीं हें योग्य केलें.

याप्रमाणें तहाचीं कलमें ठरलीं असतां, कलिकतहून क्रांगानूर मुक्कामीं जाणारें गलबत फिरंग्यांनीं पकडलें, हा दगा केला; इतकेंच नव्हे, तर कलिकतकरानें हा दगा कानावर घातला असतांही तिकडे दुर्लक्ष्य केलें, ही गोष्ट जशी बाहेरच्या गोऱ्या कातडीस तशी हृदयांत अभिषेक केलेल्या खिस्ती धर्मास न पुसतां येणारा डाग लावणारी आहे. पुढें उभयतां बंधूंनीं मिळून परत हांकारणी करावी, अशी राजाची आज्ञा असतांही, फ्रांसिसला माल भरण्यास बराच वेळ लागणार ही सबब सांगून, आल्फांसो इ० १५०४, जानेवारी २९ रोजीं निघाला, तो जुलै महिन्याच्या अखेरीस लिस्बन बंदरीं पोंचला. आल्फांसोनें निघण्याच्या पूर्वीं पांचेको नांवाच्या सरदारास पाठीं राखण करण्यास ठेवलें होतें. आपलीं ३ मन्वारें घेऊन फेब्रेवारी ९ रोजीं फ्रांसिस निघाला, त्याचा व त्याच्या बरोबरच्या मन्वारांचा पत्ता बिलकुल लागला नाहीं. समुद्रानें त्या सर्वांची आहुति घेतली अगर आरबांनीं कोठें तरी त्यांस आपल्या तलवारीस बळी देऊन सगळा माल जप्त केला, कीं जाळून टाकला, तें कळत नाहीं. कोणत्या तरी प्रकारें आपल्या बरोबरच्या मन्वारांसहित फ्रांसिस परागंदा झाला इतकें मात्र खास समजतें.

आल्फांसोनें पाठ फिरवलीशी पाहून तंबुरिनानें मलबारच्या किनाऱ्यावरून फिरंग्यांस हांकून देण्याची मसलत केली आणि बऱ्याच रजवाड्यांस मसलतींत ओढलें. या प्रसंगीं ५०००० फौज मलबाऱ्यांनीं जमवली, असें फिरंगी ह्मणतात. या ५०००० पैकीं ४००० फौज दर्यावर्दी असून पडाव २८० होते, आणखी कांहीं मचवेही होते. ४६००० लोक राहिले, ते जमिनीवर लढणारे होते आणि बरोबर ३८२ तोफा होत्या.

आपली फौज होतां होई तोंपर्यंत कमी व सामनेवाल्याची पुष्कळपट जास्त—असें वर्णन करण्याची पद्धत एकंदरींत भूमंडळावर पडलेली दिसते. गुन्हा काय तो सामनेवाल्याचा, आपली सगळी करणी चोख—इतकी चोख व पांढरी फटफटीत कीं शरच्चंद्रासच नव्हे, तर साक्षात् दुग्धोदधीसही पाठीं हटवणारी—अशा प्रकारची अतिशयोक्ति आमच्या इंग्रज बहादुरांच्याही १९ व्या शतकांत घडलेल्या ऐतिहासिक गोष्टींच्या वर्णनांत आढळते. काबुलच्या किंवा सरहद्दीवरच्या लढाईचा, ब्रह्मदेश खालसा केल्याचा, मणिपूर प्रांताची आहुति घेतल्याचा इतिहास वाचला, ह्मणजे लागलीच खात्री होते. हातांतल्या कांकणास आरसा नको; गोऱ्यांची व ख्रिस्ती ह्मणवणारांची स्वतःच्या पक्षाच्या ऐतिहासिक गोष्टी तिखटमीठ लावून वर्णन करण्याची शैली व शिताफी पहाणें असल्यास इंग्रजी शिक्षण मिळालेल्यास आज दाराहून फारसें दूर जावयास नको. कनानूरपासून क्विलोनपर्यंतच काय ती या पात्रांची रंगभूमि; तशांत कनानूर, कोचीन, क्विलोन, हे ३ महाल फिरंग्यांच्या बाजूचे; बाकीची पट्टी राहिली ती किती, व तींतून ४६००० लोक जमिनीवर लढणारे निघणार कसे? हे सगळे रजवाडे दर्यावर्दी दिसतात. यांचा अंमल विजयनगरकरावर बसलेला असण्याचा संभव नाहीं; उलट विजयनगरकराचा अंमल यांच्यावर बसलेला असण्याचा संभव आहे. विजयनगरकराची गोष्ट निराळी, या रजवाड्यांची गोष्ट निराळी. या रजवाड्यांचा प्रताप व या रजवाड्यांचें वैभव ही जोडी फिरंग्यांनीं लिहिलेल्या इतिहासांत मात्र झळकते, इकडच्या मुसलमानी किंवा देशी इतिहासामध्यें या जोडीची जाग नाहीं; जाग पूर्वी कधीं तरी असल्याच्या लेखी कथा किंवा दंतकथाही जागल्या नाहींत. सारांश, असल्या ठिकाणीं या रजवाड्यांच्या फौजेस व वैभवास फिरंग्यांनीं मुद्दाम फूग आणलेली मानावी लागते. सामनेवाल्यांची फौज जितकी फुगेल, तितकी फिरंग्यांची अरेरावकीही फुगून, मिशांस पीळ चांगला भरतां येईल.

या प्रकारच्या परिष्कारावरून असें समजूं नये कीं फिरंग्यांच्या लश्कराहून हिंदूंचें लश्कर जास्त नव्हतें. हिंदूंचें लश्कर फिरंग्यांच्या लश्कराहून पांचपटच नव्हे, तर प्रसंगीं दहापटही जास्त मानतां येईल. पण फिरंग्यांमध्यें लश्करी शिस्त सुरेख असल्यामुळें व हिंदूंमध्यें लश्करी शिस्तीचें नांवही जवळ जवळ माहीत नसल्यामुळें, फिरंग्यांची एकंदरींत सरशीच होत जाऊन घडी बरीच बसत चालली आणि हिंदूंची घडी एकंदरींत बिघडतच चालली. नुसत्या शिस्तीनें फिरंग्यांची फत्ते होत चालली, असेंही समजणें बरोबर होणार नाहीं. जशी फिरंग्यांची शिस्त भारी होती, तसा सामनेवाल्याच्या जुटाच्या घडींत बिघाड करण्यासाठीं यत्नही होताच. तो किती भारी असेल, तें आज कळणें जरी दुरापस्त आहे, तरी यत्न ह्मणून होता, याविषयीं शंका रहात नाहीं. जूट असायाचा, तो हिंदूंचा आणि आरबांचा असायाचा. बेकीखोजाची लहानशीच गोष्ट जरी ध्यानांत आणली, तरी कलिकत मुक्कामींच्या आरबांमध्यें फिरंग्यांनीं फूट चालवली होती, इतकें खास सिद्ध होतें. विचाराअंतीं फिरंग्यांस हिंदूंमध्यें फूट पाडणें असल्यास आरबांचेंच द्वार कमजास्त मानानें खुलें होतें. आरबी जाणणारे फिरंगी मिळणें सवघड होतें, अवघड नव्हतें. निदान या काळीं फूट करणें असल्यास हिंदूंचें द्वार फिरंग्यांस खुलें असण्याचा संभव नाहीं. आरबांशीं जसा फिरंग्याचा, तसा फिरंग्यांशीं

आरबांचा बराच व्यवहार वाढण्यास मांडीस मांडी ठोकून खाण्यापिण्याची सामग्री हजर होती. या सामग्रीचा व लालुचीचाही कमजास्त उपयोग करून आरबांस आपणांकडे ओढणें या काळीं फिरंग्यांस शक्य होतें आणि तें त्यांनीं केलेंही होतें, असें बेकीखोजाच्या उदाहरणावरून ह्मणणें भाग पडत आहे. इतकी तरी गोष्ट प्रसंगवशानें दाखल करण्यांत आली आहे, त्याबाबद फिरंगी ग्रंथकारांचे आभार मानणें वाजवी आहे. सारांश, जसें पुढें ह्लासीचे लढाईंत इंग्रजांचें तसें या काळीं फिरंग्यांचें बरेंच काम लष्करी शिस्तीनें पार पाडलें हें जरी अक्षरशः खरें आहे, तरी नुसता भार शिस्तीवर पडला आणि फितवाफितवीवर मुळींच पडला नाहीं, असें कोणी समजल्यास, तो त्याचा समज चुकीचा ह्मटल्याशिवाय सुटका नाहीं. याप्रमाणें हा परिष्कार सपवून प्रस्तुत आतां हकीकतीकडे वळूं.

ज्या पाचेकोची योजना राखण करण्याचे कामीं करण्यांत आली, तो शूर होता, धीराचा होता, सगळे लष्करी डावपेंच त्यास कळत होते. तरी फौज काय ती १ शेंकडा फिरंगी व ३ शेंकडे मलबारी, इतकीच पाचेकोचे हाताखालीं होती, असें फिरंगी ग्रंथकार ह्मणतात. त्रिमम्पराजवळ फक्त ५००० विश्वासू शिपाई राहिलेले असून या पांच हजारांपैकीं ५०० त्रिमम्परानें पाचेकोच्या मदतीस पाठवले होते. पण हे पांच शेंकडे लौकरच कलिकतकरास फितले असें फिरंगी ह्मणतात. पुढें जी लढाई झाली, तींत तंबुरिनाचे १०३० लोक पडले; कांहीं फिरंगी जखमी झाले, पण कोणीही ठार झाला नाहीं, असें फिरंगी ह्मणतात, तें मात्र सगळें पूर्ण भरंवसा ठेवण्याजोगें दिसत नाहीं. तशांत दोन इताल्ये तंबूरिनाच्या बाजूनें खपत होते; अर्थातच, कलिकतकरांची गोळी अगदीं वायफळ गेली, ही हकीकत जशी असावी तशी नव्हे असें समजण्याकडे मन ओढतें.

पुढें ज्योतिष्यांच्या मसलतीवर भरंवसा ठेवून कलिकतकरानें दम खाल्ला आणि पाचेकोनें दम न खातां सपाट्यानें काम चालवलें, या हकीकतीवर भरंवसा ठेवण्यास हरकत नाहीं. ज्योतिष्यांच्या मसलतीनें काम चाललें कीं एकंदरींत कामांत भट पडला असें समजावें. दसऱ्याचा सार्वजनिक मुहूर्त निराळा, पावलोपावलीं लग्नाचा आणि प्रस्थानाचा फलज्योतिषांतला गडबडगुंडा निराळा. उंटाचें पोर एकदां घरांत शिरलें, ह्मणजे घर आजना उद्यां घरमोड्याच्या हातीं गेलें; ज्योतिषावर किंवा सुरावर किंवा शिंकेवर किंवा शकुनावर किंवा मांजर आडवें जाण्या न जाण्यावर दर्बारी सूत्र हालूं लागलें कीं राष्ट्र बुडालें. "अवघा तो शकून। हृदयीं देवाचे चरण ॥ तुका ह्मणे हरिच्या दासा। शुभकाळ दाही दिशा" हा सिद्धांत आमच्या लोकांच्या मनावर जितका जास्त प्रतिबिंबेल, तितकें देशाचें कल्याण जास्त होईल. होष्यमाण गोष्टीचें सूत्र एकट्या जगन्नियंत्याच्या हातीं असतें. जगन्नियंत्यास काय करावयाचें असतें व करावयाचें असतें तें केव्हां किंवा कोणत्या प्रकारें करावयाचें असतें, तें सांगोपांग त्याचें त्यासच माहीत असतें. जगन्नियंत्याच्या हातीं ज्या घडामोडी रहातात किंवा ज्या गोष्टी असतात, त्यांची इतिकर्तव्यता—जशी अथश्री, तशी इतिश्रीही—त्याच्याच लक्षांत पटलेली असते; दुसऱ्या कोणाच्याही लक्षांत ती उतरण्याचा किंवा उतरलेली असण्याचा संभव नाहीं.

या प्रभुच्या चित्तींचें करणें कोणी कधींहि जाणेना।
जाणों जातां कविही भ्रमले निश्चय तयांसि बाणेना.

असें मोरोपंतानें ह्मटलें आहे, तें अक्षरशः खरें आहे. हा मोरोपंतानें केलेला सिद्धांत स्वकपोलकल्पित नव्हे. "तेने ब्रह्महृदाय आदिकवये मुह्यंति यत् सूरयः" हा भागवतधर्माचा एक मोठा सिद्धांत असून त्यास "भीषाऽस्माद् वातः पवते भीषोदेति सूर्यः" असा साक्षात् वेदाचा आधार आहे. ज्याची धास्ती वाऱ्यास व सूर्यास व मृत्यूसही, त्याचें हृद्गत "जाणतों" किंवा "कळतें" ह्मणण्याचा अधिकार कोणास? सारांश, मुहूर्त पहाणारे, लग्न ठरवणारे, ग्रहांचा शुभाशुभ विभाग करणारे, हे एकंदरींत भोंदू ह्मणावे लागतात. ग्रहण केव्हां होणार तें बरोबर हुडकून काढणारें गणिताचें ज्योतिषशास्त्र निराळें, ग्रहणाचे समयीं मांत्रिकास मंत्राचा जप करूं लावणारें मंत्रशास्त्र निराळें. ग्रहण सुटण्यापूर्वी केलेल्या दानाचें पुण्य वाजवीहून फाजील समजूं लावणारें भटाभक्षुकाचें दानशास्त्र निराळें, अशा वेळेस झुंजणें बरें कीं न झुंजणें बरें याचा निकाल लावूं पहाणारें फळाचें ज्योतिषशास्त्र निराळें.पहिलीं दोन शास्त्राप्रमाणें शास्त्रें आहेत; दुसरीं दोन शास्त्रें नव्हत, तर भोळकटांपासून किंवा खुळकटांपासून पैसे उपटण्याचे दोन राजरोस रस्ते दिसतात.सारांश या प्रसंगीं तंबुरीन बुडाला, तो मगज भर्कटलेल्या फलज्योतिष्यांच्या भुलथापांस भुलून बुडाला; या प्रसंगीं फिरंगी सांवरला व पुढच्या साम्राज्याचा रोपा लावूं शकला, तो "अवघा तो शकून। हृदयीं देवाचे चरण" या राजरस्त्यानें तो गेला, ह्मणूनच सांवरला व लावूं शकला.

तंटा चांगला पांच महिने चालला, आणि कलिकतकरानें जवळ जवळ १९००० लोक गमावले तेव्हां कोचीनकराशीं तह केला, असें फिरंगी ह्मणतात. या ९ महिन्यांत कलिकतकरांस नमवल्याचें यश एकट्या पाचेकोस द्यावें लागतें, दुसरा भागीदार दिसत नाहीं. पुढें एकदां किलोनपर्यंत खेप करून पाचेको कोचीन मुक्कामीं आला. याच सुमारास ह्मणजे इ० १५०४ सालीं सप्तेंबरच्या १४ वे तारिखेस १२०० लोकांनिशीं व १३ बड्या मन्वारांनिशीं सोआरेझ पुर्तुगाल्लाहून कोचीन मुक्कामीं येऊन पोंचला. पुढें ४ मन्वारांनिशीं बारेतोस कोचीन मुक्कामीं ठेवून व पाचेकोस बरोबर घेऊन सोआरेझ निघाला तो इ० १५०६ सालीं जुलै महिन्याच्या २० तारिखेस लिस्बन बंदरीं दाखल झाला. दौलतीनें भरलेलीं तेरा गलबतें आपणाबरोबर सोआरेझनें घेतलीं, असें फिरंगी ह्मणतात. जेव्हां बरेंच जाळलें व लुटलें आणि माणसें कापलीं, तेव्हां इतकी दौलत सोआरेझच्या हातीं लागूं शकली, हें उघड आहे. सोआरेझच्या बऱ्याच करणींची नोंद फिरंग्यांनीं त्यांच्या वहिवाटीप्रमाणें ठेवली आहे. पण "जाळणें, लुटणें, कापणें" या ३ क्रियांमध्यें थोडक्यांतच त्या काळचा इतिहास संपत आहे; या ३ क्रिया लक्षांत ठेवल्या कीं सोआरेझच्या स्वारीचें सगळें तत्त्व मुठींत आलें. पाचेकोचे मात्र स्वदेशीं शेवटीं शेवटीं हाल बरेच झाले. पहिल्यानें पाचेकोची बडेजाव बरीच राखण्यांत आली, पण पुढें त्याच्यावर कित्येक आरोप आल्यामुळें त्यास तुरुंगांत दिवस काढावे लागले. कांहीं वर्षांनीं हे सगळे आरोप खोटे ठरून त्याची जरी तुरुंगांतून सुटका झाली आणि त्याचा मानमरातबही बराच राखण्यांत आला,तरी वकिलांची दिवाळी पिकल्यामुळें दामाजीपंतानें अजीबात तोंड फिरवलें आणि पाचेकोची अखेर अगदीं गरीबींत झाली. पाचकोनें जाळण्याचें, कापण्याचें, लुटण्याचें, हीं तीन्ही

कामें मलबारांत पुष्कळ केलीं, याविषयीं शंका नाहीं. पण लढाई झटली कीं आजही तसलींच कामें चालू होतात.आज इंग्रज सरकारचें लश्कर व लश्करी कामगार हींच कामें मनमुराद सरहद्दीवर चालवीत आहेत. इतकेंच कीं हें एकोणिसावें शतक असल्यामुळें,कायदेबाजी माजून शब्दांचा भरणा मनस्वी वाढला आहे आणि तेणेंकरून " शासन " किंवा " पारिपत्य करणें," "लोकांस नीट अंमलांत आणणें," "लोकांमधली पुंडाई मोडणें " असल्या शब्दांचा प्रयोग करण्यांत येऊन लोखंडाचाही प्याला चांगला सोन्याचा दिसूं लावण्यापर्यंत-जशी हातचें काम करणाऱ्या, तशी वाचेचेंही काम करणाऱ्या कारागिराच्या— कारागिरीची कमाल होऊन गेली आहे. पाचेकोनें जी कामगिरी बजावली, ती बजावतांना कमजास्त पापही त्यानें राजीखुशीनें केलें असेल, तो भाग निराळा; त्या पापाबद्दल त्यास व्हावयाचें प्रायश्चित्त जगन्नियंत्याकडून होईल-पण जें कमजास्त पाप पाचेकोनें राजीखुशीनें केलें असेल किंवा त्यास करावें लागलें असेल तें सगळें फिरंग्यांच्या राजाचें कल्याण व्हावें ह्मणून केलेलें किंवा करावें लागलेलें होतें. अशी जर आंतील हकीकत होती, आणि हकीकत अशीच होती याविषयीं जर मतभेद होत नाहीं आहे, तर निदान फिरंग्यांच्या राजानें पाचेकोस अगदीं गरिबींत शेवटीं मरूं देऊं नये होतें. फिरंग्यांच्या राजाच्या हातून जसें कृतज्ञपणास आठवून काम व्हावें होतें तसें झालें नाहीं, ही गोष्ट पदरच्या कामगारांच्या आंगांत हिंमत आणणारी न होतां, उलट आंगांत असलेली हिंमत घालवणारी किंवा हिंमतीस जन्मूं न लावणारी अशी झाली. असल्या गोष्टींच्या संबंधानें शिवाजीनें जो कित्ता घातला, तोच एकंदरींत बरा दिसतो. चंद्रराव मोऱ्याचा खून करण्याची मसलत रघुनाथपंतानें केली, ती शिवाजीस मान्य असेल वा नसेल. पण समजा कीं चंद्रराव मोऱ्याचा खून रघुनाथपंतानें केला खरा. मग पुढें शिवाजीचें कर्तव्य काय ? जर चंद्रराव रघुनाथपंताचा शत्रु नव्हे, तर शिवाजीचा शत्रु; जर चंद्ररावाच्या जास्त जगण्यापासून रघुनाथपंताचें काडीचेंही खाजगी नुकसान नव्हतें व मरणापासून काडीचाही खाजगी फायदा नव्हता, तर रघुनाथपंतानें खून केला, तो उघड स्वतःखाठीं नव्हे, तर उघड यजमानासाठीं. जर खून उघड यजमानासाठीं केलेला—मग यजमानाची संमति असो वा नसो—तर यजमानानें कृतघ्न होणें आणि खून करणारास फांशीची किंवा जन्मटेपेची किंवा सर्वस्वाच्या जप्तीची शिक्षा देणें हें काम न्यायाचें न ह्मणतां उलट अन्यायाचें ह्मणावें लागत आहे. न्याय व्हावा ह्मणून, तशी अन्याय न व्हावा ह्मणूनही प्रभूनें खबरदारी ठेवली पाहिजे. न्याय करणें किंवा होऊं देणें हें जसें प्रभूच्या कर्तव्यांपैकीं आहे, तसें अन्याय न करणें किंवा होऊं न देणें हेंही प्रभूच्या कर्तव्यांपैकींच एक आहे. ह्मणून पाचेकोस शेवटीं अगदीं गरिबींत मरूं दिल्याबद्दल दोषाचा- " पापाचा " ह्मटल्यास अतिशयोक्ति होऊं न देणारा—बराच बोजा मन्वेल राजाच्या डोकीवर लादावा लागत आहे, पण तेथें निरुपाय होतो; तो तसा लादल्याशिवाय सुटका नाहीं.

(पुढें चालेल.)



# वृंदा.

[ पु० २९, ३२०, पृष्ठावरून पुढें चालू. ]

" विषयीं विराग तैसा अनुरागहि फारसा न कामाचा,
" हरितो मनुष्यपण तो, नाश करी हाहि मोक्षकामाचा. १३०
" भोगार्ह वस्तु ज्या ज्या भोगाव्या त्या; परंतु भोगाचा
"अतिरेक होय जेथें तेथें संचार होय रोगाचा. १३१
"आहारीं व्यवहारीं मर्यादेवांचुनी नसे गोडी;
" पावे तोच खरें सुख न कधीं नियमितपणास जो सोडी. १३२
" यास्तव नियमनसूत्रें बद्ध मनोवासना बळें करुनी,
"प्रक्षुब्ध त्या न झाल्या तोंच धरावें तयांस आवरुनी. १३३
" योग नको, याग नको, तीर्थ नको वा त्रिदंडसंन्यास,—
" एक विवेक पुरे; त्या आवरती वासना न अन्यास. १३४
" योगी तो न विरागें सोडुनि संसार होय जो जोगी;
" योगी तोच, मनोजय करुनि सदा योग्य भोग जो भोगी. १३५
" वास उपाधिभयानें केला जाऊनि काननीं जेणें,
" पंडितमन्य असो तो हारविलें परि मनुष्यपण तेणें. १३६
" तोच मनुष्य खरा जो बसवुनियां इंद्रियांवरी पगडा
" सारी प्रपंच करुनी धैर्यानें संकटांसवें झगडा. १३७
" हो वा न हो यशस्वी, होय तयाचाच सुफल संसार;
" जननी धन्य तयाची, तोच कुलाचा खरा अलंकार. १३८

( अपूर्ण. )

# प्लेटो.

[ १. ]

साक्रेटिसाच्या मृत्यूनंतर त्याच्या ज्या शिष्यांनीं आपापल्या समजुतीप्रमाणें व शक्तीप्रमाणें त्याच्या मतांचा प्रसार केला, त्या शिष्यांमध्यें प्लेटो हा अतिशयित प्रसिद्ध आहे. प्लेटो हा इ० स० च्या पूर्वी ४२७ व्या वर्षी आथेन्स एथील एका कुलीन व संपन्न घराण्यामध्यें जन्मला. अर्थांतच त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें सर्वांत उत्तम अशा प्रकारचें शिक्षण त्याला मिळालें; आणि त्यामुळें त्याची स्वभावतःच तीक्ष्ण अशी मानसिक शक्ति चांगली विकसित झाली. यावेळीं अथीनियन लोकांच्या निकृष्टावस्थेस आरंभ होऊन, प्रत्येक मनुष्याचा आपलपोटेपणा व अनियंत्रित लोकसत्ताक राज्यपद्धति यांच्या अनिष्ट परिणामांचा त्यांना पूर्णपणें अनुभव येऊं लागला होता. या सर्व स्थितीला कंटाळून, प्लेटोनें एकांत स्थळीं राहून तात्त्विक ज्ञान संपादण्याचा निश्चय केला. पुढें साक्रेटिसाचे वादविवाद ऐकण्याकरितां दररोज नियमानें तो त्याच्याकडे जाऊं लागला. प्लेटोची अफाट मानसिक शक्ति व ज्ञानप्राप्तीविषयींची अत्यंत उत्सुकता पाहून साक्रेटिसाचा त्याच्यावर फार लोभ जडला, आणि लवकरच तो त्याचा सर्वांत आवडता शिष्य झाला. साक्रेटिसाच्या वादविवादांचा व उपदेशांचा प्लेटोच्या मनावर फारच चांगला व सुदृढ परिणाम झाला; आणि इतर सर्व शिष्यांपेक्षां त्याला साक्रेटिसाच्या मतांचें खरें स्वरूप अधिक समजलें. प्लेटो हा साक्रेटिसाला पूर्वीपासूनच फार मान देत असे; परंतु साक्रेटिसाचें अंतकाळचें मोठें धैर्य आणि सत्यप्रीति हीं पाहून, त्याची त्याच्याविषयींची पूज्यबुद्धि अत्यंत वाढली; आणि या गोष्टीमुळें आथेन्समधील त्यावेळच्या सामाजिक व राजकीय स्थितीविषयीं त्याच्या मनामध्यें पूर्वीपेक्षां अधिक तिटकारा उत्पन्न झाला.

साक्रेटिसाच्या मृत्यूनंतर प्लेटो हा आथेन्स शहर सोडून पहिल्यानें मेगारा शहरीं गेला; त्या ठिकाणीं कांहीं दिवस राहून नंतर त्यानें ईजिप्त, सिसिली, इटली वगैरे देशांत प्रवास केला. याप्रमाणें सुमारें दहा वर्षें निरनिराळे देश, व लोक, व त्यांच्या रीतीभाती पाहण्यांत घालवून, इ. स. च्या पूर्वी ३८९ व्या वर्षाच्या सुमारास प्लेटो हा आथेन्स नगरास परत आला, आणि तेथें त्यानें तत्त्वज्ञानाविषयीं व्याख्यानें देण्याला सुरुवात केली. परंतु साक्रेटिसाप्रमाणें जो भेटेल त्याच्याशीं सार्वजनिक ठिकाणीं वादविवाद न करितां, तो थोडेसे निवडक शिष्य घेऊन, आथेन्स शहराच्या बाहेर एका निवांत स्थळीं आपला बाग होता, त्यांत त्यांना तत्त्वज्ञानाविषयीं आपलीं मतें शिकवूं लागला. पुढें या ठिकाणीं त्यानें एक "तत्त्वविद्यालय" स्थापन केलें. हें विद्यालय पुढें कित्येक शतकेंपर्यंत "अक्याडेमि" या नांवानें तत्त्वज्ञानाचें माहेरघर होऊन राहिलें होतें. या विद्यालयाची स्थापना झाल्यावर थोड्याच काळांत प्लेटोची फार ख्याति होऊन, ग्रीस देशाच्या निरनिराळ्या प्रांतांतील तरूण लोक शिष्यत्वाच्या नात्यानें त्याच्यापाशीं जमूं लागले.

प्लेटोनें तत्त्वज्ञानविचार व तत्त्वज्ञानशिक्षण हे दोन्ही उद्योग मरणकाळपर्यंत चालविले. तो इ. स. च्या पूर्वी ३४७ व्या वर्षी मरण पावला. साक्रेटिसाप्रमाणेंच प्लेटो हाही नीतिमान् होता. परंतु सधन घराण्यांत त्याचा जन्म

झाला असल्यामुळें त्याला ऐषआरामाची मूळचीच आवड होती. तथापि लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट ही कीं, या गोष्टीमुळें त्याच्या आचरणावर किंवा मनावर कोणत्याही प्रकारचा अनिष्ट परिणाम झाला नाहीं.

प्लेटो हा साक्रेटिसाचा शिष्य होता, असें पूर्वी सांगितलेंच आहे. परंतु यावरून, त्यानें साक्रेटिसाचीं तत्वज्ञानविषयक मतें शिकून त्यांचा प्रसार केला, इतकाच अर्थ घ्यायाचा नाहीं. तर त्यांची त्यानें प्रगतिही केली. साक्रेटिसाप्रमाणेंच प्लेटोचेंही मत असें असे कीं, नीतीविषयीं विचार करणें हा तत्ववेत्त्यांचा मुख्य विषय होय. दोघांचेंही असें मत होतें कीं, ज्ञान व नीति यांचा इतका परस्पर निकट संबंध आहे कीं, त्यांपैकीं एकाचा विचार करणें झाल्यास दुसऱ्याचाही विचार केलाच पाहिजे,–किंबहुना एकाचा विचार करणें ह्मणजे दुसऱ्याचाही विचार करणें होय; अर्थात, नीति ह्मणजे काय आणि नीतीची प्रगति कशी करावी, याविषयीं विचार करणें, हा मागें सांगितल्याप्रमाणें ज्या अर्थी तत्ववेत्त्याचा मुख्य विषय आहे, त्या अर्थी ज्ञान ह्मणजे काय आणि ज्ञानाची वृद्धि कशी होते, या प्रश्नाचाही त्यानें पहिल्यानें विचार केला पाहिजे. ज्ञान कोणत्या पद्धतीनें मिळविलें पाहिजे, याविषयींही साक्रेटिस व प्लेटो यांच्यामध्यें ऐकमत्य होतें. परंतु ज्ञान ह्मणजे काय व एखाद्या पदार्थाचें आपणाला ज्ञान आहे किंवा नाहीं, या प्रश्नांचा उलगडा करण्याच्या कामीं साक्रेटिसाच्या वादविवादांचा आस्तिक पक्षीं फारसा उपयोग झाला नाहीं, असें ह्मटलें तरी चालेल. ह्मणून या मुख्य प्रश्नाचा साक्रेटिसानें दाखविलेल्या पद्धतीनें उलगडा करण्याचा प्लेटोनें प्रयत्न केला.

अमुक एक आकृति त्रिकोण आहे किंवा नाहीं ? अमुक एक पदार्थ वृक्ष आहे किंवा नाहीं ? अमुक एक प्राणी अश्व आहे किंवा नाहीं ? अशा प्रकारचे प्रश्न जर एखाद्या साधारण मनुष्याला विचारले, तर बहुतकरून तो त्यांचीं उत्तरें बिनचूक देईल; परंतु त्रिकोण ह्मणजे काय ? वृक्ष ह्मणजे काय ? अश्व ह्मणजे काय ? असे जर त्याच मनुष्याला प्रश्न विचारले, तर त्यांचीं उत्तरें त्याला प्रायः देतां येणार नाहींत. आणि ही गोष्ट कबूल केली पाहिजे कीं, ज्या मनुष्याला अशा प्रकारच्या प्रश्नांचीं उत्तरें माहित नाहींत, त्याला त्रिकोण, वृक्ष, अश्व वगैरे पदार्थांचें ज्ञानच नाहीं. ह्मणजे यावरून असें सिद्ध झालें कीं, कोणत्याही पदार्थाचें ज्ञान ह्मणजे त्या पदार्थाचें नांव ज्या ज्या व्यक्तींना दिलें जातें, त्यांपैकीं एक किंवा अनेक व्यक्तींची ओळख असणें, इतकेंच नव्हे; तर त्या सर्व व्यक्तींमध्यें जो सामान्य धर्म किंवा स्वभाव असल्यामुळें त्यांना तें नांव दिलें जातें, तो धर्म किंवा स्वभाव माहित असणें. उदाहरणार्थ–त्रिकोणत्व, वृक्षत्व, अश्वत्व इत्यादि ह्मणजे काय, हें ज्या मनुष्याला माहित आहे, त्याला मात्र त्रिकोण, वृक्ष, अश्व इत्यादि पदार्थांचें ज्ञान आहे, असें ह्मटलें पाहिजे. आतां त्रिकोणत्व, वृक्षत्व, अश्वत्व इत्यादि धर्मांना जर त्रिकोण, वृक्ष, अश्व इत्यादि पदार्थांचीं "तत्वें" असें सांकेतिक नांव दिलें, तर प्लेटोच्या मताप्रमाणें ज्ञान ह्मणजे काय, याविषयीं असा सामान्य नियम झाला कीं, कोणत्याही पदार्थाचें ज्ञान ह्मणजे त्या पदार्थाच्या "तत्वा" ची माहिती.

परंतु कोणत्याही पदार्थाचें ज्ञान होण्याला जर त्या पदार्थाच्या "तत्वा"चें ज्ञान झालें

पाहिजे, तर त्या पदार्थाचें "तत्त्व" ह्मणजे काय? व त्या "तत्त्वा"चें ज्ञान कसें मिळवावयाचें! हे प्रश्न उत्पन्न होतातच. त्यांचीं उत्तरें प्लेटोच्या मताप्रमाणें अशीं कीं: कोणत्याही पदार्थाचें "तत्त्व" ह्मणजे काय? तर त्या पदार्थाचें नांव ज्या अनेक व्यक्तींना दिलें जातें त्या सर्वांमध्यें असणारा जो सामान्य धर्म तें—जो धर्म त्यांच्यामध्यें असल्यामुळें त्यांना तें नांव दिलें जातें, व जो इतर पदार्थांमध्यें नसल्यामुळें त्यांना तें नांव दिलें जात नाहीं. आणि या "तत्त्वा"चें ज्ञान मिळविण्याची पद्धति ह्मटली ह्मणजे, ज्या व्यक्तींना हें नांव दिलें जातें त्यांची एकमेकांशीं व ज्या व्यक्तींना तें नांव दिलें जात नाहीं त्यांच्याशीं तुलना करणें, ही होय. ही तुलना जर निरनिराळीं अनेक उदाहरणें घेऊन लक्षपूर्वकपणें केली, तर—कोणेका नांवानें प्रसिद्ध असलेल्या सर्व व्यक्तींमध्यें आहे, आणि ज्या व्यक्तींना तें नांव दिलें जात नाहीं त्यांच्यामध्यें नाहीं, असा सामान्य धर्म कोणता, हें आपणांला सहज कळून येईल. याच धर्माला प्लेटोनें "तत्त्व" हें सांकेतिक नांव दिलें असें पूर्वीं सांगितलेंच आहे.

याप्रमाणें सामान्यतः ज्ञान ह्मणजे काय? व ज्ञान मिळविण्याची पद्धति कोणती? याविषयीं प्लेटोचें काय मत होतें, हें सांगितलें. आतां या विषयांतच समाविष्ट होणाऱ्या, परंतु आतां ज्याचा विचार झाला आहे त्याहून वेगळ्या, अशा प्लेटोच्या "तत्त्व"विषयक एका मताकडे वळूं.

पदार्थाच्या "तत्त्वा" विषयीं प्लेटोचें असें एक मत होतें कीं, कोणत्याही पदार्थाचें "तत्त्व" त्या पदार्थामध्यें मूर्तिमंत असत नाहीं, तर आपणाला जी बाह्य इंद्रियांच्या योगानें सृष्टि दिसते, तिजपासून या सर्व "तत्त्वा"ची सृष्टि अत्यन्त भिन्न आहे. या उच्च सृष्टीमध्यें ज्यांचें मूर्तिमंत अस्तित्व आहे, अशीं जीं खरीं "तत्त्वें" त्यांपैकीं एखाद्याचा अंश, आपणाला जे पदार्थ दिसतात त्यांच्यामध्यें असतो; व त्यामुळें त्या पदार्थाला त्या "तत्त्वा"शीं साम्य प्राप्त होतें. व हें साम्य आपण पाहिलें ह्मणजे, ज्या "तत्त्वा"शीं त्या पदार्थाचें साम्य आहे असें आपणाला वाटतें, तें त्या वस्तूचें "तत्त्व" असें आपण ह्मणतों. आणि ज्या अर्थीं, प्लेटोच्या मताप्रमाणें, 'तत्त्वें' हाच काय तो ज्ञानाचा विषय, त्या अर्थीं ज्या प्रमाणानें एखाद्या वस्तूमध्यें "तत्त्वा"चा अंश असतो, त्याप्रमाणानें ती वस्तु ज्ञानाचा विषय होऊं शकते.

परंतु या ठिकाणीं असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, ज्या सृष्टीमध्यें "तत्त्वां"चें अस्तित्व आहे, ती सृष्टिच जर इंद्रियगोचर नाहीं, व इंद्रियांच्या साहाय्यावांचून आपणाला कोणत्याही बाह्य गोष्टीचें ज्ञान होणें शक्य नाहीं, तर मग वर सांगितलेल्या इंद्रियांना अगोचर अशा "तत्त्वां"चें आपणांला ज्ञान होतें कसें? व हें ज्ञान असल्यावांचून अमुक एक वस्तूचें अमूक "तत्त्वा"शीं साम्य असल्याचें आपणाला ओळखतां येतें ह्मणून जें वर ह्मटलें, त्याचा अर्थ काय? प्लेटोच्या मताप्रमाणें या प्रश्नाचें उत्तर असें कीं, "तत्त्वें" इंद्रियांना ज्ञेय नाहींत, ही गोष्ट सत्य आहे. परंतु मनुष्यामध्यें शरीर व इंद्रियें यांच्याहून अत्यन्त भिन्न, व यांच्यापेक्षां श्रेष्ठ, अशी 'आत्मा' नांवाची शक्ति आहे,—इतकेंच नव्हे, तर आत्मा हाच खरा मनुष्य, असें ह्मणण्यालाही हरकत नाहीं. आतां, शरीर आणि इंद्रियें जरी मर्त्य आहेत, तरी आत्मा अमर

आहे. अमुक एक मनुष्य मृत्यु पावला असें जें आपण ह्मणतों त्याचा खरा अर्थ इतकाच कीं, त्याचा आत्मा व शरीर यांचा संयोग नष्ट झाला. आत्म्याशीं संयोग झाल्यामुळें शरीराला जें जीवित्व प्राप्त झालें होतें, तें तो संयोग नष्ट होतांच नाहींसें होतें; परंतु त्यामुळें आत्म्याची कोणतीही शक्ति नष्ट होत नाहीं. या दृष्टीनें मृत्यु ह्मणजे आत्मा आणि शरीर यांच्या संयोगाचा नाश; त्याप्रमाणेंच, मनुष्याचा जन्म ह्मणजे आत्मा आणि शरीर यांच्या संयोगाचा आरंभ. अर्थांतच, हा संयोग होण्यापूर्वी, आणि त्याचा नाश झाल्यावर देखील, आत्मा अस्तित्वांत असतोच; आणि त्या स्थितीमध्यें तो "तत्त्वां"ची जी उच्च सृष्टि तिच्यामध्यें राहतो. यामुळें त्याला "तत्त्वां"चें साक्षात् ज्ञान करून घेण्याला संधि सांपडते. पुढें ज्यावेळीं त्याचा शरीराशीं संयोग होतो, त्यावेळीं त्याला "तत्त्वां"च्या ज्ञानाचा विसर पडतो. परंतु, ज्याप्रमाणें एखाद्या मनुष्याला पाहून फार दिवस झाल्यामुळें किंवा इतर कांहीं कारणानें, आपणाला जरी त्याचा विसर पडला तरी, त्याला किंवा त्याच्या सारखा दुसऱ्या मनुष्याला पाहून त्याची आपणाला आठवण होते, त्याप्रमाणेंच शरीराशीं संयोग होऊन 'आत्मा' या मानवी सृष्टींत आला ह्मणजे 'तत्त्व' सदृश पदार्थ पाहून त्याला पूर्वी ज्ञात असलेल्या "तत्त्वां"चें स्मरण होतें; प्लेटोच्या मताप्रमाणें, आपण ज्याला "ज्ञान" ह्मणतों ती, वास्तविक रीतीनें पाहतां, केवळ स्मृति आहे.

"तत्त्वें" हीं अनादि, अमर, विकाररहित व केवळ विचारशक्तिज्ञेय आहेत. या सृष्टीमध्यें ज्याप्रमाणें वस्तुजाति अनंत आहेत, त्याप्रमाणेंच "तत्त्वें"ही अनंत आहेत. आतां हीं अनंत तत्त्वें जरी परस्परांशीं भिन्न खरीं, तरी त्यांचा परस्परांशीं अत्यंत निकट संबंध आहे; आणि हा संबंध अशा प्रकारचा आहे कीं, एकावर एक अशा रीतीनें त्या तत्त्वांची एक मालिका लावितां येते. याप्रमाणें जर त्यांची मालिका केली, तर प्रत्येक "तत्त्व" त्याच्या मागून येणाऱ्या सर्व "तत्त्वां"चें "तत्त्व" असें समजलें पाहिजे. अर्थांतच, सर्वांमध्यें जें उच्च "तत्त्व" तें इतर सर्व "तत्त्वां"चें व पदार्थांचें "तत्त्व" असें झालें. या "तत्त्वा"ला प्लेटो वारंवार सूर्याची उपमा देत असे. ज्याप्रमाणें सूर्यामुळें या सृष्टींतील सर्व दृश्य वस्तु उत्पन्न होतात, व त्यांचें आपणाला ज्ञान प्राप्त होतें, त्याप्रमाणें हें सर्वांपेक्षां उच्च "तत्त्व" तत्त्वसृष्टीच्या अस्तित्वाचें व ज्ञेयतेचें मूळ कारण होय.

वर ज्या प्रश्नांचा विचार केला आहे, त्यांच्या इतक्याच, शुद्ध तत्त्वज्ञानदृष्टीला वाटणाऱ्या आणखी अनेक महत्त्वाच्या प्रश्नांचें प्लेटोनें आपल्या ग्रंथांत विवरण केलें आहे. परंतु प्रकृत निबंधाचा विषय नीतिशास्त्र हा असल्यामुळें, ज्या प्रश्नांचा केवळ तत्त्वज्ञानाशीं संबंध आहे,—नीतिशास्त्राशीं मुळींच नाहीं,—अशा प्रश्नांचा येथें समावेश करण्याचें प्रयोजन नाहीं. प्लेटोचीं नीतिविषयक मतें समजण्याला त्याचीं तत्त्वज्ञानविषयक जीं मतें समजणें अवश्य आहेत असें वाटलें, त्यांची येथपर्यंत संक्षिप्त माहिती दिली. आतां त्याच्या मताप्रमाणें ज्ञान आणि नीति यांचा परस्परांशीं कसा अतिनिकट संबंध आहे, हें पुढें पाहूं.

# आमच्यांतले पन्नास वर्षांतले फेरफार.

आज माझा अठ्ठावन्नावा वाढदिवस आहे. उद्यांपासून माझ्या एकुणसाठाव्या वर्षास आरंभ व्हावयाचा. ह्या अठ्ठावन वर्षांतलीं पहिलीं दहा अकरा वर्षें अगदीं अज्ञानपणांत गेलीं. त्यांतलें कांहीं मला आठवत नाहीं. परंतु त्या पुढच्या अठ्ठेचाळीस वर्षांतल्या पुष्कळ गोष्टी मला आठवत आहेत. आणि ह्या अठ्ठेचाळीस वर्षांत—ह्मणजे इ० स० १८५० पासून इ० स० १८९८ वर्षांपर्यंत—काय काय फेरफार झाले आहेत, ते थोडक्यांत सांगण्याचें मी योजिलें आहे.

१. मी लहान होतों, तेव्हां शिंप्यानें आंगरखा शिवून आणिलेला आंगाला बरोबर होतो कीं नाहीं, हें पाहाण्याच्या वेळेसदेखील डोक्यास पागोटें घालवें लागे. आतां, आंगात आंगरखे बंड्या घालून लोक खुशाल बोडके हिंडत असतात.

२. परटाकडून पांघरूणें धुऊन आलीं ह्मणजे त्यांवर शंखोदक शिंपडल्याशिवाय त्यांस शिवावयाचें नसे. आतां, पांघरूणें आलीं कीं ह्या पेटयांत ठेवून, शंखोदकाचें स्मरण देखील होत नाहीं.

३. बायकांस लिहिणें वाचणें शिकविण्याविषयीं नुसत्या गोष्टी बोलणें हें मोठें विलक्षण कृत्य समजत असत, फाजीलपण मानीत असत. आतां, आपल्या मुलींनीं शाळेंत जाऊन विद्या शिकावी, ह्मणून चांगलीं चांगलीं माणसें मोठे प्रयत्न करितात.

४. बापासमक्ष किंवा शिक्षकांसमक्ष कोणताही खेळ खेळणें हें मोठें उद्धटपण आणि मूर्खपण समजत असत. आतां बाप मुलांबरोबर आणि शिक्षक विद्यार्थ्यांबरोबर मोठ्या हौसेनें खेळत असतात. त्यांत त्यांस मोठें भूषण वाटतें.

५. तंबाखू ओढणें हें केवळ शूद्र किंवा अतिशूद्र ह्यांसच योग्य, श्रेष्ठप्रतीच्या माणसांनीं त्यास शिवूं नये, असें समजत. आतां, तोंडांत चिरूट धरून रस्त्यांत फू फू करीत धूर सोडीत जाणें उंचप्रतीच्या संभावितांसही मोठें भूषण वाटूं लागलें आहे.

६. कांहीं झालें तरी वडिलांचा मान राखणें—त्यांस भिणें—हें मुलांस आवश्यक वाटत असे. वडील माणसांच्या पुढून जाण्यास संकोच वाटत असे. आतां बापास अवमानणें, त्यास उलट बोलणें—प्रसंगीं लेखांतही त्याचा उपमर्द करणें—हें शाहाण्या ह्मणविणाऱ्या मुलांसही अगदीं सहज वाटतें. आणि कांहीं लोक त्यांस शाबास शाबास ह्मणतात.

७. वयोवृद्ध आणि तपोवृद्ध अशा माणसांस पूज्य मानणें, त्यांच्या उत्तरास प्रत्युत्तर न देणें, आपणास न आवडलें तरी प्रसंगीं त्यांचें ऐकणें, असें वागणें चांगलें ह्मणत असत. आतां त्यांची कांहीं एक परवा न करितां, आपल्या मनाला प्रशस्त वाटेल तें बोलणें आणि करणें हें " **स्वातंत्र्य** " ह्मणून, त्यावरून अशा माणसांची मोठी वाहवा करितात.

८. कचेरींतून किंवा बाजारांतून जाऊन आल्यावर शिवाशीव होत असे, ह्मणून वस्त्रांतर करीत असत. आतां तें कांहीं नाहींसें झालें आहे. वस्त्रांतर ह्मणजे काय हें सध्याच्या नव्या पिढीच्या मुलांस ठाऊक आहे कीं नाहीं, ह्याचा देखील संशय वाटतो.

९. पूर्वीं आगगाड्या नव्हत्या. सगळा प्रवास पायांनीं चालून, घोड्यावरून किंवा

गाड्यांतून करावा लागत असे. शंभर कोस जावयाचें झटलें झणजे मोठ्या कष्टाचे निदान दहा तरी दिवस लागत. आतां तो प्रवास मोठ्या सुखानें प्रहर दहा घटकांत आगगाडीनें होतो. कशाचें भय वाटत नाहीं.

१०. प्रवासांत किंवा बाजारांत अतिशूद्राच्या जवळून गेल्याचा संशय येऊन घरांत वागण्यास संकोच वाटे. आतां आगगाडींत झाराचांभाराच्या शेजारीं टेंकून बसून, घरांत खुशाल शिवण्यास कांहीं शंका वाटत नाहीं. आगगाडीनें आणि आगबोटीनें विटाळाची कल्पना अगदीं नाहींशी करून टाकिली आहे.

११. पांचपन्नास कोसांवर पत्र जाऊन उत्तर येण्यास पांचचार दिवस लागत, खर्च पडे, आणि काळजी वाटे. आतां डाकेनें पत्र तेव्हांच आणि थोडक्यांत जातें. तारेनें बातम्या एका घटकेंत पाठवितां येतात. आणि टेलिफोनीनें तर पांचपंचवीस कोसांवरच्या माणसांशीं प्रत्यक्ष बोलतां येतें. त्याचें कांहीं वाटत नाहीं.

१२. सरकार मायबाप वाटे. सरकारानें कांहीं केलें तरी त्याविषयीं कांहींएक बोलूं नये, निमूटपणें पाहावें आणि सोसावें, असें लोकांस वाटे. आतां त्या प्रकरणीं सभा कराव्या, सरकारास आणि पार्लमेंटास अर्ज करावे, हें लोकांस कळूं लागलें आहे. बाजीरावांस गादीवरून काढिलें तेव्हां कोणी कांहीं बोललें नाहीं. मल्हारराव महाराजांच्या चौकशीच्या कमिशनांत अर्धे एतद्देशीय लोक असावे, असा अर्ज सरकारास रयतेनें केला होता.

१३. देशाचे कायदे सरकार आपणांस योग्य वाटतील त्याप्रमाणें करीत असे. लोकांचें मत घेत नसे. आतां कायदेकौन्सलांत एतद्देशीय लोकांस घेतात, आणि त्यांच्या अनुमतानें कायदे करितात. त्याप्रमाणें म्युनिसिपालिट्या आणि लोकलबोर्डें ह्यांत एतद्देशीय लोकांस घेऊन त्यांच्या साह्यानें काम चालवितात.

१४. पूर्वीं परकीय लोकांसारखी बंडी घालण्यास देखील लाज वाटे. पण आतां, पायांपासून डोक्यापर्यंत परकीयांसारखा पोषाक करण्याचा मोठा डौल वाटतो. फार काय सांगावें, बायकांच्या पोषाकाची तऱ्हाही परकीय बायकांच्या पोषाकाच्या तऱ्हेवर चालली आहे.

१५. धर्मसंबंधाचें आमचें मूळचें वळण आमच्या वडिलांत होतें, त्याच्या निमे आमच्यांत नाहीं. आमच्यांत आहे, त्याच्या चौथा हिसा आमच्या मुलांत नाहीं; आणि आमच्या मुलांत आहे, त्याचा दहावा हिसा आमच्या नातवांत नाहीं. असें हें प्रमाण कमी कमी होत चाललें आहे. शेवटीं काय होणार आहे, तें कळत नाहीं.

१६. पूर्वीं गुरुविषयीं मोठी पूज्यबुद्धि असे. ज्यानें आपणास दोन अक्षरें शिकविलीं आहेत, त्याशीं नम्रपणानें वागणें हें कर्तव्य समजत. तें आतां गेलें आहे. वर्ग बदलला झणजे शिक्षक बदलले. आणि शिक्षकाचा संबंध तुटला, झणजे तो आणि आपण एक सारखे–बरोबरीचे–असें मुलांस वाटतें.

१७. पूर्वीं बोलणें थोडें असे आणि करणें पुष्कळ असे. आतां त्याच्या उलट प्रकार वाढत चालला आहे. सभा, निबंध, व्याख्यानें हीं आतां पुष्कळ सुकाळलीं आहेत. त्यांत वाक्पांडित्य पाहिजे तितकें होतें; त्याप्रमाणें वागणें होत नाहीं. पुष्कळ बोलेल तो शाहाणा, असें कांहीं झालें आहे. आणि सामर्थ्यापेक्षां वाचाळता फार वाढल्यामुळें सर्व प्रकारीं हानि होत आहे.

१८. भाषेंत विलक्षण फेर झाला आहे. पोषाकाप्रमाणें भाषेला इंग्रजी स्वरूप येऊं लागलें आहे. इंग्रजी शब्द मोठ्या झपाट्यानें भाषेंत मिसळत आहेत. कोर्ट, स्टेशन, फी, अपील, नंबर, फारेस्ट, रेव्हिन्यु, माजिस्ट्रेट, जज्ज, क्वारंटैन, प्लेग, सेग्रेगेशन, हे शब्द आतां मराठी झाले आहेत. ते कोणास परके वाटत नाहींत.

१९. कलेक्टर, कमिशनर, हायकोर्ट जज्ज, इत्यादि जागा साहिबलोकांस मात्र मिळावयाच्या, त्या एतद्देशीयांस कधीं मिळावयाच्या नाहींत, असा दृढ ग्रह होता.त्या जागा आतां एतद्देशीयांस मिळूं लागल्या आहेत,त्यामुळें तो ग्रह गेला आहे.

२०. महाजनसभा, सार्वजनिकसभा, राष्ट्रीयसभा इत्यादि मंडळ्या राज्यकर्ते आणि प्रजाजन ह्यांच्या मध्यस्थ झाल्या आहेत. त्यांच्या ह्मणण्याचा विचार आमचे राज्यकर्ते करीत आहेत, आणि त्यांचा उपयोग पुष्कळ होत आहे. ह्याविषयीं पूर्वीं कोणाला स्वप्न देखील पडलें नव्हतें. त्या सभा पाश्चिमात्यांच्या नमुन्यावर स्थापिलेल्या आहेत.

२१. सत्तावनसालीं एवढा मोठा बंडाचा धुमाकूळ मांडला होता तरी, त्या प्रसंगीं अमुक एक करावें, असें प्रजाजनांनीं सरकारास सुचविलें नाहीं. पण आतां, सरहद्दीवरच्या लढाईच्या संबंधानें काय करावें हें ते नानाप्रकारीं सांगत आहेत. हें सगळें फळ विद्येच्या प्रसाराचें आहे.

२२. पूर्वीं शाळा थोड्या होत्या, आतां पुष्कळ आहेत. लोक पूर्वींपेक्षां अधिक शाहाणे झाले आहेत. ज्या माणसांस अक्षराची ओळख नव्हती, त्यांचे नातू एम्. ए. झाले आहेत. ज्या खेड्यांत एकाददुसरा वाचणारा होता, त्या एका खेड्यांत पांचपंचवीस वाचणारे आढळतात. हें सगळें आमच्या राज्यकर्त्यांच्या कृपेचें फल आहे. त्याबद्दल त्यांचे उपकार मानावे, आणि त्यांचें कल्याण चिंतावें, हें आपलें कर्तव्य आहे. पण ह्या ज्ञानप्रसाराबरोबर नीतिमत्ता वाढली नाहीं, चावटपणा वाढला आहे. लोक पहिल्यापेक्षां अधिक वाचाळ मात्र झाले आहेत.

२३. पूर्वीं स्वातंत्र्य हें स्त्रियांस नाहीं, अशी समजूत दृढ होती. परंतु, गिरण्यांसारख्या कारखान्यांत बायकांस स्वतंत्र कामें मिळूं लागल्यामुळें अगदीं अजाण बायका देखील स्वतंत्र झाल्या आहेत. पुरुषांच्या आधाराशिवाय आपलें चालेल,असें आतां बायकांस वाटूं लागलें आहे.

२४. पूर्वीं जातिमर्यादा फार असे.म्हार हा आपणास आपण होऊनच ब्राह्मणापेक्षां नीच मानीत असे. ती भावना कमी कमी होत चालली आहे. म्हार, किंवा त्यांसारख्या नीच जातीचे लोक, विद्येनें आणि वर्तनानें दिवसेंदिवस अधिक सुधारून ब्राह्मणांची बरोबरी करायाचा प्रयत्न करीत आहेत. आणि तो कांहीं फुकट जात नाहीं आहे. परंतु ब्राह्मण लोक, आपलें श्रेष्ठत्व कायम राखण्याकरितां, अधिक अधिक विद्वान आणि अधिक अधिक पवित्र ऋषीप्रमाणें होण्याचा प्रयत्न करीत नाहींत, एवढेंच केवळ नव्हे, तर, नीच लोकांचीं कर्में करून श्रेष्ठत्वांत आणि पावित्र्यांत एक एक पाऊल मागें सरत आहेत. ह्यालाच आमचीं जुनीं माणसें वर्णसंकराचीं लक्षणें ह्मणतात.

२५. पूर्वीं राजकारणांत लक्ष देण्यास आपणांस कारण नाहीं, असें सगळ्या लोकांस वाटत असे. आतां असें वाटूं लागलें आहे कीं, साधारण लोकस्थितीविषयीं सरकारांत शोध करणें हें लोकांचें कर्तव्य आहे. 'नातु' बंधुद्वयांच्या संबंधानें कौंसलांत प्रश्न विचारितात, आणि त्यांचीं उत्तरें मिळतात, हें त्याचेंच एक उदाहरण आहे.

२६. पूर्वी मंडळ्या मिळवून, शेर काढून व्यापार करण्याचा प्रघात इकडे चालू नव्हता, तो आतां चांगला चालू झाला आहे. एकट्या मुंबई शहरांत सुमारें शंभर गिरण्या आहेत. त्या सगळ्या अशा प्रकारें उभारलेल्या आहेत.

२७. धर्मास चलन पाहिजे असें लोकांस बरेंच वाटूं लागलें आहे. सध्याच्या धर्मस्थितीनें मंडळीची तृप्ती होत नाहीं. प्रार्थनासमाज, आर्यसमाज, ब्राह्मसमाज, हीं सगळीं त्याचींच फळें आहेत. ही सगळी खटपट गेल्या पन्नास वर्षांतली आहे.

२८. धर्म तेथून सगळे सारखे आहेत अशी लोकांची खात्री अधिकाधिक होत चालली आहे. प्रथम प्रथम श्रेष्ठ जातींतले कांहीं समंजस लोक स्वधर्म टाकून परधर्माचा स्वीकार करिते झाले. परंतु अलीकडे तें धोरण अगदीं सुटलें आहे. समंजस माणसें सहसा धर्मांतर करीत नाहींतशीं झालीं आहेत.

२९. युरोपांतल्या चांगल्या कुटुंबांप्रमाणें आपलीं कुटुंबें सुधारावीं, अशी इच्छा लोकांस उत्पन्न झाली आहे. तीस अनुसरून कांहीं उद्योगही चालले आहेत. पण त्यांत खऱ्यापेक्षां ढोंग फार आहे. कृतीपेक्षां स्फिती अधिक आहे. असें असें करावें असें सांगायास आणि प्रतिपादायास सगळे तयार असतात. पण, तसें करावयाचा प्रसंग आला ह्मणजे पुढें सरावयास कोणी नाहीं.

३०. असो. असे फेरफार गेल्या पन्नास वर्षांत झाले आहेत. ह्यांच्या योगानें आपण पहिल्यापेक्षां चांगले झालों आहोंत कीं वाईट झालों आहोंत, हें ज्यांचें त्यांनीं आपल्या ठायीं पहावें, आणि त्या संबंधाचें आपलें कर्तव्य करावें.

---

# तान्हाजी मालसुरे
## अथवा
# सिंहगडची मोहिम.

## प्रकरण तिसरें.

स्वजन[1] त्याजवळी बहु रांगडी
असति शूर, गंभरी[2], खरे गडी;
मरण ते अपकीर्तिस लेखिती,
स्वतनुची लव त्यांस नसे क्षिती. ३४

बिकट पर्वत; दुर्गहि दुर्जय;
गडकरी रण-सिंह न संशय;
परि शिवंदिहि थोर पराक्रमी;—
विरळ वीर असा गड आक्रमी[3]. ३५

---

जधिं जगीं रजनी-भर ऊसळे,
टपटपां दंव जें अति कोसळे,
खरतरें खिळिले जन जैं हिमें,
तधिं रिघे शिव-सैन्यहि मोहिमे. ३६

निबिड जैं तम रोधित सृष्टिला,
दिसत सर्व भयाणच दृष्टिला;
भिवविति स्वपनें जधिं निद्रितां,
जधिं जगत्क्रम[4]ही गमला रिता, ३७

गड-तळीं झुजती तधिं मावळे-
कवळ तो गड, ते जणुं कावळे;
सर करूं तट एक गडी रिघे-
शिरिं सु-रज्जु, मुखीं तरवारि घे. ३८

अति उतावीळ होउनि साहसी
ह्मणत "काय गड्या, मुख पाहसी ?
"हुकुम दे मज, हूं ह्मण, तान्हया !
"रुचत ना बरवें वच आनें[5] या. ३९

---

१ आप्तजन. २ गंभीर. ३ सर करणें. ४ व्यापार. ५ अन्य.

" दिस इथें उगवेल-बघा बरें-
" रिपु तुह्मां मग दे गुळखोबरें:
" निघावें घोरपडी, अथवा मशीं-
" तट तुझ्या करिं सत्वर पाहशी. ४०

" कर मघांधरूनी बहु शिर्शिरे
" चरचरां उडवूं अरिचीं शिरें;
" समुर जाइन थेट गडावरी
"बघ असा"-पिटुनी भुज डावरी. ४१

धडक तो वदतां वदतां असें
पादें तटाक्रमणासि करीतसे;
बघुनि शौर्य चमूपति हांसला,
वदत-" गा, रणधीर, भला भला ! ४२

" चढ, चढोव मला, इतरांसही !
" चल गड्या, गड आज करूं सही !
" प्रसवली तव माय खरी तुला;
" न तव धैर्य-बळा दुसरी तुला " ४३

तंव गडी दुसरा सरसावला
संवगडी निज देखुनि वर्णिला;
असिमुखीं शेण-रज्जुहि घे शिरीं,
सजव धांवत तो प्रति-केसरी. ४४

तट-तरूवरि हे नर-वानर
जय-फळा हरण्यास्तव सादर;
खिळविती नखरूप खिळे तटीं,
अरि-मुखीं जणूं हाणिति चापटी. ४५

ठरवुनी पद त्यांवरि चालले,
न पळतां पळ, ते तटिं पातले.
न नर, वानर वा, तरि हे ध्वज
धडकले गुणशालि सु-वंशज. ४६

द्वि-पद घोरपडी बिलगूनि या,
सुदृढ रज्जु भले खिळवूनियां,

१ उडविण्याला. २उपमा. ३ वर्णिलेला. ४ दोरखंड.

बहु परीक्षुनि सोडिति खालते;
बळें तयांवरूनी वरि चालतें. ४७

जिकडुनी जखडून परांचिया
खचुनि राशितळींहि परींचिया,
बहुधनार्थ चढेल न धाडशी
चढति त्या तटिं दक्षिणच्या निशी. ४८

रणदिदृक्षु विमानिं सुर-स्त्रिया
दचकल्या निरखून दल-क्रिया;
लपविती ढवळीं मुख-सारसें
बघुनि ते चढतां वरि तीरसे. ४९

' तट-मिषें चढती नभिं निश्चयें
न नर हे, रजनीचर' या भयें
घन-कुचोत्कट-पीड करद्वयें
पुलकिता कवळीति पति स्वयें. ५०

क्षण खऱ्या हरिणीदृश भासल्या,
तटिं तयां स्थित देखुनि हांसल्या;
हरिखले सुर चुंबिति आननीं
गतमदा प्रमदा अति मानिनी. ५१

तटिं दलार्ध चमू-पतिच्या सवें
धडकले धडधाकड उत्सवें;
गदगदे गड, देह जसा गदें
वरुनि भास जरी शर्म सांग दे. ५२

सकल वीर तटें-स्थ निरेखिती
स्थिति गडांतिल-कोण, कुठें, किती !
गमति, ते यमदूतच हेरिती
गडें-बळी करिं ये कवणे रिती ! ५३

( पुढें चालेल )

१ सैन्य. २ परांच्या. ३ पिसाच्या. ४ पाहण्याला उत्सुक. ५ शुभ्र. ६ कमळें. ७ हरिणीसारखे (दीर्घ, मोठाले ) आहेत डोळे ज्यांचे अशा. ८ शांति ९ शांतपणानें अथवा, तटावर उभे राहून. १० गड हाच कोणी बळी.

Printed at the " Ganpat Krishnaji's " Press, Bombay, 30-1-99

॥ श्रीः ॥

# मालतीमाधव–सार व विचार.

## अंक पहिला.

[ मंगलाचरण शैव व गाणपत्य मिश्रित आहे. यांत शिवकृत तांडव नृत्याचें मुख्यत्वें वर्णन केलें असून तदनुषंगानें गणपतीचा उडालेला गोंधळ गमतीचा वर्णन केला आहे. ]

शिवतांडवाच्या वेळीं नंदीनें सपाटून ढोल वडविणें सुरू केलें; ढोलाची मेघध्वनितुल्य गंभीर गर्जना ऐकून कार्तिकेयवाहन मयूर प्राप्त झाला. त्याला पाहतांच शंकरशरीरभूषणभूत नागराज भयभीत होत्साते फणा आटोपून गडबडीनें गणेशजीच्या सोंडेंत शिरूं लागले. त्यामुळें नाकांत गुदगुल्या होऊन गणराज जोरानें मस्तक व सोंड हालवून चीं चीं करूं लागले. त्यांच्या गंडस्थलावरील भ्रमर उडून गुंजारव करूं लागले. त्या शब्दानें दाही दिशा दणाणून गेल्या. अशा गडबडींत चाललेला तो गणेशजीचा चीत्कार सर्वांचें रक्षण करो–अशी कवीनें प्रार्थना केली आहे ! !

[ कोण विलक्षण क्लिष्ट व दूरान्वित कल्पना ! यांत गणपतीविषयीं आदरबुद्धीचा लेश नाहीं. कसें तरी करून मंगलाचरणाकरितां त्याला ओढून आणिलें आहे. आधुनिक अश्लील नाटकांत विदूषक गणपतीची थट्टा प्रत्यक्ष करितो, तशांतलाच हा प्रकार नाहीं असें कोण ह्मणेल !

दुसऱ्या श्लोकांत शिवतांडवाचेंच वर्णन केलें आहे तें यापेक्षां विशेष प्रौढ व बरेंच मनोहर आहे. त्याच्यांत ग्राम्यपणा नाहीं. ]

सपाट्यानें तांडव नृत्य चाललें असतांना शिवाच्या मस्तकावरील जटाभार विस्खलित होऊन मेघमंडळाप्रमाणें इकडेतिकडे भ्रमण करूं लागला; त्याच्यांतील गंगाजलाच्या धारा याच मेघापासून पडणाऱ्या वारिधारांसारख्या दिसूं लागल्या; तृतीय नेत्रांतील वन्हिशिखा विद्युल्लेखेप्रमाणें झळकूं लागली; व चंद्रकला कोमल केतकीपत्राप्रमाणें जटेंत खोंचलेली दिसूं लागली. असा त्या भूतनाथाचा भुजंगरूपी वल्लींच्या माळांनीं बद्ध झालेला जटाजूट तुमचें रक्षण करो–अशी प्रार्थना केली आहे.

[ यांत निदान नैसर्गिक सृष्टिसौंदर्याचें तरी खुबीदार वर्णन रूपकद्वारा केलें आहे.

हा ग्रंथ रचला गेला त्यावेळीं शैवमत पूर्वीपासून सर्वमान्य झालेलें होतें तें त्याचें महत्त्व फारसें कमी झालेलें नव्हतें, इतकेंच नव्हे, तर तें महत्त्व बरेंच कायम होतें. शिवाय, शिवाच्यासंबंधानें त्याचे पुत्र कार्तिकेय व गणपती

यांचेंही महत्त्व बरेंच वाढत चाललेलें होतें, वैष्णव मताचा फारसा प्रादुर्भाव झालेला नव्हता, व गणपती केवळ अग्रगण्यपणाला पोहोंचला नव्हता, असें या दोन्ही मंगलाचरणांवरून दिसतें. यावरून या ग्रंथाचा काळ निर्णय करण्याला कांहींसें साधन होतें. शैवमत ई. स. ४००।८०० पर्यंत उत्तर व मध्य हिंदुस्थानांत फारच भरभराटींत होतें. पुढें दुसऱ्या मतांचा हळू हळू प्रसार होत चालला, असें तत्कालीन अनेक मंदिरें व शिलालेख यांवरून सिद्ध झालें आहे. त्याअर्थी हा ग्रंथ या काळानंतर झालेला नाहीं असें अनुमान निघतें.

या मंगलाचरणांत व महाकवि कालिदास याच्या नाटकांच्या मंगलाचरणांत किती व कसा फरक आहे, व कालिदासाचें मंगलाचरण या मानानें किती गंभीर, उदात्त व सरळ आहे, हें प्रत्येक मर्मज्ञ वाचकाच्या तेव्हांच लक्षांत येण्याजोगें आहे. हाच मंगलाचरणांत दिसणारा फरक दोन्ही कवींच्या नाटकांत शेवटपर्यंत दृष्टीस पडतो. कालिदासाच्या काव्यांत जो नैसर्गिक चांगुलपणा आहे तो भवभूतीनें ओढून ताणून आणण्याचा यत्न केला आहे. ]

नंतर सूत्रधार रंगभूमीवर आला. नाटकारंभाचा काल सूर्योदयाचा घेतला आहे. सूत्रधारानें पुनः मंगलाचरण करून सूर्यनारायणाचें स्तवन व प्रार्थना केली. हा श्लोक अप्रतिम आहे. यांत, सर्व उत्तमोत्तम वस्तूंचा खरा दाता श्रीसूर्यनारायणच आहे.हें सर्व जगत् त्वन्मय आहे. तुला मी नमस्कार करितों. माझें सर्व पाप नाहींसें करून मला संपत्ति व महत्त्व दे व माझें सर्व तऱ्हेनें कल्याण कर—अशी प्रार्थना केली आहे, ती प्रत्येकानें दररोज ह्मणण्यासारखी साधी आणि सरळ आहे.

[ अशा तऱ्हेनें सूत्रधारानें पडद्याबाहेर आल्यावर पुनः मंगलाचरण केल्याचें हें पहिलेंच उदाहरण दिसतें. पूर्वीची नांदी पडद्याच्या आंतून ह्मटली जात असे, असें यावरून ठरतें. नांदी झाल्यावर अशा निराळ्या प्रार्थनेची आवश्यकता वाटत नाहीं. भवभूति सूर्योपासक होता, असें या श्लोकावरून दिसतें.

सूत्रधाराच्या बोलण्यावरून या नाटकाचा प्रयोग प्रातःकाळापासूनच सुरू झाला होता असें दिसतें. रंगभूमीच्या संबंधाचीं योग्य मंगलें उरकून सूत्रधार बाहेर आलेला होता.

कालप्रियनाथ ह्मणजे उज्जयिनी येथील श्रीमहाकाळ किंवा यमुनेवरील काल्पी येथील प्रसिद्ध शिवालय—याच्या यात्रेच्या प्रसंगानें नाना देशचे अनेक विद्वान् लोक उज्जयिनी किंवा काल्पी येथें एकत्र झाले असून त्यांनीं सांगितल्यावरून या नाटकाचा प्रयोग प्रथम त्यांना काल्पी येथें करून दाखविला गेला असावा. भवभूतीला प्रारंभीं राजाश्रय फारसा नव्हता, यामुळें त्याला आपल्या नाटकाचा प्रयोग अशा तऱ्हेनें मेळ्यांत सामान्य लोकांच्या समाजापुढें करून दाखवावा लागला. पुढें त्याच्या कुळाचें व गोत्राचें वगैरे वर्णन दिलें आहे. त्यावरून हा प्रयोग करून दाखविण्याच्या वेळीं भवभूतीची फारशी प्रसिद्धी झालेली होती असें दिसत नाहीं. त्याला आपल्या काव्याच्या गुणावरच, लोकांची फारशी पर्वा न करितां, प्रसिद्धीस यावें लागलें. त्याचें काव्य तत्कालीन विद्वान् लोकांनीं त्याच्या मर्जीप्रमाणें पसंत केलें नाहीं यामुळें तो विरस झाला, व पुढें त्यानें 'हल्लीं नाहीं तरी कालांतरानें तरी माझ्या काव्याची प्रसिद्धी होईलच. हल्लीं जे लोक मला नांवें ठेवितात त्यांच्याकरितां हा मुळीं यत्नच नाहीं.

त्यांना काय कळतें,! मला त्यांची काय पर्वा ?'— असे कांहीं निराशेचे, कांहीं रागाचे व गर्वोक्तीचे उद्गार काढिले आहेत.

सूत्रधारपारिपार्श्वकसंवादरूपी प्रस्तावना केवळ कवीची कुलकथा व त्याच्या कुलाचें व काव्याचें माहात्म्य लोकांना कळवून देण्याकरितांच केलेली आहे. तिचा नाटकांतील कथानकाशीं फारच थोडा संबंध आहे. अप्रसिद्ध, पण स्वतःच्या अंगच्या गुणाविषयीं खात्री असलेल्या व लोकांपुढें कसेंतरी करून प्रसिद्ध व्हावें असें वाटत असणाऱ्या कवीला अशी प्रस्तावना करावीच लागते. खरोखर पहिल्या प्रतीच्या कालिदासासारिख्या प्रासादिक कवींना आपल्याविषयीं किंवा आपल्या पूर्वजांविषयीं बढाई मारण्याचें कारण पडत नाहीं. त्यांच्या प्रासादिक कृतीची तेव्हांच सर्वतोमुखीं प्रसिद्धी होते व ते लौकरच सर्वमान्य होतात. भवभूतीचा प्रकार तसा झाला नाहीं. कारण त्याचीं तीन्ही नाटकें केवळ नाटकें या नात्यानें सामान्य बुद्धीच्या लोकांना सहज वाचतांच समजून खरा आनंद देण्याजोगीं प्रसादयुक्त नाहींत, ही गोष्ट प्रत्येकाला मान्य करावी लागेल. यामुळें त्याच्या नाटकांची त्याच्यावेळीं चहा झाली नाहीं; इतकेंच नव्हे, तर ती केव्हांही होणें शक्य नाहीं. काव्य या नात्यानें हे तीन्ही ग्रंथ अप्रतिम आहेत, परंतु नाटकें या नात्यानें ते बरेच कमी दर्जाचे आहेत; व यामुळें ते त्याच्या वेळीं देखील लोकांना आवडले नाहींत, ह्मणून त्याला आपल्याविषयीं व आपल्या वाडवडिलांविषयीं बढाई मारावी लागली. हें एक तऱ्हेनें बरेंच झालें. कारण त्यामुळें, निदान त्याच्याविषयीं, इतर मोठमोठ्या कवींच्या मानानें, पुष्कळशी माहिती उपलब्ध झाली; इतर कवींच्या प्रमाणें त्याच्याविषयींही केवळ अनुमानावरच अवलंबून राहावयाला नको.

त्याच्यावेळीं लोकांना नाटकांमध्यें मुख्यत्वें कोणकोणचे गुण असणें अवश्य वाटत होतें हें निदान त्याच्या मताप्रमाणें त्यानें सांगितलें आहे. त्यांत, 'नाटकांत सर्व रसांनीं परिपूर्ण असे पुष्कळ गहन प्रयोग असावेत; प्रेम संबंधानें हृदयंगम वाटणाऱ्या नायकनायिकादिकांच्या कौतुकक्रीडा असाव्या; नायकाचा उद्धतपणा मदनलक्षणयुक्त असावा; चित्रविचित्र कथानकें व भाषाचातुर्य असावें; इतके गुण अवश्य होते. आतां यांपैकीं कोणचे कोणचे गुण खरोखर अवश्य आहेत व त्यांतून भवभूतीनें आपल्या नाटकांत कोणचे गुण किती साधले आहेत याविषयीं विचार या लेखांत जागोजागीं केला जाईल. तरी येथें इतकें सांगणें अवश्य आहे कीं, नाटक ह्मणजे संसाराचें चित्र खुबीदार रीतीनें लोकांच्या डोळ्यांपुढें आणून उभें करणें होय; तें अमुकच तऱ्हेचें असावें, असे नियम करून चालत नाहीं. एखाद्या महानदीचें वनपर्वतादिकांमधून स्वैर चालणारें पात्र व तिच्यांतून काढलेल्या मोठ्याशा कालव्याचें सपाट व आबाद जमिनींतून वाहणारें नीटनेटकें पात्र, या दोहोंमध्यें रमणीयतेच्या मानानें जितका फरक स्वतःसिद्ध असावयाचाच, तितकाच फरक खऱ्या नाटकामध्यें व कृत्रिम नियमांस अनुसरून रचिलेल्या नाटकामध्यें असावयाचा, ही गोष्ट नेहमी लक्षांत ठेविली पाहिजे. ]

'इतक्या सर्व गुणांनीं युक्त असें एक नाटक आपल्या लक्षांत आहे. आमच्या सारख्यांशीं भवभूतीचा उपजत स्नेह असल्यानें तें त्यानें आपणाला दिलें आहे,' असें सांगून सूत्रधारानें हा

भवभूति कोठील, कोणचा,कोण,याविषयीं पुढील माहिती दिली:—

'दक्षिण देशाच्या मार्गावर, विदर्भ देशांत पद्मपुर नांवाचें नगर आहे. तेथें काश्यप गोत्री तैत्तिरीय शाखेचे पंक्तिपावन, अग्निहोत्री, व्रतस्थ राहणारे, यज्ञयागादिक करणारे, ब्रह्मवेत्ते, उदुंबर नांवाचे ब्राह्मण राहतात. ते तत्वविनिश्चय करण्याकरितांच पुष्कळशी विद्या संपादन करितात; व द्रव्यसाधन व संचय केवळ इष्टापूर्त कर्मे–सार्वजनिक उपयोगाचीं–इह परलोकीं गति देणारीं–कूपतडागादिक आणि यज्ञयागादि कर्मे करण्यास्तवच करितात. पत्नीसेवन केवळ अपत्यप्राप्त्यर्थ, व आयुष्याचा खरा उपयोग केवळ तपश्चरण करणें हाच आहे, असें समजतात. त्या कुळांत भट्ट गोपाळाचा नातू–भट्ट नीलकंठाचा व जातूकर्णीचा पुत्र–भट्ट श्रीकंठ भवभूति नांवाचा जन्मास आला. तो मोठा कवि आहे.'

[ या वर्णनावरून भवभूति हा पवित्र व श्रेष्ठ अशा ब्राह्मणकुळांत जन्मास आला; त्याच्या वेळीं यज्ञयागादिक क्रिया व अग्निहोत्रादि श्रौत कर्मे ब्राह्मण लोक आस्थेनें करीत असत व याबद्दल त्यांचा बहुमान होत असे; ते फारच साध्या व सन्मान्य वृत्तीनें रहात असत, व ब्राह्मणांविषयीं अद्यापि यत्किंचितही तिरस्कारबुद्धि उत्पन्न झालेली नव्हती, असें दिसतें. तसेंच अशा विद्वान् व आचारसंपन्न कुळामध्यें उत्पन्न झाल्यामुळें भवभूतीला उत्तम शिक्षण मिळालें असावें, व वेदांतशास्त्र व काव्य नाटकादिकांचें त्यानें चांगलें अध्ययन केलें असावें. आपल्या शिक्षणाचा व विद्वत्तेचा भवभूतीनें आपल्या ग्रंथांत बुध्या जागजागीं पुष्कळ उपयोग केल्याचें आढळतें.

दक्षिणापथ, विदर्भदेश, व पद्मपूर, याविषयीं पुष्कळ विचार करण्यासारखा आहे. कालप्रियनाथ ह्मणजे उज्जनी येथील महाकाल असें घेऊन चाललें तर, दक्षिणापथ ह्मणजे उज्जनीहून दक्षिणेंत जाण्याचा मार्ग; विदर्भ देश ह्मणजे हल्लींचा वऱ्हाड प्रांत, व पद्मपूर ह्मणजे त्या प्रांतांतील कोणचें तरी एक प्राचीन प्रसिद्ध नगर, असें मानावें लागतें. परंतु पुढें पद्मावती नांवाची नगरी या नाटकांतील बहुतेक प्रसंगाचें मुख्यस्थान होती असें वर्णन केलें आहे, ती पद्मावती व पद्मपूर दोन्ही एकच असावीं असें मानण्याला बरींच कारणें आहेत. नाटकांत पद्मावतीचें जें वर्णन दिलेलें आहे तें काल्पनिक नसून अक्षरशः खरें आहे. पद्मावतीविषयींची माहिती कवीनें दिली आहे ती प्रत्यक्ष नेहमीं पाहिल्यासारखी दिली आहे. पद्मावतीच्या आसपासचे नदीनाले, पर्वत, अरण्य, प्रपात किंवा धबधबे वगैरेचें वर्णन या नाटकांत दिलें आहे, तसें दूर वऱ्हाडांत राहणाऱ्या गृहस्थाला सहसा देतां येण्याजोगें नाहीं. हा सर्व भाग वर्णन करणाऱ्यानें बालपणापासून नेहमीं पाहिलेला असला पाहिजे. पद्मपूर व पद्मावती, एकच मानली ह्मणजे कालप्रियनाथ कोणचा याविषयीं निर्णय करणें अवश्य आहे. पण तें तितकें सोपें नाहीं. कालप्रियनाथ नांवाचें एक प्राचीन शैवस्थान यमुनेवर काल्पी येथें असावें, व तेथें पूर्वीं प्रतिवर्षीं मोठी यात्रा भरत असावी. तूर्त या अनुमानाला शब्दसादृश्यावांचून दुसरा फारसा आधार नाहीं. पण कालप्रियनाथ काल्पीस होता, असें घेऊन चाललें तर, तेथून दक्षिणेंत जाण्याचा रस्ता पद्मपूर-पद्मावतीवरून विदर्भ देशांतून होता. व तो वि-

दर्भ देश ह्मणजे नरवरच्या आसपासचा प्रदेश होय असें ह्मणतां येतें. प्राचीन देशविभाग-व्यवस्थेंत या प्रदेशालाही विदर्भ असें ह्मटलें आहे. पद्मावती-पद्मपूर हें प्राचीन व मोठें शहर हल्लींच्या नरवरच्या किल्याच्या ईशान्येस, सुमारें २० कोसांवर सिंध व पारा किंवा पार्वती नांवाच्या नद्यांच्या संगमावर होतें. जनरल कनिंगह्याम साहेबांनीं पद्मावती व नरवर एकच असें ठरविलें आहे; पण तें बरोबर नाहीं. भवभूतीनें वर्णन केलेल्या पद्मावतीजवळ सिंधू व पारा नद्यांचा संगम, तसाच लवणा-नोन-नदीचा संगम, मधुमती-महुवर-नदीचा संगम, सुवर्णबिंदू नांवाचें शिवाचें पवित्रस्थान व सिंधूचा प्रपात किंवा धबधबा, इतक्या गोष्टी असल्याचें वर्णन आहे; त्यांपैकीं एकही नरवराजवळ नाहीं. पण पद्मावतीपासून सुमारें २ कोसांचे टप्यांत या सर्व गोष्टी आहेत. शिवाय हल्लीं देखील या गांवाला पदमपूर-पवाया-पोलपवाया असें ह्मणतात; व या जागीं पूर्वीं एक फारच मोठें शहर असावें, अशाबद्दल जुन्या इमारतीचे पाये मोठमोठया विटांचे बांधलेले, असे सुमारें एक कोस समचौरस जागेंत आढळतात. पूर्वीं या जागीं एका बऱ्याच मोठ्या राजाची राजधानी होती अशी दंतकथा आहे, व तेथें पुराणीं नाणींही अद्यापि सांपडतात. जनरल कनिंगह्याम साहेबही हें स्थळ प्रत्यक्ष पाहते तर त्यांची याविषयीं तेव्हांच खात्री झाली असती. हें गांव लष्कर ग्वाल्हेरपासून सुमारें १८ कोसांवर नैऋत्येस आहे. तेथून दोन मैलांवर धूमेश्वराचें रमणीय स्थान व सिंधूनदाचा धबधबा आहे. तेथें प्रतिवर्षीं चैत्रमासांत बरीच यात्रा जमते. तेथून दोन कोसांवर सुवर्णगिरी किंवा सोनागीर नांवाचा डोंगर आहे. त्याच्यावर हल्लीं जैन लोकांचीं पुष्कळशीं पाहण्याजोगीं मंदिरें आहेत. ]

हें सर्व वर्णन केल्यावर सूत्रधारानें भवभूतीच्या नाटकांतील ह्मणून दोन श्लोक ह्मटले आहेत. त्यांतील पहिल्यांत ' मला नांवेंच ठेवणारे लोक आहेत त्यांना काय कळतें ? त्यांच्याकरितां हा माझा यत्नच नाहीं. मजसमान असणारा व या माझ्या कृतीचें खरें मर्म कळणारा कोणी ना कोणी कधींना कधीं उत्पन्न होइलच; कारण काल हा अनंत आहे, व पृथ्वी अत्यंत अफाट आहे; असें कांहीं त्रासानें, कांहीं रागानें, व कांहीं उद्दामपणानें ह्मटलें आहे, तें किती तरी खरें आहे! पुढें कालांतरानें खरोखरीच भवभूतीची ख्याती झाली व त्याची कालिदासाबरोबर गणना होऊं लागली. व तीही त्याच्या स्वदेशीयांकडूनच नव्हे तर परद्वीपस्थांकडूनही ! हा काय थोडा मान आहे ! तसेंच दुसऱ्या श्लोकांत त्यानें आपल्याला, आपल्या ग्रंथाविषयीं जी इतकी खात्री वाटते ती केवळ आपल्या अंगीं ' वेदाध्यनय व उपनिषदें, सांख्य व योग, इत्यादिकांचें परिज्ञान वगैरे आहे त्याच्यावरून नव्हे; कारण त्यांच्यापासून ह्मणजे नाटकांत कांहीं विशेष गुण उत्पन्न होतो असें नाहीं; तर प्रौढपणा व भाषेचा उदारपणा, व अर्थगौरव वगैरे जे गुण अवश्य आहेत ते असले तर ते पांडित्याचे व चातुर्याचे दर्शक होतात. ' अर्थात् ते सर्व माझ्या नाटकांत आहेत ह्मणून मीं असें ह्मणतों, असें व्यंजित केलें आहे. यांत स्वतःची सर्व विद्वत्ता दाखविली व नाटकास अवश्य असेही गुण अंगीं असल्याचें उघड केलें आहे.

इतक्या सर्व गुणांनीं युक्त असें मालतीमाधव

नांवाचें नाटक करून दाखविण्याचें ठरवून सूत्रधार व नट तयारीला लागले.

येथवरच्या प्रस्तावनेवरून या नाटकाचा प्रयोग दिवसा होत होता, असें दिसून येतें. शिवाय पुढील भाषणावरून, स्त्रीपुरुषांचीं सर्व सोंगें पुरुषच घेत असत व स्त्रिया भूमिका घेत नसत, असेंही दिसतें.

नंतर सूत्रधार व नट, हेच कामंदकी व अवलोकिता यांचीं सोंगें घेऊन आले. त्यांचीं सर्व वस्त्रें भगवीं असत, व या बौद्ध धर्माच्या जोगिणी होत्या. येथें सौगत परिव्राजिका याचा अर्थ बौद्ध संतणी किंवा जैनी जोगिणी असा घ्यावा याचा विचार आहे. सूत्रधार व नट यांनींच हीं सोंगें घेतलीं आहेत. यावरून त्यांना आपल्या मिशा झांकण्याकरितां तोंडावरून लहानसा पडदा घेणें अवश्य पडलें असावें. नाकापुढें पडदा बांधण्याची चाल जैनांत आहे, बौद्धांत नाहीं. यावरून या जैनधर्मी जोगिणी असाव्या असें दिसतें. दुसरें, नाटकांतील संविधानकाच्या व ग्रंथरचनेच्या कालाच्या मानानेंही पाहतां, त्या सुमारास बौद्ध धर्माचा ऱ्हास होऊन बौद्ध व ब्राह्मण धर्म यांच्या बऱ्याचशा सम्मीलनानें झाल्यासारखा वाटणारा जैन धर्म बराच भरभराटींत येत चालला होता. यावरूनही या जैनी जोगणी असाव्या, असेंच ठरतें. ब्राह्मणलोकांशीं व वरिष्ठ प्रतीच्या लोकांशीं या जोगण्यांचा नेहमीं चांगला संबंध असे. त्यांच्याविषयीं अद्यापि लोकांच्या मनांत अनादर उत्पन्न झाला नव्हता. उलट थोरामोठ्यांच्या घरीं त्यांना चांगला मान मिळे, येण्याजाण्याला मोकळीक असे, व ब्राह्मणांचीं मुलें त्यांच्याबरोबर गुरूकडे किंवा खास त्यांच्या घरींही विद्याभ्यासाकरितां रहात असत, परस्पर कोणच्याही तऱ्हेचा दुजाभाव किंवा धर्मसंबंधानें वैर नसे, हें स्पष्ट आहे. यावरूनही या कवीच्या कालनिर्णयाला बरेंच साधन होतें. शंकराचार्यांच्या पूर्वीं कांहीं काल, व त्याच्या वेळीं, व नंतर शैव–वैदिक मतानुयायी ब्राह्मण व इतर बौद्ध–जैन–तांत्रिक वगैरे मतानुयायी लोकांमध्यें वैर पडूं लागलें होतें, व पुढें तर आपसांत युद्धें माजलीं. त्यापूर्वींचा भवभूतीचा काल धरला पाहिजे. नाहींतर त्याच्यासारख्या सनातन वेदोक्त कर्ममार्गानुसार चालणाऱ्या कडकडीत ब्राह्मणाच्या हातून जैनधर्मी किंवा बौद्धधर्मी संतिणींविषयीं इतका आदर कधीं झाला नसता. शंकराचार्य ई. स. ८०० च्या सुमारास होऊन गेले, असें आधुनिक विद्वानांचें मत आहे. त्याअर्थीं भवभूति यापूर्वीं बरींच वर्षें झाला असला पाहिजे.

यापुढें कामंदकी व अवलोकिता यांचा मूळ नाटकाच्या कथानकाचें हळू हळू उद्घाटन करणारा संवाद आहे. कामंदकीला, भूरिवसु व देवरात यांच्या मुलांचा परस्पर विवाह जमवून आणण्याचें काम आपण हातीं घेतलें आहे तें कसें काय पार पडेल याविषयीं बरीच काळजी व शंका होती, व तिच्या मनांत नेहमीं हाच विचार घोळत होता. तिनें अवलोकितेला सहज, 'कांगे, माझ्या मनाजोगें हें मालतीमाधव यांच्या लग्नाचें काम नीटपणें जुळून येईलना?' असें म्हटलें. व तितक्यांत तिचा डावा डोळा लवला. तेव्हां तो शुभ शकुन झाला, कार्य खचित होणार, असें तिला वाटलें, व तिनें तसें बोलून दाखविलें. अवलोकितेकडून बरोबरीच्या नात्यानें आपल्याला कांहीं साहाय्य मिळावें अशा हेतूनें तिनें तिच्याजवळ हें बोलणें काढलें होतें असें नाहीं. कवीनें केवळ वामाक्षिस्पंदनावरून इच्छित कार्यसिद्धि अवश्य होईल, एवढें

दाखविण्याकरितांच हा प्रसंग आणिला आहे. यावरून त्याच्यावेळींही हा शुभ शकुन मानला जात होता, व असें स्फुरण कांहीं अलौकिक संबंधामुळेंच डोळ्यांला होतें, व त्याचें फळ खचित मिळतें, अशी लोकांची समजूत होती असें ठरतें. असो. ' कामंदकीसारखी सर्वस्व सोडून भगवीं वस्त्रें पांघरून भिक्षावृत्तीनें दिवस काढणारी तापसी नेहमीं असल्या या लग्नाच्या उठाठेवींत सचित व निमग्न असते, ती केवळ आपखुषीनें असेल असें नाहीं, मालतीचा पिता भूरिवसु यानेंच तिला ही कामगिरी बहुधा सांगितली असेल ' असें अवलोकितेला वाटलें. व असल्या प्रतिष्ठित जोगिणीला असलें काम शोभत नाहीं असें तिला वाटून, ती आश्चर्ययुक्त होऊन कामंदकीला याविषयीं बोलली. त्यावर कामंदकीनें ह्मटलें—' अगे, तसें नाहीं. मला त्यानें जें हें काम सांगितलें आहे तें त्याचा माझा पूर्वीपासून तसाच अकृत्रिम प्रेमा व स्नेह आहे ह्मणूनच. हें त्याचें काम माझ्या हातून कसेंही करून घडलें, तर मी स्वतःला मोठी कृतार्थ समजेन. मग त्यांत माझे प्राण किंवा माझें तप खर्चीं पडलें तरी चिंता नाहीं. कारण, लहानपणीं मी, भूरिवसु, देवरात व इतर देशोदेशचे पुष्कळसे विद्यार्थी अध्ययनाकरितां एका ठिकाणीं रहात असूं. तेव्हां माझ्या व सौदामिनीच्या समक्ष त्या दोघांनीं आपसांत अपत्यसंबंध करावयाचा असें ठरविलें. व ह्मणूनच देवरातानें—तो हल्लीं विदर्भ देशच्या राजाचा मंत्री आहे—आपला पुत्र माधव याला, कुंडिनपुराहून अलीकडे येथें पद्मावतीला विद्याभ्यास पूर्ण होण्याकरितां ह्मणून पाठविलें, हें चांगलेंच केलें. कारण यांत त्यानें पूर्वींच्या अपत्य संबंधाविषयींच्या प्रतिज्ञेची आपल्या प्रिय मित्राला आठवण दिली, व अलौकिक गुणवान पुत्र त्याच्या दृष्टीस पडून त्याला आवडावा ह्मणून पुढें आणला. '

' मग यांत तुमच्या सारख्यांना मध्यस्थ घालून चोरून छपून लग्नाची तजवीज चालविण्याचें प्रयोजन काय ? असें असेल तर भूरिवसु व देवरात यांनीं उघडपणें पूर्व संकेताप्रमाणें अपत्यसंबंध कां घडवून आणूं नये ? यांत नड कोणची?' असें अवलोकितेनें विचारिलें. त्यावर ' राजानें आपला अंतरंग मित्र नंदन याच्याकरतां भूरिवसूजवळ मालतीला मागणी केली आहे. त्याला उघडपणें नाहीं ह्मणावें तर राजा रागावणार, याकरितां हा गुपचिप व बिनधोक उपाय योजिला आहे. ' असें कामंदकीनें ह्मटलें. हें ऐकून खरा प्रकार अवलोकितेच्या लक्षांत आला व तिनें ' वाहवा, वाहवा, भूरिवसु तर जसा कांहीं माधवाचें नांव, गांव सुद्धां जाणत नाहीं असा अगदीं अलिप्तपणा दाखवितो ! धन्य त्याची ! ' असें ह्मटलें. तेव्हां आतां खरा प्रकार तिला सांगण्याला हरकत नाहीं असें पाहून कामंदकी ह्मणते—'अगे, हें सारें सोंग बुद्ध्या घेतलेलें. तशांत माधव व मालती अद्यापि मुलें आहेत. त्यांना हा खरा प्रकार कळून उपयोगी नाहीं. ह्मणून खरी स्थिति त्यानें त्यांच्यापासून छपवून ठेविली आहे. त्या दोघांचें परस्पर प्रेम जुळलें आहे असें सर्वतोमुखीं आहे, व ही गोष्ट इष्टच आहे. याच योगानें राजा व नंदन यांना फसवावयाचें आहे. '

' खरा शाहणा मनुष्य बाहेरून सर्वांशीं गोड रीतीनें वागतो व त्या योगानें लोकांपासून गुप्त राखण्याच्या लहानसहान गोष्टीवर देखील झांकण घालतो. व याप्रमाणें कपटानें वागून, सर्वांचें संधान राखून, स्वतः नांवानिरा-

ळा राहून आपलें कार्य साधतो, व पुन्हा बभ्रा झणून कसा तो होऊं देत नाहीं. '

[ येथवरच्या कामंदकीच्या भाषणांत पुष्कळ गोष्टी विचार करण्यासारख्या आहेत. एक तर, पूर्वी विद्याभ्यासाकरितां देशोदेशच्या मुली व मुलगे एखाद्या प्रसिद्ध शहरांत कोणा मोठ्या विद्वान् गुरूजवळ बरींच वर्षे अध्ययनाकरितां रहात असत. निदान ब्राह्मणांचीं मुलें अशा तऱ्हेनें रहात असत. मुलींनाही तत्कालीन वरिष्ठ प्रतीचें शिक्षण मुलांबरोबर दिलें जात होतें, व पुढें त्या योग्य वाटल्यास एकदम परमार्थप्रद मार्गांचें सेवन करीत असत. असें करण्यांत कांहीं दोष मानला जात नसे.उलट त्यांची अधिक मान्यता होत असे, व त्यांना मोठमोठ्यांच्या घरीं अप्रतिबंध जातां येत असे. त्या आपल्या योग्यतेप्रमाणें मठाधिकारिणी होत असत. बहुतेक मोठ्यांच्या मुलींना चांगलें शिक्षण मिळत असे. मुलांचा अभ्यास एक ठिकाणीं पूर्ण न झाला तर त्यांना दुसऱ्या गुरूकडे पाठवीत. सर्व अभ्यास पूर्ण झाल्यावर कोठेंतरी चांगल्याशा राजधानींत जगाचा अनुभव व पोक्तपणा येण्याला पाठवीत. अशा विद्याभ्यासाच्या वेळीं झालेल्या ओळखी व स्नेह पुढें आमरण कायम रहात, व सहाध्यायांमध्यें नेहमीं दळणवळण चांगलें रहात असे. ही तऱ्हा व तीन चारशें वर्षांपासून युरोपांत मुलांच्या विद्याभ्यासाची चालू असलेली तऱ्हा अगदीं एकसारखी दिसते. भवभूतीनें वर्णन केलेली तऱ्हा हिंदुस्थानाला उतरती कळा लागण्याच्या सुमाराची आहे. पुढें अनेक कारणांमुळें आपसांत कलागती लागून हिंदुस्थानचें स्वातंत्र्य नष्ट होत गेलें, तसतशा या चांगल्या संस्थांचा व चालीरीतींचाही लोप होत गेला. तो येथवर कीं, ज्या कामंदकीला व मालतीला भवभूतीच्या वेळीं त्यांच्या शिक्षणावरून व वर्तनावरून उत्तम मान मिळत होता, त्याच हल्लींच्या काळांत तशाच जन्मास आल्या तर त्यांच्या फजीतीला पारावार राहणार नाहीं ! !

कामंदकी नांवाची एक फार विद्वान्, सन्मान्य व पूज्य विदुषी होऊन गेली. तिनें कामंदक नांवाचा नीतीशास्त्रावर एक उत्तम ग्रंथ केलेला उपलब्ध आहे.त्याचा काळ निर्णित झालेला नाहीं. तरी तो ग्रंथ भवभूतीच्या कालापूर्वीं पुष्कळ वर्षें झालेला असावा असें वाटतें. भवभूतीनें मालतीमाधव नाटकांत माधव नायक केलेला आहे. तरी खरा विचार करून पाहतां, मुख्य नायक व सूत्रधार कामंदकी आहे. असें मुख्य काम स्त्रीकडे व पूर्वींपासून सन्मान्य अशा नांवाच्या स्त्रीकडे भवभूतीनें दिलेलें आहे, यावरून त्याच्या मनांत अशा विद्वान् व सन्यस्त स्त्रियांविषयीं अनादर नव्हता असें ठरतें.

अशा तऱ्हेनें विद्या संपादन करून नंतर ब्राह्मण लोक लहान मोठ्या राजांच्या पदरीं नोकरी धरीत व आपापल्या योग्यतेप्रमाणें लहान मोठ्या हुद्यावर पोहोंचत. त्याप्रमाणें भूरिवसु पद्मावतीच्या राजाचा अमात्य झाला, व देवरात विदर्भ देशच्या राजाचा मंत्री झाला. तरी हे दोघेही आपापल्या राजांचे मुख्य प्रधान होते, किंवा राजांचा त्याच्यांवर पूर्ण विश्वास होता असें दिसत नाहीं. ते कोणीतरी मोठे कामगार असावेत. भूरिवसूला नंदनाची भीति होती, कारण राजाची त्याच्यावर अंतस्थ बहाल मर्जी होती. आपल्या एकुलत्या एक मुलीच्या, पूर्वींच ठरलेल्या, लग्नाच्या संबंधांत देखील भूरिवसूला पद्मावतीच्या राजाजवळ स्पष्टपणें सर्व हकीकत कळवून राजाची नंदनाबद्दलची मागणी नाका-

## सूचना.

मुंबईंत प्लेगची धामधूम विशेष बळावत चालल्यामुळें वि. ज्ञा. विस्तार वेळच्याविळीं निघण्यास व्यत्यय येईल कीं काय ह्मणून धास्ती वाटूं लागली आहे.

आमच्या बऱ्याच नवीन आश्रयदात्यांकडे गेल्या सालचा डिसेंबरचा अंक, कांहींकांस त्यांच्या सूचनेप्रमाणें, व्ही. पी. पोष्टानें जाणार होता; परंतु एक वर्षाची वर्गणी पाठविण्यास जेवढा मनिआर्डरीचा खर्च लागणार तेवढाच दोन वर्षांची वर्गणी पाठविण्यास पडत असल्यामुळें, आह्मी एकच सालचें व्ही. पी. करण्याचा बेत तकूब केला. आतां दोन्ही सालची वर्गणी एकदमच व्ही. पी. पोष्टानें मागविण्यांत येईल. त्याबद्दल आगाऊ सूचना जाईलच.

आमच्या कांहीं वर्गणीदारांकडे वर्गणीची बरीच बाकी येणें आहे. ती पाठविण्याकडे त्यांच्याकडून हयगई होत आहे हें बरें नव्हे. आगाऊ सूचना देऊन पुस्तक व्ही. पी. केलें असतां त्याचा अनादर करून आह्मांस व्यर्थ खर्चांत आणि त्रासांत पाडणें, ही गोष्ट त्यांच्या सभ्यपणास अत्यंत अनुचित होय.

---

हा अंक ज्या गृहस्थांकडे नवीनच जात आहे त्यांनीं त्याचा स्वीकार करून, वर्गणीदारांच्या पटांत आपलें नांव नोंदण्याची आह्मांस परवानगी द्यावी, ह्मणून त्यांस विनंती करितों. ज्यांस आश्रय देण्याचें सामर्थ्य आहे आणि वाचण्याची हौस आहे, अशा लोकांकडेसच हा अंक रवाना केला आहे. तर, आह्मांस लैब्ररींत अथवा मित्रांकडे वाचावयास मिळतो, या सबबीवर त्यांनीं आमच्या विनंतीचा अव्हेर करूं नये अशी त्यांस प्रार्थना आहे.

---

## पुस्तकांची पोंच.

१. श्रीमद्भगवद्गीता—मासिकपुस्तक—अंक दुसरा. सरलार्थबोधिनी गीता मागें रा. रा. शंकर मोरो रानडे आणि नंतर ( कै. ) रा. रा. वामन दाजी ओक हे प्रसिद्ध करीत असत. पुढें तो प्रयत्न महाराष्ट्रवाचकांच्या दुर्दैवानें अर्ध्यांवरच बंद पडला. त्याच पद्धतीवर हें नवीन मासिकपुस्तक काढण्याचें रा. रा. चिंतामण गंगाधर भानु यांनीं सुरू केलें आहे. तें तरी शेवटास जावो असें आह्मी इच्छितों.

२ Lessons in English translation. रा. रा. गोविंद रामचंद्र काळे. बी. ए. प्रिन्सिपाल औरंगाबाद कालेज, यांनीं हायस्कुलांतील विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां हें लिहिलें आहे. रा. रा. द्वारकानाथ राघोबा तर्खडकर यांच्या भाषांतरपाठमालेच्या नमुन्यावरच साधारतः याची रचना आहे. विद्यार्थ्यांनीं याचा अवश्यमेव उपयोग करून आपला फायदा करून घ्यावा.

३. लोंकरीचें विणकाम शिकण्याचें पुस्तक—भाग पहिला. ९९ सुंदर आकृतींसहित, हें पुस्तक मिसेस रुक्मिणीबाई मंझगिरी यांनीं लिहिलें. पहिली आवृत्ति संपल्यामुळें सुधारून आणि वाढवून ही दुसरी आवृत्ति प्रसिद्ध केली आहे, यावरूनच या पुस्तकाची उपयुक्तता दिसून येते.

## विविधज्ञानविस्तार पुस्तकालयांत मिळणाऱ्या पुस्तकांची यादी.



**रा. सा. विष्णु मो. महाजनी एम्. ए. कृत.**

बंगाल्यांतील जमीनदारी वहिवाट ... १–४–०
कुसुमांजलि. ( स्फुट कविता. ) ... ०–४–०
स्वतःचा प्रयत्न. ... ... ... ०–३–०

**( कै० ) बजाबा रामचंद्र प्रधानकृत–**

सद्गुणी स्त्री ... ... ... ... ०–४–०
शेन गोष्टी ... ... ... ... ०–४–०

**रा. रा. गणेश जनार्दन आगाशे बी. ए. कृत–**

अर्थशास्त्राचीं मूलतत्वें. ... ... २–०–०
बाल–शिक्षण. ... ... ... ... ०–३–०
सुंदरेची संक्रांत. ... ... ... ०–१–६

**( कै० ) वामन दाजी ओककृत–**

थोरले माधवराव पेशवे यांचा मृत्यु (काव्य) ०–६–०
काव्यमाधुर्य ... ... ... ... ०–७–०
लार्ड बेकनचें चरित्र.... ... ... ०–१०–०
गणपतिनिधनविलाप. ... ... ०–२–०
नानक–चरित्र. ... ... ... ०–३–०

**रा. सा. शिवराम सीताराम वागळे बी. ए. कृत–**

व्यवहारनीति अथवा कर्तव्य विचार ... ०–०–०
ब्रिटिश राज्यव्यवस्था ... ... ०–८–०
बेकनचे निबंध. ... ... ... ०–८–०
चातुर्य आणि मनोरंजन. ... ... ०–५–०
सख्वाजीराव ढमाले ( फार्स. ) ... ०–४–०
सिसरोकृत नीतिविषयक चार निबंध ०–४–०
पुरून ठेविलेलें द्रव्य ( फार्स. ) ... ०–३–०
महाराष्ट्र काव्यमकरंद ... ... .. ०–५–०

**रा. रा. रामचंद्र भिकाजी गुंजीकरकृत–**

भगवद्गीतेचें सुबोध भाषांतर ... ... ०–१०–०
मोचनगड ... ... ... ... ०–१२–०
सौभाग्यरत्नमाला, भाग १ ला. ... ०–६–०
सरस्वतीमंडल ... ... ... ... १–८–०
भ्रमनिरास ... ... ... ... ०–८–०
महाराष्ट्र भाषेची लेखनशुद्धि. ... ०–३–०
सुबोध व्याकरण ... ... ... ०–४–०

**( कै० ) गणेश भिकाजी गुंजीकर बी. ए. कृत–**

स्वपराक्रम. ... ... ... ... ०–५–०
व्हिक्टोरिया महाराणीचें चरित्र. ... ०–३–०
जुळया बहिणी. ... ... ... ०–२–०
कुटुंबवत्सल. ... ... ... .. ०–२–०
दानत. ... ... ... ... ०–१–६

**डा० भालचंद्र कृष्ण भाटवडकरकृत—**

अबलासंजीवन ... ... ... १–०–०
सार्वजनिक आरोग्य... ... ... ०–१२–०

**( कै० ) आनंदराव सखाराम बर्वे बी. ए. कृत–**

हिंमतबहादर नाटक ( Hamlet. ) ... १–०–०
ठगाची जबानी. ... ... ... २–८–०

**डा० कान्होबा रणछोडदास कीर्तिकरकृत—**

इंदिरा ( काव्य ) ... ... ... ०–१२–०
चार्लस डार्विनचें चरित्र. ... ... ०–२–०

**( कै० ) डा० सखाराम अर्जुनकृत—**

गृहिणी कंठभूषण. ... ... ... ०–१२–०
Bombay Drugs ... ... ... ३– ८–०

---

आरबी भाषेंतील सुरस गोष्टी ... ४–०–०
शिवछत्रपतींचें चरित्र. ( चिटणीस कृत ) १–०–०
सौभाग्य रत्नमाला ( २ भाग एकत्र ) ०–११–०
" भाग दुसरा ... ०–६–०
श्रीमहाबळेश्वर–वर्णन (उदास–कृत)... ०–८–०
मोहना नाटक. ... ... ... ०–८–०
भ्रांतिकृत चमत्कार. ... ... ... ०–६–०
एका रात्रीचा घोंटाळा. ... ... ०–१०–०
अकबर काव्य ... ... .. ०–८–०
तरुण मित्र. ... ... ... ... ०–८–०
तीन गोष्टी. ... ... ... ... ०–४–०
गीतार्थसार ( कै० वा. आ. मोडक कृत ) ०–४–०
पद्यात्मक लघुहितोपदेश. ... ... ०–२–०

---

☞ टपाल खर्च निराळा–रुपयास दीड आणाप्रमाणें.

॥ श्रीः ॥

# विविधज्ञानविस्तार.

## A MONTHLY MAGAZINE
OF
## MARATHI LITERATURE
FOR
Ladies and Gentlemen.

कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरितां.

पुस्तक ३०. फेब्रुवारी १८९९. अंक २.

विषय. अनुक्रमणिका. पृष्ठ.



मुंबईंत
गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत छापिलें.
वर्षाची वर्गणी रुपये ३; टपालखर्च आणे ६

## सूचना.

विविधज्ञानविस्तारचा हा अंक प्रसिद्ध होण्यास जरा विलंब झाला आहे, त्याचें कारण मुंबईतील 'प्लेग' होय. या भयंकर सांथीमुळें मुंबईच्या लोकांची—श्रीमंतांची तशीच गरीब गुरिबांची—जी पळापळ झाली आहे तिची ज्यांस कल्पना असेल ते आह्मांस या विलंबाबद्दल दोष देणार नाहींतच. देवदयेनें मुंबईस लौकरच पूर्वस्थिति प्राप्त होऊन, वेलातिक्रमाच्या दोषांतून आह्मी लौकरच मुक्त होऊं अशी उमेद आहे.

या अंकांत 'मालतीमाधव–सार व विचार' या विषयाचीं आठांऐवजीं सोळा पृष्ठें घातलीं आहेत. मार्चच्या अंकांत हा विषय न येतां, ४० ही पृष्ठें इतर विषयांस दिलीं जातील.

रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांचें चरित्र, विल्यम ईवर्ट ग्ल्याडस्टन यांचें चरित्र, फिरंग्यांचा अलीकडील इतिहास, व 'वृंदा' नामक सुरस काव्य यांना गेल्या वर्षाच्या पुस्तकांतच आरंभ झाला आहे. जानेवारीच्या अंकासोबत पाठविलेल्या विषयानुक्रमणिकेवरून हें समजून येईलच. नवीन आश्रयदात्यांस १८९८ सालचे १२ अंक अगाऊ दरानेंच दिले जातील.

आश्रयदात्यांनीं आपल्याकडील बाक्यांचा सत्वर उलगडा करावा ह्मणून त्यांस विनंती आहे. पैशाच्या अभावीं असलीं कामें चालण्यास किती नडी येण्याचा संभव असतो हें आमच्या सुज्ञ वाचकवर्गास सांगावयास नकोच.

## पोंच.

१ **सद्बोधमंदिर**–भाग दुसरा.–"गृहशिक्षण"–हा ग्रंथ रा० रा० शंकर रामचंद्र हतवळणे ह्यांनीं केला. "सुशिक्षित स्त्री" ह्मणून याच ग्रंथकारानें या पूर्वी एक ग्रंथ तयार केला आहे तो या 'सद्बोधमंदिर' मालेचा प्रथम भाग होय. आपल्या बंधुभगिनींची स्थिति सुधारण्याचे रा० हतवळणे यांचे प्रयत्न अत्यंत स्तुत्य होत. या ग्रंथांतील बहुतेक भाग विविधज्ञानविस्तारांत येऊन गेला आहे. तथापि सर्व विषय एकत्र वाचण्याची ज्यांस इच्छा असेल त्यांणीं अवश्यमेव या पुस्तकाचा संग्रह करावा. मुलांकडून हें पुस्तक वाचविल्यास त्यांना पुष्कळ ज्ञान आणि नीतितत्वांचा बोध होऊन त्यांच्या मनावर चांगला परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं. थोर पुरुषांचीं वचनें ह्मणून पुस्तकाच्या शेवटीं तुकारामादि साधु पुरुषांची निवडक वचनें दिलीं आहेत.

श्री.

# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ३०. अंक १.

रावसाहेब

## विश्वनाथ नारायण मंडलिक.

### भाग पांचवा.

स्वतंत्र व्यवसाय.

( १८६३—१८७१ )

मागील अंकांत वर निर्दिष्ट केलेल्या कालांत सार्वजनिक संस्थांच्या संबंधानें रावसाहेबांनीं जो उद्योग केला त्याची हकीकत देण्यांत आली आहे. आतां या कालामध्यें घडलेल्या एका सामाजिक प्रकरणाविषयीं उल्लेख करून नंतर गृहस्थितीकडे वळूं.

हें प्रकरण करसनदास मुळजी यांची विलायतची यात्रा होय. मुंबईतील श्रेष्ठ श्रेष्ठ गुजराथी गृहस्थांशीं रावसाहेबांचें विशेष दळणवळण असल्याविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे. गुजराथी लोकांमध्यें जे वैष्णव आहेत त्यांमध्यें ‘ वल्लभी ’ नांवाचा एक पंथ आहे. या पंथाचे जे गुरु असतात त्यांस ‘ महाराज ’ अशी विशेष संज्ञा आहे. भाविक लोक या महाराजांस श्रीकृष्णाचाच अवतार समजतात, यामुळें त्यांच्या पायाचें तीर्थ मिळण्यासाठीं किंवा त्यांच्या जवळून प्रसाद मिळण्यासाठीं ते फार आतुर असतात. महाराजांची कृपा संपादन करण्यासाठीं मोठमोठ्या रकमा देण्यासही ते मागें पुढें पहात नाहींत. पुरुषांप्रमाणें स्त्रियांनाही महाराजांची सेवा करण्यास प्रतिबंध नसतो. या प्रचारासंबंधानें १८६०।६१ सालाच्या सुमारास गुजराथी वर्तमानपत्रांमधून बरीच चर्चा सुरु झाली, व तो बदलण्याचे कामीं ज्यांनीं पुढाकार घेतला त्यांमध्यें करसनदास माधवदास व करसनदास मुळजी हे प्रमुख होते. रावसाहेबही सत्यप्रकाश नांवाच्या वर्तमानपत्रांत या विषयासंबंधानें गुजराथीभाषेंत लेख लिहीत असत. तेव्हांपासूनच रावसाहेबांचा व वर सांगितलेल्या दोन गृहस्थांचा विशेष परिचय झाला. पुढें करसनदास माधवदास यांच्याशीं रावसाहेबांची देवघेवही असे. १८६३ सालीं करसनदास मुळजी विलायतेस जाऊन परत आले तेव्हां त्यांस जातींत घेण्याचा प्रश्न उपस्थित झाला. वस्तुतः रावसाहेब व डाक्तर भाऊ दाजी यांचा या भाटिया जातीच्या प्रकरणांशीं संबंध असण्याचें कारण नव्हतें; परंतु या कामीं करसनदास माधवदास यांचें अंग असल्यामुळें व त्यांचा या दोघांशीं विशेष ऋणानुबंध असल्यामुळें दोघांनीं व विशेषेंकरून रावसाहेबांनीं त्या कामांत फार श्रम घेतले. भाटेज्ञातींत सुधारक ह्मणविणारे असे लोकही करसनदास

मुळजी यांस ज्ञातींत घेण्यास हरकती आणूं लागले. होतां होतां करसनदास माधवदास हे एकटेच कायते करसनदास मुळजी यांच्या पक्षाकडे राहिले. सुधारक ह्मणविणाऱ्या भाटिया मंडळीच्या रावसाहेबांनीं अनेक सभा भरविल्या, व एका प्रसंगीं त्यांनीं व विशेषत: डाक्तर भाऊ दाजी यांनीं त्यांच्या भित्रेपणाबद्दल त्यांस दोष दिला, व पुढें सुधारक ह्मणून लोकांस तोंड न दाखवितां कोनाकोपऱ्यांत लपून राहण्याविषयीं त्यांस उपदेश केला. रावसाहेब व डाक्तर भाऊ दाजी यांनीं जे श्रम केले त्यांस फारसें यश आलें असें नाहीं. तथापि करसनदास माधवदास यांनीं निष्प्रांजलपणें आपली कृतज्ञता व्यक्त केली, व त्यांच्या उपकारांचें विस्मरण आमरण होणार नाहीं असें बोलून दाखविलें. त्या प्रसंगीं आपल्या कर्तव्यापलीकडे आपण कांहींच केलें नाहीं असें रावसाहेब ह्मणाले. असो. याशिवाय दुसऱ्या कोणत्याही सामाजिक प्रकरणांत प्रकृत कालीं पडल्याचा रावसाहेबांच्या दैनिकवृत्तांत उल्लेख नाहीं.

आपण आतां रावसाहेबांच्या गृहस्थितीकडे वळूं रावसाहेबांवर त्यांच्या वडिलांची लहानपणापासूनच अत्यंत प्रीति असे हें पूर्वीं सांगितलेंच आहे. आपल्या अंगच्या असामान्य गुणांनी रावसाहेब कालक्रमानें या प्रीतीस विशेष पात्र झाले. पुढें जसजसा रावसाहेबांचा उत्कर्ष होत चालला तसतसा हा प्रेमग्रन्थि अधिकच दृढ होत गेला. परंतु दोघांचाही स्वभाव तिखट असल्याकारणानें केव्हां परस्परांमध्यें विपर्यास येईल याविषयीं दोघेही साशंक असत. रावसाहेबांस चाकरी लागल्यानंतर हळू हळू घरची खरी स्थिति समजूं लागली व वडिलांस कर्ज असल्याविषयीं त्यांस समजलें. तेव्हांपासून कर्जाची व्यवस्था लावण्याविषयीं ते झटूं लागले. कर्ज फिटेपर्यंत रावसाहेबांनीं आपला खर्चवेंच फारच बेताबातानें ठेविला होता व कर्ज फिटेपर्यंत त्यांस निर्वेध वाटलें नाहीं. वडील ऋणमुक्त झाल्यानंतर मात्र रावसाहेबांनीं खर्चाचे कामांत आपला हात ढिला सोडिला. डेप्युटि इन्स्पेक्टर असतांना त्यांस घोडा बाळगावा लागत असे. क्युरेटर झाल्यावर त्यांनीं गाडीही ठेविली. अशा रीतीनें खर्च वाढतां वाढतां आय व व्यय यांची बहुधा बरोबरीच होऊं लागली. त्यामुळें घरीं पैसे पाठविण्यास सवड होईना, व ही गोष्ट वडिलांस आवडली नसावी असें वाटतें. १८६१ सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या दैनिकवृत्तांत २४ तारिखेच्या पुढें जो मजकूर आहे तो यणेप्रमाणें:–
"जेवढी मिळकत तेवढा खर्च अशी जी माझी
"सध्याची राहणी आहे ती प्रशस्त नव्हे असें
"मला वाटतें. शिवाय स्वतंत्रता संपादन कर-
"ण्याविषयींचे व परमेश्वरासंबंधानें, स्वत:
"संबंधानें आणि इतर मनुष्यांसंबंधानें माझ्या
"कर्तव्याविषयींचे जे माझे विलक्षण संकल्प
"आहेत त्यांचा विचार केला ह्मणजे माझी
"प्रस्तुतची तऱ्हा अधिकच अप्रशस्त भासते.
"माझ्याजवळ माझा स्वत:चा असा कांहीं
"द्रव्यसंचय नसला तर मला लोकांच्या तोंडा-
"कडे पाहण्याचा प्रसंग येईल. या स्थितीचा
"प्रतीकार करण्यासाठीं महिन्याच्या कांठीं
"किती खर्च आवश्यक व वाजवी आहे याचा
"आह्मी सर्वांनीं मिळून अजमास केला."–

यानंतरही रावसाहेबांस घरीं पैसे पाठविण्यास सवड झाली नाहीं असें दिसतें, व त्यामुळें त्यांच्या वडिलांची चित्तवृत्ति कलुषित होऊन त्यांनीं रावसाहेबांस मर्मभेदक असें एक पत्र पाठविलें. हें पत्र वाचून रावसाहेबांस

अत्यंत दुःख झालें. केवळ पैशासाठीं आपल्या वडिलांनीं आपल्यास असें दुखवावें ही गोष्ट रावसाहेबांस अत्यंत चमत्कारिक वाटली. संसारांतील एकंदर बंधनामध्यें पितृप्रेमासारखें पवित्र, स्पृहणीय व चिरस्थायी असें बन्धन दुसरें नाहीं. तशांत रावसाहेबांना तर संसारयात्रेंत इतकें आधारभूत दुसरें कांहींच नव्हतें. पुढें जेव्हां सरकारी नोकरीचा राजीनामा देण्याचा प्रसंग आला तेव्हां जवळ द्रव्यसंचय नसल्याबद्दल त्यांस वाईट वाटलें, इतकेंच नव्हे, तर वडिलांलानींही त्या प्रसंगीं त्यांस त्यांच्या कृत्याबद्दल दूषण दिलें ह्मणून त्यांस अत्यंत दुःख झालें. वकिलीचा धंदा सुरू झाल्यानंतर थोड्याच कालांत रावसाहेबांस चांगली प्राप्ति होऊं लागली, तेव्हां वडिलांच्या रोषाचा उपशम झाला असावा असें दिसतें. तथापि रावसाहेबांस व्यापारी लोकांच्या सहवासामुळें सट्टा वगैरे करण्याचा नाद असल्यामुळें त्यांस वडिलांना पैसे पाठविण्यास सवड झाली असेल किंवा नाहीं याविषयीं संशयच आहे. पुढें १८६९ च्या आरंभींच त्यांस जेव्हां बरीच ठोकर बसली तेव्हांपासून त्यांनीं तो नाद सोडला. अशी आख्यायिका आहे कीं रावसाहेब लहान असतां त्यांच्या मातुःश्रीनें विनोदानें त्यांस विचारिलें कीं, तूं मोठा झालास ह्मणजे मला काय देशील ? तेव्हां रावसाहेबांनीं पुष्कळ दागिने देण्याचें कबूल केलें. हें दिलेलें वचन रावसाहेबांच्या ध्यानांत होतें; परंतु वकील होण्यापूर्वीं तें पूर्ण करण्यास त्यांस सवड झाली नाहीं. वकिलीचा व्यवसाय सुरु होऊन आरंभींच जेव्हां पुष्कळ द्रव्य मिळालें तेव्हां त्यांनीं आपली शैशवावस्थेंत केलेली प्रतिज्ञा सिद्धीस नेली. आपल्या जवळच्या व दूरच्या नातेवाईकांस यथाशक्ति साहाय्य करण्याचा रावसाहेबांचा प्रथमपासूनच क्रम असे. वकिली चांगली चालूं लागल्यावर ती त्यांची प्रवृत्ति अधिक बळावली; परंतु ज्या मानानें ते द्रव्यद्वारा इष्ट, मित्र, आप्त, बांधव यांस अधिक मदत करूं लागले त्या मानानें रावसाहेबांच्या धनाढ्यतेविषयीं त्यांचा विलक्षण ग्रह होत चालला व त्यांची अपेक्षाही वृद्धि पावत चालली. हा प्रकार मात्र रावसाहेबांस दुःसह होत असे. वकील झाल्यानंतर पहिल्यानदाच जेव्हां रावसाहेब घरीं गेले तेव्हां त्यांच्या मातुःश्रीनें आपल्या एका जांवयास बरीच मोठी रक्कम उसनवार देण्याविषयीं त्यांस भीड घातली. रावसाहेब ह्मणाले:- " आई, माझेजवळ उसनवार " देण्यास रक्कम नाहीं. खर्च भागून जेवढे " पैसे रहातात त्यांतून माझे भाऊ, बहिणी, " स्नेही व इतर नातेवाईक मंडळी यांना मी " मदत करीत असतों व पुढेंही तोच क्रम चाल- " विण्याचा माझा संकल्प आहे. परंतु स्वत: " कर्ज काढून त्यांना मदत करण्यास मात्र " मी तयार नाहीं. " हें रावसाहेबांचें ह्मणणें मातुःश्रीस पटलें नाहीं. त्या ह्मणाल्या:-" अ- " ण्णा, तूं श्रीमंत आहेस-तूं मुंबईस बोटभर " चिठ्ठी पाठविलीस तर तुला हजारों रुपये " मिळतील. मोठमोठ्या रकमांच्या हुंड्या मुंब- " ईहून मागीव आणि माईच्या नवऱ्याची अड- " चण दूर कर. " हें भाषण ऐकून ' मला या गोष्टीचा विचार केला पाहिजे-' एवढेंच रावसाहेबांनीं उत्तर दिलें. परंतु त्यांच्या चित्तसागरामध्यें विचारतरंगांची संतति सुरू झाली. पैशासारख्या क्षुल्लक बाबतींत आपल्या मातुःश्रीनेंही आपल्या बोलण्यावर विश्वास ठेवूं नये ही गोष्ट त्यांस अत्यंत दुर्दैवाची वाटली. उप

पैशाच्या योगानें मनुष्यमात्राच्या चित्तवृत्ति इतक्या कठोर होतात त्या पैशाला धिःकार असो असें त्यांस वाटलें.

वकील झाल्यापासून वर्षांतून एकदां तरी आपल्या गांवीं जाऊन तीर्थरूपमातुःश्रींना भेटण्याचा रावसाहेबांचा क्रम असे. हा योग बहुतकरून मे महिन्यांच्या सुटींत जुळून येत असे. कधीं महाबळेश्वरास जातांना व कधीं महाबळेश्वराहून परत येतांना ते आंजर्लें व मुरुड येथें आपल्या व आपल्या पत्नीच्या जवळच्या नातेवाइकांच्या अल्प सहवासाचा लाभ घेत असत. या सर्व प्रसंगीं सपत्नीकच जाण्याचा त्यांचा परिपाठ असे. १८६४ सालच्या मे महिन्यांत घरीं जाण्यापूर्वीं रावसाहेबांनीं आपल्या खोती गांवांमधील सर्व लोकांना यथेच्छ भोजन देण्याचा समारंभ करण्याचा संकल्प वडिलांस कळविला. यावेळीं रावसाहेबांची वकिली नुकतीच नांवारूपास येऊं लागली होती व भावी अभ्युदयाची आशा पूर्णपणें जागृत झाली होती. अशा स्थितींत आपल्या गांवीं जाण्याचा प्रसंग सर्वांसच सुखावह व्हावा अशी इच्छा असणें अगदींच साहजिक होतें. ऐषआरामांत द्रव्याचा व्यय करण्याकडे रावसाहेबांची प्रवृत्ति नव्हती; परंतु ज्या लोकांशीं आपला संबंध त्या लोकांवर पूर्णपणें छाप बसविण्याची खुबी त्यांस उत्तम प्रकारें साधली होती. याच धोरणानें लोकाचारासंबंधानें जेवढ्या गोष्टी होणें त्यांस इष्ट वाटे त्या करण्यास ते मागेंपुढें पहात नसत. कोणतेंही काम करणें झालें तर उत्तम प्रकारेंच करावयाचें असा त्यांचा बाणा असे व त्याच स्वभावाला अनुरूप असें त्यांचें या प्रसंगींही वर्तन घडलें.

मासू मुक्कामीं मेजवानीचा मोठाच समारंभ झाला. कुणबी, माळी, गवळी, असे सर्व लोक या प्रसंगीं निमंत्रित होते. तीनशें पुरुष व तीनशें बायका अशीं एकंदर ६०० मनुष्यें त्या दिवशीं जेवून तृप्त झालीं. गांवकऱ्यांपैकीं ज्या कोणांस समारंभास येववलें नाहीं त्यांच्या घरीं वाढणीं पाठविण्यांत आलीं होतीं. सर्व लोक अत्यंत खुष होऊन आपल्या छोट्या यजमानाचा धन्यवाद गाऊं लागले. रात्रीच्या समयीं कुणबी मंडळींनीं आपल्याआपल्यांतच एक खेळ केला. या प्रसंगींही रावसाहेब हजर होते. जमलेल्या लोकांची थोड्यामध्यें संतुष्ट होण्याची प्रवृत्ति पाहून रावसाहेबांना फारच मौज वाटली. त्यांचीं गाणीं ऐकून जो रावसाहेबांचा ग्रह झाला त्याविषयीं त्यांच्या दैनिकवृत्तांत पुढें लिहिल्याप्रमाणें उल्लेख आहे:–" एकंदरीनें अशा प्रका-
" रच्या खेळापासून एक मोठाच उपयोग होतो-
" तो हा कीं, खालच्या प्रतीच्या लोकांना आप-
" ले अवरुद्ध झालेले मनोविकार प्रकट कर-
" ण्यास व आपले विचार वरच्या प्रतीच्या
" लोकांना कळविण्यास सवड सांपडते. "

१८६४ सालच्या नवंबर महिन्यांत रावसाहेबांचे वडील व मातुःश्री उभयतां काशीयात्रेला गेलीं. त्यासमयीं रावसाहेब स्वतः पुण्यापर्यंत त्यांस पोंचवायाला गेले होते. सेकंड क्लासाचा एक स्वतंत्र डबा त्यांच्यासाठीं योजून त्यांस मोठ्या व्यवस्थेनें ते घेऊन गेले. पुण्यास दोन दिवस राहून त्यांची सर्व प्रकारची तजवीज लावून त्यांचा आशीर्वाद घेऊन ते मुंबईस परत आले. पुढें १८६५ सालीं जून महिन्यांत तीं उभयतां महायात्रा करून परत आलीं. यानंतर सुमारें साडेपांच वर्षेपर्यंत रावसाहेबांना वडिलां-

च्या छायेचें सुख होतें. १८७० च्या नोव्हेंबर महिन्याच्या अखेरीस ते निवर्तले. हें दुःखाचें वर्तमान बळवंतराव बागुल नांवाच्या गृहस्थांनीं गणपतराव भास्करजी यांस कळविलें, व त्यांच्याकडून रावसाहेब यांस १ डिसेंबर रोजीं समजलें. त्यावेळीं रावसाहेबांस अत्यंत शोक झाला. ज्या अनेक संबंधांमुळें संसारयात्रा सुखावह वाटते त्या सर्वांमध्यें बहुप्रेमास्पद असा पितापुत्रसंबंध होय. रावसाहेब व त्यांचे वडील यांजमध्यें वाग्बाणांचा अनेक प्रसंगीं विनिमय होत असे हें पूर्वीं सांगितलेंच आहे; तथापि त्यामुळें स्नेहाचा आत्यंतिक लोप होत नसून कांहीं प्रसंगीं तो परस्परांविषयीं आदरबुद्धि वृद्धिंगत करण्यास कारणभूत होत होता. अशा स्थितींत पितृनिधनाची वार्ता ऐकून रावसाहेबांस किती दुःख झालें असेल याची कल्पना सहज करतां येण्यासारखी आहे. संसारशकट ओढण्याचे कामीं ज्यास पिता सहायभूत असतो त्यास त्याच्या अभावीं होणारें दुःख केवळ व्यवहारमूलक असूं शकेल. परंतु रावसाहेबांची स्थिति तशी नव्हती. आपल्या शिरावर वडील आहेत एवढ्या कल्पनेनेंच जें विलक्षण सुख होतें त्या सुखाची परंपरा सहृदय मनुष्याला केव्हांही नकोशी होत नाहीं. आपण स्वतः अभ्युदयाला चढलों असतां त्या अभ्युदयाचीं साक्षिभूत अशीं वडील मनुष्यें नसलीं तर त्यापासून होणारा आनंद निम्म्यानें कमी होतो. बाळपणापासून ज्यानें आपल्या पुत्राच्या हिताची काळजी वाहिली, स्वसुखनिरभिलाष होऊन पुत्राला सुख देण्याचीच आकांक्षा धरिली, व ज्याच्या हेतूप्रमाणें पुत्रानें आपला कार्यभाग प्रशंसनीय अशा रीतीनें उरकल्यामुळें पुत्रावर ज्याचें प्रेम एकवटलें आहे, अशा पित्याच्या मृत्यूनें सहृदय अशा पुत्राला शोक होणें अगदीं साहजिक आहे. असा शोक झाला तरी तो गिळून रावसाहेबांनीं आपली शांति कायम ठेविली. तारीख ९ डिसेंबर रोजीं आपल्या गांवीं जाण्याकरितां ते मुंबईहून निघाले, ते दुसऱ्या दिवशीं तेथें पोंचले. घरीं गेल्याबरोबर पहिला दुर्धर प्रसंग मातुःश्रीच्या दर्शनाचा. स्त्रियांना असह्य असा जो वैधव्यरूप दारुण दैवदुर्विपाक त्याच्या तापानें त्या माउलीची इतकी दशा होऊन गेली होती कीं तिच्यानें रावसाहेबांशीं एक शब्दही बोलवेना. तिचें दुःख पाहून रावसाहेबांचें दुःख द्विगुणित झालें. जोंपर्यंत अशौचाचा काल असून और्ध्वदेहिक क्रियांची परंपरा चालू होती तोंपर्यंत त्या दुःखाचा उपशम होण्याचा मुळींच संभव नव्हता. या कालांतच पितृनिधनानें कशा प्रकारची हानि झाली त्याची पूर्ण कल्पना रावसाहेबांस आली. अगोदर शोकाचें कारण मोठें, तशांत शोकवृद्धीस अनुकूल अशी परिस्थिति असल्यावर साधारण मनुष्याच्याही प्रकृतीचें स्वास्थ्य भंग पावेल. रावसाहेबांची तर प्रकृति अगोदरच बिघडलेली होती. त्यांत असें जबर निमित्त झाल्यामुळें त्यांस सुतकांतच दुःसह असा संधिवाताचा झटका झाला. त्यामुळें त्यांची प्रकृति कांहीं दिवस अस्वस्थ होती. क्रियाकर्मांतर सर्व आटोपल्यावर दुसरें कांहीं करावयाचें नव्हतें म्हणून पंधरावे दिवशींच रावसाहेब मातुःश्रीचा निरोप घेऊन मुंबईस परत आले. यानंतर त्यांचा घराकडे पहिल्यासारखा ओढा राहिला नाहीं.

संसारसुखास मुख्यत्वें करून कारणीभूत पत्नी होय. सहधर्मचारिणी कशी असावी याचें वर्णन महाकवि भवभूति यानें उत्तररामचरित

नाटकांत एकाच श्लोकांत परंतु फार मनोहर केलें आहे. तो श्लोक येणेंप्रमाणें:—

> अद्वैतं सुखदुःखयोरनुगुणं सर्वास्ववस्थासु यत्
> विश्रामो हृदयस्य यत्र जरसा यस्मिन्नहार्यो रसः।
> कालेनावरणात्ययात् परिणते यत्स्नेहसारे स्थितम्
> भद्रं तस्य सुमानुषस्य कथमप्येकं हि तत्प्राप्यते॥

सुख असो किंवा दुःख असो जिच्या चित्तवृत्तींत बदल होत नाहीं; सर्व अवस्थांमध्यें अनुरूप असें जिचें वर्तन; जी केवळ हृदयाचें विश्रान्तिस्थान; जरा प्राप्त झाली असतांही जिच्या ठिकाणचें प्रेम नाहींसें होत नाहीं; विवाह झाल्यापासून क्रमाक्रमानें लज्जेचें आवरण निघून गेल्यावर जी केवळ स्नेहसर्वस्व बनते; अशा प्रकारची स्त्री म्हणजे मूर्तिमंत भाग्य होय, व असें भाग्य पुण्यवानासही मोठ्या कष्टानें प्राप्त होतें.

वर सांगितलेले गुण स्वभावासंबंधाचे झाले. परंतु हे गुण कमीज्यास्त प्रमाणानें असले तरी शरीराची निरोगिता असल्याशिवाय पत्नीला सहधर्माचरण शक्य नाहीं. शरीरस्वास्थ्याच्या अभावीं बहुतेक व्यवहार लंगडा पडतो. हिंदुस्थानी भाषेंत म्हण आहे 'तनदुरुस्ती हजार न्यामत्'—म्हणजे एक शरीरप्रकृति दुरुस्त असणें हें हजार कल्याणकारक गोष्टींबरोबर आहे. रावसाहेबांच्या पत्नीचा स्वभाव चांगला असून पतिसेवापरायणता व पतिच्छन्दानुवर्तित्व हे गुण त्यांच्या अंगीं होते. परंतु अल्पवयांतच त्यांची प्रकृति बिघडून कांहीं दिवसांनीं त्या विकलांग झाल्या. प्रथम संधिवाताचा विकार जडला व पुढें गर्भाशयाच्या एका प्रकारच्या रोगाची त्यास मदत होऊन अखेरीस त्यांचे पाय अगदीं गेल्यासारखे झाले. त्यांच्या प्रकृतीस आराम होण्यासाठीं रावसाहेबांनीं सर्व प्रकारचे उपाय केले. डाक्तरांच्या व वैद्यांच्या सांगण्याप्रमाणें हवा पालटण्याचे व औषधोपचाराचे त्यांनीं सर्व प्रकार करून पाहिले. रावसाहेबांची वकिलीची परीक्षा उतरून थोडा काळ लोटला होता तेव्हांपासूनच दुखणें विकोपास जात चाललें. कांहीं दिवस त्यांस पुण्यासही ठेवण्यांत आलें होतें. परंतु या स्थलांतरामुळें यत्किंचितूही फायदा झाला नाहीं. रावसाहेबांची मात्र व्यर्थ ओढाताण झाली. डाक्तर भाऊ दाजी यांची रोगचिकित्सेंत विचक्षणता त्यावेळीं विश्रुत होती. त्यांचा व रावसाहेबांचा अत्यंत ऋणानुबंध होता, तेव्हां त्यानीं आपली शिकस्त करून पाहिली असेल हें उघड आहे. मधून मधून थोडासा आराम वाटल्यासारखें होई; परंतु पुनः रोगाचा जोर होऊन प्रकृति पूर्वीपेक्षां अधिक बिघडे. १८६५ च्या मार्च महिन्यांत रावसाहेबांनीं आपल्या कुटुंबास कांहीं दिवस ठाण्यास नेऊन ठेविलें.ठाण्याची हवा म्हणजे रुग्ण जनांस हितकर वाटण्यासारखी आहे असें नाहीं, परंतु पूर्वीं रावसाहेब ठाण्यास होते त्यावेळीं कुटुंबाची प्रकृति साधारण बरी असे, म्हणून कदाचित् तेथें किंचित् आराम वाटल्यास वाटेल असें समजून त्या तेथें राहिल्या असाव्या. सर्व गडीमाणसें ठाण्यासच ठेविलीं होतीं व रावसाहेबांचा रोज मुंबईहून ठाण्यास जाण्याचा क्रम असे. ठाण्यास पत्नीला ठेविल्यानंतर दुसऱ्याच दिवसाची जी हकीकत दैनिक वृत्तांत आहे तिजमध्यें रावसाहेबांनीं आपल्या हातानें स्वैंपाक केल्याविषयीं उल्लेख आहे. कांहीं कामाकरितां ते व त्यांचे मेहुणे ठाण्याहून सकाळींच मुंबईस आले होते. कामाच्या नडीमुळें पुनः ठाण्यास जाण्यास सवड नव्हती म्हणून मुंबईसच भोजन करण्याचा प्रसंग आला, व त्या प्रसंगाचा

निर्वाह कोणा स्नेहाकडे जाऊन न करितां स्वहस्तानेंच पाकनिष्पत्ति करून त्यांनीं केला. या हकीकतीवरून रावसाहेबांचा साधेपणा व त्यांची उत्साहवृत्ति सहज व्यक्त होण्यासारखी आहे. असो. १८६९ सालच्या मे महिन्यापासून प्रतिवर्षी उन्हाळ्यांत महाबळेश्वरीं जाण्याचा रावसाहेबांचा क्रम असे हें पूर्वी सांगितलेंच आहे. पत्नीसमवेत जाण्याचा रावसाहेबांचा नेहेमीचा परिपाठ असे. तथापि तेथील आरोग्यप्रद हवेपासून त्यांच्या पत्नीला ह्मणण्यासारखा फायदा वाटला नाहीं. १८७१ सालच्या जानेवारी महिन्यांत 'मेस्मेरिझम्' नांवाचा शक्तिपाताचा प्रयोग रावसाहेबांनीं ह्यूम नांवाच्या एका युरोपियन गृहस्थाकडून आपल्या पत्नीवर करविला. त्या प्रसंगीं डाक्तर भिकाजी अमृत व नारायण दाजी हे प्रयोग पहाण्यास हजर होते. परंतु प्रयोग चांगला वठला नाहीं. कारण कीं त्याची क्रिया सोसण्याचें सामर्थ्य रोग्याच्या अंगीं नव्हतें.

याप्रमाणें सर्व यत्न विफल होऊन रावसाहेबांच्या पत्नीचें विकलांगत्व कायम झालें. स्त्री व पुरुष हीं संसारशकटाचीं दोन चक्रें कल्पिलीं आहेत, तेव्हां पत्नीच्या वैकल्यामुळें त्यांच्या संसारसुखाची किती हानि झाली असेल याची कल्पना सहज होण्यासारखी आहे. अशा स्थितींत सामान्यप्रतीचा मनुष्य निःसंशय भग्नोत्साह झाला असता. परंतु रावसाहेबांची चित्तवृत्ति स्वभावतःच विलक्षण असल्यामुळें प्राप्त स्थितींत सुख मानून अंगीकृत व्यवसायाचा निर्वाह त्यांनीं अबाधितपणें चालविला. इतकेंच नव्हे, तर आपल्या पत्नीस त्यांच्या वैगुण्याबद्दल होतां होईल तों खेद न होऊं देण्याचा त्यांचा सतत यत्न असे. पत्नी विकलांग झाल्यापासून त्यांचें देहावसान होईपर्यंत त्यांची शुश्रूषा नियमानें करण्याचा रावसाहेबांचा क्रम असे. या कामांत जो वेळ जाई त्याचा वचपा काढण्यासाठीं ते मोठ्या पहांटेस उठत. कर्तव्यपरायणता हा जो रावसाहेबांच्या अंगचा लोकोत्तर गुण त्या गुणाची पत्नीसेवेच्या बाबतींत चांगलीच परीक्षा झाली.

याचसंबंधानें दुसरें असें सांगावयाचें कीं, ऐन तारुण्यावस्थेंत पत्नीसहवासाच्या सुखास रावसाहेब अंतरले असतांही त्यांनीं द्वितीय संबंध केला नाहीं. मनुष्याच्या शहाणपणाचा व मनोनिग्रहाचा खरा निकष झटला ह्मणजे स्वतःवरचा प्रसंग होय. दुसऱ्यावर प्रसंग आला असतां उपदेशाची रेलचेल करणारे लोक पुष्कळ, परंतु स्वतःवर बेतली असतां आपल्या उक्तीप्रमाणें क्रिया करणारे लोक विरळा. असे असतील तेच जनतेच्या आदरास पात्र होतात. असें ह्मटलें आहे कीं,

चित्ते वाचि क्रियायां च साधूनामेकरूपता ॥

याचप्रमाणें साधु तुकारामानें आपल्या प्रसादमय वाणीनें याच अर्थाचा अनुवाद 'बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाउलें' या अभंगांत केला आहे. या वचनांच्या अनुरोधानें पाहिलें असतां रावसाहेबांचें या बाबतींत वर्तन केवळ प्रशंसनीय झालें. सुधारक ह्मणविणाऱ्या मंडळीची तऱ्हा याहून भिन्न असते. बोलणें व करणें यांत विपर्यास हें त्यांच्या वर्तनाचें प्रधान अंग असतें व अशा वर्तनाचें मंडन करण्यासाठीं मग त्यांना नानाप्रकारच्या युक्त्या सुचतात. या युक्त्यांपैकीं वारंवार पुढें येणारी ह्मटली ह्मणजे वडील माणसांचा आग्रह. प्रकृत प्रसंगीं रावसाहेबांच्या वडील माणसांचा त्यांनीं द्वितीयसंबंध करावा ह्मणून अत्यंत आग्रह होता;

व असें असूनही रावसाहेबांनीं आपल्या निश्चयाचा त्याग केला नाहीं ही गोष्ट त्यांच्या स्वभावाचा जो कांहीं विलक्षण विशेष त्याची द्योतक आहे. आपल्या सदसद्विवेकबुद्धीला जें सत्य वाटेल त्याचा अवलंब करावयाचा व जें असत्य वाटेल त्याचा त्याग करावयाचा, व मग त्या बाबतींत भीड, मर्यादा वगैरे औपचारिक बन्धनांस मोजावयाचें नाहीं. हीच रावसाहेबांच्या वर्तनक्रमाची किल्ली होती. द्वितीय संबन्ध न करण्याच्या बाबतींत रावसाहेबांचा मुख्य कोटिक्रम असा होता कीं, ज्या अर्थीं पति विकलांग झाला असतां स्त्रियांना अन्याचें पाणिग्रहण करितां येत नाहीं, त्या अर्थीं पतीला त्यासारख्या प्रसंगीं दुसऱ्या पत्नीशीं उद्वाह करितां येऊं नये. ही कोटी न्यायमूलक आहे हें कोणीही कबूल करील; व या प्रकरणावरून असें ठरतें कीं केवळ न्याय्याचरणाचें अवलंबन करण्यासाठीं रावसाहेबांनीं संसारसुखासही तुच्छ मानिलें. एकदां रावसाहेबांचे वडील या बाबतींत त्यांचें मन वळविण्याकरितां मुद्दाम मुंबईस आले. पितापुत्रांचें भाषण होऊन अखेरीस रावसाहेबांनीं आपल्या वडिलांस निर्भीडपणें त्या विषयासंबंधानें पुन्हा गोष्ट न काढण्याविषयीं विनंती केली. त्यांच्या वडिलांचा स्वभावही मोठा मानी होता. त्यांस रावसाहेबांचें वर्तन केवळ दुराग्रहाचें वाटलें व तें त्यांस सहन न होऊन दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळींच ते न विचारितां मुरूडास परत गेले.

अशा स्थितींत चित्ताची समता ठेवणें फारच दुर्घट होतें हें उघड आहे, व तसें करण्यास किती मनोनिग्रह करावा लागला असेल याची कल्पना सहज होण्यासारखी आहे. असें सांगतात कीं आरंभीं आरंभीं रावसाहेबांस यथेच्छ निद्रासुखही दुर्लभ झालें होतें. परंतु अस्वास्थ्याच्या स्थितींत चित्तास विकारवश न होऊं देण्यासाठीं ते मध्यरात्रीं सुद्धां उठून वाचीत किंवा लिहीत बसत. अशा रीतीनें चित्ताची सत्कर्मव्यग्रता संपादन केल्यानें कर्तव्य व सदाचार यांस पराङ्मुख होण्यास कारण असतांही ते पराङ्मुख झाले नाहींत. कवीनें ह्मटलें आहे कीं,

> विकार हेतौ सति विक्रियन्ते
> येषां न चेतांसि त एव धीराः ।

विकारवश होण्यास कारण असतांही ज्यांचें चित्त विकार पावत नाहीं त्यांसच ‘धीर’ ह्मणावें. असो.

पत्नीसहवासाचें सुख रावसाहेबांस पूर्वकालीं उपलब्ध होतें तेव्हां अपत्यप्राप्तीचा योग जुळून आला असता तर रावसाहेबांना उत्तरकालीं संसारसुखाचा अल्पांशमात्रानें लाभ झाला असता. भवभूतीनें ह्मटलें आहे कीं, अपत्य ह्मणजे दंपतीच्या अन्तःकरणांतील आनंदाचा ग्रंथि होय. अशा रीतीनें परस्परांच्या आनंदाची गांठ बसली ह्मणजे ती सहसा सुटत नाहीं. रावसाहेबांच्या नशिबीं असा योग नव्हता. तेव्हां प्राप्तस्थितींतच ते सुख मानून घेत होते. केवळ अपत्यप्राप्तीसाठीं अनेक स्त्रियांशीं विवाह करणारे लोक पुष्कळ पाहण्यांत येतात; परंतु तशांपैकीं रावसाहेब नव्हते हें आतां व्यक्त झालेंच आहे. प्रथमपत्नी विकलांग झाली असतां स्त्रीसहवाससुखाच्या लालसेनेंही ज्यानें द्वितीयसंबंध केला नाहीं तो केवळ अपत्यप्राप्तीसाठीं तसें करण्यास प्रवृत्त होईल अशी कल्पनाच अनवकाश आहे. तथापि स्वतःचें अपत्य नसूनही अपत्यप्राप्तीपासून घडणारें जें चित्ताचें एक प्रकारचें बन्धन असतें तत्सदृश

बन्धनाचा योग त्यांस प्राप्त झाला तो कसा हें पुढील कथानकावरून समजेल.

रावसाहेबांची पत्नी आंजर्लें येथील काण्यांची मुलगी हें दुसऱ्या भागांत सांगितलेंच आहे. नातेवाइक व आप्तइष्ट यांचा परामर्श घेण्याचा रावसाहेबांचा क्रम असे हेंही पूर्वीं सांगण्यांत आलें आहे. रावसाहेबांचा जसजसा अभ्युदय होत चालला तसतसा त्यांच्या आप्तवर्गास त्यांचा अधिकाधिक उपयोग होऊं लागला हें साहजिकच झालें. तशांत रावसाहेबांच्या पत्नींची वैकल्यावस्था असल्यामुळें त्यांच्या सुखाकरितां व सोयीकरितां त्यांच्या माहेरच्या माणसांच्या सहवासाची त्यांस विशेष अपेक्षा असावी हें अनुमान अयुक्तिक होणार नाहीं. रावसाहेबांच्या पत्नीची एक धाकटी बहीण पांडोबा दातार नांवाच्या गृहस्थांस दिली होती. या बहिणीनें सुजनता, सुशीलता, सरलता इत्यादि आपल्या अंगच्या विलक्षण गुणांनीं सर्वांस प्रेमबद्ध करून सोडिलें होतें. परंतु सर्वांपेक्षां रावसाहेबांच्या कुटुंबाचा तिच्यावर फार जीव होता. तिच्या सहवासानें रावसाहेबांच्या पत्नीस फार सौख्य होत असे. १८७० सालच्या अखेरीस बाळंतपणासाठीं ह्मणून रावसाहेबांनीं आपल्या मेहुणीला आपल्यायेथें आणिली. दैवयोग असा कांहीं विचित्र आला कीं प्रसूत झाल्यानंतर पांचसहा महिन्यांच्या आंतच त्या बाई परलोकवासी झाल्या. त्यांस आराम व्हावा व त्यांच्या तान्ह्या मुलाची आबाळ होऊं नये ह्मणून रावसाहेबांनीं अतोनात श्रम केले व द्रव्यही खर्चिलें, परंतु बलवत्तर अशा भवितव्यतेपुढें तें सर्व व्यर्थ झालें. हा प्रकार १८७१ सालीं मार्च महिन्याच्या अखेरीस घडला. पत्नी निवर्तल्यानंतर दुसऱ्या दिवशीं पांडोबा दातार आले. पत्नीच्या मरणानें त्यांस दुःख झालें असेलच, परंतु तान्ह्या मुलाची पुढें काय व्यवस्था लावावी या चिंतेनें ते अधिक व्यथित झाले. पंधरा तीन वार मुंबईस राहून रावसाहेबांबरोबरच ते आंजर्ल्यास गेले. हवा पालटण्यासाठीं आपल्या मेहुणीला कोंकणांत नेण्याचा रावसाहेबांचा विचार होता व तेथें नेल्यानें त्यांच्या व्याधीचा उपशम होईल असा त्यांना भरंवसा होता. कोंकणांत गेल्यावर या पूर्वोक्त संकल्पांचें स्मरण होऊन रावसाहेब व त्यांची पत्नी यांस अत्यंत दुःख झालें. आपले सर्व हेतु जागच्याजागीं राहिले असें पाहून त्यांस अनावर असा शोक झाला. पांडोबा दातारांचा द्वितीय विवाह करण्याचा निश्चय ठरला व त्यांच्या येथें मुलाची जोपासणी व्हावी तशी होणार नाहीं असें जाणून त्यांनीं आपल्या मुलाला संभाळण्याचें काम त्यांच्या सासूबाई व रावसाहेब यांजकडे सोंपविलें. तें काम रावसाहेब व त्यांची पत्नी यांनीं मोठ्या आनंदानें पत्करिलें. अशा रीतीनें अपत्यबन्धनसदृश असें बन्धन निर्माण झालें. या बन्धनाची परिणति पुढें कशी झाली हें योग्य स्थलीं सांगण्यांत येईल.



## पंचवटीस्थलनिर्णय.

सदरहू पुस्तक श्री. रा. रा. गणपतराव हरिहर पटवर्धन ऊर्फ बापूसाहेब कुरुंदवाडकर यांनीं छापून त्याची एक प्रत अभिप्रायार्थ आमच्याकडे धाडिली आहे. त्याचा साभार स्वीकार करून या वादाविषयीं आमचें मत काय आहे तें सादर करितों.

हा वाद सुरू कसा झाला व त्याची पुढें वादीप्रतिवादींमध्यें व्यवस्था कशी झाली याचें प्रस्तुत पुस्तकांत साग्र वर्णन आहे. हा वाद आमचे वाचकांस नीटसा कळावा, कारण हें पुस्तक सर्वांस पाहण्यास मिळालेंच असेल असें वाटत नाहीं, ह्मणून तो प्रथमतः येथें देतों.

आमचे वाचकांस माहित आहेच कीं, **निर्णयसागरां**तून 'काव्यसंग्रह' नांवाचें सुंदर महाराष्ट्रकाव्यसंग्रहाचें पुस्तक प्रतिमासास निघत असतें. त्या पुस्तकाचें संपादकत्व प्रथमतः कै० जनार्दन बाळाजी मोडक यांजकडे होतें. ते निवर्तल्यानंतर (आतां कैलासवासी) वामन दाजी ओक या विद्वान्, बहुश्रुत व संस्कृतमहाराष्ट्रादि काव्योदधीमध्यें पूर्णालोडन केलेले गृहस्थांकडे त्याचें संपादकत्व आलें. तें काम त्यांनीं आमरणान्त किती उत्कृष्ट तऱ्हेनें केलें याजबद्दल आज विशेष लिहिण्याचें कारण नाहीं. हें कार्य करीत असतां त्यांनीं पंचशतीरामायण या ग्रंथावर टीपा देत असतां, ' जनस्थान ' व ' पंचवटी ' या शब्दांवर–प्रस्तुत महाराष्ट्रीयांनीं मानिलेलीं हीं स्थळें नसून, हिंदुस्थानच्या पूर्व भागांतील गोदावरीमुखाजवळील हीं स्थळें होत–अशी टीप दिली होती. या टीपेवरून श्रीमंत कुरुंदवाडकर यांनीं आपल्या शंका रा. ओक यांस कळविल्या. त्याचें उत्तर रा. ओक यांनीं घरगुती तऱ्हेनें न देतां काव्यसंग्रहाच्या सर्व वाचकांस या शंकासंबंधानें त्यांचें ह्मणणें काय होतें तें कळावें ह्मणून सदर पुस्तकांत परिशिष्टरूपानें सादर केलें. तेव्हांपासून या वादाला सार्वजनीनत्व आलें; व त्यावरून पुणें येथील शाळापत्रकादि पुस्तकांतून थोडीबहुत त्या काळीं चर्चाही झाली होती. त्या वामनरावजींच्या लेखावर मूळ वादी यांचें काय ह्मणणें होतें तें बाहेर येण्याच्या पूर्वींच आमचे मित्र ओक हे परलोकवासी झाले. तेव्हां श्रीमंतांनीं सदर वाद साग्र आपल्या उत्तरासुद्धा एकत्र करून वाचकांच्या निर्णयाकरितां छापून प्रसिद्ध केला आहे. हा वाद जरी सार्वजनीन आहे तरी आम्ही आजवर यांत पडलों नव्हतों. याचें कारण, दोघेही वादीप्रतिवादी मोठे विद्वान्, समंजस व सत्यप्रिय असल्यामुळें कोणीही वितंडवाद करणार नाहीं, आणि सत्य तोच निर्णय बाहेर पडेल, अशा आशेवर आह्मी होतों; परंतु आमच्या महाराष्ट्रांच्या दुर्दैवामुळें रा. ओक यांजवर काळाची गदा पडली, ह्मणून या वादांत शिरण्याचा प्रसंग आह्मांस आला आहे. दोघेही वादी प्रतिवादी हे आमचे अत्यंत निष्कारण सुहृत्कोटींतील असल्यामुळें आमच्या लेखामुळें एका कोणास तरी विषाद वाटण्याचा संभव आहे. परंतु दोघेही दुरभिमानी नसल्याचें आह्मांस अनुभूत असल्यामुळें ही भीति फारशी जबरदस्त नाहीं याबद्दल आनंद वाटतो.

आह्मीं या दोघांसही दुरभिमानी नाहींत असें जें ह्मटलें आहे त्याचा पुरावा हें प्रकृत पुस्तकच देत आहे. प्रथमतः वादाचे मुद्दे तीन होते. त्यांतील ओकांनीं दीडमुद्दा ह्मणजे एक संबंध व एक अंशतः आपल्या अंगावर आला असें प्रांजलपणें कबूल केलें आहे; व श्रीमंतां-

नींही तिसऱ्या मुद्द्यांतील कांहीं अंश भ्रममूलक आहे असें हल्लींच्या प्रत्युत्तरांत मान्य केलें आहे. तेव्हां अशा वादीप्रतिवादींच्या वादांत न पडतां तटस्थवृत्तीनें कौतुक पहावें अशा बेतानें आजवर स्वस्थ होतों. अद्यापही शेवटचा तिन्हाइत या नात्यानें निकाल देण्याचा प्रसंग आम्हांवर आला आहे असें आह्मी समजत नाहीं. काव्यसंग्रहाचे प्रस्तुतचे विद्वान् संपादक या प्रत्युत्तराविषयीं मुग्ध राहतील असें आह्मांस वाटत नाहीं, व त्यांनीं तसें राहूं नये अशी आमची सूचनाही आहे. जर कदाचित श्रीमंतांचा प्रतिपक्ष खरा व मुद्देसूद आहे अशी प्रकृत संपादकांची समजूत असेल तर त्यांनीं तसें निरभिमानतया कळवावें; तसें करण्यांत वामनरावजींच्या दुरभिमानरहित प्रवृत्तीच्या विरुद्ध होणार नाहीं.

आतां हा वाद आह्मीं समग्र विद्यार्थिदृष्टीनें वाचला आहे, व प्रथम वाद सुरू झाला तेव्हांपासून या स्थलनिर्णयाबद्दल आह्मांस विशेष जिज्ञासा होती. ह्मणून या वादांत उभय पक्षकारांनीं जितके ग्रंथ निर्दिष्ट केले आहेत ते पाहण्याचा आह्मी बराचसा यत्न केला आहे. बराचसा ह्मणण्याचें कारण गर्वोक्ति न भासावी. नाहीं तर 'केरळकोकिळ'कारांसारख्या विद्वान् लेखकास वामनरावजीसारख्यांनीं जे जे ग्रंथ पाहिले त्यांची यादी दिली ह्मणून त्यांस आपल्या विद्वत्तेची घमेंड होती असें वाटायास चुकलें नाहीं, व तें त्यांनीं तसें नमूद ही केलें आहे; तेव्हां आह्मांविषयींही तसा विपरीत ग्रह होणें साहजिक आहे. आतां श्रीमंतांस वामनरावांनीं दिलेल्या यादींपैकीं सतराएक ग्रंथ पहावयास मिळाले नाहींत, व आमच्या केरळकोकिळकारांनीं एक देखील ग्रंथ पाहण्याचा विचार मनांत आणिला नाहीं; व त्याचें कारण, श्रीमंतांसारख्यांस सर्वानुकूलता असतां जर कांहीं ग्रंथ मिळाले नाहींत तर केरळासारख्या ठिकाणीं ते कोठून मिळणार ? अशा समजुतीवरच ते स्तब्ध बसले; नाहीं तर आमच्या—किंवा कोकिळकारां—सारख्या भिक्षापतीस यत्न केला असतां हवा तो ग्रंथ चार दिवस पाहण्याकरितां मिळणें कठिण नाहीं. परंतु सत्यनिर्णयाकरितां ग्रंथावलोकनाची इच्छा मात्र पाहिजे होती. आतां आह्मांस जे ग्रंथ पाहावयास सांपडले ते अर्थात् आमच्या स्नेह्यांवगैरेचेच होत. हे ग्रंथ पाहण्याची प्रथमत: फारशी इच्छा नव्हती. परंतु प्रतिपक्षी श्रीमंत व तन्नेयबुद्धि कोकिळकार यांनीं वामनरावजींवर सत्यापलाप करण्याकरितांच कीं काय कांहीं ग्रंथांतून उतारे घेतांना कांहीं अंश मुद्दाम गाळले आहेत असा आरोप केल्यावरून पूर्वीं वामनरावजींबद्दल ते पक्षाभिमानामुळें सत्पथ सोडतील असें वाटत नव्हतें, तो ग्रह थोडासा डळमळूं लागला. व स्वकीय विद्वत्वप्रदर्शनाची हौस त्यांस फार होती असा या यादीवरून व इतर कांहीं वाक्यांवरून कोकिळकारांनीं त्यांजवर आरोप केला, याकरितां मनाची पक्की खातरी करावी ह्मणून सदर ग्रंथ पाहण्याची आह्मीं तसदी घेतली. या तसदीचें असें सुरेख फळ झालें कीं, आमचा वामनरावजींबद्दलचा पूर्वग्रह कायम झाला, व त्यांजवर जे अडून अडून आरोप केले गेले आहेत ते केवळ पक्षाभिमानामुळेंच होत अशी आमची खात्री झाली.

श्रीमंतांची व तदनुयायी कोकिळकार यांची अशी समजूत झाली आहे कीं, वामनरावजींनीं जी ग्रंथांची यादी दिली आहे त्यांतील सर्व पुस्तकें त्यांच्या पक्षास बळकटी आणणारीं आहेत. ह्मणजे त्यांतील प्रत्येक पुस्तकांत भद्राचळंजवळील जनस्थानाचा स्पष्ट व निर्णायक

उल्लेख आहे. परंतु ही त्यांची मोठी भ्रांति आहे. वामनरावजींनीं आपल्या उत्तरलेखांत हे ग्रंथ अमुकाचेच बाजूचे आहेत ह्मणून वाचलें नसून, हे ग्रंथकार आपल्या ह्मणण्यामुळें श्रीमंतांच्या पहिल्या पत्राप्रमाणें अडाणी ठरतात कीं काय हें पाहण्याकरितां ह्मणून त्यांनीं ते ग्रंथ काळजीपूर्वक वाचिले; व कांहीं ग्रंथ वादांतील उपांगभूत प्रकरणांस उपयोगी पडत होते ह्मणून वाचिले. वास्तविक पाहतां त्यांचे मनांतून ही विद्वत्वप्रदर्शक ह्मणून मानलेली यादी प्रथमतः देण्याचें नव्हतें. परंतु श्रीमंतांच्या 'सर्व रामायणें व अलीकडील कवि अडाणी ठरतील' या वाक्यावर ते कटाक्षपूर्वक लिहीत असतां, त्यांचेकडून तीच मोघम लिहिण्याची चूक होत आहे असें त्यांच्या मित्रमंडळीनें सुचविल्यावरून त्यांनीं ती यादी दिली आहे. व जे ग्रंथ किंवा त्यांतील वाक्यें त्यांच्या पक्षसमर्थनास आवश्यक होतीं तीं तीं त्यांनीं स्पष्टपणें स्थलनिर्देशपूर्वक उतरून घेतलीं आहेत. तेव्हां हीं पुस्तकें मिळविण्याच्या व पाहण्याच्या खटपटींत कोणासही पडण्याचें वास्तविक प्रयोजन नव्हतें. परंतु श्रीमंतांची समजूत ते व्यवहारज्ञ असल्यामुळें अशी झाली कीं 'विश्वास काय यांचा सुविषम होताति नर सदा सम ही' या पंतोक्तिप्रमाणें वादीप्रतिवादी ह्मणून कोणीही समरंगणांत आले ह्मणजे त्यांस धर्मयुद्धाची विस्मृति पडून ते कूटयुद्ध सुरू करतात; तेव्हां वामनराव तरी यास अपवादक कसे होतील अशी साहजिक पक्षाभिमानामुळें श्रीमंतांस शंका आली असावी; व तदनुषंगानें हा वरील आरोप क्रमप्राप्तच आहे. परंतु वामनरावजींचा श्रीमंतांस फारसा सहवास नसल्यामुळें अशी शंका येणें साहजिक आहे. परंतु आमच्यासारख्यांस, ह्मणजे आज वीसपंचवीस वर्षांचा निकट संबंध असणाऱ्या मित्रांस, वामनरावजी हे असल्या लफंडावांत कधीं पडायाचे नाहींत असा पूर्ण अनुभव आहे. त्यांना सत्यनिर्णयापुढें पक्षाभिमान कांहींच वाटत नव्हता. त्यांच्यासारखे सरल वादी मिळणें खरोखर भाग्याचेंच काम होय. असला सरळपणा दुर्मिळ तर खराच, परंतु केव्हां केव्हां तो या जगांत दृष्टीस पडतो. आह्मी ह्मणतों ही गोष्ट श्रीमंतांसही कबूल असली पाहिजे कीं वामनराव हे वादप्रतिवादांत निरुपम सरळ होते. याला प्रत्यंतर पाहिजे असल्यास प्रस्तुत वादांतच एक सांपडेल. श्रीमंतांनीं मुद्गलपुराणांतील एक स्वपक्षमंडनार्थ उतारा दिला आहे. त्याचा इतिहास आह्मांस खासगी रीतीनें जो कळला आहे तो असा कीं, वामनरावजींचें उत्तर प्रसिद्ध झाल्यावर एका विद्वान् शास्त्र्यानें श्रीमंतांच्या पक्षास अनुकूल असा सदर पुस्तक वाचीत असतां आपणांस आधार सांपडला असें रा. ओक यांस कळविलें. तेव्हां तो उतारा त्यांनीं लगेच श्रीमंतांकडे पाठवून दिला. आतां सदर आधार श्रीमंतांस त्यापूर्वींच सांपडला नसेल असें नाहीं. परंतु वामनरावजींची सरलता या गोष्टीनें अत्यंत व्यक्त होते. असें असून श्रीमंतांस वामनरावजी कुटिलयोद्धे असतील असा भास होणें हें खरोखरच दुर्भाग्य होय. असो. सदर याद पाहिली असतां सहा सात ग्रंथांखेरीज सर्व रामकथानकपर आहेत; व त्यांस अडाणी ठरविण्याचा दोष आपणावर येतो कीं काय हें पाहण्याकरितांच वामनरावजींनीं ते चाळले होते. ते अमुकच पक्षाचे आहेत असें सदर ग्रंथ वाचीतोंपर्यंत त्यांस माहितही नसावें. शिवाय, आपल्या तर्फेचे ग्रंथ ह्मणून ज्यांचीं नांवें द्यावयाचीं

त्यांत स्वपक्षमंडनपर एक शब्दही नसावा असें करण्याचें वामनरावजींच्या आंगीं धाष्टर्य होतें अशी कल्पना करणें, ह्मणजे वामनरावांस त्यांच्या सरळपणाबद्दल उत्तम प्रशस्तिपत्र देणेंच होय! अमरसिंहादिक ग्रंथकारांचा या यादींत नामनिर्देश पाहून श्रीमंतांस थोडें नवल वाटलेंसें दिसतें. परंतु पक्षाभिमान सोडून विचार केला असतां असें दिसेल कीं, हे ग्रंथकार या वादाच्या उपांगास आवश्यक आहेत. उदाहरणार्थ, तारानाथ तर्कवाचस्पति यांचा वाचस्पत्य नांवाचा कोश, व वराहमिहिरकृत बृहत्संहिता हीं एकंदर भूगोल पाहण्याच्या कामीं उपयोगी पडलीं. अमरसिंह हा क्षेत्रमापनकोष्टक देण्यांत उपयोगी पडला. Traveller's Guide—मग तें कोणचेंही असो—अलाहाबादेपासून चित्रकूटाची लांबी काढण्याच्या कामीं उपयोगी पडलें; व कांहीं मंडळी रामटेकावरून ह्मणजे रामगिरीवरून राम नाशिकास गेले असें ह्मणतात त्यांस खोटें ठरविण्यास सिंदुरागिरिमाहात्म्य व मेघदूत हीं उपयोगी पडतात. तेव्हां श्रीमंत व त्यांच्या मागून री ओढणारे कोकिळकार या दोघांची हे यादींतील ग्रंथ वामनरावजींच्या तर्फेचे आहेत असें समजण्यांत मोठी चूक झाली. व या भ्रांतीमुळें या उभयतांनींही जें आकांडतांडव केलें आहे तें व्यर्थ होऊन हा वाद पुस्तक दहावीस पृष्ठांनीं फुगविण्यास केवळ साधनीभूत झाला आहे. वामनरावजींस जीं पंचवटीसंबंधानें या ग्रंथांतील निर्णायक स्थळें दाखवावयाचीं होतीं तीं त्यांनीं आपल्या मूळ उत्तरांत स्पष्टपणें उतरून घेतलीं आहेत. तेव्हां बाकी राहिलेल्या ग्रंथांत अमुक ठिकाणीं उल्लेख नाहीं असें यादींत प्रत्येक ठिकाणीं लिहिण्याचें त्यांस 'तक्रकौंडिन्य न्यायानें' जरूर नव्हतें. आणि हें जर श्रीमंत पक्षाभिमानवश झाले नसते तर सहज त्यांच्या लक्षांत आलें असतें. असो. हा यादीचा उल्लेख व विचार श्रीमंतांनीं प्राधान्येंकरून केल्यामुळें आह्मांस एका गोष्टीचा निर्णय करतां येत आहे. तो हा कीं, **जनस्थान व पंचवटी** हीं स्थळें वामनरावजींनीं भद्राचलंजवळील मानल्यानें 'सर्व रामायणें व अलीकडील कवि अडाणी ठरतील; सर्व भलभलतें विसंगत होईल' अशी जी श्रीमंतांस धास्ती होती ती निदान या यादींत उल्लिखित शंभर रामायणांपुरती तरी निर्मूल झाली, व ज्या इतर रामायणांत या स्थळनिर्णयानें घोंटाळा होईल असें संभवनीय होतें अशांपैकीं एकाचाही श्रीमंतांनीं आपल्या प्रत्युत्तरांत उल्लेख केला नाहीं. यावरून श्रीमंतांची धास्ती निर्मूल होती हें उघड होत आहे. प्रस्तुत वादांत जीं रामायणें किंवा रामचरित्रें ओघाओघानें उल्लिखित झालीं आहेत त्यांशिवाय पुष्कळच संस्कृत, महाराष्ट्र, तैलंगी, बंगाली, हिंदी वगैरे भाषांत आहेत. तेव्हां ज्या कोणास हीं वाचण्याचा प्रसंग येईल त्यांनीं श्रीमंतांची धास्ती कितपत खरी आहे हें कळविल्यास या वादास महदुपकारक होईल. तथापि प्रस्तुत येवढा निर्णय झाला ह्मणण्यास हरकत नाहीं कीं, जोंवर अयोध्येहून लंकेस राम गेले हा ग्रह कायम आहे तोंवर जनस्थान व पंचवटी हिंदुस्थानच्या दक्षिणभागांत कोणत्याही स्थळीं—पंपेच्या पूर्वीं मात्र—गोदेच्या तटाकीं आहेत असें मानिल्यास कोणीही जुना कवि अडाणी ठरणार नाहीं.

आतां वादाच्या मुख्य मुद्याकडे वळूंया. मुख्य मुद्दा 'जनस्थान व पंचवटी हीं नाशिक व त्याच्या जवळचें खेडें पंचवटी ही रामाची वनवासांतील राहण्याची जागा असा जो महाराष्ट्रां-

तील लोकांचा समज आहे, तो भ्रांतिमूलक आहे' असें वामनरावांचें ह्मणणें होय. यावर श्रीमंतांचे दोन आक्षेप होते. त्यांपैकीं दुसरा, ह्मणजे सर्व कवि अडाणी ठरण्याचा आक्षेप, निर्मूल आहे असा आजपर्यंत झालेल्या वादावरून निष्कर्ष निघतो; व पहिला आक्षेप जटायुनिधनक्षेत्रादि रामायणीय कथेंतील स्थळें 'मागें राहिलीं आणि त्या करितां राम मागें आले असें ह्मणावें लागेल,' हा श्रीमंतांचा आक्षेप प्रत्युत्तरांत श्रीमंतांनीं निरभिमानतया व प्रांजलपणें परत घेतला आहे. तथापि श्रीमंतांनीं थोडीशी उलट मारून त्या आक्षेपास नवीन स्वरूप देण्याचा यत्न केला आहे. परंतु तो केवळ भ्रामक व वाल्मीकिरामायणकथेचा अश्रद्धासूचक आहे. आम्हींही वामनरावजींसारखे या नवीन सुचविलेल्या रस्त्याबद्दल येवढेंच ह्मणण्याचें धाष्ट्य करितों कीं, जनस्थानापासून पंपेच्या मार्गाचा, मग तें जनस्थान नाशिकाजवळ असो कीं भद्राचलंजवळ असो, भूगोलविषयक श्रीमंतांचा ज्ञानाभास आहे. श्रीमंत जर हिंदुस्थानाचा नकाशा फिरून एकवार सावधानतया पाहण्याची तसदी घेतील तर आतां उलट मारून काढलेला आक्षेप पूर्वींच्या आक्षेपाप्रमाणेंच निर्मूलक होय असें त्यांना दिसून येईल. आतां या मुख्य वादाचा निर्णय करणें ह्मणजे वादीप्रतिवादींना कोणकोणता पुरावा संमत आहे हें जाणणें जरूर आहे. या वादांत वामनरावजींचा मुख्य आधार ह्मणजे केवळ वाल्मीकीयरामायण. त्यावांचून इतर ग्रंथांचा उपयोग केवळ त्या त्या ग्रंथकारांची समजूत कोणत्या प्रकारची होती येवढेंच पाहण्याचा होता. अर्थात् रामायणीय कथेसंबंधानें या ग्रंथकारांचा प्राधान्येंकरून उपयोग नाहीं. या वादास साधकतम केवळ वाल्मीकिरामायण हा ग्रंथ होय असा वामनरावांचा स्पष्ट आशय आहे. आतां श्रीमंतांची 'उभयतः पाशारज्जुः' अशी स्थिति या वाल्मीकीयरामायणासंबंधी प्रस्तुत वादांत झालेली दृष्टीस पडते. वामनरावजींनीं वाल्मीकीयरामायणावरून रामयात्राक्रम अयोध्येपासून पंपेपर्यंतचा—दिशा व स्थलांतरें जितकीं त्या ग्रंथांत उपलब्ध झालीं तितकीं स्थलनिर्देशपूर्वक नमूद करून—दिला आहे, व वाल्मीकीचा आशय स्पष्ट कळावा ह्मणून त्याच ग्रंथानुरूप नकाशाही दिला आहे. आतां या वादाचा निकाल करणें ह्मणजे या वामनरावांच्या मुख्य आधाराविषयीं श्रीमंतांचें काय ह्मणणें आहे याचा कंठरवानें उल्लेख झाला पाहिजे होता. परंतु श्रीमंतांनीं तसें कोठेंही केलेलें आढळत नाहीं. आतां पृष्ठ ३९ यांत श्रीमंतांचें असें ह्मणणें आहे कीं "रामांनीं अयोध्या सोडल्यापासून पंचवटीस येईपर्यंत व पुढें सीताहरण जाहल्यापासून राम पंपेस येईपर्यंत जे मुक्काम व रामाचें राहणें वगैरे संबंधानें वाल्मीकिरामायणाप्रमाणें रा. रा. ओकांनीं लिहिलें आहे तें सर्वमान्यच आहे." परंतु नकाशा जो वाल्मिकीच्या ह्मणण्याच्या अनुरोधानें तयार केलेला आहे तो मात्र श्रीमंतांच्या मतें 'भरंवसा ठेवण्यास लायक ठरत नाहीं.' आतां विचार करितां श्रीमंतांचें नकाशा असम्मत आहे असें ह्मणणें हें थोडेंसें धाष्ट्याचें आहे. "विक्रीते करिणि किमंकुशे विवादः"? श्रीमंतांस जर प्रथमतः वाल्मीकिग्रंथ व तदनन्तर ओकांनीं दिलेला त्याचा उतारा हीं अमान्य असतीं, तर नकाशावरील त्यांची अश्रद्धा योग्य होती. परंतु तसा प्रकार नसून, मुख्य भाग सम्मत आहे ह्मणून नकाशावर आक्षेप करणें हें 'अर्धजरतीय' न्यायानें विसंगत

१. पंचवटीस्थलनिर्णय. पृ. ७८ पहा.

होय. जर वामनरावजींनीं परिश्रमपूर्वक तयार केलेला नकाशा असम्मत होता तर श्रीमंतांनीं दोन गोष्टी केल्या पाहिजे होत्या. प्रथमत: स्वाभिमत, परंतु वाल्मीक्यनुरोधानें नाशिकीय जनस्थानापर्यंत व तेथून पंपेपर्यंत नकाशा तयार करून या ग्रंथास जोडणें आवश्यक होतें. ह्मणजे त्या नकाशांत वामनरावजींनीं जशीं रामायणीय स्थळें दाखविलीं आहेत तशीं, मूळरामायणांत दिलेल्या दिशा व अंतरें साधून, स्थळें दाखवावयाचीं होतीं; व नाशिकीय जनस्थान मानिल्यास जी विसंगतता होईल असें वामनरावजीनीं दाखविलें आहे तिचा परिहार करणें आवश्यक होतें. ह्मणजे श्रीमंतांच्या असम्मतत्वास कांहीं स्वरूप व जोर हीं आलीं असतीं. परंतु हल्लींच्या उत्तरांत, चित्रकूटाहून राम कसे तरी गेले असतील—कोठेंतरी गेले असतील—पण शेवटीं ते नाशिकीय पंचवटींत धडकले—व तेथून पुढेंही पंपेपर्यंत लंकेला जाण्याच्या उद्देशानें सरळ मार्गानें गेले असें श्रीमंत मोघम ह्मणतात. पण हें ह्मणणें त्यांसच बाधक आहे, व त्यांचा पक्ष बलहीन आहे अशी परोक्षरीत्या कबुलीच आहे, असें तिऱ्हाइतास दिसण्याजोगें आहे. वामनरावजींनीं रामायणीय स्थळें नुसतीं कल्पनेनें ठरविलेलीं नसून ज्या सुमारास तीं होतीं असें दाखविलें आहे त्यांची स्थिति त्यांनीं Cnningham's Archaeological Reports च्या आधारावरून—विशेषत: ९, १०, ११ व्हाल्यूम्समधून—व वामनरावजी स्वतः त्या प्रांतांत बरेच दिवस हिंडले असल्यामुळें स्वतःच्या अवलोकनावरून निश्चित केली आहे; व ती वाल्मिकीयरामायणानुकूल असल्यामुळें नाकबूल करतां येत नाहीं. वादप्रसंगीं नुसता उडवाउडवीचा प्रकार श्रेयस्कर होत नाहीं, व निर्णय करणाऱ्यास तो उडवाउडवी करणारा पक्ष बलहीन वाटतो. याप्रमाणें पाहतां श्रीमंतांचा पक्ष अगदीं दुर्बळ आहे असें ह्मणावें लागतें. व येथवरच हा वाद संपायाचा असल्यास—ह्मणजे श्रीमंतांस व काव्यसंग्रहकारांस ( ह्मणजे वामनरावांचे प्रतिभूंस ) याबद्दल आणखी अधिक कांहीं ह्मणणें नसल्यास—या वादांत वामनरावजींचीच सरशी आहे असें आह्मांस वाटतें. या वाल्मीकिग्रंथाचा व तदनुरूप तयार केलेल्या नकाशाचा विचार करीत असतां त्या मूळग्रंथांत दिलेलीं अंतरें व दिशा हीं ओकांनीं स्पष्टपणें दाखविलीं असतांही श्रीमंतांनीं त्यांच्या अस्तित्वाबद्दल आपण सुजाण आहों किंवा अजाण आहों अशाबद्दल आपल्या उत्तरांत कोठेंही मागमूस लागूं दिला नाहीं. व वेळोवेळीं अमुकच स्थळ अमुकच ठिकाणीं आहे हें कशावरून, अशा प्रकारचे संशयोद्गार काढिले आहेत. तेव्हां वाल्मीकिरामायण जर श्रीमंतांस असम्मत असेल—पण तें तसें कालत्रयींही असण्याचा संभव नाहीं—तर या वादाला निराळें रूप येण्याचा संभव आहे. परंतु हल्लीं आहे हीच स्थिति कायम धरिल्यास वामनरावांचा पक्ष सर्वथैव खरा होऊं पाहतो.

हा वाद पूर्णपणें जनस्थानस्थितीची शहानिशा करण्यास उपयोगी पडावा ह्मणून लोकांच्या समजुतीप्रमाणें संभवनीय असणारे चित्रकूटाहून जनस्थानापर्यंतच्या मार्गांचाही ओकांनीं विचार केला आहे; परंतु श्रीमंतांनीं त्या दोहों मार्गांपैकीं कोणताही एक मार्ग आपल्यास मान्य असल्याचें कबूल केलें नाहीं. बरें ते दोनीही असम्मत होते तर आपला ह्मणून तिसरा मार्ग दाखवावयाचा होता. परंतु त्यांनीं हिकडे तिकडे अशा आड वळणांनीं मोघमपणें रस्ता दाखविण्याचा यत्न केला

आहे. तसें करण्यांत चित्रकूटाहून नाशिकास येतांना लागणाऱ्या रस्त्यांत जे देश लागतात ( व त्यांचा स्पष्टपणें ओकांनीं नामनिर्देश केला आहे ) ते टाळण्याकरितां हा श्रीमंतांचा प्रयास आहे. परंतु तसें करण्यांत रस्ता वाल्मीकीच्या दृष्टीनें अगदीं उलट होतो हें श्रीमंतांच्या लक्षांत आलें नाहीं. व तोच प्रकार पुढें पंपेपर्यंतच्या रस्त्याचा होईल हें श्रीमंत अगदींच विसरल्यासारखे दिसतात. यामुळें त्यांच्या पक्षाला बळकटी कितीशी व कोठेंशी आहे हें पाहण्यास आधारच मिळत नाहीं. एतावता वाल्मीकिरामायणावरूनच श्रीमंतांच्या पक्षाला कांहींच बळकटी येत नाहीं असें स्पष्ट दिसतें.

या वादांत श्रीमंतांची एक भलतीच समजूत झाली आहे व तिच्या योगानें हा वाद भलतासाच वाढला आहे. ह्मणजे वामनरावजींच्या बत्तीस पृष्ठांच्या उत्तरास श्रीमंतांचें शेचाळीस पृष्ठांचें उत्तर झालें आहे. वामनरावजींच्या उत्तरामध्यें २० पृष्ठें वाल्मीकिरामायणाच्या आधारें या वादाचा विचार करण्यांत गेलीं आहेत,आणि बाकीच्या बारा पृष्ठांत इतर ग्रंथांच्या दृष्टीनें विचार केला आहे. परंतु श्रीमंतांचें प्रत्युत्तर पाहतां वाल्मीकिरामायणाच्या संबंधानें दोनच पृष्ठांत त्यांनीं सर्व कारभार उरकून घेतला आहे. तेव्हां राहिलेल्या ४० पृष्ठांत श्रीमंतांनीं कशाचा तरी विचार केला आहे अशी साहजिक शंका उत्पन्न होईल. तर आमच्या मतें श्रीमंतांची समजूत चुकल्यामुळें त्यांस इतका प्रपंच करावा लागला आहे. वामनरावजींनीं आपल्या उत्तरांत "तेव्हां खरा प्रकार काय आहे—ह्मणजे श्रीमंतांचें ह्मणणें खरें किंवा आमचा पक्ष खरा—हें पाहण्याकरितां सुमारें ३०—४० या संबंधाचे ग्रंथ पहावे लागले " असें स्पष्ट ह्मटलें असतांही, श्रीमंत "त्या त्या ग्रंथांतील पंचवटीसंबंधानें निर्णायक स्थळें दाखविलीं असतीं तर विचारास सोयीचें झालें असतें " असें ह्मणतात, व त्यांतील उतारे घेण्यांतच सोळा पृष्ठें अडवितात, हें सर्व चुकीच्या समजुतीमुळें झालें आहे. वास्तविक वामनरावजींच्या पक्षास पुष्टी देणारे ग्रंथ वाल्मीकिरामायणाखेरीज ब्रह्मपुराण, रघुवंश, उत्तररामचरित, अनर्घराघव व बालरामायण इतके आहेत; व त्यांचे त्यांनीं योग्य तेवढे उतारेही घेतले आहेत. तेव्हां बाकीचे ग्रंथांत अमुक नाहीं तमुक नाहीं असें ह्मणण्याचें त्यांस प्रयोजन नव्हतें व ह्मणून त्यांनीं ह्मटलें ही नाहीं. श्रीमंतांनीं वामनरावजींच्या पक्षाचे हे सर्व ग्रंथकार आहेत असें समजून, त्यांतील उतारे देण्याच्या भानगडींत ते पडले आहेत.त्यापासून कांहींच लाभ न होतां श्रीमंतांस व्यर्थ श्रम पडले याबद्दल आह्मांस वाईट वाटतें. पण त्यांतल्या त्यांत आनंदाचा भाग हा आहे कीं, वामनरावजींच्या पक्षास प्रतिकूल असा एकादाही उल्लेख श्रीमंतांस मिळाला नाहीं. नाहींतर एखादा उल्लेख असून वामनरावजींच्या कडून चुकून निर्दिष्ट झाला नसता तर परपुष्ट कोकिळास आकांडतांडव करण्यास सांपडलें असतें. अस्तु.

या वादासंबंधानें पुराणकार काय ह्मणतात याचा विचार तूर्त एकीकडे ठेवून, काव्य नाटकें यांच्याविषयीं विचार करूं. प्रथमतः कविकुलगुरु कालिदास यांचा रघुवंश पाहूंया. या काव्यांतून वामनरावजींनीं उतारे दिले नाहींत. परंतु त्यांनीं कालिदास आपल्या पक्षास अनुकूल आहे असें ध्वनित केलें आहे. परंतु श्रीमंतांनीं आपल्या झालेल्या मुख्य ग्रहानुरूप पंचवटी शब्द ज्यांत आहे असा बारावे सर्गांतील एक

श्लोक उद्धृत केला आहे. परंतु वामनरावजींस अनुकूल असा सर्ग ६ मधील उल्लेख गाळला आहे. हा खातरीनें बुद्धिपुरःसर गाळला आहे असें कोणीही समंजस मनुष्य ह्मणणार नाहीं. श्रीमंतांचा रामकथेवर व पंचवटी स्थळावर विशेष कटाक्ष असल्यामुळें या सहाव्या सर्गाकडे त्यांची दृष्टि साहजिक गेली नाहीं. तो प्रसंग ज्या अर्थीं दोघांही वादीप्रतिवादींनीं गाळला आहे त्या अर्थीं आह्मी तो येथें नमूद करितोंः—

अस्त्रं हरादाप्तवता दुरापं
येनेंद्रलोकावजयाय दृप्तः ।
पुरा जनस्थानविमर्दशंकी
संधाय लंकाधिपतिः प्रतस्थे ॥ ६२ ॥

याजवर मल्लिनाथाची जनस्थान शब्दावर टीका अशी आहे—' जनस्थानस्य=खरालयस्य. '

ताम्बूलवल्लीपरिणद्धपूगा-
स्वेलालतालिंगितचंदनासु ।
तमालपत्रास्तरणासु रन्तुं
प्रसीद शश्वन्मलयस्थलीषु ॥ ६४ ॥

सदर वर्णन पांड्यदेशाच्या अधिपतीचें सुनंदा इंदुमतीजवळ करीत आहे, असा प्रसंग आहे. श्लोक ५९ पासून ६५ पर्यंत सदर राजाचें वर्णन असून हे दोन श्लोक प्रस्तुत वादांत उपयोगी आहेत ह्मणून येथें उतरून घेतले आहेत. ६१ वा श्लोकही आमच्या लक्षांत आहे. परंतु तो प्रस्तुत वादांत साक्षात् उपयोगी नसल्यामुळें आह्मीं त्याची उपेक्षा केली आहे. आतां पांड्यदेश कोठेंसा आहे याजविषयीं वाद असेल असें आह्मांस वाटत नाहीं. वामनरावजींनीं आपल्या नकाशांत पांड्यदेशाची स्थिति दाखविली आहे ती खरी आहे असें या उद्धृत श्लोकांवरून व ' दिशः सपत्नी भव दक्षिणस्याः ' या ६३ व्या श्लोकाच्या पादावरून स्पष्ट होंत. हल्लींच्या भूगोलाप्रमाणें पांड्यदेशाची व्यवस्था लावूं पाहिली तर हल्लींच्या नीलगिरि पर्वताच्या ( पूर्वींच्या मलयाच्या ) दक्षिणेस समुद्रापर्यंत बराचसा भाग म्हैसूरपासून टिलीवालीपर्यंत पूर्व पश्चिम भाग त्यांत येतो. आतां चौसष्टाव्या श्लोकावरून नीलगिरि नांवाची जी आडवी पर्वताची ओळ आहे ती मलय शब्दानें उद्दिष्ट आहे, व तीच अनर्घराघवटीकाकार रुचिपति याचें ' मलयाद्रिसमीपे रक्षोवासस्थानं जनस्थानं ' असें ह्मणण्यांत उद्दिष्ट आहे असें स्पष्ट आहे. याचप्रमाणें भवभूति वीरचरितांत, व ब्रह्मपुराणकार अ. २७, श्लोक १९ व ३७ यांत, मलय शब्दानें नीलगिरिच द्योतित करतात असें थोडेंसें विचारपूर्वक पाहिल्यास लक्षांत येईल. आतां हें जनस्थान मलयाजवळचें उत्तरबाजूचें जें महारण्य तें होय. तेंच जनस्थान नांवाचें अरण्य ६२ व्या श्लोकांत उद्दिष्ट जनस्थान नांवाचें अरण्य ह्मणजे खरालय होय. पांड्य देशाजवळ जनस्थान असल्यामुळें त्या देशींचा राजा आपल्या भावावर स्वारी करील या भीतीनें रावण त्याशीं तह करता झाला. तर हें जनस्थान चार योजनाचें नाशिकीय जनस्थान कालिदासाचे मनांत खात्रीनें नसावें हें कोणीही कबूल करील, कारण नाशिकीय जनस्थान पांड्य देशापासून किती दूर होतें, व मध्यंतरीं इतर राजे होते किंवा नाहीं याचाही विचार मनांत आल्यावांचून राहूं नये. तेव्हां हा कालिदासाचा पुरावा श्रीमंतांच्या दोन शब्दांवरील ( ह्मणजे जनस्थान व मलय यांवरील ) कोटीस किती विघातक आहे याचा श्रीमंतांनीं व इतर सूज्ञ वाचकांनीं जरूर विचार करावा. आमच्यामतें तर श्रीमंतांचा या दोन स्थलांविषयींचा समज वाल्मीकिरामायणावरून, कालिदासीय रघुवंशावरून, भव-

भूति, मुरारि व ब्रह्मपुराणकार यांच्या ह्मणण्यावरून पाहतां सर्वस्वी चुकला आहे.

( पुढील अंकांत समाप्त. )

## सोम व सोमरस.

[ १. ]

लेखक—सखाराम गणेश देउसकर.

**सत्येनोत्तभिता भूमिः सूर्येणोत्तभिता द्यौः। ऋतेनादित्यास्तिष्ठंति दिवि सोमो अधिश्रितः ॥१॥ सोमेनादित्या बलिनः सोमेन पृथिवी मही। अथो नक्षत्राणामेषामुपस्थे सोम आहितः॥२॥ सोमं मन्यते पपिवान् यत् संपिंष्यंत्योषधिम्। सोमं यं ब्रह्माणो विदुः न तस्याश्नाति कश्चन ॥३॥ आच्छद्विधानैर्गुपितो बार्हतैः सोम रक्षितः। ग्राव्णामिच्छृण्वन् तिष्ठसि न ते अश्नाति पार्थिवः ॥ ४ ॥ यत्त्वा देव प्रपिबंति तत आप्यायसे पुनः । वायुः सोमस्य रक्षिता समानां मास आकृतिः ॥ ५ ॥**

टीपः— ऋग्वेद मंडल १०, सूक्त ८५.

१. सत्येन=सत्यभूतेन ब्रह्मणा। उत्तभिता=उपरि स्तंभिता। ऋतेन=धर्मेण, यज्ञेन वा। आदित्याः=देवाः। अधिश्रितः=अधिष्ठितः।

२. मही=महति । नक्षत्राणामुपस्थे=द्युलोके ( इति सायणः )। आहितः=आस्थितः।

३ संपिंष्यंति=निष्पीडयंति । ओषधिम्=वल्लीरूपं सोमम्। ब्रह्माणः=ब्राह्मणाः।

४ आच्छद्विधानैः=आच्छादयंति विधानानि येषां तैः। बार्हतैः=बृहत्सामगायकैः । ग्राव्णां=अभिषव-ग्राव्णां ( प्रस्तराणां )। इत्=ध्वनिम्। पार्थिवाः=ऐहिकसुखपरायणाः।

५. यत्=यदा । त्वा=त्वां । प्रपिबंति=प्रकृष्टरूपेण पिबंति । आप्यायसे=वर्धसे ( आप्यायस्व इति सायणः )। रक्षिता="रक्षिता यथा न शुष्यति तथा। वायुः शोषकः प्रसिद्धो लोके" ( इति सायणः) मासः=सोमः ( सायणः ) । समानां=संवत्सराणां। आकृतिः=मूर्तिः " आकर्त्ता, व्यवच्छेदकः कर्त्ता वा "( इति सायणः )।

ह्या सूक्ताची भाषा फार सोपी आहे. ज्यांस थोडेंही संस्कृत भाषेचें ज्ञान आहे, त्यांस वरील टीपांवरून ह्या सूक्ताचा अर्थ सहज कळेल. ह्मणून ह्या सूक्ताचें भाषांतर देऊन निबंधविस्तार न करितां त्याचें तात्पर्य व त्यापासून निघणाऱ्या सिद्धांतांविषयीं आह्मांस जें वाटतें, तें येथें लिहितों.

पहिल्या मंत्रांत ऋषि ह्मणतात कीं " सोम हा स्वर्गलोकांत अधिष्ठित आहे. " दुसऱ्यांत, आदित्यांस बल देणारा व पृथ्वीस एवढी मोठी करणारा सोमच होय, असें ह्मटलें आहे. तिसऱ्या मंत्राचा भावार्थ असा कीं, वल्लीरूपी सोमाचा रस काढून तो पिणारे असें समजतात कीं, आमचें " सोमपान " झालें; पण ब्राह्मण ज्यास " सोम " ह्मणून समजतात त्यास कोणी पिऊं शकत नाहीं. बार्हतांनीं ह्मणजे बृहत्सामगायक ऋषींनीं सोमास आच्छादन करून लोकांपासून दूर लपवून ठेविण्याची व्यवस्था केली आहे, व पार्थिव ह्मणजे जगाच्या मोहजाळ्यांत सांपडलेल्या मनुष्यास सोमपान घडत नाहीं. चवथ्या मंत्राचा एवढाच आशय दिसतो. पांचव्या मंत्रांत ऋषि ह्मणतात कीं, सोमाचें पान केल्यानें त्याचा ऱ्हास न होतां उलट तो दिवसानुदिवस वाढत जातो. वायूनें सोम शोषला जात नाहीं. ( नचैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ गीता, अ. २ श्लोक २३. ) व तो कालाचा कर्ता, व्यवच्छेदक व मूर्ति ह्मणजे कालात्मक व महाकालरूपी आहे.

या पांच मंत्रांत सोमाचें जें संक्षिप्त वर्णन आढळतें, त्यावरून तो आदित्यांचा नियंता,

पृथ्वीचा स्रष्टा, अशोष्य, कालरूप व स्वर्गलोकांत विराजमान असून पार्थिवलोकांस दुष्प्राप्य असा ठरतो. ह्यावरून तो कोण असावा, तें वेगळें सांगण्याची जरूर नाहीं. शेवटल्या दोन मंत्रांवरून असें अनुमान निघतें कीं, बृहत्सामगायक ऋषींनीं सोमपानाची विद्या ह्मणजे ब्रह्मविद्या अनधिकारी लोकांपासून गुप्त ठेविली होती. व एकदा तत्त्वज्ञान ज्याच्या हृदयांत बिंबत असे, त्याच्या हृदयांत त्याची वाढ आपोआप मोठ्या झपाट्यानें होत असे, व तो तत्वज्ञानाची तशी वाढ व्हावी अशी देवाजवळ प्रार्थना करीत असे. सोम हा इतर पदार्थांसारखा पेय नव्हे, असें ह्या सूक्तांत कंठरवानें ह्मटलें आहे, त्याकडेही वाचकांचें लक्ष्य गेलेंच असेल.

यज्ञाच्या वेळेस ब्रह्मविद्येची दीक्षा घेण्यापूर्वीं चित्तशुद्धीकरितां सोमवल्लीचा मधुर रस ( मं. ८ सूक्त ४८ मंत्र १ मध्यें सोमास "स्वादु अन्न" ह्मटलेलें आहे. ) पिण्याची चाल होती. तिसऱ्या मंत्रांत ब्रह्मविद्येची दीक्षा घेऊं इच्छिणारांस ऋषि सुचवितात कीं, ओषधीचा रस प्याल्यानें सोमपान होतें असें जें कित्येकांस वाटतें, तें चुकीचें आहे. खऱ्या सोमपानाचा प्रकार निराळाच आहे.त्या सोमास कोणी तोंडानें पिऊं शकत नाहीं, तसेंच मोहबद्ध मनुष्यही सोमाचा स्वाद घेण्यास समर्थ होत नाहीं.

सोमास स्वर्गीय पदार्थ ह्मणून पुष्कळ ठिकाणीं वर्णिलें आहे. ऋग्वेदांत अशा अर्थाची एक आख्यायिका आहे कीं, 'सोम हा स्वर्गीय पदार्थ असून नरलोकांस पूर्वीं दुर्लभ होता. पुढें इंद्रानें श्येनपक्ष्याचें रूप घेऊन मनुष्यांच्या हिताकरितां सोमास ह्या मर्त्यलोकांत आणिलें.' ह्यावरून ब्रह्मविद्या ही सर्व प्रथम इंद्रापासून ( ह्मणजे इंद्राची उपासना करितां करितां) ऋषिमंडलास मिळाली. ह्या विद्येस ' मधु—विद्या ' असेंही नांव दिलेलें वेदांत आढळतें. ऋग्वेदाच्या मं. १, सूक्त११६, मंत्र १२, ह्यावरून मधुविद्येस ऋषिलोक फार गुप्त ठेवीत असत. आह्मी वर दाखल केलेल्या सूक्ताच्या चवथ्या मंत्रांतही सोमरहस्य गुप्त ठेविण्याची व्यवस्था ऋषींनीं केली होती, हें वर पाहण्यांत आलेंच आहे. अष्टम मंडलाच्या ४८ व्या सूक्तांत सोमास ' मधु ' ही संज्ञा दिलेली आढळते. तसेंच " अधामे श्येनो ' मधु ' आजभार " ह्या वामदेवाच्या उक्तींत सोमाच्या ऐवजीं 'मधु' शब्द योजलेला आहे. एवंच मधुविद्या, ब्रह्मविद्या व सोमरहस्य हीं तीनही अभिन्न ठरूं पाहतात, व सोम आणि सोमरस हीं ब्रह्मज्ञान व भगवद्भक्ति यांचीं नामांतरें होत असें ह्मणण्याकडे प्रवृत्ति होते. ह्या ब्रह्मज्ञानांत व भगवद्भक्तींत ' स्वादिष्ठपणा व मदिष्ठपणा ' किती असतो, हें तुकारामाच्या चरित्रावरून आमच्या मराठी वाचकांस कळून आलेंच असेल.

मधुविद्येची ( ब्रह्मविद्येची ) दीक्षा घेण्यापूर्वीं यज्ञांत चित्तशुद्धीकरितां सोमवल्लीचा रस पिण्याची पद्धत होती व त्यावरून इतर यज्ञांतही सामान्यत: सोमरसपानाची चाल पडली असावी असें दिसतें. सोमवल्लीच्या रसांत मादकता असते ह्मणून ती दूर करण्याकरितां ऋषिलोक त्यांत दहीं घालीत असत. त्या दह्यांस"आशिर" ह्मणत. ह्यावरून झिंगण्याकरितां पूर्वींचीं ब्रह्मवृंदें सोमरसाचें प्राशन करीत असत,असें ह्मणतां येत नाहीं. शिवाय आणीक एक गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे,ती ही कीं, यज्ञाशिवाय दुसऱ्या कोणत्याही लौकिक कृत्यांत सोमपान विहित होतें, असें ह्मणण्यास आधार नाहीं. यज्ञांत विधिपूर्वक सोमरस पान केल्यानें " स्वर्गप्राप्ति "

होतें, असाही समज पूर्वी होता. तेव्हां दधिमिश्रित सोमरसास दारूची संज्ञा कशी लावावी व तशाप्रकारें सोमरसपान करणारांस मद्यप्यांच्या पंक्तीस कसें बसवावें, हें आह्मांस समजत नाहीं. सोमरसाच्या पानानें चित्ताचा सतेजपणा, एकाग्रता व मेंदूची शक्ति वाढून अति गहन तत्त्वविचार करण्यास लागणारें चित्तस्थैर्य प्राप्त होत असे. दहीं घातल्यामुळें त्याचा मदिरापणा अजीबात उडून जाई.

दुसरें असें कीं, सोमवल्लीच्या रसाचा स्वाद अतिशय वाईट असतो. पंडित मार्टिन हौग साहेबांनीं त्याचें प्राशन करून त्यास Nasty drink असें ह्मटलें आहे. परंतु वेदांत ज्या सोमरसाची फार फार स्तुति आढळते, त्यास स्वादिष्ठ ह्मणजे अतिशय गोड असें ह्मटलेलें आहे. ह्यावरून " स्वादिष्ठ " व " मदिष्ठ " हीं विशेषणें ज्या सोमास लावलेलीं आहेत, व ज्यास श्येनरूपी इंद्रानें स्वर्गलोकांतून मनुष्याच्या हिताकरितां पृथ्वीवर आणिलें ह्मणून वर्णिलेलें आहे, तो सोम वल्लिरूपी नसून सर्व जगताचा नियंता व आप्यायनकारी परब्रह्माचें नामांतर होय, असा आमचा तर्क धांवतो. परमगुह्य सोमरहस्य( मधुविद्या ) प्राकृत जनांस कळवून देण्याच्या उद्देशानें त्याचें वर्णन करितांना ऋषींनीं पुष्कळ ठिकाणीं लाक्षणिक वर्णनपद्धतीचें व रूपकालंकाराचें अवलंबन केलें आहे, असेंही कित्येक मंत्रांच्या रचनाप्रकारावरून दिसून येतें.

सोमाविषयीं वेदांत पुष्कळ मंत्र आहेत. देशी चष्मा लावून त्यांचें निरीक्षण केल्यास त्या काळच्या पुष्कळ गोष्टी त्यापासून उघडकीस येण्याचा संभव आहे. ह्मणून क्रमाक्रमानें त्यांतील निदान कांहींचा तरी विचार करण्याची आमची इच्छा आहे. ह्याविषयीं आमचे सन्माननीय मित्र बंगाल्यांतील प्रसिद्ध वैदिकनिबंध-लेखक **उमेशचंद्र वटव्याल** यांनीं कांहीं महत्त्वाचे लेख लिहिले आहेत. नुकतेच ते वारले असून त्यांच्या अकाल मृत्यूनें बंगाली सारस्वतसमाजाची जी नुकसानी झाली आहे, ती लौकर भरून येण्याची आशा दिसत नाहीं, याचें आह्मांस फार दुःख वाटतें. असो. त्यांच्या लेखांतील मुख्य मुद्दे मराठी वाचकांपुढें मांडावेत, ह्या हेतूनें ही निबंधमाला लिहिण्याचा संकल्प केला आहे.

ह्या निबंधाच्या प्रारंभीं ज्या पांच ऋचा दाखल केल्या आहेत, त्यांच्या व्याख्या वगैरे बहुतेक आमच्या सन्माननीय मित्रांच्या निबंधावरून घेतल्या आहेत. टीपेंत जे शब्दार्थ दिले आहेत ते मूळच्या बंगाली निबंधांत नसून बहुतेक सायणभाष्यावरून आह्मी मराठी वाचकांकरितां उतरून घेतले आहेत. सायणभाष्य वाचीत असतां आह्मांस असें दिसून आलें कीं, वटव्याल महाशयांनीं ह्या सूक्ताची जी व्याख्या केली आहे, तिचा भाष्यकारांनीं केलेल्या व्याख्येशीं मेळ बसत नाहीं. पुढें यास्ककृत निरुक्तांत काय व्याख्या दिली आहे, ती पाहूं जातां असें आढळलें कीं, सायणांनीं यास्काचाच मार्ग स्वीकारला आहे. त्या दोघांही व्याख्यात्यांनीं या सूक्ताचा सोमवल्लि–व चंद्र–पर अर्थ घेतला आहे. त्यावरून कांहीं दिवसांपूर्वी आह्मी एका बंगाली निबंधांत " वैदिक विष्णु" विषयीं लिहीत असतां वेदाच्या टीकाकारांविषयीं व वेदार्थाविषयीं जें लिहिलें होतें, तेंच खरें आहे असें आह्मांस आढळून आलें.

आमच्या पूर्वनिर्दिष्ट बंगाली निबंधांत आह्मी असें ह्मटलें होतें कीं, वैदिक मंत्र बहुतकरून विविधार्थक असतात; ह्मणजे एके-

का मंत्रांतून तीन चार प्रकारचे अर्थ निघूं शकतात. तसेंच, बहुतेक मंत्रांच्या लौकिकार्थाशिवाय त्यांत एक तत्वज्ञानपर गूढ अर्थही निहित असतो. भाष्यकारांची दृष्टि लौकिकार्थाकडे विशेष असते. आमच्या ह्या अनुमानास जें कारण आह्मी त्यावेळीं दाखविलें होतें, तेंच पुन्हा येथें दाखल करतों.

सुप्रसिद्ध वामनसूक्तांत पुढील मंत्र आढळतो.–

**" इदं विष्णुर्विचक्रमे त्रेधा निदधे पदं "** ॥

ह्याची व्याख्या करितांना सायणांनीं पुराणांतील " बलिवामनोपाख्यानाचा " उल्लेख केला आहे, व त्याचा अर्थही त्या आख्यायिकेस अनुसरून केला आहे. यास्क व त्याच्या पूर्वींच्या व्याख्यात्यांनीं जो अर्थनिर्देश केला आहे, तो असा.—

**" यदिदं किंच तद्विक्रमते विष्णुः । त्रेधा निधत्ते पदं । त्रेधाभावाय पृथिव्यां, अंतरीक्षे दिवीति शाकपूणिः । समारोहणे, विष्णुपदे, गयशिरसि इत्यौर्णवाभः "** ॥

यावर दुर्गाचार्यांनीं वृत्ति लिहिली आहे. ती अशी.—

**" यदिदं किन्चिद्विभागेनावस्थितं तद्विक्रमते विष्णुरादित्यः । कथमिति यत् आह ' त्रेधा-निदधे पदं ' निधत्ते पदं निधानं पदैः । क तत्तावत् ? पृथिव्यामंतरिक्षे दिवीति शाकपूणिः। पार्थिवोग्निर्भूत्वा पृथिव्यां यत्किंचिदस्ति, तद्विक्रमते तदधितिष्ठति । वैद्युतात्मना, दिवि सूर्यात्मना । यदुक्तं–" तमू अकृण्वन् त्रेधा भुवेकं.**

( ऋग्वेद १० म मंडल. ८८ सूक्त. मंत्र १० वा. )

**" समारोहणे उदयगिरौ उद्यन् पदमेकंनिधत्ते, विष्णुपदे मध्यंदिनेऽतरिक्षे, गयशिरसि अस्तं गिरौ इत्यौर्णवाभ आचार्यो मन्यते "** ॥

वरील व्याख्येंत विष्णूच्या त्रिपादांनीं जगत् आक्रमणाचा अर्थ " सूर्याचा उदय, त्याची मध्य आकाशांत स्थिति, व त्याचें अस्तगमन" असा केला आहे. 'विष्णु'शब्दाचा निरुक्तनिष्पन्न अर्थ " सूर्य ", व वैदिकनिघंटु नांवाच्या ग्रंथांत विष्णु व सूर्य हे दोन्ही शब्द परस्परांचे वाचक आहेत असें सांगितलें आहे. निरुक्तांत दिलेली ह्या मंत्राची सौर व्याख्या जी आह्मी वर दाखल केली आहे, ती अतिप्राचीन असूनही त्यांत लौकिकार्थ मात्र दाखविला आहे–त्याचा गूढार्थ सांगितलेला नाहीं. परंतु तेवढ्यावरून त्या मंत्रांत कांहीं निगूढार्थ नाहीं, असें सिद्ध होत नाहीं.

यजुर्वेदीय वाजसनेयी संहितेच्या २३ व्या अध्यायांत ४९ व्या मंत्रांत, पुढील प्रश्न केलेला आहे- **" येषु विष्णुस्त्रिषु पदेषु एष्टस्तेषु विश्वंभुवनमाविवेशा ॥"** ह्मणजे विष्णूचीं जीं पदत्रयें यज्ञयागानें तृप्त होतात, त्यांत विश्वभुवन अनुप्रविष्ट आहे कीं नाहीं ? ह्या प्रश्नाचें उत्तर पुढील मंत्रांतच दिलें आहे,—" **अपि तेषु त्रिषु पदेषु अस्मि येषु विश्वं भुवनं आविवेश । सद्यः पर्येमि पृथिवीं उत द्यां एकांगेन दिवो अस्य पृष्ठं ॥** " विष्णूच्या त्या पादत्रयांत मी अंतर्निविष्ट आहें, इतकेंच नाहीं, परंतु त्यांत पृथिवी, स्वर्ग व स्वर्गपृष्ठ ह्मणजे स्वर्गाहूनही उच्चलोक अनुप्रविष्ट आहेत, हें मला एका अंगानें ( मनरूप इंद्रियांनीं ) कळतें. " ह्या मंत्रांत विष्णूच्या त्रिपादांनीं त्रिलोक व्याप्त आहेत, हें जें तत्व सांगितलें आहे तेंच " इदंविष्णुर्विचक्रमे " या मंत्रांत गर्भित आहे, हें अगदीं उघड आहे. तथापि भाष्यकारांनीं जसें येथें लौकिकार्थापलीकडे जाण्याची खटपट केली नाहीं. तशीच वरील सोमसूक्ताच्या वेळींही त्यांनीं ती

केलेली दिसत नाहीं. परंतु आह्मांस तरी असें वाटतें कीं, वरील पांच मंत्रांचा सोमलताविषयक अगर चंद्रपर अर्थ जितका सुयुक्तिक दिसतो, त्याहीपेक्षां परब्रह्मपक्षीय व्याख्या अधिक हृदयंगम व सरळ आहे. असें नसेल तर सोमवल्लीस " दिवि अधिश्रितः " " न ते अश्नाति पार्थिवः " असें ह्मणतां येईल काय ? चंद्रपर अर्थ घेतल्यास " आच्छद्विधानैर्गुपितो " व " वायुः सोमस्य रक्षिता " इत्यादि वाक्यांची व्यवस्था काय ? आतां सोमाचा ब्रह्मपक्षीय अर्थ इतर सूक्तांवरून सिद्ध होतो कीं नाहीं, तें पुढील निबंधांत दाखविण्याचा प्रयत्न करूं.

---

## तान्हाजी मालसुरे
### अथवा
## सिंहगडची मोहिम.

### प्रकरण तिसरें.

( मागील अंकावरून पुढें चालू. )

प्रसंग येणार अ–भद्र फार
विपत्तिचे लोटति तोंच भार;
उपाय ते होति अपाय सारे;
कुबुद्धिचें येत मनांत वारें. ५४

असे निशा कृष्ण भरांत आली;
दहींवरें सृष्टि सचैल न्हाली;
करीत मर्त्यांस सुषुप्तिदास,
गडीं कळा ये सहजीं उदास. ५५

दिवे कुठें जे झुजती तमाशीं,
तयांसवें झुंजति कीट–माशी;
धर्गांतले गार पडोनि ओंडे
धगांसि झाले स्वयमेव धोंडे. ५६

सभोंवतीं कांकडले शिपाई
श्रमून, त्यां चेतवितां उपाई
सुमंदची ते; परि हे प्रकाश
अरींस देती फलमात्र खास. ५७

स्थिरावले जंतुसवेंचि शब्द,
नसेहि त्यांची पड–साद[१] लब्ध;
तथापि शैत्यातिशयें पिडूनी
शिवा, दिवा–भीत रडे मधूनी. ५८

सुंणीं[२] कुठें काढिति लांब हेल
×हिंवें जिवीं होउनि घालमेल;
तशीं कुणीं पाहुनि चाहुलीस
पुनःपुन्हा पैं करिती हुलीस. ५९

पिटाळिती गुंगित त्यां शिबंदी–
खुली न कां हो अरिलागिं बंदी[३]?
अभागियांतें न रूचे प्रबोध;
खरा शिका टाकुनि घेति बोध[४]. ६०

हळू हळू तें दळ ये पुढारीं,
तृणाचिया जेंवि गुरू बिढारीं;
गडांतले निर्भय सुप्त लोक–
गणून कीं कोट असे अजिंक्य. ६१

होती गडांत फिरती जरि गस्त साची,
खासा असे गडकरी[५] फिरता तसाची,
कोणासही न कळला रिपुचा रिघाव.
( पापाश्रितांवरि[७] पडेत असेचि घाव. )६२

' घाला कधींहि नच येइल दक्षिणेचा[८] '
होता पुरा मनिं घडा गड–पाळकांचा.
आलें परंतु तिथुनीच गडासि विघ्न;
प्रारब्धयोग फिरतां सुत हो पितृ–घ्न. ६३

---

१ परसे.

१ प्रतिध्वनि. २ कुत्रीं. × थंडीनें. ३ एकच गर्दी ( ओरडण्याची ). ४ बोध–बद वाजणारा. ५ गंज. ६ किल्लेदार, उदेभान. ७ दुष्टांचे आश्रित. ८ दक्षिणबाजूकडून.

संरक्षणारहित तो उमगून ठाव
आला अचानक रिपू करुनी उठाव;
फैलावला प्रबळ तो बघतां न कोण्ही;—
मध्यान्हिं जेविं तृणपर्णकुटींत वन्ही. ६४
लोपे किती भडकली धुमसून आग ?
लोपे कसा लगटला अति-काय नाग ?
झाला सुगुप्त अरि शेवटिं भासमान-
डोहीं सवेग गढल्या कलभा-समान. ६५
ऐकून पाद-रव थोर समीप भागीं,
साशंक येक तइं गस्तकरी अभागी;
झाला पुढें वदत—"कोण ? उभे असा रे!
"जातां कुठें दपत ? चोर जसेच सारे!"६६
तों तीर हो तदुदरीं शिरला सवेंची,
शब्दासमेत निमिषें तदसूंस वेंची;
घाला बघून इतरीं पुर-रक्षकांनीं
केला महा-स्वनचि; जाय समस्त कानीं.६७

---

झाली नौबत, तोफही धडकली,
शिंगें गडीं वाजलीं,
आली गर्जत दुर्ग-पालक-चमू
तों शूर नांवाजली.
खांडा, तीरकमाण, ढाल बरची—
ज्या जें करीं लाधलें
घेवोनी, रिपुला तिणें चहुंकडे
घेरोन संरोधिलें. ६८
टेंभे पाजळती, अनेक दिवट्या,
तैशा मशाली किती!
कोणी चेतविती धगांस-रिपुला
स्वाधीनसा लेखिती.
तान्हाजी क्षण वागुरीं गवसल्या
सिंहापरी भावला;
किंवा, भव्य गजेंद्र दिव्य दवज-
ज्वालांत भांबावला. ६९
जों जों घोर परंतु होरपळवी
थोरां महात्म्यांप्रती,
तों तों त्या दिसती चमत्कृति-परा
चेतो-हरा तत्कृति;
बोले तो स्वदलास हास्यवदनें
पंचास्य कालोचिता
वाणी, जे श्रवणीं पडोनि रिपुच्या
श्रेणीहि रोमांचिता. ७०

---

"ऐका बांधव हो, मम स्वजन हो!
मत्प्रार्थना आयका—
कर्तव्या कळवावयास नलगे
शूरांचिया नायकां!
हें तों सत्य; परी हुताशन पुन्हा
चाळावया लागतो
यालागीं, तुमचे कर स्फुरति ज्या-
साठींच तें सांगतों.७१
'ज्याचा झेंडा यशश्वी अखिरि भगवा
नित्य' हें नांव राहो;
ज्यांच्या कीर्ती दिगंतीं दुमदुमति अशा
पूर्वजांना स्मरा हो;
मेल्या स्वर्गास जाऊं, जरि विजय मिळे
कीर्तिसौख्यास लाहूं;
बाप्पानों! वैरि पाहू खडतर तुमचा
घाव आतां! चला हूं! ७२
कोणाचे दास आह्मीं, स्थळ कवण, पुढें
कोण, हें पूर्ण देखा!

---

१ हत्ती. २ महावन्ह, बॉंब. ३ जाळ्यांत.

१ वणव्याच्या (पासून झालेल्या.) २ चिता. ३ सिंह. ४ रांगा, ओळी.

राज्याला काय धोका समायें कचरल्या
आणि धर्मास लेखा !
ध्या जी ध्यानांत माझी विनति समय हा
योग्य ध्यायास बाजी ;
पाजी हे म्लेंछ आजी चरचरुनि चिरा !
गाजवा हिंदु-राजी! ७३

ज्या मातेच्या प्रतापें शिवनृप शकला
धर्मसंस्थापनातें,
ज्या त्यांच्याचि प्रसादें अजि सुगम इथें
मार्ग हो आपणातें,
ती माता भूप देवो यश बळ सकळां
धैर्य आह्मां ल्ढाला !
बोला ! "जै श्रीभवानी जय जय शिवजी"
मित्र हो ध्याच ढाला ! ७४

सांडा भिती सकळ, सांडेंच या जरि
मुसांडा तयां हेय गणी;
भांडापरी, कुटिल भांडाळ यांस
यम-भांडार ध्याच गर्गणीं !
लांडा दिसे, तरि नलांडा न, खाईत
कलांडाच त्यास मरिच्या !
खांडा धरा सबळ, खांडापरी झटुन
खांडां शिरांसि अरिच्या !"७५

---

वीरांहीं श्रवण करून वीरवाणी,
शत्रूंना बघुन अदूर शस्त्र-पाणी,
बाणीचा समय मनांत पूर्ण बाणे,
वीरश्री तंव तंव अंतरीं फणाणे. ७६
क्रोधानें उसळुनि खाउनी रदांतें,
वेगानें हटवुनि वायु-नीरदांतें
तान्हाजी असि-धर-रत्न अग्रभागीं,
जीच्या, ती खळबळली चमू-भुजंगी. ७७
खावे कीं रिपु-भट-भेक हे वधावे-
व्याळी ही भरुनि उमाप चेव धांवे;
तों मर्मीं अतिकठिण प्रहार लाहे;-
क्रोधांध स्वपरबलाबला न पाहे. ७८

जों जों ती-वरि भडिमार होय भारी,
तों तों ते सजव पुढें शिरें उभारी;
भग्नांगें रुधिर-निषिक्त सांवरीते
पुष्पांहीं उत्तरत रक्तसांवरी ते. ७९
साहोनी परि अति शस्त्र-वेदनांला
आटोपी रिपु; रिपुहि स्वधैर्षणाला;
लागे जो मग हतभाग्य काय हातीं,
त्या त्याला ह्मणवित "हाय हाय, हा !"ती.८०
दुर्धर ते जरि निर्भर झुंजति-
दुर्ग-सु-रक्षक जर्जर झाले,
पंकीं पडे; किति खंक तयीं;
कुणि शंख करीत निशंक पळाले !
धांवति ते भरधांव करूं-जशि
वाव मिळे; लवलाहिं अवाई.
मालुसरा, दुसरा यम, पाठिस
राहुन, दे घसराहि सवाई ८१
गेली मांदी पळुन अवघी दुर्ग-संरक्षकांची;
गेली तैशी धृति-मतिसह श्रीहि जीच्या मुखांची.
सांगे सारी परिभवकथा ते उदेभान राया,
चालेना मन्मतिविभव त्या वर्णनातें कराया. ८२

## प्रकरण तिसरें समाप्त.

---

१ अनुमान करा २ हिंदुपद पादशाही. ३ सांडा—उंद्रिणी. ४ मुसंडा—मुसलमान. ५ वोडे. ६ भांडलोक. ७ आकाशांत. ८ महामारीच्या. ९ जवळ. १० पाऊस.

१ तांबडी सांवरी ( झाड ). २ धैर्याला ( आटोपी ). ३ न हटणारे. ४ अतिशय. ५ गड—रखवालदार. ६ चिखल. ७ तिथें= चिखलांत. ८ केवळ दुसरा यमच असा. ९ शस्त्रांचा भडिमार. १० पराजय.

खेना, व त्याला आपला हेतू साध्य करून घेण्याला किती तरी कपट व गुप्त खटपट करावी लागली, यावरून दोन गोष्टी सिद्ध होतात. भूरिवसु अमात्य या नात्यानें असावा तितका प्रबळ नव्हता. दुसरें, पाश्चात्य लोक आपणा हिंदुस्थानी लोकांस ज्या प्रकारच्या वर्तनावरून नेहमीं कपटी, कारस्थानी व आडमार्गानें जाणारे अशीं नांवें ठेवतात, तशा तऱ्हेचें वर्तन आपल्यांतील मोठमोठ्या विद्वान् व हुद्देदार लोकांच्याही अंगांत इतक्या प्राचीन काळींही बिंबूं लागलें होतें; इतकेंच नव्हे तर, असें वर्तन असण्यांत कांहीं दोष नाहीं, दुटप्पीपणा व कुटिल मार्ग यांचें खुशाल सेवन करावें, पण आपलें इष्टकार्य साधावें हेंच शहाणपण, अशी समजूत दृढ होत चालली होती. समाजांतील धुरीण लोकांची अशी समजूत होणें, हें देशाच्या उतरत्या कळेचें लक्षण होय. व असें वर्तन होत गेल्यानेंच या देशाला हल्लींची हीन दशा आली यांत शंका नाहीं.

पूर्वीं विदर्भ देशाबद्दल थोडेंसें लिहिलें आहे त्याला, देवरात हा विदर्भदेशच्या राजाचा मंत्री होता व कुंडिनपुर ही विदर्भदेशाची राजधानी होती असें वर्णन केलेलें आहे त्यावरून, बरीच मजबुती येते. विदर्भ ह्मणजे वऱ्हाडदेश असें घेतलें तर देवरातानें आपला तरुण मुलगा माधव वऱ्हाडांतून नरवराजवळ पद्मावतीस सुमारें २५० कोसांच्या अंतरावर पाठविला असें होतें. पण ही गोष्ट संभवत नाहीं. कारण एकतर अंतर फार; दुसरें मध्यंतरीं तीन चार मोठमोठ्या नद्या, व विंध्याद्रि व सातपुडा हे प्रचंड व भयंकर पर्वत व निबिड अरण्यें येतात. दुसरें- पद्मावतीच्या राजाचें नांवही दिलेलें नाहीं, यावरून यावेळीं तो राजा कोणी लहानसाच सामंत असावा, व जवळच्या विदर्भ देशावर दुसरा कोणी असाच राजा राज्य करीत असावा असें दिसतें. कुंडिनपुर हें अमुक जागीं होतें असें निश्चित झालेलें नाहीं, पण ग्वाल्हेर व नरवर यांच्याच आसपास तें कोठेंतरी असावें असें दिसतें. ग्वाल्हेरीच्या उत्तरेस सुमारें १५ कोसांवर कुटवार नांवाचें एक फार प्राचीन उजाड शहर आहे. तें व कुंडिनपुर कदाचित् एकच असेल. याबद्दल जनरल कनिंगह्याम साहेबांचे आर्किआलॉजिकल रिपोर्टांतही विशेष माहिती मिळत नाहीं. ]

कामंदकीनें आपल्या शिष्यिणी, अवलोकिता व बुद्धरक्षिता (हीं दोन्हीं नांवें बौद्ध व जैन धर्मांतील आहेत.) यांना आपलें कार्य—मालती व माधव यांचा ठरावाप्रमाणें विवाह—जमवून आणण्याकरितां निरनिराळीं कामें सांगितलीं होतीं; तसेंच मालतीच्या दायीची कन्या व प्रियसखी लवंगिका इलाही सामिल करून घेतलें होतें. साधल्यास माधवाचा प्रिय मित्र मकरंद याचेंही नंदनाची बहीण मदयंतिका इच्याशीं लग्न जुळवावयाचेंही तिनें योजिलें होतें. पण शेवटपर्यंत, निदान योग्य वेळ येईपर्यंत, यांतून कोणालाही तिनें, वर शहाण्या माणसाचें वर्णन केल्याप्रमाणें, आपल्या खऱ्या व पूर्या बेतांचा थांग लागूं द्यावयास नको होतें. या नाटकांत माधव व मालती मुख्य नायक व नायिका, आणि मकरंद व मदयंतिका उपनायक व उपनायिका आहेत. भवभूतीनें या चारी पात्रांची व्यवस्था सारखी पूर्णतेस आणण्याचा यत्न करून, तो यत्न बराच चांगला शेवटासही नेला आहे. पण तसें करण्यांत नाटकांत फारच पाल्हाळ झाला आहे, व यामुळें कांहीं कांहीं

जागीं विरसपणाही आला आहे. पुष्कळ काम चांगलें करण्याचा यत्न केल्यामुळें सर्वच कामाचा उत्तमपणा कमी झाला आहे.

कामंदकीच्या सांगण्याप्रमाणें अवलोकिता माधवाला वरचेवर भूरिवसूच्या वाड्यावरील राजमार्गानें नेत असे. लवंगिकेलाही सूचना मिळालीच होती. त्याप्रमाणें ती माधव त्या रस्तानें जाण्याच्या संधीस मालतीला वाड्याच्या गच्चीवर नेऊन माधव तिच्या नजरेस पडे असें करी. नेहमीं तिच्याशीं त्याच्याविषयीं बोलणें काढून तिनें मालतीला जणों माधवाचें वेड लावून टाकलें होतें. 'आपल्या वाड्यावरून प्रत्यहीं जाणारें तें मनोहर व मदनालाही लाजविणारें माधवाचें रूप, वाड्याच्या गच्चीवरील खिडकींत उभें राहून पहात गेल्यामुळें मालतीच्या शरीरांत व मनांत साक्षात् मदनाचाच जणों संचार होत चालला, व ती फारच विव्हळ होऊं लागली आहे—' ही गोष्ट लवंगिकेनें कामंदकीला कळविली होती. मालतीनें आपलें मन रंजविण्याकरितां माधवाची तसबीर स्वतःच काढली होती; यावरून मुलींना चित्रकला शिकविणें या काळीं गैर मानलें जात नसे, असें दिसतें. निदान ब्राह्मण अमात्याच्या मुलीला उत्तम चित्रकला व काव्यरचना येणें, यांत कांहीं वावगें नाहीं असें भवभूतीला वाटत होतें. ती तसबीर लवंगिकेनें मंदारिका नांवाच्या दासीजवळ दिली. मंदारिका व माधवाचा अनुचर कलहंस यांचा परस्पर मेळ होता. मंदारिकेजवळ माधवाची—आपल्या धन्याची—तसबीर पाहतांच कलहंस सहजच ती माधवाला नेऊन दाखवील, असा लवंगिकेचा अभिप्राय होता; व तो पुढें खराही झाला.

[ आरंभींच हा तसबीरीचा सर्व खुलासेवार वृत्तांत न सांगतां, पुढें कलहंसानें माधवाला ती तसबीर दाखविल्यावर व माधवानें त्याच पाटीवर मालतीची तसबीर काढली इतक्यांत मंदारिकेनें येऊन ती कलहंसाकडून गडबडीनें मागून घेतली, त्याठिकाणीं हा खुलासा तिच्याच तोंडांत एक दोन अधिक वाक्यें घालून केला असता तर याहून विशेष मजा येती. नाटकांतील कथानकाचा बीजस्फोट बुद्ध्या करण्यापेक्षां, व त्यांतही कामंदकीसारख्या मुख्य पात्राच्या हातून करविण्यापेक्षां, तो हळू हळू आपोआप ध्वनित होत गेला तर अधिक मनोरम होतो. ]

अवलोकितेच्या सांगण्यावरून माधव मदनोद्यान नांवाच्या बगीच्यांत मदनोत्सव पाहण्याकरितां ह्मणून सकाळींच गेला होता, व मालतीही तेथें जावयाची होती. तेथें उभयतांची भेट—दृष्टादृष्ट—मोकळेपणानें होण्याचा योग होता. यांतही वरच्या सारखाच प्रकार आहे.

गौणपात्रांनीं आपल्या अकलेनें केलेल्या कामाला पुढें मुख्य—सूत्रधार—पात्रानें 'वा: चांगलें केलें' असें ह्मणावें, यांत मुख्य पात्राकडे गौणपणा येतो. मुख्य पात्राच्या आज्ञेनें व इच्छेप्रमाणें गौण पात्राच्या हातून कामें होत असावीं व त्यांना त्यांतील इंगित फारसें कळूं नये, अशी स्थिति मुद्राराक्षस नाटकांत आढळते. व यामुळेंच त्यांतील मुख्य पात्र चाणक्य याची इतकी थोरवी आहे. तसा प्रकार येथें नाहीं.

अवलोकितेच्या या चतुरपणावरून कामंदकीला सौदामिनीचें स्मरण झालें. येथें तिला पूर्वशिष्या असें ह्मटलें आहे. भूरिवसु, देवरात व कामंदकी एके जागीं विद्याभ्यास करीत असतांना, सौदामिनीसमक्ष अपत्यसंबंधविधीची

प्रतिज्ञा झाली होती, असें पूर्वीं ह्मटलें आहे. तेव्हां सौदामिनी कामंदकीची सहाध्यायिनी किंवा शिष्या होती, याविषयीं शंका आहे. त्या सौदामिनीविषयींही अवलोकितेनेंच कामंदकीला माहिती सांगितली कीं, 'ती श्रीपर्वतावर अलौकिक मंत्रसिद्धिप्रभाव संपादन करून कापालिक व्रत धारण करून रहात आहे, असें स्मशानांतील कराला देवीच्या देवळांत राहिलेल्या अघोरघंट नांवाच्या कापालिकाची अनुचर कपालकुंडला इच्या तोंडून कळलें आहे.' कामंदकीला मंत्रसिद्धि प्राप्त झालेली नव्हती. 'सौदामिनीला अशी सिद्धि प्राप्त झाली असेल–ती तशीच आहे.' असें तिनें ह्मटलें. हीं सर्व नांवें पुढें नाटकांत येणाऱ्या पात्रांचें दिग्दर्शन होण्याकरितांच बुद्धया दिलेलीं आहेत. तसेंच मकरंद व मदयंतिका यांचींही नांवें एवढ्याकरितांच गोवून दिलीं आहेत. 'त्या दोघांचेंही लग्न जमून येईल तर माधवाचें तितकें अधिकच हित झालें ह्मणावयाचें–' असें अवलोकितेनें ह्मणतांच, 'होय, मी त्या कामगारीवर बुद्धरक्षितेची योजना करून ठेवली आहे. पहावें कसें काय होईल तें–' असें ह्मणून माधवाकडील वर्तमान समजून घेऊन मालतीकडे जाण्याकरितां ह्मणून कामंदकी व अवलोकिता दोघीही निघाल्या. 'मालतीचा स्वभाव फारच उदार, साधा व थोर आहे; तिच्याकडे याविषयीं गोष्ट काढणें ती मोठ्या पोक्तपणानें, खुबीदारीनें व सभ्यपणानेंच काढली पाहिजे. व कसेंही करून या परस्परानुरूप जोडप्याच्या विवाहाचा योग जमवून आणून, कुमुदाला शरदृतूंतील चांदण्यापासून जसा आनंद होतो, तसा त्या सुंदरीपासून त्या श्रेष्ठ तरुणाला आनंद होवो व परस्पर अत्यंत अनुरूप अशा गुणांचें संमीलन झाल्यानें विधात्याचें चातुर्य सुफल व मनोहर होवो–' असा कामंदकी विचार करीत होती.

[ येथवर आलेल्या भाषणांत बाष्कळ शब्दप्राचुर्य, व पात्रांस न शोभे असें व व्युत्पन्न मनुष्यासही क्वचितच सामान्य व्यवहारांत उपयोगांत आणतां येण्यासारखें समासयुक्त भाषण आलेलें नाहीं. येथवर गेलेल्या श्लोकांत विशेष अर्थगांभीर्य किंवा स्वारस्य नसलें, तरी ते टाकाऊही नाहींत. भवभूतीच्या सर्व नाटकांतील श्लोकांत ध्वनि फार कमी, किंबहुना मुळींच नसतो ह्मटलें तरी चालेल; पण त्याची वर्णन करण्याची व वर्णित वस्तूचें रेखलेलें चित्र डोळ्यांपुढें उभें करून देण्याची हातोटी चांगली आहे. त्यांत पुनरुक्तिरूप दोषही बराच आढळतो. तरी श्लोक एकंदरींत चांगले असतात. पण गद्य (नाटकांत आलें आहे त्यावरून तरी) अगदीं अप्रस्तुत, निरुपयोगी व रसभंग करणारें आहे, असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं. हेंच गद्य एखाद्या कादंबरींत किंवा चंपूंत असतें तर तितकें दूषणीय झालें नसतें. पण नाटकांत व त्यांतही हव्या त्या प्रसंगीं व हव्या त्या पात्राच्या तोंडांत तें घुसडून दिलें आहे, यावरून भवभूतीला नाटकाचें खरें मर्मच कळलें नव्हतें असें खास ह्मणावें लागतें. याचे मासले पुढें येतीलच, पण थोडासा नमुना कलहंसाचें पुढील पहिलेंच भाषण आहे. भवभूति जाडा विद्वान खरा; त्याच्या हातून महाकाव्यासारखा किंवा कादंबरीसारखा एखादा ग्रंथ सुरेख बनला असता. पण त्याला नाटक करितां येणें शक्यच नव्हतें. ]

मालतीनें काढलेली माधवाची तसबीर घेऊन कलहंस माधवाला शोधीत मदनोद्यानांत आला, व उन्हामुळें थकल्यासारखा होऊन थोडा वेळ

विश्रांति घेत बसला. ' माधव कोठें भेटेल बरें ? त्याला कोठें पहावा बरें ? थोडावेळ विश्रांति घेऊन त्या दोघांनाही शोधावें '—एव्हढाच त्याचा बोलण्याचा भाव आहे. पण भवभूतीनें आपली भाषाशैलि व विद्वत्ता दाखविण्याकरितां त्याच्या तोंडांत—' मकरध्वजाच्या रूपाशीं तुलना झाली असतां ज्याच्या रूपानें त्याचा गर्व घालविला व त्याला खालीं पाहावयाला लाविलें, व ज्याच्यामुळें मालतीच्या हृदयांत मकरध्वजाच्या रूपाचें मुळींच माहात्म्य राहिलें नाहीं, असा माझा धनी माधव हा मला कोठें सांपडेल बरें?—' अशा अर्थाचें समासयुक्त, दूरान्वित व भारदस्त वाक्य घातलें आहे ! कलहंसासारख्या गौण, तिसऱ्या किंवा चौथ्या प्रतीच्या पात्राच्या तोंडीं अशी भाषा घातली म्हणजे, मुख्य पात्राच्या तोंडीं तर सूत्रमय किंवा भाष्यमयच भाषणें असलीं पाहिजेत ! भवभूतीच्या या नाटकांत हा मोठा दोष आहे. हुजरे कुणबिणीपासून तों तहत मुख्य नायकापर्यंत सर्वांच्याच तोंडीं एखाद्या महामहोपाध्यायालाही क्वचितच शोभेल अशी भाषा घातलेली आहे. यामुळें ग्रंथ वाचतांना देखील रसभंग होतो. मग रंगभूमीवर प्रयोगाच्या वेळीं विलक्षण हास्यकारक प्रकार होईल यांत नवल काय ! हा दोष बहुतेक पात्रांच्या प्रत्येक मोठ्याशा भाषणांत आहे. तो गर्ह्य आहे याविषयीं कोणासही शंका येईल असें वाटत नाहीं. सबब याबद्दल पुढें वरचेवर उल्लेख करण्याची आवश्यकता नाहीं.

कलहंस मदनोद्यानांत आल्यावर थोड्याच वेळानें मकरंदही तेथेंच माधवाचा शोध करीत आला. त्याला माधव मदनोद्यानांत गेल्याचें अवलोकितेनें सांगितलें होतें. इतक्यांत मालतीशीं दृष्टादृष्ट व लवंगिकेशीं मालतीसंबंधीं भाषण होऊन व मालतीच्या सख्यांनीं त्याच्याविषयीं आपसांत खाणाखुणा व चेष्टा केलेल्या पाहून मदनदाहानें विव्हल व खिन्न होत्साता येत असलेला माधव मकरंदाच्या दृष्टीस पडला. त्याच्या चर्येवरूनच तो कामी व विव्हळ झाला आहे असें मकरंदानें ताडलें. कारण ' त्याचें गमन सुस्त, दृष्टि शून्य, शरीर अस्ताव्यस्त झालेलें, व श्वास वरचेवर व दीर्घ चाललेला, असें होतें. ' या सर्वांचें कारण काय असावें असा मकरंदानें क्षणमात्र विचार केला; तोंच ' याला मनांत विकार उत्पन्न करणारें असें यौवन प्राप्त झालेलें आहे. व आजकाल कंदर्पाचे ऐन बहारीचे दिवस आहेत, यामुळेंच त्याच्या अंगीं निरनिराळे मदनविकार—मूलक भाव उत्पन्न झाले आहेत. व यामुळें तो अगदीं अधीर झाला आहे; दुसरें काय ?' असें लक्षांत आलें. हें वर्णन फार सुरेख आहे. इतक्या सर्व गोष्टी लक्षांत येण्याजोगें मकरंदाचें वय होतें किंवा कसें याची शंका आहे. तो माधवाहून कांहींसा लहान तर होताच, व म्हणूनच पुढें त्याला मालतीचें सोंग कामंदकीनें देवविलें आहे.

मालतीच्या दृष्टादृष्ट होण्याच्या प्रसंगाविषयींच्या विचारांत गुंग होऊन माधव वेड्यासारखा आपल्याशींच बडबडत होता. ' तिला पाहिल्यापासून तिची मूर्ति त्याच्या अंतःकरणावर कोरल्यासारखी झाली होती. जिकडे तिकडे त्याला तीच दिसे. त्याला कोणाचीच लाज, भीड किंवा मर्यादा वाटेनाशी झाली, व काय करावें तें सुचेना. तिच्या जवळ असतांना त्याला आनंदसागरांत निमग्न झाल्या सारखें वाटत होतें. ' पण आतां विरहाग्नीनें त्याचें अंतःकरण होरपळत होतें. तो शुद्धीवर देखील

नव्हता. मकरंद जवळ आला तरी त्याला भान नव्हतें. मकरंदानें त्याला हाक मारल्यावर तो शुद्धीवर आला. त्यावेळीं दुपारची वेळ होती, व कडक ऊन्ह पडलें होतें, ह्मणून ते दोघेही जवळच कांचनाराच्या छायेंत बसले. इतक्यांत कलहंसानेंही त्या दोघांना पाहिलें व मालतीनें काढलेलें चित्र त्यांना नेऊन दाखवावें असें मनांत आणिलें. पण पुनः 'थोडा वेळ त्यांना विश्रांति घेऊं द्या, मग दाखवूं,' असें ह्मणून तो स्वस्थ बसला. मकरंदाच्या बोलण्यांत कांचन वृक्षाचें बेरेंच लांबलचक समासयुक्त विशेषणें देऊन वर्णन केलें आहे. प्रत्येक वस्तूला अशा रीतीनें महत्त्व देण्याचा यत्न केल्यानें सर्वांचेंच महत्त्व वस्तुतः कमी झालें आहे.

थोडा वेळ बसल्यावर, माधवाच्या चित्तवृत्तींत फारच फरक पडलेला पाहून मकरंदानें त्याला, 'आज नुकतेच आपण मदनोद्यानांतील मदनमहोत्सवाकरितां जमलेल्या अनेक सुंदर स्त्रीजनसमुदायांतून आलों आहों, तेव्हां पंचबाणाच्या तडाक्यांत आपलें अंतःकरण सांपडलें, असें तर नाहींना?' ह्मणून विचारलें. तेव्हां माधवानें लाजून मान खालीं घातली. हें पाहून 'अरे, अशी खालीं मान कां घातलीस? यांत छिपवाछिपवी कशाला, काय असेल तें सांग. हा मनसिज काम मोठा प्रबल आहे. रजोगुणी व तमोगुणी सर्व प्राणिमात्रचसे काय पण प्रत्यक्ष सृष्ट्युत्पन्नकर्ता ब्रह्मदेव किंवा खुद्द परमेश्वर देखील त्याच्या सपाट्यांतून सुटला नाहीं, मग आपली कथा काय?' असा मकरंदानें त्याला धीर दिला. तेव्हां माधवानें त्याला त्या दिवशीं घडलेली सर्व हकीकत आरंभापासून सांगितली. तो ह्मणाला—'मकरंदा, अवलोकितेनें सांगितल्यावरून मलाही कौतुक वाटलें व मी कामदेवायतनांत गेलों. तेथें एका सुंदर, गोंडस व प्रफुल्लित अशा बकुळीच्या झाडाखालीं इकडे तिकडे पहात उभा राहिलों—(येथें बकुळ वृक्षाचें वर्णन चांगलें पण अप्रस्तुत आहे)—त्या झाडाखालीं पुष्कळशीं बकुळीचीं फुलें पडलीं होतीं. तीं वेंचून त्यांची मी एक सुंदर माला तयार करीत होतों. इतक्यांत त्या देवालयाच्या गाभाऱ्यांतून एक अप्रतिम सुंदर, उत्तम वस्त्रालंकार धारण केलेली, अतिशय मनोहर व कुलीन कुमारिका बऱ्याचशा सखीजनांसह बाहेर पडली. ती केवळ सर्व रमणीयवस्तुमात्राची पुतळी व सौंदर्याच्या साराचेंही सार अशी असून तिला उत्पन्न करण्याचें काम स्वतः मदनानें केलें असावें, व तिला खरोखर इंदु, सुधामृणाल व ज्योत्स्ना इत्यादिकांपासूनच त्यानें घडली असावी, असें तिला पाहतांच कोणालाही वाटलें असतें. तिच्या सख्या बकुलपुष्पें वेंचण्याच्या निमित्तानें तिला मी होतों त्या बकुल वृक्षाकडेच घेऊन आल्या. तिला पाहतांच, जणों पुष्कळ दिवसांचाच तिचा माझा पूर्वजन्मींचा सहवास असावा अशा रीतीनें एकदम माझें मन तिच्यावर बसलें, व माझ्या अंतःकरणाची वृत्ति चमत्कारिक झाली. सेवक व सखीजनांच्या सांगण्यावरून ती आपली कशीतरी पुष्पावचयक्रिया करीत होती, असें दिसलें; तिचें सर्वांग म्लान व चुरडलेल्या कमलमृणालासारखें, तरी पण मनोहर दिसत होतें; व तिचें मुख व कपोल पूर्ण व निष्कलंक चंद्रबिंबाप्रमाणें व नूतन कापलेल्याच हस्तिदंताप्रमाणें सुंदर दिसत होते. तिला पाहतांक्षणींच माझ्या नेत्रांत अमृतांजनशलाका फिरविल्यासारखें झालें व मला अत्यंत आनंद वाटला. लोहचुंबकमणी लोखंडाला आकर्षण करितो तद्वत् ति-

नें माझें अंतःकरण आपल्याकडे ओढून घेतलें. माझें मन वेड्यासारखें कांहीं एक हेतु नसतां तिच्यावर आसक्त झालें आहे. याच्यापासून एकसारखा मानसिक संताप व अनेक महासंकटें मात्र उत्पन्न होणार, दुसरें काय ? प्राणिमात्राचें बरेंवाईट केवळ भवितव्यतेवर अवलंबून आहे.'

हें ऐकून मकरंद ह्मणतो–'गड्या माधवा, स्नेहाला कांहीं कारण पाहिजे लागतें, हें ह्मणणेंच मुळीं चमत्कारिक व विरुद्ध आहे. अरे, लोकांच्या मनांत स्नेह उत्पन्न होतो त्याला कांहींतरी अंतर्वर्ती न समजणारा असाच हेतु असतो. प्रीतीला बाह्य उपाधींची आवश्यकता मुळींच असत नाहीं. सूर्याला पाहतांच सूर्यकमल विकसित होतें, व हिमरश्मी चंद्र उगवतांच चंद्रकांताला पाझर फुटतो, हें तूं पहात नाहींस का ? बरें, पण पुढें काय झालें?' यावर माधव ह्मणाला, "पुढें तिच्या सख्यांनीं माझ्याकडे नेत्रसंकेत करून 'तोच हा' असें तिला सांगितलें. व त्या आपसांत कांहीं ओळखीच्या अशा नेत्रकटाक्षांनीं खुणा करूं लागल्या. व मोठ्या ऐटीनें, थाटानें व मुरक्यानें मागें वळल्यासारखें करून त्यांनीं मजकडे बोटें करून हंसत हंसत चतुरपणानें तिला ह्मटलें 'ताईसाहेब, मोठी गंमत झाली. हें पहा किनई, इथेंच आपलें ह्मणे कोणाचेंसें कोणसें उभें आहे.' दासीजनाच्या परत वळून पाहण्याचें अनावश्यक पण बरेंच सुरेख वर्णन दिलें आहे.

हें ऐकून, यांची परस्पर ओळख व पूर्वींच पुष्कळशी प्रीति जमलेली आहे, असें मकरंदाच्या तेव्हांच लक्षांत आलें, व याचें त्याला बरेंच आश्चर्य वाटलें. इतक्यांत कलहंस त्याच्या थोडासा जवळ आला, पण त्यांच्या आपसांत, बायकांविषयीं, प्रेमानें गोष्टी चालल्या आहेत असें पाहून तो स्वस्थ ऐकत उभा राहिला.

[ अशा रीतीनें एक पात्र व्यर्थ रंगभूमीवर तमासगिराप्रमाणें उभें करून ठेवणें ठीक नाहीं. प्रत्येक पात्र होईल तेथवर अवश्य असेल त्याचवेळीं व तेव्हढ्याचपुरतें रंगभूमीवर प्रेक्षकांपुढें असावें. कलहंसाला आरंभापासून प्रेक्षकांपुढें आणून उभा केला आहे, त्यापेक्षां चित्रफलक दाखविण्याच्या किंचित् पूर्वीं, मालतीवरच माधवाचें मन बसलें आहे इतकें त्याच्या लक्षांत येण्याच्या बेतानें–त्याला पुढें आणला असता तर त्यापासून कांहीं अडचण पडली नसती. ]

माधव पुढें बोलला, 'हे सख्यांचे शब्द ऐकतांच त्या सुंदरीनें मान वळवून मजकडे वांकड्या दृष्टीनें बरेंच वेळां पाहिलें. त्यावेळीं तिच्या चेहऱ्यावरून तिची चित्तवृत्ति फारच विलक्षण, अधीर, मदनातुर, मनोरम, पण केवळ अवर्णनीय अशी झाली होती. मजकडे तिनें पाहिलें त्यावेळीं तिचे नेत्र कांहींसे उघडलेले, पण माझी दृष्टादृष्ट होतांच झांकलेले होत असत. भिवया वर चढलेल्या व अत्यंत शोभिवंत, आणि बाव्हल्या पाणीदार व किंचित् आकुंचित दिसत होत्या. नेत्रप्रांत कांहींसे विस्तृत झालेले होते व पापण्या क्षणोक्षणीं हालत होत्या. अशा अगणित दृष्टिपातांची मजवर जणो वृष्टि झाली. तसेंच त्या कमलनयनेच्या अलसवलित, मुग्ध, स्निग्ध, मंद, चंचल आणि स्तब्ध नेत्रकटाक्षांनीं माझें दीन हृदय जणों भिन्न व विदीर्ण, पिळून टाकल्यासारखें किंवा उखडून टाकल्यासारखें झालें. अशा रीतीनें ती मजकडे पहात असतांना मी तिच्या उघड

दिसणाऱ्या व सहेतुक लहरसांत जणों निमग्न होऊन गेलों, व आनंदसागरांत बुडूं लागलों. तरी आपली ती स्थिति कोणाच्या लक्षांत येऊं नये ह्मणून बकुलपुष्पांची माला गुंफण्याची थोडोशी राहिली होती ती मी कशीतरी पुरी केली. नंतर तिच्या बरोबरचे सेवक, शिपाई, प्यादे, स्वार, भालदार वगैरे लोक आल्यावर ती आपल्या सख्यांसह एका हत्तिणीवर बसून नगरमार्गानें निघून गेली. जातां जातां तिनें वरचेवर मान वळवून मागें माझ्याकडे पाहिलें, व आपल्या अमृतमय व विषमय अशा नेत्र-कटाक्षांचा माझ्या अंतःकरणावर गाढ प्रहार केला. तेव्हांपासून, माझ्या मनामध्यें एक विलक्षण विकार उत्पन्न झाला आहे. तो कसा आहे याचें निदान होत नाहीं; त्याचें वर्णन होऊं शकत नाहीं; या जन्मांत पूर्वी कधीं तशा विकाराचा मला अनुभव घडलेला नाहीं; माझा विवेक पार नाहींसा झाला आहे; व मला मोठा व गहन मोह उत्पन्न झाला आहे. माझें अंतःकरण जड व सुन्न झालें आहे, व त्या-पासून मला अत्यंत ताप होत आहे. तसेंच मला समोर असलेला पदार्थही नीट ओळखतां येत नाहीं. ओळखीच्या पदार्थाविषयीं भलताच भ्रम होतो. सरोवराच्या थंडगार जलानें किंवा चंद्राकडे पाहूनही मला शांतता वाटत नाहीं. मन वेड्यासारखें भटकतें, व कांहीं तरी भलतेंच रूप दिसूं लागतें.'

हें सर्व ऐकून, 'हा सर्व प्रकार होण्याचें कारण मालतीच असेल का ?' असें कलहंसाला वाटलें.

इतक्या थरावर गोष्ट गेली तेव्हां आतां माधवाला आपण—'छेः हा भलताच नाद सोडून दे. वेड्यासारखा मोहपाशांत काय पडतोस ? आपली बुद्धि व विचार जागृत ठेव, त्यांना मलिन होऊं देऊं नको—' असा उपदेश करून पहावा किंवा कसें, असें मकरंदाला वाटलें. 'पण त्याचा कांहीं उपयोग नाहीं, कारण कामानें त्याच्या मनावर पूर्ण पगडा बसविला आहे व त्याच्या अंगीं नवयौवन आलेलें आहे. आपलें बोलणें व्यर्थ जाणार—' अशी त्याची खात्री झाली. व त्यानें त्याला 'ती कोणाची कोण हें कांहीं कळलें का ?' ह्मणून विचारिलें. त्यावर माधव ह्मणाला 'मित्रा, ऐक. ती हत्तिणीवर बसावयास गेली, इतक्यांत तिच्या पुष्कळशा दासींतून एक दासी मागें राहिली व त्या बकुलवृक्षाखालीं पडलेलीं फुलें वेंचण्याच्या निमित्तानें खालीं वांकून नमस्कार करून कुसुम—मालेच्या मिषानें मला ह्मणाली, 'हे महाभागा ! हा सुश्लिष्ट गुणामुळें आपला सुमनांचा संनिवेश फारच रमणीय झाला आहे. याचें आमच्या धनीसाहिबांच्या कन्येला मोठें कौतुक वाटलें आहे. तिला नवीन नवीन पुष्परचना पाहण्याचा विचित्र नाद आहे—तिच्या अंगीं आपल्याला पाहून कुसुमबाणाचा विचित्र व अभिनव व्यापार होऊं लागला आहे. या-करितां आपल्या चातुर्याची कृतार्थता होवो, ही रचना निर्माण करणाऱ्या विधात्याची नि-र्माणरमणीयता सुफल होवो, व त्याला आम-च्या धन्याच्या कन्येचें कंठावलंबनरूपी माहा-त्म्य व वैभव प्राप्त होवो.'

[ या लवंगिकेच्या भाषणाच्या अनुवादांत, दोन अर्थ—एक बकुलमालापर, व दुसरा स्वतः माधव व मालती यांच्या मनांतील भावांविषयीं-असे फारच सुरेख साधलेले आहेत. मूळ संस्कृ-तांत द्व्यर्थी शब्द घालण्याची सोय आहे, ती सोय मराठींत साधणें फारच कठिण आहे.

एका हिशेबीं, अशा ठिकाणीं कवीच्या खऱ्या काव्यरचनाचातुर्याची बरीच परीक्षा होते. ]

या दासीच्या बोलण्याचें मकरंदालाही अर्थांतच मोठें कौतुक वाटलें.

'नंतर मीं तिला विचारल्यावरून तिनें सांगितलें कीं, ती सुंदर कुमारिका अमात्य भूरिवसूची कन्या, तिचें नांव मालती; व मी तिच्या दायीची मुलगी, माझें नांव लवंगिका.'

मालती हें नांव कानीं पडतांच कलहंसाला अतिशय आनंद झाला; व माधवाचें मन मालतीवरच बसलें आहे असें पाहून, आपल्या मनांत होती तीच गोष्ट चतुर अशा मदनानें घडवून आणिली, असें त्याला वाटलें.

मालतीचें नांव ऐकून, कामंदकी वरचेवर मालती, मालती, असें मोठ्या आनंदानें नांव घेत असे, त्याचें मकरंदाला स्मरण झालें. 'माधवाचें मन भूरिवसूच्या कन्येवर बसलें असून परस्पर प्रेम जमलें यांत माधवाचा मोठाच मान झाला यांत शंका नाहीं; तरी राजानें नंदनाकरितां तिच्याविषयीं मागणी केली आहे अशी लोकवार्ता आहे, तेव्हां कसें होईल ?' अशी त्याच्या मनांत शंका आलीसें दिसतें. पण त्याच्या त्या बोलण्याकडे माधवानें फारसें लक्ष दिलें नाहीं. हें मकरंदाचें भाषण निदान स्वगत असावें-कारण वास्तविकपणें ही गोष्ट यावेळीं मकरंदाच्या तोंडांतून येथें काढविण्याचें कारण काय़सें कळत नाहीं. या बोलण्याचा पुढें माधवानें कोठें उपयोग केल्याचेंही आढळत नाहीं. तो ह्मणाला, " तिनें सांगितल्यावरून मी ती बकुळमाला आपल्या कंठांतून काढून तिच्याजवळ दिली. मी मालतीकडे पहात असल्यामुळें त्या माळेचा एकभाग नीटसा गुंफलेला नव्हता. तरी ती तिनें 'मोठा प्रसाद मिळाला,' असें ह्मणून घेतली, व ती यात्रेच्या गर्दींत निघून गेली. ती दिसेनाशी झाल्यावर मी हा इकडे आलों."

हें सर्व ऐकून मकरंद ह्मणाला, 'माधवा, मालतीचेंही प्रेम तुजवर असल्याचें व्यक्त झालें, हें आतां जमतें; तिच्या तोंडावर व गालांवर पांडुरता आली होती ती मदनविकारामुळेंच, व तो मदनविकार तुजमुळेंच तिला झाला होता यांत शंका नाहीं. पण तिनें तुला पूर्वीं कोठें पाहिलें असावें, हें कांहीं लक्षांत येत नाहीं. आणि अशा थोर व कुलीन कुमारिका एकावर मन ठेवून दुसऱ्यावर प्रेमकटाक्ष फेंकतील असें कधीं होणार नाहीं. तसेंच तिच्या सख्यांनीं परस्पर नेत्रसंकेत करून कोणाचा कोणसा आहे असें ह्मटलें. यावरून तिचें पूर्वींपासून तुजवर प्रेम होतें असें दिसतें. त्याचप्रमाणें धात्रेयिकेचें चतुर भाषण आणि '—तितक्यांत एकदम कलहंसानें पुढें येऊन 'ही तसबीर' असें ह्मटलें. ती तसबीर दोघांनींही पाहिली. [ हा कलहंसाचा प्रवेश फारच सुरेख साधला आहे. मकरंदाच्या मनांत थोडीशी शंका होती, ती मालतीनें काढलेली माधवाची तसबीर पाहतांच नाहींशी होण्याचें उत्तम साधन आहे. ] माधवाची तसबीर पाहून मकरंदानें कलहंसाला, 'ती कोणी काढली' ह्मणून विचारिलें. तेव्हां 'जिनें त्याचें चित्त हरण केलें तिनेंच' असें त्यानें सांगितलें. त्यावर 'मालतीनें ?' असें पुनः ह्मणतां, 'होय' असें त्यानें सांगितलें. हें ऐकून माधवाला आनंद वाटलाच व त्यानें मकरंदाला, 'गड्या, तुझा तर्क खरा झाला' असें ह्मटलें. मकरंदानें कलहंसाला, 'पण ही तसबीर तुझ्या हातीं कशी आली' असें विचारिलें. तेव्हां तो ह्मणाला, 'मला मंदारिकेकडून मिळाली, व तिच्या-

जवळ लवंगिकेनें दिली होती. आपल्या मनाची करमणुक करण्याकरितां मालतीनें गमतीनें ती काढली होती, असें मंदारिका ह्मणत होती.'

मकरंद ह्मणाला, 'माधवा आतां मुळींच शंका राहिली नाहीं. तूं कांहीं चिंता करूं नकोस. धैर्य धर; तुझ्या नेत्रकमलांना आनंद देणाऱ्या त्या कौमुदीच्या मनोरथांचा पूर्ण विसावा तूंच आहेस. तुम्हां उभयतांचा समागम व्हावा ही गोष्ट विधि व मदन या दोघांनाही संमत आहे, त्याअर्थी तुमचा योग जमून येणार, यांत अगदीं संशय नाहीं. तुला इतकें विवश करून टाकणारें मालतीचें स्वरूपही तसेंच अप्रतिम प्रेक्षणीय असलें पाहिजे. तर तिची तसबीर काढ पाहूं.'

मकरंदाचा आग्रह पाहून माधवानें–'बरें, तूं ह्मणतोस तसेंच कां होईना. आण ती पाटी आणि चित्र काढण्याचें सामान.' असें बोलून मकरंदानें दिलेली ती पाटी सामान घेऊन त्यानें मालतीची तसबीर काढण्याला आरंभ केला. (चित्रफलकाबरोबरच कलहंस बुद्ध्या चित्र काढण्याचें सामानही घेऊन गेला होता असें येथें गृहित धरलें पाहिजे.) व चित्र काढतां काढतां ह्मणाला, 'मित्रा मकरंदा, वरचेवर माझी दृष्टि अश्रुप्रवाहामुळें मंद होते; तिचें रूप ध्यानांत आणण्याचा विचार करीत असतां मन सुन्न होतें; सर्व गात्रें आणि हात जड होऊन वरचेवर कंप सुटल्यामुळें व डवडवून घाम आल्यामुळें हातांचीं बोटें नीट चालत नाहींत–त्यांच्यांत कलम ठरत नाहीं, यामुळें चित्र काढण्याला वेळ फार लागतो, त्याला माझा कांहीं इलाज नाहीं. तरी कसें तरी काढतों आहे'–असें ह्मणून पुष्कळ वेळानें त्यानें तिची तसबीर काढून दाखविली. तिच्या खालीं एक नवीन श्लोक रचून लिहिला होता. मकरंदानें तसबीर पाहून ह्मटलें.–'तुझें मन बसलें तें यथार्थ आहे वाः इतक्यांत एक श्लोकही रचून लिहिला आहे!' "या जगांत नूतन चंद्रकला वगैरे मन हरण करणारे व स्वभावतःच मधुर असे अनेक निरनिराळे भाव आहेत. परंतु ही नेत्रांना आनंद देणारी चंद्रिका माझ्या दृष्टीस पडली तोच माझ्या सर्व जन्मांत मी अप्रतिम व एकच महोत्सव समजतों."



इतक्यांत मंदारिका गडबडीनें कलहंसाला शोधीत आली व त्याला पाहून 'वाः रे वाः कलहंसा–बराच आहेस–तुझीं पावलें ओळखीत मीं तुला येऊन गांठलें.' (भर दुपारीं यात्रेच्या गडबडींत तिला रस्त्यावर त्याचीं पावलें कशीं दिसलीं व ओळखतां आलीं हें आश्चर्यच आहे!) असें बोलते तोंच माधव व मकरंद यांना पाहून ती लज्जित झाली व, 'अगई, आणि हेही दोघ महाभाग इथेंच आहेत की!' असें ह्मणाली. दोघांनींही तिला बैस ह्मटलें. तिनें कलहंसाजवळ चित्रफलक मागितला, तो त्यानें घेऊन तिला दिला. त्याच्यावर मालतीचें चित्र काढलें होतें तें पाहून तिनें, 'हें कोणी व कशाकरितां काढलें,' असें विचारिलें. त्यावर कलहंसानें 'ज्याला–ज्याकरितां–मालतीनें काढलें त्यानेंच' असें सांगितलें. तेव्हां, 'ब्रह्मदेवानें खरोखरच आपलें शहाणपण व चातुर्य दाखविलें, फार चांगलें झालें–' असें ती ह्मणाली. मकरंदानें, 'याबद्दल कलहंस सांगतो तसें खरेंच कां?' ह्मणून विचारतां तिनें 'होय, खरेंच' असें सांगितलें. तेव्हां मकरंद ह्मणाला, 'पण मालतीनें माधवाला पूर्वीं कोठें केव्हां पाहिलें होतें?' त्यावर ती ह्मणाली, 'लवंगिका ह्मणत होती कीं वाड्याच्या गच्चीवरील खिडक्यांमधून.' 'आपण

बहुधा अमात्याच्या वाड्यावरील राजमार्गानेंच जातों येतों, तेंव्हां हें ठीक जुळतें, ' असें मकरंदाच्या लक्षांत आलें. नंतर मंदारिका हें आनंदाचें वर्तमान लवंगिकेला सांगण्याकरितां त्यांना विचारून निघून गेली.

इतकें सर्व होईतों ऐन मध्यान्ह होऊन गेली होती. ऊन्हही प्रखर पडलें होतें, ह्मणून माधव व मकरंद परत घरीं येण्यास निघाले. माधवाच्या मनांत मालतीचें रूप सारखें घोळत होतें. तो ह्मणाला, ' यावेळीं त्या मुग्ध, सुंदर व मनोहर कुमारिकेच्या मुखावर घर्मजल आल्यामुळें तिच्या परिजनांनीं सकाळीं वेणीफणी व शृंगार करवितांनां कपोलावर व उरस्थलावर चित्रविचित्र कुंकुमांनीं पत्रावलि काढिलेल्या असतील; तें कुंकुम ओघळून अस्ताव्यस्त झालें असेल; तसेंच हे कुंद व कराल वगैरेच्या नुकत्याच उमलणाऱ्या फुलांवरून येणाऱ्या व त्यांच्या गाढ परिमळानें घन व शीत होणाऱ्या व कामाचें साहाय्य करणाऱ्या शीतल वायो! तूं त्या किंचित् चंचल नेत्रयुक्त व नतांगी प्रियेच्या अंगाला स्पर्श करून नंतर माझ्या प्रत्येक अवयवाला स्पर्श कर.'

माधवाची ही विव्हल स्थिति पाहून मकरंदाला मोठीच काळजी पडली, व तो आपल्याशीं ह्मणाला, 'हा मदनज्वर अतिशय सपाट्यानें या माधवावर एकदम हल्ला करीत आहे. एखाद्या हत्तीच्या छाव्याला एकाएकीं दारुणज्वर यावा तशांतली याची स्थिति झाली आहे. यांतून पार पाडणार कायती भगवती कामंदकी'—तिला शरण गेलें पाहिजे असें त्याला वाटलें.

माधवाच्या मनांत हेच विचार घोळत होते. ' इकडे तिकडे, पुढें मागें, आंत बाहेर व चोंहीकडे, किंचित विकसलेलें मुग्ध सुवर्णकमलाप्रमाणें भासणारें आपलें मुख मागें वळवून मोठ्या आसक्त दृष्टीनें मालती आपल्याकडेच पहात आहे, ' असें त्याला भासत होतें. तो मकरंदाला ह्मणाला, ' मित्रा, हा कोणी प्रखर व हाणून पाडणारा देहदाह माझ्या अंगांत संचार करून माझ्या सर्व इंद्रियांची चेतना नाहींशी करितो आहे. सर्व शरीराचा वरचेवर दाह होत आहे. आंतून अंतःकरणाला आग लागली आहे, तरी तें तन्मय होऊन गेलें आहे. '

[ कलहंसाच्या प्रवेशापासून माधवानें मकरंदाला मदनोद्यानांत नुकताच घडलेला मालतीच्या भेटीचा वृत्तांत सांगितला आहे तेथवरचा सर्व भाग वास्तविकपणें रंगभूमीवर प्रत्यक्ष दाखविण्या जोगा आहे. तो प्रत्यक्ष पाहिल्यानें प्रेक्षकांच्या मनावर जो उत्तम ठसा उमटला असता त्याच्या दशांशही ठसा उमटणें किंवा आनंद वाटणें, त्या प्रसंगाची लांबचलांब कहाणी कितीही काव्यालंकारप्रचुर श्लोकांनीं किंवा गद्यरूपानें सांगितली, तरी होण्याचा संभव नाहीं. भवभूतीनें ही कहाणी बऱ्याच चांगल्या रीतीनें सांगण्याचा प्रयत्न केला आहे. तरी त्याच्या रचनेंत भाषेचा फाजील प्रौढपणा हा दोष आहेच. एखाद्या काव्यांत असें वर्णन शोभलें असतें, पण दृश्य काव्यांत—नाटकांत—अशा वर्णनाचा अर्थातच कंटाळा येतो. माधव बकुलवृक्षाखालीं फुलें वेंचीत उभा असतांना मालती आपल्या सख्यांसह गर्भगृहांतून निघते,—तिला तिच्या सख्या त्याच वृक्षाकडे आणितात,—सख्या आनंदानें कुजबुजतात,—उभयतांची दृष्टादृष्ट होते, व नंतर लवंगिका मागें राहून माधवाला सर्व वृत्तांत सांगते. हे सर्व प्रकार रंगभूमीवर झाले असते तर किती मनोहर झाले असते व खुबीदार वठले असते. कांहीं अंशीं अशाच तऱ्हेचा प्रसंग कालिदासाच्या शाकुंतल

नाटकांत पहिल्याच अंकांत आला आहे. त्याच्याशीं तुलना केल्यानें याची कल्पना सहज होणार आहे. दुष्यंत व शकुंतला यांचीही प्रथम दृष्टादृष्ट तपोवनांत सहजगत्या झाली आहे व शकुंतलेच्या सख्यांनीं उभयतांच्या मनांत तात्कालिक उत्पन्न झालेला विकार जाणून थट्टामस्करीही केली आहे. व शकुंतलेचें सर्व पूर्ववृत्तही सांगितलें आहे. तें सर्व प्रत्यक्ष रंगभूमीवर झालें असल्यानें किती मनोरम वाटतें,याचा अनुभव प्रत्येक सहृदय वाचकास व नाटकप्रयोगप्रेक्षकास आहेच. असें केल्यानें पुढें माधवास मकरंदाला सर्व वृत्त थोडक्यांत सांगण्याला अडचण पडती असें नाहीं. दुष्यंतानेंही सर्व हकीकत विदूषकाला सांगितलीच आहे. पण या त्याच्या सांगण्यांत किती तरी रस व खुबी आहे ! भवभूतीनें हें नाटक रचिलें त्यावेळीं शाकुंतल व विक्रमोर्वशी हीं नाटकें त्यानें नमुन्याकरितां पुढें घेतलीं होतीं, निदान तीं त्यानें नीटपणें वाचलीं होतीं, असें ह्मणण्याला बराच आधार आहे. माधवानें मालतीचें चित्र काढते वेळीं आपल्या मनाच्या व शरीराच्या स्थितीचें वर्णन केलें आहे. तें शाकुंतलाच्या साहाव्या अंकांतील १४ व्या श्लोकावरूनच विस्तृत केलें नाहीं, असें कोण ह्मणेल ? तसेंच पुढें कामंदकीनें शकुंतला व उर्वशी यांचीं उदाहरणें मालतीला दिलेलीं आहेत. तीं तरी शाकुंतल व विक्रमोर्वशी नाटकांवरूनच दिलेलीं असावीं असें ह्मणतां येईल. शाकुंतलासारखें उत्तम दृश्य काव्य पुढें असूनही भवभूतीनें त्याचा योग्य नमुना घेतलेला नाहीं यामुळें त्याच्या नाटकाला तितकी गौणता आलीआहे. अनेक सुसंबद्ध व शेवटीं एकाच मुख्य गोष्टीचे पोषक प्रसंग व्यवस्थित रीतीनें रंगभूमीवर प्रेक्षकांपुढें प्रत्यक्ष आणून, त्यांचें मन नेहमीं उल्लसित व उत्सुक ठेवावें, पुढें काय होणार याविषयीं त्यांच्या मनांत नेहमीं सकौतुक उत्कंठा जागृत ठेवावी, व होईल तेथवर एखादी गोष्ट रंगभूमीवर प्रत्यक्ष दिसेपर्यंत तिचा सुगावा लागूं नये, हें नाटकाचें खरें रहस्य होय. पण भवभूतीचा सर्वच प्रकार याच्या विरुद्ध आहे. एकेका अंकांतच नव्हे तर सर्व नाटकांत पुढें काय काय होणार याबद्दल त्यानें प्रथमच प्रस्तावना करून त्या त्या गोष्टी प्रत्यक्ष दाखविण्याच्या ऐवजीं नुस्तीं दोन दोन पात्रें आणून त्या प्रसंगांचें यथास्थित वर्णन केलें आहे. यामुळें रसपोष न होतां उलट प्रेक्षकांना कंटाळा येतो.

या सर्व विचारांवरून भवभूतीला नाटकाचें खरें रहस्य कळलें नव्हतें, तो केवळ जाडा विद्वान् होता, त्या विद्वत्तेस अनुसरून त्यानें नाटक ह्मणून एक प्रबंध लिहिला, असें ह्मणण्याला हरकत नाहीं असें वाटतें.

मदनोद्यानांत मालती सख्यांसह गेली होती त्या वेळीं कोणाच्याच तोंडावर बुरखा किंवा पडदा होता असें दिसत नाहीं. यावरून त्यावेळीं पडद्याची चाल नव्हती. ती मागाहून पडली असें दिसतें. तसेंच कुमारिका व विवाहित स्त्रिया यांच्या पोषाकांत बराच उघड दिसून येणारा फरक होता. लवंगिकेला माधवानें वारयोषिता असें ह्मटलें आहे. व मंदारिकेचें व कलहंसाचें संधान होतें ही गोष्ट सर्वांना माहित होती. तिचें माधव व मकरंद यांच्या समक्ष कलहंसाशीं भाषण झालें आहे; व त्यांनीं तिला ‘तुझा वल्लभ कलहंस’ असें ह्मटलें आहे. यावरून अशा तऱ्हेच्या सेवक–स्त्रिया, हल्लीं मोठमोठ्या राजे लोकांकडे सुनापोरी नांवाच्या असतात त्याप्रमाणें, संभा-

वित व कुलीन घराण्यांतील कुमारिकांजवळ असण्यांत कांहीं प्रत्यवाय मानला जात नसे. यावरून या काळीं लोकसमाजाच्या नैतिक स्थितीला उतरती कळा लागत चालली होती असें ह्मणतां येतें. हा प्रकार मृच्छकटिकांत आढळत नाहीं. ]

## अंक दुसरा.

या अंकांतील प्रवेशाला आरंभ पहिल्या अंकाच्या दिवशींच सायंकाळच्या सुमारास झालेला आहे. मालती मदनोद्यानांतून परत आली, व लवंगिका मागें राहिली होती. तिची ती मोठ्या उत्सुकतेनें वाट पहात होती. मकरंदानेंही मदनोद्यानांतून परत येतांच माधवाची सर्व हकीकत कामंदकीला येऊन सांगितली होती. परस्पर दृष्टादृष्ट होऊन प्रेम प्रकट झालेलें ऐकून कामंदकीला आपलें काम बरेंच साधलें असें वाटलें, व आतां स्वतः मालतीच्या समाचारास ह्मणून जाऊन निसृष्टार्थ दूतिकल्प, किंवा इच्छित हेतुसाधक प्रस्ताव करण्याची ही उत्तम संधि आहे असें जाणून, तिनें मालती काय करिते आहे हें पाहण्याकरितां अवलोकितेला पाठविलें. ती शोध करून परत आल्यावर त्या दोघीही मालतीकडे गेल्या. इकडे लवंगिका परत येतांच तिला मालतीनें एकांतांत नेऊन माधवाकडील सर्व वृत्तांत विचारला. मालतीचें प्रेम माधवावर बसलें आहे, ही गोष्ट तिच्या घरच्या सर्व नोकर माणसांस ठाऊक झाली होती. तसेंच "राजानें नंदनाकरितां भूरिवसूजवळ मालतीची मागणी केली आहे व त्यानेंही, 'आपल्या कन्येविषयीं महाराज मुखत्यार आहेत' असा संमतीचा जबाब दिला आहे; तेव्हां मालती व माधव यांच्या विवाहाचा योग कसा जमणार ? हें प्रेम केवळ मालतीला आमरणान्त हृदयशल्य होणार-हें कसें जमेल तें जमो-आतां भगवती कामंदकीच येथें आपलें काय शहाणपण व अलौकिक सामर्थ्य दाखवील तें खरें-" असें सेवकजनांला वाटत होतें. हा सर्व प्रकार मालतीच्या दोन दासींच्या तोंडून वदविला आहे, तो चांगला साधला आहे.

मालती व लवंगिका एकांतांत बोलत बसल्या असतांना मालतीनें विचारल्यावरून लवंगिका ह्मणाली, 'नंतर त्या महाभागानें मला ही बकुळीमाला दिली.'-' ती थोडीशी एका बाजूस विस्खलित दिसते, याचें कारण काय ? ' ह्मणून मालतीनें विचारतां,-' याचें कारण तूंच आहेस. तो माला तयार करीत असतां तूं तेथें पोहोंचलीस; तुझ्याकडे पाहून त्याच्या मनाची चलबिचल झाली, व त्यामुळें त्याचें मन माला गुंफण्यांत लागेना. ( येथें लवंगिकेनें माधवाला-' दुर्वाश्यामलांग', 'दुर्वांप्रमाणें सांवळ्या वर्णाचा'-असें ह्मटलें आहे. हें 'माधव' नांवावरून त्याचें श्रीकृष्णाशीं सादृश्य होतें असें दाखविण्याकरितां कदाचित् केलेलें असेल. बाकी सामान्यतः सांवळा रंग फारसा लोकांना पसंत पडतो असें वाटत नाहीं. ) मालती ह्मणते, ' गडे लवंगिके, तूं किनई माझें आपलें कांहींतरी मनाचें समाधान करितेस ! ' लवंगिकेनें उत्तर दिलें, ' यांत समाधान तें काय करायाचें ! तूं त्याच्याकडे प्रेमानें ठुमकत मुरडत, मान वळवून पाहिलेंस, तेव्हां त्याचीही दृष्टि तुझ्याकडे लागलेली होतीच. त्याची चर्या व स्थिति कशी प्रेमविव्हल व आतुर झाली होती तें तुझ्या नाहीं वाटतें लक्षांत आलें ? '

( या भाषणांतील शब्दरचना क्लिष्ट आहे. ) त्यावर मालती आनंदानें व किंचित् असूयेनें ह्मणते, 'पण कां ग, त्यांची तशी स्थिति झालेली दिसत होती ती खरीच प्रेमामुळें झाली होती, कां स्वाभाविकच-सहज पाहणाऱ्याची फसवणूक करणारी होती ?' लवंगिकेनें मालतीचा भाव तेंव्हांच ताडला व तिला तिनें उलट विचारिलें, 'पण कांगे मालती, त्यावेळीं तूं नृत्य व संगीत साधनांशिवायच जणों नाचावयाला व हावभाव करायाला लागली होतीस, ती बुद्ध्या कां स्वभावतःच ?' हें ऐकतांच मालती कांहीं रागानें व प्रेमानें 'बरें बरें, मग पुढें ?' असें बोलली. लवंगिका ह्मणाली, 'नंतर मी परतलें, व यात्रेच्या गर्दीमुळें तो महाभाग दिसेनासा झाला. पुढें येतां येतां मी मंदारिकेकडे गेलें. कारण ती तसबीर मीं सकाळीं तिच्या स्वाधीन केलेली होती. कां ह्मणशील तर माधवाचा अनुचर कलहंस याचें मंदारिकेकडे जाणें येणें आहे. तिनें मला एक मोठें आनंदाचें वर्तमान कळविलें.' हें ऐकून मालतीला वाटलें कीं, कलहंसानें ती तसबीर आपल्या यजमानाला दाखविली असेल—व ती लवंगिकेला मोठ्या उत्सुकतेनें ह्मणाली—'असें कोणचें आनंदाचें वर्तमान ?' लवंगिका ह्मणते, 'कोणचें ? अग हें पहा—आपल्या मदनविव्हल, संतप्त व दुःसह विरहाग्नींत होरपळणाऱ्या मनाचें थोडेंसें शांतवन करण्याकरितां ह्मणून त्यानें काढलेलें हें तुझें चित्र.' ( आपण चोरून काढलेली माधवाची तसबीर, अशा द्वारानें माधवाच्या दृष्टीस पडावी, ही गोष्ट मालतीच्या मनाला पसंत पडणें तिच्या उपजत कुलीनपणाला शोभतें किंवा कसें याचा विचारच आहे. यापेक्षां 'मी सहज मंदारिकेजवळ ती ठेवावयास दिली होती, ती तिच्याजवळून कलहंसानें बळेंच नेऊन माधवाला दाखविली. माधवानें ही तुझी तसबीर काढली आहे पहा.'—इतकेंच लवंगिकेकडून वदविलें असतें, व आपण काढलेली तसबीर माधवाच्या दृष्टीस पडली याबद्दल सहजगत्या मालतीस वाटणारी लज्जा व त्रास—बाह्यात्कारें कां होईना—ती व्यक्त करून दाखविणार तोंच माधवानें काढलेली आपली तसबीर पाहून तिला आनंद झाला व ती यासंबंधें कांहींच बोलली नाहीं असें दाखविलें असतें तर बरें झालें असतें, असें वाटतें; पण याबद्दल मतभेद होण्याचा संभव आहे. )

चित्र पाहतांच मालतीच्या मनाची अगदीं खात्री झाली. व, 'इतकी स्थिति असूनही मी त्यांची सर्व कृति फसवणुकीची अशी समजत होतें' असें तिला वाटलें. इतक्यांत आपल्या चित्राखालीं लिहिलेला श्लोकही तिच्या दृष्टीस पडला. तो तिनें वाचून पाहिला. त्यावरून तर तिला अधिकच आनंद झाला, व ती ह्मणाली, 'हे महाभागा, आपली ही रचना खरोखर आपल्या अनुरूपच आहे. आपलें दर्शन तत्काल परमानंद देणारें, पण परिणामीं दीर्घकाल दारूण संताप देणारें आहे. ज्या मुली आपल्याला मुळींच पहात नाहींत, किंवा पाहिल्यावरही ज्यांना आपलें अंतःकरण स्वाधीन ठेवितां येतें, त्या खरोखर धन्य होत.' हें ऐकून हिला अद्यापि माधवाविषयीं विश्वास आला नाहीं असें समजून लवंगिका ह्मणाली, 'अगे मालती, ज्याच्याकरितां तुझें अंतःकरण तुटून पडलेल्या अशोकाच्या पानाप्रमाणें चलबिचल व खिन्न झालें आहे, व जाईचीं ताजीं फुलें सुद्धां सोसवत नाहींत इतकी तूं खिन्न झाली आहेस, त्याचीही भगवान् मन्मथानें तुजसारखीच

असह्य अवस्था करून टाकिलेली आहे. ' मालती ह्मणाली, ' लवंगिके, तो महाभाग खुशाल असो ह्मणजे झालें. माझें ह्मणून समाधान कसें तें मुळींच व्हावयाचें नाहीं. त्यांतूनही आतां माझ्या अंगांत हा प्रेमरूपी वन्ही विषाप्रमाणें एकसारखा संचार करीत आहे. तो निर्धूम व रखरखित निखाऱ्याप्रमाणें माझ्या प्रत्येक अंगाचा प्रखर ज्वराप्रमाणें चोहींकडून दाह करीत आहे. तात, माता किंवा तूं–कोणाच्याही हातून आतां माझें रक्षण होण्यासारखें नाहीं. '

मालतीच्या मनाची ही चमत्कारिक स्थिति पाहून लवंगिकेला कसेंचसें वाटलें, व या वेळीं प्रिय माधवाच्या समागमाविषयीं कांहीं तरी उपाय करण्याचें तिला सुचविलें तर बहुधा रुचणार नाहीं असें नाहीं, असें जाणून ती ह्मणाली–' मालती, तूं ह्मणतेस तेंच खरें. सज्जनांचे समागम समक्ष सुखदायक, पण परोक्ष अत्यंत दुस्सह विरहदुःख देणारे असतात. ज्याला नुसतें खिडकींतून, क्षणमात्र पाहूनच, पौर्णिमेचा चंद्र पाहतांच प्रखर अग्नीजवळ उभो राहिल्याप्रमाणें तुझ्या शरीराची स्थिति झाली, व निर्दय अशा मदनाच्या व्यथेमुळें तुझे प्राण राहतात कीं जातात असें झालें, त्यालाच पुष्कळ वेळ नीट पाहण्यास मिळालें व मिळत आहे, तरी आज तुला अधिकच संताप होत आहे. तेव्हां याला काय ह्मणावें बरें ? प्रिये गडे मालती, मला तर बाई वाटतें—असें जें दुर्लभ वाटणारें मनोरथाचें फळ आहे तेंच या जीवलोकांत श्लाघनीय होय. अशा या प्रचंड प्रेमानुभावाला पात्र व सदृश अशा त्या महानुभाव प्रियाच्या समागमाविषयीं यत्न करावा हें बरें, असें मला वाटतें.'

हे ऐकतांच लवंगिकेच्या बोलण्याचा भाव मालतीच्या लक्षांत आला. आपण स्वतः होऊन माधवाचा समागम होण्याचा यत्न करावा असें तिचें मत आहे, असें तिला कळलें. पण ही गोष्ट आपल्यासारख्या थोरा मोठ्यांच्या व कुलीन कुमारिकांना अत्यंत अयोग्य होय अशी तिची खात्री होती. ह्मणून तिनें लवंगिकेला झिडकारिलें. ती ह्मणाली, ' लवंगिके, तुला या मालतीचें जीवित मात्र प्रिय आहे–ह्मणूनच तूं या साहसाचा मजपुढें उपन्यास केलास. छेः छेः, वरचेवर अशा दुर्लभ मनोरथाविषयीं इच्छा धरून आपल्या हृदयाला अतिशय संताप होत असतांना, व पुढें याच्यांत परिणामीं मजकडे दांडगेपणा व लघुता येणार असें पक्कें जाणत असूनही, मी याचा नाद सोडीत नाहीं. तेव्हां यांत मजकडेच दोष आहे, तुला काय बोल लावावा ' ? हें बोलतांना तिला रडें आलें व अत्यंत खेद झाला. ती पुन्हा ह्मणाली, ' हें पहा लवंगिके, प्रतिरात्रीं वाटेल तर पौर्णिमेचा पूर्ण चंद्रमा गगनमंडळीं संचार करो व मदन मला वाटेल तसा जाळून पोळून त्रास देवो. तो फार तर शेवटीं माझा प्राण घेईल, याहून अधिक तें काय करणार ? मी तुला सांगून ठेवतें, मला माझा थोर पिता व सत्कुलोत्पन्न माता, व माझें निर्मल कुल हींच खरोखर प्रिय आहेत. हा जन, माधव, किंवा प्रत्यक्ष माझे प्राण यांची देखील मला त्यांच्यापुढें पर्वा नाहीं. ' हें मालतीचें कळवळ्याचें व निकराचें भाषण ऐकून व तिची स्थिति पाहून लवंगिका निरुपाय झाली. तिला पुढें काय बोलावें, व काय उपाय करावा हें सुचेना. ' आतां याला काय उपाय ?'–असा ती मनांत विचार करीत आहे तोंच प्रतिहारीनें अर्धवट आंत येऊन ' भगवती कामंदकी–' असें ह्मटलें. त्यावर दोघींनीं ' काय भगवती ? ' असें ह्मणतांच ' ताईसाहेबांच्या समाचारास आल्या आ-

हेत—' असें कळविलें. तेव्हां 'मग उशीर कां?' असें त्यांनीं ह्मणतांच, प्रतिहारी कामंदकीला आणण्यास गेली—मालतीनें चित्रफलक पदराखालीं झांकून ठेविला—लवंगिकेला ' या वेळीं कामंदकी आली, फार चांगलें झालें ' असें वाटलें. हा सर्व भाग फार चांगला साधला आहे.

[ लवंगिकेनें मालतीला उपाय सुचविला तो तिच्या स्वतःच्या स्थितीस व शिक्षणास—तसेंच कामंदकीसुद्धां सर्व मंडळीच्या मनांत होतें त्याला अनुरूपच होता. पण तिनें जी अयोग्य गोष्ट सुचविली ती मालतीनें तेव्हांच साफ झिडकारिली; व आपल्या हातून कुलीनपणास बट्टा लागेल अशी कोणचीही गोष्ट केव्हांही घडणार नाहीं, त्यांत प्राण गेला तरी पतकरला, असें स्वच्छ सांगितलें. तिनें ह्मटलेला श्लोक चांगला लक्षांत ठेवण्यासारखा आहे. मालतीचें पात्र भवभूतीनें होईल तेथवर फारच सुरेख साधलें आहे. तिच्या अंगीं कुलीनपणा, बालपणास अनुरूप अशी लज्जा, भीति, उत्सुकता, उत्कंठा, आतुरता, निष्कपटप्रेम व सरलता, व त्यांतल्यात्यांत स्वकुलाविषयीं योग्य अभिमान व कोणचीही अयोग्य गोष्ट आपल्या हातून न घडावी याविषयीं उत्कट इच्छा, तसेंच अनुभव कमी असल्यामुळें वडील पोक्त माणसें सांगतील त्याच्यावर साहजिक विश्वास, इत्यादि गुण फारच चांगल्या रीतीनें वठविले आहेत. तिच्या तोंडांतील भाषणांत दूरान्वित समासयुक्त वाक्यें इतरांच्या मानानें बरींच कमी घातलेलीं आहेत.]

कामंदकी अवलोकितेसह मालतीच्या समाचारास ह्मणून आली. तिला आजवरची सर्व हकीकत कळलेलीच होती. माधवाची व तिची दृष्टादृष्ट झालेली असून त्यानें काढलेली तसबीर मालतीजवळ पोहोंचलेली आहे, व मालतीच्या मनांत आज माधवाविषयीं अतिशयच अनुराग उत्पन्न झालेला असेल; अशा वेळीं जाऊन आपण मोठ्या चतुराईनें त्रयस्थपणानें गोष्ट काढून तिचें मन वळेल असें करावें, अशा उद्देशानेंच ती निघाली होती. भूरिवसूनें राजाच्या मागणीला, ' आपल्या कन्येविषयीं महाराज मुखत्यार आहेत ' असा जबाब दिला होता, तो तिला कळला होता. तें उत्तर फार चोख व कोणालाही नांव ठेवितां येऊं नये असें आहे, तें देण्यांत भूरिवसूनें मोठेंच चातुर्य दाखविलें, ह्मणून कामंदकीनें त्याची तारीफ केली आहे. वास्तविकपणें हा दुटप्पी जबाब आहे. याच्यांत ' आपल्या ' या शब्दावर जोर आहे. पण राजा प्रबल असला तर या दुटप्पीपणाचा कांहीं उपयोग नाहीं, तो आपल्या मतलबाचाच अर्थ करील; व प्रबल नसला तर असा लपंडाव करण्याची आवश्यकता नव्हती. मालती व माधव यांचा विवाह चोरून घडवून आणिल्यावर तरी पुढें राजाची समजूत कशी पाडणार याचा कामंदकी किंवा भूरिवसु यांच्या वर्तनांत कांहींच विचार केल्याचें दिसत नाहीं. सर्वच दैवावर हवाला ठेवलेला आहे, हें योग्य नाहीं.

कामंदकी येतां येतां आपल्याशीं ह्मणते—"भूरिवसूनें मोठा चतुराईचा जबाब दिला, त्यांत त्याला इहपरलोकीं दोष मुळींच लागणार नाहीं. [ खरें खोटें बोलणें कायतें वाचिक आहे, अर्थाशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं, अशी त्यावेळीं नीति ठरली होती असें दिसतें—व तीच समजूत आजपर्यंत तशीच कायम नाहीं असें कोण ह्मणेल ? यापासून देशाचें किती तरी अकल्याण झालें आहे.] आज मदनोद्यानांत घडलेल्या

वृत्तांतावरून या कार्याला विधीची अनुकूलता आहे असें दिसतें. बकुलावली व चित्रफलक यांच्या परस्पर नेण्याआणण्यावरून या कार्याला जी काय बहार आली आहे! तिच्यावरून मोठाच आनंद वाटतो. विवाहाच्या कामांत परस्पर प्रीति जमणें हा मोठाच शुभ शकुन असतो. अंगिरा ऋषीनें ह्मटलेंच आहे कीं, ' जेथें मन व नेत्र यांच्या द्वारें परस्पर प्रेम व स्नेह व्यक्त झाला असेल तेथें फत्ते समजावी. " [भवभूतीच्या वेळीं कामशास्त्रप्रवर्तक अंगिरा ऋषीचा एखादा ग्रंथ प्रसिद्ध असावा व त्यांतून हा उतरा घेतलेला असावा. हल्लीं कामशास्त्रावर वात्स्यायनप्रणीत सूत्रें प्रसिद्ध व उपलब्ध आहेत, त्यांत या तऱ्हेचें किंवा अशा अर्थाचें वाक्य आढळत नाहीं. वात्स्यायनसूत्रें कदाचित अलीकडील असतील, किंवा डा. भांडारकर यांच्या कल्पनेप्रमाणें आंगिरसा हा शब्द सोडला तर, हें अवतरण कवीनें आपस्तंब गृह्यसूत्रांतून घेतलें आहे, असें दिसतें. ]

इतक्यांत मालती कामंदकीच्या दृष्टीस पडली. तिची स्थिति व चर्या पाहून खरा प्रकार तिच्या तेव्हांच लक्षांत आला. तिचीही अवस्था केवळ मदनपरवशतेमुळेंच झालेली आहे असें तिला कळलें व ती अवलोकितेला ह्मणाली–' ही फारच क्षीण झालेली दिसते. केळीच्या गाभ्याप्रमाणें इच्या शरीराची अवस्था झाली आहे. प्रतिपदेच्या चंद्रकलेप्रमाणें तिला पाहून नेत्रांना आनंद होत आहे. ती मदनानलाच्या दाहामुळें खिन्न झालेली आहे. इला पाहून माझ्या मनाला आनंदही होतो आणि भयही वाटतें आहे. '

आणखी, ' इचे गाल पांढरे फटफटित झाले आहेत, त्यामुळें देखील तिच्या मुखाला मनोहरपणा आला आहे. मन्मथाची क्रीडा रमणीय अशा जनाच्या ठायीं आविर्भूत झाली असतां अधिकच ललित होऊन सर्वोत्कृष्ट दिसूं लागते. मला वाटतें, खरोखर ही मानसिक प्रियसमागमसुख अनुभवीत आहे. कारण इचें नीवीबंधन उच्छ्वसित व शिथिल होत आहे; अधर फुरफुरताहेत; बाहूंना ग्लानी आली आहे. इला घाम आला आहे; नेत्र मधुर, किंचित् पाणीदार व स्तब्ध झाले आहेत; दोन्ही स्तन सारखे प्रकंपित होत आहेत; गालांवर रोमांच आलेले आहेत; व तिला वरचेवर मूर्छना व चेतना येत आहे. ' असें ह्मणत ह्मणत ती आंत गेली.

[ हें वर्णन संकल्पनिर्मित प्रियसमागमाचा अनुभव घेणाऱ्या स्त्रीचें यथार्थ असेल. पण तें मालतीला–निदान यावेळीं–लागू होण्यासारखें आहे किंवा नाहीं याचा विचारच आहे. कारण तिनें अशा अनुचित विचाराला आपल्या मनांत होईल तेथवर जागा द्यावयाची नाहीं असें लवंगिकेला नुकतेंच निक्षून सांगितलें आहे. कदाचित् तिच्या मनांत नसूनही तिच्या चित्ताची व शरीराची अशी स्थिति झाली असेल.]

कामंदकी आंत येईतों मालतीला ग्लानी आली होती. लवंगिकेनें तिला सावध केलें. तिनें कामंदकीला नमस्कार केला. तेव्हां तिनें तिला ' तुझ्या मनाप्रमाणें कार्यसिद्धि होवो ' ह्मणून आशीर्वाद दिला. व सर्वजणी बसल्यानंतर मालतीनें ह्मटलें ' कां भगवती, आपण खुशाल आहांना? ' त्यावर कामंदकीनें आपल्या चिंतित कार्याच्या अनुरोधानें बुद्धया सुस्कारा टाकून व कांहींशा खिन्न मुद्रेनें ' हो–खुशालच ह्मणावयाचें '–असें उत्तर दिलें. तिची ती तऱ्हा लवंगिकेच्या तेव्हांच लक्षांत आली. व ती पुढील उपक्रम करण्याकरितां बुद्धया ह्मणाली–'आपण असें ओढत व मोठ्या खिन्न अंतःकर-

**२. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें**–हें पुस्तक रा० रा० विश्वनाथ काशिनाथ राजवाडे बी० ए० यांनी छापून प्रसिद्ध केलें. याची पृष्ठसंख्या ९३६ असून, यांत एकंदर ३०४ लेख प्रसिद्ध झाले आहेत. हे लेख समजण्यास साधनीभूत ह्मणून आरंभीं एक विस्तीर्ण प्रस्तावना जोडली आहे. ऐतिहासिक लेखसंग्रह, भारतवर्ष, त्याच प्रमाणें, रा० राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलेलें हें पुस्तक यांचा, मराठ्यांचा इतिहास लिहिण्याच्या कामीं अत्यंत उपयोग होणार आहे. मराठ्यांच्या इतिहासाच्या भोक्तयांनीं या पुस्तकास अवश्य आश्रय द्यावा ह्मणून आह्मी शिफारस करितों. किं० तीन रुपये.

---

**संगीत मालविकाग्निमित्र नाटक**–रा० रा० वामन गणेश जोशी केळशीकर यांणीं केलें. नाट्यकथामालेमधून आरंभीं प्रसिद्ध होत होतें, तें आतां स्वतंत्र पुस्तकरूपानें संगीताच्या भोक्त्यांस सादर केलें आहे. मूळ कालिदासाच्या कृतीचें हें भाषांतर आहे, तेव्हां नाटक ग्रंथांच्या वाचकांचा याच्या वाचनापासून अगदींच हिरमोड होणार नाहीं.

---

**स्त्री शिक्षणचंद्रिका.**–हें डेमी अष्टपत्री २४ पृष्ठांचें मासिक पुस्तक स्त्रियांच्या उपयोगासाठीं सावंतवाडी येथें या वर्षापासून चालू झालें आहे. लेख चांगले सुबोध असतात. स्त्रियांसाठीं अशा एकाद्या मासिकाची गरज होतीच. इंद्रियविज्ञानशास्त्रासारखे विषय उपयुक्त खरे, परंतु स्त्रीवाचकांच्या ग्रहणशक्तीस तूर्तच्या स्थितींत कठिण ह्मणण्यास हरकत नाहीं. प्रसिद्ध झालेल्या दोन अंकांवरून पाहतां हें पुस्तक सर्वांच्या–त्यांतही विशेषेंकरून स्त्रीवाचकवर्गाच्या–आश्रयास पात्र आहे. वार्षिक मोल ट. हां. सुद्धां १ रु. ४ आ. आहे. तें अल्प आहे.

---

'**मराठी भाषेची लेखनपद्धति**'–या विषयासंबंधानें अखेरची व्यवस्था रा० रा० काशिनाथ नारायण साने, रामचंद्र परशुराम गोडबोले, आणि शंकर रामचंद्र हतवळणे यांनीं या लेखांत सुचविली आहे. या संबंधानें आह्मास दोन शब्द लिहावयाचे आहेत ते पुढील खेपेस लिहूं.

---

# विविधज्ञानविस्तार पुस्तकालयांत मिळणाऱ्या पुस्तकांची यादी.



**रा. सा. विष्णु मो. महाजनी एम्. ए.कृत.**

बंगाल्यांतील जमीनदारी वहिवाट ... १–४–०
कुसुमांजलि. ( स्फुट कविता. ) ... ०–४–०
स्वनःचा प्रयत्न. ... ... ... ०–३–०

**( कै० ) बजाबा रामचंद्र प्रधानकृत–**

रुद्रुणी स्त्री ... ... ... ... ०–४–०
दोन गोष्टी ... ... ... ... ०–४–०

**रा. रा. गणेश जनार्दन आगाशे बी. ए.कृत–**

अर्थशास्त्राचीं मूलतत्वें. ... ... २–०–०
बाल–शिक्षण. ... ... ... ... ०–३–०
सुंदरेची संक्रांत. ... ... ... ०–१–६

**( कै० ) वामन दाजी ओककृत–**

थोरले माधवराव पेशवे यांचा मृत्यु (काव्य) ०–६–०
काव्यमाधुर्य ... ... ... ... ०–७–०
लार्ड बेकनचें चरित्र.... ... ... ०–१०–०
गणपतिनिधनविलाप. ... ... ०–२–०
नानक–चरित्र. ... ... ... ०–३–०

**रा. सा. शिवराम सीताराम वागळे बी.ए.कृत–**

व्यवहारनीति अथवा कर्तव्य विचार ... ०–०–०
ब्रिटिश राज्यव्यवस्था ... ... ०–८–०
बेकनचे निबंध. ... ... ... ०–८–०
चातुर्य आणि मनोरंजन. ... ... ०–५–०
सटवाजीराव ढमाले ( फार्स. ) ... ०–४–०
सिसरोकृत नीतिविषयक चार निबंध ०–४–०
पुरून ठेविलेलें द्रव्य ( फार्स. ) ... ०–३–०
महाराष्ट्र काव्यमकरंद ... ... .. ०–५–०

**रा. रा. रामचंद्र भिकाजी गुंजीकरकृत–**

भगवद्गीतेचें सुबोध भाषांतर ... ... ०–१०–०
मोचनगड ... ... ... ... ०–१२–०
सौभाग्यरत्नमाला, भाग १ ला. ... ०–६–०
सरस्वतीमंडल ... ... ... ... १–८–०
भ्रमनिरास ... ... ... ... ०–८–०
महाराष्ट्र भाषेची लेखनशुद्धि. ... ०–३–०
सुबोध व्याकरण ... ... ... ०–४–०

**(कै०) गणेश भिकाजी गुंजीकर बी. ए.कृत–**

स्वपराक्रम. ... ... ... ... ०–५–०
व्हिक्टोरिया महाराणीचें चरित्र. ... ०–३–०
जुळ्या बहिणी. ... ... ... ०–२–०
कुटुंबवत्सल. ... ... ... .. ०–२–०
दानत. ... ... ... ... ०–१–६

**डा० भालचंद्र कृष्ण भाटवडकरकृत—**

अबलासंजीवन ... ... ... १–०–०
सार्वजनिक आरोग्य... ... ... ०–१२–०

**(कै० ) आनंदराव सखाराम बर्वे बी. ए.कृत–**

हिंमतबहादर नाटक ( Hamlet. ) ... १–०–०
ठगाची जबानी. ... ... ... २–८–०

**डा० कान्होबा रणछोडदास कीर्तिकरकृत—**

इंदिरा ( काव्य ) ... ... ... ०–१२–०
चार्लस डार्विनचें चरित्र. ... ... ०–२–०

**( कै० ) डा० सखाराम अर्जुनकृत—**

गृहिणी कंठभूषण. ... ... ... ०–१२–०
Bombay Drugs ... ... ... ३– ८–०

---

आरबी भाषेंतील सुरस गोष्टी ... ४–०–०
शिवछत्रपतीचें चरित्र. ( चिटणीस कृत ) १–०–०
सौभाग्य रत्नमाला ( २ भाग एकत्र ) ०–११–०
" भाग दुसरा ... ०–६–०
धौममहाबळेश्वर–वर्णन(उदास–कृत)... ०–८–०
मोहना नाटक. ... ... ... ०–८–०
भ्रांतिकृत चमत्कार. ... ... ... ०–६–०
एका रात्रीचा घोंटाळा. ... ... ०–१०–०
अकबर काव्य ... ... .. ०–८–०
तरुण मित्र. ... ... ... ... ०–८–०
तीन गोष्टी. ... ... ... ... ०–४–०
गीतार्थसार ( कै० वा. आ. मोडक कृत ) ०–४–०
पद्यात्मक लघुहितोपदेश. ... ... ०–२–०

---

टपाल खर्च निराळा–रुपयास दीड आणाप्रमाणें.

॥ श्रीः ॥

# विविधज्ञानविस्तार.

## A MONTHLY MAGAZINE
OF
## MARATHI LITERATURE
FOR
Ladies and Gentlemen.

कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरितां.

पुस्तक ३०. मार्च १८९९. अंक ३.

| विषय. | अनुक्रमणिका. | पृष्ठ. |
|---|---|---|



मुंबईत

गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत छापिलें.

वर्षाची वर्गणी रुपये ३; टपालखर्च आणे ६.

कैलासवासी

# हरि महादेव पंडित.

विविधज्ञानविस्तारास प्रतिजनकाच्या स्थानीं असलेले आमचे उपरिनिर्दिष्ट मित्र चालू मार्च महिन्याच्या १९ व्या तारखेस, नागपुर मुक्कामीं, नवज्वराच्या दुखण्यानें परलोकवासी झाले हें कळविण्यास आह्मास अत्यंत दुःख वाटतें. यांच्या या अकालिक मृत्यूमुळें ज्याप्रमाणें त्यांच्या कुटुंबाचें त्याप्रमाणें मराठी भाषेचें आणि विविधज्ञानविस्ताराचें मोठें नुकसान झालें आहे. या पुस्तकाशीं त्यांचा संबंध, संपादक या नात्यानें, सातव्या पुस्तकापासून जडला, आणि तो ते मरतपर्यंत अव्याहत चालू होता. विविधज्ञानविस्ताराला प्रस्तुतची स्थिति प्राप्त होण्यास त्यांचा हा संबंधच विशेषतः कारणीभूत झाला असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

हरिपंतांसारखा बहुश्रुत, शोधक, लेखनकुशल, निरपेक्ष काम करणारा, समाधानवृत्तीचा पुरुष या काळांत विरळ आढळतो. विद्वानांत विद्वान, विनोद्यांत विनोदी, लहानांत लहान, थोरांत थोर, अशी यांची वृत्ति असे. यांचें जीवनवृत्त येत्या अंकांत प्रसिद्ध करण्यांत येईल.

श्री.

# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ३०. अंक ३.

## पंचवटीस्थलनिर्णय.

[ मागील अंकावरून पुढें चालू. ]

आतां हा वाद स्थलस्थितिनिर्णयाचा आहे. परंतु वादीप्रतिवादी यांच्यामध्यें शिक्षणादि परिस्थितीमुळें समजांत फारच अंतर आहे. तेव्हां दोघांची एकवाक्यता करण्यास तिसराच एक पक्ष उभा राहिला पाहिजे. नाहींतर हा घोंटाळा कधींच संपायाचा नाहीं. ' एल्लिमेल्लि ' व ' हरिसत्ता ' या जुन्या गोष्टीप्रमाणें घोंटाळा व कल्होळ उडून जावयाचा. वामनरावजींच्या ह्मणण्याप्रमाणें—व तें ह्मणणें कोणीही निरभिमानी मनुष्य कबूल करील—आमच्या लोकांत कालस्थलस्थितिनिर्णयसंबंधानें फार उदासीनता आहे व श्रीमंतांना तर या दोन्ही गोष्टींची फारशी महति वाटत नाहीं. यद्यपि श्रीमंतांनीं आपणास भूगोलाचें विशेषसें परिज्ञान नसल्याचें कबूल केलें आहे, तथापि त्यांचे ह्मणण्यावरून भूगोलपरिज्ञानाची बाब विशेष महत्त्वाची नाहीं. यामुळें त्यांच्या मतीं एखाद्या स्थळाची आग्नेय काय व नैऋत्य काय त्यांत विशेष फरक नाहीं. उदाहरणार्थ ' जनस्थानपश्चिमः चित्रकुंजवान् गिरिः ' या भवभूतीच्या उक्तीसंबंधानें लिहीत असतां या दिशांसंबंधानें श्रीमंतांस ' कुमठा क्या ' और ' कवठा क्या ' या हैदरअल्लीच्या स्वाराप्रमाणें एकच वाटतात. तेव्हां खरी समजूत पडायाची कशी? तसेंच जागोजागीं भद्राचलंकडील जनस्थान व पर्णशाला यासंबंधानें वामनरावजींनीं जीं वाक्यें उद्धृत केलीं आहेत त्यांसंबंधानें श्रीमंतांचें एकच ह्मणणें वारंवार दृष्टीस पडतें; तें हें कीं, कंठरवानें व स्पष्टपणें त्या ग्रंथकारांनीं तीं स्थळें भद्राचलंजवळ होतीं असें ह्मटलें नाहीं! या संबंधानें आह्मांस तर असें वाटतें कीं, यद्यपि दोघेही वादीप्रतिवादी सर्वप्रकारें योग्य जोड आहेत तथापि दोघांची दृष्टि भिन्न असल्यामुळें हा वाद इतका वाढला आहे. व श्रीमंतांनीं जें प्रत्युत्तर दिलें आहे त्यांत जे त्यांनीं असंबद्ध आक्षेप काढिले आहेत त्यांचीं जर उत्तरें देण्यास ओकांच्या पक्षानें कोणी तयार होईल व त्याचेही कांहीं असंबद्ध आक्षेप निघतील तर हा मूळवाद कोठेंतरी लुप्त होऊन भलत्याच गोष्टीला प्राधान्य येईल. आमची जुनी वादाची रीति अशीच आहे. याला अलीकडील उदाहरणें-पुण्याचा पुनर्विवाहवाद, मद्रास येथील उत्तराधिपीठाचे स्वामींसमोर झालेला पुनर्विवाहविषयक वाद, व काशींत स्वामी दयानंदाचा तेथील विद्वानांशीं झालेला वाद, वगैरे होत. अशा वादांत खरा समाधानकारक निर्णय न होतां उभय-

पक्षांनीं आपआपल्या ठिकाणीं आपापली खरशी झाली असें ह्मणावें व स्वस्थ बसावें. तसा प्रकार प्रस्तुत वादाचा न व्हावा अशी आमची वामनरावजींच्या पक्षीयांस व श्रीमंतांस विनंती आहे. तेव्हां श्रीमंतांची मुख्य दृष्टि चुकल्यामुळें वीरचरित, उत्तरचरित, अनर्घराघव व बालरामायण, यांतील आधारानें ओकांनीं दिलेले पुरावे श्रीमंतांच्या लक्षांतच भरले नाहींत. व त्या त्या ग्रंथांची इतर दृष्टीनें योग्यता पाहण्याच्या भानगडींत श्रीमंत पडले आहेत. उत्तररामचरितांतील उद्‌धृत वाक्यांचा विचार एकीकडे ठेवून, त्या ग्रंथांत तपोवन, सीतातीर्थ अशीं नांवें आलीं आहेत, व नाशिकीय जनस्थानांत त्या नांवाचीं स्थळें आज आहेत व 'भद्राचलमीय' जनस्थानांत अशीं स्थळें असल्याचें ओकांनीं लिहिलें नाहीं; तेव्हां वाल्मीकीय जनस्थान हें नाशिकच होय असा निष्कर्ष श्रीमंत काढितात. परंतु रामकालीन जनस्थान घोर अरण्य असल्यामुळें व भद्राचलं वगैरे स्थळें तदुत्तरचीं असल्यामुळें तपोवन, सीतातीर्थ वगैरे स्थळें अमुकच होतीं असें आज दाखविणें कादंबरीकाराखेरीज कोणासही शक्य नाहीं. 'चतुर्योजनविस्तीर्णं जनस्थानं' असें ब्रह्मपुराणकाराचें वचन आहे, तेंच प्रमाण धरून श्रीमंत एके ठिकाणीं 'जनस्थान हें चार योजनें विस्तीर्ण आहे असें सर्वत्र प्रसिद्ध आहे' असें ह्मणतात. व त्या योगानें त्या ३२ मैलांच्या टापूंत सर्व जनस्थानीय स्थळें आणावयाचीं आहेत. परंतु ओकांनीं दिलेल्या उत्तररामचरितांतील वाक्यांची गति काय करावयाची याचें भान श्रीमंतांस जसें रहावें तसें राहिलें नाहीं. व्यावहारिक न्यायकोर्टांत जो एक प्रकार दृष्टीस पडतो तो श्रीमंतांनीं धरिला आहे. तो असा. साक्षीदार ह्मणून जे एक पक्षाकडून येतात ते अविश्वसनीय होत असें दुसऱ्या पक्षानें साधार दाखवावयाचें; परंतु त्यांनीं दिलेली साक्ष रद्द करी तोंपर्यंत त्यांच्या अविश्वास्यतेबद्दल बाहेरचा असंबद्ध पुरावा कितीही आणिला तरी व्यर्थ आहे. भवभूतीनें, मुरारीनें व राजशेखरानें रामायणकथा थोडी अस्ताव्यस्त करून आपल्या कार्याकरितां उपयोगांत आणिली आहे, तेव्हां ते जनस्थानस्थितिनिर्णयासंबंधानें अविश्वसनीय आहेत असें कसें सिद्ध होतें हें आह्मांस कळत नाहीं. शिवाय मृताशौचांत क्षत्रियांस मुळांत 'प्रतिषिद्धमस्त्रग्रहणं' असें आहे, 'शस्त्रग्रहण' असें नाहीं. शस्त्रग्रहण वर्ज आहे असें ह्मणणारा मुरारी श्रीमंतांच्या मतीं धर्मशास्त्री नसेल; परंतु तेवढ्यावरून त्यानें दिलेला रामयात्राव्युत्क्रम असंबद्ध कसा ठरतो हेंही समजण्यास कठिण आहे. कबंधास खळगा खणून पुरलें किंवा जाळलें, संपातीनें राम चित्रकूटास असतांच मलयपर्वतावरून त्यास ओळखिलें, किंवा तो भेटल्यानंतर मारुतीनें त्यास रामकथा सांगितली, ह्मणून असें ह्मणणाऱ्यांपैकीं एक स्थलस्थितिनिर्णयासंबंधानें अविश्वास्य कसा होईल हेंही आह्मांस गूढ आहे. नाटककार हे आपल्या कृतीस सौष्ठव यावें ह्मणून संभवनीय व विशेष गोडसा फेर आधारभूत कथेंत करितात. ह्मणून मुख्य गोष्ट ते सोडून देतात किंवा तिचा विपर्यास करितात असें मात्र होत नाहीं. जरी शेक्सपियरनें बोहिमियाच्या (कल्पितद्वीपाच्या) तीरीं तारूं आणून लाविलें आहे तथापि त्याच्या मुख्य वर्ण्य विषयाच्या संबंधानें कांहीं विसंगतता किंवा विपर्यास आला आहे असें कोण ह्मणेल? हाच प्रकार भवभूत्यादिकांच्या विपर्यस्त ह्मणून श्रीमंतांनीं दाखविलेल्या उक्तींचा होय. त्या

उक्तींमुळें वाल्मीकीय रामायणास किंवा प्रस्तुत वादविषयीभूत जनस्थानस्थितीस काडीइतकाही धक्का पोंचत नाहीं. तेव्हां त्यांस अविश्वास्य कोटींत ढकलून त्यांनीं दिलेला पुरावा मानूं नये असा जो श्रीमंतांचा रोंख दिसतो तो पतकरण्यास आह्मी तयार नाहीं. तर ओकांनीं भवभूत्यादिकांच्या या स्थलांबद्दल समजुती काय होत्या हें दाखविण्याकरितां जीं वाक्यें किंवा स्थलें दाखविलीं आहेत तीं चुकलीं असें श्रीमंतांनीं दाखवावयास पाहिजे होतें. तसें ज्या अर्थीं त्यांनीं केलें नाहीं त्या अर्थीं हा पुरावा वामनरावांच्या पक्षाचाच भक्कम आहे असें आमचें मत आहे.

वामनरावजींच्या मूळ उत्तराच्या धोरणानें पाहिलें तर एक दोन गोष्टी पाहण्याच्या राहून गेल्या व पुढील विषय आधीं येऊन गेला असें आमच्या या विवेचनांत व श्रीमंतांच्या उत्तरांत होऊन गेलें आहे, ह्मणून पुन: आह्मी मागें वळतों. ओकांनीं प्रथमत: रामयात्राक्रम वाल्मीक्यनुसार अगदीं बारकाईनें दिला आहे. नंतर त्या यात्राक्रमांतील स्थलें हल्लींच्या प्रचलित हिंदुस्थानच्या भूवर्णनांत कोठेंशीं आहेत याचा निर्णय केला आहे. व तदुत्तर लोकभ्रमाप्रमाणें विशेषत: हा भ्रम महाराष्ट्रांतच आहे–नाशिकीय जनस्थान मानिल्यास तेथें येऊन पोंचण्याचे संभवनीय मार्ग कोणचे यांचा विचार केला आहे, व हें गोदोद्गमाकडील जनस्थान मानिल्यास व वाल्मीकीस न सोडल्यास किती अनार्थापात होत आहेत हें दाखविलें आहे. याजवरील उत्तर पाहतां श्रीमंत वाल्मीकीसंबंधानें मुग्ध राहतात. हल्लींच्या भूगोलाच्या मेळासंबंधानें वामनरावजींचा स्थलस्थितिनिर्णय त्यांस पसंत नाहीं असें, हेंच तें स्थळ कसें, अशा मोघम (ह्मणजे कारणविरहित) शंका विचारून व्यक्त करितात; व तिसऱ्या मुद्याला उत्तर देण्याचें टाळून वामनरावांस खोडून काढण्याच्या उद्देशानें कौसल्या ही उत्तर कोसलाधिपतीची कन्या होती व दक्षिणकोसलाची नव्हती असें सांगून व वाल्मीकीनें कृष्णानदीचा उल्लेख रामयात्राक्रमांत कां केला नाहीं असा वामनरावजींस उलट प्रश्न करून श्रीमंत निर्वाह करून घेतात. परंतु या योगानें वामनरावजीनीं नाशिकीय जनस्थानाविरुद्ध जो जोरदार विरुद्ध पुरावा मांडला आहे तो या दोन विधानांनीं यत्किंचितही ढासळत नाहीं. वामनरावजी आज हयात असते तर आज आह्मांस प्रतिपक्ष अंगावर घेऊन लिहिण्याचें कांहीं कारण नव्हतें. श्रीमंतांस त्यांनीं योग्य तेंच उत्तर दिलें असतें. परंतु तूर्त त्यांचे ऐवजीं या दोन गोष्टींचें उत्तर देण्याचा आह्मी यत्न करितों. प्रथम कौसल्या ही उत्तरकोसलाधीशाची कन्या असें श्रीमंत ह्मणतात त्यास आधार काय तो—आह्मांस आढळल्याप्रमाणें—आनंदरामायणाप्रमाणें कोसल नांवाचा देश अयोध्येच्या सन्निध होता. तेथील राजाची मुलगी कौसल्या; व ती दशरथास दिली होती. तेथील राजानें आपल्या मुलीबरोबर दशरथास कोसल देश देऊन टाकला, असें सारकांड सर्ग १ यांत आहे. श्रीमंतांनीं आपल्या ह्मणण्यास आधार कोणचा ग्रंथ आहे हें दाखविलें नाहीं. परंतु जर आनंदरामायणच असेल तर तो ग्रंथ अविश्वास्य आहे असें श्रीमंतांनींच आपला पुरावा देते वेळीं कंठरवानें ह्मटलें आहे. तेव्हां जर दुसरा कोणचा ग्रंथ असेल तर तो समजे तोंपर्यंत या श्रीमंतांच्या कौसल्याविषयक विधानास त्यांच्याच ह्मणण्याप्रमाणें महत्त्व देतां येत नाहीं. वामनरावजींचा, दक्षिण-

कोसलकन्यका कौसल्या होती असें ह्मणण्यास पुरावा वाल्मीकिरामायण, रघुवंश व ब्रह्मपुराण हे ग्रंथ असावेत. मात्र हे तीन्ही ग्रंथ वाचतांना प्रतिपदोक्त वचनांचाच पुरावा पाहिजे असल्यास तो मात्र मिळणार नाहीं. बाकी अनुमानानें–पण बरेच स्पष्ट असे–पुरावे मिळतील. वाल्मीकिरामायणांत प्रथम दहा अध्यायांत साकेत ह्मणजे अयोध्या कोणत्या देशांत वसविली हें व पुत्रकामेष्टी यज्ञ करतांना दशरथानें आपले मेहुणे किंवा सासरे यांस बोलाविलें होतें, हें स्पष्ट आढळून येईल. व थोडासा अनुमानाचा प्रयोग केला असतां द्वितीय प्रसंगींचा कोसलेश्वर भानुमंत हा कोठला असावा हें सहज कळण्याजोगें आहे. उत्तरकोसल हा देश आंदणांत दिला व तेव्हांपासूनच साकेताधीश कोसलेश्वर झाले, असें आनंदरामायणकार ह्मणतात. श्रीमंतांच्या मतीं हें रामायण दोन तीनशें वर्षांपूर्वीं कोणी लिहिलें असावें. कालिदास हा त्याच्या निदान हजार वर्षांनीं पूर्वीं होऊन गेला असें सर्वांस कबूल आहे. तेव्हां या संबंधानें कालिदासाचें ह्मणणें विशेष आदरणीय होईल असें वाटतें. रघु. स. ६, श्लोक ७१, यांत अजराजाच्या वेळीं व त्याच्याही पूर्वीं साकेताधीशास उत्तरकोसलेंद्र ह्मटलेलें आहे. 'काकुत्स्थशब्दं यत उन्नतेच्छाः श्लाघ्यं दधत्युत्तरकोसलेंद्राः।' यावरून उत्तरकोसल अलीकडे आंदण दिलें गेलें असावें, किंवा दक्षिण कोसल कौसल्येबरोबर आंदण दिलें गेलें असून उत्तर कोसल आंदण दिलें असें चुकून पडलें असावें. नाहींतर कालिदासाला अविश्वास्य कोटींत काढून टाकावा. तसें केल्यास वामनरावांचा पक्ष अगदीं सबशेल बुडतो. अस्तु. पुढें सर्ग ९, श्लोक १७, यामध्यें दशरथ कोसलाच्या मुलीशीं विवाह करितो असा प्रसंग आहे. तेव्हां उत्तरकोसलेंद्र ह्मणजे दशरथ हा दुसऱ्या कोणत्यातरी ह्मणजे दक्षिणकोसलेश्वराच्या मुलीशीं विवाह करितो हें उघड आहे. तेव्हां वामनरावजींची कौसल्याविषयक उक्ति साधार आहे असें सहज दिसून येईल. मग श्रीमंतांना शंका कां आली हें नीटसें ध्यानांत येत नाहीं.

आतां वामनरावजींनीं दाखविलेला विरोध परिहार करण्याकरितां श्रीमंतांनीं 'कंटकेनैव कंटकं' या युक्तीचा उपयोग केला आहे. चित्रकूटाहून नाशिकास येतांना नर्मदा, तापी या प्रसिद्ध नद्या वलांडिल्या पाहिजेत; परंतु त्यांचा उल्लेख वाल्मीकीनें केला नाहीं. तेव्हां ज्या मार्गानें गेलें असतां या नद्या लागावयाच्या नाहींत अशा रस्त्यानें ह्मणजे 'भद्राचलमीय' जनस्थानाच्या बाजूनें राम गेले असें वामनराव ह्मणतात. याजवर श्रीमंतांनीं कांहींतरी समाधानकारक उत्तर द्यावयाचें होतें. परंतु श्रीमंतांनीं ज्याचें घोंगडें त्याच्या गळ्यांत घालण्याच्या बेतानें कृष्णानदीचा उच्चार वाल्मीकीनें कां केला नाहीं असा उलट प्रश्न केला आहे. सकृद्दर्शनीं हा प्रश्न निरूत्तर करण्याजोगा आहे असें कोणासही वाटेल. कारण कोणच्याही जनस्थानांतून राम गेले तथापि त्यांस कृष्णा ही वलांडलीच पाहिजे. मग याचें निवारण काय, हा सहज प्रश्न उत्पन्न होतो. त्याचें सरळ उत्तर ह्मटलें ह्मणजे वाल्मीकीला गोदावरी उतरल्यानंतर दक्षिणेपर्यंतचा मार्ग नीटसा माहित नसावा. त्यास उत्तरदेशाची माहिती चांगली होती असें त्याच्या रामायणावरून स्पष्ट होत आहे. सरयू, वेदश्रुति, गंगा, तमसा, यमुना, मंदाकिनी, नर्मदा, इ. नद्या त्यास

माहित होत्या. व त्या नद्यांपैकीं ज्या रामास यात्राप्रसंगीं लागल्या त्यांचा त्यानें उल्लेख केला आहे, असें असून नर्मदेचा उल्लेख कां केला नाहीं असें वामनरावांचें ह्मणणें. आतां कृष्णा ही नदी उत्तरदेशीय ग्रंथकारांस माहित नव्हती असें ह्मणावें लागतें. रामायणामध्यें कृष्णवेणी या शब्दाचा एकवार किष्किंधाकांडांत सुग्रीवानें भूवर्णन केलें आहे त्यांत उल्लेख आढळतो. त्याचप्रमाणें भारतांतही वनपर्वांत एक दोन वेळां कृष्णवेणीचा उल्लेख झाला आहे. परंतु या उच्चारापेक्षां जास्ती तन्हेनें स्थलादि वर्णन कोठेंच आढळत नाहीं. इतकेंच काय परंतु ब्रह्मपुराण अध्याय ७० श्लोक २३ व ३३-३४ यांजमध्यें प्रसिद्ध नद्यांचीं नांवें दिलीं आहेत. परंतु त्यांत कृष्णेचें नांव मुळींच नाहीं. तेव्हां दक्षिणेंतली ही नदी वाल्मीकीस माहित नसावी यांत आश्चर्य नाहीं. व ह्मणूनच तिचा त्यांनीं उल्लेख केला नाहीं. परंतु नर्मदेचा उल्लेख नसावा हें मात्र आश्चर्यकारक आहे.

श्रीमंतांच्या उत्तरांत वामनरावजींकडून प्रत्युत्तर देण्याजोग्या किरकोळ-परंतु महत्वाच्या अशा कांहीं बाबी राहिल्या आहेत असें वाटत नाहीं. तेव्हां उभयपक्षांच्या संबंधानें पुराव्यादाखल आणलेले पुराणग्रंथ पाहूंया. वामनरावजींकडून पुराणग्रंथ आधाराकरितां ह्मणून घेतलेला एकच दिसतो. बाकीचे कांहीं त्यांनीं पाहून दोन्ही पक्षास उपकारक नाहींत ह्मणून सोडून दिले आहेत. पुराणग्रंथांविषयीं, ह्मणजे त्यांच्या योग्यतेविषयीं व त्यांतील मजकुराविषयीं, आमचें मत पूर्वी एका प्रसंगीं कळविलेंच आहे. तें मत आमचें अद्याप कायम आहे, इतकेंच नाहीं, पण अधिकच दृढ झालें आहे. वामनरावजींचेंही मत या पुराणग्रंथांच्याविषयीं विशेषसें निराळें होतें असें वाटत नाहीं. व तसें त्यांनीं आपल्या उत्तरांत बरेंच स्पष्टपणें ध्वनित केलें आहे. तेव्हां या पुराणांचा पुरावा जेव्हां श्रुतिस्मृतिरामायण व भारत यांच्या विरूद्ध नसेल तेव्हांच तितक्यापुरता मान्य करावयाचा. अन्यत्र त्यांचा कादंबरीवजा उपयोग समजावयाचा. ही गोष्ट श्रीमंतांसही नाकबूल नसावी. नाकबूल होईल तर आमच्या जुन्या मीमांसापद्धतीस हरताळ लावावा लागेल. तेव्हां तो कांहीं भीति नाहीं. आमच्या वाचकांनींही पुढील विवेचन वाचतांना हें आमचें ह्मणणें लक्षांत बाळगावें येवढी विनंती आहे. आतां ब्रह्मपुराणांतील गौतमीमाहात्म्याकडे वळूंया. प्रथमतः ही गोष्ट आनंदाची झाली आहे कीं वामनरावजींनीं हें माहात्म्य डोळ्यांत तेल घालून मोठ्या काळजीपूर्वक वाचलें आहे, असें श्रीमंतांचें त्यांस प्रशस्तिपत्र मिळालें आहे. परंतु जितक्या मोकळ्या मनानें हें प्रशस्तिपत्र दिलें आहे तितक्याच उदार मनानें त्यांनीं या ग्रंथावरून अनुमित होणारे प्रकार जे वामनरावजींनीं दिले आहेत त्यांकडे पाहिलें असतें व त्यांतील उत्तर देण्याजोग्या गोष्टींस उत्तरें दिलीं असतीं तर हा वाद आतां जितका फुगला आहे तितका फुगला नसता, व तिन्हाइतास याचा निर्णय करण्याचा प्रसंग आला नसता. परंतु दुःखाची गोष्ट आहे कीं, तसा प्रकार झाला नाहीं. प्रथमतः या ग्रंथांत दंडक व दंडकारण्य या शब्दांच्या उपयोगांचा उल्लेख केलेला नीट पहावा अशी वामनरावांची इच्छा होती. परंतु श्रीमंतांनीं तसें कांहींच केलें नाहीं. पुढें जनस्थान प्रकरण पाहतां वामनरावजींनीं नाशिक हें जनस्थानपुरी होय, जनस्थानारण्य नव्हे,

असें स्पष्टपणें दाखविलें असतां व राम जनस्थानपुरींत आल्याचा गौतमीमाहात्म्यकार उल्लेख करीत नसतांही श्रीमंत वाल्मीकीचें जनस्थानारण्य नाशिकीय जनस्थानपुरी होय असें पुनः ह्मणतात, याचें आश्चर्य वाटतें. हेंच जनस्थानारण्य होय याला पुरावा 'चतुर्योजनविस्तीर्णम्'! व दुसरें प्रमाण गौ०मा०, अ० १९, यांत 'तथा पंचवटाश्रमः' असें अजागलस्तनवत् उच्चारण होय. परंतु गौतमीमाहात्म्यकाराला पंचवटी किंवा पंचवटाश्रम हा कांहीं विशेषसा संस्मरणीय पदार्थ वाटला नसावा. कारण प्रतिअध्यायाच्या शेवटीं संस्मरणीय तीर्थांची नामवारी येत असते. तसा प्रकार पंचवटीसंबंधानें मात्र कोठेंही नाहीं. परंतु जनस्थानक्षेत्रवर्णनानंतरच्या अध्यायांत 'पंचवटाश्रम' शब्द येतांच श्रीमंतांनीं त्यांची सांगड घालून टाकली आहे. राम व सीता जर या क्षेत्रास आलीं असतीं तर त्या प्रसंगाचा उल्लेख करण्यास माहात्म्यकार कधीं न विसरते. कारण महीसारख्या वारवधूचें वर्णन करण्यास जर कवि कमी करीत नाहीं तर येवढ्या मोठ्या गोष्टीची त्यानें उपेक्षा केली असेल असें मानणें व्यवहारदृष्ट्या सुसंगत होणार नाहीं. 'चतुर्योजनविस्तीर्णम्' यावरून जनस्थान हें पुरी नाहीं असें ह्मणण्यास श्रीमंतांस काय कारण झालें असावें हें कळत नाहीं. रामायणांत वाल्मीकीच्या योजनानें अयोध्या दोन योजनें होती, ह्मणजे वामनरावजींनीं दाखविल्याप्रमाणें ६० मैल होती; व अयोध्या ही नगरी होती व अरण्य नव्हती, हें श्रीमंतांस कबूल असेलच. तेव्हां बत्तीस मैलांचें (गौतमीमाहात्म्यकारांचें अंतरप्रमाण निश्चित ठाऊक नाहीं ह्मणून अंदाजानें धरिलें आहे.) जनस्थान अरण्यच कां असलें पाहिजे हें आह्मांस समजत नाहीं. 'नानाजातिसमावृतं' असें जें सार्थक विशेषण माहात्म्यकारांनीं जनस्थानास दिलें आहे त्याचा निर्वाह श्रीमंत कसा करितात? त्यांनीं उत्तर देण्याच्या ऐवजीं विनोद करूनच हा मुद्दा उडवून दिला आहे. श्रीमंतांना अगदीं अलीकडे विजापूर हें बारा कोसांचें होतें अशी त्या प्रांतीं ख्याति होती हें माहित असेलच; व आजकाल मुंबईस वाढायास जागा नाहीं ह्मणून ती एकवीस मैल परिघाचीच राहिली आहे, पण भरगच्च आहे. तेव्हां पूर्वकालीं बत्तीस मैलांचें शहर असण्यास कांहीं बाध येतो असें दिसत नाहीं. शिवाय प्रस्तुतकाळी ६० । ७० चौरस मैल व्यापून असणारें लंडन शहर तरी त्यांनीं अशा विवेचनांत विसरावयाचें नव्हतें. तेव्हां हा वामनरावजींचा मुद्दा ढासळला नाहीं असें स्पष्ट होत आहे.

जनस्थानानंतर रामतीर्थापर्यंत श्रीमंतांस आक्षेप घेण्याजोगें कांहीं आढळलें नाहीं, हें वामनरावजींच्या पक्षीयांस आनंदजनक आहे. परंतु त्या तीर्थवर्णनप्रसंगांत अखेरीस श्रीमंतांस वामनरावजींस कचाट्यांत धरण्याजोगें एक वाक्य आढळलें आहे. तें वाक्य असें:— "गते तस्मिन्सुरश्रेष्ठे रामोप्यनुचरैः सह । गौतमी यत्र चोत्पन्ना शनैस्तं देशमभ्यगात् ॥" आतां या वाक्यांत 'गौतमी यत्र चोत्पन्ना' आणि 'अभ्यगात्' हे शब्द श्रीमंतांस अनुकूल असे दिसले. त्यांतील 'अनुचरैः सह' असें पूर्वार्धांतील वचनही श्रीमंतांनीं पाहिलें पाहिजे होतें. लक्ष्मण आणि सीता हीं दोघें कायतीं रामाबरोबर होतीं, तेव्हां बहुवचन चिंत्य आहे. आतां मुख्य वाक्यांतील 'यत्र-चोत्पन्ना' 'तन्देशमभ्यगात्' याचा अर्थ श्री-

मंत जसा समजतात, ह्मणजे राम नाशिकास किंवा त्र्यंबकेश्वरास गेला व त्यामुळें वामनराव-जींवर कोटी आली, तसा नसून ज्या दिशेकडे ही गोदावरी उत्पन्न झाली आहे तिकडील प्रदेशांत राम गेला. या वाक्यांतील ' अभ्यगात् ' शब्दांतील ' अभि ' या उपसर्गाचा व्याकरणदृष्ट्या प्रयोग अवश्य लक्षांत घेतला पाहिजे. त्या योगानें अर्थभेद होऊन वामनरावजींच्या वाल्मीक्यनुसार ह्मणण्यास पुष्टी येते. पूर्व उत्तरासोबत दिलेला नकाशा पाहिला असतां गोदावरीच्या दक्षिणेस, परंतु तिच्या उगमाकडे बऱ्याच अंतरावर राम गेले आहेत. तेव्हां प्रस्तुत माहात्म्यवाक्याचा अर्थही तसाच ह्मणजे वाल्मीक्यनुकूल आहे ह्मणून तसाच केला पाहिजे, व नाशिकीय जनस्थानास राम आला असें ह्मणणें भ्रामक आहे.

वर १९ व्या अध्यायासंबंधानें पंचवटाश्रम असा निरवलंब उच्चार आला आहे असें आह्मीं ह्मटलें आहे. तोच अध्याय श्रीमंतांचा अत्यंत सहायक आहे असें त्यांच्या लेखावरून दिसतें. त्यासंबंधानें त्यांचें ह्मणणें, "पण असा चमत्कार वाटतो कीं आमचे परम मित्र ओक यांणीं हें माहात्म्य अगदीं डोळ्यांत तेल घालून वाचिलें असून मजपाशीं असलेल्या पुस्तकांतील १८ वा अध्याय व ओकांच्या पुस्तकांतील १८ वा अध्याय जमत नाहींत, मागें पुढें आहेत." ! ! नशीब ओकांचें कीं त्यांचे ( ह्मणजे भोंसले संस्कृतग्रंथसंग्रहालयांतील ) पुस्तकाचे व श्रीमंतांच्या पुस्तकाचे अध्याय जमत नाहींत ते नाहींतच, पण एकांतील मजकूर दुसऱ्याशीं जमत नाहीं ! त्याहून चमत्कार असा कीं, आनंदाश्रमांत छापिलेल्या ब्रह्मपुराणांत अध्याय १९ वा असून ' त्रातारः पंचवटवो वारयामासुरोजसा। ततः कोपात् वटून् पंच ' येथेंढे तीन चरण त्यांत सांपडत नाहींत. तेव्हां वामनरावजींनीं डोळ्यांत तेल घातलें असेल किंवा नसेल. तथापि जर छापील ग्रंथांतही त्या पादत्रयाचा उल्लेख मुख्यग्रंथांत किंवा पादस्थलीं देखील नाहीं, व त्यांच्या पुस्तकांतही नसावा, तर तो भाग त्यांस कोठून दिसावा ? हाच प्रकार ' गौतमीं यत्र चोत्पन्ना ' इत्यादि श्लोकांविषयीं कां नसावा ? हें लिहिण्याचें प्रयोजन इतकेंच कीं, वामनरावजींस श्रीमंत कूटयोद्धे समजतात असें चार पांच प्रसंगांवरून दिसून येतें. परंतु हा त्यांचा भ्रम आहे. निदान वामनरावजींच्या मागें दीड वर्षानीं छापून प्रसिद्ध केलेल्या उत्तरांत हे भाग गाळून टाकायाचे होते. कारण खास व्यक्तिविषयक आरोप त्यांच्या मागून केल्यानें कांहीं-एक फायदा नसून नुसतें लिहिणाऱ्याच्या मनाची अनुदारता व्यक्त होते.

गौतमीमाहात्म्य अ० ४९ यांत गोदेच्या उत्तरतीरास अगस्त्याश्रम होता असें वामनरावजींनीं ह्मटलें आहे. परंतु ' तसा लेख मला तर कोठेंही दिसला नाहीं ' असें श्रीमंत ह्मणतात. पण आह्मी छापील प्रत पाहिली तेव्हां ' शनैः सगौतमीमागात् सत्रमागाय दीक्षितः। यावत्संवत्सरं सत्रमकरोदृषिभिर्वृतः ॥ ' असा ९ वा श्लोक दिसला, व पुढें श्लोक १५ यांत ते अगस्त्यादि ऋषि ' दक्षिणं तीरमाश्रितं। सौरिं शनैश्वरं ...... गत्वा ...... रक्षः कर्म न्यवेदयत् ' ॥ १६ ॥ या लेखावरून वामनरावजी कसे चुकले हें आह्मांस समजत नाहीं. अशाच तऱ्हेनें या ब्रह्मपुराणाची श्रीमंतांनीं बरीच ओढाताण केली आहे. वामनरावजींची या ग्रंथावर भिस्त नव्हती; केवळ वाल्मीक्यनुकूल या ग्रंथकारानें जे उल्लेख केले असतील ते आपल्या

ह्मणण्यास पोषक आहेत इतकेंच दाखवावयाचें होतें. व त्या दृष्टीनें वामनरावजीनीं जो यत्न केला आहे तो त्यांस बराच फायदेशीर झाले-ला आहे. श्रीमंतांनीं ब्रह्मपुराणांतील उल्लेखावर खरा मनाला पटेल असा एकही आक्षेप केला नाहीं. तेव्हां हें पुराण सोडून देऊन श्रीमंतांनीं आपल्या बाजूचीं ह्मणून जीं इतर तीन पुराणें आणलीं आहेत त्यांकडे वळूं.

श्रीमंतांनीं प्रथमतः आपल्या सहायास गणेश-पुराण आणिलें आहे. श्रीमंतांनीं उद्धृत केले-लीं वाक्यें त्यांनीं निर्दिष्ट केलेल्या ठिकाणीं आ-हेत व श्रीमंतांच्या पक्षाला पोषक आहेत. यांत जनस्थान व नाशिक अशीं दोन नांवें आलीं आहेत. वामनरावजीनीं एक त्रिपाद श्लोक ना-शिकाच्या नांवाबद्दल उद्धृत केला होता तो श्रीमंतांनीं पूर्ण केला आहे. तो असा " कृते तु पद्मनगरं त्रेतायां तु त्रिकंटकम् । द्वापरे तु ज-नस्थानं कलौ नाशिकमुच्यते ॥ " परंतु तो श्रीमंतांस मान्य नाहीं. नाहीं तर गणेशपुराणांती-ल ही कथा द्वापारयुगीन व कलियुगीन हाऊं पाहील. परंतु श्रीमंतांच्या मतीं हीं चारी नांवें नाशिकास सर्व युगामध्यें मर्जीप्रमाणें लावतां येत होतीं. परंतु गणेशपुराण पूर्वखंड अ० ७९ यांतील श्लोक ७, ८, ९ हे श्रीमंतांनीं पाहिलेच असतील; त्यांवरून हें जनस्थान अरण्य नसून पुरी आहे असें स्वच्छ ध्वनित होतें. शिवाय ब्रह्मपुराणाशीं याचा विरोध दृष्टीस पडतो, याचाही श्रीमंतांनीं विचार करावा. दुसरें मुद्गलपुराण. त्यां-तील तृ० खं० अ० २६ यांतील ४१ वा श्लोक श्रीमंतांना नाशिकीय जनस्थानसिद्ध्यर्थ फार पोषक आहे. व तसेंच सदरहू अध्यायाचा श्लो-क ४४ वामनरावजींना कृष्णानदीचा वाल्मीकीनें कां उल्लेख केला नाहीं, हा प्रश्न सोडविण्यास दिव्यदृष्टि देत आहे.

**स तत्र नाशिके रामो वासं चक्रे प्रहर्षितः ४१**
**ततो जगाम रामश्च सीतामन्वेषयन्वने ॥**
**कर्णाटे तत्र शैवं स क्षेत्रं मुख्यं ददर्श ह ॥४४॥**

हा दीड श्लोक दोघांची एकवाक्यता करण्यास पूर्वींच जर वामनरावजींस मिळाला असता तर हा येवढा वादच माजला नसता. तो प्रकार असा. श्रीमंतांच्या ह्मणण्याप्रमाणें राम नाशि-कास येऊन स्वस्थ बसता; व वाल्मीकीच्या ह्मणण्याप्रमाणें वामनरावजींनीं जो एक भ्रामक विरोध दक्षिणयात्रेसंबंधानें आणिला होता त्याचा या श्लोकानें कसा सुरेख निकाल लाव-ला आहे; त्याचप्रमाणें श्रीमंतांनाही कृष्णेबद्दल विरोध दाखविण्यास अवसरच न मिळता. राम जो एकदां नाशिकाहून निघाला तो नैऋत्य दिशेनें मुंबईच्या बाजूनें जाऊन थेट दक्षिणेला गोकर्णमहाबळेश्वरास गेला. तसें करण्यानें कृष्णा, चंद्रभागा, कोयना इत्यादि सर्व नद्या सहजच चुकल्या. मग वाल्मीकीनें त्यांचा उच्चार तरी कसा करावा? पण पुरावा फार उशीरानें आला, ह्मणून टाकावा लागतो. अस्तु. हें पुराण पुराव्यांत दाखल कर-ण्याच्या पूर्वीं जर श्रीमंतांनीं याच अध्यायाचा पूर्वभाग व उत्तरभाग लक्ष देऊन पाहिले असते तर हें पुराण अश्रद्धेय आहे—निदान हा अध्याय तरी अश्रद्धेय आहे—असें त्यांस खास वाटलें असतें. या अध्यायांतील रामक-थेला आरंभ करण्यापूर्वीं शिव ह्मणत आहे 'गणेशः स तु पुत्रो भूद्दशरथस्य भो मुने' (२८) पुढें ४७ व्या श्लोकांत तोच शिव ह्मणतो 'राम शृणु महाभाग त्वं वै विष्णुः सनातनः। भृगुशापेन जातोऽसि मानुषे देह-

धारकः ॥ ' तेव्हां रामोत्पत्तीबद्दल एकाच अध्यायांत इतका घोंटाळा आहे. तस्मात् सर्व अध्याय लिहिण्यांत शांभवी जास्ती झाली असावी असें समजून हें पुराण वाल्मीकिकथाविरोधक आहे ह्मणून अग्राह्य होय असें ह्मटल्यावांचून गत्यंतर नाहीं.

आतां आनंदरामायणांत स्पष्टपणें श्रीमंतांस अनुकूल असा भक्कम पुरावा आहे. तो उतरून न घेतां स्थलनिर्देश मात्र करितों. सारकांड सर्ग ७ सबंध; सर्ग १२ रामाचा लंकेंतून नाशिकावरून अयोध्येस व्युत्क्रम; यात्राकांड यामध्यें सर्ग ७ व ८ यांतही नाशिकीय जनस्थान व त्यापूर्वीचे अगस्त्याश्रम, तद्भ्रातुराश्रम, सुतीक्ष्णाश्रम वगैरेचें वर्णन श्रीमंतांस अत्यंत अनुकूल आहे. परंतु श्रीमंत या ग्रंथास विश्वसनीय मानीत नाहींत, हें ठीकच करितात. कारण यात्राखंडाचे द्वितीय सर्गांत श्लोक ६९ व ७० यांत शंकर पार्वतीस सांगतात " रामायणान्यनेकानि पृथगग्रे मुनीश्वराः । करिष्यन्त्यत्र शतशस्तानि सर्वाणि पार्वति ॥ वाल्मीकीयाद्विना देवि न ज्ञेयानि मनीषिभिः ॥ " तेव्हां या रामायणकारानें वाल्मीकीय रामायणास सोडून कितीही लिहिलें तरी त्याच्याच ह्मणण्याप्रमाणें तें असम्मत होय. परंतु या रामायणकारानें एक तोड सुचविली आहे ती वामनरावांच्या पक्षीयांनीं मान्य केल्यास श्रीमंतांचा व त्यांचा वादच होण्यास अवकाश रहात नाहीं. कोणताच पक्ष खोटा न ठरून दोघेही आपापल्या ठिकाणीं आपण खरे आहों असें समजून स्वस्थ बसूं शकतील. या रामायणांत सारकांड सर्ग तीन, श्लोक २२, यांत ह्मटलें आहे कीं– " कल्पभेदाद्वदंतीत्थं मुनयश्चापि केचन । नैकरूपास्ति सर्वेषु कल्पेषु रामसत्कथा ॥ " हें मानिल्यास सर्वच वाद विरघळला. एका कल्पामध्यें राम भद्राचलमीय जनस्थानास राहिला होता व दुसऱ्या कल्पांत नाशिकीय जनस्थानांत राहिला होता. ह्मणजे वाल्मीकीय रामायणाप्रमाणें भद्राचलमीय पर्णशाळेंत होता, व भावार्थरामायणीय कल्पांत अरुणावरुणासंगमाजवळच्या पंचवटींत होता ! तेव्हां तो वाद मिटलाच. अशी सोय असून श्रीमंत हा ग्रंथ अविश्वास्य ठरवून स्वपक्षघात करितात. अस्तु. या तीन्ही पुराणांचा श्रीमंतांस कांहीं जोरा मिळेल असें सकृतदर्शनीं वाटत होतें, परंतु वर निर्दिष्ट केलेल्या कारणांकरितां पुराव्यापुरते ते ग्रंथ अमान्य आहेत असें ह्मणावें लागतें.

यासंबंधानें श्रीमंतांनीं महाराष्ट्र व महाराष्ट्र-इंग्रजी असे पांच ग्रंथ घेतले आहेत. परंतु हे ग्रंथकार महाराष्ट्रीय असल्यामुळें महाराष्ट्रांत जनस्थान पंचवटी यांजबद्दल प्रचलित समजुती काय आहेत त्या त्यांनीं आपल्या ग्रंथांत नमूद केल्या आहेत. यापेक्षां त्यांनीं विशेष कांहीं केलेलें दिसत नाहीं. श्रीमंतांचें प्रथम ह्मणणें हें आह्मांस अविश्वास्य वाटत नव्हतें व तितक्याच बेतानें या पांच ग्रंथकारांचें ह्मणणेंही आह्मांस अविश्वास्य वाटत नाहीं; परंतु तें पुराव्यादाखल घेतां येत नाहीं. अशाच प्रकारें आणखीं पुरावे दोडशें वर्षांचे जुने पण महाराष्ट्रीयांच्या लेखांचे पाहिजे असल्यास श्रीमंतांनीं अंताजी माणकेश्वर व नारोशंकर यांचीं जनस्थान येथून गेलेलीं पत्रें ( आज छापून प्रसिद्ध आहेत तीं ) पहावीं. यांतील मुख्य ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट ही आहे कीं, एका पारड्यांत वाल्मीकिरामायण व दुसऱ्या बाजूला हे महाराष्ट्र ग्रंथकार घातले तर वजन

कोणाचें जास्ती भरेल हें निर्मल दृष्टीनें पाहिलें पाहिजे. आमच्या समजुतीनें श्रीमंतांचा हा पुरावा स्वस्कंधारोहणवत् आहे.

आतां बाकी राहिले आधुनिक विद्वान् ग्रंथकार. या वादासंबंधानें पाहतां हे ग्रंथकार फार नाहींत. पैकीं अस्मद्देशीय दोन व परस्थ तीन. डा. भांडारकर व कै. बाबू आनंदराम बरूहा या दोघांचीं मतें वामनरावजींनीं उतरून घेतलीं आहेत. त्याशिवाय श्रीमंतांच्या बाजूनें कांहीं नाहींत. मात्र भांडारकरांच्या दक्षिणेच्या इतिहासांत उद्धृत वाक्यांच्या पुढचा भाग श्रीमंतांस पुष्टिकारक वाटला आहे व ह्मणूनच त्यांनीं तो उतरून घेतला आहे. ज्या अर्थीं वामनरावजींनीं तो पुढचा भाग गाळला आहे त्याअर्थीं तो त्यांच्या पक्षास विघातक होता ह्मणून त्यांनीं तो बुद्धिपुरःसर गाळला असें श्रीमंतांस वाटतें. परंतु खरा प्रकार पूर्वापर विचार केला असतां असा दिसतो कीं, गाळलेला भाग डाक्टर भांडारकरांचें मत नसून मत्स्यपुराणकार काय ह्मणतात हें त्या भागांत दाखविलें आहे. वामनरावजींनीं पुराणकारांची योग्यता ते या वादांत कितपतशी मानीत होते हें बरेंच स्पष्टपणें सांगितलें असल्यामुळें हा अनुद्धृतांश घेऊन विश्लेषण करण्याचें त्यांचे मनांत नव्हतें. शिवाय डाक्टर भांडारकरांचा ग्रंथ सर्वांस सहज उपलब्ध होण्याजोगा होता; तेव्हां सर्व वाक्यांचा उद्धार करणें त्यांस* जरूर वाटलें नाहीं. परंतु बरूहाचा ग्रंथ दुर्मिळ असल्यामुळें जरी त्यांतील कांहीं अंश वामनरावांस विरोधक आहे असें श्रीमंतांनीं पुढें दाखविलें आहे तरी तो संबंध उतरून घेतला आहे. तेव्हां भांडारकरांचीं कांहीं वाक्यें गाळलीं आहेत ह्मणून श्रीमंतांनीं जो कटाक्ष ठेविला आहे, तो गैरसमजुतीचा परिणाम आहे असें ह्मणावें लागतें. या दोन ग्रंथकारांचें मत काय आहे हें पाहिलें तर हिंदुस्थानाच्या पूर्वबाजूला पूर्वकाळीं जाण्यायेण्याचा रस्ता होता व दंडकारण्यादि स्थळें पूर्वबाजूस होतीं. आतां कदाचित् प्राग्ज्योतिषपुरस्थ बरूहा सारख्यास हंपीसारखीं गांवें अमुकच ठिकाणीं आहेत असें माहित नसल्यास व त्यामुळें थोड्या दिशा चुकल्या असल्यास नवल नाहीं. श्रीमंतांसारख्यांसही नाशिकाजवळ राक्षसभुवन आहे असें वाटोवें, तेव्हां आसामस्थास बल्लारी जिल्ह्यांतील एक पहाड माहित नसावा यांत कांहींच नवल नाहीं. तेव्हां हे दोन ग्रंथकार वामनरावजींच्या बाजूचेच आहेत असें आह्मांस अद्यापि वाटतें. आतां राहिले इंग्रज ग्रंथकार. पैकीं व्हीलर साहेब श्रीमंतांच्या तर्फेचे आहेत व ही गोष्ट वामनरावजींस माहित होती; व त्यांच्या ह्मणण्याचा विचार आपल्या बाधक प्रमाणांच्या सदराखालीं त्यांनीं केला आहे. त्याची पुनरुक्ति येथें करणें नको. जोंपर्यंत वामनरावजींनीं दाखविलेले विरोध परिहार होत नाहींत तोंपर्यंत व्हीलर साहेबांची साक्ष श्रीमंतांस पुढें करितां येत नाहीं. आतां राहिले विल्सन साहेब व हंटर साहेब. श्रीमंतांनीं विल्सन साहेबांची उत्तररामचरिताच्या टिपणींतून ( Hindu Theatre मधून ) साक्ष घेतली आहे; परंतु तींत साक्षीदार काय ह्मणतो व त्याचा रोख काय आहे इकडे त्यांनीं लक्ष दिलें नाहीं. या योगें त्या साक्षीदाराची साक्ष त्यांस उपकारक झाली नाहीं. 'Tradition says' 'according to the comment' अशा सारखे सुटायाचे उपाय योजून साक्षीदार निसटून जात आहे हें श्रीमंतांच्या लक्षांत कसें आलें नाहीं याचें नवल

वाटतें. हीच गत हंटरच्या श्रीमंतांनीं कटाक्ष-पूर्वक दिलेल्या उताऱ्याची. वामनरावजींना परस्थ ग्रंथकार विशेष अनुकूल असा कानिंग्-ह्याम् हा आहे.

याप्रमाणें सर्व लेखी पुरावा पाहतां श्रीमं-तांचा पक्ष अगदीं निर्बल आहे असें ह्मणावें लागतें. वाल्मीकीच्या योग्यतेचा जोडीदार प्रतिपक्षास मिळे तोंपर्यंत या जुन्या वाल्मीकी-चाच पक्ष सबल राहणार. स्वपक्षमंडनार्थ मुख्य पुराव्यावांचून इतर कितीही पुरावा आणिला तरी तो जसा व्हावा तसा उपकारक हो-णार नाहीं.

पंचवटीस्थलनिर्णायक वादाबद्दल विचार-णीय अशी कांहीं विशेष मुद्याची बाब राहिली आहे असें वाटत नाहीं. दंतकथेच्या संबंधानें अशा वादांत विचार करूंच नये हें बरें असें सम-जून तो भाग गाळला आहे. या वादांत लंके-संबंधाचा एक पोटभाग आहे. त्यासंबंधानें आमचें येवढेंच ह्मणणें आहे कीं, लंकापुरीच्या स्थितीसंबंधानें वामनरावजींचा पक्ष श्रीमंतांनीं सुरेख ढासळून टाकिला आहे, व लंकाद्वीप हें सिं-हलाहून निराळें अशाबद्दल भागवतकाराचा जो श्रीमंतांनीं पुरावा दिला आहे तो वजनदार अस-ल्यामुळें चांगला विचारणीय आहे. परंतु लंकेला-च—ह्मणजे तिच्या शेष राहिलेल्या भागास—सिंहल ह्मणूं लागले असावें याचा नीटसा निर्णय श्री-मंतांनीं जोंपर्यंत केला नाहीं तोंपर्यंत यासंबंधानें आह्मी विशेष लिहूं इच्छित नाहीं.

प्रस्तुत **काव्यसंग्रहकारांस व शेट तुकाराम जावजींस** अशी सविनय सूचना आहे कीं, श्री-मंतांनीं आपला कार्यभाग हें पुस्तक छापल्या-नें उत्तम बजाविला आहे. तसाच त्यांनींही हा समग्र वाद आपल्या उत्तरासह व इतरांचे या वादासंबंधाच्या अभिप्रायांसह, आपला अखेरचा अभिप्राय देऊन, परिशिष्टरूपानें आपल्या ग्राह-कांस सादर करावा. त्यांत आपल्या तर्फेचा व श्रीमंतांचे तर्फेचा असे दोन नकाशे सामील केल्यास या वादाचें अध्ययन करूं इच्छिणारांवर अत्यंत उपकार होतील. हत्तीला सुपाचें ओझें होत नाहीं; तसें शेटजी सारख्या ज्ञानबुभुत्सूस हें कार्य अवघड वाटूं नये.

या वादापासून आह्मांस व इतर महारा-ष्ट्रीयांस एक विशेष फायदा असा झाला कीं, श्रीमंतांसारख्या वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व तपोवृद्धि गृहस्थांची अद्यापि ग्रंथनिरीक्षणलालसा व जिवापाड श्रम करण्याची अंगांतील तरतरी व ज्ञानबुभुत्सा ह्या आमच्या सर्वांच्या दृष्टीस पडल्या. नाहीं तर राजबिंड्या पुरुषांस जनस्थान कोठेंही असलें तरी काय करावयाचें आहे, अशा भ्रामक समजुतीचा अंगीकार करणारे पुष्कळसे आहेत. परंतु श्रीमंत तसे नसून वामनरावजीसारख्यांच्या कोनाकोपऱ्यां-तील लेखावर इतका परिश्रमपूर्वक विचार करि-तात, याहून त्यांचें गौरव करण्यास दुसरें साधन काय हवें ? असो. या अभिप्रायलेखांत कांहीं ‘ यदक्षरपदभ्रष्टं यात्राहीनं च यद्भवेत् । तत्सर्वं क्षम्यतां देव ’ अशी श्रीमंतांस प्रार्थना करून हा अभिप्रायलेख संपवितों.



## ब्राह्मणाचा स्वधर्म.

### १. श्रुति काय ह्मणते ?

श्रुति, स्मृति, पुराण—असे ब्राह्मणी शास्त्राचे तीन प्रकार आहेत. श्रुति काय ह्मणते ? श्रुतीच्या ह्मणण्याचा अर्थ काय होतो ? हेंच मुख्यत्वें करून पहाणें आहे.

" ब्राह्मणेन निष्कारणो धर्मः षडङ्गो वेदोऽध्येयो ज्ञेयश्च " असें श्रुति ह्मणते. " ब्राह्मणानें कोणताही हेतु न धरतां धर्म ( प्रतिपादन करणारा ) सहा अङ्गांचा वेद ह्मणावा आणि जाणावा " असा या श्रुतीचा शब्दार्थ होत आहे; अर्थांतच धर्म प्रतिपादन करणारा सहा अङ्गांचा वेद कोणताही हेतु न धरतां ह्मणणें आणि जाणणें हा ब्राह्मणाचा स्वधर्म होत आहे.

" विद्या ह वै ब्राह्मणमाजगाम—'गोपाय मा, शेवधिष्टेऽहमस्मि' " अशी ही एक श्रुति आहे. "विद्या खरोखरीच ब्राह्मणाजवळ आली ( आणि ह्मणाली )—'माझा सांभाळ कर, मी तुझें पुरलेलें द्रव्य आहें' " असा या श्रुतीचा शब्दार्थ होतो. " विद्या " हें वेदाचेंच जास्त जुनाट नांव आहे.

विद्येनें ब्राह्मणाजवळच कां यावें ? ब्राह्मणासच अशी माळ कां घालावी ? क्षत्रियास किंवा वैश्यास अशा प्रकारें माळ कां घालूं नये ? जसा ब्राह्मणास वेदविद्येचा अधिकार आहे, तसा क्षत्रियास आहे, तसाच वैश्यास आहे. असें असतां ब्राह्मणाजवळच अशा प्रकारची लाडीगोडी विद्येनें कां लावावी ? तर ब्राह्मणाचें ह्मणणेंजाणणें जसें निर्हेतुक असण्याचा संभव असतो, तसें क्षत्रियवैश्याचें ह्मणणेंजाणणें निर्हेतुक असण्याचा संभव नसतो. क्षत्रियाचा हेतु राज्याची चतुःसीमा आणि वैश्याचा हेतु पैसा वाढवण्याचा असण्याचा संभव असतो. क्षत्रिय आणि वैश्य हे कदाचित् परक्याच्या मुलुखाचा आणि पैशाचा अपहार करण्याकडे अनुक्रमें ह्मटल्याजाणलेल्या विद्येचा उपयोग करतील; लोभानें तोंडास पाणी सुटलें ह्मणजे स्वार्थ साधून घेण्यासाठीं अर्थाचा अनर्थ करूं लागण्याचा संभव पुष्कळ आहे. ब्राह्मण विद्या ह्मणतो जाणतो, तो कोणताही जगिक हेतु धरून ह्मणतजाणत नसतो; त्यास मुलुखाची किंवा पैशाची चाड नसते. ह्मणणेंजाणणें जगबुडीपर्यंत चालू रहावें आणि बरेंवाईट आपणास कळून, तें प्रसंगीं परक्यासही कळवतां यावें—इतक्याच हेतूनें ब्राह्मणाचें ह्मणणेंजाणणें होत असतें; अर्थांतच त्याच्याकडून अर्थाचा अनर्थ होण्याचा संभव नाहीं. तो उजेडास उजेड आणि काळोखास काळोख ह्मणणार; बरें असेल किंवा दिसेल, तें बरें ह्मणणार आणि वाईट असेल किंवा दिसेल, तें वाईट ह्मणणार. असा प्रौढ विचार करून, विद्येनें क्षत्रियवैश्यास सोडून दिलें आणि ब्राह्मणासच माळ घातली; ब्राह्मणानेंही विद्येस राजीखुशीनें आपल्या गळ्यांत माळ घालूं दिली. जो ब्राह्मण ह्मणवूं लागला, त्यानें आपला देह चन्दनाप्रमाणें परार्थास वाहिला आणि परार्थाच्या सिंहासनापुढें स्वार्थाचा धूप जाळण्यास आरंभ केला. वेदाचें ह्मणणेंजाणणें " निष्कारण " झालें किंवा होऊं लागलें ह्मणजे ब्राह्मणानें स्वधर्म राखला, ब्राह्मण स्वधर्मानें चालला.

### २. ह्मणण्याजाणण्याची मीमांसा.

ह्मणणें दोन प्रकारचें आहे—अर्थाशिवाय आणि अर्थासहित. दशग्रंथ्यांचें ह्मणणें अर्था-

शिवाय असतें. षडंगेंही दशग्रंथी ह्मणतात, पण त्यांचा अर्थ त्यांस कळत नसतो. शास्त्र्यांचें ह्मणणें अर्थासहित असतें, अर्थाशिवाय नसतें. न्यायशास्त्र्यास न्यायशास्त्राचा, व्याकरणशास्त्र्यास व्याकरणशास्त्राचा, धर्मशास्त्र्यास धर्मशास्त्राचा, वेदान्त्यास वेदान्ताचा अर्थ कळत असतो. वैदिक किंवा भट भिक्षुक असतात, त्यांचें मात्र अर्थाशीं वांकडें असतें. शास्त्री ह्मटला कीं तो पुराणीक कां असेना ?–त्यास अर्थ कमजास्त मानानें कळत असतो.

याप्रमाणें ह्मणणें आज जेमतेम होत असतें, पण जाणणें मात्र मुळींच होत नसतें; जाणण्याची दिशाही आज कळलेली नसते.

अवयवीच्या एका अवयवाची त्याच्याच दुसऱ्या अवयवाशीं, एका अवयवीच्या एका अवयवाची दुसऱ्या अवयवीच्या अवयवाशीं, एका अवयवीची दुसऱ्या अवयवीशीं तुलना करतां येणें; जसे अवयवीचे, तसे त्याच्या त्या त्या अवयवाचेही गुणावगुण लक्षांत भरणें; प्रत्येक विशेषनामाची–जशी भूगोलीक किंवा इतिहासीक, तशी जितकी ह्मणून शक्य असेल, तितकी–सगळी माहिती मिळालेली असणें; हें सगळें जाणण्याचें लक्षण होय. पूर्वींचा आमचा समाज आमच्या आजच्या समाजाशीं किंवा दुसऱ्या कोणत्याही भूत अगर वर्तमान समाजाशीं ताडून पाहाणें व ताडतां येणें हेंही जाणणेंच होय.

शाकुंतल नाटक हा एक अवयवी, मालतीमाधव हा दुसरा अवयवी. दुष्यन्ताचा कित्ता चांगला कीं शकुंतलेचा चांगला ? कीं दोहोंचा सारखाच ? दुष्यन्तासारखे राजे किंवा मुलगे आज झाल्यानें रयतेस किंवा वडिलांस सुख होईल कीं दुःख होईल ? शकुंतलेसारखी मुलगी बहीण वागली, तर बापाभावास बरें वाटेल कीं वाईट वाटेल ? शकुंतला आणि मालती किंवा दुष्यन्त आणि माधव, यांच्यामध्यें पहिल्या स्त्रीपुरुषांच्या जोडीचा कित्ता वळणदार ह्मणून आजच्या संततीपुढें ठेवावा कीं दुसऱ्या स्त्रीपुरुषांच्या जोडीचा ? दुष्यन्त आणि माधव अगर शकुंतला आणि मालती या जोड्यांमध्यें जास्त गुणी कोण ? जास्त अवगुणी कोण ? रघुवंशाच्या चवथ्या सर्गांत "हूण" (तत्र हूणावरोधानाम्) आणि "यवन" (यवनीमुखपद्मानाम्) अशा दोन म्लेंच्छांच्या जाती आल्या आहेत. तर या कोठल्या ? यांचें मूळ ठिकाण होतें कोठें ? यांचा अम्मल चालला कोठें? यांचा इतिहास किती कळत आहे किंवा कळणें आज शक्य आहे ? आमच्या पूर्वींच्या समाजाशीं आमच्या आजच्या समाजाचा सारखेपणा किती आहे ? किंवा दोहोंमध्यें अंतर पडलें असल्यास तें किती व कां पडलें आहे ? या सगळ्या आणि यांच्याचसारख्या दुसऱ्याही बाबी जाणण्याच्या होत.

एक एक, दोन दोन किंवा तीन तीनही शास्त्रें अध्ययन केलेले शास्त्री आज बरेच सांपडतील. "नलोपः प्रातिपदिकान्तस्य" असल्या सूत्रांवर तासतास भवति–न–भवति एकसारखी झडण्यास कमी होणार नाहीं. सूत्रांवर सूत्रें आणि ग्रंथांवर ग्रंथ बऱ्याच शास्त्र्यांच्या कण्ठगत झालेले आढळतील. अलंकाराची बाब आली कीं तासतास गीर्वाण वाणीमध्यें अस्खलित भाषण चालेल. पण वरच्यासारख्या बाबी पुढें मांडल्या कीं यांची अतिकुशाग्रही बुद्धि बोंथट झाली ! पाणिनीच्या दृष्टीनें ब्राह्मणें संहितेहून कमी मातब्बरीचीं ठरतातसें ह्मटलें कीं हे दचकले; वेदाचा बराच भाग ऋषींस कलियुगांतच दिसलेला असून, गोवध वगैरे बऱ्याच अपूर्व भास-

णाऱ्या चालींनीं व आज्ञांनीं भरलेलें आश्वलायनाचें गृह्यसूत्र कलियुगांत आणि कलियुगांतल्यांचसाठीं लिहिलेलें ह्मटलें कीं यांचा मेंदू एकदम थंड पडला ! असें कां ? तर जाणणें नाहीं, ह्मणून.

**३. " उपांगें"हीं ह्मटलींजाणलीं पाहिजेत.**

श्रुतीनें सहा अंगांचाच उल्लेख केलेला आहे. शिक्षा, ज्योतिष, निरुक्त, छंद, कल्प, व्याकरण, हीं वेदाचीं ६ अंगें मानलीं आहेत. पण अर्थासहित ह्मणण्यास इतकीं अंगें ह्मणून काम होत नाहीं; जाणण्याची कथा दूर राहिली. "इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत् " असें स्मृति ह्मणत आहे. " इतिहास आणि पुराण या दोहोंनीं वेदास बळकटी आणावी." तरी देखील स्मृतीचें समाधान होईना. शेवटीं " बिभेत्यल्पश्रुताद् वेदो मामयं प्रहरेदिति " असा शेरा स्मृतीनें मारून ठेवला आहे. जितका ह्मणून " बहुश्रुत " असेल, तितक्यास वेदाचें मर्म जास्त कळेल; कारण " 'हा मला छिन्नभिन्न करील' ह्मणून अल्पश्रुतास वेद भितो. " बहुश्रुतपणा जितका येईल, तितका वेदाचा अर्थ करतांना हवा आहे. ह्मणून इतिहासपुराणांप्रमाणें ज्या दुसऱ्याही विद्या आहेत, त्या सगळ्या " उपांगें " होत आहेत.

याप्रमाणें सांगोपांग वेद ह्मणणें जाणणें हा प्रत्येक ब्राह्मण ह्मणवणाराचा स्वधर्म होय. जर ब्राह्मणपणा हवा, तर स्वधर्मानें चाललें पाहिजे; वेदाच्या सांगोपांग ह्मणण्याजाणण्याकडे लक्ष पहिल्यानें पोंचवलें पाहिजे.

**४. श्रुतीच्याच आधारानें जास्त खुलासा.**

श्राद्धामध्यें " पुनन्तु मां ब्राह्मणपादपांसवः " असें एक वचन येतें. ब्राह्मणांची पायधूळ डोकीवर घेण्यास क्षत्रियवैश्याची तयारी असे, ती ठीक असे. या वचनांत यजमानाचें ह्मणणें आहे. पूर्वींच्या काळीं यजमानपणा क्षत्रियवैश्यांकडे; ब्राह्मण त्यांच्या घरीं श्राद्धाचे प्रसंगीं जेवीत, तेव्हां क्षत्रियवैश्य त्यांची पायधूळ डोकीवर ठेवीत आणि "आपण पावन झालों" असें समजत. पण ते क्षत्रियवैश्यांचे घरीं जेवणारे पुरुष " ब्राह्मण " होते. आज जर क्षत्रियवैश्य नाहींत, तर ब्राह्मण तरी कोठें आहेत ? आजच्या भटांची पायधूळ आगीसारखी ज्याच्या मस्तकावर पडेल, त्यास जाळून खाक करून टाकण्याचाच संभव जास्त, पावन करून सोडण्याची गोष्ट दूर राहिली. " पुनंतु माम् " संपल्यानंतर, लगेच " यावतीर्वै देवतास्ताः सर्वा वेदविदि ब्राह्मणे वसंति, तस्माद् ब्राह्मणेभ्यो वेदविद्भ्यो दिवे दिवे नमस्कुर्यान्नाश्लीलं कीर्तयदेता एव देवताः प्रीणातीति" अशी एक श्रुति ह्मणतात. " जितक्या ह्मणून देवता, त्या सगळ्या वेद जाणणाऱ्या ब्राह्मणामध्यें रहातात; ह्मणून वेद जाणणाऱ्या ब्राह्मणांस दरदिवस नमस्कार करावा [ त्यांच्या विषयीं ] भलतें सलतें बोलूं नये; कारण याच देवता ( वेद जाणणारा ब्राह्मण ) प्रसन्न करून ठेवतो " असा या श्रुतीचा अर्थ होतो. पूर्वींचे ब्राह्मण वेद जाणणारे होते, त्यांस "ब्राह्मण" शब्द शोभत होता; आज श्राद्धें झोडणारे असतात, त्यांच्यापैकीं शेंकडा नव्याण्णवांस सगळी संहिताही येत नसते, सांग वेदाची गोष्ट एके बाजूस राहिली ! यांचें ह्मणणें अर्थाशिवाय असून तेंही श्राद्धसंकल्पाच्या फारसें पलीकडे गेलेलें नसतें. असल्यांस " ब्राह्मण " शब्द शोभत नाहीं, असल्यांस " भट " शब्दच शोभतो. ब्राह्मणांस प्रत्येक क्षत्रियवैश्यानें नमस्कार करणें जर योग्य आहे, तर शूद्रातिशूद्रानेंही तो करणें सुतराम् योग्य आहे. जो ब्राह्मण

असेल, त्यास क्षत्रियवैश्याप्रमाणें शूद्रातिशूद्रासही प्रसंगीं आपल्या पायधुळीनें पावन केल्याशिवाय सुटका नाहीं; एकनाथाच्या धोरणानें जाऊन,द्वादशीच्या पारण्यानें महारांचेंही खोंपट पावन केल्याशिवाय गति नाहीं. जो भट असेल त्याची गोष्ट उघड निराळी; त्याचा भटपणा कुळंब्याच्या शिंवाशिंवीनें कांचे सारखा पिचकन फुटणार; महाराच्या सावलीनेंही—जसा आगीनें, तसा—पापडासारखा वरखालीं फुगून निघणार. मोठमोठ्या दिग्विजयी राजाधिराजांनीं आणि कोटिनारायणांनीं ब्राह्मणाची पायधूळ एखाद्या अमोलिक रत्नाप्रमाणें किंवा सुवासिक फुलाप्रमाणें आपल्या डोकीवर ठेवावी, हा काय त्याचा लहानसान मान ?

कोरड्या ह्मणण्याची श्रुतीनेंच ठांसून निन्दा केली आहे. "नानुध्यायाद् बहून् शब्दान्, वाचो विग्लापनं हि तत् " ही एक श्रुति. " पुष्कळ शब्दांची कोरडी घोकंपट्टी चालवूं नये, ती वाणीस शीण आणणारी ( होते ) " असा अर्थ या श्रुतीचा होतो. " यदधीतमविज्ञातं निगदेनैव शब्द्यते। अनग्नाविव शुष्कैधो न तज्ज्वलति कर्हिचित् " ही दुसरी श्रुति. " जें ऋटलेलें ( आणि ) न जाणलेलें नुसत्या पाठानें ह्मणण्यांत येतें, तें अग्नी नसणाऱ्या ठिकाणीं सुक्या लांकडाप्रमाणें कधींही पेटत नाहीं "असा या दुसऱ्या श्रुतीचा अर्थ आहे. जर अग्नि नाहीं,तर सुक्या लांकडापासून बाहेरचा उजेड किंवा बाहेरची उष्णता मिळणें नाहीं; जर जाणणें नाहीं, तर कोरड्या ह्मणण्यापासून आंतला उजेड किंवा आंतली उष्णता हातीं लागणें नाहीं. " स्थाणुरयं भारहार: किलाभूदधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम् " ही तिसरी श्रुति. " जो वेद ह्मणून अर्थ जाणत नाहीं, तो खरोखरीच ( निव्वळ ) भार झालेला ( असा ) फांद्या तोडलेला वृक्ष झाला " असें ही श्रुति ह्मणत आहे. सारांश, श्रुतीस कोरडें ह्मणणें नको आहे.

" जाणावा " इतकेंच श्रुति ह्मणत आहे; अर्थ कळला कीं श्रुति समजली. " ह्मणावा " ह्मणजे पाठ करावा, " जाणावा " ह्मणजे अर्थ समजून घ्यावा–याप्रमाणें पाठ होऊन, अर्थ जसातसा समजूं लागला कीं " अध्येयो ज्ञेयश्च " या श्रुतीची मजल संपली. जाणण्याचें अकांडतांडव निव्वळ स्वकपोलकल्पित दिसतें, असा आक्षेप कोणी घेईल, तर पाण्यांत थोडें खोल शिरल्यास बरें.

" उत त्वं सख्ये स्थिरपीतमाहुर्नैनं हिन्वंत्यपि वाजिनेषु । अधेन्वा चरति माययैष वाचं शुश्रुवां अफलामपुष्पाम्. " " त्वम् "=एकम्, " वाजिनेषु "=वागिनेषु=वागीश्वरेषु, " शुश्रुवां "=शुश्रुवान्.

ज्यास वेदाचा अर्थ कळतो, तो वेदाचा अर्थ " प्यालेला " ह्मणतां येईल. पण एक दोन प्याले झोडल्यानें हें पिणें चांगलेसें होत नाहीं. तर रेवतीच्या हातचे प्याल्यांवर प्याले बळीराम जसा झोडीत असे, तसा जो बळी ब्राह्मण वेदविद्येच्या हातचे प्याल्यांवर प्याले झोडणार, त्यासच " स्थिरपीत " शब्द लागणार. एकदां दोनदां प्याला झोडून जेमतेम अर्थ कळलेले " अल्पपीत " होत, " स्थिरपीत " नव्हत. जो " स्थिरपीत " असेल, त्याचें वेदाशीं " सख्य " झालें खरें. " स्थिरपीत "पणाच्या पायावर उभारतां आलेली वेदाशीं सख्याची पक्की इमारत ब्राह्मणास हवी, " अल्पपीत–" पणाच्या पायावर उभारतां आलेली कच्ची इमारत त्यास नको. याप्रमाणें जो " पीत्वा पीत्वा

पुनः पीत्वा, उत्थाय च पुनः पीत्वा " बनलेला असेल, " त्याच्याशीं सामना करण्याची मोठमोठ्या पंडितांचीही छाती नाहीं. फळ न लागलेली, फूल न लागलेली वाणी ऐकणारा हा दुभती नव्हे अशी गौडबंगाली ( गाय ) बरोबर घेऊन भटकत फिरतो. " वाणीस जसें फूल लागतें, तसें फळही लागतें-असें ही श्रुति स्पष्ट सांगत आहे. फळाफुलाची वाणी ऐकणारा, फुलाची वाणी ऐकणारा, फळाफुलाशिवाय वाणी ऐकणारा—असे वाणी ऐकणारांचे ३ वर्ग ही श्रुति दुसऱ्या अर्धांत करीत आहे. पहिल्या अर्धांतला " स्थिरपीत " प्रत्यक्ष दिसत आहे, तो फळाफुलाची वाणी ऐकणारा समजावा. " अल्पपीत " अनुमित केला आहे, तो फुलाची वाणी ऐकणारा ठरतो. " स्थिरपीत " आणि " अल्पपीत " पुढें आले, ह्मणजे पाठीमागचा " अपीत "ही हळूच पुढें ओढावा लागत आहे. हा " अपीत " फळाफुलाशिवाय वाणी ऐकणारा ह्मणावा.

" उत त्वः पश्यन्न ददर्श वाचमुत त्वः शृण्वन्न शृणोत्येनाम् । उतो त्वस्मै तन्वं विसस्रे जायेव पत्य उशती सुवासाः " हीही श्रुति सुप्रसिद्ध आहे. " त्वः "=एकः. " त्वः " शब्द सर्वनाम समजतात. " एक वाणीस पहात असतां पहात नाहीं, ऐकत असतां ऐकत नाहीं. " " ऐकत असतां ऐकत नाहीं " ह्मणजे "ज्यास अर्थ बिलकुल कळत नाहीं;" " पहात असतां पहात नाहीं " ह्मणजे "ज्यास अर्थ जेमतेम किंवा बराच कळतो." यांच्यापुढें वाणी आपलें शरीर उघडें करीत नाहीं; तर पुढें या दोहोंहूनही जो निराळा असा तिसरा असतो," त्याच्या पुढें वाणी-जशी ( लग्नाच्या ) नवऱ्यापुढें प्रेमानें भरलेली ( आणि ) शोभणारें लुगडें नेसलेली ( लग्ना )ची बायको, तशी आपलें शरीर उघडें करते. " विद्या ही ब्राह्मणाची लग्नाची बायको, ब्राह्मण हा विद्येचा लग्नाचा नवरा. पण ब्राह्मण कोणता ? आजचा भट किंवा शास्त्री नव्हे; नुसती घोकंपट्टी करणारा भट किंवा वेदाचा जेमतेम अर्थ लावूं पहाणारा शास्त्री यांचें पुण्य वेदविद्येनें आपलें शरीर उघडें करावें इतकें खास नसतें. जो ब्राह्मण जाणता असेल, त्याच्या पुढें वेदविद्या आपलें शरीर उघडें करणार; पण आजचे भट आणि शास्त्री नेणते किंवा जेमतेम अर्थ करणारे पडतात. जर आज जाणणें मुळींच लोपलें आहे, जर आज जाणतेपणा हद्दपार झालेला दिसत आहे, तर सौभाग्य गेलेंसारखें वाटणाऱ्या वेदविद्येनें खेळायाचें तरी कोणापुढें ?

सारांश, जाणणें या मानसिक पदार्थाचा श्रुतींनेंच नीट खुलासा करून ठेवला आहे. याप्रमाणें जे जाणते ब्राह्मण असतील, त्यांची पायधूळ कोणासही पावन करणारी-जशी पूर्वीं झाली, तशी-आजही होईल.

राजाराम रामकृष्ण भागवत.

[ पुढील अंकांत संपूर्ण. ]



# फिरंग्यांची इकडील हकीकत.

( मागील अंकावरून पुढें चालू. )

हिंदुस्थानांतला माल दोन वाटांनीं युरोपखंडामध्यें जाऊन दाखल होत असे. एक वाट आशिया खंडांतून होती, दुसरी आफ्रिकाखंडांतून होती. खंबायत व कलिकत या दोन हिंदुस्थानांतल्या मालाच्या उतारपेंठा होत्या. खंबायतेहून किंवा कलिकताहून माल हुरमुझला व हुरमुझहून इराणी अखातांतून युफ्राता नदीच्या मुखाजवळ बसोरा मुक्कामीं जाई; पुढें तेथून लंबाणांच्या मार्फत भूमध्य समुद्रावर बैरुत बंदरीं जाई. बैरुत बंदरच्या खेपा करणारे जसे वेनिशी व जिनोवी होते, तसे कातालोनीही होते. बैरुत उतारपेंठेंतून ही खेपा करणारी त्रिकूट मंडळी त्या त्या देशीं माल नेऊन पोंचवी. याप्रमाणें जो माल हुरमुझ मुक्कामीं जाई, त्याची व्यवस्था लागे. जो माल एदन मुक्कामीं जाई, त्याची निरवानिरव आफ्रिकाखंडांतल्या वाटेनें लागे. एदनमध्यें भरलेला माल तांबड्या समुद्रांतून सुएझ मुक्कामीं जाई; पुढें सुएझहून कैरो मुक्कामीं लंबाणांच्या मार्फत पोंचे, आणि कैरोहून नीलनदीमधून शिकंदर्या बंदरीं दाखल होई. शिकंदर्या बंदरीं माल दाखल झाला कीं तेथून युरोपांतल्या त्या त्या पेंठेमध्यें जाऊन घुसला समजावा. याप्रमाणें हिंदुस्थानच्या मालाची एक उतारपेंठ हुरमुझ असून, दुसरी उतारपेंठ एदन होती. खंबायत आणि कलिकत या जशा उतारपेंठा होत्या तशा तळपेंठाही होत्या. हुरमुझ व एदन या तळपेंठा असण्याचा संभव नाहीं, या निव्वळ उतारपेंठाच दिसतात.



फिरंग्यांनीं राजरोस चांचेपणा आरंभून चारपांच वर्षें जेव्हां एकसारखी धामधूम चालविली, तेव्हां मिसर देशाच्या सुलतानानें पहिल्यानें पोपाची कानउघाडणी केली. "जर लागावी तशी दाद न लागली तर यरूशलममधलीं सगळीं पवित्र स्थळें फडशा करून टाकूं" अशी धास्ती सुलतानानें पोपास घातली.

आतां या स्थळीं विचार करण्यासारखी एक गोष्ट आहे, ती ही कीं, कानउघाडणी फिरंग्यांची करावयाची ती सोडून देऊन सुलतानानें पहिल्यानें बोलणें चालवलें तें पोपाशीं कां चालवलें? उजू फिरंग्यांशींच कां चालवलें नाहीं? या गोष्टीचा विचार करण्यास इ. १२ व्या शतकाच्या दुसऱ्या अर्धापर्यंत आणि प्रसंगीं ८ व्या शतकापर्यंत पाठीमागें गोलांटी मारली पाहिजे.

पोपांची सत्ता मुळची आध्यात्मिक होती. धर्माधिकारी ह्मटला कीं त्याची सत्ता आत्म्यावर बसली. पण हळू हळू पोपांनीं दर्बारी सत्ताही हातीं बळकावलेली दिसते. इ. १२ व्या शतकांत पोपांचा जर्मनीच्या बादशहाशीं झगडा चालू होता. बादशहाचें ह्मणणें असें असे कीं "मी मान्य करीन, तेव्हां पोपास पोपकी येईल." "मीं कबूल करीन व मुकुट डोकीवर ठेवीन, तेव्हां बादशहास बादशाहकी येईल"—असें पोपाचें ह्मणणें असे. जर पोप आपल्या आध्यात्मिक अधिकाराबाहेर ढवळाढवळ न चालवते तर त्यांच्या अधिकारामध्यें बादशहाही हात न घालते. पण सत्तेची गोडी एकदां ज्यास लागली, त्यास ती प्रसंगीं वेडा करते. पोपांस एकदां दर्बारी सत्तेची गोडी लागली आणि तिनें अखेरीस त्यांस वेडें करून टाकलें. या वेडाचे पायीं अखेरीस पोपांची एकछत्री आ-

ध्यात्मिक सत्ता होती ती नाहींशी होऊन, पोपाचें नांव निघालें कीं आंगाचा तिळपापड व्हावा अशी बऱ्याच राष्ट्रांची स्थिति होऊन गेली. बादशहानें रूम मुक्कामीं येऊन पोपाची रिकब्बी धरावी आणि पुढें पोपानें बादशहाच्या डोकीवर मुकुट ठेवून त्यास रूम्यांचा बादशाहा बनवावें—अशी वहिवाट पडली होती किंवा पाडण्यांत आली होती. पोपाची रिकब्बी धरली, ह्मणजे पोपाचें समाधान झालें; रूमची बादशाही मिळाल्यानें बादशहाचें समाधान झालें—अशी एकमेकांची समजूत करण्यासाठीं व्यवस्था वाईट नव्हती. बादशहानें रिकब्बी धरली कीं बादशहा बंद्यासारखा झाला, असें पोप समजे; धर्माधिकारी हा देखावा स्वतःच्या डोळ्यांनीं पहात; इटालीभर लौकरच ही बातमी फैलावत असे. याप्रमाणें आपला अधिकार बादशहानें कबूल करावा, ह्मणून कांहीं खाऊ ह्मणून दाखवणें आवश्यक होतें. ज्यानें "रूमची" किंवा "रूम्यांची बादशाहकी" हा अपूर्व असा एक शब्द रूमची बादशाहकी रसातळास गेल्यानंतरही जन्मूं लावला, त्यानें खरोखरच मात केली ह्मटली पाहिजे. रूमची बादशाहकी बुडून किती तरी वर्षें या काळीं गेलीं होतीं. कुस्तुन्तुनियाच्या बादशहांनीं कैक वर्षें—रूमचे बादशाहा पुरे रसातळीं गेल्यानंतर—रूमची खरी बादशाहकी बरीच भोगिली होती. पण पुढें जेव्हां कुस्तुन्तुनिया मुक्कामीं पुतळ्यांची पूजा बंद करण्यांत आली, तेव्हां पोपांनीं पुतळ्यांचा कैवार घेतला आणि कुस्तुन्तुनियाकरांचा अंमल युक्तीनें झुगारून देऊन स्वतंत्रपणा कमावला. या काळापासून दरबारी सूत्र हळू हळू पोपांनीं हातीं घेणें चालवलें. कुस्तुन्तुनियाकरांशीं सामना करतां येण्यासारखा जोर पोपांच्या मनगटांत असणार कोठून ? त्यामुळें पोपांची प्रवृत्ति इटालीच्या बाहेरच्या लोकांशीं जास्त घरोबा ठेवण्याकडे झाली. अर्थातच जे धर्माधिकारी ह्मणून नांवाजले होते, त्यांनीं व त्यांच्या मसलत्यांनीं मुत्सद्दीपणाचा विडा उचलला.

याप्रमाणें इ. १२ व्या शतकांतल्या झगड्याचें मूळ शोधणें असल्यास इ० ८ व्या शतकापर्यंत आणखीं पाठीमागें गोलांटी मारली पाहिजे. तर इ० ८ व्या शतकांतली हकीकत आतां दाखल करणें बरेंच प्रासंगिक होत आहे. ही हकीकत कळल्यानें, पोपांच्या हातीं राजसत्ता गेली कशी, तें थोडक्यांतच लक्षांत येईल.

कुस्तुन्तुनियाचा बादशहा तिसरा लीओ याची कारकीर्द, इ० ७१७ पासून इ०७४१ पर्यंत चालली. इ० ७३१ त तिसरा ग्रेगोरी या पोपानें या बादशहावर पुतळेपूजा बंद केल्यामुळें बहिष्काराचा कोरडा ओढला. लीओचा मुलगा कुस्तुनीन यानेंही बापाचा कित्ता वळवला. हा इ० ७७१ मध्यें वारला. याच्या पाठीमागें चवथा लीओ यानेंही हेंच वळण वळवलें. चवथा लीओ इ० ७८० त विषप्रयोगानें मारलेला दिसतो. याप्रमाणें इ० ७३१ पासून तों इ० ७८० पर्यंत कुस्तुन्तुनियाकरानें पोपावर आणि पोपानें कुस्तुन्तुनियाकरावर उघड शस्त्र उचललेलें होतें. इ०७४१ त तिसरा ग्रेगोरी यानें फ्रान्समध्यें जाऊन पेपिनचा बाप चार्ल्स याला आपल्या बाजूस ओढण्याचा यत्न केला होता. या काळीं फ्रान्सचे राजे बाहुल्यासारखे झालेले असून, सगळी सत्ता त्यांचे खानगीकडचे पेशवे होते, त्यांनीं बळकावली होती. पेपिनचा बाप चार्ल्स हा 'पेशवा' नांव कमावलेला होता. कुस्तुन्तुनियाकर हे जरी पोपाचे शत्रु होते, तरी ते पुष्कळ दूर होते. पोपांस दाराजवळच

एक मोठा शत्रु उत्पन्न झाला होता. लोम्बार्द नांवाचे लोक होते, ते इटालीच्या सरहद्दीवर वसलेले असून, त्यांनीं उत्तर इटालीचाही कांहीं भाग बळकावला होता. यांच्या पोपांशीं नेहेमीं कटकटी चालत. ग्रेगोरीचा मोठा हेतु लोम्बार्दांची मस्ती चार्ल्सनें मोडावी हा होता. पण चार्ल्सनें फ्रान्सच्या घरगुती खटपटींत हात गुंतलेला राहिल्यामुळें ग्रेगोरीस मदत करण्याचें नाकारलें. कुस्तुन्तुनियाकरावर बहिष्काराचा कोरडा ओढलेला असल्यामुळें त्याच्याशींही कमजास्त मानानें कटकटी चालल्याच होत्या; त्यामुळें बादशाही मदतीची आशा ग्रेगोरीस बिलकुल नव्हती. याप्रमाणें लोम्बार्दांशीं तह करून आपली अब्रू कशीतरी वांचवणें हीच एक वाट ग्रेगोरीस या काळीं राहिली होती; अर्थातच पुतळेपूजेचें स्तोम माजवल्यामुळें, दुसरा ग्रेगोरी ( इ० ७१५–७३१ ) व तिसरा ग्रेगोरी ( इ० ७३१–७४१ ) या जोडीस स्वातंत्र्याचा रोपा रूम मुक्कामीं लावण्यास सवड सांपडली. पुतळेपूजेचें स्तोम माजवून, अज्ञांच्या मनांत कुस्तुन्तुनियाकराविषयीं द्वेष आणि आपणांकडे ओढा उत्पन्न केला, हा ग्रेगोरी जोडीचा मुत्सद्दीपणा लहान नव्हे. पुतळे व चित्रें बनविण्याचा किंवा काढण्याचा धंदा "मङ्क" नांवानें नांवाजलेले क्याथोलिक संन्याशी होते, ते करीत. त्यामुळें सगळे "मङ्क"ही ग्रेगोरींनीं आपल्या बाजूस ओढले. हें लहानसें बंडच इटालींतल्या रयतेच्या तोंडीच्या धर्माधिकाऱ्यांनीं कुस्तुन्तुनियाकर प्रभूच्या उलट केलें, हें तत्व ह्मणावें लागतें.

"पुतळेपूजा केली पाहिजे" अशी खिस्ताची आज्ञा नाहीं; अर्थातच पुतळेपूजा खिस्ती धर्मीच्या ठरींव सिद्धान्तांपैकीं नव्हे. तशांत खिस्त यहुदी होता आणि यहुदी ह्मटले कीं, पुतळ्यांच्या किंवा बाहुल्यांच्याच नव्हे, तर चित्रांच्याही विरुद्ध असत. रूम्यांचा जरीपटका जेव्हां जेव्हां यरूशलममध्यें आला, तेव्हां तेव्हां यहुद्यांनीं धुमश्चक्री माजविली, प्रसंगीं बंडही केलें होतें. यहुदी ह्मटला कीं तो चित्रांचाही कट्टा द्वेषी; पुतळेपूजा किंवा चित्रपूजा खिस्तास थोडीही मान्य असण्याचा संभव नव्हता; तर ती निव्वळ अमान्य होती, असेंच–खिस्त जातीनें यहुदी होता, हें लक्षांत एकदां पडल्यास–समजणें व ह्मणणेंही भाग पडतें. जर पट्टशिष्यांशिष्यांमध्यें यहुद्यांच्या बाहेरचे लोक असते, तर खिस्तास उजूही निषेध करावा लागता. पण खिस्ताचा सगळा परिवार यहुदीमय असल्यामुळें त्यास निषेधाचा प्रसंग पडला नाहीं. त्यामुळें जरी उजू निषेध ख्रिस्तानें केलेला नसला तरी पुतळेपूजेस किंवा चित्रपूजेस ख्रिस्त थोडा तरी अनुकूल होता किंवा झाला असता अशी कल्पना करण्यास सवड नाहीं. इतकेंच नाहीं, तर स्पेनमध्यें ग्रानादा शहरापासून सुमारें सात मैलांवर अल्वीर डोंगरावर वसलेल्या गांवीं इ० ३०५ मध्यें जी खिस्त्यांची ह्मणून अगदीं पहिली परिषद् भरली होती व जी "अल्वीरची परिषद्" या नांवानें खिस्ती धर्माच्या इतिहासामध्यें नांवाजलेली आहे तिनें भिंतीवरच्याही चित्रांचा निषेध केला होता, असें क्याथोलिक पंथांतलाच अल्झोग नांवाचा इतिहासकार ( पृ० ३१२, व्हाल्युम १ ) ह्मणत आहे. सारांश, लीओ बादशहा इ० शकाच्या ८ व्या शतकांत जी गोष्ट अमलांत आणूं पहात होता, त्याच गोष्टीस इ० ४ थ्या शतकाच्या आरंभींच्या परिषदेचें पाठबळ मिळालेलें होतें. जर इ० ४ थ्या शतकाच्या आरंभीं भिंतीवरच्याही चित्रांचा निषेध करणाऱ्या धर्माधिकाऱ्यांवर व धर्मोपदेशकांवर पाखं-

डीपणाचा आरोप करण्यांत किंवा बहिष्काराचा कोरडा ओढण्यांत येत नाहीं, तर इ० ८ व्या शतकांतल्या पुतळेपूजेचा निषेध करणाऱ्या धर्माधिकाऱ्यांवर किंवा धर्मोपदेशकांवर आणि बादशहावर पाखंडीपणाचा आरोप करण्यांत किंवा बहिष्काराचा कोरडा ओढण्यांत कां यावा तें निदान क्याथोलिकांच्या बाहेरच्यांस कळणें कठिण पडणार. पुतळेपूजेचा निषेध जर धर्मद्रोह असता, तर ग्रेगोरीनें चालवलेलें भांडण व घातलेला बहिष्कार यथायोग्य ह्मणावा लागता. वर लिहिलेल्या वाटेनें गेलें ह्मणजे पुतळेपूजेच्या निषेधाचा धर्मद्रोहाशीं संबध लागणें केवळ अशक्य होतें, आणि ग्रेगोरीनें किंवा ग्रेगोरींनीं केलेलें काम धर्माचा कैवार घेऊन केलेलें न मानतां, दुसऱ्याच कोणत्या तरी हेतूनें केलेलें—निदान तिऱ्हाइतास—मानावें लागतें. अज्ञांस बाजूस ओढून सज्ञांचा पाडाव करण्यासाठीं ह्मणून जर हा ग्रेगोरीचा यत्न उघड दिसत आहे, तर मुख्य हेतु कुस्तुन्तुनियाकरापासून स्वतंत्र होण्याचाच असण्याचा संभव जास्त आहे. ह्मणून हें ग्रेगोरीचें काम परमार्थासाठीं केलेलें न मानतां, स्वार्थासाठीं केलेलें मानण्याकडे, जे क्याथोलिक नव्हत त्यांचीच नव्हे, तर जे खिस्ती नव्हत त्यांचीही प्रवृत्ति झाल्यास नवल नाहीं. या प्रकारची प्रवृत्ति झाली ह्मणजे, अध्यात्मिक गोष्टी थोड्या दूर ठेवून, संसारांतल्या गोष्टींकडे वळल्याचा आणि प्रसंगीं प्रभुद्रोहाचाही आरोप ग्रेगोरीजोडीकडे व विशेषेंकरून तिसऱ्या ग्रेगोरीकडे येऊं पहाणार; अर्थातच ग्रेगोरीची दृष्टि या काळीं स्वतंत्रपणा किंवा राजसत्ता हातीं घेण्याच्या खटपटीकडे लागली.

ग्रेगोरी लौकरच वारला आणि झकारीस पोपाची गादी मिळाली. बादशहाशीं विरोध माजवल्यामुळें बादशाही मदत मिळण्याचा संभव नव्हता; पेपिनच्या बापाकडूनही मदत मिळाली नाहीं; मिळून, लोम्बार्डांशीं कसा तरी तह करण्यापलीकडे दुसरी वाट झकारीस राहिली नाहीं, व अर्थातच ती त्यानें स्वीकारली. पण इ० ७५२ सालीं झकारीस एक मोठी शिकार मारण्यास सवड सांपडली व अध्यात्मिक गोष्टींकडे किंवा नीतीकडे बराच कानाडोळा करून ती झकारीनें मारलीही. चार्लस वारला व त्याचा मुलगा पेपिन याचे हातीं पेशवाई आली. चिल्दरीक नांवाचा फ्रेंचांचा राजा होता, तो निव्वळ नांवाचा राजा होता, आंतलें सगळें सूत्र पेपिनकडे होतें. आंतून सगळी सत्ता जरी पेपिन भोगीत होता, तरी बाहेरचाही मानमरातब आणि थाटमाट आपल्या तैनातीस लावण्याची बळकट इच्छा पेपिनला झाली आणि ती त्यानें बर्कहार्द नांवाचा बिशप होता त्यास कळविली. बर्कहार्दनें पेपिनची इच्छा झकारीपुढें मांडली. "ज्याच्या हातीं आंतून सत्ता आहे, त्याच्याच हातीं बाहेरूनही सत्ता असणें वाजवी" अशी कोटी लढवून, झकारीनें बोनिफेस नांवाच्या साधूजवळून इ० ७५२ मध्यें "सोयसों" मुक्कामीं पेपिनला राज्याभिषेक करविला. चिल्दरीकच्या कपाळीं अर्थातच कैद आली, आणि पूर्वींच्या वंशाची समाप्ति होऊन, राजसत्ता नव्या वंशाकडे गेली.

याप्रमाणें राजक्रांति होऊं दिली; इतकेंच नव्हे, तर आपण पुढें होऊन ती केली किंवा बोनिफेसला करूं लावली, यांतही परमार्थाचा गंध बिलकुल न मारतां, निव्वळ स्वार्थाचाच मनस्वी उग्र असा दर्प मारत आहे. जर पेपिनचा प्रभु विधर्मी असता, तर धर्माच्या परमार्थासाठीं झकारीनें ही उलथापालथ केलेली मानतां येती. पण चिल्दरीक विधर्मी नव्हता; इतकेंच नव्हे,

तर विपंथीही नव्हता. पुतळेपूजेच्या आड जाण्याचें स्वप्न चिल्दरिकास कधीं तरी पडलें होतें, असें ह्मणण्यास किंवा समजण्यास आधार नाहीं. झकारीनें काम केलें, तें उघड लोम्बार्दांची मस्ती मोडतां यावी, ह्मणून केलें. ग्रेगोरी इ० ७४१ त ज्या हेतूनें फ्रान्समध्यें मुद्दाम गेला होता, तो हेतु झकारीस ११ वर्षांनीं पुढें इ० ७५२ त घरीं बसून मुखत्याराच्या मार्फत अनायासें पूर्ण करून घेतां आला. याप्रमाणें ग्रेगोरीचा फ्रेंचांस जवळ ओढण्याचा मनोरथ झकारीनें पूर्ण केला, आणि जें बीं ग्रेगोरीनें रुजत घातलें होतें, त्यास मोड येण्याचा रंग दिसूं लागला. इतक्यांत झकारी वारला आणि स्तिफनला पोपकी ( इ० ७५२–७५७ ) मिळाली. या प्रसंगीं लोम्बार्दांनीं कुस्तुन्तुनियाकरांचा रावेना सुभ्याचा सुभेदार होता, त्याच्याशीं जूट करून, पुन्हा उपद्रव सुरू केला–मग कारण पोपाकडून झालेलें असो वा नसो. स्तिफननें ग्रेगोरीप्रमाणें स्वार्थासाठीं फ्रान्सची यात्रा पत्करिली. ग्रेगोरीस हात हालवीत परत यावें लागलें होतें; पण झकारीनें शिकार नीट मारल्यामुळें, स्तिफनला सुरेख यश आलें. पेपिननें खासा स्वारी केली आणि इ० ७५६ त जशी लोम्बार्दांची तशी त्यास मदत केलेल्या कुस्तुन्तुनियाकराच्या सुभेदाराचीही रग ठीक जिरवली; इतकेंच नाहीं, तर शत्रूचा कांहीं मुलूखही पीतर साधूस उद्देशून ह्मणून स्तिफनला दान केला. रूम्यांनींही "आपण स्तिफनाची आज्ञा पाळूं" अशी कबुलायत केली. याप्रमाणें इ० ७५६ मध्यें स्तिफननें, पेपिनच्या जोरावर व रूम्यांच्या कबुलायतीवर, ग्रेगोरीनें जें बीं रुजत घातलें होतें त्यास लौकरच मोड आलेला दिसण्याचा योग आणला आणि पोपांच्या राजसत्तेचा नाजूक पाया जगजाहीर घातला. याप्रमाणें पोपांच्या राजसत्तेची "स्तिफन–झकारी–ग्रेगोरी" ही पितृपितामहप्रपितामही त्रयी जाणावी. लोम्बार्दांनीं पुढें आणखी एकदां डोकें वर केलें होतें. पण पोप पहिला आद्रियन (इ० ७७२–७९५ ) यानें पेपिनचा पेपिनहून पराक्रमी मुलगा चार्लमेन याच्याजवळून लोम्बार्दांस पुरें बुडवलें आणि पेपिननें दान केलेला मुलुख पुन्हा कायम करून घेतला. पुढें इ० ७९५ पासून ८१६ पावेतों तिसऱ्या लीओची कारकीर्द होती. इ० ८०० मध्यें चार्लमेन रूम मुक्कामीं आला, तेव्हां या लीओनें बादशाही मुकुट त्याच्या डोकीवर ठेवून, त्यास दानपत्र पीतरच्या समाधीवर ठेवूं लावलें. या काळीं पोपास बादशहाचे डोकीवर मुकुट ठेवण्याचा आणि बादशहास पोपाची निवडणूक कायम करण्याचा, असे दोघांस दोन हक्क एकमेकांकडून मिळाले.

पेपिन व चार्लमेन या बापलेकांनीं जी कामगिरी बजाविली, तींत सगळा परमार्थाचाच हेतु नव्हता, अशी क्षणभर कल्पना केली, तरी पुष्कळ अंशीं त्यांची प्रवृत्ति परमार्थाकडे दृष्टि वळल्यामुळें झाली, याविषयीं निदान श्रद्धावंतांमध्यें मतभेद होऊं नये. तरी पेपिनची दृष्टि परमार्थाहून स्वार्थाकडेच जास्त लागलेली होती, याविषयीं शंका नाहीं. उघड राजकी हवी होती ह्मटली कीं, स्वार्थाचा बराच भाग आला. अशा प्रकारच्या स्वार्थाच्या भागाची कल्पना चार्लमेनाविषयीं करण्यास सवड नाहीं. ह्मणून चार्लमेनानें जी कामगिरी बजावली, तींत श्रद्धाळूपणाचा ह्मणजे परमार्थाचाच भाग जास्त असला पाहिजे. पोपांची प्रवृत्ति झाली, तीस मात्र परमार्थाचा वासही लागलेला दिसत नाहीं. पुतळेपूजेची बाजू धर्माधिकाऱ्यांनीं घेतली, ती केवळ स्वार्थानें घेतलेली ह्मणावी लागते. जर पुतळे-

पूजा पट्टशिष्यांशिष्यांनीं विहित किंवा यथाकथंचित् तरी मान्य केलेली असती, जर ती अल्वीरच्या परिषदेनें निषिद्ध केलेली नसती, तर शिष्टाचाराचा कैवार पोपांनीं घेतला, असें ह्मणतां येतें. जो आचार पट्टशिष्यांशिष्यांनीं घातलेला नव्हे, जो आचार अल्वीरच्या परिषदेनें उघड निषिद्ध केलेला, तो शिष्टांचा मानणें बरोबर नाहीं; इतकेंच नव्हे, तर यहुदी संप्रदायाकडे लक्ष पोंचल्यास, पुतळेपूजा हा धडधडीत अनाचार होणार. पुतळेपूजेचा पोपांनीं कैवार घेणें हें अनाचाराचा कैवार घेण्यासारखें भासत आहे. याप्रमाणें पुतळेपूजेचा कैवार याकाळीं पोपांनीं घेतला, तो केवळ अज्ञांस आपल्या बाजूनें ओढून आपल्या इटालींतल्या पक्षास बळकटी आणण्यासाठीं ह्मणून घेतल्याची शंका येते. बरें, याप्रमाणें स्वार्थाकडे प्रवृत्ति झाली, ती झाली. ती तशीच परमार्थापासून अगदीं अलग तरी ठेवावी होती. पण दुर्दैवानें स्वार्थ साधून घेण्यासाठीं पुतळेपूजेचा निषेध करणें हें पाखंड ठरवलें आणि निषेधपक्षावर बहिष्काराचा कोरडा ओढला, हें काम धर्माधिकारी ह्मणवणारांच्या हातून मनस्वी गैर झालेलें दिसतें. या काळापासून ह्मणजे इ० आठव्या शतकाचा पहिला पाद गेल्यापासून पोपांचा अध्यात्मीकपणा जो कमी होत गेला, त्याची कमाल आठव्या शतकाच्या अखेरच्या वर्षीं झाली आणि पोपांनीं राजकीय अमलाचा कित्ता वळवण्यास आरंभ केला. ज्यास रूम मुक्कामीं पोपाच्या हातून अभिषेक होई व मुकुट मिळे तो रूमचा व रूम्यांचा बादशहा कागदोपत्रीं बने. रूम शहरीं वस्ती पोपांची होती व दान दिलेल्या मुलखाचा सगळा कारभार पोपच करी, ह्मणून पोपच रूमचा व रूम्यांचा खरा बादशहा होता. कागदोपत्रीं जो रूमचा व रूम्यांचा बादशहा लागे, तो कागदोपत्रींचाच समजावा; त्याची सत्ता रूमवर किंवा रूम्यांवर एकंदरींत फारशी चालत नसे. पोपाच्या हातून मुकुट मिळे, तितक्यानेंच जसें पूर्वीं फ्रेंचांच्या तसें पुढें जर्मनीच्याही बादशहांचें एकंदरींत समाधान होत गेलें आणि त्यांचें नांव इटालीभर पोपाचा वचक राहण्यास मात्र एकंदरींत उत्तम साधन झालें.

चार्लमेनची प्रवृत्ति एकंदरींत परमार्थामुळें आणि पोपाची प्रवृत्ति एकंदरींत स्वार्थामुळें झालेली मानण्यास आणखींही बराच बळकट पुरावा आहे. आद्रियननें चार्लमेनास "फ्रेंचांचा आणि लोम्बार्दांचा राजा" ह्मटलें, यांत कोणतीही नवी जोड त्यांस दिली नाहीं. फ्रेंचांची राजकी चार्लमेनच्या बापास मिळालेली होती, ती पेपिनचा लेक असल्यामुळें चार्लमेनकडे चालायाचीच होती. लोम्बार्दांनीं डोकें वर केलेलें दिसतांच त्यावर गदा मारण्याचें काम आद्रियननें अर्ज केला नसता, तरी चार्लमेनास केल्याशिवाय सुटका नव्हती; कारण पेपिननें बुडवल्यापासून लोम्बार्दांचें स्वातंत्र्य नष्ट होऊन, ते करभार देणारांपैकीं झाले होते आणि त्यामुळें त्यांनीं डोकें वर करणें हें पुंडाईसारखें किंवा राजद्रोहासारखें होत होतें. तरी जर पोपाची आज्ञा ह्मणून राखली, तर चार्लमेनची दृष्टि या प्रसंगीं परमार्थाकडेच जास्त वळली. नवीन जोड मिळण्यासारखी नसतां व खंडणी देणाराची पुंडाई मोडणें होती ती पुढेंही सोईप्रमाणें मोडतां आली असतां, जर पोपाची आज्ञा होतांच तदनुरूप चार्लमेन कामगिरी बजावीत आहे, तर चार्लमेनची दृष्टि परमार्थाकडेच वळलेली मानावी लागत आहे. तशांत जर पोपाचा अगदीं अंकित बनलेला असता, तर परमार्थाकडे जास्त दृष्टि वळलेली न समजतां पोपार्थाच्या

द्वारें स्वार्थाचकडेस चार्लमेनची दृष्टि जास्त वळलेली समजावी लागती. पण पोपाची सगळी करणी आणि पोपाचा सगळा संप्रदाय चार्लमेनास मान्य नव्हता. इ० ७८७ मधल्या नैसच्या परिषदेचे जे ठराव, पहिला आद्रियन नांवाचा पोप (इ० ७७२-७९५) होता त्यानें तर्जुमा करून पाठविले होते, त्या ठरावांवर खरमरीत टीका चालवून, फ्रांकफोर्त मुक्कामच्या इ० ७९४ मधल्या परिषदेंत चार्लमेननें व त्याच्या बिशपांनीं त्यांतले कित्येक अमान्य किंवा रद्दी केले होते; इतकेंच नाहीं, तर आद्रियनचे पश्चात् गादी मिळालेल्या तिसऱ्या लीओवरही कोरडा ओढण्यास चार्लमेननें कमी केलें नव्हतें. सारांश, आद्रियन आणि लीओ या दोघांसही चार्लमेन सर्वतोपरी पूज्य मानीत असून, त्यांची आज्ञा अगदीं अनतिक्राम्य समजत होता, असा भाग नव्हे; अर्थातच चार्लमेननें पोपाची कामगिरी बजावली, ती त्याच्या संप्रदायाकडे दृष्टि देऊन बजावलेली न ह्मणतां, निव्वळ ख्रिस्तीपणाकडे दृष्टि देवून बजावलेली ह्मणणें जास्त सयुक्तिक भासतें. आद्रियन आणि लीओ या दोघांच्या विषयीं असें समजतां किंवा ह्मणतां येत नाहीं. आद्रियननें चार्लमेनला बोलावलें होतें, तें ख्रिस्ती धर्माची अब्रू राखण्यास बोलावलेलें नव्हतें; तर केवळ आपल्या स्वतःच्या पंथाची अब्रू राखण्यास बोलावलें होतें. जसा पोप ख्रिस्ती होता, तसा कुस्तुन्तुनियाकरही होता; पण कुस्तुन्तुनियाकर निराळ्या पंथाचा होता ह्मणून त्याच्याकडे वळणें हें आद्रियन महापातकाच्या तोडीचें समजत होता आणि त्यामुळें कुस्तुन्तुनियाकराची मदत मागण्याच्या वाटेनें न जातां, पूर्वी मदत करून नांवाजलेल्या पेपिनच्या जास्त नांवाजलेल्या मुलाची मदत पुन्हाही मागण्याकडे आद्रियनची प्रवृत्ति झाली. थोडा बारीक विचार केल्यास असें दिसून येईल कीं, कुस्तुन्तुनियाकराची मदत या काळीं मागण्यास आद्रियनास तोंड राहिलेलें नव्हतें. कुस्तुन्तुनियाकराचा द्रोह पुतळेपूजेच्या निषेधामुळें करून, पुतळेपूजेचा कैवार ज्या दिवशीं पोपानें घेतला त्याच दिवशीं त्याचें कुस्तुन्तुनियाकराशीं फाटलें. पुढें पेपिनला राजा बनवून त्याच्यापासून कुस्तुन्तुनियाकराच्या ताब्यांतला मुलुख दान घेतला, तेव्हां पोपानें फाटलें होतें तें जास्त फाडलें आणि कुस्तुन्तुनियाकराशीं सर्वतोपरी संबंध तोडला. अशी जर हकीकत होती, तर कुस्तुन्तुनियाकराची मदत मागण्यास आद्रियनास तोंड या काळीं कोठून असणार ? तशांत कुस्तुन्तुनियाकर बराच दूर असून, या काळीं घरफुटीनें बराच कमकुवत झालेला होता; ह्मणून त्याची मदत येण्यास बरेच दिवस लागते व ती येऊन पोंचण्याच्या पूर्वींच जवळच्या पराक्रमी चार्लमेन बादशहास हांहां ह्मणतां पोपास साफ चिरडून टाकतां येतें, हीही एक मोठी गोष्ट लक्षांतून घालवतां कामानये. सारांश, आपल्या स्वतःच्या पंथाची ह्मणजे आपली स्वतःचीच अब्रू राखण्यास आद्रियन पोपास जी एकच वाट उरली होती, ती त्यानें निरुपायानें स्वीकारली आणि आपला स्वार्थ साधून घेतला. ज्या लीओवर पहिल्यानें कोरडा ओढण्यास कमी केलें नाहीं, त्याच लीओची अब्रू प्रसंगीं मदत करून राखली; इतकेंच नाहीं, तर बापानें दिलेली देणगीही कायम केली, यांत चार्लमेननें मनाचा थोरपणा आणि परमार्थबुद्धि हीं दोन्ही पुष्कळ दाखवलीं. लीओनें कृतज्ञ होऊन त्यास बादशहा केलें, हेंही काम सुरेख केलें; या कृतज्ञपणाची तारीफ करावी, तितकी थोडी. लीओनें जें काम केलें तें उजू बुद्धीनें केलेलें नव्हे, असें ह्मणण्यासमजण्यास आधार नाहीं. पण या काळीं ह्मणजे

इ० ८०० सालीं बादशाहकी आणि पोपकी या दोहोंची जी सांगड पडली, तिच्यामुळें पुढच्या पिढीमध्यें तंटे सुरू झाले. बादशहा पोपावर अंमल चालवूं पाहे, पोप बादशहावर दाब ठेवण्यास यत्न करी–असा कमजास्त झगडा कांहीं वर्षें चालला होता. अखेरीस बादशहाच्या मुलांमध्यें तंटा जुंपला, ह्मणजे एकाची बाजू स्वीकारून त्यास आपणाकडे ओढण्याचा क्रम कित्येक वर्षें पोपानें चालवला. पुढें इ० ८८८ मध्यें पेपिनच्या वंशाची समाप्ती झाली आणि मांडलिकांमध्यें भांडणें लागलीं, तेव्हां पोपाच्या गादीचे मनस्वी हाल झाले. पूर्वीच्या संप्रदायास अनुसरून बाराव्या योहान्नानें (इ० ९५६–९६४) ओथो नांवाच्या जर्मनीच्या बादशहाच्या डोकीवर इ० ९६२ मध्यें जेव्हां बादशाही मुकुट ठेवला, तेव्हां पोपाच्या गादीचें बळ पुन्हा वाढण्याचा रंग दिसूं लागला. पण चार्लमेमच्या लीओची खाण निराळी, ओथोच्या योहान्नाची खाण निराळी. योहान्न आईकडून सर्व प्रकारचे दुर्गुण आंगीं मुरलेला असा उपजला होता. त्यामुळें जर्मन व रूम्ये यांच्यामध्यें भरदुपारीं तंटे जुंपले आणि एक बादशहाचा पोप, तर दुसरा रूम्यांचा पोप–अशी दुतर्फी खेंचाखेंचीची मनस्वी भयंकर व अगदीं अनिष्ट स्थिति येऊन पोंचली. शेवटीं तिसऱ्या ओथोच्या कारकीर्दींत (इ० ९८५–१००२) बादशहा करील तो पोप–येथपर्यंत मजल आली, आणि ओथोचा ब्रूनो नांवाचा पुतण्या होता त्यास पोपकी मिळाली. हा ब्रूनो पांचवा ग्रेगोरी (इ० ९९६–९९९) नांवानें प्रसिद्ध झाला. ग्रेगोरीच्या पश्चात् ओथोनें गेरबर्त नांवाचा गुरु होता, त्यास पोपकी देववली. हा गेरबर्त दुसरा सिल्वेस्तर (इ० ९९९–१००३) या नांवानें प्रसिद्ध झाला. हे हालहवाल इ० १०७३ पर्यंत चालले. कधीं दोन पोप, कधीं एक पोप–पण एकंदरींत बादशहाच्या धोरणाचीच मातब्बरी जास्त असे. १०७३ मध्यें हिल्दिब्रान्द ऊर्फ ७ वा ग्रेगोरी पोप झाला, त्यानें बादशहास धाब्यावर बसवण्याची दांडगी खटपट चालवली; पण ग्रेगोरीस शेवटीं हद्दपार होऊन, इ० १०८५ मध्यें मरावें लागलें. बादशहास धाब्यावर बसवण्यासाठीं मरणाऱ्या पोपानें पुढच्या पोपाची नेमणूक करून ठेवावी, अशी व्यवस्था ग्रेगोरीनें सुचवली होती, ती अमलांत आली आणि पोपांनीं सगळी कळ आपल्याच हातीं ठेवली. दुसऱ्या अर्बनला (इ० १०८८–१०९९) बरेच क्लेश सोसावे लागले, तरी क्रेरमोनाच्या परिषदेंत (इ० १०९५) "दुसऱ्या कोणत्याही प्रभूच्या पायीं एकनिष्ठपणाची शपथ बिशपांनीं घेतां कामानये" अशा अर्थाचा ठराव पसार झाला, तेव्हां राजसत्तेशीं धर्मसत्तेचा खरा झगडा सुरु झाला. पांचव्या हेन्रीची कारकीर्द इ० ११०६ पासून ११२५ पावेतों आणि दुसऱ्या पास्कल पोपाची इ० १०९९ पासून १११८ पावेतों झाली. सुत्री मुक्कामीं इ० ११११ मध्यें हेन्री व पास्कल या दोहोंचा ठराव झाला, त्या ठरावाअन्वयें रूम मुक्कामीं पास्कलनें हेन्रीच्या डोकीवर मुकुट ठेवला. पण इतक्यांत बिशपांच्या शिकवणुकीनें रूम्ये बिथरले आणि बादशहाच्या विरुद्ध झाले! हा दगा दिसतांच पास्कलचें मन खट्टू झालें. पास्कलनें पोपकीचा राजीनामा दिला आणि एका एकलकोंड बेटांत वस्ती स्वीकारली. तरी धर्माधिकाऱ्यांची विनंती मान्य करून पोपकी पुन्हा स्वीकारली, ही गोष्ट पास्कलच्या सौजन्याची सुरेख साक्ष पटवीत आहे. लेतरन मुक्काम्च्या परिषदेनें इ० १११२ त हेन्रीशीं केलेला

करार रद्द केला आणि याच साली विएन्नाच्या परिषदेनें हेन्रीवर वाळ घातली. ही सगळी दांडगाई निव्वळ धर्माधिकाऱ्यांची होती, पोप पास्कलचा हींत हात नव्हता. या पापाचा मोठा घडा धर्माधिकाऱ्यांच्या डोकीवर फोडला पाहिजे; पास्कल अगदीं देवमाणूस मानावा लागतो. थोर मनाचा साधु-मग तो कोणत्याही धर्माचा कां असेना, तो-पास्कल पोपाच्या पायांवर बिनतक्रार पडेल. त्याच्या हाताखालच्या दांडग्या धर्माधिकाऱ्यांस पूर्ण मतलबीपणाचें दाखलेपत्र मात्र त्याच्यापासून बिनतक्रार मिळेल, त्यांची आणखीं दुसरी वोळवणी होण्याचा संभव दिसत नाहीं. पास्कलच्या पाठीमागें दुसऱ्या गेलासियस (इ० १११८-१११९) पोपानें पुन्हा हेन्रीच्या विरुद्ध खटपट चालविली; पण पोपाची फजिती होऊन, शेवटीं त्याचा शेवटही लौकरच झाला. पुढें हेन्रीचा नातेवाईक होता, तो दुसरा कलिक्षत या नांवानें पोप (इ० १११९-११२४) झाला, तेव्हां इ० ११२३ तली काथोलिकांची नववी महापरिषद् भरली आणि हेन्रीशीं मांडोवाळ करण्यांत आली. हेन्री ११२५-त वारला. पुढें इ० ११५५ पासून ११५९ पावेतों चवथा आद्रियन पोपाच्या गादीवर बसला. त्याच्या कारकीर्दींत याच प्रकारचा तंटा पुन्हा जुंपला. चवथा आद्रियन जातीचा इंग्रज होता. या प्रसंगीं जसा फ्रेदरीक बार्बरोसा नांवाचा बादशहा तसा दुसरा विलियम नांवाचा सिसिलीचा राजाही नांवाजला. आद्रियननें विलियमवर बहिष्कार घातला. विलियमनें स्वारी करून आद्रियनास लष्करी कोंडवाड्यांत घातल आणि आपली सर्वतोपरी सुटका त्याच्या हातून सुरेख करून घेतली. फ्रेदरीकनेंही अशीच वेसण नाकांत घातली असती पण इतक्यांत पोप वा-



ढला आणि निवडणुकीचे समयीं दोन फळ्या झाल्या,-एक अव्वल महंती फळी आणि दुसरी बादशाही फळी. रूमच्या पंचक्रोशींतले जे बिशप किंवा महंत असत, त्यांस "कार्दिनल" म्हणजे "अव्वल" समजत. या "कार्दिनलां"स दुसऱ्या निकोलास (इ० १०५८-१०६१) पोपानें इ० १०५९ मध्यें रूम मुक्कामीं एक परिषद् भरवून तींत पोपाच्या निवडणुकीचा हक्क, बादशहाच्या नाकांत काडी घालण्यासाठीं, ठरावाच्या द्वारें देऊन ठेवला होता आणि हा ठराव "कार्दिनलां"नीं निकोलसाच्या पश्चात् दुसऱ्या शिकंदराची (इ० १०६१-१०७३) निवडणूक करून अंमलांतही आणला होता. पुढें बादशहाकडून आणखींही एक पोप नेमण्यांत आला आणि बराच घोंटाळा माजला, तो भाग निराळा; पुढें हिल्दिब्रान्दनें आदली निवडणूक बादशहाकडून कायम करून घेऊन, बादशहाची सत्ता उघड कबूल केली, तोही भाग निराळा; पण इ० १०५९ तल्या रूमच्या परिषदेचा ठराव लगेच म्हणजे इ० १०६१ मध्यें अंमलांत आणण्यांत आला होता, याविषयीं मतभेद होणें नाहीं. सारांश, ही दुफळी पहिल्यानेंच झालेली नव्हे; तर या प्रकारच्या दुफळीची चाल वहिवाट पडून बरींच वर्षें झालीं होतीं. "कार्दिनलां"नीं तिसऱ्या शिकंदरची निवडणूक केली. पूर्वीं पोपांनीं लोम्बार्दीस बुडवण्यासाठीं बादशहाशीं संधान बांधण्याचें ठेवलें होतें; या काळीं लोम्बार्दीची मदत घेऊन बादशहावर तान करण्याचें शिकंदरानें योजलें. काळाचा महिमा किती तरी विचित्र आहे! या शिकंदरानें आणखींही एक अपूर्व शक्कल काढली. आरबांविरुद्ध बंडें करून इबरी द्वीपकल्पांतले ख्रिस्ती बरेच प्रबळ होत चालले होते.

प्रसंग पडल्यास लोम्बार्दीच्या राजासारखें राजे पाठराखणे असावे, असा मोठ्या मुत्सद्दीपणाचा दूरवर विचार करून, शिकंदरानें पुर्तुगाल्यांचा रजवाडा आल्फान्सो नांवाचा होता त्यास "राजा" बनवलें. या बिरुदाबद्दल आल्फान्सोनें पोपास रोकड खंडणी देण्याचें कबूल केलें होतें. रजवाडा होता तो "राजा" बनल्यानें थोडा फुगूं शकला; रोकड नाणें हातीं येण्याची संधि सांपडल्यामुळें, लश्कर ठेवून आसपासच्या रजवाड्यांस व प्रसंगीं बादशहासही शहाची धास्ती पडण्याचा किंवा घालण्याचा योग आणणें पोपास शक्य झालें. खंडणी देणारे राजे बनवत आले कीं, राजकीच्या छातीवर पोपकी अनायासें बसली आणि ग्रेगोरीचा मनोरथवृक्ष फुलून लागास येण्याचा रंग दिसूं लागला. हा शिकंदर एकंदरींत सामान्य मुत्सद्यांपैकीं नव्हे. इ० ११९८ त ज्या तिसऱ्या इनोसेंन्तास गादी मिळाली, त्याच्यामध्यें मुत्सद्दीपणा शिकंदराच्याहून कांकणभर जास्त वास करीत होता. यानें खंडणी देण्याची कबुलायत करणाऱ्या बऱ्याच रजवाड्यांस "राजे" बनवलें. आरागोनच्या दुसऱ्या पीतरास रूम मुक्कामीं बोलावून त्याच्या डोकीवर खंडणीच्या कबुलायतीवर इनोसेंतानें राजाचा मुकुट ठेवला. आल्फान्सोनें कबूल केलेली खंडणी दिली नाहीं, ह्मणून त्याचा मुलगा पहिला सांको यास पुर्तुगालचें राज्य याच इनोसेंतानें आपल्या हवालीं करूं लावलें!

( पुढें चालेल. )



## प्लेटो.

[ २. ]

मनुष्याचें हरएक प्रकारचें आचरण हा नीतिमार्गाचा विषय होय. तरी साधारण आचरणाचा विचार अमळ एकीकडे ठेवून,—किंवा त्या विचाराचा आरंभ सुगम रीतीनें करण्याकरितां,—आपण एका सोप्या प्रश्नाचा विचार पहिल्यानें मनांत आणूं. समजा कीं, आपणापुढें असा प्रश्न आला आहे कीं, कोणत्याही मनुष्याचा धंदा त्याजकडून योग्य रीतीनें केला जाण्याला, त्याला लागणारीं जीं बाह्य साधनें त्यांच्याशिवाय दुसरी कोणती गोष्ट त्यापाशीं अवश्य असली पाहिजे? या प्रश्नाचें उत्तर असें येईल कीं, त्याला त्या धंद्याच्या मूळ हेतूचें ज्ञान असलें पाहिजे; आणि हें ज्ञान जर त्याला नसेल तर त्याला तो धंदा कधींही योग्य रीतीनें करितां येणार नाहीं; कां कीं, कोणताही धंदा योग्य रीतीनें करणें, याचा अर्थ ह्मटला ह्मणजे—त्या धंद्याचा मूळ हेतु पुरा करणें हाच होय. अर्थात् आपण जो धंदा पत्करितों, त्या धंद्याच्या हेतूची सिद्धि, हेंच त्या धंद्यामध्यें आपलें आयुष्य खर्चण्याचें फळ, असें समजलें पाहिजे. आतां प्रत्येक मनुष्य जो कोणताही धंदा पत्करितो, तो विचारपूर्वक तो पत्करितो असें जर गृहीत केलें, तर असा सामान्य नियम झाला कीं, जो धंदा करण्याची आपल्यामध्यें योग्यता आहे, तोच धंदा आपण स्वीकारितों. आणि नुकतीच सांगितलेली गोष्ट लक्षांत ठेविली ह्मणजे या नियमावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं, आपल्यामध्यें जें कांहीं काम करण्याचें सामर्थ्य आहे तें काम करणें, किंवा तें काम करण्याचा

आपल्या हातून होईल तो हरप्रयत्न करणें, हाच आपल्या आयुष्यक्रमणाचा हेतु होय. त्याप्रमाणेंच, ज्या ज्या प्राण्याला किंवा पदार्थाला जें जें करण्याची शक्ति आहे, तें तें त्याच्याकडून केलें जाणें, हाच त्या प्राण्याचा आणि पदार्थाच्या अस्तित्वाचा हेतु होय. सारांश, मनुष्य, इतर प्राणी व निर्जीव पदार्थ, हे सर्व कांहींना कांहीं उद्देशानें निर्माण केलेले आहेत; आणि याकरितां ते सर्व तो तो उद्देश सफळ करण्याचीं केवळ साधनें आहेत.

वरील विवेचनावरून पाहतां, ज्ञान आणि नीति यांच्या संबंधाची ही एक गोष्ट सिद्ध झाली कीं, अमुक एक उद्योग करणें आपणाला उचित आहे किंवा नाहीं, या नीतिविषयक प्रश्नाचा निर्णय करण्याला. आपणांमध्यें तो उद्योग करण्याचें सामर्थ्य आहे किंवा नाहीं. याचें आपणाला ज्ञान असलें पाहिजे. तसेंच सामान्यत:, आपण केलेलें कोणतेंही कृत्य योग्य आहे किंवा नाहीं, अशा प्रकारच्या नीतिविषयक प्रश्नाचा निश्चय करण्याला,-जें काम करण्याची आपणामध्यें शक्ति आहे, तें काम करण्याला प्रस्तुत कृत्यापासून कांहीं अडथळा येईल किंवा कसें,-या प्रश्नाचाही उलगडा केला पाहिजे; आणि हा उलगडा करण्याला प्रस्तुत कृत्याचे भावी परिणाम व आपलें सामर्थ्य यांचें ज्ञान आवश्यक आहे.

परंतु प्लेटोच्या मताप्रमाणें ज्ञान व नीति यांच्यामध्यें वरच्या पेक्षांही अधिक निकट असा एक संबंध आहे. तो असा.—वर असें सांगितलें आहे कीं; निरनिराळ्या पदार्थ जातींच्या "तत्त्वां"ची एक मालिका आहे, व या मालिकेमधील प्रत्येक "तत्त्व" त्याच्याखालीं असणाऱ्या "तत्त्वां"चें "तत्त्व" होतें. या मालिकेप्रमाणेंच निरनिराळ्या पदार्थांच्या हेतूची एक मालिका आहे, व या मालिकेमधील प्रत्येक हेतु त्याच्या खालीं असलेल्या हेतूंचा हेतु होतो,—किंवा वर असलेल्या हेतूंचें साधन होतो; उदाहरणार्थ, सुताराच्या धंद्याचा हेतु घर बांधणें, तें संरक्षणाचें एक साधन आहे. अर्थात् या मालिकेमधील अतिशय जो उच्च हेतु, त्याचीं बाकीचे सर्व उद्देश हीं केवळ साधनें होत. यावरून असें ध्यानांत येईल कीं, कोणत्याही पदार्थाच्या "तत्त्वां"चें ज्ञान पूर्णपणें होण्याला त्याच्या हेतूचें ज्ञान झालें पाहिजे; इतकेंच नव्हे, तर प्लेटोच्या मताप्रमाणें, त्या पदार्थाचा उद्देश हेंच त्याचें "तत्त्व" होय. ह्मणजे वर ज्या दोन मालिका सांगितल्या, त्या परस्पर भिन्न नाहींत, तर केवळ एकाच मालिकेचीं, निरनिराळ्या दृष्टीनें, दोन नांवें होत; आणि सर्वांत उच्च जो हेतु तेंच सर्वांत उच्च "तत्त्व," व सर्वांत उच्च जें "तत्त्व" तोच सर्वांत उच्च हेतु. यावरून असेंही सिद्ध झालें कीं, ज्ञानाचा मार्ग आणि नीतीचा मार्ग हे परस्पर अभिन्न आहेत; कारण प्लेटोच्या मताप्रमाणें नीति ह्मणजे सर्व सृष्टीचा जो हेतु तो जेणेंकरून थोडा बहुत तरी पूर्ण होईल अशा रीतीनें आचरण करणें; आणि हें आचरण ज्या मनुष्याला त्या हेतूचें ज्ञान आहे त्याच्याकडून झाल्याशिवाय राहणारच नाहीं, व ज्याला हें ज्ञान नाहीं त्याच्याकडून तें होणें शक्य नाहीं.

वरील निरूपणावरून प्लेटोच्या मताप्रमाणें ज्ञान व नीति यांचा कसा अत्यन्त निकट संबंध आहे याचें स्पष्टीकरण झालें; इतकेंच नाहीं, तर त्याच्या मताप्रमाणें आयुष्यक्रमणाचा योग्य मार्ग कोणता हेंही ध्वनित झालें. तो मार्ग स्पष्ट समजण्याकरितां ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे

कीं, मनुष्य हा सृष्टीच्या बाहेर नाहीं; तर मनुष्यादि सर्व सृष्ट पदार्थ मिळून अशी एक घटना आहे कीं, आपल्या हस्तपादादि अवयवांचा परस्परांशीं व त्यांपैकीं प्रत्येकाचा सर्व शरीराशीं जसा संबंध असतो, तशा प्रकारचाच मनुष्य, इतर प्राणी, निर्जीव पदार्थ, वगैरे जे वरील घटनेचे अवयव त्यांचा परस्परांशीं व त्या घटनेशीं संबंध आहे. आतां अशा प्रकारच्या कोणत्याही घटनेच्या निरनिराळ्या अवयवांचे जरी निरनिराळे हेतु असतात, तरी हे सर्व हेतु त्या घटनेच्या हेतूचीं केवळ साधनें असतात. ह्मणून कोणताही अवयव आपला व्यापार योग्य रीतीनें करितो किंवा नाहीं, हें पाहणें झाल्यास त्या घटनेचा जो हेतु तो त्या अवयवाच्या प्रत्यक्ष व्यापारानें, त्याच्या शक्तीप्रमाणें सिद्धीस जातो किंवा नाहीं, हें पाहिलें पाहिजे. ही गोष्ट जर खरी आहे तर वरील कल्पनेप्रमाणें, सृष्टपदार्थ-घटनेचा एक अवयव जो मनुष्य तो आपला व्यापार—ह्मणजे आयुष्यक्रमण—योग्य रीतीनें करितो किंवा नाहीं, अर्थात् कोणताही मनुष्य सदाचरणी आहे किंवा दुराचरणी आहे, या प्रश्नाचा निर्णय करणें झाल्यास, सर्व सृष्टीचा जो हेतु तो त्या मनुष्याच्या वर्तणुकेच्या योगानें, त्याच्या सामर्थ्याच्या मानानें, सफल होतो किंवा नाहीं, हें पाहिलें पाहिजे.

याप्रमाणें ज्ञान व नीति यांच्या संबन्धाविषयीं प्लेटोच्या मताचा विचार झाला. आतां नीतीविषयीं त्याच्या मतांचें संक्षेपानें विवरण करूं.

अमुक एक पदार्थाचें आपणाला यथार्थ ज्ञान आहे किंवा नाहीं, याविषयीं साधारण मनुष्य जसा विचार करीत नाहीं, त्याप्रमाणेंच तो ज्या आचरणाला सदाचरण ह्मणतो, तें खरोखर सदाचरण आहे किंवा नाहीं याचाही तो फारसा विचार करीत नाहीं. दुसऱ्यानें त्याला कांहीं गोष्ट सांगितली ह्मणजे, तें त्या सांगणाराचें नुसतें मत आहे, किंवा तें वास्तविक ज्ञान आहे; मतच असेल तर त्याला कांहीं पुरावा आहे किंवा नाहीं; पुरावा असल्यास त्या पुराव्यावर विश्वास ठेवणें योग्य होईल किंवा नाहीं, व तो पुरावा भरपूर आहे किंवा नाहीं; तसेंच, ज्ञान असेल तर तें त्याला कोणत्या रीतीनें प्राप्त झालें; वगैरे प्रश्नांचा विचार करणें साधारण मनुष्याच्या बहुतकरून लक्षांतही येत नाहीं. त्याप्रमाणेंच ज्या आचरणाला आपले वाडवडील ‘सदाचरण’ ह्मणत गेले, किंवा ज्याला चांगलें ह्मणण्याचा परिपाठ आहे, तें आचरण आपणही योग्य असें समजतो. परंतु तें खरोखर योग्य आहे किंवा नाहीं, याविषयीं फारसा, किंबहुना मुळींच, आपण विचार करीत नाहीं. आणि हा विचार न केल्यामुळें मोठमोठ्या चुका कशा होतात हें थोड्या विचारानें कळून येईल. उदाहरणार्थ, आपल्या शत्रूला इजा करणें हें कृत्य आपण अयोग्य समजत नाहीं; इतकेंच नाहीं, तर तें योग्य आहे असें समजतो. परंतु शांतपणानें विचार केला असतां असें दिसून येईल कीं, नुकसान करण्याच्या उद्देशानें दुसऱ्याला—मग तो आपला शत्रु असो किंवा मित्र असो, त्याला—इजा करणें हें नेहमी अयोग्यच आहे. तसेंच, जेणेंकरून आपणाला सुख होईल तें आचरण योग्य असें समजलें जातें; परंतु असें ह्मणणें सुद्धां चुकीचें आहे. कारण ज्या स्थितीला आपण साधारणपणें सुख असें समजतों, तें क्षणिक व परिणामीं दुःखदायक असतें; आणि अनेक कृत्यें अशीं आहेत कीं, तीं जरी आरंभीं दुःखप्रद वाटतात, तथापि परिणामीं त्यांच्यापासून आपलें हित होतें. अशा

प्रकारच्या अज्ञानमूलक सर्व चुकांचा परिहार करण्याचा एकच मार्ग आहे. तो हा कीं, नीतीस ज्ञानाच्या पायावर रचणें.

परंतु आपण पूर्वीं पाहिलेंच आहे कीं, ज्ञानाचा खरा विषय ह्मटला ह्मणजे इन्द्रियगोचर पदार्थ नव्हे, तर पदार्थ "तत्त्वें". या "तत्त्वां"चें ज्ञान केवळ विचारशक्तीच्या योगानें होतें. ज्या मनुष्याला हें ज्ञान प्राप्त झालें त्याला नीतीचें सार समजलें; इतकेंच नव्हे, तर वर्तन व ज्ञान यांच्यामध्यें, प्लेटोच्या मताप्रमाणें कार्यकारण-संबंध असल्यामुळें, तोच खरा नीतिमान् मनुष्य समजला पाहिजे. यावरून असें स्पष्ट झालें कीं, सदाचरणी होणें ह्मणजे, इंद्रियगोचर सर्व सृष्टीपासून अलग होऊन, सृष्टपदार्थ "तत्त्वां"च्या बुद्धिद्वारें अविश्रांत विचार करणें होय. इंद्रियगोचर सृष्टि विकारशील व नाशवंत असल्यामुळें, तिच्यापासून खरें सुख कधींही प्राप्त होणें शक्य नाहीं; इतकेंच नव्हे, तर उलट दुःख मात्र उत्पन्न होतें. याकरितां तिचा जितका परिहार करवेल तितका केला पाहिजे. आणि तिच्यापासून जितके जितके आपण दूर होऊं,—ह्मणजे आपली इंद्रियसुखाची वासना जितकी जितकी कमी होईल,—तितका तितका इंद्रियांच्या बंधनापासून आत्मा मुक्त होऊन, तो अधिक अधिक शुद्ध व उदात्त होईल, आणि त्याला स्वतःविषयीं खरें ज्ञान प्राप्त होईल. आणि याप्रमाणें इंद्रियगोचर सृष्टीपासून बुद्धिगोचर सृष्टीकडील आपली प्रगति पुरी झाली ह्मणजे, आपणाला खऱ्या व शुद्ध सुखाचा निरंतर अनुभव येईल.

तथापि या ठिकाणीं ही गोष्ट पक्की ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, जरी इंद्रियगोचर सृष्टीचा त्याग करून "तत्त्व" सृष्टीचा विचार करणें हा मनुष्याचा परमार्थ आहे, आणि जरी एकदां आपणाला या बुद्धिगोचर सृष्टीची अभिरुचि लागली ह्मणजे आपण इंद्रियगोचर सृष्टींतील कोणत्याही पदार्थाची इच्छा धरणार नाहीं, तरी "तत्त्व"ज्ञानाची आवड एका क्षणांत उत्पन्न होत नाहीं; आणि ही आवड एखाद्या भाग्यवान् मनुष्याला थोड्या वेळांत प्राप्त झाली, तरी ती पुरी होणें हें फार प्रयासाचें व दीर्घकालाचें काम आहे; इतकेंच नव्हे, तर इंद्रियगोचर सृष्टीचा पहिल्यानें अनुभव घेतल्याशिवाय "तत्त्व"-ज्ञानाची इच्छा मनुष्याला होणें शक्यच नाहीं, असें ह्मटलें तरी चालेल. शिवाय पुष्कळ मनुष्यांची निसर्गतः अशी स्थिति असते कीं, कांहीं झालें तरी, त्यांना "तत्त्व"ज्ञानाची इच्छा स्वप्नांतही होत नाहीं. यास्तव "तत्त्व" ज्ञानप्राप्ति हा जरी मनुष्यप्राण्याचा खरा परमार्थ आहे, तरी पुष्कळ मनुष्यांना आपलें सर्व आयुष्य व कांहीं मनुष्यांना आयुष्याचा बराच पूर्व भाग इंद्रियगोचर सृष्टींतील पदार्थांचा विचार करण्यांत व अनुभव घेण्यांत घालविणें अवश्य असतें. आणि याकरितां, या दृश्य सृष्टींतील आयुष्यक्रमणाच्या संबंधानें सदाचरण व दुराचरण ह्मणजे काय, किंवा परमार्थ कोणता, याचा विचार केला पाहिजे.

प्लेटोच्या मताप्रमाणें या परमार्थाचें अवश्य साधन ह्मटलें ह्मणजे सुकृत[1]. शारीरिक सुखाला ज्याप्रमाणें शरीराचा निरोगीपणा अवश्य आहे त्याप्रमाणेंच मानसिक सुखाला सुकृताची गरज लागते. या दृष्टीनें सुकृत ह्मणजे आत्म्याचा निरोगीपणा असें ह्मणण्याला हरकत नाहीं. त्याप्रमाणेंच परमार्थ ह्मणजे आत्म्याच्या या निरो-

1 Virtue.

गीपणापासून प्राप्त होणारें सुख, असें समजावयाचें. यावरून असेंही सिद्ध झालें कीं, सदाचरण ह्मणजे ज्या आचरणामध्यें सुकृताचें आविष्करण होतें, तें. आतां हें उघड आहे कीं, इतर कोणत्याही गुणाप्रमाणें, सुकृत अधिकाधिक दृढ व विकसित होण्याला आचरणामध्यें त्याचें पुनः पुनः आविष्करण झालें पाहिजे. ही गोष्ट लक्षांत ठेविली ह्मणजे, सदाचरणाचे नियम प्रत्येक मनुष्यानें कां पाळिले पाहिजेत, हा प्रश्न, शारीरिक आरोग्याचे नियम प्रत्येक मनुष्यानें कां पाळिले पाहिजेत या प्रश्नाप्रमाणेंच, अप्रयोजक आहे. प्लेटोच्या मताप्रमाणें सुकृताचे मुख्य चार प्रकार आहेत; ह्मणचे आत्मनियमन, धैर्य, न्याय्यता, आणि वैदग्ध्य.[1]

आपण ज्याला नीतिशास्त्र असें समजतों, त्यांत नीतीविषयीं ज्या प्रकारचें विवरण केलें जातें, तशा प्रकारचें नीतीविषयक प्रश्नांचें प्लेटोनें विवरण केलेलें नाहीं. वर ज्या नीतिविषयक प्रश्नासंबंधानें प्लेटोच्या मतांची संक्षिप्त रीतीनें माहिती दिली आहे, त्यांखेरीज ज्या महत्वाच्या प्रश्नाचा प्लेटोनें विचार केला, असा नीतिविषयक प्रश्न ह्मटला ह्मणजे, वर जीं चार प्रकारचीं सुकृतें सांगितलीं, त्यांतील प्रत्येकाचें लक्षण करणें. हा विचार जरी प्लेटोच्या निरनिराळ्या ग्रंथांत पुनः पुनः केलेला आहे, तरी "रिपब्लिक" ह्मणून जो त्याचा प्रसिद्ध ग्रंथ आहे, त्यांत वरील प्रश्नासंबंधानें विचार इतर ग्रंथांपेक्षां अधिक स्पष्ट व सुगम रीतीनें केलेला आहे. या ग्रंथांत नीतीशिवाय आणखी अनेक विषयांचें विवेचन केलेलें आहे. ह्मणून इतर सर्व भाग गाळून, ज्या भागामध्यें केवळ वर सांगितलेल्या नीतिविषयक प्रश्नाचें विवेचन केलें आहे, अशा भागाचा पुढें संक्षेप दिला आहे. तो केवळ भाषांतररूपानें नव्हे, पण प्लेटोची विचारसरणी वाचकांच्या ध्यानांत यावी, व तरूण वाचकांना आपण कोणत्याही विषयासंबंधानें विचार करीत असतां त्या विचाराचा क्रम कसा ठेवावा, आणि दुसऱ्याचें मन न दुखवितां त्याची चूक त्याला कबूल होईल अशा रीतीनें त्याच्या पदरांत कशी घालावी, हें समजावें ह्मणून, मुळाला धरवेल तितकें धरून तो संक्षेप दिला आहे.

1 Wisdom (practical).

---

रावसाहेब

## विश्वनाथ नारायण मंडलिक.

### भाग सहावा.

स्वतंत्र व्यवसाय.

(१८७२—१८८०)

स्वतंत्र व्यवसायांत जें रावसाहेबांचें आयुष्य गेलें त्याचे तीन भाग करण्याचें योजिलें आहे, या तीन भागांत क्रमानें आरंभकाल, मध्यकाल व अवसानकाल यांची हकीकत देण्याचा संकल्प आहे. या तीन्ही कालांचे विवेचनाच्या सोयीसाठीं नऊ नऊ वर्षांचें सारखेंच परिमाण धरलेलें आहे. मागील भागांत आरंभकालाचें वर्णन करण्यांत आलें आहे. प्रकृत भागांत मध्यकालाचा वृत्तांत देण्याचा प्रयत्न करूं.

मागील भागांतील हकीकत बरीच सविस्तर आहे याचें कारण, दैनिक वृत्तावरून बरीच माहिती उपलब्ध झाली, हें होय. प्रस्तुत भागांतील कथानक लिहिण्यास त्याच प्रकारची साधनांची

अनुकूलता नाहीं. खरें ह्मटलें ह्मणजे 'राजसेवे'च्या कालांतील रोजनिशा जशा माहितीनें परिपूर्ण आहेत तशा पुढील कालांतील नाहींत. १८६६ सालची रोजनिशी उपलब्धच नाहीं. १८६७, १८६८ व १८६९ या सालच्या रोजनिशा बहुतेक कोऱ्याच आहेत. १८७० च्या रोजनिशींत कांहीं दिवसांचें वृत्त आहे. १८७१ पासून १८७४ पर्यंतचीं दैनिक वृत्ताचीं टिपणें भरपूर जरी नाहींत तरी साधारण बरीं आहेत. १८७५, १८७६, १८७७ या वर्षांचीं पुस्तकें बहुतेक कोरींच आहेत. १८७८ सालच्या रोजनिशींत थोडासा मजकूर आहे. त्या सालानंतर रावसाहेबांनीं रोजनिशी लिहिण्याचा क्रम सोडला असावा असें अनुमान होतें. निदान पुढील काळाचीं टिपणें उपलब्ध तरी नाहींत. आणि अन्यत्र मिळण्यासारखी जी माहिती आहे ती चरित्रलेखनास अपर्याप्त असल्यामुळें या भागांतील मजकूर मागल्या भागांतील मजकुराइतका सविस्तर करण्यास सवड नाहीं. जें आहे त्यांतच निर्वाह केला पाहिजे.

गेल्या भागांत जो वर्णनक्रम स्वीकृत आहे त्याच क्रमानें या भागांतही हकीकत देण्याचा विचार आहे. प्रथम द्रव्यार्जनासाठीं पत्करलेल्या व्यवसायासंबंधानें उल्लेख करून नंतर आपण त्यांच्या इतर उद्योगांकडे वळूं.

रावसाहेबांचा वकिलीचा धंदा दिवसानुदिवस फारच चांगला चालूं लागला. जसजशी त्यांची मानमान्यता वृद्धिंगत झाली व त्यांची कीर्ति सर्वत्र पसरली तसतसें त्यांच्या धंद्यास अधिकाधिक तेज येऊं लागलें व द्रव्यप्राप्तीचा योग चांगलाच जुळून आला. तथापि त्यांच्या उत्साहाचा भंग होण्यास याच कालांत एक विशेष कारण झालें. रावसाहेबांनीं वकिली सुरू केल्यानंतर थोड्याच कालांत जें त्यांचें बस्तान बसलें व जी त्यांची वाहवा झाली त्यामुळें पुढें मागें आपल्यास हायकोर्टांतील न्यायाधिशाचें पद प्राप्त होईल असें त्यांस वाटूं लागलें. मागील भागांत जामनगर संस्थानची दिवाणगिरी नाकारण्याच्या वेळीं त्यांनीं जें लक्ष्मीदास खीमजी यांस उत्तर दिलें त्यावरूनही हें स्पष्ट कळण्यासारखें आहे. तशी संधि १८६३ च्या जून महिन्यांत आली. त्या वेळीं एका एतद्देशियाची न्यायाधिशाच्या जागीं हंगामी नेमणूक करण्याचा प्रश्न उपस्थित होऊन कोणाची नेमणूक करावी या गोष्टीची वाटाघाट चालली होती. त्या वेळीं टक्कर साहेबांनीं रावसाहेब मंडलिक व शांताराम नारायण या दोघांचीं नांवें गव्हरनर साहेबांकडे पाठविलीं असें ह्मणतात. परंतु गव्हरनर साहेबांनीं चीफ जस्टिस यांचें मत विचारल्यावरून त्यांनीं दोघांचींही नांवें एकीकडे ठेवून तिसरेंच ह्मणजे नानाभाई हरीदास यांचें नांव पुढें केलें, व अखेरीस नानाभाई यांचीच न्यायाधिशाचे जागीं नेमणूक झाली. या प्रसंगीं ही नेमणूक थोडे दिवसांसाठीं होती; परंतु एकदां नानाभाईंचें नांव लागू झाल्यामुळें पुढेंही त्यांसच वारंवार नेमण्यांत येत असे, व अखेरीस त्यांसच कायमची जागा मिळाली. न्यायाधिशाचे जागेसाठीं जे तीन उमेदवार होते त्यांमध्यें उद्योगशीलता व व्यासंगपरता हे गुण रावसाहेबांमध्यें होते ही गोष्ट निर्विवाद आहे. शिवाय लोकांत प्रतिष्ठा व मानमान्यता त्यांचीच विशेष होती. असा एकंदर प्रकार असल्यामुळें रावसाहेबांस ती जागा मिळावी असा लोकांचा समज होता. व रावसाहेबांसही तसेंच वाटत असावें असें दिसतें. गिब्स साहेबांमार्फत त्यांनीं त्या बाबतींत प्रयत्नही बराच केला. असें असूनही

रावसाहेबांस या कामीं यश आलें नाहीं ही गोष्ट त्यांस बरीच विषादजनक झाली असावी हें उघड आहे. नानाभाई हरीदासांच्या मागून रावसाहेबांना अपेक्षित पदाची प्राप्ति झाली असती किंवा नाहीं या गोष्टीबद्दल विशिष्ट प्रकारचा तर्क बांधण्याचा यत्न करणें केवळ निरर्थक होय. इतकें मात्र खरें कीं, नानाभाई ज्या वेळीं मृत्यु पावले त्या वेळीं रावसाहेबांच्या अंगच्या गुणांचा चाहता सरकार दरबारांत कोणी नव्हता. त्यामुळें रावसाहेब त्या वेळीं हयात असते तरी त्यांस न्यायाधीशपदाची प्राप्ति अवश्य झालीच असती असें ह्मणण्यास बरीच हरकत वाटते. आणि तसा प्रतिकूल योग घडून आला असता तर रावसाहेबांच्या सारख्या तेजस्वी स्वभावावर त्या अपमानाचा काय परिणाम घडला असता हें सांगणें कठिण आहे. असो. प्रस्तुत प्रसंगीं आपल्यास एवढ्याच गोष्टीचा निर्देश करावयाचा कीं, आशेचा भंग झाल्यामुळें रावसाहेबांस बराच विषाद वाटला; परंतु त्यांच्या नेहेमीच्या तऱ्हेप्रमाणें त्यांनीं त्याचा अंमल फार वेळ टिकूं दिला नाहीं. असो.

वकिलीच्या धंद्यास ज्याप्रमाणें या काळांत अधिक तेज आलें त्याचप्रमाणें अर्ज तयार करण्याचीं कामेंही अधिक येऊं लागलीं. प्रस्तुत काळीं जे अर्ज त्यांनीं तयार केले त्या सर्वांमध्यें साताऱ्च्या पदच्युत महाराजांच्या वतीनें केलेला अर्ज फारच महत्वाचा आहे. या कामीं रावसाहेबांनीं फारच परिश्रम घेतले.

प्रकृत काळांतही वकिलीच्या व्यवसायापासून व्यावृत्त होण्याचा एक प्रसंग घडून आला. १८७८ सालच्या दैनिक वृत्तांत असा उल्लेख आहे कीं, तारीख ४ डिसेंबर रोजीं देसाई हरिसाद् संतोषराम हे भावनगरच्या महाराजांकडून रावसाहेबांची भेट घेण्यास आले होते, व त्यांनीं त्या संस्थानची दिवाणगिरी पत्करण्याची रावसाहेबांची खुशी आहे काय असा प्रश्न केला होता. परंतु रावसाहेबांनीं स्वीकृत व्यवसायाचा त्याग केला नाहीं.

मागील भागांत सांगितल्याप्रमाणें प्रकृत काळांतही रावसाहेबांची अध्ययनशीलता कायम होती. इंग्रजी व संस्कृत ग्रंथ नियमानें वाचण्याचा त्यांचा क्रम सुरू होता. 'नेटिव ओपिनियन' पत्राचें चालकत्व जरी त्यांनीं या वेळीं सोडिलें होतें तरी मधून मधून त्या पत्रांत लेख लिहिण्याचा त्यांचा प्रघात असे.

१८७१ च्या अखेरीस महाराष्ट्र भाषेचा कोश तयार करण्याचा त्यांचा संकल्प झाला होता असें दिसतें. पुढें १८७४ सालीं शाळाखात्याचे मुख्य अधिकारी चाट्फील्ड साहेब यांनीं त्या कोशाच्या प्रती शाळांच्या उपयोगासाठीं घेण्याचें अभिवचन दिल्याविषयीं दैनिक वृत्तांत उल्लेख आहे. परंतु तो कोश पुरा होऊन प्रसिद्ध झाला असल्याविषयींची माहिती उपलब्ध नाहीं. या काळांतील विशेष महत्वाचें ग्रंथरचनेचें काम ह्मटलें ह्मणजे १८८० सालीं प्रसिद्ध केलेलें हिंदुधर्मशास्त्राचें पुस्तक होय. हें पुस्तक १८८० सालीं प्रसिद्ध करण्यांत आलें. यांत याज्ञवल्क्यस्मृति व व्यवहारमयूख या सर्वमान्य हिंदुधर्मशास्त्रप्रतिपादक ग्रंथांचा समावेश केलेला असून त्यांचा इंग्रजी भाषेंत तर्जुमा देण्यांत आला आहे. या पुस्तकाची प्रस्तावना विस्तृत असून तिच्यामध्यें हिंदुधर्मशास्त्राचा इतिहास, त्यास प्रमाणभूत मानलेले ग्रन्थ व त्या शास्त्राचीं मुख्य तत्वें, यांचा साधार उल्लेख करण्यांत आला आहे; व कांहीं विशेष महत्वाच्या मुद्यांचें मोठें मार्मिक, व्यापक व निर्णायक असें

प्रतिपादन केलें आहे असें ह्मणतात. अशा प्रकारचें पुस्तक करण्याचा रावसाहेबांचा पुष्कळ दिवसांचा संकल्प होता व संकल्पसिद्धीसाठीं त्यांनीं दीर्घ परिश्रम केले. हें पुस्तक प्रसिद्ध केल्यानें रावसाहेबांची कीर्ति सर्वत्र झाली व धर्मशास्त्रविशारदांत त्यांची गणना होऊं लागली. न्यायाधीश, वकिलीचा व्यवसाय करणारे व करूं इच्छिणारे या सर्वांसच या पुस्तकाचा अत्यंत उपयोग होऊं लागला, व यामुळें रावसाहेबांचें नांव अजरामर झालें. या पुस्तकांतील विषयांची व्याप्ति वाढवून समग्र हिंदुधर्मशास्त्रप्रतिपादक असा प्रमाणभूत ग्रंथ तयार करण्याचा रावसाहेबांचा विचार होता व तत्सिद्ध्यर्थ आवश्यक सामग्रीची जुळवाजुळव करण्याचाही त्यांनीं उपक्रम केला होता. परंतु शरीरप्रकृतीचें अस्वास्थ्य व अकालिक मृत्यु यामुळें त्या विचाराची परिणति झाली नाहीं.

आतां प्रकृत कालांत रावसाहेबांनीं स्वतंत्र लेख कोणते लिहिले याविषयीं थोडीशी माहिती देऊं. प्रथमतः 'रायल एशियाटिक सोसायटी'च्या संबंधानें त्यांनीं काय उद्योग केला तो पाहूं. १८७३ सालीं मार्च महिन्यांत 'शालिवाहन व शालिवाहन सप्तशती' या विषयावर त्यांनीं या सभेपुढें एक निबंध वाचला. या निबंधांत आरंभीं शालिवाहनासंबंधीं सामान्य उल्लेख करण्यांत आला आहे. कलियुगामध्यें होणारे जे सहा शककर्ते सांगितलेले आहेत त्यांमध्यें शालिवाहन हा तिसरा होय, असें सांगून, नंतर निरनिराळ्या शककर्त्यांची कालमर्यादा निर्दिष्ट करण्यांत आली आहे. पुढें साठ संवत्सर सांगून त्यांच्या गुणावगुणांविषयीं जी लोकांची समजूत आहे तिचा उल्लेख करण्यांत आला आहे. नंतर जिनप्रभसूरि नांवाच्या जैन ग्रंथकारानें रचिलेल्या 'कल्पप्रदीप' नांवाच्या पुस्तकांत शालिवाहनासंबंधानें दिलेल्या हकीकतीचा सारांश दिला आहे. पुढें त्याच ग्रंथकारानें केलेल्या प्रतिष्ठान (पैठण) नगरीच्या वर्णनापैकीं कांहीं संस्कृत श्लोक देऊन त्यांचें इंग्रजी भाषांतर दिलें आहे. राजशेखर यानें 'चतुर्विंशति प्रबन्ध' नांवाचा एक ग्रन्थ लिहिला आहे, त्यांत शालिवाहनानें पंडितांच्या साहाय्यानें चार लक्ष प्राकृत गाथांचा एक ग्रंथ लिहिला असल्याविषयीं उल्लेख आहे. या ग्रंथास 'कोश' अशी संज्ञा आहे. बाणभट्टानें आपल्या हर्षचरिताच्या आरंभींही या ग्रंथाचा निर्देश केला आहे. या गाथांपैकीं सातशें गाथांचा 'शालिवाहन सप्तशती' नांवाचा ग्रंथ रावसाहेबांना वसई गांवच्या एका ब्राह्मणाकडून प्राप्त झाला, व त्यामुळेंच हा लेख लिहिण्याची त्यांना स्फूर्ति झाली असावी असें अनुमान होतें. या सप्तशतीमध्यें जें प्राकृत भाषेचें रूप दृग्गोचर होतें त्याचें प्रस्तुत कालच्या महाराष्ट्र भाषेशीं किती साम्य आहे याविषयीं उल्लेख करून त्यांनीं असा निष्कर्ष काढिला आहे कीं, ज्ञानेश्वरीची रचना झाल्यापासून प्रस्तुत कालांत जितकें अंतर, त्याच्या दुपटीहून अधिक काल सप्तशती व ज्ञानेश्वरी यांजमध्यें गेला असला पाहिजे.

जैन ग्रंथकार शालिवाहनास आपल्याच धर्माचा अनुयायी समजतात. परंतु गाथांच्या मंगलाचरणांत 'पशुपति' या नांवानें शिवाची स्तुति केली आहे एवढ्यावरून तो जैन नव्हता असें रावसाहेबांनीं अनुमान काढिलें आहे.

प्रकृत कालांत सोसायटीपुढें वाचलेला दुसरा लेख 'संगमेश्वरमाहात्म्य व लिंगपूजा' या विषयावर होता. हा लेख तारीख १३ फेब्रुआरी १८७५ रोजीं वाचण्यांत आला. स्कन्दपुराणां-

तील सह्याद्रिखंडाचे जे भाग प्रस्तुत काळीं उपलब्ध आहेत त्यांमध्यें ज्या स्थलांचा विशेषेंकरून निर्देश करण्यांत आला आहे त्यांपैकीं संगमेश्वर एक होय. येथें विष्णु मोरेश्वर केळकर नांवाचे गृहस्थ मुन्सफीच्या कामावर असतां त्यांच्या पहाण्यांत 'संगमेश्वरमाहात्म्य' नांवाचा एक ग्रंथ आला तेव्हां तो त्यांनीं रावसाहेबांकडे पाठविला. चालुक्य घराण्यांतील कर्ण नांवाच्या राजाच्या पदरीं असलेल्या शेष नांवाच्या कवीनें हा ग्रंथ रचिला. यामध्यें आरंभीं कर्ण राजाची पूर्वपीठिका देऊन नंतर कर्णाचा वृत्तांत आहे. कर्ण हा कोल्हापुराहून आपले बन्धु नाग व सिंघण यांसमवेत संगमेश्वर येथें गेला व तेथें त्यानें अनेक देवालयें बांधिलीं. येथें पूर्वींचीं रघुकुलोत्तंस राम यानें बांधिलेलीं कांहीं देवालयें होतीं व या स्थलास प्राचीन काळीं रामक्षेत्र अशी संज्ञा होती, असा या ग्रंथांत उल्लेख आहे. या कर्णानेंच कोल्हापूर येथील महालक्ष्मीचें व संगमेश्वर येथील कर्णेश्वराचें देवालय बांधिलें असेंही या काव्यांत लिहिलें आहे. संगमेश्वर गांवीं संगमेश्वराचें जें मंदिर आहे तें कर्णेश्वराच्या मंदिराहून प्राचीन आहे व त्याची स्थापना परशुरामानें केली असें सांगतात.

एवढें लिहून पुढें चालुक्य राजांच्या कालासंबंधीं उपलब्ध प्रमाणांविषयीं उल्लेख करून, प्रसंगवशात् लिंगपूजेचा प्रसार करण्यास चालुक्य राजेच कसे कारणीभूत झाले हें सांगून, अखेरीस 'संगमेश्वरमाहात्म्य' या काव्याचें भाषांतर देण्यांत आलें आहे.

१८७५ सालीं एप्रिल महिन्यांत सोसायटीपुढें तीन वलभी ताम्रपत्रांसंबंधानें रावसाहेबांनीं एक लेख वाचला, व १८७८ सालीं कच्छ प्रांतांतील शिलालेखांसंबंधी कांहीं माहिती सरकारांत लिहून पाठविली. वलभी ताम्रपत्रामध्यें शिलादित्य नांवाच्या राजाविषयीं उल्लेख असून त्यांनीं केलेल्या धर्मकृत्यांविषयीं हकीकत आहे. यांत सहज लक्ष्यांत येण्यासारखें वैलक्षण्य हें आहे कीं, शिलादित्यानें केलेल्या दानपत्राचा निर्देश करतांना त्यास शिवाचा महान् उपासक असें म्हटलें आहे; परंतु दानपत्रामध्यें, बुद्धाच्या पूजेसाठीं आणि बुद्धोपासक भिक्षु जनांच्या सुखासाठीं व सोयीसाठीं दान केलेलें आहे. कच्छ प्रांतांतील शिलालेख बरेच अलीकडचे असल्यामुळे त्यांच्यापासून प्राक्कालीन इतिहासाची माहिती मिळण्याचा मुळींच संभव नव्हता. सरकारांत हे लेख कोणी अधिकाऱ्यानें पाठविले होते ते सरकारानें तपासण्यासाठीं सोसायटीकडे पाठविले, व सोसायटीनें तें काम रावसाहेबांना सांगितलें होतें.

याप्रमाणें रावसाहेबांनीं सोसायटीपुढें वाचलेल्या लेखांची हकीकत झाली. परंतु प्रकृत कालामध्यें त्यांनीं सोसायटीप्रीत्यर्थ दुसऱ्या एका तऱ्हेनें विशेष परिश्रम केले, त्याविषयीं उल्लेख करणें राहिलें. १८०४ सालाच्या सुमारास 'लिटररी सोसायटी' नांवाची एक सभा मुंबईस स्थापन झाली व तिलाच पुढें 'बांबे ब्रांच आफ ध रायल एशियाटिक सोसायटी' असें नांव प्राप्त झालें. या सभेचा पत्रव्यवहार, सभेपुढें विद्वज्जनांनीं वाचलेले निबंध किंवा दिलेलीं व्याख्यानें, यांची व्यवस्था लावून त्यांची पुस्तकरूपानें प्रसिद्धि करण्याचें सोसायटीच्या मनांत आलें. परंतु तें काम फारच श्रमाचें व विवेचनाचें असल्यामुळें तसेंच लांबणीवर पडलें. पुढें गिब्ससाहेब सोसायटीचे अध्यक्ष झाले तेव्हां रावसाहेबांच्या अंगचे गुण त्यांस माहित असल्यामुळें त्यांनीं तो कार्यभार पत्करण्याविषयीं

रावसाहेबांस विनंती केली, व ती त्यांनीं मान्य करून १८७७ सालीं प्रस्तावना व आवश्यक स्पष्टीकरण यांसहित एकंदर हकीकतीचीं तीन पुस्तकें प्रसिद्ध केलीं.

आतां आपण राज्यव्यवस्थाविषयक लेखांकडे वळूं. प्रकृत कालामध्यें रावसाहेबांनीं दोन विशेष महत्वाचे लेख लिहिले. हे दोन्हीही १८७४ सालीं लिहिण्यांत आले. एक लेख जमीनमहसुलाच्या बाबतींत मुंबई इलाख्यांतील दिवाणी कोर्टांचा अम्मल कोठपर्यंत चालावा या संबंधानें जो कायदा झाला त्याविषयीं होता, व दुसरा खोती प्रकरणाविषयीं होता.

१८७३ सालीं हिंदुस्थान सरकारचे कौन्सलांत एलिस साहेबांनीं एक नवीन कायद्याचा मसुदा आणण्याची परवानगी मागितली. त्याचें कारण असें झालें कीं, त्या वेळेस मुलकी कामगारांवर दिवाणी कोर्टांतून बऱ्याच फिर्यादी झाल्या व साऱ्याची रक्कम व ती आकारण्याची रीति यांच्या न्याय्यान्याय्यतेबद्दल सुद्धां तक्रारी निघाल्या. एका कज्जांत फिर्यादीनें अशी तक्रार केली कीं, सर्व्हेच्या कामगारांनीं केलेली ४ रु. ची आकारणी बरोबर नाहीं. दोन तीन कोर्टांतून या तक्रारीची शाहनिशाह होतां होतां अखेरीस वरिष्ठ कोर्टानें फिर्यादीतर्फे निवाडा केला. ही गोष्ट अर्थातच सरकारास पसंत पडली नाहीं. कारण कीं, अशा रीतानें सर्व्हे खात्याचा आकारणी बदलण्यांत आली म्हणजे सर्व प्रकारांनीं अनवस्थेचा प्रसंग यावयाचा व आकारणाच्या तत्वभूत मानिलेल्या नियमांस धक्का बसावयाचा. म्हणून मुंबई सरकारानें हिंदुस्थान सरकारास याला तोड काढण्याची सूचना केली व त्या सूचनेच्या अन्वयें एलिस साहेबांनीं नवाच कायद्याचा मसुदा तयार करण्याची परवानगी मागितली. पढें मुंबईसरकाराबरोबर कांहीं मुद्यांविषयीं वाटाघाट करून एलिस साहेबांनीं एक मसुदा कौन्सिलपुढें आणिला. तो मसुदा प्रसिद्ध झाल्यावर १८७४ सालीं रावसाहेबांनीं एक विस्तृत लेख लिहून त्यांतील सर्व मुद्दे खोडून काढण्याचा यत्न केला. हा लेख बराच व्यापक, मुद्देसूद व निर्भीडपणानें लिहिलेला आहे. त्यांतील कोटिक्रम दूषणातीत व प्रत्ययजनक, विचारसरणी प्रौढ व मार्मिक, आणि भाषा विषयाला अनुरूप व जोरदार अशी आहे. या लेखाचे दोन भाग आहेत. प्रथम भागांत वादविषयाची व्याप्ति व तत्संबंधी त्या वेळीं प्रचारांत असलेले नियम यांजविषयीं उल्लेख करण्यांत आला आहे. दुसऱ्या भागांत पूर्वस्थितीचें परिवर्तन करण्याची अवश्यकता व तन्निमित्त दिलेलीं कारणें यांचें परीक्षण करण्यांत आलें आहे. या लेखामध्यें आपल्या म्हणण्यास आधारभूत अशीं संमाननीय ग्रंथांतून जीं वचनें देण्यांत आलीं आहेत त्यांवरून रावसाहेबांचें वाचन व्यापक, अध्ययन मार्मिक, व योजना सम्यक्, असें सहज समजण्यांत येतें. या लेखांतील कांहीं भाग अवतरणरूपानें येथें देतों:—

"औदार्यशाली लॉर्ड कॉर्नवालिस यानें बंगाल प्रांताकरितां ज्या कायद्यांची योजना "केली तेच कायदे मुंबई व मद्रास इलाख्यांतील "कायद्यांना आधारभूत झाले. त्या राजकार्य-"धुरंधर पुरुषानें जी पद्धत सुरू केली तिजमध्यें "पुढील दोन तत्वांचा प्राधान्येंकरून समावेश "करण्यांत आला होता: (१) वसुलाचें व न्या-"याचें काम यांचें पृथक्करण. दोन्ही प्र-"कारची सत्ता एकाच अधिकाऱ्याच्या हातीं "असल्यानें तिचा दुरुपयोग होतो; इतकेंच

"नव्हे, तर दुरुपयोग झाला असतां त्याचें शा-
"सन होत नाहीं. तेव्हां या पृथक्करणानें हे
"दोन्हीही प्रकार घडण्याचा संभव राहिला नाहीं.
"( २ ) स्वतंत्र न्यायसभांची स्थापना,
"आणि सरकार व त्यांचे कामगार यांनीं
"आपल्या हुद्याच्या अन्वयें केलेल्या कृत्यांचा
"जबाब विचारण्याचा या सभांना हक्क.

"ब्रिटिश राज्य हिंदुस्थानांत अबाधित चा-
"लण्यास व त्याची भरभराट होण्यास हींच
"तत्वें निःसंशय कारणीभूत आहेत. नामदार
"एलिस साहेबांनीं जो कायद्याचा मसुदा कौन्स-
"लापुढें आणिला आहे तो न्यायसभांच्या विद्य-
"मान अधिकारास अपायकारक असल्यामुळें,
"राज्यरूप इमारतीचा समूल उच्छेद होण्याचा
"संभव आहे असें मी ह्मणतों. मसुदा आण-
"ण्याचीं जीं कारणें एलिस साहेबांनीं दिलीं
"आहेत त्यांचें मी परीक्षण केलें आहे व माझ्या
"मतें तीं सर्व अयथार्थ व निर्जीव आहेत, इत-
"केंच नाहीं, तर त्यांनीं केलेला कोटिक्रम केवळ
"हेत्वाभासमय आहे. राज्ञीप्रतिनिधींच्या परिष-
"देंत अशा प्रकारचा कोटिक्रम तत्वभूत अशा
"नियमाविरुद्ध करण्यांत यावा ही गोष्ट अप्र-
"शस्त आहे. या नव्या कायद्याअन्वयें एक नवी-
"नच तत्व प्रतिपादन करण्याचा विचार दिसतो.
"मुलकी कामगारांनीं जीं मुलकी कामें केलीं
"असतील त्यांची न्याय्यान्याय्यता ठरविण्याचा
"अधिकार त्यांच्याच हातांत देण्याचें या काय-
"द्याचें धोरण आहे. त्यांनीं वाटल्यास नियम
"बाजूला ठेवावे, केलेले करार मोडावे व प्रा-
"चीन देशाचार व लोकरीति यांच्या बन्धनांचा
"उपहास करावा, परंतु प्रजेला मात्र आपल्या
"दुःखाचा प्रतीकार करून घेण्यास मार्ग नसावा.
"या कायद्यावरून महात्मा माउंट स्टुअर्ट एल्फि-
"न्स्टन यानें घालून दिलेल्या कायद्यांतील एका
"विशेष तत्वाची पायमल्ली करण्याचा उद्देश दिस-
"ण्यांत येतो. ज्या खटल्यांत सरकारच्या तर्फेनें
"कोणत्याच प्रकारचा उलट पुरावा देण्यांत
"आला नव्हता अशा एका खटल्याचा आधार
"घेऊन त्याचें स्वरूप अयथार्थत्वेंकरून लोकांस
"दाखवून नवाच कायदा करण्यांत येत आहे, व
"गायकवाड किंवा मोंगल बादशहा यांच्याप्रमाणें
"अप्रतिहत अधिकार मुलकी अधिकाऱ्यांस दे-
"ण्याचें योजिलें आहे. गायकवाड व मोंगल
"बादशाहा झाले तरी त्यांच्या शासनासही
"कांहीं प्रतिबंध होते, परंतु या अधिकाऱ्यांसंबं-
"धानें तसा प्रकार नाहीं. अशा प्रकारचा का-
"यदा झाल्यानें राजा व प्रजा यांचें बन्धन
"शिथिल होण्याची भीति आहे. प्रजेच्या मि-
"राशी हक्कावर आतां गदा आली आहे ह्मणून
"त्या प्रजेपैकीं एक या नात्यानें हा लहानसा
"लेख लिहून मी आपलें कर्तव्य करीत आहें
"असें समजतों. हा कायदा प्रजेला संमत
"नाहीं, याला साधक अशीं प्रमाणें मुळींच
"नाहींत, व त्याच्या आवश्यकतेसंबंधानें जीं
"कारणें दिलीं आहेत तीं वास्तविक नाहींत, या
"मुद्यांचें प्रतिपादन या लेखांत करण्याचा
"विचार आहे. शिवाय ज्या ज्या प्रांतांत जमीन
"महसुलाच्या आकारणीसंबंधानें ठरीव असे
"प्राचीन प्रचार नाहींत व कायदेही नाहींत
"त्या त्या प्रांताकरितां कांहीं तरी विशेष प्रका-
"रचे नियम करण्याची वेळ येऊन चुकली
"आहे असेंही या लेखांत प्रतिपादन करण्याचा
"हेतु आहे.

"प्रकृत विषयासंबंधानें सध्या कशा प्रका-
"रची व्यवस्था चालू आहे हें सांगण्यापूर्वी कांहीं
"सामान्य प्रकारचे विचार प्रकट करतों. प्रसिद्ध

"तत्ववेत्ता अरिस्टाटल यानें असें प्रतिपादन "केलें आहे कीं, नियमबद्ध राज्यव्यवस्था व "व्यक्तिविशेषाच्या तारतम्यानें होणारी व्यवस्था "यांजमध्यें विरोध आहे, आणि व्यक्तिविशे- "षाच्या तारतम्याप्रमाणें व्यवस्था चालूं देणें "ह्मणजे हिंस्रपशूंचा श्वापदगणावर जो अंमल "असतो त्याचेंच अनुकरण होय. हिंदुस्थान "देशांत आंग्ल राजकारणी पुरुषांनीं जे कायदे "ठरविले आहेत ते सर्व मुख्यत: वरील तत्वाच्या "अनुरोधानेंच ठरविलेले आहेत असें माझें "मत आहे. आमच्या सांप्रतच्या अवस्थेमध्यें "नियमबद्ध व्यवस्थेनेंच आमचें समाधान होण्या- "सारखें आहे. व्यक्तिविशेषाच्या तारतम्याच्या "अनुरोधानें होणारी व्यवस्था एतद्देशीयांस अ- "भिमत नाहीं अशाविषयीं सर हेन्री मेन यांनीं "जो अभिप्राय व्यक्त केला आहे तो माझ्या मतें "ग्राह्य आहे. 'ग्रामसंस्था' या विषयावर त्यांनीं "जो ग्रंथ रचिला आहे त्यांत ते असें ह्मणतात:- "'ठरीव असे नियम करून अधिकारि जनांच्या "तारतम्यास अवकाश न ठेवणें हें कांहीं अंशीं "अपायकारक आहे ही गोष्ट मला कबूल आहे, "आणि हिंदुस्थान देशाच्या प्रकृत अवस्थेंत तर तसें "केल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. परंतु कांहीं लो- "कांचें जें ह्मणणें आहे कीं, एतद्देशीयांस असलें "नियमांचें बन्धन अभिमत नाहीं तें मला संमत "नाहीं. या विधानास प्रमाण नाहीं इतकेंच नव्हे, "तर संभवनीय कोटीच्याही तें बाह्य आहे. केव्हां "केव्हां अधिकारि जनांच्या तारतम्यानेंच राज्य- "व्यवस्था चालूं देणें आवश्यक असतें हें ह्मणणें "कबूल होण्यासारखें आहे. परंतु ज्या लोकांमध्यें "आचारांच्या बन्धनांचा इतका आदर आहे कीं, "धर्माच्या व इतर व्यवहाराच्या बाबतींत सुद्धां "आचाराचें अप्रतिहत शासन ते मान्य करि- "तात, त्यांना राजकीय व्यवहारांतच व्यक्तिवि- "शेषाच्या इच्छेप्रमाणें होणारे फेरफार कां अभिमत "असावे ? इतरांप्रमाणें मला एतद्देशीयांच्या आ- "चारविचारांचें ज्ञान आहे असें मी ह्मणत नाहीं, "परंतु त्यांचे शास्त्रग्रन्थ जर प्रमाण मानावयाचे "असतील तर त्यांस नियमबद्धतेपेक्षां तारतम्य "अधिक अभिमत नाहीं हें स्पष्ट आहे.'

× × + × ×

"साऱ्याची आकारणी ठरलेल्या तत्वावर "होत नाहीं हें एलिस साहेबांच्या भाषणावरून "व्यक्त होत आहे व त्यामुळें अनेक तऱ्हेचे "प्रमाद घडत आहेत. असेच प्रमाद सतत घ- "डत रहावे व त्यामुळें होणारा अन्याय कायम "असावा असाच सरकारचा हेतु असेल तर तो "प्रकृत कायद्यानें उत्तम प्रकारें सिद्धीस जाईल. "परंतु प्रजेचें कल्याण व राज्याचें क्षेम यांचा "विचार करितां तसा हेतु नसावा अशी मला "उमेद आहे.

× × × × ×

"नवीन कायद्यास आधारभूत ह्मणून ज्या "कज्याचा उल्लेख एलिस साहेबांनीं केलेला "आहे त्यापेक्षां सबळ प्रमाण जर उपलब्ध न- "सेल तर सरकारचा पक्ष फारच दुर्बल आहे "असें ह्मणणें भाग आहे. ज्यांत नवीन सर्वे "अमलांत आली आहे अशा तीन जिल्ह्यांसं- "बंधानें मी चौकशी केली आहे व मला जी "माहिती मिळाली आहे तिच्यावरून असें दि- "सतें कीं, केवळ आकारणीबद्दल हायकोर्टापर्यंत "गेलेली अशी तक्रार एकच आहे. तेव्हां अशा "रीतीनें लोकांचीं तोंडें बंद करून त्यांचे दु:- "खाचे उद्गार दुसऱ्याला ऐकूं जाऊं नयेत असा "बंदोबस्त करण्यापेक्षां सर्वसंमत अशा प्राचीन "देशाचारांना व रूढीला अनुरूप असे नियम

"ठरविणें हें माझ्या अल्प समजुतीप्रमाणें अधिक
"प्रशस्त होय.

× × × × ×

"हायकोर्टाकडून जेव्हां ठरीव नियमांचा अ-
"तिक्रम होईल तेव्हां मात्र न्यायाधिशांच्या अ-
"धिकाराचा संकोच करण्याचा प्रसंग येईल.
"आतां जो कायदा करण्याचें योजिलें आहे
"त्यामुळें हायकोर्टाच्या वर्तनावर जो आक्षेप
"येण्याचा संभव आहे त्या आक्षेपापासून आ-
"पला बचाव करण्याचें सामर्थ्य त्या न्यायसभेला
"आहे यांत मला संशय नाहीं. या कामांत
"माझा संबंध आटला ह्मणजे प्रजाजनांपैकीं एक
"या नात्यानें आहे. मला असें दिसत आहे
"कीं, नसती सबब पुढें करून प्रजाजनांचा
"एक विशेष प्रकारचा हक्क हिरावून घेतला जात
"आहे. सर्वे सेटलमेंट खात्याचे लोक जर इतके
"गैरवाकब आहेत कीं पदोपदीं त्यांच्या हातून
"नियमांचा भंग व लोकांच्या हक्कांची पायमल्ली
"होण्याचा संभव आहे तर लोकांचे हक्क सर्वस्वी
"नाहींतसे करून कायद्याच्या योगानें त्यांचे
"दाद मागण्याचे मार्ग बंद करण्यापेक्षां त्या
"अधिकाऱ्यांच्या जागीं त्यांच्यापेक्षां चांगले
"लोक आणावे हें बेहेत्तर आहे. विशिष्ट प्रका
"रचें शिक्षण मिळालेले अधिकारी ह्मणून
"ज्यांचा एलिस साहेबांनीं उल्लेख केला आहे
"त्यांच्या हातून लोकांचें कशा प्रकारचें नुक-
"सान होण्याचा संभव आहे याचें अनुमान
"दक्षिण भागाचे कमिशनर हान्हेलाक यांच्या
"रिपोर्टावरून होण्यासारखें आहे. या रिपोर्टा-
"वरून असें दिसण्यांत येईल कीं, लाखो रुपये
"खर्ची पडून सुद्धां रत्नागिरी जिल्ह्याची जी
"सर्वे झाली ती व्यर्थ गेली. अशा प्रकारें अ-
"न्याय झाला असतां त्यांचा कांहीं अंशीं प्रती-
"कार करण्याचे जे कांहीं योग्य मार्ग आहेत त्यां-
"पैकींच एकाचें अवलंबन मुंबईसरकाराकडून कर-
"ण्यांत येत आहे हें ठीक आहे. परंतु प्रजेचीं तोंडें
"बंद करून राजपुरुष व प्रजाजन यांजमधील प्रेम-
"भाव वाढविण्याचें कोणीही राजकारणी पुरुष
"मनांत आणील असें माझ्या अजूनपर्यंत ऐक-
"ण्यांत आलें नाहीं. ज्याप्रमाणें एकाद्या रो-
"ग्याला कफक्षय झाला असावा आणि मोकळ्या
"हवेंत खेळत असलेला प्राणवायु फुप्फुसांत
"जाऊन कदाचित् रोग्याच्या अशक्ततेला अनु-
"रूप अशी जी त्याची क्रिया समजली गेली
"आहे, तिच्यापेक्षां अधिक क्रिया घडून रो-
"ग्याच्या जीवितास अपाय होईल ह्मणून
"एकाद्या हकीमानें त्या रोग्याला जेथें हवा व
"प्रकाश नाहीं अशा एका खोलींत कोंडून
"ठेवावा, त्याप्रमाणेंच प्रस्तुतचा प्रकार आहे.
"क्षणमात्र विचाराअंतीं असें कळेल कीं, जसा
"वर निर्दिष्ट केलेला रोगी खास मृत्युमुखीं पडेल
"तशी प्रकृत कायद्याप्रमाणें कायदे करण्यांत
"आले असतां एकंदर प्रजा स्वातंत्र्य जाऊन
"नष्टप्राय होईल. प्रेमबन्धन दृढ करण्याच्या
"अशा युक्तीचा मासला युरोप व एशिया खं-
"डांच्या प्राचीन व अर्वाचीन इतिहासांत मिळ-
"ण्यासारखा नाहीं."

हा लेख लिहून रावसाहेबांनीं सरकारांत पाठविला व शिवाय या कायद्याविरुद्ध कांहीं अर्ज्याही सरकारांत केल्या; परंतु त्यांचा कांहींच परिणाम न होतां, सरकारानें तो कायदा तसाच पसंत केला व सेक्रेटरी ऑफ स्टेट यांजकडे मंजुरीकरितां पाठविला. तेव्हां त्या अधिकाऱ्याकडे अर्ज पाठविण्याशिवाय दुसरा मार्ग उरला नाहीं. ह्मणून १८७६ सालीं एप्रिल महिन्याच्या १८ व्या तारखेस मुंबईस एक जाहीरसभा भर-

विण्यांत आली. त्या प्रसंगीं रावसाहेबांनीं विस्तृत भाषण केलें. त्यांत त्यांनीं हिंदुस्थानसरकारच्या कौन्सिलांतील सभासद होप व हॉब हौस यांच्या कोटिक्रमाचा फडशा पाडिला. प्रकृत विषयाचा व्यासंग त्यांनीं पूर्वींच चांगल्या प्रकारें केला असल्यामुळें त्यांचें विवेचन फारच समर्पक झालें व लोकांत त्यांची वाहवा झाली. या भाषणाचा उपसंहार रावसाहेबांनीं पुढें लिहिल्याप्रमाणें केलाः—

"सरकारी अधिकाऱ्यांच्या वर्तनावर तक्रार "करण्याचा हक्क प्रजाजनांस होता म्हणूनच स-"र्वेच्या कामांतील दोषस्थलें वेळेवर उघडकीस "आलीं व सरकारचें लक्षावधि रुपयांचें नुकसान "टळलें. हॉबहाउस साहेब म्हणतात कीं, सनदा "व दानपत्रें यांची फारशी किंमत आहे असा "प्रकार नाहीं, आणि 'यावच्चंद्रदिवाकरौ' हे शब्द "सातत्यदर्शक नसून दानकर्ता व दानभोगी "यांच्या आयुर्मर्यादेहून अधिक त्यांची व्याप्ति "नाहीं. म्हसूर प्रकरणाच्या वेळीं मांगल्स सा-"हेबांनीं असाच कोटिक्रम लढविला होता. "परंतु तो यथार्थ नाहीं व जो शब्दार्थ तोच "भावार्थ आहे हें सदर कोर्ट व हायकोर्ट यांनीं "अनेक प्रसंगीं केलेल्या निर्णयावरून व्यक्त "होण्यासारखें आहे. या देशांत जे राज्यकर्ते "पूर्वीं झाले त्यांचा या बाबतींत रिवाज कसा "होता, हें सांगतांना हॉबहौस साहेबांनीं "त्यांचा अधिक्षेप केला आहे हें पाहून मला "आश्चर्य वाटतें. आतां हें खरें आहे कीं, जे "कांहीं राजे अन्यायशील झाले त्यांच्या कार-"कीर्दींत ज्या प्रजेच्या हक्कांस मान देणें अवश्य "होतें त्याची पायमल्ली झाली. परंतु हा प्रकार "सर्वसाधारण आहे. इतर देशांतही जुलमी "राजांच्या अमलाखालीं अशीच स्थिति झालेली "आहे. 'यावच्चंद्रदिवाकरौ' या शब्दांची व्याप्ति "वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें संकुचित करणें म्हणजे "ज्या गोष्टीचा ऐतिहासिक प्रमाणांनीं प्रत्यादेश "होण्यासारखा आहे त्या गोष्टीचेंच प्रतिपादन क-"रण्यासारखें आहे. क्यांडी साहेबांनीं सरकारांत "रिपोर्ट करितांना एका प्रसंगीं असें म्हटलें आहे "कीं, एतद्देशीय राजे कितीही स्वेच्छाचारी "झाले तरी नेहेमी सनदांना मान देत असत, "असें आढळून येईल. हेंच खरें आहे."

## 'मराठी भाषेची लेखनपद्धति.'

या विषयावर पुण्यांतील प्रसिद्ध पंडितत्रयानें आजपर्यंत बरेच लेख प्रसिद्ध केले आहेत. या संबंधानें आमचे विचार आम्हीं यापूर्वींच स्पष्ट केले आहेत, त्यांमध्यें अधिक उणें करण्याचें आम्हांला कांहीं विशेष कारण दिसत नाहीं. या विषयाची चर्चा होतां होतां शेवटीं उक्त पंडितत्रयाचीं मतें बरींच स्थिर झाल्यासारखीं दिसत आहेत. यांत विशेषतः ही गोष्ट लक्षांत धरण्यासारखी आहे कीं, 'वादे वादे जायते तत्त्वबोधः' ही म्हण ध्यानांत घेऊन हें पंडितत्रय आपलाच हेका न धरितां इतरांच्या मताचाही विचार करीत आहे. आणि एकंदरीनें पाहतां, मराठी लेखनपद्धतीची जी सद्यस्कस्थिति, तिजकडेसच त्यांचें पुनः मत वळत चाललें आहे, हें पाहून तितकें समाधान वाटतें. कांहीं थोड्या गोष्टींविषयीं अद्यापि त्यांचें मत अनिश्चित दिसतें, तथापि थोड्याच दिवसांत तेंही वाद नाहींसा होईल अशी आशा धरण्यास अवकाश आहे. ऱ्हस्व इउकारान्त संस्कृत शब्दांचें स्वरूप दीर्घान्त करण्याविषयीं त्यांची बरीच प्रवृत्ति दि-

सते, व तें तसें न करण्याला आह्मी जीं कारणें दाखविलीं आहेत तीं त्यांना कबूल नाहींतसें वाटतें. तसेंच कित्येक अकारान्त शब्दांचे अपभ्रंश विसर्गहीन, आणि कित्येकांचे आकारान्त कां व्हावेत याविषयीं त्यांची समजूत होत नाहीं, असेंही भासतें. या संबंधानें आह्मी कित्येक वेळां लिहिलें आहे, ह्मणून तूर्त अधिक लिहीत नाहीं; तरी कारण पडल्यास त्यांकडे पुनः लक्ष देऊं. तथापि त्यांच्या मताचा स्वीकार केल्यास देखील, संस्कृत शब्द कोणते व निवळ मराठी कोणते हें जाणण्याची आवश्यकता मुळींच चुकत नाहीं, असें आह्मांस वाटतें. अनुस्वाराच्या संबंधानें यांचा विचार अद्यापि अपुर्ता आहे असेंही ह्मणणें प्राप्त आहे. असो. तूर्त इतकेंच पुरे.

---

प्रिय मित्र

## स्वर्गनिवासी हरि महादेव पंडित.

[ श्लोक. ]

गेला ! गेला ! दशरथि महाराष्ट्र सारस्वताचा—
कैवारीहो सकल **विविधज्ञानविस्तारकांचा** !
गेला ! गेला ! प्रबल **हरि** तो अन्वयीं पंडितांचे !
आतां कैंची अभिनव सदा श्री तयांची ! न वांचे ! १

केव्हां जाती दिनकरशशी अस्तमार्गास ठावें;
ठावें केव्हां विकच कमलें म्लान व्हावें गळावें;
नाहीं ठावें परि कधि नरें देह सोडून जावें;
जाणारा मी समजुन गड्या ! दक्ष कार्यीं रहावें ! २

ह्या पुष्पाच्या रुचिर हृदयीं—ह्या फळाच्या कपाळीं—
तारुण्याच्या सहसित मुखीं—वृद्धतेच्या कपोलीं—
जेथें तेथें दिसत लिहिली अंतकाची निशाणी;—
कीं प्राण्यांनीं निशिदिनिं तिला चालणें आठवोनी. ३

आयुष्याला गणिति न कळे कां जनीं वर्षमासीं !
कां शोकाच्या निधिंत बुडती मोजुनीयां तयांसीं !
आला गेला जलद घडिचा पूर्ण दीर्घायु झाला !
मेला ! मेला ! चिर जरि वरी धूम झांकी नभाला ! ४

[ पद. ]

(चाल—'जाऊं कामाला। चला ग दिवस पहा आला')

पंडितवर गेला। कुठें हो पाहुं चला त्याला ॥ध्रु०॥
कोणी कोणी मला सांगती सखा तुझा मेला।
पहा रे सखा तुझा मेला !
सारें खोटें ! सोडुन धरणी मम हृदयीं रमला।
सखा तो मम हृदयीं रमला !
तात्विक ह्मणती अक्षयतेच्या पैल तटा गेला।
खरोखर पैल तटा गेला !
सार यांतलें नष्ट न तो झाला !
पंडितवर० ॥ १ ॥
महाराष्ट्रवाङ्मयीं अमर तो यशोरूप झाला।
खरोखर यशोरूप झाला !
स्मृतिमंजूषा निहित उराशीं बाळगिती त्याला।
रसिकहो बाळगिती त्याला !
रडूं नका मित्रहो न मृत्यू प्रेमा सच्छीला।
खरोखर प्रेमा सच्छीला।
सार यांतलें नष्ट न तो झाला ॥
पंडितवर गेला ॥ २ ॥

**ना० वा० टिळक.**



Printed at the "Ganpat Krishnaji" Press, Bombay, 28-4-99

## आश्रयदात्यांस सूचना.

या मासिक पुस्तकाचें काम किती खर्चाचें आहे इकडे लक्ष देऊन आश्रयदाते आपल्या-कडील वर्गणीचा पैसा जर लौकर पाठवितील तर मोठे उपकार होतील. वारंवार पैशांसाठीं त्यां-च्याकडे जिकीर करणें आह्मांस प्रशस्त वाटत नाहीं.

---

## पोंच.

१. पाणिपतचा दुर्दैवी मोहरा, अथवा पाणिपतचें तुमुल युद्ध–हें नाटक माजी नाट्यकथा-र्णवामधून भागशः प्रसिद्ध होत होतें, तें आतां स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें आहे. पाणिपतचें युद्ध ह्मणजे मराठ्यांच्या इतिहासांतील अत्यंत महत्वाचा प्रसंग आहे. त्या प्रसंगाचें नाटकरूपी चित्र ज्यांना पाहणें असेल त्यांनीं तें प्रस्तुत पुस्तकांत पाहून घ्यावें.

२. दृष्टांतशतक–मित्र, व्यसन, गर्व, इत्यादि व्यावहारिक विषयांवर रा० रा० मोरो गणेश लोंढे यांनीं या कविता केल्या आहेत, आणि इतिहासांतील प्रसिद्ध गोष्टींचे अथवा व्यक्तींचे दृष्टांत दिले आहेत. कविता एकंदरींत सोपी आणि सरळ आहे.

३. सन १३०८ फसली अलमगोर जंत्री व औरंगाबाद डायरेक्टरी.

४. तिलकचंद्र–हें संस्कृत काव्य रा० रा० बाळ गंगाधर टिळक यांच्या स्तुतिपर आहे.

५. आयुर्वेदरहस्य अथवा वाग्भटार्थविस्तार, भाग पहिला–हें पुस्तक मुंबई आयुर्वेद विद्याल-यीन विद्यार्थी रा० शंकर नारायण भागवत यांनीं तयार केलें. वैद्यकज्ञानाभिलाषी जनांच्या आश्रयास पात्र आहे.

६. रा० रा० चिंतामणराव विनायक वैद्य एम्. ए. एल्. एल्. बी. यांच्याकडून पुढील दोन पुस्तकें अभिप्रायार्थ आलीं आहेत. १ विधवापुनर्विवाहनिषेध; २ प्रस्तुत कोणती सुधारणा शक्य आहे? व ती कशी अमलांत आणावी?

---

## सूचना.

विविधज्ञानविस्तार हें मासिकपुस्तक जरी 'कुलस्त्रिया व गृहस्थ' यांच्यासाठीं प्रसिद्ध होत अ-सतें, तरी कुलस्त्रियांसाठींच लिहिलेले लेख यांत फार दुर्मिळ असतात अशी पुष्कळांची कुरकुर आहे, आणि ती बरेच अंशीं खरीही आहे. एका मित्रानें तर हल्लींच अशी पृच्छा केली कीं, 'कुलस्त्रियां-साठीं' हे शब्द मुळींच काढून टाकले तर काय हरकत आहे? तथापि ज्याअर्थीं हें पुस्तक मूळ उ-त्पादकांनीं दोघांच्याही उपयोगार्थ सुरू केलें होतें त्याअर्थीं मूळ उद्देशास अनुसरून जर व्यवस्था होईल तर उत्तम, हें कोणीही सांगेल. विशेषेंकरून स्त्रियांस उपयोगी असे लेख यांत यापुढें यावेत अशी आमची मोठी इच्छा आहे; आणि या कामीं श्रीमती सौभाग्यवती काशीबाई कानिटकर या विदुषी बाईनीं आह्मास साह्य देण्याचें अभिवचन दिलें आहे. पुढील अंकांत त्यांनीं लिहिलेली एक गोष्ट प्रसिद्ध होईल.

# विविधज्ञानविस्तार पुस्तकालयांत मिळणाऱ्या पुस्तकांची यादी.



**रा. सा. विष्णु मो. महाजनी एम्. ए. कृत.**

बंगाल्यांतील जमीनदारी वहिवाट ... १-८-०
कुसुमांजलि. ( स्फुट कविता. ) ... ०-४-०
स्वतःचा प्रयत्न. ... ... ... ०-३-०

**( कै० ) बजाबा रामचंद्र प्रधानकृत—**

सद्गुणी स्त्री ... ... ... ... ०-४-०
दोन गोष्टी ... ... ... ... ०-४-०

**रा. रा. गणेश जनार्दन आगाशे बी. ए. कृत—**

अर्थशास्त्राचीं मूलतत्वें. ... ... २-०-०
बाल-शिक्षण. ... ... ... ... ०-३-०
सुंदरेची संक्रांत. ... ... ... ०-१-६

**( कै० ) वामन दाजी ओककृत—**

थोरले माधवराव पेशवे यांचा मृत्यु (काव्य) ०-६-०
काव्यमाधुर्य ... ... ... ... ०-७-०
लार्ड बेकनचें चरित्र.... ... ... ०-१०-०
गणपतिनिधनविलाप. ... ... ०-२-०
नानक-चरित्र. ... ... ... ०-३-०

**रा. सा. शिवराम सीताराम वागळे बी. ए. कृत—**

व्यवहारनीति अथवा कर्तव्य विचार ... ०-०-०
ब्रिटिश राज्यव्यवस्था ... ... ०-८-०
बेकनचे निबंध. ... ... ... ०-८-०
चातुर्य आणि मनोरंजन. ... ... ०-५-०
सटवाजीराव ढमाले ( फार्स. ) ... ०-४-०
सिसरोकृत नीतिविषयक चार निबंध ०-४-०
पुरून ठेविलेलें द्रव्य ( फार्स. ) ... ०-३-०
महाराष्ट्र काव्यमकरंद ... ... .. ०-५-०

**रा. रा. रामचंद्र भिकाजी गुंजीकरकृत—**

भगवद्गीतेचें सुबोध भाषांतर ... ... ०-१०-०
मोचनगड ... ... ... ... ०-१२-०
सौभाग्यरत्नमाला, भाग १ ला. ... ०-६-०
सरस्वतीमंडल ... ... ... ... १-८-०
भ्रमनिरास ... ... ... ... ०-८-०
महाराष्ट्र भाषेची लेखनशुद्धि. ... ०-३-०
सुबोध व्याकरण ... ... ... ०-४-०

**( कै० ) गणेश भिकाजी गुंजीकर बी. ए. कृत—**

स्वपराक्रम. ... ... ... ... ०-५-०
व्हिक्टोरिया महाराणीचें चरित्र. ... ०-३-०
जुळ्या बहिणी. ... ... ... ०-२-०
कुटुंबवत्सल. ... ... ... .. ०-२-०
दानत. ... ... ... ... ०-१-६

**डा० भालचंद्र कृष्ण भाटवडेकरकृत—**

अबलासंजीवन ... ... ... १-०-०
सार्वजनिक आरोग्य... ... ... ०-१२-०

**( कै० ) आनंदराव सखाराम बर्वे बी. ए. कृत—**

हिंमतबहादर नाटक ( Hamlet. ) ... १-०-०
ठगाची जबानी. ... ... ... २-८-०

**डा० कान्होबा रणछोडदास कीर्तिकरकृत—**

इंदिरा ( काव्य ) ... ... ... ०-१२-०
चार्लस डार्विनचें चरित्र. ... ... ०-२-०

**( कै० ) डा० सखाराम अर्जुनकृत—**

गृहिणी कंठभूषण. ... ... ... ०-१२-०
Bombay Drugs ... ... ... ३-८-०

---

आरबी भाषेंतील सुरस गोष्टी ... ४-०-०
शिवछत्रपतीचें चरित्र. ( चिटणीस कृत ) १-०-०
सौभाग्य रत्नमाला ( २ भाग एकत्र ) ०-११-०
" भाग दुसरा ... ०-६-०
धोममहाबळेश्वर-वर्णन(उदास-कृत)... ०-८-०
मोहना नाटक. ... ... ... ०-८-०
भ्रांतिकृत चमत्कार. ... ... ... ०-६-०
एका रात्रीचा घोंटाळा. ... ... ०-१०-०
अकबर काव्य ... ... .. ०-८-०
तरुण मित्र. ... ... ... ... ०-८-०
तीन गोष्टी. ... ... ... ... ०-४-०
गीतार्थसार ( कै० वा. आ. मोडक कृत ) ०-४-०
पद्यात्मक लघुहितोपदेश. ... ... ०-२-०

टपाल खर्च निराळा—रुपयास दीड आणाप्रमाणें.

॥ श्रीः ॥

# विविधज्ञानविस्तार.

## A MONTHLY MAGAZINE

OF

## MARATHI LITERATURE

FOR

Ladies and Gentlemen.

कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरितां.

पुस्तक ३०. एप्रिल १८९९. अंक ४.

विषय. अनुक्रमणिका. पृष्ठ.



मुंबईंत

गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत छापिलें.

वर्षाची वर्गणी रुपये ३; टपालखर्च आणे ६.

## सूचना.

निरुपायानें हा एप्रिलचा अंक उशीरानें निघत आहे. मे आणि जून या महिन्यांचे अंक आतां लौकरच निघतील. प्लेगमुळें आमच्या इच्छेविरुद्ध आह्मांस जडलेल्या ह्या अनियमितपणापासून लौकरच आह्मी मुक्त होऊं अशी आशा आहे.

---

गुदस्त सालापासून **विस्ताराचा** आकार वाढल्यामुळें खर्चाचें मानही वाढलें आहे. इकडे लक्ष देऊन आमचे आश्रयदाते आपल्याकडील वर्गणीचा सत्वर उलगडा करतील तर मोठे उपकार होतील. सुज्ञांस यापेक्षां जास्त लिहिणें नको.

---

कै० **हरि महादेव पंडित** यांचें चरित्र या अंकांत देण्याचें अभिवचन दिलें होतें. परंतु ज्या त्यांच्या मित्रानें तें लिहिण्याचें पत्करिलें आहे त्यास पाहिजेत तशीं साधनें अद्यून उपलब्ध न झाल्यामुळें तें काम किंचित् लांबणीवर पडलें आहे. परंतु यामुळें वाचकांचा फायदाच होईल, ह्मणून ते आह्मांस या उशिरावद्दल दोष देणार नाहींत अशी खात्री आहे.

---

## पोंच.

१ "छपविलेलें द्रव्य"—'डिटेक्टिव्ह टेल्स' ह्मणून पोलिसच्या लोकांची हुषारी आणि कर्तबगारी दाखविणारीं इंग्लिशभाषेंत मनोरंजक पुस्तकें आहेत. त्यांतील निवडक गोष्टींचीं मराठी भाषान्तरें मराठी वाचकांच्या सोईसाठीं करवून छापविण्याचें काम मुळगांवकर कंपनीनें आरंभिलें आहे. भाषांतराचें काम रा. रा. खंडेराव भिकाजी बेलसरे यांजकडे सोंपविलें आहे. '**छपविलेलें द्रव्य**' ही या मालिकेंतील पहिली गोष्ट होय. याच्या वाचनापासून करमणुक होईल यांत संशय नाहीं. परंतु असलीं पुस्तकें ज्यास्त आदरास पात्र होण्यास भाषाशुद्धीकडे आणि पुस्तकाच्या अंतर्बाह्य स्वरूपाकडे विशेष लक्ष्य दिलें पाहिजे असें आह्मांस वाटतें.

२. **भारतवर्ष**—मराठ्यांच्या इतिहासासंबंधाचे जुने लेख प्रसिद्ध करणारें हें मासिकपुस्तक आतां सातारा येथें सुरळीत रीतीनें निघण्याची व्यवस्था झाली आहे. दुसऱ्या वर्षाचे दोन अंक निघाले, आणि पहिल्या वर्षाचे तीन अंक कमी होते तेही नुक्तेच हातीं आले. आतां भारतवर्षाची एकंदर व्यवस्था रा० रा० पारसनीस यांजकडे आहे. या मासिकपुस्तकाच्या हातून मिरजेच्या "ऐतिहासिक लेखसंग्रहा"प्रमाणेंच मराठ्यांच्या इतिहासास साधनीभूत असा जुना लेखसंग्रह प्रसिद्ध करण्याचें महत्कार्य व्हावें अशी आमची मनापासून इच्छा असल्यामुळें संपादकांस आमची अशी सूचना आहे कीं, वाङ्मयात्मक लेखांस तूर्त फांटा देऊन, जुने लेखच काळजीपूर्वक आणि निःपक्षपातबुद्धीनें प्रसिद्ध करण्यांत यावे. जुने लेख छापून निघाल्यावर मागून टीकात्मक अथवा स्वतंत्र लेख लिहिण्यास ठीक पडेल. रा० रा० विश्वनाथपंत राजवाडे यांजपासून या कामीं त्यांस उत्तम प्रकारचें साहाय्य होईल असें वाटतें. त्यांच्यापाशीं असलेला 'अमूप इतिहासोपयोगी लेखसंग्रह' ग्रंथमालेपेक्षां भारतवर्षामध्यें प्रसिद्ध होणें अधिक योग्य होईल.

श्री.

# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ३०. अंक ४.

पुस्तकपरीक्षा.

## " हिंदुधर्म आणि सुधारणा. "

**दीपो भक्षयते ध्वान्तं कज्जलं च प्रसूयते ।**
**यदन्नं भक्षयेन्नित्यं जायते तादृशी प्रजा ॥**[1]

शिरोभागीं निर्दिष्ट केलेलें पुस्तक पुष्कळ अंशांनीं आमच्या विपन्न सद्यःस्थितीचा परिणाम होय असें सूक्ष्मदृष्टीच्या मनुष्यास कळून येईल. राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक, कोणत्याही बाजूकडे दृष्टि फेंकली तरी समाधानकारक स्थिति दिसत नाहीं. कोणत्याही संस्थेच्या जननकालाचें निश्चयात्मक भविष्य करितां येत नाहीं; तिचा मरणकाल मात्र खात्रीपूर्वक सांगतां येतो. एखादा पुरुष आपल्या बुद्धिमत्तेनें किंवा कर्तृत्वशक्तीनें थोडासा पुढें येऊं लागतो न लागतो तोंच निर्दय काळ त्याजवर झडप घालून त्यास घेऊन जातो. परीक्षा उत्तीर्ण होऊन विद्यार्थिगण पैलतीरावर पाय ठेवून आशाळभूत दृष्टीनें चोहोंकडे पाहूं लागतो तों त्यास प्रत्येक बाजूस दारिद्र्यपिशाच आ वांसून बसलेलें दृष्टीस पडतें. राम सात ताड, व सीता चार ताड उंच होती असें हरिदासाच्या तोंडून वर्णन ऐकतांच आमचे काडीपैलवान तरुण लोक वक्त्याच्या कल्पनाशक्तीविषयीं अस्थिपंजरभूत तोंडें उघडून आश्चर्य करीत रहातात. हेच अस्थिपंजर कांहीं वेळानें आपल्या उदरांत दारूच्या सबंध पिपांना उदार आश्रय देतांना पाहून प्रेक्षकांस आश्चर्य वाटतें. जातीजातींतील वैमनस्य पाहून हिंदु समाजाच्या भावि कल्याणाबद्दल मन साशंक होतें. वक्तृत्वसभेंत सुधारणेविषयीं मोलानें भाषणें करणारे वक्ते घरीं आल्यावर तीं पार विसरून जाऊन विपरीत कृत्यें करण्यास तयार होतात हें पाहून असमाधान उत्पन्न होतें. मेळ्यांतून तालसुरावर काठ्या आपटीत चाललेले आर्यपुत्र मुसलमानाचें नांव ऐकतांच पळ काढतांना पाहून त्यांच्याविषयीं अनादर उत्पन्न होतो. वरिष्ठ प्रतीच्या जागा हिंदु लोकांस बंद असूनही इतर धंदेसुद्धां बसत चाललेले पाहून निराशा वाटूं लागते. घरीं यावें तों बायकांची हालअपेष्टा दृष्टीस पडते. बाहेर जावें तों पुरुषांचें दैन्य नजरेस येतें. गरीबांकडे पाहिलें तर निःसत्वता, आणि श्रीमंतांकडे पाहिलें तर दुर्बलता दिसून येते. आपलीं मुलें दुःखी, तरुण तेजोहीन, आणि वृद्ध—वृद्ध दिसतच नाहींत; मग वर्णन तरी कसें करावें? आपल्या समाज-

[1] दिवा अंधकाराला खाऊन काजळाला प्रसवतो. ठीकच आहे; जसें अन्न नेहमीं खावें तशी प्रजा उत्पन्न होते.

रूप इमारतीच्या लांबीकडे, रुंदीकडे, उंचीकडे-कुणीकडे जरी लक्ष पुरविलें तरी सारखी कीड लागलेली दिसेल. अलीकडे दुष्काळ, अग्निप्रलय, जलप्रलय, भूकंप, रोगांच्या सांथी इत्यादिकांनीं या पिळपिळीत समाजाची जी दुर्दशा उडवून दिली आहे तिचें वर्णन करणें सारखेंच कठिण व दुःखप्रद आहे.

वरील स्थिति पाहून इष्टवादी व अनिष्टवादी या वर्गांच्या मनांत निरनिराळे तरंग येऊं लागतात. दुसऱ्या वर्गापैकीं बराच भाग तर आत्यंतिक निराशेच्या आधीन होतो. या कष्टमय हिंदुस्थानांतील आयुष्याचे उरलेले दिवस कसेबसे काढावे आणि शेवटीं मरून जावें हाच मार्ग या लोकांस मोकळा दिसतो. या वर्गामध्यें जे विशेष चैनी असतात ते कर्तव्याची पर्वा न करितां आमरण मनसोक्त वर्तन करीत रहातात. पहिल्या वर्गास भौतिक सुधारणेचे सर्व मार्ग ढळढळीतपणें बंद दिसत असल्यामुळें तो परमार्थाच्या मार्गास लागून आपल्या मनाचें सांत्वन करितो. पारमार्थिक सुधारणेची भौतिक सुधारणेपेक्षां महती गाण्यांत येते; इतकेंच नाहीं, तर पारमार्थिक सुधारणाच काय ती इष्ट आहे असें प्रतिपादण्यांत येतें. अशांत जर एखादी हिंदुधर्माचें तुणतुणें घेतलेली बिझांट बाई दिसली तर मग विचारावयासच नको. इष्टवाद्यांपैकीं आपल्या विपन्न स्थितीमध्येंही जे अपवादरूप पुरुष आपलें डोकें शाबूद ठेवितात ते सुधारकवर्गांत शिरून त्यामध्यें शेवटीं श्रेष्ठतम ठरतात. याप्रमाणें, खरें पाहूं गेलें तर साध्या वर्तनाचे व चैनी या परस्परांचा जितका निकट संबंध आहे तितकाच कट्टे धर्माभिमानी व कट्टे सुधारक यांचा आहे. परंतु ज्याप्रमाणें युरोपच्या धर्मक्रांतीच्या काळांत सख्खे बंधुसुद्धां मतभेदामुळें परस्परांचे वैरी बनले, त्याचप्रमाणें एकाच प्रेरणेनें प्रेरित झालेले कट्टे सुधारक व कट्टे धर्माभिमानी परस्परांचे कट्टे वैरी बनतात. असाच प्रकार अनिष्टवाद्यांच्या पोटवर्गासंबंधानें सुद्धां घडून येतो. ह्मणजे साध्या वर्तनाचे उदासीन लोक कट्टया धर्माभिमान्यांस मिळून त्यांचा पक्ष कमजोर करितात, आणि चैनी लोक सुधारकवर्गांत सामील होऊन त्यास हलकेपणा आणितात. लहान मुलांच्या खेळांत गड्यांची वांटणी होण्याच्या वेळीं दोन दोन गडी प्रेमानें एकमेकांच्या गळ्यांत हात घालून जोडयांनीं दोन्ही बाजूंच्या मोहोरक्यांपुढें येऊन 'कोणी घ्या कमळ, कोणी घ्या गुलाब' असे शब्द उच्चारून त्यांनीं निवडणुक करितांच एकदम विरुद्ध बाजूंना होऊन एकमेकांशीं नेटानें झुंजतात, त्याचप्रमाणें वरील दोन्ही प्रमुख वर्गांतील पोटवर्ग परस्परविरुद्ध होतांच एकमेकांची यथेच्छ निंदा करावयास लागतात; इतकेंच नाहीं, तर ज्याप्रमाणें पांडवांनीं नकळत प्रत्यक्ष आपल्या बंधूचा वध केला त्याप्रमाणें अज्ञानानें एकमेकांचा नीच साधनांनीं पाडाव करून त्यांतच पुरुषार्थ मानितात.

या गृहकलहाचा एक चांगला परिणाम दिसावयास लागला आहे. सुशिक्षित लोकांपैकीं कांहीं इष्टवादी वर विवेचन केल्याप्रमाणें कट्टे धर्माभिमानी बनल्यामुळें ते साहजिकपणें आपल्या पक्षाचे नायक बनले आहेत, आणि सुधारकांशीं होणाऱ्या संग्रामांत प्रतिपक्षाप्रमाणें बुद्धिवादाच्या शस्त्राचाच उपयोग करीत आहेत. यामुळें सुधारकांस संग्रामाचें कार्य पूर्वींपेक्षां पुष्कळ पटीनें सुलभ झालें आहे. या विधानाची सत्यता प्रस्तुत पुस्तकांतल्याप्रमाणें दुसरीकडे क्वचितच दिसून येईल. प्रकाशकाची प्रस्तावना वाचून पुढील पृष्ठांत जुन्या लोकांचीं मतें

जुन्या तऱ्हेच्या प्रमाणांनीं स्थापिलेलीं पहाण्यांत येतील या आशेनें वाचक पुढें वाचावयास लागतो तों त्यास कोठें उत्क्रांतितत्त्व, कोठें समाजसुख, कोठें जीवनार्थ कलह, कोठें लोकसंख्येतील वर्गांचें पृथःकरण करणारें कोष्टक, वगैरे गोष्टी दिसून येऊन तो क्षणभर बुचकळ्यांत पडतो. नातवाला मांडीवर घेऊन त्याला खेळविण्यांत वेळ घालविणाऱ्या आणि इंग्रजी विद्येचा सात्त्विक रीतीचा तिटकारा दाखविणाऱ्या भाऊसाहेबांसारख्या पेन्शनर गृहस्थांनीं या नवीन गोष्टींचा अभ्यास तरी केव्हां आणि कोठें केला? शेवटीं ही सरळ इंग्रजी विद्या पांढऱ्या पागोट्याच्या आणि पांढऱ्या केंसांच्या डोक्यांत सुद्धां आपला शिरकाव करीत असून आमच्या जुन्या विद्येबद्दलच्या अभिमानास हळू हळू हुसकावून लावीत आहे तर!-असे विचार वाचकास क्षणभर स्तब्ध बसावयास लावितात. पण क्षणभर विचार केल्यास त्यास दिसून येईल कीं, अजून इतकें हताश होण्याचें कारण नाहीं. कारण, भाऊसाहेबांचें चित्र खरोखरीचें नसून तें विद्याधर पंतासारख्या एकदोन मध्यवर्ति भिंगांमुळें अवास्तविक दिसत आहे. हीं मध्यस्थ भिंगें नुसतें परावर्तन करूनच स्वस्थ बसत नाहींत; तर रंग, रूप, गुणसुद्धां पार बदलून दाखविण्याची त्यांच्यांत शक्ति आहे. जीं पारदर्शक म्हणून मिरविणारीं भिंगें असत्यास सत्याप्रमाणें भासावयास लावितात, त्यांना एखाद्या भाऊसाहेबांस किंवा बापूसाहेबांस हर्बर्ट स्पेन्सर बनविणें म्हणजे हातचा मळ आहे.

प्रकाशक प्रस्तावनेंत म्हणतात:—"परंतु जुन्या चालीच्या धर्मसंरक्षक मंडळीस काय वाटतें, ते धर्माभिमान कां बाळगतात...... या गोष्टींचें सर्व लोकांस योग्य ज्ञान होण्याजोगा आतांपर्यंत चांगला ग्रंथ झालेला नाहीं. ही उणीव विद्याधराच्या ग्रंथानें दूर होण्यासारखी आहे." प्रस्तुत पुस्तकाचीं कोणतींही पंचवीस पानें ओळीनें वाचलीं तर सहज कळून येणार आहे कीं, विद्याधरानें आपल्या पात्रांच्या तोंडीं जी भाषा घातली आहे तिला विद्याधराच्या चिमुकल्या पण व्युत्पन्न मेंदूचा बराच गंध लागला आहे. आपणास राजकीय उन्नति अशक्य आहे म्हणून राष्ट्रीयसभा बंद करा;-किंवा आपणांमध्यें विश्वासुकपणाचा गंधही नाहीं म्हणून आपल्या व्यापाराच्या उत्कर्षाची हांव धरणें वेडगळपणा आहे. अशीं सुटीं विधानें जर एखाद्या धर्मसंरक्षकाच्या समोर केलीं तर त्यांची त्याजकडून जी संभावना होईल ती हींच विधानें प्रस्तुत पुस्तकांत जुन्या चालींच्या मंडनार्थ मांडलेलीं असल्यामुळें त्यांजकडून खास होत नसेल. या पुस्तकांत सुधारकांवर उघडपणें बराच ताशेरा झाडला आहे खरा. तरी पण धर्मसंरक्षक मंडळींचे दिवसाढवळ्या गच्च डोळे बांधून त्यांच्या माथ्यावर त्यांचीं नावडतीं विधानें जशीं लादलीं आहेत, तसा प्रकार सुधारकांच्या संबंधानें केला नाहीं, यांत एकाच वेळीं पहिल्याविषयीं अनादर व दुसऱ्याविषयीं आदर व्यक्त केला आहे.

पण विद्याधराच्या या अल्प दोषाचा त्याच्या पात्रांनीं चांगलाच सूड घेतला आहे. विद्याधराच्या कपोलकल्पित प्राण्यांनीं कृतघ्नपणें आपल्या जनकावर (म्हणजे विद्याधराच्या कपोलावर नाहीं हो!) वाक्प्रहार करून त्याचीं मतें पार बदलून टाकिलीं आहेत. पण खरोखर पाहिलें तर या सगळ्याचें श्रेय त्यांच्या वाक्प्रहाराच्या तडाक्यांस नसून विद्या-

धरपंताच्या परप्रत्ययनेयत्वास आहे. हें विद्याधरपंतरूप पीस वाऱ्याच्या मंद झुळकेबरोबर हवें तसें हेलकावे खातें. समोर सुधारक दिसला कीं, विद्याधर सुधारणामय बनलाच. बरें, एखादा भाऊसाहेबांसारखा करडा धर्मसंरक्षक पुढें आला तर त्याप्रमाणें बनण्यास विद्याधराची तयारीच. रामचंद्रपंत, त्यांचे चिरंजीव, मोरियर साहेब, बंगाली साधु, भाऊसाहेब, बापूसाहेब, दंगूशास्त्री, लीलावती इत्यादिकांनीं या वेड्या पीराला आपापल्या बाजूला खेंचून जी बिचाऱ्याची हबेलंडी उडवून दिली आहे ती पाहून वृद्ध स्त्रीनें काळे, व तरुण स्त्रीनें पांढरे केंस उपटून टाकल्यावर टक्कल पडलेल्या व भांबावलेल्या डोक्याची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं. एखादा सुधारक विद्याधराच्या मठ्ठ मेंदूवर सुधारणामृताचें सिंचन करून समाधानानें परत फिरतो न फिरतो तोंच एखाद्या गरम दुर्धारकास दुरून पाहून त्या अमृताची भराभर वाफ होऊं लागते. आमची खात्री आहे कीं, प्रस्तुत पुस्तकांत एक दोन भागांची भर पडून एखादा टारगा सुधारक जर विद्याधराच्या अवलोकनांत आला असता तर त्यानें नर्मदेच्या तीरावर स्नानसंध्या करण्याचा विचार तहकूब ठेवून टेम्स नदीच्या तीरीं वारुणीच्या आचमनांवर सपाटा लाविला असता. इंग्लण्डचा प्रवास जर विद्याधराच्या नशीबांत असताच तर वर निर्दिष्ट केलेल्या पात्रांपैकीं लीलावती त्याला खास सोबती मिळाली असती. कारण मनाच्या चांचल्यांत विद्याधराच्या तोडीची तीच कायती एकटी आम्हांस आढळली. हें स्त्रीरत्न प्रथम आपल्या वक्तृत्वाच्या तेजानें विद्याधरास दिपवून टाकून लागलीच क्षणार्धांत त्याचें उरोभूषण होण्याची इच्छा करीत आहे. आणि आपलें स्वातंत्र्य गमावून अनेक गुणांचा समुदाय जो विद्याधर त्यावर अवलंबन करण्याची इच्छा प्रकट करीत आहे.

विद्याधराच्या मनांतील विचारांचा जसा विशेष गुण आहे कीं समोर नवीन विचार आला असतां ते पुच्छ वळवून धूम मागें पळत सुटतात, तसा त्याच्या शरीराचा नाहीं ही आनंदाची गोष्ट आहे. इतकेंच नाहीं तर त्याचें शरीर स्वतः पीछेहाट करण्याऐवजीं कांहीं विशिष्ट व्यक्तींना रानोमाळ पळावयास लावितें. या विशिष्ट व्यक्ति ह्मणजे सुधारकांतील अनुकरणीय वर्तनाचे लोक होत. विद्याधराची मूर्ति पाहिल्याबरोबर हे लोक चोहोंकडे धांवावयास लागून नापत्ता होतात. यामुळें प्रस्तुत पुस्तकाच्या सृष्टींत चांगले सुधारक औषधाला सुद्धां मिळण्याजोगे नाहींत. दंगूशास्त्र्याची आणि अनेक सुधारकांची गाणाऱ्या कलावंतिणींच्या घरीं ओळख झाली आहे. रामचंद्रपंतांचे चिरंजीव उन्मत्त व चटोर असे दर्शविले आहेत. लीलावतीस विद्याधरानें या शहरांत 'उत्तम सुविचारी गृहस्थ कोण?' अशी पृच्छा केली असतां ती ह्मणते—"सुधारक मंडळींपैकीं कोणीही सुविचारी नाहीं...... कोणी द्रव्यानें उन्मत्त झाले आहेत; कोणी नवें तें चांगलें ह्मणून इंग्रजांचें अनुकरण करीत आहेत; कोणी राजकारणी महत्वाकांक्षेंत आपला जीव व्यर्थ शिणवीत आहेत; सर्व कामांत अविचार सुरू आहे." प्लेटोनें जसें आपल्या "प्रजासत्ताक राज्या"मधून कवींना हद्दपार केलें आहे, त्याप्रमाणें आपल्या समाजास अलंकारभूत झालेल्या सुधारकांना या पुस्तकांत थारा दिलेला नाहीं. विद्याधरपंत जेथें जेथें जातो तेथें तेथें त्यास राम-

चंद्रपंतांचे चिरंजीव, दंगूशास्त्री, यांच्यासारखे टारगे सुधारक मात्र भेटतात. मग विद्याधरपंताच्या शरीरांतच एखादें श्रेष्ठसुधारकोत्सारि द्रव्य असल्यास नकळे! अथवा मिल्टनच्या "पाराडाइस लॉस्ट" मधील सैतान जसा सूर्याप्रत टाळून अंधकारयुक्त गोलार्धांत नेहमीं वास करितो, त्याप्रमाणें हातांत शहाणपणाची दिवटी घेतलेले विद्याधरपंत क्षितिजावर डोकावूं लागतांना पाहून सुधारकशिरोमणि आपापलीं तोंडें अंधारांत लपवीत असल्यास नकळे!

प्रस्तुत पुस्तक टीकाकारानें हातीं घेतलें कीं त्यास टीका लिहिण्याच्या कामीं बऱ्याच अडचणी दिसून येतात. एक तर या पुस्तकाचा नायक जो विद्याधरपंत तोच मुळीं वर दर्शविल्याप्रमाणें सहज न कळणारा असल्यामुळें सुधारणेविरुद्ध दिलेल्या कोणत्या प्रमाणास लेखकानें इतर प्रमाणांपेक्षां विशेष महत्त्व दिलें आहे हें कळण्याचा मार्गच उरला नाहीं. दुसरें असें कीं, प्रस्तुत पुस्तक कादंबरीरूप असल्यामुळें त्यांतील पात्रांचे विचार लेखकाच्या मताशीं जुळणारे असतील कीं नाहीं असा टीकाकारास संशय येणें साहजिक आहे. लीलावतीच्या तोंडीं आरंभीं लेखकानें जी सुंदर आणि जोरदार भाषा घातली आहे तिजवरून हें लेखकाचें प्रियपात्र असावें असा संशय साहजिक उद्भवूं पहतो. भाऊसाहेब, बापूसाहेब इत्यादि इतर प्रियपात्रांच्या तोंडीं घातलेले कांहीं विचार जेव्हां तिच्या बोलण्यांत येऊं लागतात तेव्हां वरील संशय दृढतर होऊं लागतो. पण इतक्यांत हा वेळपर्यंत दगडासारखा बसलेल्या विद्याधरपंताचीं पांच दहा वाक्यें ऐकून जेव्हां लीलावतीचें धर्मांतर होतें तेव्हां वाचकानें रचिलेला सगळाच व्यूह ढासळून पडतो, आणि त्याचें मन बावरल्यासारखें होतें. टीकाकाराचा घोंटाळा उडून जाण्याचें तिसरें कारण असें कीं, लेखकानें सर्व विषय आपल्या ग्रंथांत संगतवार मांडिलेले नाहींत. त्यामुळें एखाद्या प्रमाणाचा एक धागा येथें, तर दुसरा पांच सात भागांच्या अंतरानें. तळमजल्यावर हुक्क्याची चिलीम पाहून ज्याप्रमाणें अपरिचित मनुष्यास तिळमात्रही संशय येत नाहीं कीं, त्या हुक्क्याचा उपभोग घेणारे दाढी-दीक्षित सातव्या मजल्यावर धुराचे लोट सोडीत आहेत, त्याचप्रमाणें अठराव्या भागांत बापूसाहेबांनीं जें बालविवाहाचें सूक्ष्म बीज पेरलें आहे तेंच पस्तीसाव्या भागांत भाऊसाहेब आपल्या वक्तृत्वाचें खत घालून वृक्षरूपानें उदयास आणणार आहेत हें कोणाच्या ध्यानीमनींही येत नाहीं. चवथें, आपल्या या गुंतागुंत झालेल्या समाजांतील सर्व सामाजिक विषय या ग्रंथांत आणिलेले असल्यामुळें, टीकाकारानें एक तर येवढाच अवाढव्य ग्रंथ लिहावा, किंवा मुळींच परीक्षण करण्याचें सोडून द्यावें; यांशिवाय तिसरा मार्ग त्यास मोकळा नाहीं. बाहुलाबाहुलीप्रमाणें मुलामुलीचा विवाह उरकून नंतर मुलीच्या खुदकन् हंसण्यावर व मुरकण्यावर, किंवा 'इश्श बाई, भलतेंच कांहीं तरी' अशा उद्गारांवर भिस्त ठेवून सात्विक-प्रेमोद्भवाची वाट पहाण्याची थोरवी; पतिनिधनाचा हृदयावर डाग बसल्यावर विधवेनें निमूटपणें एखाद्या चावट न्हाव्यासमोर बसून आपल्या केंसांस हक्काची रजा देण्याची आवश्यकता; चारपांच अल्पवयस्क स्त्रियांचा एककालीन जरठ नवरा आपल्या पातकांचा जबाब देण्याकरितां यमलोकीं गेला असतां त्याच्या विधवांनीं सात्त्विकपणें आपल्या नवरोजीच्या चुलत आतेभावाच्या मामेसासऱ्याचीं मुलें खेळविण्याचें महत्त्व; इत्यादि अनेक

विषयांचा ऊहापोह या ग्रंथांत केला आहे. त्यामुळें "चलचल चलचल" ह्मणून एका हातचलाखीच्या खेळापासून भाबड्या प्रेक्षकांची दृष्टि दुसऱ्याच वस्तूकडे आकर्षण करण्यास गारोड्यास जशी त्याची पोतडी उपयोगी पडते, तसा वरील विविध–विषयसमूह लेखकाच्या कामीं पडला आहे. विद्याधरानें प्रिन्सिपाल गोळ्यांवर प्रकाशनाचें काम सोंपवून स्वतःच्या प्रमादाची कांहीं जबाबदारी त्यांजवर ढकलण्याची जी अजब युक्ति काढली आहे तिची भर वरील सर्व अडचणींत घातल्यास विद्याऽधरखंडनाचें कार्य जितकें आनंददायक आहे तितकें सुलभ नाहीं हें तेव्हांच लक्ष्यांत येईल.

पुस्तकांतील प्रमुख विषयांकडे वळण्यापूर्वी ग्रंथकर्त्याच्या कांहीं ऐंद्रजालिक साधनांशीं वाचकांची ओळख केल्यास बरें पडेल. प्रथम तर ग्रंथकर्त्यानें सात्विक मनोवृत्ति, तादात्म्यशक्ति वगैरे कांहीं शक्ति आपल्या शिलकेंत ठेवून दिल्या आहेत; प्रतिस्पर्ध्यावर बाकीचे बाण सोडून सर्व उपाय हरल्यावर मग वरील शक्तींचा उपयोग करावयाचा. या शक्तींचा असा एक विशेष गुण आहे कीं, त्यांचा उपयोग केल्यावर त्या नष्टवीर्य न होतां पुनः आपल्या भात्यांत जाऊन घुसतात. बालविवाहाचा सोहळा उरकतांना मंगलाष्टकांत सात्विक मनोवृत्तींचा उल्लेख करून पुनः विधवाविवाहास शाप देण्याच्या मंत्रांत सुद्धा त्यांना ढकलतां येतें. बालविवाह आणि विधवाविवाहप्रतिबंध हे निसर्गतः परस्परविरुद्ध असूनही, ज्याप्रमाणें "मोत्या मोत्या छूः" केल्यावर मोत्या बेधडक उडी घालून समोर येणारास चीत करितो, त्याप्रमाणें दोन्ही प्रचारांच्या शत्रूंस सपाट्यासरसे हाणून पाडणाऱ्या वस्तूंची थोरवी काय सांगावी? असो. ग्रंथकर्त्याचें दुसरें साधन–आपल्या मतलबास लागेल तेव्हां शब्दांचे अर्थ बदलून टाकावयाचे–हें होय. याचें उत्कृष्ट उदाहरण ह्मटलें ह्मणजे विधवाविवाहासंबंधानें लिहितांना 'मातृत्व' या शब्दाची केलेली ओढाताण. विध्यर्थि विधानापासून स्वार्थी सिद्धांत काढणें हें तिसरें साधन ग्रंथकर्त्यानें योजिलें आहे. याचें उदाहरणः—

प्रत्येक पुढच्या विवाहांत स्त्रीस संतति होण्याचा संभव कमी असतो.

ज्या विवाहानें संतति होण्याचा संभव कमी असतो तो विवाह **करूं नये.**

∴ मध्यम वयाचे पुरुष विवाह **करीत नाहींत.** (जें सिद्ध करावयाचें तें झालें.)

ग्रंथकर्त्याचें चौथें साधन, अन्यायाचें मंडन करितांना तो अन्यायच अन्यायविषयाच्या सद्गुणाची साक्ष आहे असें प्रतिपादन करणें. छत्रपति शाहू राजाची विधवा राणी सती जाणार अशी खोटी भुमका चोहोंकडे उठवून, नंतर त्या बिचारीला खरोखरीच सती जाण्यास लावून आपल्या मार्गांतील कांटा काढणाऱ्या बहाद्दर पेशव्याची वरील युक्तीनें प्रत्येकास आठवण होईल. बालविवाहाचें रहस्य काय? तर जन्मापासून स्त्रीहृदयांत जो सात्विक प्रेमाचा अंकुर फुटत असतो त्यास सुदिशा लावणें. विधवाविवाह त्याज्य कां? तर तो प्रचार आणिल्यानें अनादि संस्कारांनीं उदात्त झालेली स्त्रियांची चित्तवृत्ति नीचतेस जाईल ह्मणून. "अज्ञानी विधवांमध्येंही उत्कृष्ट मनोवृत्ति असतात; परंतु तुह्मी त्यांस न्याय देण्याकरितां वाद करूं लागलां ह्मणजे त्या त्यांच्या मनोवृत्तींचा मुळींच उल्लेख करीत नाहींत. त्यामुळें विधवांस वाटतें, आपले जुन्या चालीचे आप्त बरे, परंतु हे बेअब्रू करणारे सुधारक कैवारी नकोत." कां? आहे कीं नाहीं

बेमालूम युक्ति? आह्मांमध्यें अजून जातिभेदासारखा मोठा अन्याय अवशिष्ट राहिला आहे याचें कारण काय? तर शूद्रांमध्यें जी तादात्म्यशक्ति व परमार्थबुद्धि वाढली आहे ती. हा शेवटचा घुटका शूद्रजातीस कितीसा मानवेल याचा संशयच आहे. पण विधवांना दिलेला उदात्त चित्तवृत्तीचा वळसा मात्र बराच लागू पडेल असें वाटतें. अंगांत जों जों सद्गुण अधिक तों तों दुसऱ्यांनीं जखडून टाकण्याची आवश्यकता अधिक, या विधानाची असत्यता कळण्याइतकी बुद्धि आह्मी परोपकाराचा डौल मिरविणाऱ्या पुरुषांनीं त्यांच्यांत उरूं दिली असती तर त्यांना ही गोष्ट समजून आली असती. असो. कधीं कधीं एखाद्या साधनापासून कायदेशीर रीतीनें एखादा सिद्धांत निघत नसूनही ग्रंथांतील एखादें धर्माभिमानी पात्र तो सिद्धांत काढण्यास मागें पुढें पहात नाहीं याचें उत्तम निदर्शन 'प्रेमाकर्षणा'च्या भागांत वाचकांस आढळून येईल. प्रेमाकर्षणाची फजीती करण्याच्या भरांत दंगूशास्त्री जी गोष्ट सांगतो त्या गोष्टीचा, पुरुषोत्तम ( वर ) एंजलिकच्या ( वधूच्या ) मरणानंतर अर्धवेडा होऊन जगाचे पाठीवर फिरत आहे असा हृदयद्रावक शेवट वाचतांना वाचकांचें मन पूर्वीपेक्षां प्रेमाकर्षणाकडे आकर्षून जातें, व दंगूशास्त्र्यानें येवढा केलेला खटाटोप व्यर्थ होतो. कधीं कधीं तर आपला स्वार्थ साधण्याकरितां ग्रंथकर्त्यानें आपल्या पात्रांकरवीं सुधारकांच्या इष्ट सिद्धांतांचें साहाय्य घेतविलें आहे. प्रौढविवाहाची मनमुराद निंदा करून विधवाविवाहासंबंधानें विवेचन करितांना ग्रंथकार भाऊसाहेबांकडून वदवितात—" मुलींचीं वयें जीं हळू हळू वाढत चाललीं आहेत तीं पुनर्विवाहास आड येतील."

ग्रंथकाराच्या मनावर दुराग्रहाचा पगडा किती आहे हें पूर्णपणें कळण्यास वरील विवेचन थोडेंसें तरी साधनीभूत होईल. या ग्रंथांत आढळणारे कांहीं विसंगतपणाचे प्रकार या दुराग्रहाचे जसे परिणाम आहेत तसेच द्योतकही आहेत. ते येथें दिले असतां अप्रासंगिक होणार नाहीं. या ग्रंथांत सुधारकांच्या नीचपणाबद्दल जशी टिमकी वाजविली आहे तशी त्यांच्या उदात्त प्रेरणांबद्दलही एक दोन ठिकाणीं कुजबुज केली आहे. सुधारकांनीं रूढि बदलूं नये अशा आशयाचें पुराण सांगून त्याच दमांत जुन्या लोकांना ती बदलण्याबद्दल शाबासकी दिली आहे. पितृगृहीं प्रौढ मुलीचें ब्रह्मचर्य असंभवनीय कल्पून दुसऱ्या ठिकाणीं तें सुसंभाव्य मानिलें आहे. एका स्थळीं ऐहिक सुखाचा व भौतिक उन्नतीचा धिःकार करून अन्य स्थळीं पारमार्थिक उन्नति या दोहोंवर अवलंबून असलेली दाखविली आहे. शिद्यांना स्वतंत्र करून ज्या महात्म्यांनीं त्यांजवर अगणित उपकार केले आहेत त्यांच्या उपकारांची किंमत कमी करून शूद्रांना सदोदित दास्यांत ठेवूं पहाणाऱ्या ब्राह्मणांची थोरवी गाण्यांत सर्व वक्तृत्व खर्च केलें आहे. हिंदुस्थानांत उपभोगाची अनावश्यकता आहे असें विधान करून उपभोगांच्या त्यागांत दिसून येणाऱ्या ब्राह्मणांच्या निरपेक्षतेचे पोवाडे गाइले आहेत. सत्य, प्रेम, दया वगैरे सात्विक गुणांची महती सांगून व आह्मांमध्यें सात्विक गुण पूर्णपणें बिंबले आहेत असें प्रतिज्ञेनें बोलून, आमच्या मनाची कोमलता वर्णावयाच्या भरांत आह्मीं कधीं कधीं सत्यापलाप करितों व आह्मांमध्यें विश्वासुकपणा बिलकूल नाहीं असे वेडगळ उद्गार काढिले आहेत. सुधारकांना धर्मांत हात न

घालण्याबद्दल ताकीद देऊन खिस्ती धर्माच्या सांनिध्यानें होत जाणाऱ्या स्वधर्मसंशोधनाचें अभिनंदन केलें आहे. लीलावती पक्की नास्तिक होती असें तिच्या भाषणांत व्यक्त करून तिच्याकडून स्त्रियांच्या श्रद्धेबद्दल अभिमान प्रदर्शित केला आहे. बालविवाह मंडनाच्या वेळीं स्त्रियांची कामरूपी मनोवृत्ति प्रबळ असें स्थापित करून, विधवाविवाहखंडनाचे प्रसंगीं तिचें उच्चाटन केलें आहे. रामदास धर्मप्रेमामुळें लग्नाच्या भानगडींत पडला नाहीं असें जाहीर करून पुढील भागांतच बुद्धिप्रकर्षामुळें येणारें संततिहीनत्व त्या महापुरुषाच्या गळ्यांत बांधून पूर्वींचा जाहीरनामा रद्द केला आहे. एकदां इंग्रजी ज्ञानाच्या प्रसाराबद्दल खेद प्रदर्शित करून नंतर तरुणांच्या उन्मत्तपणामुळें होणाऱ्या त्या ज्ञानाच्या भावि अप्रियतेबद्दल दिलगिरी दाखविली आहे. आनुवंशिक संस्कारामुळें बापाचा धंदा चालविण्यास मुलगा विशेष योग्य होतो असें ठाम ठरवून नंतर मुलानें पितृस्वीकृत मार्गापेक्षां निराळा मार्ग स्वीकारण्याचा उपदेश केला आहे. पाणी ज्याप्रमाणें संनिहित वस्तूप्रमाणें रंग बदलतें त्याप्रमाणें या ग्रंथांतील धर्माभिमानी गृहस्थसुद्धां विषयभेदाप्रमाणें आपल्या प्रमाणांचें रंगरूप बदलून टाकितात. प्रकाशकांनीं धर्मसंरक्षकांच्या ज्या विचारसरणीचा उल्लेख केला आहे ती हीच असल्यास हा ग्रंथ त्यांच्या मताप्रमाणेंच "मनोरंजकच नव्हे तर उत्कृष्ट उपदेशपर होईल" असें आम्हांसही वाटतें. तर्कज्ञानास या ग्रंथामुळें किती भर पडणार आहे हें जरी प्रकाशकांनीं नजरचुकीनें आणि विद्याधरानें विनयामुळें, वाचकांच्या पुढें आणिलें नाहीं तरी एखाद्या तर्कशास्त्रावरील पुस्तकांतील हेत्वाभासप्रकरणास वरील अनुमानपद्धतीचा बराच उपयोग होईल हें आम्ही प्रकाशकांस बिनधोकपणें सांगूं शकतों. या अमोल ग्रंथाचा हा उपयोग नर्मदातीरस्थ विद्याधरपंडितांस कळविण्याचीही आमची प्रकाशकांस विनंती आहे.

ग्रंथकर्त्यानें स्वतःशीं केलेला विरोध आतांपर्यंत दाखविण्यांत आला. ग्रंथांतील निसर्गविरुद्ध गोष्टी नमूद करावयास लागलों तर आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टींएवढा विस्तृत आणि तितकाच मनोरंजक ग्रंथ होईल. ह्मणून प्रमुख गोष्टींवरच उतावळ्या मनाचें सांत्वन केलें पाहिजे. विद्याधराच्या कल्पनासृष्टींत, वेदांतील देवयान व पितृयान या प्रदेशाप्रमाणेंच, सुधारकांचा व धर्मसंरक्षकांचा असे दोन प्रदेश कल्पिले आहेत. सुधारकांच्या प्रदेशांत ताडी, माडी इत्यादि देशी, व ब्रांडो, शांपेन इत्यादि परदेशस्थ दारू फार उत्पन्न होते. मांसाचे रांजण एकमेकांवर रचलेले इतस्ततः दिसून येतात. दारू आणि मांस यांशिवाय वारयोषितांचेंच कार्यतें व्यसन येथील रहिवाशांस असतें. या प्रदेशांतील स्त्रिया फारच वाईट असतात. एकीकडे पहावें तों एक तरुणी एका तरुणास प्रेमाकर्षणाचा पाश घालून ओढीत आहे. दुसरीकडे पहावें तों दुसरी कामिनी एका अजागळ तरुणावर भाळून त्याच्या गळ्यांत गळा घालण्याच्या बेतांत आहे. येथील वारयोषितांचीं गृहेंच कायतीं पुरुषांमध्यें परस्परांच्या ओळखी होण्याचीं साधनें असतात. या गृहांचा उंबरठा वलांडला कीं, पुरुषांची एकमेकांशीं ओळख होण्याची आशाच नको. पुरुषांना इतरत्र परस्परांची ओळख करून घेण्याला अवकाशही नसतो; कारण, दारू पिऊन झिंगण्याशिवाय जो वेळ राहील तो ते राजकीय खट-

पटी वगैरे मूर्खपणाचीं कृत्यें करण्यांत दवडतात. सर्व सुधारक उदात्त मनोवृत्तींनीं प्रेरित होतात इतकीच कायती दुःखांत सुख मानण्यास त्यांना जागा आहे.

धर्मसंरक्षकांचा प्रदेश याहून फार रम्य आहे. येथें साम्राज्य करण्यास कवि व स्त्रिया यांची एक कमेटी बसत असते. कारण सृष्टींतील प्रत्येक गोष्टीचें रहस्य यांच्यावांचून कोणासही कळत नसतें. हा येथील सर्वांचा—विशेषतः ग्रंथकारांचा—अनुभव आहे. तत्ववेत्ते, इतिहासकार, वेदांती हे बेटे मूर्ख असल्यामुळें त्यांना या कमेटींत जागा नसून झाडलोट करण्याच्या कामावर त्यांची नेमणूक केलेली आहे. येथें चातुर्वर्ण्यासारखी संस्था असल्यामुळें समाजास फार बळकटी आली आहे. येथील ब्राह्मणांवर आपली सांवली पडेल या भीतीनें त्यांपासून एका हांकेच्या अंतरानें चालत असतां शूद्रांना ब्राह्मणांचें सर्व सुख तादात्म्यशक्तीमुळें अनुभवितां येत असल्यामुळें आनंदाच्या गुदगुल्या होत असतात. शिवाय, ब्राह्मणांइतकी सात्त्विक वृत्ति संपादिल्यावर त्यांना ब्राह्मणांत शिरण्याची मोकळीक असतेच. मात्र वरिष्ट वर्गांत शिरण्याची इच्छा टाळवेल तितकी टाळण्याचा प्रत्येक शूद्र प्रयत्न करीत असतो. कारण वार्षिक परीक्षेंत ही इच्छा जितक्या मानानें जास्त तितकी उमेदवाराची नालायकी अधिक असें ठरविण्यांत येतें, आणि वरच्या वर्गांत जाण्याचा मार्ग बंद होतो. येथील स्त्रिया ह्मणजे गूढ रत्नें असतात. प्रत्येक मुलीची नाळ कापल्याबरोबर तिच्या बेंबीच्या देंठाशीं सात्त्विक प्रेमाचा व उदात्त मनोवृत्तीचा उद्भव होऊं लागतो. येथील मुलींचीं लग्नें लहानपणींच होतात. कारण सात्त्विक प्रेमाची वाढ होण्यास अवसर पाहिजे कीं नाहीं? लहानपणीं लग्न केलें नाहीं तर तिच्या उदात्त मनोवृत्ति लयास जाऊन ती पक्की दुराचरणी बनते. लग्न झाल्यावर तिच्या खुदकन् हंसण्याच्या प्रत्येक लकेरीबरोबर तिचें पतीवरील सात्त्विक प्रेम वाढत जातें. आणि या हंसण्याच्या मदतीस 'इश्श बाई' वगैरे उद्गार असल्यास मग विचारावयासच नको, प्रेमाचा नुस्ता लयलूट होऊन जातो. अशा प्रेमांत जर मृत्यूनें पतीवर झडप घातली तर या विचित्र प्रदेशांत कोणासच वाईट वाटत नाहीं. कारण मुलीच्या सात्त्विक आप्तांना आपल्या मुलांची शुश्रूषा करण्यास, किंवा बायकांच्या विटाळांत किंवा दुखण्यांत त्यांची खस्त खाण्यास, कोणी आप्त स्त्री पाहिजेच असते. स्वतः मुलीला आप्तांचीं मुलेंबाळें खेळविण्यासारखें किंवा त्यांचीं उष्टीं खरकटीं काढण्यासारखें मनोरंजनाचें साधन असल्यामुळें तिचा वेळ तेव्हांच निघून जातो. अगदीं करमेनासेंच झालें तर मसाला कुटणें, मेतकूट दळणें, तांदूळ कांडणें वगैरे रासायनिक प्रयोग करून किंवा व्यायामाचे खेळ खेळून ती आपली करमणूक करून घेते. एखाद्या वेळीं पतीची आठवण झालीच तर तिच्या पतीचा आत्मा तिजभोंवतीं घिरट्या घालीत वरील करमणुकीचे खेळ पहात असल्यामुळें त्या आत्म्याकडे डोळे भरून पाहून ती समाधान मानिते. एखादा नापिक तिचें सौंदर्यसर्वस्व हरण करण्याच्या इराद्यानें पुढें आला असतां, स्वतः मातृत्वदीक्षा धारण केली आहे या उदात्त गोष्टीची तिला अवचित आठवण होऊन ती हंसत हंसत आपली मान त्यापुढें करिते. एखाद्या सुधारकानें या प्रदेशांत प्रवास करीत असतां जर तिला पुनर्विवाह करण्याची सल्ला दिली

तर ती लागलीच वरील स्त्रीमिश्रित कविमंडळापुढें बेअब्रूची फिर्याद आणिते. या प्रदेशांतील प्रत्येक स्त्री स्वतःस **कादंबरी** समजून जवळ बसलेल्या पुरुषाच्या गळ्यांत हात घालते, तोंच तीस आपण **महाश्वेता** आहों अशी आठवण होऊन ती त्याच्याशीं जन्मभर बहिणभावंडाचें नातें राखण्याची प्रतिज्ञा करिते. याच प्रदेशांतून नर्मदा नदी वहात गेली आहे. तिच्या कांठीं समाजाची उन्नति करूं पहाणाऱ्या देशाभिमानी लोकांची पंगत बसून जपमाळ ओढीत असते. या प्रदेशांतील बहुतेक पुरुष जुन्यांत जुने, नव्यांत नवे या वर्णनास शोभतील असे असतात. यांची करमणुक ह्मटली ह्मणजे लोकसंख्येचीं व समाजांतील निरनिराळ्या वर्गांचीं कोष्टकें बनविणें, किंवा फार झालें तर चिमुकल्या नातवास मांडीवर घेऊन एखाद्या प्रवासी सुधारकास व्याख्यानें झोडणें ही असते. सुधारकांना शिव्या देण्यानें येथील अशक्त माणसांस मूठभर मांस येतें. येथील वैद्य क्षयरोग्यास हाच उपचार सांगत असतात. येथील ब्राह्मणेतर जातींत "आपापल्या उत्कर्षाकरितां पैसा गोळा करून स्वजातीयांच्या उत्तेजनाचे प्रयत्न चालू" असतात. ब्राह्मण जातींत मात्र अशा प्रयत्नांना जागा मिळत नाहीं. मिळणार तरी कोठून ? व्यावहारिक स्वपरभाव त्यांच्या मनोदेवतेस पसंत असेल तर कीं नाहीं ? नसल्यावर त्या प्रयत्नांची भीति सुद्धां नको.

विद्याधराच्या कल्पनासृष्टीचें वरील वर्णन आमच्या वाचकांपैकीं कित्येकांस लांबच लांब वाटेल. परंतु त्यास आमचा निरुपाय आहे. विद्याधराच्या ग्रंथांतील कांहीं मासलेवाईक भाग वाचकांपुढें मांडण्याचा आमचा विचार असल्यामुळें त्या भागांचें हृद्गत त्यांस पूर्णपणें कळावें इतकी तयारी करणें आह्मांस भाग पडलें. अशा अलौकिक विचारांच्या ग्रंथाचें परीक्षण करितांना 'मियां मूठभर आणि दाढी हातभर' असा प्रकार हटकून व्हावयाचा. या प्रदेशाचा वरील नकाशा बरोबर घेतल्यास वाचक फारसे खांचखळग्यांत पडून इजा पावणार नाहींत; किंवा लीलावतीच्या नेत्रकटाक्षांनीं विद्ध होऊन जाण्याची, दंगूशास्त्र्यासारख्या विषारी कालसर्पांच्या फूत्कारांनीं दग्ध होऊन जाण्याची, किंवा भाऊसाहेबांसारख्या पटाईत फांसेपारध्याच्या पाशांत गुरफटून जाण्याची भीति त्यांना आतां बाळगण्याचें कारण नाहीं.

---

# चांदण्यांतल्या गप्पा.

## गोष्ट १.

फाल्गुन मास संपत आला. वसंताचीं पूर्वचिन्हें दिसूं लागलीं. बहुतेक वृक्षवेलींनीं आपल्या जुन्या वस्त्रांचा त्याग करून नवीन सुंदर सुंदर रंगांचीं वस्त्रें परिधान केलीं व कांहीं करीत आहेत;—जणुं काय युवयुवती एखाद्या मोठ्या समारंभास जाण्यासाठीं नटून थटून तयार झाल्या आहेत, अथवा वसंतरूप फार थोर पाहुणा आपले घरीं येणार ह्मणून थाटमाट करून त्या त्याची वाटच बघत आहेत. घरधनी व धनिनी यांनीं सुंदर पोशाख केल्यामुळें व तीं आनंदांत आहेत असें पाहून आश्रितसमुदायही आनंदित दिसत आहे. पिढ्यानूपिढ्या आश्रय करून राहिलेला पक्षिगण मोठ्या गडबडीनें इकडून तिकडे तिकडून इकडे जात येत आहे. त्यांच्याही अंगावर चित्रविचित्र रंगांचे अंगरखे दिसत आहेत. कोणाचा तांबडा, कोणाचा हिरवा,

कोणाचा पिंवळा, कोणाचा निळा, कोणाचा पारवा, कोणाचा पांढरा शुभ्र, कोणाचा बुट्टीदार; कोणीं डोक्यावर तुरा खोंविला आहे; कोणीं विडे खाऊन तोंडें लाल केलीं आहेत; कोणी तोंडास व पायांस हळद फांसली आहे; कोणीं आपल्या पायांस मेंदी लावली आहे. याप्रमाणें ज्यानें त्यानें आपल्या आवडीप्रमाणेंआपणास शृंगारलें आहे.

सकाळीं व दुपारीं मंजुळ सूर काढून हा नटवेबाज पक्षिसंघ गात आहे. त्या निरनिराळ्या पक्ष्यांचीं निरनिराळीं गाणीं ऐकिलीं असतां आज यांनीं एकमेकांवर ताण करण्याचें मनांत आणिलें आहे कीं काय असें वाटे.

पर्वताकडे दृष्टि फेंकली असतां तो रखरखित, झाड पान वेल यांविरहित उघडा बोडका दिसतो आहे. जशीं शेजारीं शेजारीं दोन घरें असून एका घरावर दरवडा पडून किंवा त्यास आग लागून त्याचा नाश होतो, व दुसऱ्या घरीं अकल्पित कारणानें लक्ष्मीस ऊत येतो, त्याप्रमाणें वनभूमि व डोंगर या दोन शेजाऱ्यांची स्थिति भासते. संसारांत हा असाच नेहेमींचा अनुभव आहे. एकाचा भाग्योदय होतो तोंच दुसऱ्याच्या विनाशकाळास आरंभ होतो. एक अत्यंत दरिद्रावस्थेंतून निघून हत्तीच्या अंबारींत बसतो व दुसरा दारिद्र्यरूप पंकांत मग्न होतो. अशी दैवगति विचित्र आहे. थोरांना दारिद्र्य फार दुःख देतें. नेहेमीं श्रीमंतींत व ऐषआरामांत वागलेल्याला दारिद्र्य आलें असतां त्याचे चाकरनोकर आप्तइष्ट सर्व त्यास सोडून जातात, व त्या दारिद्र्याचें दुःख तो बापडा एकटाच भोगीत असतो. त्याच्या निकटसंबंध्यांना त्याचेप्रमाणेंच दुःख होतें; तथापि त्याला सोडून जाण्याचें त्यांस भाग पडतें.

दरिद्री पुरुषाच्या कन्येप्रमाणें ही नदी पहा—आपला तरी भार पित्यावर कशाला टाकावा असें मनांत आणून त्याचा निरोप घेऊन मोठ्या कष्टानें आपल्या पतिगृहाचा मार्ग क्रमीत आहे. क्षीणतेमुळें मार्ग चालण्यास कठिण पडून ठिकठिकाणीं विश्रांति घेत घेत व दम टाकीत टाकीत ती चालली आहे. कोठें कोठें तर ती कोणा दुष्टापासून आपणास उपद्रव होऊं नये ह्मणून दडत व लपत चालली आहे, असें वाटे. इतकें करूनही बिचारीचें संरक्षण करण्यास अथवा तिचेबरोबर जाऊन तिला पतिगृहीं पोंचविण्यास कोणी नसल्यामुळेंच जणों कोठें खड्याचा, कोठें डबक्याचा, अथवा एखाद्या वांकणाचा तिनें आश्रय केला असतां ते दुष्ट बगळे वाटमाऱ्याचें महा नीच कृत्य अंगीकारून बिचारीचे थोडेसे शिल्लक राहिलेले व तिचे फार आवडते असे मत्स्यादि अलंकार भराभर ओरबाडून घेऊन तिला ताप देत आहेत. ज्यांस आपण आजपर्यंत जीवन देऊन प्रेमानें वाढविलें व पोशिलें ते तीरस्थ वृक्ष आपल्यास या संकटकाळीं खास उपयोगी पडतील अशा आशेनें त्यांच्या बुंधांचा आश्रय करण्यास ती बिचारी गेली, तों तेही त्या दुष्ट बकांना लपण्यास आश्रय देऊन चोरांना सामील झाल्याचें तिला आढळलें. तेव्हां, उपकारकर्त्यांवर संकट आलें असतां प्रसंगीं उपयोगी पडणारा जगांत विरळा! ज्यांवर आपण उपकार केले ते प्रसंगीं आपणावर अपकार करण्यासच प्रवृत्त झाले, असें पाहून नदी अतिशय संतापली. 'पित्याकडे याचें गाऱ्हाणें सांगण्यांत कांहीं हांशील नाहीं. तो अगोदरच दुर्बल झाला आहे; त्याला या गोष्टीपासून अधिक ताप मात्र होईल' असा विचार मनांत आणून आपला प्रिय पति जो सागर

त्याला तिनें सर्व हकीकत सांगितल्यावरून तो रागानें अत्यन्त क्षुब्ध झाला व कृतघ्न वृक्षांचा नाश करण्यास्तव सर्व वातावरणांत त्यानें दंव व धुकें पसरून दिलें. दंव हेंच सागराचें शापोदक होऊन अनेक वृक्षांचें अनेक प्रकारें नुकसान झालें. कोमल हृदयांच्या आम्रवृक्षांचा मोहोर गळून पडल्यामुळें ते रडूं लागले व त्यांच्या मधुरूपी अश्रूंनीं त्यांच्या खालची भूमि ओली चिंब झाली.

पण या झाडांवरून गुंगत राहणाऱ्या मधमाशा पहा ! कोणाचें कांहीं का होईना आपला मतलब साधला कीं झालें, अशा कांहीं व्यक्ति आपल्या पहाण्यांत येतात कीं नाहीं ? त्यांना काळ वेळ, ठिकाण, या कशाचा विचार नसतो. फक्त त्यांच्या मतलबाशीं गांठ पडली ह्मणजे झालें. 'शेजारीं कोणी दारिद्र्यांत निमग्न असो, कोणी चोरांकडून लुटला जावो, कोणी श्वापदग्ध होवो, त्याच्याशीं आपल्याला काय करावयाचें आहे ?' असा विचार करणाऱ्या मधमाशा आपल्या कामांत अगदीं गर्क आहेत. त्या आपल्या सकाळ संध्याकाळ या झाडावरचा थोडा त्या झाडावरचा थोडा गुं गुं गुं गुं शब्द करीत मध गोळा करीत व इकडून तिकडे तिकडून इकडे लगबगीनें जातांयेतांना दिसत आहेत. किंवा असेंही ह्मटलें तरी चालेल कीं, मधमाशा वस्तुस्थितीचा विचार करणाऱ्या आहेत; झालेली गोष्ट जर कांहीं पुनः परत येत नाहीं तर मग उगीच शोक करण्यांत अथवा तेंच तेंच घेऊन बसण्यांत तरी कोणता अर्थ आहे ? झालेलें नुकसान कांहीं भरून येत नाहीं, तेव्हां त्यांतल्या त्यांतच काय होण्यासारखा आपला फायदा असेल तो करून घ्यावा असें ह्मणूनच जणों त्या आंब्यांनीं टाकून दिलेला मध जमा करण्यास लागल्या आहेत.

प्लेगमुळें आह्मी या अशा परिस्थितीचा अनुभव घेत आहों. अरण्यवासाचें व सृष्टिसौंदर्याचें अशा प्रकारें सुख अनुभवीत असतांही चित्तास स्वास्थ्य ह्मणून वाटत नसे. कारण रोज व्यवसाई मंडळी आपल्या व्यवसायांसाठीं प्लेगनें पछाडलेल्या ठिकाणीं जाऊन येत व संध्याकाळीं—ही लागली, ती मेली, त्याला 'सेग्रिगेट' केला, अमकी गरीबाची बायको होती, तमक्याची बायको बुडाली, फलाण्याचीं पोरें उघडीं पडलीं, अशा सारख्या उद्वेगजनक बातम्या आणीत व पुनः पुनः त्याच विषयांवर बोलत बसल्यानें आमच्या सर्वांच्या मनाला उद्विग्नता मात्र येई. ह्मणून मीं एक दिवस आमच्या एकंदर मंडळीला ह्मटलें कीं, आपण संध्याकाळीं दररोज गोष्टी सांगून करमणूक करून आपल्या उद्विग्न मनांची शांति करण्याचा मार्ग काढूं. ही सूचना सर्वांना पसंत पडली; व रोज गोष्टी सांगण्याचें ठरलें. मीं त्यांच्या गोष्टी लिहून काढण्याचें पत्करलें. कारण मला गोष्टी सांगतां येत नाहींत. गोष्टी सांगण्यास लागणारा वाणीचा रसाळपणा माझ्या अंगीं नाहीं, व त्या सांगतांना गोष्टीला तिखट मीठ लावून गोष्ट सांगण्याचें चातुर्यही माझ्यामध्यें नाहीं; ह्मणून मी हें मजुरासारखें लिहिण्याचें काम पत्करलें. देवानें चातुर्य व माधुर्य हे गुण जेव्हां आपल्या दरबारांत वांटले तेव्हां माझ्या कमनशीबरूपी पाहरेकऱ्यानें माझा त्या दरबारांत प्रवेशच होऊं दिला नाहीं. असो.

आह्मी ज्या जागेंत रहात आहों त्याचें आणखी थोडेंसें वर्णन देऊन नंतर आमच्यापैकीं एका गृहस्थानें गोष्ट सांगितली ती देतें.

आमच्या समोरच सागरगडचा डोंगर दिसतो. एका बाजूस रामधरण आहे, व उत्तरेच्या अंगास कनकेश्वरचा डोंगर आहे. सह्याद्रीच्या एका डोंगराच्या पायथ्याशीं नदितीरावर जुन्या आंब्याच्या राईंत आह्मी रहात आहों. या राईंतील आंब्याचे वृक्ष फार उंच उंच गेलेले आहेत. व त्यांच्या फांद्या एकमेकांत गुंतल्यामुळें वर नजर फेंकली असतां हिरवेंगार व बुट्टीदार छत दिलें आहे असें वाटतें. या राईंत सकाळसंध्याकाळशिवाय सूर्याचा प्रवेश होत नाहीं. या राईंत आमचीं गवताचीं झोंपडीं एखाद्या ऋषीच्या आश्रमासारखीं शोभतात. पूर्वेच्या बाजूला जी सह्याद्रीची ओळ आहे तिकडून सूर्य उगवला ह्मणजे प्रातःकाळीं फारच नामी दिसतो.—जणूं काय जगच्चालक सुवर्णकार त्या डोंगराच्या मागल्या बाजूला असून त्यानें हा लाल तापविलेला सुवर्णगोल निवण्याकरितां पर्वतावर ठेविला आहे ! केव्हां केव्हां वाटतें कीं, सृष्टिदेवीचा हा कुंकुमतिलकच आहे; व केव्हां वाटतें कीं, सृष्टि व ईश्वर हीं रंगपंचमीचा रंग खेळत असून त्यांनीं हा गुलालगोटा फेंकून दिला आहे! संध्याकाळीं पश्चिमेच्या बाजूला पहावें तों वाटतें कीं, सूर्यपत्नी आपल्या भ्रताराच्या आगमनसमयीं आपलें पुढलें अंगण शृंगारून केशराचा सडा घालून प्रियपतीची वाट पहात बसली आहे ! आमच्या या तपोवनांत उभें राहून कोणीकडच्याही बाजूला व कोणत्याही वेळीं दृष्टि फेंकली तरी देखावा मनोहरच दिसतो. आतां उन्हाळा सुरू झाल्यामुळें डोंगर अगदीं रखरखीत झाले आहेत. तरी मधून मधून कोठें हिरवळ दिसते. जसा एखाद्या श्रीमंताच्या घरावर दरवडा पडून सर्व नाहींसें होतें, पण कोठें कोनाकोपऱ्यांत एखादें फडताळ राहून त्यांत कांहीं खुर्दा, कांहीं दागिने चुकून शिल्लक रहावे, तसें तें दिसतें. डोंगराच्या पायथ्यावरील वनभूमिका फारच नामी दिसतात. तीं सरळ व उंच ताडाचीं झाडें डोकीवर हिरवागार तुरा धारण करून उंचीच्या कामांत डोंगराशीं जणों प्रतिस्पर्धा करीत आहेत असें वाटतें. लांब लांब पानांचीं हिरवीं गार केळींचीं झाडें, लालभडक फुलांनीं गजबजलेले पांगारे, जीर्णपर्ण झालेले साग, पोपटी रंगाचे करंज, हिरव्या गार भेंड्या, मोहोरलेले आंबे, लांब लांब दाढीच्या ऋषींसारखे वड, ठेंगण्या करवंदीच्या जाळ्या व जमिनीबरोबर लवलेले—वालांचे, घेवड्याचे, रताळ्याचे वेल व झेंडूंच्या फुलांचे वाफे हे फार सुरेख दिसतात. जशी कांहीं डोंगरानें आपली ही संपत्ति चोरांच्या भयानें जमिनींत ठेवली आहे, किंवा त्यांच्या घरीं कांहीं कार्यप्रयोजन आहे ह्मणून या हिरवे शालू नेसलेल्या वनभूमिका कार्यसिद्धि करण्यास चालल्या आहेत, असें भासतें. आमच्या या तपोवनांत दोन तीन कुटुंबांचींच झोपडीं किंवा पर्णकुटिका आहेत. त्यांतील आह्मी सर्व माणसें एका कुटुंबांतल्यासारखीं वागतों. संध्याकाळीं आमच्या पर्णकुटीसमोरच्या अंगणांत सर्व जण जेवणखाण उरकून येऊन बसतात, व गोष्टी सांगतात. आमच्यापैकीं एका गृहस्थानें गोष्ट सांगण्यास आरंभ केला. ते ह्मणाले:—

तुह्मां सर्वांना, किंवा कांहीं जणांना तरी, मुंबईचे प्रसिद्ध वकील **रावबहादूर गणपतराव सरदेसाई** हे ऐकून ठाऊक असतीलच. मी वकिलीचा अभ्यास करीत असतां त्यांच्या मुलांना शिकविण्याचेंही काम करीत असें. माझी मूळची गरिबी होती. मला स्वतःचें कोणी नव्हतें व पैशाची मदत करण्यासारखे

कोणी आप्तइष्टही नव्हते. अगदीं पहिल्या-पासून शिकवण्या पत्करूनच मी आपला अभ्यास केला. शाळेंतली हुषारी पाहून माझ्या सासऱ्यानें मला आपली मुलगी दिली. ती मोठी होईपर्यंत त्यानें तिला आपले घरींच ठेवून घेतलें, व पुढें मोठी झाल्यावर मज-कडे आणून पोहोंचविली. मला शिकून दहा रुपये मिळत व शिकवणीचे १० मिळत. त्यांत आमचा दोघांचा संसार होत असे. पुढें वकिलीची परिक्षा देण्याचें मी मनांत आणलें. पण वकिलीची परिक्षा देण्यास कायद्याचीं पुस्तकें पाहिजेत. त्यांला किंमत अतिशय पडते ती देण्याचें माझे अंगीं सामर्थ्य कोठचें ! तेव्हां एखाद्या वकिलाचा कारकून व्हावें असें मी मनांत आणिलें. कारकुन ठेवतां काय म्हणून मी रावबहादुरांना विचारण्यास गेलों. त्यांनीं माझा अभ्यास पाहून व मी कशाकरितां कारकून रहाण्याचें पत्करीत आहें हें समजून घेऊन, मला त्यांनीं आपल्या मुलांना शिकव-ण्यास ठेविलें. त्यांना दोन मुलें होतीं. एक मुलगा व एक मुलगी. मी दोन तास शिकवीं व एक तास त्यांच्या कायद्याच्या पुस्तकालयांत कायद्याचा अभ्यास करीं. रावबहादुरांना घरीं **बाबासाहेब** म्हणत. **बाबासाहेबांच्या** शरीराची काठी उंच असून हाडपेर चांगलें मजबूत होतें, रंग साधारण गोऱ्यांतला होता, नाक सरळ, भिवया भपकेदार, डोळे खोल व बारीक, व मिशा वर पिळलेल्या असत. **बाबासाहेबां-कडे** पाहिलें म्हणजे हा गृहस्थ फार तिरसट असावा असें वाटे. **बाबासाहेबांना** बोलणें अगदीं थोडें हवें असे व तेंही अगदीं मुद्द्याचें. मुद्द्याबाहेर एक अक्षरसुद्धां बोललेलें त्यांस आव-डत नसे. या सर्वांवरून ते खास तुसडे आहेत असें एक दोन वेळ ज्यानें त्यांस पाहिलें आहे अशा माणसास वाटल्यावांचून रहात नसे. पण खरो-खर ते तसे नव्हते. त्यांची वागणूक फार सभ्य-पणाची व सरळ असे.

त्यांचा मुलगा **भय्यासाहेब** अगदीं आ-पल्या वडिलांप्रमाणेंच निघेल असें त्याच्या आतांच्या वळणावरून दिसत असे. मुलीला **अक्कासाहेब** म्हणत. तिचा चेहरा फार सौम्य असे. ती नाकाडोळ्यांनीं सुरेख व फार मनमिळाऊ स्वभावाची होती. **बाबासाहेबांना** या दोन अप-त्यांशिवाय त्यांच्या जिव्हाळ्याचें असें कोणी न-व्हतें; एवढेंच नव्हे, पण या दोन अज्ञान मुलांचें संगोपन करण्यास कोणी बायको माणूसही त्यांच्या नात्यागोत्याचें नव्हतें. बाबासाहेबांच्या दिखाऊ तिरसटपणामुळें त्यांचीं मुलें त्यांस भीत असत, व त्यांचें त्या मुलांवर अतिशय प्रेम होतें तरी तीं मुलें त्यांच्याजवळ फारशीं जात नसत.

मी दोन तास शिकवून लौकर घरीं जाई. कारण घरीं ती एकटीच असे. आणखी मी जेथें बिऱ्हाडाला जागा घेतली होती त्या जा-गेच्या आसपास ब्राह्मणांचा शेजार नव्हता. मी घरीं जाऊं लागलों म्हणजे दोन्हीं पोरें ए-वढींशीं तोंडें करीत. असें निराळें बिऱ्हाड करून **बाबासाहेबांच्या** येथें शिकवायला सरा-सरी एक दोन महिने गेलों असेन. पुढें **बाबा-साहेबांच्या** सांगण्यावरून मी आपलें बिऱ्हाड त्यांच्याच वाड्यांत आणिलें.

**बाबासाहेबांनीं** मुंबईची वकिली बहुतेक सोडल्यासारखीच होती. एखाद्या कुळाच्या आग्रहावरून एखादे वेळीं ते मुंबईस अथवा इतर ठिकाणीं जात. एरवीं, त्यांनीं **वाईस** जमीनजुमला केला होता तेथेंच ते

रहात. वाईंत त्यांचें घर मेणवलीचे वाटेवर गांवाच्या बाहेर एका उंचवटयाच्या मैदानावर होतें. बाबासाहेबांच्या वाडयाला बाहेर मोठा थोरला कोट असून त्याला बुरूज होते. वाई प्रांतीं त्याला **सरदेसायांची गढी** ह्मणत. या गढीच्या बाहेरच्या कोटाच्या आंत बागशाई होती. मागल्या बाजूला तर चांगला मोठा मळाच होता. आंतल्या बाजूला ह्मणजे मुख्य राहत्या वाडयांत चारी बुरूजांवर चार खोल्या व त्याच्या खालींही तशाच खोल्या होत्या. आंतला वाडा चौसोपी होता, व बुरूजाच्या खोल्यांना लागूनच चार मोठमोठीं दालनें होतीं. पश्चिमेच्या बाजूच्या बुरूजावर **बाबासाहेब** बसत असत व त्याला लागूनच जें दालन होतें त्यांत त्यांचा **पुस्तकसंग्रह** असे, व सर्वांत पुढच्या दालनांत बैठक घातलेली असे त्या ठिकाणीं ते आल्यागेल्याची व पक्षकारांची गांठ घेत. **बाबासाहेबांच्या** एकंदर पुस्तकसंग्रहाची किल्ली माझेजवळ असे व तेथें बसून कायद्याचा अभ्यास करण्यास त्यांची मला परवानगी होती.

**बाबासाहेब सरदेसाई** ह्मणजे वांईतलें चालतें बोलतें घडयाळच, असें तेथील लोक समजत. त्यांचें जेवण, स्नान, फिरावयास जाणें, वाचीत बसणें व निजावयाला जाणें या सर्व वेळा अगदीं बांधून टाकलेल्या असत. त्यांच्या बसावयाच्या खोलीचें, वाचनगृहाचें अथवा भेट घेण्याच्या दिवाणखान्याचें दार वाजलें कीं, अमुक वाजून अमुक मिनिटें झालीं, असें समजून त्या दाराच्या करकरण्यावर आपलें खिशांतलें घडयाळ खुशाल लावावें! एक सेकंदाचा देखील फरक पडावयाचा नाहीं. **बाबासाहेबांचा** फार वेळ सहवास आह्मां कोणालाच आवडत नसे. त्यांची वर्तणूक जरी अतिशय सभ्य व चाकर नोकरांशीं त्यांचें वर्तन शांत असे, तरी त्यांचा तो दिखाऊ तिरसटपणा व मित भाषण यांमुळें त्यांचा फारच वचक वाटे.

पुस्तकालयाच्या अगदीं शेजारीं ह्मणजे त्याला लागूनच त्यांची खोली होती. मी पुस्तकालयांत दोन दोन तास बसत असें. पण मला त्यांच्या खोलीच्या आंत काय सामान होतें व ती कशी होती हें ठाऊक नव्हतें. खोली राहो; पण ज्याच्या आश्रयानें आपण रहातों त्या आपल्या अन्नदात्या यजमानाचा पूर्व वृत्तांत काय होता, त्याच्या कुटुंबांत माणसें कोण होतीं, याची सुद्धां मला माहिती नव्हती.

एके दिवशीं तिसरे प्रहरीं मी मुलांना घेऊन गढीच्या मागें बाग होती तींत फिरावयास गेलों. मुलांच्याबरोबर एक दोन गडीमाणसें होतीं. बागेंत गेल्यावर मीं आपलें अभ्यासाचें पुस्तक बरोबर घेऊन गेलों होतों; तें घेऊन तेथें एका आंब्याच्या झाडाखालीं मी वाचीत बसलों व मुलें खेळूं लागलीं; आणि गडी माणसें गप्पा सप्पा मारीत झोंपडयांत बसलीं. मुलें झोंपडीजवळच खेळत होतीं ह्मणून मी निर्धास्त होतों, व वाचनांत अगदीं गढून गेलों होतों. तों एकदम विहिरींत कांहीं पडल्याचा मोठा आवाज झाला. तो ऐकतांच माझें काळजांत चर्र झालें, व तेथून उठून मी एकदम विहिरीकडे गेलों. पहातों तों **अक्कासाहेब** आंत पडलेल्या! मी लगेच अंगांतलें फेंकून दिलें, धोतराची कांस मारली, जानवें कमरेसभोंतीं खोंचलें, व एकदम विहिरींत उडी टाकली. मुलीनें एक गटंगळी खाऊन ती वर आली.

तोंच मीं तिची वेणी धरून तिला वर ओढली व पोटाशीं धरली. वर गडीमाणसें होतीं त्यांनीं पाळणा वगैरे आणून तो आंत सोडला. त्यांत मीं तिला बसवून वरच्या लोकांनीं तो सावकाश शिकाळून घ्यावा ह्मणून त्यांस बजावून मी वर चढलों व पाळणाही त्यांनीं वर ओढला. मुलगी चांगली सावध होती. एखादें मांजर विहिरींत पडलेलें पोहोऱ्याविऱ्यांत काढलें ह्मणजे तो पोहोरा जमिनीवर टेंकतांच भोंवतालच्या माणसांना भिऊन तें जसें पट्कन् उडी मारून चालतें होतें, त्याप्रमाणें पाळणा भुईवर टेंकतांच **अक्कासाहेब** चट्कन् पाळण्याबाहेर उडी मारून आल्या. हें पाहून आह्मां सर्वांस पराकाष्ठेचा आनंद झाला, व देवानें मोठी खैर केली असें वाटलें. नाहींतर त्या मुलीला बुडावयास वेळ तो कितीसा लागता! आणखी तसें झालें असतें तर केवढा दुर्धर प्रसंग! तीं दोन मुलें **बाबासाहेबांचा** अगदीं जीव कीं प्राण होतीं. त्यांच्या सुखासाठीं **बाबासाहेब** किती खर्च सोशीत होते, किती माणसें बाळगीत होते! मुलांच्या पायाला कांटा बोंचला तर **बाबासाहेबांना** स्वस्थ झोंप येत नसे, मग मुलीवर बुडण्याचा प्रसंग आला असता तर त्यांची काय दशा झाली असती!!! असो. आह्मां सर्वांवरचा त्या दिवशीं हलगर्जी ह्मणून घेण्याचा प्रसंग परमेश्वरानें टाळला एवढें खरें.

गर्दीत जाऊन कोरडीं चिरगुटें पांघरुणें आणतांना गड्यामाणसांनीं बरीच धांदल केली, त्यामुळें **अक्कासाहेब** विहिरींत पडल्याची गुणगुण **बाबासाहेबांच्या** कानावर गेली. खरोखर काय प्रकार आहे तो पहाण्याकरितां ते स्वतःच येण्यास निघाले होते; तोंच आह्मी गर्दीत जाऊन पोहोंचलों. त्यांनीं मुलीला जवळ घेतलें, तिचें चुंबन घेतलें आणि मग तिला खेळावयास पाठविलें. नंतर त्यांनीं मला आपल्या बसावयाच्या खोलींत बोलावून नेऊन झालेली हकीकत सांगण्यास सांगितलें.

**बाबासाहेबांनीं** मला आपल्या खोलींत बोलावलें यावरून मला मोठें आश्चर्य वाटलें, व मजवर त्यांची एकदम बहाल मर्जी कशी झाली याचें मला मोठें गूढ पडलें. मी त्यांच्या विश्वासाला पात्र आहें असें त्यांना आढळून आलें असेल ह्मणूनच त्यांनीं मला खोलींत येण्याबद्दल सांगितलें असावें, नाहींतर त्या खोलींत जाण्याची कोणालाही परवानगी नसे. त्यांचीं जिवापलीकडे ठेविलेलीं अशीं मुलेंसुद्धां त्या खोलींत पाऊल टाकीत नसत. यामुळें त्यांच्या खोलींत जाण्याचा विशेष मान हा आपल्यालाच मिळाला असें मला वाटलें.

या खोलींत भिंतीशीं एक लहान टेबल, त्याचेजवळ खुर्ची, टेबलावर एक शिसवी पेटी, व टेबलावरच्या बाजूला भिंतीशीं एका सुंदर तरुण स्त्रीची तेलाच्या रंगांत काढलेली मनुष्याच्या पूर्ण आकाराची अशी तसबीर होती. येवढेंच काय तें तेथें सामान. ते त्या खोलींत वाचावयास वगैरे बसत ह्मणून थोडींशीं पुस्तकेंही तेथें होतीं. टेबलावर जी पेटी होती ती मीं अनेक वेळां पाहिली होती. **बाबासाहेब** बाहेर गांवीं कधीं कामाकाजाला गेले तरी ती पेटी त्यांच्या बरोबर असे, ते तिला अगदीं विसंबत नसत.

खोलींत गेल्यावर, मुलगी कशी पडली, कशी काढली, वगैरे सर्व मीं त्यांना सांगितलें; व मुलीच्या जिवाला अगदीं भय नाहीं, आपण अगदीं काळजी करूं नका असें मी त्यांस खात्रीपूर्वक सांगितलें. माझें बोलणें संपतांच त्यांनीं मला

निरोप दिला. मुद्याचें व कामापुरतेंच बोलण्याची त्यांच्या येथें वहिवाट असे ह्मणून पूर्वींच मीं सांगितलें आहे. तेव्हां मला लगेच निरोप मिळाला याचें मला अर्थातच नवल वाटलें नाहीं.

**बाबासाहेबांच्या** खोलींतून खालच्या दिवाणखान्यांत मी येतों तोंच त्यांचे कारभारी **परशुरामपंत** यांनीं मोठ्या आश्चर्यचकित मुद्रेनें मला ह्मटलें, 'मास्तरसाहेब, आज आपणावर यजमानांची मोठी मेहरबानगी झाली बोवा!'

**मी**—ती कशी?

**परशुरामपंत**:—त्यांनीं होऊन तुह्माला आपल्या खोलींत बोलावलें ही का लहानसहान मेहेरबानी?

**मी**—त्या संबंधानें ह्मणत असलां तर आहे खरी बोवा!

**परशु०**—स्वारी पुन्हा आपल्या पहिल्या वळणावर चाललीसें वाटतें.

**मी**—पहिल्या वळणावर ह्मणजे काय? तुह्मी काय ह्मणतां तें मला कांहींच कळत नाहीं!

**परशु०**—ह्मणजे? (मोठ्या आश्चर्यानें ह्मणतो) यजमानांची पहिली बायको वारल्यावर यजमान कोणत्या थराला गेले होते हें साऱ्या मुंबईला व बाईला ठाऊक आहे; आणी तुह्माला त्याबद्दल कांहींच ठाऊक नाहीं?

**मी**—नाहीं बोवा. मला कोठून असेल माहित? **बाबासाहेबांना** दोन बायका झाल्या हें सुद्धां आज तुमच्याच तोंडून मला कळत आहे.

**पर०**—तर मग तुह्मांला कांहींच ठाऊक नाहीं. **बाबासाहेबांची** पहिली बायको वारल्यावर त्यांनीं किती तरी दिवस दुसरें लग्नच केलें नव्हतें. आह्मीं सर्वांनीं पुष्कळ आग्रह केला पण ते का आमच्या सारख्यांचें ऐकतात? किती झालें तरी आह्मी त्यांचे आश्रितच. त्यावेळीं यांची तिशी कांहीं उलटली नव्हती, अगदीं तरूण होते. तरूण व संपत्तिमान् असल्यावर भोंवतीं अनेक तऱ्हेचे लोक जमतात. तशांत यांचा पडला वकिलीचा धंदा, त्या धंद्याच्या निमित्तानेंही यांच्याकडे पुष्कळ तऱ्हेच्या लोकांचें येणेंजाणें होत असे. हे मुंबईंत चांगल्या नामांकित वकिलांत पहिले होते; पैशाचा जणुं यांच्यावर पाऊस पडत होता. एकएका महिन्याला सात सात आठ आठ हजार रुपये त्यावेळीं यांना मिळालेले मी आपल्या डोळ्यांनीं पाहिले आहेत. त्या पैशांबरोबर वाईट संगतीनें दारूही पण यांच्या घरांत शिरली! प्रथम कांहीं फारसें व्यसन नव्हतें. पण पुढें पुढें दिवसांचे दिवस दारूच्या धुंदींत जात. दारूच्या व्यसनाबरोबर हलकट लोकांच्या संगतीनें दुसरेंही व्यसन यांना लागलें. दुसऱ्या बाईसाहेबांच्या लग्नानंतर त्यांच्या शहाणपणानें हे चांगले सुधरले होते, पण पुन्हा पूर्व वळणावर स्वारी जाऊं लागलीसें वाटतें.

इतकें बोलून **परशुरामपंत** तेथून चालता झाला. मी ह्याच गोष्टीचा विचार करीत होतों, आणि कांहीं वेळानें अंगरखा पागोटें घालून फिरावयास निघून गेलों. पण '**परशुरामपंतांनीं** सांगितली ही गोष्ट खरी असेल काय? जे **बाबासाहेब** मला एवढे प्रतिष्ठित, सभ्य, मितभाषणी असे दिसतात, त्यांना वाईट संगत लागणें शक्य आहे काय! कीं लोक कांहीं तरी बोलतात!' इत्यादि विचार वारंवार मनांत येऊन माझें डोकें अगदीं भणभणून गेलें. मी त्या दिवसापासून त्या गोष्टीचा शोध करण्याचा निश्चय केला.

एके दिवशीं दोनप्रहरीं मी मधल्या दिवाणखान्यांत वाचीत बसलों होतों. मुलें खेळावयास गेलीं होतीं, व ती दोनप्रहरची अम्मळ लवंडली होती. इतक्यांत माडीवर कांहीं वाजल्याचा आवाज माझ्या कानीं आला. ह्मणून मी तें काय आहे तें पहाण्यास उठलों. तों स्वत: बाबासाहेब कोणाला तरी रागानें बाहेर घालवून देत आहेत असें ऐकूं आलें. मी जिन्याच्या तोंडाशीं जातों तों नेहमीं येणारी गौळण भराभर पावलें टाकीत घाबरलेली खालीं येत आहे, व बाबासाहेबांच्या खोलींत ती पैसे मागायला गेल्याबद्दल तिला ते रागें भरत आहेत असें दिसलें. त्यांच्या बोलण्यावरून, तिनें त्यांच्या शिस्वी पेटीला हात लावला, असें मला आढळून आलें. कोणाला विचारल्यापुसल्याशिवाय ती खोलींत गेली ह्मणून त्यांना तिचा संताप आला.

एक दिवस जेवणें खाणें झालीं, मुलेंहीं लौकर निजलीं, असें पाहून आमची ही ह्मणाली, 'आज एकादशी आहे—रास्त्यांच्या विष्णूला पोषाख फार नामी करितात. तर आपण तो पहायला जाऊं.' मी तिचें ह्मणणें कबूल केलें,— तिनें तांदूळ, सुपाऱ्या, हळदकुंकवाची डबी घेतली, मी अंगरखा पागोटें घालून आलों. तिनें दारेंबिरें लावून, उंदीर वात नेतील ह्मणून दिव्यावर झांकण घालून, मुलांना संभाळा ह्मणून घरांतल्या बाईला सांगून, ती व मी घरांतून बाहेर पडलों.

शुद्ध पक्षांतील एकादशीची रात्र; ग्रीष्म ऋतूंतील चांदणें फारच मजेदार पडलें होतें. ठिकठिकाणच्या देवळांतून भजनाचा सपाटा चालला होता. त्या भजनांतल्या टाळांचा झणझणाट लांबवर ऐकूं येत होता. त्याशिवाय जिकडे तिकडे शांत व गंभीर झालें होतें. लोकांच्या घरांभोंवतीं लावलेल्या फुलझाडांच्या फुलांचा घमघमाट सुटला होता. प्राणिमात्र निद्रासुखाचा अनुभव घेत होता. जीवांबरोबर जड अशीं घरें, दुकानें, डोंगर हेही निद्रावश झाल्यासारखे वाटत.—जणुं प्राण्यांच्या सारखे तेही 'जीवनार्थ कलहा'नें थकून गेले आहेत !! देवदर्शन घेऊन घांटावर गणपतीचें दर्शन घेण्यास गेलों. मंद मंद वारा वहात होता. गंगेचें पाणी प्रशांत असावयाचें, पण वाऱ्यामुळें त्यांत बारीक बारीक लाटा उठत होत्या. त्या असंख्य लाटांत चंद्राचीं प्रतिबिंबें दिसत होतीं.—जणुं काय त्या आकाशस्थ थोरल्या चंद्राचीं हीं असंख्य बालकें जलक्रीडा करीत आहेत. केव्हां वाटे, असंख्य रत्नांचा रस करून तो ओतून दिला व त्याचाच हा गंगारूप प्रवाह वहात चालला आहे. वारा मंद झाल्यावर घांटावरच्या देवळांचें, आकाशाचें, डोंगराचें, वृक्षवेलींचें पाण्यांत साफ प्रतिबिंब दिसे, तेव्हां तें फारच मनोरम वाटे व मनांत येई कीं, वैकुंठ वैकुंठ ह्मणतात तो हाच असावा, व श्रीविष्णूंनीं वैष्णवांना वैकुंठीं जाण्यास लांब पडूं नये ह्मणून श्रीकृष्णाबाईच्या उदरांत त्याची स्थापना केली असावी ! कृष्णेच्या पलीकडे डोंगरावर, वाईतल्या घरांवर, तसेंच झाडांवर नजर फेंकली असतां तीं सर्व पांढरीं शुभ्र दिसत.—जणुं का रात्रिपति जो चंद्र त्याच्या आगमनसमयीं रोहिणीनें असंख्य कामधेनूंच्या दुधानें त्याचे पाय धुतले होते, त्या दुधाचा लोट पृथ्वीवर येऊन त्यानें हीं घरें, दारें, डोंगर, झाडें वगैरे पांढरीं शुभ्र दिसत आहेत. अशासारखा सुंदर देखावा पहात पहात व त्या संबंधानें बोलत बोलत आह्मी बाबासाहेबांच्या माडीखालीं येऊन थडकलों. आह्मी आपल्या बोलण्याच्या ऐन भरांत होतों

तों माडीवरून कधीं न ऐकलेले असे एका स्त्रीचे गोड शब्द कानीं पडले. आह्मी दोघांनीं आश्चर्यचकित मुद्रेनें एकमेकांकडे पाहिलें, पण कांहींच बोललों नाहीं. मुकाट्यानें घरीं जाऊन निजलों.

मी नांवाला हंतरुणावर जाऊन पडलों. पण कांहीं केल्या झोंप कशी ती बिलकूल लागेना. डोक्यांत त्या बाईबद्दलच विचार घोळत होते. गढीच्या पुढच्या दारावर पहारा, मागल्या दोन्ही तीन्ही दारांना आंतून कुलुपें, इतका बंदोबस्त असतां इतक्या रात्रीं **बाबासाहेबांच्या** माडीवर ही स्त्री आली कोठून ? गढी फार जुनी होती. तेव्हां कदाचित् तिला चोरवाट असण्याचा संभव आहे. पण ती कोणच्या बाजूनें असेल ? ही बोललेली स्त्री फार दिवसांची माहितगार असेल ह्मणून आजपर्यंत ती आल्याचें कोणाला कळलें नसावें. काय असेल तें असो. कांहीं तरी गूढ आहे खरें ! कदाचित् त्यांच्या खोलींतूनच ती चोरवाट असेल व ह्मणूनच कोणी त्या खोलींत गेलें असतां त्यांना राग येतो व ते त्यावर अतिशय संतापतात. अशांसारखे विचार पुनः पुनः माझ्या डोक्यांत घोळत राहिले. त्यामुळें अहोरात्र जागरण झालें. तशांत आणखी रात्रीं पोटांतही दुखूं लागलें. नुस्ती बिछान्यावर लोळून लोळून रात्र काढली. सकाळीं तोंड धुणें वगैरे करून अंगरखा पागोटें घातलें, व **गंगापुरींत** माझ्या ओळखीचा एक वैद्य होता त्याचेकडे गेलों, व पोट दुखत होतें त्यावर औषध मागितलें. त्यानें तें दिलें. मी औषधाच्या पुड्या घेऊन घरीं आलों व वैद्यबोवांनीं सांगितल्याप्रमाणें त्या घेतल्या. त्या दिवशीं लौकरच जेवणखाण करून पुस्तकसंग्रहाच्या दालनांत अभ्यास करीत बसलों. मुलांना त्या दिवशीं आदितवारची सुटी होती. अभ्यास करीत असतां केव्हांच मला झोंप लागली; हातांतलें पुस्तक खालीं गळून पडलें, व मी चांगला घोरूं लागलों असें वाटतें.

मी किती तासांनीं जागा झालों तें मला कांहीं कळलें नाहीं. पण जागा झालों तेव्हां जिकडे तिकडे अंधार पडला होता. दिवे लावण्याच्या वेळीं गड्यानें चोहोंकडचीं दारें लावून बाहेरून कड्या लावून घेतल्या होत्या. कदाचित् मी निजलेला, त्याला अंधारांत दिसलों नसेन. पण मी अशा रीतीनें कोंडला गेलों. या दाराशीं जा, त्याला धक्का देऊन पहा, त्या दाराशीं जा, त्याला धक्का देऊन खडखडाव, असें मी पुष्कळ केलें. पण सारीं दारें लावलीं गेल्यामुळें माझा कांहीं इलाज चालेना. कोणाला मोठ्यांदा हांक मारावी तर **बाबासाहेबांची** बसावयाची खोली अगदीं जवळ ! अशा पंचाइतींत मी जों पडलों आहें तों माझ्या कानांवर असे शब्द पडले. "ऐकलें का ? आपण येवढें वाईट वाटूं देऊं नका. मी कांहीं लांब नाहीं. जेव्हां ह्मणाल तेव्हां आपल्याजवळच आहें." हे शब्द कानीं पडतांच माझी छाती धडधडूं लागली. अंगावर कांटा उभा राहिला, डोकीवरचे केंस सुद्धां भीतीनें ताठ उभे राहिले असावे, असें मला वाटलें. डोळ्यांचीं बुबुळें गरकन् फिरल्याचा भास झाला. सर्वांगाला घाम सुटला व हातपाय लटलटां कांपूं लागले. कोणाला हाक मारीन तर बोबडी वळली. अशी माझी दशा कां झाली व मी येवढा कां घाबरलों हें माझें मलाच सांगतां येईना. पण घाबरलों खरा. भीतीनें माझी अशी गाळण झाली आहे तों पुन्हां तसेच शब्द

माझ्या कानीं आले: हे शब्द थोडे गाण्याच्या सुरांत असल्यासारखा भास झाला.

यावेळीं मीं अगदीं धैर्य केलें. उठून उभा राहिलों. मी ऐकला हा स्त्रीचाच शब्द काय, याची आपल्या मनाशीं खातरी करून घेतली. शेंडी बांधली. धोतराच्या ओढळ्या घट्ट केल्या, सदऱ्याच्या गुंड्या निघाल्या होत्या त्या घातल्या, व नीट **बाबासाहेबांच्या** खोलींत शिरलों. मला पहातांच **बाबासाहेब** रागानें खुर्चीवरून एकदम उठले व दाराशीं येऊन रागाच्या स्वरांत मला ह्मणाले:—

**बाबा०**–कोण पुरुषोत्तमपंत ?

**मी**–( भीत भीत ) होय, मीच तो.

**बाबा०**–(रागानें) येवढ्या रात्रीं विचारल्यापुसल्यावांचून येथें कसे आलां ?

मी हात जोडून मोठ्या नम्रपणानें आपली सर्व हकीकत त्यांना जी होती ती खरी खरी सांगितली. मी बोलत असतां त्यांचा राग थोडथोडा कमी कमी होत गेला असें मला वाटलें व माझें बोलणें संपतांच तो पार नाहींसा झाला. माझें बोलणें सर्व खरें व मी झालेली हकीकत इमानानें सांगितली, अशी त्यांची खात्री झाली. ते ह्मणाले–"गोष्ट झाली त्याला इलाज नाहीं. ज्याअर्थीं तुह्माला अवचित माझें गौप्य कळलें आहे, त्याअर्थीं मीच आतां तें सर्व सांगतों. पण उद्यां सकाळाला तुमची माझी गांठ पडूं नये, व पुन्हा कधींही तुमची माझी दृष्टादृष्ट होऊं नये, अशी माझी इच्छा आहे. असें ह्मणून त्यांनीं आपली हकीकत सांगण्यास आरंभ केला:—

**बाबासाहेब सरदेसाई ह्मणाले—**

"माझी पहिली बायको वारल्यावर मी केवळ पिशाचवृत्ति धारण केली होती. त्यावेळीं पैसा तर माझे घरांत गंगेच्या लोटाप्रमाणें वाहून येत होता. त्यामुळें मी अगदीं धनांध होऊन कोणालाच मोजीनासा झालों. माझ्या नातेवाईकांनीं दुसरें लग्न करण्याविषयीं मला पुष्कळ आग्रह केला. पण मी कसला त्यांना जुमानतों ! मी त्यांना साफ सांगितलें कीं, मला लग्न करावयाचें नाहीं. मी भल्याची संगत सोडून, हलकट तोंडपुजे लोकांना चाहूं लागलों. माझ्या घरांत अक्षयी अशा लोकांच्या बैठकी असत. त्यांच्या नादानें मला दारूची वगैरे वाईट व्यसनें लागलीं. मी दारू पितां पितां अट्टल दारूबाज बनलों. रात्रंदिवस त्यांतच गुंग होऊन पडूं लागलों. मला कोणाची पर्वा नाहींशी झाली. फक्त माझ्या सुदैवानें मी आपल्या गुरूचा मात्र आज्ञाभंग कधीं केला नाहीं, व ते सांगतील तें करण्याची प्रवृत्ति माझ्या मनानें सोडली नव्हती.

एकदां बाहेर गावीं आपल्या गुरूकडे गेलों होतों. माझी सध्यांची स्थिति कर्णोपकर्णीं त्यांच्याही कानावर गेली होती. मी नेहमींप्रमाणें दर्शन घेऊन कांहीं वेळ तेथें बसून जाण्यास निघालों तेव्हां त्यांनीं मला आशिर्वाद देऊन सांगितलें कीं, 'गणपतराव, पुढच्या खेपेला याल ते असे विधुर येऊं नका, द्वितीय संबंध करून उभयतां या.' मी 'होय' ह्मणून गुरुजींना वंदन करून निघालों. माझ्या गुरुजींचें नांव **आनंदलहरी यति**. ते फार विद्वान्, निस्पृह, कर्मठ, निश्चयी व निरिच्छ असे होते. मी परत मुंबईस आल्यावर गुरुजींची आज्ञा आपल्या स्नेह्यांना व कारभाऱ्याला कळविली. प्रथम त्यांना ती थट्टा वाटली. पण मी त्यांना खात्रीपूर्वक सांगून, त्यांच्या सांगण्याप्रमाणें वागण्याचा मी माझा निश्चयही त्यांना कळविला.

माझी लग्न करण्याची खरोखर इच्छा पाहून माझे स्नेही व कारभारी मुली पाहूं लागले.

मी असला अट्टल व्यसनी माणूस! पण संपत्ति अतोनात असल्यामुळें आठ दहा दिवसांच्या आंतच मला चांगली मोठी, सुस्वरूप, गरिबाची पण कुलीन मुलगी मिळाली. पैसा असल्यावर मुली मिळायला कांहीं अडचण पडत नाहीं, असें जें ह्मणतात तें माझ्या संबंधानें तरी खरें झालें! माझ्या सुदैवानें मला बायको चांगली मिळाली. तिची वागणूक भारदस्त होती, बोलणें गोड व खरें, स्वभाव शांत व सरळ असून, तो विचारी व आपला अधिकार संभाळून वागणारी अशी होती. ती माझे घरीं आल्यावर तिचा आनंदी स्वभाव, नम्रपणा इत्यादि एकंदर गुणांमुळें माझें तिजवर अत्यंत प्रेम जडलें. मी तिचा अगदीं दास बनलों. तिच्या आज्ञेबाहेर एक पाऊल सुद्धां टाकावयाचें नाहीं असा मी निश्चय केला. ती मोठी संसारदक्षही होती. हळू हळू तिच्या उपदेशानें माझें व्यसन सुटत चाललें, व थोड्या दिवसांत तें पार नाहींसें झालें. मी तिच्यासह मोठ्या आनंदानें संसार करूं लागलों. मी व्यसनमुक्त झाल्यावर माझी प्राप्ति आणखी वाढली. तिच्यामुळें माझी लोकांत चांगली कीर्ति झाली. परमेश्वर कृपेनें मला तिचेपासून हीं दोन अपत्यें झालीं. त्यामुळें माझें संसारसुख आणखी दुणावलें. याप्रमाणें मी आनंदसागरांत यथेच्छ डुंबत असतां तें दैवाला पाहवलें नाहीं. माझ्या प्रियेला क्षयानें पछाडलें. तिला मी अनेक वैद्य व डाक्टर यांजकडून औषधें देवविलीं, पण तिच्या दुखण्याचें पाऊल मागें ह्मणून हटलें नाहीं. ती मरणाला भीत नव्हती. तिनें मुलांचें कसें होईल ह्मणून कधीं काळजी केली नाहीं आपलें मन संसारांत गुंतविलें नाहीं. —पण तिला रात्रंदिवस माझी काळजी लागली होती. तिला वाटे आपण मेल्यावर मी पुन्हा त्या भयंकर व्यसनराक्षसाच्या दाढेंत सांपडेन. याच गोष्टीची ती काळजी करी. तिची अशी अवस्था असतां मला नाइलाजामुळें कामासंबंधानें इंदुरास जाणें भाग पडलें. मी गेल्यावर दोन तीन दिवसांनीं तिची प्रकृति जास्त बिघडून, माझ्या आनंदरूप उपवनांतील आवडती मधुमालतीची कळी दुष्ट काळानें चोरून नेली! माझ्या सुखातिशयरूप धनाच्या पेटीवर दरवडा पडला! माझ्या सुखाचा झरा आटला!—व मी दीन माशाप्रमाणें रखरखीत मैदानावर पडलों असें मला वाटलें. घरीं आल्यावर मला सर्व कळलें, मी अतिशय शोक केला. मला माझे आईबाप, आप्त, इष्टमित्र या सर्वांचा याच वेळीं अंत झाला असें वाटलें. मी पाहिजे तितका शोक केला, तरी मला या वेळीं समजुतीच्या गोष्टी सांगायला कोण येणार? हीं दोन मुलेंही मजप्रमाणें आतां दीन झालीं, असें मनांत येऊन मला दुःखाचें आणखी भरतें येई. असो. कांहीं वेळानें मी आपला शोक आवरला, आणि माझ्या प्रियेनें मला कांहीं निरोप कागदावर लिहून ठेवला आहे काय, ह्मणून शोधूं लागलों. तों कारभाऱ्यानें एक कागदांत गुंडाळलेली किल्ली आणून दिली. ती त्याला तिचे अंथरुणांत सांपडली होती. मी ती घेतली, ती आणखी एका कागदानें गुंडाळली होती. मी तो कागद उलगडला. त्यावर तिनें आपल्या हातानें हीं अक्षरें लिहून ठेविलीं होतीं:—'जें काय आहे तें शिसवी पेटींत आहे.' ती पेटी उघडून पाहिली तों हा **फोनोग्राफ** मला दिसला. किल्ली फिरविल्यावर तिनें आपले शब्द त्यांत ठेवलेले जसेच्या तसेच ऐकू

आले. तेच तुह्मी मघाशीं ऐकलेत-'व एकादशीच्या रात्रींही तेच ऐकलेत.' **बाबासाहेबांनीं** भिंतीला टांगलेल्या तसबिरीकडे बोट करून सांगितलें-'हे माझे गुरु,' व पेटीकडे बोट करून ह्मणाले-'हा त्यांचा उपदेश.' तसबिरीकडे मी पाहिलें. ती स्त्रीची असून ती मोठी सौम्य सुंदर स्त्री असावी अशी माझी खात्री झाली.

**बाबासाहेब** ह्मणाले:- मी नित्य दिवसांतून तीन वेळ माझ्या प्रियेचे गोड शब्द ऐकतों व सर्वदा तिचे प्रतिबिंबाच्या सानिध्यांत वेळ घालवितों. असो.

याप्रमाणें त्यांनीं आपली हकीकत सांगून, माझ्या शंकेचें व कुकल्पनांचें निरसन केलें. त्यांनीं माझ्या चांगल्या वर्तनाबद्दल मला ५०० रुपये बक्षीस दिले व राहिलेल्या दिवसांचा पगार देऊन, शिवाय मला कांहीं कायद्याचीं पुस्तकेंही पाहिजे होतीं तीं देऊन, त्यांनीं माझा निरोप घेतला. **सरदेसायांची** गढी सोडतांना तिला, मला व त्यांच्या मुलांना फार वाईट वाटलें. परंतु इलाज काय ?

मी त्याच वर्षीं वकिलीच्या परीक्षेंत पास झालों, व **बाबासाहेबांच्या** आशिर्वादानें सुखांत आहें. माझा धंदाही चांगला चालतो. असो. मी गढी सोडल्यावर कांहीं दिवसांनीं वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेलें वाचलें कीं, **बाबासाहेब सरदेसाई** घोड्यावर बसून फेरफटका करावयास गेले असतां घोडा उधळून ते खालीं पडले व त्यामुळें त्यांचा अंत झाला.



# ब्राह्मणाचा स्वधर्म.

[ मागील अंकावरून पुढें चालू. ]

## ५. जाणणें पूर्वीं होतें केव्हां ? लोपलें केव्हां व कां ?

वेदविद्येचा ऊहापोह करणाऱ्या शास्त्रास "मीमांसा" ह्मणतात.

"स्वर्ग, सर्वस्वदान, ब्राह्मण, सहस्रसंवत्सर" या ४ बाबींची व्यवस्था पूर्वींच्या ब्राह्मण ह्मणवणारांनीं कशी लावली आहे, तिकडे दृष्टि फेंकूं या.

"स्वर्गासाठीं यज्ञ करावा" अशी श्रुति पुन्हा पुन्हा येते. पण "स्वर्ग" ह्मणजे काय ? याचा खुलासा हवा. शबरस्वामींच्या भाष्यांतलाच उतारा या स्थळीं देण्यांत येत आहे.

मीमांसेच्या ६ व्या अध्यायाच्या पहिल्या पादांत आरंभींच यागादिक कर्मांपासून स्वर्गादिक फळ मिळतें कीं नाहीं, हा विचार चालला आहे. "स्वर्ग" ह्मणजे काय ? हा प्रसंग आला. शबरस्वामींनीं—

"ननु स्वर्गशब्दो लोके प्रसिद्धो विशिष्टे देशे; 'यस्मिन् नोष्णम्, न शीतम्, न क्षुद्, न तृषा, नाऽरतिः, न ग्लानिः; पुण्यकृत एव प्रेत्य तत्र गच्छन्ति, नान्ये.'" (पण लोकांत "स्वर्ग" शब्द एका विशिष्ट देशास लावतात; "ज्यांत गर्मी नाहीं, थंडी नाहीं, भूक नाहीं, तहान नाहीं, अस्वस्थपणा नाहीं, ग्लानि नाहीं; पुण्य करणारे मात्र मरून तेथें जातात, दुसरे जात नाहींत.")

असा पूर्वपक्ष करून,

"अत्रोच्यते—'यदि तत्राऽमृत्वा केचिद् गच्छन्ति, तत आगच्छन्त्यजनित्वा, तर्हि स

प्रत्यक्षो देश एवंजातीयकः; न त्वनुमानाद् गम्यते.' " ( याविषयीं ह्मणतो—"जर तेथें मेल्याशिवाय कोणी जात असले, तेथून पुनर्जन्म घ्यावा न लागतां परत येत असले, तर तो प्रत्यक्ष देश अशा प्रकारचा मानतां येईल; पण अनुमानानें ठरवतां येत नाहीं." )

असा मध्यें आक्षेप आणून, शेवटीं "स्वर्ग शब्दः प्रीतिरभिधाता" ( "स्वर्ग" शब्दाचा अर्थ "प्रीति" ह्मणजे "सुख" ) असा सिद्धांत ठरविला आहे.

विश्वजित् नांवाचा यज्ञ आहे, त्यांत सर्वस्वदानाचा विधि आहे. "सर्वस्व" ह्मणजे काय? राजा "भूमि" देऊं शकेल कीं नाहीं? मांडलीक राजा भूमि देऊं न शकला, तरी सार्वभौम राजा कां देऊं शकणार नाहीं? "सार्वभौम" शब्दाचाच अर्थ "सगळ्या भूमीचा मालक" ( सर्वस्या भूमेरीश्वरः ) असा होतो. अशी शंका घेऊन,

"नेति ब्रूमः. कुतः ? यावता भोगेन सार्वभौमो भूमेरीष्टे, तावताऽन्योऽपि; न तत्र कश्चिद् विशेषः. सार्वभौमत्वेऽस्य त्वेतदधिकम्—यदसौ पृथिव्यां संभूतानां व्रीह्यादीनां रक्षणेन निर्विष्टस्य कस्यचिद् भागस्येष्टे." ( सार्वभौमही भूमि देऊं शकत नाहीं, असें आह्मी ह्मणतों. कां ? जितक्या भोगामुळें सार्वभौम भूमीचा मालक असतो, तितक्यानें दुसराही; त्यांत कांहीं अंतर नाहीं. सार्वभौमपणामुळें यास इतकेंच अधिक कीं, हा पृथ्वीवर पिकलेल्या भात वगैऱ्यांच्या राखणेमुळें वेतनाप्रमाणें मिळालेल्या कांहीं अंशाचा मालक होतो." )

असें सुरेख समाधान ( "न भूमिः स्यात् सर्वान् प्रत्यविशिष्टत्वात्"—सू० ३, पाद ७, अध्याय ६ ) करण्यांत आलें आहे. जशी व जितकी तुमचीआमची जमिनीवर मालकी, तशी व तितकीच राजाधिराजाचीही—इतकेंच कीं, उत्पन्नाचा ६ वा अंश राजाधिराजास राखणरूपी नोकरी बजावल्यामुळें रयतेकडून स्वसंतोषानें देण्यांत येतो.

यज्ञाचें अनुष्ठान, वेदाचें अध्ययन, समन्त्रक विवाह—ही त्रयी "जायमानो ह वै ब्राह्मणस्त्रिभिऋणवां जायते" या श्रुतींतल्या "ब्राह्मण" शब्दावरून नुसत्या "ब्राह्मण" वर्णास लागू होऊं पहात आहे, क्षत्रियवैश्यास लागू होतेशी दिसत नाहीं. पण ६ व्या अध्यायाच्या दुसऱ्या पादाच्या एकतिसाव्या सूत्रांत "ब्राह्मणग्रहणं तु प्रदर्शनार्थम्—जायमानो ब्राह्मणो राजन्यो वैश्यो वा, तथा जायमानो जातश्चेति" असा थोर सिद्धांत शबरस्वामींनीं करून ठेवला आहे.

"विश्वसृजामयनं सहस्रसंवत्सरम्" ( विश्वसृजांचें सत्र सहस्र संवत्सरांचें ) अशी एक श्रुति आहे. "सहस्र संवत्सरांचें" ह्मणजे काय ? मनुष्याचें आयुष्य "शतायुर्वै पुरुषः" असें श्रुतिच ह्मणते; मानवी आयुष्य शंभर वर्षांचें. बरें, हें "सहस्र संवत्सरांचें" सत्र करणारे मनुष्य नव्हते, तर गन्धर्व वगैरे देवयोनीपैकीं होते, त्यांनीं केलें ह्मणावें, तर शास्त्र मनुष्यांसाठीं आहे, ( मनुष्याधिकारं शास्त्रं समधिगतम् ) गंधर्व वगैरे देवयोनींतल्यासाठीं नव्हे—असा दांडगा पूर्वपक्ष करून, "संवत्सर" शब्द "मास"-सही लावल्याचीं उदाहरणें शबरस्वामींनीं दिलीं आहेत आणि सरतेशेवटीं ( सू० ३१ पासून ४०, पाद ७, अध्या० ६ ) "आदित्यो वा सर्व ऋतवः, स यदैवोदेत्यथ वसन्तो, यदा संगवोऽथ ग्रीष्मो, यदा मध्यन्दिनोऽथ वर्षा, यदाऽपराण्होऽथ शरद्, यदास्तमेत्यथ हेमन्तशिशिरौ" या श्रुतीवरून "सहस्रसंवत्सर" शब्दांतल्या "संवत्सर" शब्दाचा अर्थ "दिवस" केला आहे.

हा पूर्वींच्या ब्राह्मण ह्मणवणारांचा सजाणपणा. असल्या सजाण ब्राह्मणांची पायधूळ जर क्षत्रियवैश्य डोकीवर ठेवीत, जर त्यांच्यापुढें एकदां सोडून शंभरदां लोटांगण घालण्यास शरमत नसत, तर नवल कोणतें ? ही पूर्वींच्या ब्राह्मण ह्मणवणारांच्या सजाणपणाची कमाल झाली नव्हे काय ?

आतां या ब्राह्मण ह्मणवणाऱ्या सजाणांपुढें आजचे ब्राह्मण ह्मणवणारे अजाण बसवूं या; ह्मणजे दोहोंमधलें ठळक अंतर लागलेंच दृष्टोत्पत्तीस येईल.

आजचा ब्राह्मण ह्मणवणारा स्वर्गांतल्या अमृताची, अप्सरांची, कामधेनूची, चिन्तामणीची, कल्पवृक्षाची गोष्ट करीत बसणार. आजचा ब्राह्मण ह्मणवणारा अग्रहाराच्या किंवा इनाम जमिनीच्या किंवा असल्याच दुसऱ्या लोभानें आजच्या राजांची मालकी हव्या त्या पदार्थावर शाबीत करणार आणि तो पदार्थ आपल्या घशाखालीं उतरवणार. "ब्राह्मण" शब्द ब्राह्मण वर्गांतल्या गोवर्धन, पळशे, कुडाळे, शेणवी असल्या दुसऱ्या जातींस लागू केला, तरीही आमच्या मधल्या सोंवळंमन्यांच्या पायांची आग मस्तकीं जाणार; मग क्षत्रियवैश्यांची गोष्ट तर दूरच राहिली. आजच्या ब्राह्मण ह्मणवणारांस वेदांतल्या गोष्टी ह्मटल्या कीं, त्या देवांच्या किंवा गंधर्वांच्या वाटतात, त्या काळीं माणूस हा प्राणी जसा काय जन्मलाच नव्हता; मग हजार सोडून दहा हजार वर्षांशीं प्रसंग पडला, तर काय ? यांच्या अकलेची दिवटी पाजळलेली असतेच. दोघेही वेदविद्येचे कैवारी; पण पूर्वींचा ब्राह्मण ह्मणवणारा जितका खरा कैवारी होता, तितकाच आजचा ब्राह्मण ह्मणवणारा सोंगाड्या कैवारी दिसतो. पुराणांतल्या गोष्टी इतिहासीक न समजतां, त्या गोष्टींच्या पायावर उभारलेल्या रघुवंशासारख्या काव्याचीही किंमत तितपतच करून, "शतायुर्वै पुरुषः" या श्रुतीची मातब्बरी न घडघडवणारा पूर्वींचा ब्राह्मण ह्मणवणारा वेदविद्येचा खरा कैवारी; पुराणांतल्या गोष्टी इतिहासीक समजून, त्याच्या पायावरच्या रघुवंशासारख्या काव्यांतल्या "किंचिदूनमनूनर्द्धेः शरदामयुतं ययौ "(श्रावणाचा शाप झाल्यानंतर राज्य करीत असतां दशरथाचीं जवळ जवळ दहा हजार वर्षे गेलीं) असल्या भाकड गोष्टी इतिहासांतल्या समजणारा आणि "शतायुर्वै: पुरुषः" ही श्रुति दूर झुगारून देणारा आजचा ब्राह्मण ह्मणवणारा वेदविद्येचा सोंगाड्या कैवारी. वेदविद्येचा खरा कैवारी राजास मात्र अश्वमेधाचा अधिकार देणार; पण आजचा सोंगाड्या कैवारी परशुराम ब्राह्मणाजवळूनही अश्वमेध करवितो आणि सगळी पृथ्वी परशुराम ब्राह्मणानें आपल्या पूर्वजांस दान दिलेली मानतो! रघूनें विश्वजित् यज्ञांत सर्वस्वाच्या दानांत भूमीचेंही दान केलें आणि त्यामुळें कौत्साची पूजा करतांना मातीचीं उपकरणें पुढें आलीं, ही सगळी कालिदासाची कविताशक्ति असतां, आणि "न देखे रवी, तें देखे कवी" ही ह्मणही जगजाहीर असतां, आजचा वेदविद्येचा सोंगाड्या कैवारी रघुवंश हा एक इतिहासीक ग्रंथ मानतो आणि स्वतः खाड्यांत पडून आपल्या जवळच्यासही पडूं लावतो. ही सगळी आजच्या ब्राह्मण ह्मणवणाराच्या अजाणपणाची कमाल झाली नाहीं काय ? अजाणपणाची याच्या पलीकडे आणखीं मजल शक्य आहे काय !

हें पूर्वींचें जाणणें इसवी १३४० पर्यंत बरेंच कायम होतेंसें मानावें लागतें. वेदभाष्य करणारा माधव-ऊर्फ सायण-ऊर्फ

विद्यारण्य—येथें सजाण ब्राह्मणांची पिढी संपली, वंश खुटला. मुसलमानांच्या वावटळीनें जे अनेक संप्रदाय निर्वंश केले, त्यांच्यामध्यें हा सजाणपणाचा संप्रदायही घालावा लागत आहे. शेवटच्या पुरुषामध्यें सजाणपणाची जोत किती जागती होती, तें पहाणें असल्यास त्याच्या ऋग्वेदाच्या भाष्याची आरंभींची प्रस्तावना पहावी ह्मणजे पहाणारा खास थक्क होऊन जाईल आणि "विद्यारण्य" नांव यथार्थ मानील.

पुढें तालिकोटच्या लढाईंत विजयनगर साफ बुडालें, तेव्हां दुर्दैवाची पराकाष्ठा झाली; जो निर्वंश झाला होता, तो तसाच कायम राहिला. हिंदूंचें राज्यच राहिलें नाहीं, तर मग जाणण्याची किंमत कोण करणार? "प्रसवे तीच अभिज्ञा शल्या तैशी न वांझ वेणेची." जाणण्याची किंमत करण्यास जाणणारे हवेत. सजाणपणा रत्नपारखीपणासारखा आहे. रत्नपारख्यासच रत्न पारखतां येतें, सजाणच सजाणपणास ओळखूं शकतो. इतके सम्प्रदाय बुडाले, तें नवल नव्हे; तर व्याकरण, अलंकार, न्याय, काव्यनाटकें हे चार संप्रदाय आज दिसत आहेत इतके राहिले हेंच नवल होय.

## ६. जाणण्याचा जीर्णोद्धार आज शक्य आहे कीं अशक्य?

ज्या मनूमध्यें जाणण्याचा लोप झाला तो काळोखाच मनू होता. मुख्य युगें वास्तवीक दोनच असतात—उजेडाचें आणि काळोखाचें. जसा ऐन मध्यान्ह असतो, तशी ऐन मध्यरात्र असते. हे दोन मुख्य काळ दोन मुख्य युगांचीं किंवा मनूंचीं लक्षणें होत.

आज इंग्रजी आहे. इंग्रजी झाली तेव्हां हिंदुस्थानांत उजेडाच्या युगाची पहांट झाली. ज्या ब्राह्मणास आज स्वधर्मानें उजू जाणें असेल, त्याच्या भाग्याचे चारही दरवाजे आज उघडले ह्मणावे लागत आहेत.

पूर्वी काळोखाच्या मनूंत व त्याच्या पूर्वीच्या उजेडाच्याही मनूंत पुस्तकांचें भांडार कोठें एखाद्या राजधानींत असलें तर असावयाचें; काव्य, नाटकें व अलंकाराचे ग्रंथ एकेठिकाणीं सांपडले, तर व्याकरणाचे ग्रंथ दूर दिगंतीं मिळावयाचे; बरें, ते एके दिगंतीं मिळाले, तर धर्मशास्त्राचे ग्रंथ दुसरे दिगंतीं, वेदाचे व वैदिक सारस्वताचे तिसरे दिगन्तीं—असे हालहवाल होते. समजा कीं इतके हे ब्राह्मणी धर्माचे ग्रंथ एकदां कसे तरी पहावयास सांपडले, तरी बौद्धांचे आणि जैनाचे कसे मिळणार? ते यथाकथंचित् हातीं आले, तरी मुसलमानी किंवा ख्रिस्ती धर्माचे हातीं कसे लागणार? भांडार ह्मटलें कीं लाखो रुपये आंत ओतावे लागत आणि पुष्कळ लिहिणारे बसवावे लागत.

पण आज हजारपंधराशें रुपयांत इतके संस्कृत ग्रंथ मिळूं शकतात कीं तितके पूर्वी लाख दीडलाख रुपये खर्चूनही मिळणें शक्य नव्हतें. आज इंग्रजीची कामधेनु ज्या ब्राह्मणांचे हातीं आली आहे, त्यांच्या तर भाग्यास पारावार नाहीं, असेंच ह्मटलें पाहिजे. कारण इंग्रजी आल्यानें विद्येच्या दहाही दिशा खुल्या झाल्या; त्यास कोणत्याही विषयांत किंवा शास्त्रांत किंवा धर्मांत मज्जाव राहिला नाहीं; प्रसंगीं गांठीं फारसा पैसा बांधलेला नसला, तरी मोठमोठ्या राजधान्यांमध्यें महिना सहाआठ आणे खर्चल्यास आपला सगळा ग्रंथसंग्रह वाचण्याजाणण्यासाठीं पुढें ठेवणारीं सार्वजनिक भांडारें आहेत. आणखीं दुसरें स्वधर्मानें चालूं पहाणाऱ्या ब्राह्मणास काय हवें? याप्रमाणें

आजचा मनू हा ज्ञानसामग्रीचा दांडगा मनू आहे. या प्रकारचा मनू पूर्वीं कधींही नव्हता.

चालू मनू जसा ज्ञानसामग्रीचा आहे, तसाच प्रवासाचा आहे. पूर्वींचा मनू कूपमंडूकपणाचा होता. ज्या त्या ब्राह्मणाची व ब्राह्मणेतराची स्थिति पूर्वीं कूपमंडूकाप्रमाणें होती. उंबरांतल्या किड्यास उंबरापलीकडे जग दिसत नसतें; तसें पूर्वींच्या काळोखांत ब्राह्मणांस आणि ब्राह्मणेतरांस आपल्या गांवाच्या किंवा पोटजातीच्या पलीकडे कांहीं दिसत नव्हतें. पण आज प्रवासाचा मनू पडल्यामुळें दूरदूरचेही देश फारसा खर्च न लागतां पहावयास सांपडत आहेत, व एकमेकांचे आचारविचार एकमेकांच्या आचारविचारांशीं ताडून पहाण्याचे ते ते प्रसंग अनायासें येत आहेत.

याप्रमाणें वाढलेली ज्ञानसामग्री सुलभ करण्याचें व नवीही ज्यास्त वाढवण्याचें श्रेय जसें छापण्याच्या तसें प्रवास सोपा व सोईचा केल्याचें श्रेय वाफेच्या कलेस द्यावें लागत आहे. आज इंग्रजी आहे, ह्मणून या दोन्ही कला आमच्यामध्यें बऱ्याच फैलावल्या आहेत, आणि या अशा फैलावलेल्या असल्यामुळें सर्वतोपरी ह्मणणेंजाणणें ब्राह्मण ह्मणवणारास आज सर्वतोपरी सवघड झालें आहे. ह्मणून स्वधर्मानें चालूं पहाणाऱ्या ब्राह्मणाच्या तोंडून इंग्रजीच्या उलट अक्षरही येण्याचा संभव बिलकुल नाहीं. सारांश, आज जाणण्याचा जीर्णोद्धार इंग्रजी असल्यामुळें जसा शक्य झाला आहे, तसा शक्य पूर्वीं कधींही झाला नव्हता. आज ही इंग्रजी आहे, ह्मणून जीर्णोद्धार असा शक्य झाला आहे; जर इंग्रजीच्या ठिकाणीं फिरंग्यांची सत्ता, किंवा मोंगलाई, किंवा आमची ब्रह्मबादशाही असती, तर जीर्णोद्धाराची कल्पना स्वप्नींही आली नसती.

जीर्णोद्धार ह्मटला कीं थोडें तरी नवें आंत घुसलेंच; तें तसें घुसलेंही पाहिजे. श्रुतीप्रमाणें "वेदोऽध्येयो ज्ञेयश्च" हाच काय तो ब्राह्मणाचा स्वधर्म, दुसरा स्वधर्म ब्राह्मणास नाहीं. ज्यास ब्राह्मण ह्मणावयाचें, त्यानें या आपल्या स्वधर्मानें चाललें पाहिजे. ज्यांस स्वधर्मानें चालणें नाहीं, त्यांनीं ब्राह्मण ह्मणवून घेऊं नये.

### ७. स्वधर्मानें चालणाऱ्या ब्राह्मणावरची जबाबदारी.

ब्राह्मण स्वधर्मानें चालूं लागला, ह्मणजे त्याच्या डोकीवर जबाबदारीचा बोजा दांडगा असतो. विद्या क्षत्रियवैश्यांकडे न जातां आपणांकडे आली, हें जसजसें जास्त लक्षांत येतें, तसतसा जबाबदारीचा बोजा जास्त दृष्टीस पडूं लागतो. क्षत्रियवैश्य पायधूळ डोकीवर ठेवण्यास तयार असल्यामुळें, गुरुत्व ब्राह्मणाकडे येतें, आणि तें गुरुत्व त्यास त्याच्या आंतल्या डोळ्यांत नेहमीं तेल घालूं लावतें. आजचे शास्त्री आणि भट आपली तूपपोळी चालण्यापुरतेंच गुरुत्वाकडे लक्ष देतात; जर तूपपोळी चालत नाहीं, तर ते गुरुत्वावर लाथ मारणार. पण गुरुत्व ह्मटलें कीं तूपपोळीकडे गौणता आली, कित्त्याकडे मुख्यपणा आला. तूपपोळी मिळो, वा कोरडी भाकर मिळो, वा तीही न मिळो, कित्ता घालणारानें कित्ता घालण्याचें आपलें पहिलें कर्तव्य पहिल्यानें बजावलें पाहिजे; कांटा अगदीं समतोल—केंसभर इकडे न कले, केंसभर तिकडे न कले, इतका सुरेख—धरला पाहिजे.

एकदां गुरुत्वाकडे दृष्टि गेली, ह्मणजे अन्तर्यामी देवतेशीं गांठ पडली. ही गांठ एकदां पडली कीं, दुसरा प्रभु ब्राह्मणास राहिला नाहीं, बहुमताचीही चाड साफ लोपली. प्रभूस किंवा

बहुमतास गोड लागो वा कडू लागो, जें जसें असेल किंवा दिसेल, तें तसेंच ब्राह्मणाकडून निरूपण व्हावयाचें, त्यांत केंसभर किंवा सुईच्या अग्राही इतकें अंतर पडणें नाहीं.

**८. ब्राह्मणास भक्ष्याभक्ष्य आणि पेयापेय आहे कीं नाहीं ?**

असा सवाल कित्येकांकडून येण्याचा सम्भव आहे. तर त्याचा जबाब तयार करून दिला पाहिजे.

"ब्रह्म ह्मणतो किंवा जाणतो "तो **ब्राह्मण**–मग "ब्रह्म" कर्मकाण्डांतलें "कर्म" असो, वेदान्तांतलें "तज्जलानिति" असो,वा "उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः" असें भगवद्गीतेंत वर्णन केलेलें असो.

"सत्यं सूर्यसमं ज्योतिः" हें कर्मठांचें ह्मणणें, "सत्यमेव जयते" हें वेदान्त्याचें, "ॐ तत् सत्" हें भागवतांचें. याविषयीं मतभेद होणें नाहीं.

भागवत धर्मांत "शमो दमस्" या वचनामध्यें भक्ष्याभक्ष्याचा किंवा पेयापेयाचा उल्लेख केलेला नाहीं, त्या पक्षीं भागवत धर्मांतल्या ब्राह्मणाच्या खाण्यापिण्यावर भगवंताचा कटाक्ष खास नव्हता. वेदान्ती ब्राह्मण ह्मटला कीं, तो "परमहंस" झाला. परमहंसी वृत्तीस भक्ष्याभक्ष्याचा व पेयापेयाचा विभाग माहीत नसतो.

कर्मठ ब्राह्मण जर नुसता कर्मठ असला, तर मात्र भक्ष्याभक्ष्याचें व पेयापेयाचें शास्त्र त्यास लागू झाल्याशिवाय रहाणें नाहीं. तरी मांस तितकें अभक्ष्य, फळभाजी तितकी भक्ष्य–असें त्याचें शास्त्र खास असूं शकत नाहीं. बकऱ्याचें मांस विहित असल्यामुळें ब्राह्मण खाईल, पण उण्टाचें मांस निषिद्ध असल्यामुळें खाणार नाहीं. हिंग जरी या ब्राह्मणानें निषिद्ध मानला नाहीं, तरी कांदा लसूण खाण्याकडे त्याची प्रवृत्ति होणें नाहीं; कारण हिंग विहित असून, कांदालसूण निषिद्धांपैकीं आहे. याचप्रमाणें कर्मठ ब्राह्मणाच्या पेयापेयाचीही व्यवस्था लागावयाची.

याप्रमाणें ब्राह्मणाचे ३ प्रकार शास्त्रप्रमाणें दिलें आहेत.

"गौड" आणि "द्रविड" या भेदांस शास्त्राचा आधार जर दिसत नाहीं, तर "महाराष्ट्र, त्रिलिंग" वगैरे द्रविडांच्या पोटभेदांस तो सुतराम् आणि "चित्पावन, कऱ्हाडे, देवरुखे" वगैरे पोटभेदांस सुतमाम् नाहीं. या सगळ्या "जाती" होत. शास्त्रांत "वर्ण" येतात, पण "जाती" येत नाहींत. वर्णभेद शास्त्रास मान्य आहे, जातिभेद शास्त्रास मान्य नाहीं.

**"मान्यान् प्रणम्य विहिताञ्जलिरेष भूयो**
**भूयो निवेद्य विनयं विनिवेदयामि–**
**दूष्यं वचो मम, परं निपुणं विभाव्य;**
**भावावबोध विहितो न दुनोति दोषः"**

**राजाराम रामकृष्ण भागवत.**



## तान्हाजी मालसुरे
### अथवा
## सिंहगडची मोहिम.

### प्रकरण चौथें.

**विषयः**—उदेभान व तान्हाजी यांचें द्वंद्व; दोघेही परस्परांचे हातें पतन पावतात; तान्हाजीचें सैन्य पळूं लागतें; त्यांची व सूर्याजी याची गांठ पडते; त्याचें त्यांना भाषण व उपदेश; ते सर्व परततात; जय.

**काळ**:—मध्यरात्र.

( लढाईचें वर्णन. )

उदेभानजी ऐकुनी खेदवार्ता
चमू आशिली जेंवि ऐणी दवोर्ता,
निघे शूर तो संगरासी उदार—
गडीं ज्यावरी सर्व होतो मदार. १

निघाले सवें रांगडे जातभाई
खेंडी घालुनी एकमेकां दुराई,—
"मरूं एक वा शत्रुला ठार मारूं!
"रणीं कोणिही पाय मागें न सारूं!" २

निघाले सवें अन्यही जे शिबंदी—
जयांचे शिरीं येत युद्धार्थ धुंदी;
बडा दांडगा ओघ शूरा नरांचा
अहो चालिला; वर्णनीं स्तब्ध वाचा. ३

झडों लागले ढोल ताशेहि मर्फे—
रणश्री जयांच्या सवें फार दर्पे;
करूं लागले शिंग—कर्णे झणाणा,
तशीं वाजलीं अन्य वाद्येंहि नाना. ४

१ हरिणी. २ वणव्यांत सांपडलेली. ३ मोठी-दांडगी. ४ शपथ.

पुढें लोटल्या शेंकडोंशें मशाली;
गडी लोटती मागुनी धैर्यशाली;
दिशा कोंदल्या घोर वीर—स्वनांहीं,
घनाचा जयांच्या पुढें गर्व नाहीं. ५

सवें गर्जती मावळे राजयाचे—
स्फुरे अंगिं वीर जयांच्या जयाचें;
उठे एक—"जै, जै, जयश्री भवानी!"
निराळीं रिता ठाव ना या रवांनीं. ६

भयें काग कोठ्यांतुनी भेदरून
उडों लागले दाट 'का का' करून;
दिवाभीतही बावरे वायसांत,
दडाले किती नेणुनी वैरि आप्त. ७

तयांचेकडे दृष्टि देतां वरी तो
उदेभानजी पागडी सांवरीतो;
परी त्यापुढें ती उताणी पडेच;
धरूं जाय तों त्यासही पाडि ठेंच. ८

गुरें, मेंढरें, भल्लुका ओरडाया—
भयें लागती बालकेंही रडाया;
कैपारीं तसा नाद देवालयांत
उठे थोर कल्होळ पैं किल्लियांत. ९

निमेषांत तों भीड झाली दळांची—
महाशीघ्र मृत्यूचिया वादळाची!
लढाई भली जुंपली सामन्याची,
ढिलाई कुठें राहिली नाच साची. १०

शिवाची चमू पातली हातघाई—
जणों मागते वैर—रूपी तैंगाई!
भरारां दिसों लागले उंच खांडे;—
शिरांचीं उडों लागलीं तोंच खांडें! ११

१ कावळे, गुरें रात्रीं ओरडणें हें दुश्चिन्ह मानितात. तसेंच प्रयाणकालीं घुबड दृष्टीस पडणें हेंही दुश्चिन्हच. २ डोंगराच्या कडेकपारांत. ३ उसनें (वाण).

बडा मार तैं मारिती मावळींये;–
अहो, व्याघ्र ते पातले गोवळीं ये[१] !
हटूं पाहती मागचे शत्रु मागें,
ठरेना जरा ना पुढें पाय लागे. १२

उडाली असे जों रणाची धुमाळी,
तमोराशिही[३] फोडुनी अंशुमाळी[४]
उभा ठाकला घोर संग्राम पाह्या;–
शिरांच्या उडों लागल्या जेथ लाह्या. १३

दिसे चांदण्यामाजी टोळी मराठी
यशस्वी जरी अल्प ते, ऊफराठी[५].
उदेभानही खोंचला अंतरांत,
सरे तैं स्वकीयांसवें संगरांत. १४

बिनीची अघाडी मराठ्या गड्यांहीं
पुरी फोडिली देखुनी रांगडयांहीं[६],
जवें धांवुनी घातला त्यां गराडा;
बडा मांडिला मावळ्यांचा चुराडा. १५

सभोंतीं महा मोंगली सैन्यसिंधु,
मधें बेट हें धाकुटें सैन्य हिंदु !
भरे जोर जों जों तयालागिं फार,
बुडे हें असें जागच्या जागिं पार ! १६

जरी घेरिली ये रिती येरि[७] सेना,
यशाची परी स्वल्प वार्ता दिसेना;
मिळे रीघ ना जींत कोठें लिखांना[८],
रिपूच्या तिथें ठाव हो सैनिकांना ? १७

पडे एक घायाळ जों, तोच ठाव
दुजा मागला घे करोनी उठाव;
पडे हाहि; तों मागुती तीसराही
पुढें वीर काढोनि छातीस राही. १८

शिवाच्या चमूच्या धृतीच्या[१] नगांना
असो धन्यता ! योग्य ते शान गाना.–
पळेना, वळेना, ढळे नैक[२] रेणू[३]–
तृणें ताडिली मत्त जैशी करेणू[४]. १९

कुणाचा तुटे हस्त जों सव्य, तोंची
दुज्यानें धरी शस्त्र पैं शत्रु ठेंची.
पुढें वामही हस्त गेला लयाला,
तरीही तयांची नसे क्षीतै[५] याला. २०

पदांहीं, रदांहीं, शिरीं, ढोंपरांनीं,
प्रहारा करी; खाइना हार मानी.
रणीं झुंजलीं शुद्ध त्यांची कबंधें–
सुरांहीं अहा वर्णिलीं सत्प्रबंधें[६]. २१

---

शिकारी जिच्या पाठिशीं श्वान रानीं;
जिच्या सव्य भागास वैश्वानरांनीं
पुरें ग्रासिलें; वामपार्श्वांत[७] जाळीं;
पुढें व्याध ते विंधिती बाणजाळीं[८]; २२

जिचे भोंवतीं होत घायाळ पंडे,
जिला ताडिलें दुष्ट शब्दें उदंडें;
नवी बांड जी दांड भारी झपाटी
अति क्रोधुनी सृक्कणि–प्रांत चाटी; २३

गडाडे, मिशा पिंजरी, दांत खाई;
जणों पेटली मृत्युची उग्र खाई !
जशी डाहणी वाघिणी पाहडींची
तुटोनी पडे शत्रु–संघीं सडीची[९]: २४

तसा वीर राणा–रणामाजि दाणा–
दळाची दशा दीन देखोनि तान्हा–
उडाला पुढें उंच सैन्यामधोन–
"चलारे हटा सर्व मागें" वदोन. २५

---

१ गोवळ=गुरांचा गोठा. २ ये=या. ३ अंधःकार. ४ चंद्र. ५ उलटी तीच यशस्वी दिसली. ६ उदेभानाच्या रजपुतांनीं. ७ ती. ८ लिखा इत्यादिकांना.

१ धैर्याच्या पर्वतांना २ न एक. ३ रजभर सुद्धा. ४ हत्तीण. ५ क्षिती, पर्वा. ६ उत्तम गीतांनीं. ७ डाव्या बाजूला. ८ बाणांचा पूर–जाळें. ९ एकटीच.

झणीं द्वेष्टियांच्या पुढें पावला हो
लढायास–कीं आपणा वाव लाहो;
करूं लागला शत्रु–संभावना कीं
अहंभाव त्यांच्या सवें जाय नाकीं. २६

फिरे वीजसा, वज्रसा घाव मारी,
दपे सर्पसा, ऊसळे जेंवि मारी,
सवें प्रेतसा सुप्त, तों धूमकेतु–
परी उंच आकाशि तो शौर्यसेतु ! २७

गतीनें अशा शत्रु तो वीर गाढा
पिळी इक्षु–कांडांसि जैसा रगाडा;
मिळेना दिसेना कुणाला कळेना;
बळें वेंचिलीं व्यर्थ, तो आंकळेना. २८

---

अहा:कार झाला दळीं मोंगलांच्या,
गडी लागले सोइला ते पळाच्या;
पळूं लागले ना स्वयेंची, परांना
"पळारे, पळा" सांगती "चीपें राना"! २९

पडे एक जातां, कुणी अन्य पाडी,
दडे एक मार्गी, दुजा वस्त्र फाडी;
रडे कोणि, कोणी स्मरे तैं ह्मसोबा,
बडे खांहि ते बोलती "हाय! तोबा !" ३०

नभीं गर्जतां मेघ, शार्दूल गर्जे;
जळे हेम अग्नींत तों तों विराजे;
पराभूतिवार्ता तशी वीर–हीरां
अती चेतवी सत्वधीरां गभीरां. ३१

बिळांतुनि ये ताडिला जेंवि नाग,
निघे कीं ज्वलत्पर्वतांतूनि आग,
दळांतूनि तैसा उदेभान साचा
निघाला त्वरें, बोलिला दीर्घ वाचाः– ३२

"अरे कोण तूं शूर मोठा विचारी ?
दळें मारिसी कासया हीं बिचारीं?
लढूं ये स्वयें, हा निवाडा करूं या !
तुला कीं मला येश ये वीरराया ! ३३

"तुझ्या आणि माझ्या दळांहीं रहावें
दुरी, तेथुनी द्वंद्वयुद्धा पहावें !
घडे त्यांत निष्पन्न जें तत्व शेखीं
न मानी तया कोण सुज्ञांत लेखी ?" ३४

---

अशी ऐकुनी तान्हया वीरवाणी
उभा ठाकला तत्क्षणीं खड्गपाणी;
तया मान दे युद्ध–पाचारणातें–
करी व्याघ्रही मानें ज्या कारणातें. ३५

सवें द्वंद्व–युद्धा करूं अप्रतीम
गडी सिद्ध, जैसे जरासंध–भीम;
उदेभान तो दक्ष, हा वीरभद्र–
तया ह्यो मखीं हा करूं ये अभद्र. ३६

लखाके न ह्याच्या करीं धोपें जंगी
तरी ती शिवाच्या गणाची भुजंगी;
न ते गेंडियाची पुढें ढाल काळी
तयाची सु–कृष्णाजिनाचीच खोळी. ३७

तसा सिद्ध म्लेच्छेंश्वराचा दलेश–
महावीर दोघे, नसे भेद लेश;
करूं एकमेकां प्रणामासि गेले.
भले शिष्टमार्गा सदाही भुकेले. ३८

असीतें असी लावुनी रामरामी
करीती भली लोकरीती सलामी;

---

१ लाभो, मिळो. २ स्वर्गांत. ३ महामारी; पटकी. ४ आवरेना. ५ मुकाटचानें, गपचूप. ६ खान=मिया. ७ पराजय. ८ वीरांतील हीर=हिरे.

१ असें ह्मणतात कीं वाघाला "ये" ह्मणून हांक मारिली असतां तो थेट आंगावर चालून येईल, इकडे तिकडे जावयाचा नाहीं. हें पक्कें मानीपणाचें लक्षण आहे. २ ह्या ( रण ) मखीं=यज्ञांत. ३ मोठी तरवार, जिच्या दोहीं बाजूस धार असते. ४ तरवारीला तरवार. ५ पहिला सलामीचा हात.

दुजाही उडे सामन्याचा पवित्रा-
शिताफी जणों दाविती मित्रमित्रां. ३९

तिजा चोथ्या[1] जाहले पांच हात,
मुखें गौरवें एकमेंका चहात
चढाओढ चाले; परंतु क्रमानें
पराच्या खिजों लागले विक्रमानें[2]. ४०

जसे मत्त भृंग प्रफुल्ल प्रभातीं
सुमें[3]-श्री हरूं गुंगुनी झुंजताती,
तसे [4]चण्ड-दोर्दण्ड योद्धे प्रचण्ड
जय-श्री हरूं झुंजती ते उदण्ड. ४१

भिडोनी गडी खेटुनी एकमेकां
रिपूतें करूं पाहती घाय देखा;
खरी वापरूं लागले शस्त्रधार,
जराही कुणी ठेविती ना उधार. ४२

उडे एक जों घाय मारूं परातें,
दुजाही उडे टाळुनी तत्करातें;
झटे हा सर्व ऊसनें वाण द्याया,
करी पूर्विंचा वीर तो यत्न वायां. ४३

जवें खालते मागुती दोन्हि येती,
पुन्हा ते जवें उंच उड्डाण घेती;
उडया ऊलटया सूलटया उंच नीच
करोनी गडी पाहती रीघ टीच. ४४

बळें खड्ग खड्गावरी, ढाल ढाली-
वरी घालिती; एक गर्दी उडाली;
खणाणा निघे शब्द खांडयामधून,
कणांची उठे अग्निच्या हार पूर्ण. ४५

चकाके सभोंतीं असींची चकाकी;-
गमे ते नभीं तक्षकाचीच काकी!
स्वयें ती कुणा त्यांतुनी वीरराया
असे पातली नाग-कन्या वराया! ४६

---

असा चालिला द्वंद्व-संग्राम-रंग;
चलेना कुणा येश ये हा तरंग;
अहो दोनही पारडीं सारखीं तीं,
तिथें कायते पारखी पारखीती? ४७

दळें दोन्हि चित्रापरी तीं तटस्थ;
उभीं पाहती-वानिती त्यां समस्त;
गडींच्या उभ्या गोपुरीं रम्य बाला
झरोक्यांतुनी पाहती द्वंद्व-लीला. ४८

प्रसंगीं अशा ढाल ती तान्ह्याची
गळोनी पडे भूमिला छिन्न साची!
मराठ्यांकडे हांक तैं होय " हा हा!
"अहा संकटीं शूर आला महा हा!" ४९

कुणी धांवती देउं त्या अन्य चर्म[1],
पुढें हो कुणी तैं करूं द्वंद्व-कर्म;
भयें एक खालीं बसे, एक मागें
पळे, त्या निवारी दुजा रागरागें. ५०

शहाच्या दळीं हो जयाचा सु-घोष;
किती नाचले, पावले सर्व तोष.
वदों लागले "स्वस्थ व्हा मौज पाहों-
"भलारे भला पुंड हा लाभला हो!" ५१

---

परी[2] जाहली यापरी दों दळांत;
डगेना परी वीर तो धीर शांत;
पराभूति[3] ज्या मृत्युऐसी गमे, तो
पुढें मृत्युही पातल्या काय भीतो? ५२

गडी घाव घे सर्वही वाम हस्तीं-
जसा वारि शुंडाबळें भिन्न हस्ती;
कराची करी डाविया ढाल नामी;
पडे धैर्य शस्त्राहुनी फार कामीं. ५३

---

१ चौथा. २ शौर्यानें. ३ कुसुम=पुष्प. ४ ज्यांचे बाहु मोठे बलाढ्य आहेत असे.

१ ढाल. २ स्थिति; प्रकार. ३ पराभव.

चढे मात्र भारी मनीं त्यासि तेख,
दिसे दीर्घ चापल्य तेणें सुरेख;
पुरें बाणलें अंतरीं वीरहीरा[1]—
असे वेळ निर्वाणिची दुर्निवारा. ५४

न लाभेल आतां यशस्वी लढाई—
गळाली जरी ढालरूपें बढाई;
कुठें हस्त तो क्षुद्र चर्मास्थि खंड?—
कुठें खड्ग तीक्ष्णोग्र तो लोह–दंड? ५५

उदेभानही साधुनी पूर्ण लक्ष
प्रयत्नें प्रहारा करी तेथ दक्ष;
प्रहारें प्रहारें तुटे बाहु सारा,
अशुद्धाचिया वाहती घोर धारा. ५६

न्हाली धरा शोणितें शुद्ध ते गा!
न्हालाहि तो शत्रुचा लाल तेगा[3]!
न्हाली तनू तान्हयाचीही साची;
न हाले तरी वीर तो सव्यसाची! ५७

शरीरांतुनी वाहतो रक्त–पूर,
पुढें झुंजतो शत्रु शूरांत शूर;
अशक्तीमुळें मूर्च्छना येउं पाहे,
तसा काजवा दृष्टिला रोधिताहे. ५८

यशावीण आशा नुरे त्या कशाची;
तशी भीतिही मात्र ती दुर्यशाची.
समाकर्षुनी सर्व जी शक्ति अंगीं,
पुरें नेमकें लावुनी लक्ष जंगी, ५९

स्वधर्माभिमानी—स्वराज्याभिमानी—
मुखें गर्जुनी 'जैजयश्रीभवानी!'
करी तो असा हात कीं खांडियाचा
शिराला कळे जोर तो स्पर्धियाच्या. ६०

वदोनि "गड्या ऊसने वाण घे घे!"
असो मारुनी एकमेकांसि दोघे
महात्मे सर्वे येति ते भूतळाला—
अहंभाव आतां जयांचा गळाला. ६१

वपु त्यागुनी नश्वरी भौतिकी या
नव्या शाश्वती कीर्तिरूप स्वकीया
धरोनी नभीं चालिले ते विमानीं;
गळीं वेष्टिले चुंबिले अप्सरांनीं! ६२

असे पावतां दोन अस्तासि तारे,
जहाले भयाक्रांत शोकार्त सारे;
रणामाजि झाला महा तैं अकांत,
तसा लोटला गोपुरीं बायकांत.— ६३

धिराचे पुरे, साहसी, धीट मोठे,
दिली शत्रुला पाठ ज्यांहीं न कोठें,
पळाले असे मावळे कैक रानीं—
जरि वारिले कोणि मोळ्या धिरांनीं. ६४

चमू स्वल्प आधीं गडीं राजयाची;
रणीं क्षीण हो त्यांतुनी फार साची;
विदेशी-निरुत्साह–तैशी अनाथ—
न सेवील ती आसरा काननांत? ६५

जसा बूडत्या ठाव लाधे उरांचा,
तृषार्तासि कीं व्होळ भेटे पुराचा,
क्षुधार्तासि खाजें भलें सांपडावें,
सुधेनें स्वयें रुग्णवक्त्रीं पडावें,— ६६

अकस्मात् तसा बंधु तान्हाजिचा तो
पुढें ठाकला; दुर्दशा ही पहातो.
वदे—"कोणरे?—कायरे?—भागतां कां?
"गडीं लागली का नृपाची पताका?" ६७

१ वीररत्न—वीरश्रेष्ठ. २ तीक्ष्ण+उग्र=भयंकर. ३ खांडा; मोठी तरवार. ४ डोळ्यांपुढें काजवे येऊं लागले.

१ "एकएकाच्या हातें पडले" असें वर्णन मराठ्यांच्या बखरींत आहे. २ पंचभूतात्मक नाश पावणाऱ्या. ३ (शिवाजी) राजाची. ४ छातीभर पाण्याचा ठाव सांपडावा. ५ सुग्रास अन्न. ६ अमृतानें. ७ रोग्याच्या तोंडांत. ८ पळतां कां?

Printed at the "Ganpat Krishnaji" Press, Bombay, 20-6-99

णानें कसें तरी हें उत्तर दिलेंसें दिसतें. आपल्याला असा उद्वेग होण्याचें काय बरें कारण असावें ?'—त्यावर तशाच तऱ्हेनें व स्वरानें कामंदकी ह्मणाली, 'हीच या भगव्या वस्त्रांना न शोभणारी खटपट व कटकट! अग, तुला माहित नाहीं का, हें मदनाचें त्रिभुवनविजयी अस्त्र स्वाभाविकच शोभेनें भरलेलें व पाहतांच मोहून टाकणारें(मालतीचें)शरीर अनुचित वराच्या हातीं पडून त्याचे सर्व गुण व्यर्थ जाणार आहेत ह्मणून—दुसरें काय ?' हें ऐकतांच मालती कावरीबावरी झाली. लवंगिका ह्मणाली 'होय, राजाची मर्जी प्रसन्न राखण्यासाठीं अमात्यानें नंदनाला मालती देण्याचें कबूल केलें—ह्मणून सर्व लोक अमात्याला नांवें ठेवताहेत. ही गोष्ट अद्यापि मालतीच्या कानीं गेलेली नव्हती. ती प्रथमच ऐकतांच मालतीला कसेंसेंच वाटलें व— 'काय मला पित्यानें राजाला जणों नजर केली आँ?' असें तिच्या मनांत आलें. तिच्या मनाची स्थिति तिच्या चर्येवरून कामंदकीनें ताडली व ती पुनः ह्मणाली, 'मोठेंच आश्चर्य आहे! गुणावगुणांचा कांहींच विचार न करितां ही गोष्ट कशी घडली कोण जाणे. अथवा, कुटिल राजकारणी नीतींत निपुण अशा लोकांच्या मनांत अपत्यस्नेह कोठून असणार ! मला वाटतें, राजाचा नर्म सचिव नंदन—कन्यादानानें कां होइना—मित्र होवो अशा विचारानेंच अमात्यानें ही गोष्ट केली असावी.'

हें ऐकून मालती मनांत ह्मणते—'राजाची मर्जी बाबाला अधिक वाटली—मालती कांहींच नाहीं आँ!' त्यावर नंदनाविषयीं मालतीच्या मनांत तिरस्कार उत्पन्न करण्याकरितां लवंगिका ह्मणाली, 'हो तर काय, आपण ह्मणतां तसेंच खरें—नाहींतर तसल्या त्या वृद्ध व कुरूप वराविषयीं अमात्य कांहींच का विचार न करिता ?'

हें ऐकून तर मालतीची अगदींच निराशा झाली व ती आपल्याशीं ह्मणाली, 'झालें तर मग. हा मजवर अनर्थाचा वज्रपातच झाला ह्मणावयाचा—यांतून मी कशाची वांचतें!'

तिच्या मनांत कांहीं थोडी आशा उत्पन्न होण्याकरितां लवंगिका ह्मणाली, 'भगवति कामंदकी, आपण तरी कांहीं कृपा करा, व कसेंही करून या माझ्या प्रियसखीला या जिवंत नरकांतून वांचवा. आपलीही ही कन्याच नाहीं का?'

त्यावर अगदीं वेड पांघरल्यासारखें करून कामंदकी ह्मणते—'अग लवंगिके, तूं भाबडीच आहेस! मी भगवती तरी याच्यांत काय करणार!—माझ्या हातून काय होणार? मुलीवर मुख्यत्वें मालकी पिता किंवा दैव यांचीच. विश्वामित्राची कन्या शकुंतला इनें दुष्यंताला वरिलें, तसेंच उर्वशी अप्सरेनें पुरूरव्याला वरिलें, असें आख्यानकारांनीं वर्णन केलें आहे; किंवा वासवदत्तेला तिच्या पित्यानें संजय राजाला दिली असतांना तिनें स्वतः उदयनाशीं स्वयंवर केला, अशा गोष्टी प्रसिद्ध आहेत. तरी असें करणें साहसासारखेंच होय. ह्मणून तसें करण्याविषयीं उपदेश करणें योग्य नव्हे. याकरितां—'राजाची मर्जी राखण्याकरितां त्याच्या प्रिय सचिवाला आपली कन्या देऊन अमात्य एकदांचा सुखी होवो—विमल चंद्रबिंब राहुमुखांत पडावें तद्वत् इचाही त्या कुरूप वराशीं संयोग होवो—दुसरें काय ?'

हा सर्व प्रकार ज्या उद्देशानें केला होता तो उद्देश सफल झाला. मालती अगदींच खिन्न व दीन होऊन मुळुमुळु रडूं लागली, व आप-

त्याशींच ह्मणाली–'बाबा तुह्मी देखील माझ्याविषयीं असे झालां औँ ? झालें–या भोगतृष्णेला नमस्कार असो, तिची हद्द झाली.'

यावर अवलोकितेनें कामंदकीला ह्मटलें, 'चला, बराच उशीर झाला. माधवाची प्रकृति बरीच अस्वस्थ झाली आहे.' हें ऐकून कामंदकी ह्मणाली, 'हो खरेंच, तिकडे जावयाचें आहे. चला–मुली येतें बरें.'

माधवाचें नांव सहज निघालें त्यावर कामंदकीच्या तोंडानें तो महाकुलीन घराण्यांतला आहे हें व त्याच्या गुणांचें वर्णन मालतीच्या कर्णी पाडावें, ह्मणजे तितका अधिक अनुराग उत्पन्न होईल आणि तोच योग्य पति असें तिला वाटेल, असें जाणून लवंगिकेनें प्रथम बळेंच, हळूच मालतीचा रुकार घेऊन, कामंदकीला ह्मटलें, 'भगवति, हो बरेंच झालें, मी आपल्याला कधींची विचारणार होतें–आपल्या मनांत इतका भारी स्नेहाचा ओढा आहे असा हा माधव आहे तरी कोण ?' कामंदकीनें त्यांची उत्कंठा वाढविण्याकरितां ह्मटलें, 'जाऊं दे ग, ही एक मोठी लांबलचक कहाणीच आहे, हल्लीं तिचें कांहीं प्रयोजन नाहीं.' 'तरी पण सांगाच, कृपा करा.' अशी लवंगिकेनें गळ घातल्यावर कामंदकी ह्मणाली, 'ऐका तर, विदर्भ देशाच्या राजाचा राजकार्यधुरंधर देवरात नांवाचा मुख्य मंत्री आहे. तो कसा, कोणाचा कोण, हें त्याचा सहाध्यायी तुझा–मालतीचा–पिताच जाणतो. त्यानें आपल्या विमल व शुभ्र यशानें सर्व दिग्भाग व्याप्त केले आहेत. थोर पुण्यप्रतापांचें तो केवळ अधिष्ठान आहे. त्याचा थोरपणाचा थांगच लागत नाहीं. सर्व मंगलांचें तो केवळ आगार असे त्याच्यासारखे थोर पुरुष या जगांत कधींतरी विरळा अवतरतात.'

हें ऐकून, 'आपला पिता वरचेवर देवराताचें स्मरण करीत असतो' असें मालतीला स्मरण झालें, व तिनें लवंगिकेला तसें सांगितलें. त्यावर लवंगिका ह्मणाली, 'हो दोघांनींही बरोबरच विद्याभ्यास केला, असें त्यावेळचे जाणते लोक ह्मणतात.'

कामंदकी पुढें ह्मणाली, 'या देवरातरूपी उदयाचलापासून एक सुंदर, गुणी, शोभायमान, कलावान व सर्व सनेत्र लोकांच्या नेत्रांना आनंद देणारा व या सर्व जगाला महोत्सव देणारा असा बालचंद्र उदयास आला. [ बालचंद्र पूर्व दिशेस उगवत नाहीं ही गोष्ट कवीच्या लक्षांत आली नाहींसें दिसतें. किंवा कलावान ह्मणजे पूर्ण कलांनीं युक्त असा पूर्णचंद्र उदयास आला असा अर्थ घ्यावा; किंवा उदयगिरी ह्मणजे चंद्राचाच उदय होण्याचा गिरी असा एकदेशीय अर्थ घ्यावा. अथवा चंद्रासारखा बालक उदयास आला असाही अर्थ होईल. ]

मालतीच्या मनांत अधिक उत्कंठा उत्पन्न करण्याकरितां लवंगिकेनें तिला ह्मटलें, 'हाच माधव असेल काग ?' अद्यापि माधवाचें नांव आलेलें नव्हतें. कामंदकी पुढें ह्मणाली, 'असा तो वयानें लहान पण सर्व विद्यांत निपुण असूनही सांप्रत पूर्णचंद्राप्रमाणें शोभायमान होत्साता घर सोडून येथें आला आहे. नगरांतील सर्व वाड्यांच्या खिडक्यांत त्याला पाहण्याकरितां लगबगीनें आलेल्या सुंदर नागरिक स्त्रियांच्या नेत्रकटाक्षांच्या योगानें सर्व नगरांतील खिडक्यांमध्यें जणों प्रफुल्लित नीलकमलेंच उगवलीं आहेत असें होतें. तो येथें आपला बालमित्र मकरंद याच्यासह आन्वीक्षिकी विद्या पढत आहे. तोच हा माधव–'

यावर मालती आनंदानें ह्मणाली—'लवंगिके, गडे ऐकिलेंस!' त्यावर लवंगिकेनें उत्तर दिलें, 'अग हो. महोदधीशिवाय पारिजातकाचा उद्गम कोठून होणार?!' हीं भाषणें चाललीं आहेत तोंच संध्याकाळ झाली व चवथ्या प्रहराचा शंख वाजला. त्या वेळीं प्रहरा प्रहराला शंख वाजण्याची चाल होती. घंटा किंवा तास वाजविण्याची चाल पुढें पडली असावी असें दिसतें. शंखध्वनि ऐकून फारच उशीर झाला असें कामंदकीला वाटलें, व ती ह्मणाली, 'हा संध्याशंखाचा ध्वनि मोठमोठ्या राजवाड्यांवरून व निकुंजांवरून प्रतिध्वनित होत्साता आकाशांत पसरतो आहे. त्याच्या योगानें आनंदानें व सुरत श्रमानें स्वस्थ निजलेलीं विहगमिथुनें जागीं होऊन रात्रीच्या विरहाकरितां मोठ्या कष्टानें तयार होत आहेत. चला जावें.' असें ह्मणून ती उठली. मालतीच्या मनांत या प्रवेशांत कळून आलेल्या गोष्टीच सारख्या घोळत होत्या. व ती त्याविषयींच आपल्याशीं पुटपुटत होती. ती ह्मणाली, 'बाबांनीं मला जणों राजाला नजर केली आँ? त्यांना राजाची मर्जी राखणें मालतीपेक्षां अधिक वाटलें! बाबा, तुह्मी देखील माझ्याविषयीं असे—तेव्हां काय ह्मणावयाचें? भोगतृष्णेची कमाल झाली.' तितक्यांतच माधवाचें स्मरण होऊन ती आनंदानें ह्मणाली, 'ते तरी थोर कुलांत उत्पन्न झाले आहेत. लवंगिका ह्मणाली तें खरेंच—महोदधीशिवाय पारिजातक कसा उत्पन्न होईल? त्यांचें पुनः दर्शन कसें बरें होईल?'

लवंगिका मार्ग दाखविण्याला पुढें झाली. जातां जातां कामंदकीला आपल्यावरचें एक मोठें ओझें उतरल्यासारखें झालें, व बेत केल्याप्रमाणें निसृष्टार्थ दूतीकल्पाचें काम सुरेख साधलें असें वाटलें. ती ह्मणाली, 'आजच्या प्रसंगांत आपण मालतीच्या मनांत दुसऱ्या वराविषयीं तिरस्कार व बापाच्या वर्तनाविषयीं आशंका उत्पन्न केली. पूर्वींच्या कथांचा उपन्यास करून पुढें काय करावें तें सुचविलें. त्या वत्सा माधवाचें कुल व गुण यांचें माहात्म्य प्रसंगानें वर्णन करून त्याच्याविषयीं तिच्या मनांत आस्था उत्पन्न केली. आतां पुढें त्यांचा समागम होणें दैवाधीन आहे.'

[नाटकाच्या नात्यानें हा अंक बराच चांगला साधला आहे. यांत प्रेक्षकांना कंटाळा येण्याजोगीं वर्णनपर लांबच लांब भाषणें कमी आहेत, किंबहुना नाहींत; व प्रवेशवैचित्र्यही चांगलें आहे.

कामंदकीचें सर्व वर्तन पोक्त व भारदस्त आहे; तरी तें पहिल्या प्रतीचें आहे असें ह्मणतां येत नाहीं.

शाकुंतल व विक्रमोर्वशी या दोन्ही कालिदासकृत नाटकांशीं भवभूतीचा दृढ परिचय असावा असें त्यांच्या एकमेकांशीं लागून दिलेल्या अवतरणांवरून ह्मणतां येतें. तसेंच, वासवदत्तेच्या कथेचा अनुवाद केला आहे तो बहुतेक सुबंधूच्या वासवदत्तेवरून केलेला वाटतो. किंवा कदाचित् गुणाढ्याच्या बृहत्कथेवरूनही हा अनुवाद केला असेल. बृहत्कथा फार प्राचीन ग्रंथ आहे. पण सुबंधूची वासवदत्ता भवभूतीच्या पूर्वींची किंवा अलीकडची आहे याविषयीं अद्यापि व्हावा तसा निर्णय झालेला दिसत नाहीं. तरी ती भवभूतीच्या पूर्वींची असावी असें या अवतरणावरून ह्मणतां येईल.]

## अंक तिसरा.

मागील अंकांत वर्णन केलेल्या गोष्टी घडल्यानंतर पुढें बऱ्याच दिवसांनीं या अंकांतील गोष्टी घडल्या आहेत. कामंदकी दररोज मालतीच्या समाचारास जात होती. मालती व माधव यांची परस्पर वरचेवर भेट व्हावी याविषयीं तिची खटपट नेहमी चालू होती. तिनें मदयंतिकेच्या मनांत मकरंदाविषयीं प्रेम उत्पन्न करण्याची कामगिरी बुद्धरक्षितेला सांगितली होती. 'वद्य चतुर्दशीच्या निमित्तानें मालती शंकराच्या मंदिरांत देवदर्शनाकरितां येईल, तेथें माधवही गेला असतां उभयतांची दृष्टादृष्ट होईल, याकरितां माधवाला तेथें जाण्यास सांग' असें तिनें अवलोकितेला सांगितलें होतें. या दोन्ही कामगिऱ्या अवलोकिता व बुद्धरक्षिता यांनीं चांगल्या बजावल्या होत्या. त्या दोघींची गांठ पडल्यावर त्यांचें या संबंधानें प्रथम प्रवेशांत बोलणें झालें आहे. मदयंतिका व मकरंद त्या बागेंत जावयाचे असून त्यांचीही भेट तेथेंच व्हावयाची होती. या भेटींत कामंदकीही मालतीबरोबर जाणार होती. तिनें मालतीच्या आईला कृष्णचतुर्दशीच्या दिवशीं शंकराचें दर्शन घेतल्यानें सौभाग्य वाढतें असें सांगितलें होतें. (कृष्णचतुर्दशीचें महात्म्य वर्णन केलें आहे यावरून त्यावेळीं वद्य व शुद्ध त्रयोदशीचे प्रदोषाचें माहात्म्य होतें किंवा कसें याची शंका वाटते. कदाचित् वद्य चतुर्दशीवरूनच पुढें प्रदोष व शिवरात्रीचें माहात्म्य वाढलें असेल.) व देवळांत गेल्यावर स्वतः फुलें वेंचण्याच्या निमित्तानें मालतीनें जवळच्या बागेंत लवंगिकेसह जावें व तेथें सहज माधवाची तिची भेट व्हावी असें ठरविलें होतें.

याप्रमाणें सर्वजण शंकरगृहांत जमले होते. येथवर केलेले उपाय बरेच सफल झाले असें वाटून कामंदकी स्वतःशीं ह्मणाली, 'मालती तितकी विनयनम्र असूनही तिला कांहीं दिवस निरनिराळे उपाय योजून ती आपल्या सखीवर पूर्णपणें विश्वास ठेवी असें केलें आहे. आतां तिला माझा यत्किंचितही विरह झाला तर तिचें चित्त ठिकाणावर नाहींसें होतें. मी जवळ असलें कीं ती मोठी प्रसन्न असते. एकांतांत तिला मोठें सुख होतें, विचारिल्या प्रश्नाचें ती मोठ्या आनंदानें उत्तर देते, व नेहमीं माझ्या मागें मागें असते. पण मी जाण्यास निघालें न निघालें कीं ती माझ्या गळीं पडून, मला वरचेवर अडवून धरिते, व पुष्कळशा आणा शपथा घालून व हातांपायां पडून पुनः पुनः लौकर परत येण्याविषयीं विनविते.' [ अत्यन्त अनुरक्त व आतुर, पण मुग्ध नवयौवना स्त्रियांचें असें वर्तन प्रत्येक प्रेमळ पतीच्या अनुभवास निदान नूतन संबंधानंतर हल्लींच्या काळीं देखील येत नाहीं असें कोण ह्मणेल ! हें वर्णन किती सरळ, खरें व मार्मिक आहे याची कल्पना ज्याला त्याचा थोडा बहुत तरी अनुभव आहे अशाला तेव्हांच येईल. ]

'शिवाय आपला बेत साधण्याची आशा वाटण्याला आणखीही कारणें उत्पन्न होत चाललीं आहेत. सहज गोष्ट काढतां काढतां शाकुंतलादिक इतिहासवाद सांगितलेले ऐकून ती माझ्या मांडीवर पडल्या पडल्या अतिशय चिंताग्रस्त व स्तब्ध होते.'

[ यावरून आपणही तसें करावें किंवा नाहीं याविषयीं मालतीच्या मनांत विचार घोळूं लागले आहेत असें कामंदकीला वाटत होतें असें दिसतें. ] नंतर तिनें मालतीला बोलाविलें तेव्हां

ती व लवंगिका आल्या. मालतीच्या मनांत 'बापानें मला राजाला नजर केलें आँ' हाच विचार सारखा घोळत होता. येतां येतां लवंगिकेनें कुसुमाकरोद्यानांतून येणारा सुधाबिंदूप्रमाणें किंवा मुग्ध मुखचंद्रावर लावलेल्या चंदनरसाप्रमाणें शीतल असा वायु तुला स्पर्श करीत आहे, तर चल आंत जाऊं, अशा अर्थाचें लांबच लांब व चमत्कारिक वर्णन केलेलें आहे. असें वर्णन चंपूंत किंवा कादंबरींत देखील क्वचितच सांपडेल.

याच सुमारास माधवानेंही कुसुमाकरोद्यानांत प्रवेश केला. कामंदकी पूर्वीच आलेली आहे असें पाहून तो ह्मणाला, 'एखाद्या तरुण व संतप्त मयूराला वृष्टि होण्याच्या पूर्वीं विद्युल्लता चमकलेली पाहून आनंद होतो त्याप्रमाणें माझ्या प्रियेच्या दर्शनापूर्वींच ही भगवती येथें आलेली पाहून संतप्त झालेल्या माझ्या अंतःकरणांत सानंद आशा व उत्कंठा उत्पन्न होत आहे. भगवती आली आहे त्या अर्थीं मालती आली असेलच-' इतक्यांत लवंगिका व मालती त्याच्या दृष्टीस पडल्या. त्यांना पाहून तो ह्मणाला, 'काय आश्चर्य आहे ! चंद्रदर्शनाच्या योगानें पर्वतालाही विकार होऊन पाझर फुटतात, तद्वत या कमलनयनेच्या निष्कलंक मुखचंद्राच्या सांनिध्यामुळें माझ्या अंतःकरणाची स्थिति झाली आहे. तें वरचेवर अगदीं जड व बधिर असें होत आहे. हल्लीं मालती अधिकच रमणीय दिसत आहे. मालतीचें सर्वांग विलासलुलित व आलस्ययुक्त होत्सातें चुरमडलेल्या चंपकपुष्पाप्रमाणें दिसतें आहे व ती माझ्या अंगांत संचार करणारा मनोभवरूपी अग्नि अधिक प्रखर करून अंतःकरणांत आनंद व मोह उत्पन्न करित आहे.'

मालती लवंगिकेला ह्मणाली-'गडे, या कुंजनिकुंजांत फुलें वेचूं या.'

हे मालतीच्या तोंडचे पहिलेच शब्द ऐकून माधवाला फारच आनंद झाला, व तो ह्मणाला- 'या माझ्या प्रियेच्या मुखांतून निघालेले पहिलेच शब्द ऐकून माझ्या सर्वांगावर आनंदानें रोमांच उभे राहिले आहेत. नवीनच अभ्रें येऊन नुकतीच वृष्टि झाल्यावर कदंब वृक्षाचीं सर्व फुलें एकदम विकसित झाल्यानें तो जसा शोभूं लागतो, तद्वत् यावेळीं माझी स्थिति झाली आहे.'

लवंगिका-'बरें तर चला-' असें ह्मणून मालतीबरोबर फुलें वेचूं लागली.

ही सर्व स्थिति पाहून कामंदकीनें हा फारच मनोरम घाट घातला आहे असें माधवाला वाटलें. इतक्यांत कामंदकीनें पुढें होऊन मालतीला प्रेमानें पोटाशीं धरून ह्मटलें, 'मालती, पुरे हे परिश्रम-किती तरी थकली माझी बाळ ती-तसेंच-तुझे शब्द अडखळतात, प्रत्येक अवयव थकून म्लान झाला आहे. परिश्रमामुळें मुखचंद्रावर स्पष्ट घर्मबिंदु आलेले आहेत, नेत्र वरचेवर मिटताहेत, वल्लभाला पाहिल्यापासून उत्पन्न झालेला हा खेद तुझ्या अंगीं अगदीं त्याच्यासारखाच शोभतो आहे.' हें कामंदकीनें केलेलें वर्णन ऐकून मालती अर्थातच लज्जित झाली व लवंगिकेनें ह्मटलें 'आपण ह्मणालां तें अगदीं खरें आहे.'

माधव हें सर्व ऐकतच होता. त्यालाही ही मालतीची झालेली थट्टा हृदयंगमच वाटली. नंतर कामंदकी ह्मणाली, 'मालती, बैस, तुला कांहीं सांगायाचें आहे.' नंतर सर्वजणी बसल्यावर तिनें प्रेमानें मालतीच्या हनुवटीला हात लावून ह्मटलें, 'मालती, तुला आठवण असेलच मीं तुला एकदां सांगितलें होतें कीं, तुझ्या-

प्रमाणेंच ज्याच्यावर माझें अतिशय प्रेम आहे असा माधव नांवाचा एक कुमार आहे.' यावर लवंगिका ह्मणते, 'हो स्मरण आहे तर.' (या सर्व प्रवेशांत मालतीला केलेल्या बहुतेक प्रश्नांचीं उत्तरें तिच्या वतीनें लवंगिकेनेंच दिलीं आहेत. हा प्रकार मालतीचा कुलीन व लाजाळू स्वभाव व्यक्त करण्याकरितां ह्मणून केलेला आहे.) कामंदकी पुढें ह्मणाली, 'मन्मथोद्यानांतील यात्रेच्या प्रसंगापासून त्याचें चित्त मुळींच ठिकाणावर नाहीं. त्याची शरीरप्रकृति ही फारच चमत्कारिक व विवश झाली आहे. तो अगदींच पराधीन झाला आहे. त्याला चंद्रदर्शनानें किंवा मित्रांच्या सहवासानेंही सुख होत नाहीं. तो अत्यंत धैर्यशील आहे ह्मणून त्याचा संताप तो बाहेर व्यक्त करीत नाहीं, तरी आंतल्या आंत मुरल्यामुळें तो त्याच्या शरीराच्या कृशतेवरून स्पष्ट होतो आहे. प्रियंगुपुष्पाप्रमाणें सांवळ्या वर्णाचें त्याचें शरीर विरहाग्नीमुळें किंचित् पांडुर वर्णाचें व अधिकाधिक क्षीण होत चाललें आहे.'

हें ऐकून लवंगिका ह्मणाली, हो, आपण जातां जातां त्या दिवशीं अवलोकितेनें असेंही ह्मटलें होतें कीं, 'माधवाची शरीरप्रकृति अस्वस्थ आहे.' तें ऐकलें न ऐकलेंसें करून कामंदकी ह्मणाली, 'तेव्हांच मी ऐकलें होतें कीं, माधवाची तशी कामी व खिन्न अवस्था होण्याला कारण मालतीच. मलाही तेंच खरें वाटतें. मालतीच्या मुखचंद्राकडे पाहतांच त्याचा अंतःकरणरूपी जलनिधि क्षुब्ध होऊन त्याची वृत्ति विलक्षण होते, असें तेव्हांच अनुमान होतें.'

हें सर्व कामंदकीचें भाषण ऐकून माधवाला मोठा आनंद व आश्चर्यही वाटलें. तो ह्मणाला, 'वाः काय तरी गोष्ट काढण्याची खुबी व मला महत्व देण्याचा हा किती उत्तम उपक्रम! शास्त्रांवर निष्ठा, साहजिक ज्ञान, प्रगल्भपणा, नेहमी गुणयुक्त व अभ्यस्त अशी वाणी, योग्यायोग्य कालाचा विचार व हजर जबाब, इतके गुण असले ह्मणजे सर्व कामें हटकून सिद्ध व्हावयाचींच.' हे सर्व गुण कामंदकीच्या अंगीं आहेत तेव्हां तिनें मनांत आणलेलें कार्य सिद्ध होणारच.

कामंदकी पुनः मालतीला ह्मणाली, 'माधव आपल्या जिवाला जणों अगदीं त्रासला आहे. कोणचेंही दुष्कर कृत्य त्यानें केल्यावांचून सोडिलें असें नाहीं. 'तो नवीन व नुकताच मोहोर आलेल्या व कोकिल शब्द करीत असलेल्या आम्रवृक्षावर दृष्टि देऊन उभा राहतो. बकुलपुष्पपरिमलानें सुवासित झालेल्या वायूच्या मार्गांत आपलें संतप्त शरीर उभें करितो. सर्व शरीराचा होत असलेला दाह शांत किंवा परिपूर्ण तरी होण्याकरितां कमलपत्र मात्र मध्यें धरून तो एकसारखा चंद्रकिरणाचें सेवन करीत असतो.'

हें ऐकून, कामंदकी आपलें बोलणें दुसऱ्याच थरावर नेत आहे, असें माधवाच्या लक्षांत आलें. मालतीला मात्र—हा सर्व प्रकार खरा असून माधव फारच दुष्कर कर्म करितो—असें वाटलें. शेवटीं कामंदकी ह्मणाली—'तेव्हां असा तो मुळचाच सुकुमार प्रकृति माधव, अशा प्रकारच्या क्लेशाचा पूर्वीं मुळींच अनुभव नसल्यानें कदाचित् असेंच करितां करितां मरून सुद्धां जाईल.'

माधवाची स्थिति या परिणामावर जाईल असें कामंदकीनें सांगितलें, तेव्हां त्या सर्व लोकांत अलंकारभूत अशा माधवाचा असा परिणाम होणार व तोही आपल्या कारणानें असें मनांत येऊन मालतीला भीति वाटली. व

पुढें-' आतां काय करावें बरें?-असें ती लवंगिकेला ह्मणाली.

मालतीविषयींही अशाच तऱ्हेचें वर्णन करण्याचा हा प्रसंग बरा आहे, असें पाहून लवंगिकेनें तिच्या अवस्थेची कहाणी सांगण्यास आरंभ केला. आपण केलेलें सर्व वर्णन व भाषण माधव ऐकत आहे हें कामंदकीला व बहुधा लवंगिकेलाही माहीत होतें. मालतीला मात्र याविषयीं सुगावा नव्हता. ( लवंगिकेच्या तोंडीं येथपासून सुमारें तीन पानें मालतीच्या वर्णनपर भाषण घातलेलें आहे. तें नाटकांत अगदींच अयोग्य आहे. त्यांत शब्दरचना, अलंकार व दूरान्वित समासांची गर्दी उडाली आहे. पण मतलब पाहिला तर सुमारें ५।७ वाक्यांत येण्याजोगा आहे. तो येणेंप्रमाणें:-लवंगिका ह्मणाली,

' आपणच आतां गोष्ट काढलीत ह्मणून सांगतें. आमच्या ताईसाहेब तरी माधवाला रस्त्यांतून जातांना माडीवरून पाहून मन्मथपीडेनें अगदीं खिन्न पण दिसण्यांत एक तऱ्हेनें अधिक रमणीय होतात; त्या परिजनांवर उगीचच रागवतात; त्यांना खेळ क्रीडा मुळींच आवडत नाहींत; नुसत्या तळहातावर गाल ठेवून सारख्या सचिंत बसलेल्या असतात. थंडगार वाऱ्यानें त्यांना त्रास होतो. त्या मन्मथोद्यानांत यात्रेच्या दिवशीं दोघांची दृष्टादृष्ट झाली, त्या दिवसापासून तर त्या एखाद्या बालकमलिनीप्रमाणें थोडा वेळ विकसित होऊन नंतर सारख्या झुरताहेत. तरी केव्हां केव्हां त्या संकल्पनिर्मित समागमसुखाचा अनुभव घेऊन आनंदित होत असतात असें वाटतें. व त्यांची ती त्या वेळची स्थिति पाहून चतुर सख्यांच्या मनांत त्यांच्या कौमारभावाविषयींही कांहींशी शंका येते. कसेही शीतोपचार केले तरी त्यांना मुळींच निद्रा येत नाहीं व रात्रीच्यारात्री जागरणें होतात. कधींमधीं निद्रा लागलीच तर त्यांत त्यांना प्रियसमागमाविषयींचींच स्वप्नें पडतात असें दिसतें. त्या स्वप्नांच्या भरांत त्यांची मुद्रा फारच आनंदित दिसते, पण तितक्यांत त्या कोणास गाढालिंगन देत आहेत अशा स्थितींत एकदम जाग्या होतात, व शयनावर आपण एकट्याच आहों असें पाहून त्यांची वृत्ति फारच उदास, व्यग्र व खिन्न होते. त्यांचे प्राण जातात का राहतात असें वाटूं लागतें. अशा वेळीं परिजनांची अगदीं गाळण होते, त्यांना काय करावें तें सुचत नाहीं. दैवावर हवाला ठेवून स्वस्थ बसावें लागतें. असाच प्रकार चालला तर कोठवर टिकणार ? विरही जनांना अत्यंत दुःसह अशा या रात्रींत यांचा काय परिणाम होणार व या वसंतऋतूंतील रात्रींच्या सपाट्यांतून आमच्या या ताईसाहेब कशा पार पडणार याविषयीं मोठीच काळजी पडली आहे. [ हें सर्व वर्णन अप्रासंगिक व चमत्कारिक तर आहेच, पण तें यथार्थही नाहीं असें वाटतें. कारण, खऱ्या कुलीन व नुकत्याच बाल्यावस्थेंतून मुग्ध दशेंत येत चाललेल्या तरुण व शुद्धाचरणी मुलींना, संकल्पनिर्मित प्रियसमागमसुखाचा-सुरताचा-पूर्वीं निदान एकवार तरी प्रत्यक्ष अनुभव असल्याशिवाय स्वप्नांत अनुभव येणें शक्य आहे असें वाटत नाहीं. हें वर्णन बरेंच अश्लीलही आहे. याचें वर्णन द्व्यर्थी पदांनींच केलें पाहिजे होतें. )

हा सर्व प्रकार ऐकून कामंदकीनें बुद्धया ह्मटलें, ' या सर्व गोष्टी माधवाला उद्देशूनच होत असल्या तर हें खरोखर तिच्या गुणज्ञतेचेंच फल आहे. याचा मला आनंदच होतो. तरी हें ऐकून माझें अंतःकरण कसें कांपतें आहे ! '

माधवाच्या मनाला हा सर्व वृत्तांत ऐकून अर्थातच अतिशय आनंद झाला. व कामंदकीला आनंद झाला तोही योग्यच आहे असें वाटलें.

कामंदकी पुनः ह्मणाली, 'खरोखर हल्लीं मोठा भयंकर प्रसंग आहे. हें मालतीचें शरीर स्वभावत: कोमल व सर्व सुकुमार वस्तूंचें सार आहे. पंचबाण मोठा दारूण आहे. तसेंच मलयवात सुटलेला असून त्याच्यांत मनोहर असा आम्राच्या मोहोराचा सुगंध भरलेला आहे. व हा वसंत-काल चंद्ररूपी कर्णाभरणानें युक्त असा फारच बहारीचा आलेला आहे. कामीजनांना अनर्थ-कारक अशा या कालांतून ही बिचारी कोमलांगी कशी पार पडते कोण जाणें !'

इतक्यांत लवंगिकेनें बुद्धया मालतीनें जवळ लपवून ठेवलेला चित्रफलक व तिच्या गळ्यांत असलेली माधवानें गुंफलेली बकुलमाला कामंदकीला दाखवून ह्मटलें, 'हा पहा माध-वाची तसबीर असलेला चित्रफलक व ही माधवानें गुंफलेली ह्मणून जीव का प्राण समजून अक्षयीं गळयांत असलेली बकुलमाला !'

इतकें सर्व झाल्यावर माधवाला मालतीचें मन आपल्यावरच बसलें आहे याविषयीं मुळींच शंका राहिली नाहीं. त्याच्या मनांत आनंदानें गुदगुल्या होऊं लागल्या, व तो बकुलावलीला उद्देशून ह्मणाला–'हे बकुलावली, या त्रिभु-वनांत तूं मोठी धन्य, कारण तूं या सुंदरीची वल्लभा झाली आहेस,–व मृणालाप्रमाणें शुभ्र व रमणीय अशा तिच्या स्तनांसभोंवती नेहमीं तुझा वास असतो यापेक्षां अधिक तें काय पाहिजे ?'

[अशा तऱ्हेनें आपल्या प्रियेला प्रिय झालेल्या व तिच्या सहवासांत असलेल्या पदा-र्थांचीं धन्यतावर्णनपर भाषणें बहुतेक नाटकांत व काव्य ग्रंथांत आढळून येतात. ]

अशा तऱ्हेनें त्या कुसुमोद्यानांत गमतीनें भाषणें चाललीं आहेत तोंच बाहेरच्या बाजूच्या राजमार्गावर एक वाघ पिंजऱ्यांतून सुटून संचार करीत असल्यामुळें एकदम फारच गडबड उडाली. तशांत मदयंतिका त्याच मार्गानें त्या बागेंत येत होती ती वाघाच्या तावडींत सांपडली. तेव्हां तर एकच हलकल्होळ झाला. [हा प्रसंग मुख्यत्वें मकरंद व मदयंतिका यांची भेट करून देण्याच्या उद्देशानें आणिला आहे. मालतीच्या मनावर कामंदकी व लवंगिका यांच्या भाषणानें व चित्रफलक व बकुलमाला यांच्या उद्‌घाटनानें जो परिणाम झाला होता, तो तिला त्याच्याविषयीं स्वस्थपणें विचार करून उत्तर देण्यास सवड मिळाली असती तर कमी होण्याचा संभव होता. पण असा एखादा भयंकर प्रसंग आणवून तिला घाबरून सोड-ल्यानें व पुढें त्याच्यांतून सर्वांची मकरंदाच्या पराक्रमानें सुटका झाल्यावर हर्षाच्या निर्भरांत मालतीकडून याबद्दल वाटेल तसाच जबाब घेण्याला यापासून उत्तम संधि येणार होती, ह्मणून हा प्रसंग दोन्ही तऱ्हेनें चांगला साधला आहे. पण 'मदयंतिकेचें वाघाच्या सपाट्यांतून रक्षण करा'–असें घाबऱ्या घाबऱ्या लोक ओरडत असतांना त्यांच्या तोंडांत वाघाचें फाजिल अनवश्यक व सामान्य लोकांच्या तोंडून कधींही न निघणारें वर्णन घातलें आहे. यावरून देखील भवभूतीला नाटकाचें खरें रहस्य कळलें नव्हतें असें ह्मणतां येतें.]

हें वर्णन लोकांच्या कल्होळाचें आहे व त्यांतील मुख्य आशय एवढाच आहे कीं, 'हा दुष्ट व दांडगा वाघ लोखंडी पिंजरा

३. ठाणें मराठी ग्रंथसंग्रहालयाचा सहावा वार्षिक रिपोर्ट—या संग्रहालयांत या सालीं ५०० जास्त पुस्तकांचा संग्रह झाला आहे. शिल्लकही गुदस्तपेक्षां जास्त आहे. यावरून उत्तरोत्तर या संस्थेची भरभराट होत आहे हें उघड आहे आणि ही स्थिति संस्थेच्या चालकांस निःसंशय भूषणावह आहे. यापेक्षांही त्यांस जास्त भूषणावह ही गोष्ट आहे कीं, त्यांचें उदाहरण पाहून मुंबईसही अशी एक संस्था स्थापन झाली आहे; आणि पुण्यासही एक स्थापन होण्याचें घाटत आहे.

४. ग्रंथमाला—हें ६४ पृष्ठांचें मासिकपुस्तक कोल्हापूर येथें प्रसिद्ध होत असतें. याच्या द्वारें मराठींतील ग्रंथसंग्रह बराच वाढला आहे. त्याच्या संबंधाची जाहिरात या खालीं दिला आहे तीवरून पाहतां, वर्गणीदारांची संख्या १००० झाल्यास, पुस्तकाची पृष्ठसंख्या २०० करण्याचा चालकांचा विचार आहे असें दिसतें. विचार योग्य आहे, कसा सिद्धीस जाईल याबद्दलच कायतो संशय. पुस्तक लोकाश्रयास पात्र आहे.

---

# विविधज्ञानविस्तार.



हें पुस्तक प्रतिमासास एकदां निघतें. यांत शास्त्रीय विषय; स्त्रियांकरितां मनोरंजक व सन्मार्गवर्ती गोष्टी; रूपकें; कविता; विद्यार्थ्यांकरितां अन्यभाषांची माहिती, व भाषान्तरें; इतिहास; देशज्ञान; विख्यात पुरुषांची चरित्रें; आरोग्य-रक्षणार्थ सूचना; नवीन पुस्तकांवर टीका; नीतिवादाचे निबंध; इत्यादिक विषयांचा संग्रह अवकाशानुसार होत असतो.

या पुस्तकांत प्रसिद्ध करण्याकरितां सदरील विषयांवर कोणी लेख पाठविले तर, पसंत पडल्यास, त्यांस अवश्य स्थळ मिळेल.

**या पुस्तकाची किंमत.**

वर्षाची आगाऊ.......... रुपये ३.
सहामाही आगाऊ........ रुपये २.
फुटकळ दर प्रतीस........ आणे ६.
टपाल हांशील वर्षाचें...... आणे ६.

वर्गणीदारांनीं आगाऊ वर्गणी आरंभापासून दोन महिन्यांचे आंतच पाठविण्याची मेहरबानी करावी. नाहींतर दरसाल साडेचार रुपयांप्रमाणें त्यांकडे किंमत मागावी लागेल.

या पुस्तकाविषयीं हरएक प्रकरणीं पत्रव्यवहार, मुंबईंत फणसवाडींत अग्निहोत्र्यांच्या वाड्यासमोर, अथवा काळबादेवीचे रस्त्यावर नंबर १ च्या घरांत " **म्यानेजर, विविधज्ञानविस्तार** " या पत्त्यावर ठेवावा. **नाटपेड** पत्र घेतलें जाणार नाहीं.

॥ श्रीः ॥

# विविधज्ञानविस्तार.

A MONTHLY MAGAZINE
OF
MARATHI LITERATURE
FOR
Ladies and Gentlemen.

कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरितां.

पुस्तक ३०. मे १८९९. अंक ५.

विषय. अनुक्रमणिका. पृष्ठ.



मुंबईंत
गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत छापिलें.

वर्षाची वर्गणी रुपये ३; टपालखर्च आणे ६.

## सूचना.

' हिंदुधर्म आणि सुधारणा ' या पुस्तकाचें परीक्षण पुढच्या अंकांत समाप्त होईल.

---

रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांच्या चरित्राचा पुढील भाग येत्या अंकांत प्रसिद्ध होईल.

---

गुदस्त सालापासून विस्ताराचा आकार वाढल्यामुळें खर्चाचें मानही वाढलें आहे. इकडे लक्ष देऊन आमचे आश्रयदाते आपल्याकडील वर्गणीचा सत्वर उलगडा करतील तर मोठे उपकार होतील. सुज्ञांस यापेक्षां जास्त लिहिणें नको.

पत्ते बदलले असल्यास जरूर लिहून कळविण्याबद्दल आश्रयदात्यांस विनंती आहे.

---

## सुविचारसमागम.

या मासिक पुस्तकास पहिलें वर्ष संपून आतां दुसरें वर्ष लागलें. दुसऱ्या वर्षापासून यास आठ पृष्टांची भरती घातली आहे, यावरून उत्पादकांस लोकांकडून योग्य उत्तेजन मिळालें असावें असें वाटतें. याचप्रमाणें लोकांकडून उत्तेजन मिळत गेल्यास याहीपेक्षां सुधारणा करण्यास उत्पादकांस उमेद येईल.

पुस्तकांतील विषयांची व्यवस्था समाधानकारक आहे. तथापि संपादकांस प्रेमभावानें एक लहानशी सूचना करणें अवश्य वाटते; ती ही कीं, केवळ भिडेखातर कसल्यातरी निरूपयोगी बिषयांस जागा दिली, असा संशय येण्यास त्यांनीं अवकाश देऊं नये.

---

श्री.

# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ३०. अंक ५.

### पुस्तकपरीक्षा.

## " हिंदुधर्म आणि सुधारणा. "

[ २ ]

या ग्रंथांतील मुख्य तत्त्वांचें प्रथम परीक्षण करूंया. मनुष्याची इतिकर्तव्यता ह्मटली ह्मणजे समाज " सुखी, समाधानी, व सुव्यवस्थित" होईल अशा तऱ्हेचें वर्तन ठेवावयाचें, हें तत्त्व प्रथम पुढें ठेवून त्यावर ग्रंथकर्त्यानें आपल्या सर्व तत्त्वज्ञानाचा पाया रचिला आहे. ख्रिस्ती लोकांची मनमुराद निंदा करितांना जरी या तत्वाची ग्रंथकर्त्यानें टवाळी केली आहे तरी आपल्या आवडत्या विधानांच्या समर्थनार्थ याच तत्त्वास बिगारी धरण्यास त्यानें कमी केलें नाहीं. पस्तिसाव्या भागांत ग्रंथकर्त्यानें भाऊसाहेबांच्या तोंडून जें नीतिशास्त्र वदविलें आहे त्यावरून ही गोष्ट चांगली स्पष्ट होईल. असो, प्रसिद्ध नीतिशास्त्रवेत्ता बेन्थाम यानें जें तत्त्व मागील शतकांत युरोपमध्यें प्रचलित करून लोकांपुढें एक श्रेष्ठतम कर्तव्य मांडिलें तेंच ग्रंथकर्त्यानें पाया ह्मणून अंगीकारिलें असल्यामुळें त्याविरुद्ध आमचें कांहींच ह्मणणें नाहीं. आह्मांस सांगावयाचें ह्मणून इतकेंच कीं भाऊसाहेबांस बेन्थाम ण्यानें ग्रंथकर्त्यानें आरंभींच आपल्या डीची चुणुक दाखवून "प्रथमग्रासे मक्षि ता"चा प्रकार केला आहे. या ग्रंथांतील कसकशा अस्वाभाविक प्राण्यांनीं भरली हेंही यावरून सहज समजून येईल.

आतां समाजाचें सुख, समाधान व कोणत्या उपायांनीं वृद्धिगत होईल हा प्रश्न येतो. यास उत्तरादाखल ग्रंथकर्ते जें ह्मणता येथें थोडक्यांत दाखल करितों. वरील तीन्ही उच्च मनोवृत्तींच्या प्रादुर्भावानें मात्र साध्य आहे मुख्यत्वेंकरून कृतज्ञता, सत्य, प्रेम, व दया मनोवृत्तींची वाढ आपणास केली पाहिजे पैकीं कृतज्ञता व सत्य या दुकलीस प्रेम या दुकलीपेक्षां अधिक महत्व आहे. तिजमुळेंच समाजाचें विशेष हित होतें. या मनोवृत्ति कायम किंवा वाढ कायदा, शिष्टाचार, धर्म व रूढि हें भूत होतात; परंतु कायदा चुकवितां त्यामुळें व शिष्टसमागम सुलभ नसल्यामुळें धर्म व रूढि या दुकलीचीच पायधरणी अवश्य केली पाहिजे. कायदा व शिष्टाचार फार झालें तर आपल्या बाह्य कृतींचें नियमन करितील. परंतु उत्तम धर्म व रूढि समाजांत प्रचलित

असल्यावांचून व्यक्तींचीं अंतःकरणें जिंकितां येणें दुरापास्त आहे. दर पिढींत ज्ञान, कर्तृत्व आणि संपत्ति यांत होणाऱ्या फरकाच्या मानानें रूढींत फरक पडत जातो. रूढीच्या पोटांत सुधारणा असल्याकारणानें तिचा अंमल अधिक असतो; व ह्मणून धर्म व रूढि यांमध्यें दिवसानुदिवस वाढत जाणाऱ्या फुटींत जनसमूह धर्माची कड न धरितां रूढीला पकडून ठेवितो. हा फरक हळूहळू सांचत जाऊन जेव्हां रूढि प्रचलित धर्माशीं फारच विसंगत व विजातीय दिसूं लागते तेव्हां एखादा मोठा धर्मसंरक्षक उत्पन्न होऊन तो धर्माची व रूढीची तोंडमिळवणी करितो;—ह्मणजे रूढीस मागें ओढीत नाहीं तर धर्मास पुढें खेंचतो; व धर्माला याप्रमाणें स्थानभ्रष्ट करण्याच्या कामीं तो ईश्वरी अंश आहे ही लोकांची समजूत त्याच्या फारच उपयोगीं पडते. वर दर्शविल्याप्रमाणें रूढींत दर पिढीस थोडथोडा फरक पडत जात असतो खरा. पण त्या एकदम नाहींशा करून त्यांच्याशीं संलग्न असलेल्या उच्च मनोवृत्तींस धक्का देण्याचा मूर्खपणा सुधारक करीत आहेत तो त्यांनीं सोडून द्यावा.

समाजसुख पारमार्थिक उन्नतीमुळेंच होतें. भौतिक उन्नति हिंदुस्थानासारख्या जुनाट देशाला शक्यही नाहीं, व तेथील रहिवाशांना ती नकोही असते; कारण विषयोपभोगांच्या द्वारें कधीं सुखप्राप्ति व्हावयाची नाहीं, असा या देशांत ठरलेला नियम आहे. तरी पण या देशांत सर्वच लोक सात्विक आचरणाचे नसल्यामुळें राजस प्रकृतीच्या लोकांचा उद्धार करण्याच्या कामीं बिनचूक उपयोगीं पडणारी भौतिक उन्नति अवश्य झाली पाहिजे; व ती राजस प्रकृतीमुळें उत्पन्न होते.

वरील संक्षेपांतील गुणचतुष्टयासंबंधाचा मजकूर भाऊसाहेबांच्या भाषणांतील शुभ्र नवनीत ह्मणून येथें सादर केला आहे. त्यापुढील ह्मणजे पारमार्थिक उन्नतीसंबंधाचा गोषवारा दिगंबर महाराजांचें तत्वज्ञान दिगंबरस्थितींत वाचकांपुढें मांडावयाच्या उद्देशानें दिला आहे. प्रस्तावनेंत या ग्रंथाच्या विद्वान् प्रकाशकांनीं "पोकळ पांडित्यानें, बालिश विनोदानें, उद्दाम वृत्तीनें किंवा काल्पनिक प्रमाणांनीं या संग्रामांत सुधारकांस जय मिळण्याची आतां आशा नाहीं" अशा तऱ्हेचें निर्धारपूर्वक आश्वासन देऊन धर्मसंरक्षकांचें भरींव पांडित्य, मुद्देसूद प्रमाणें वगैरे जें ध्वनित केलें आहे, त्यावरून आह्मांस वरील दोन्ही वक्त्यांबद्दल बराच आदर उत्पन्न झाला होता. "ताई, भाऊसाहेब अद्वितीय माणूस आहेत; त्यांची विचारसरणी दुसऱ्या कोणास (दिगंबर महाराजांसही ?) येणें नाहीं" अशा लाडक्या शब्दांनीं विद्याधरपंत लीलावतीस जें भाऊसाहेबांचें वर्णन देत आहे त्यावरून त्यांच्या भाषणांतील मुद्देसूदपणाबद्दलचा आमचा संशय पार काढून टाकून आह्मीं पुनः तें समग्र वाचलें. तरीसुद्धां आमची निराशाच झाली. असो, वर जवळ जवळ मांडिलेलीं परस्परविरुद्ध विधानें लचके तोडून एकमेकांस फाडून टाकण्यापूर्वीं त्या विधानांचें सूक्ष्मदृष्ट्या परीक्षण केलें पाहिजे. वरील दोन्ही वक्त्यांच्या वक्तृत्वास ज्याअर्थीं विद्याधर नंदीबैलाप्रमाणें मान डोलवीत आहे त्याअर्थीं तीं दोन्ही त्यास सारख्याच प्रमाणानें मान्य असलीं पाहिजेत हें उघड आहे.

पारमार्थिक उन्नतीपासून समाजास कोणत्या रीतीनें स्थैर्य येतें हें "हिंदुधर्माचीं पंच महातत्वें" या प्रकरणांत ग्रंथकर्त्यानें सांगितलें आहे. "उत्कृष्ट धर्मव्यवस्थेमुळें वर्गावर्गांचीं कर्तव्यें

उत्तम प्रकारें नियमित केलीं गेलीं व कोणासही जीवनार्थ विलक्षण प्रकारचा कलह करण्याची आवश्यकता राहिली नाहीं. ज्याचीं कर्तव्यें त्यानें करावयाचीं असा निश्चय राखिल्यामुळें केव्हांही सर्व राष्ट्र युद्धसंग्रामांत गुंतून गेलें नाहीं. ज्यांचें युद्धाचें काम नव्हे, **ते समोर युद्ध चाललें असतां तटस्थ रहात.** यामुळें जरी अनेक राज्यक्रांत्या झाल्या तथापि नवीन राज्यकर्त्यांस देशांतील सर्व लोक शत्रूंप्रमाणें वाटले नाहींत व ते तसे नव्हतेही."

ब्राह्मणांच्या बुद्धिमत्तेमुळें संतति कमी झाल्यानें, व क्षत्रियांच्या युद्धलालसेमुळें ती संग्रामांत नष्ट झाल्यानें, इतर वर्गांपेक्षां या दोन वर्गांत लोकसंख्या कमी आढळून येत असली पाहिजे हें उघड आहे. एकंदर लोकसंख्येमध्यें जी वृद्धि व्हावयाची ती वैश्य व शूद्र या दोन वर्गांत वृद्धि झाल्यामुळेंच होत असली पाहिजे. अर्थात् जातिभेदाच्या व्यवस्थेमुळें या दोन वर्गांत जीवनार्थ कलह बराच झपाट्यानें चालू असला पाहिजे. दुसऱ्या देशांत अशा प्रकारचा झगडा सुरू झाला असतां दुसऱ्या धंद्यांचें अवलंबन करून त्यांतून मुक्त होण्याचा मार्ग सर्वांस मोकळा असतो. तोही चातुर्वर्ण्यव्यवस्थेंत बंद असल्यामुळें नीच जातींची स्थिति 'तोंड दाबून बुक्क्यांचा मार' अशी झाली असल्यास नवल नाहीं. या व्यवस्थेंत ब्राह्मण व क्षत्रिय यांची मात्र चैन होती खरी. इतर जातींच्या झगड्याचा स्वतःस संपर्क न लागतां त्यांचे कष्ट पाहून त्यांच्या तुलनेनें स्वतःचें सुख विशेष संतोषानें मिटक्या मारीत अनुभवणें हें कार्यंतें वरिष्ठजातीयांच्याच नशिबीं होतें.

याप्रमाणें कर्तव्यांच्या नियमनापासून होणारे फायदे सांगतांना एक जात दुसऱ्या जातीच्या धंद्याचें कधीं अवलंबन करीत नसे असें सांगून, वैश्यशूद्रांची स्थिति अगदीं कष्टमय नव्हती असें सिद्ध करण्याच्या भरांत ग्रंथकार आपलें पूर्वीचें विधान चटकन् विसरून ह्मणतात:— "शूद्रांस जी परमार्थदृष्ट्या श्रेष्ठता आली तीमुळें क्षत्रिय आणि वैश्य यांमध्यें व शूद्रांमध्यें फारसें अंतर उरलें नाहीं. क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचा एकाच शूद्रवर्गांत समावेश होऊं लागला. कांहीं शूद्रांनीं क्षत्रियांचें गुणकर्म अंगीकारलें, कांहीं वाण्यांचा धंदा करूं लागले.....सारांश पूर्वींच्या वर्णांपैकीं ब्राह्मणवर्ण मात्र शुद्ध राहिला." प्रथम दिलेला उतारा जर सत्यास धरून असेल तर या उताऱ्याचा निर्वाह कसा करावयाचा? पहिला खोटा समजून दुसरा सत्यास चिकटून आहे अशी कल्पना केली कीं वर क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांमध्यें जीं कुंपणें कल्पिलीं आहेत तीं नाहींशीं होऊन या तीन्ही जातींतील लोक एका जातींतील लोकांप्रमाणें जीवनार्थ कलह करण्यास तयार झालेच. इतकेंच नाहीं, तर हा जीवनार्थ कलह इतर देशांतल्यापेक्षां फारच भयंकर होत असला पाहिजे. कारण एकाच धंद्यामुळें उत्पन्न होणाऱ्या स्पर्धेच्या मदतीस उच्चनीचभाव येऊन धंदेवाल्यांमध्यें विलक्षण वैमनस्य माजत असलें पाहिजे. पहिलें विधान सत्य मानिलें तर जीवनार्थ कलहास योग्य अशा दोन जाती रहातात; दुसरें सत्य मानिलें तर सबगोलंकार होऊन इतर देशांपेक्षांही अनिष्ट स्थिति उत्पन्न होते. आपल्या समाजाच्या लंगड्या बाजूसही धट्टीकट्टी दाखविण्याची जो हांव धरितो त्याची अशी कुतरओढ झाल्यास नवल नाहीं.

समाजांतील व्यक्तींच्या समाधानाविषयीं येथपर्यंत सांगितलें. समभागाचा समतोलपणा वि-

घडवून टाकणाऱ्या आंतर कारणांना सोडून बाह्य कारणांचा विचार करूं लागलों तरी ग्रंथकाराच्या विधानांची असत्यताच दिसून येईल. परकीयांशीं क्षत्रिय देशबांधव झगडत असतां वैश्यांनीं रणांगणाच्या जवळच आपलें दुकान स्थापून तराजूच्या दांडीची चलबिचल होऊं न देतां शत्रुपक्षास किराणा विकणें, किंवा ब्राह्मणांनीं होमकुंडें स्थापून त्यांमध्यें आपल्या बांधवांच्या शिरकमळांचा हवि पडतांना पाहून आनंद मानणें यांत ग्रंथकर्त्यास कदाचित् सात्विक वृत्तीची परमावधि वाटत असेल. पण त्याच्या शिवाय कोणाही खऱ्या हिंदूस वरील गोष्ट शक्य वाटणार नाहीं,–किंवा शक्य वाटल्यास तिजबद्दल अभिमान वाटणार नाहीं इतर देशांतही आपल्याप्रमाणेंच साधारण संग्रामाच्या प्रसंगीं उदमी लोक तराजूची दांडी फेंकून देऊन खांद्यावर बंदूक वापरतांना आढळत नाहींत. परंतु तसाच प्रसंग पडला तर रणमैदानाकडे टकमक पहाण्याच्या ऐवजीं हातघाईस आलेल्या आपल्या देशबंधूंस साहाय्य करण्यास ते धावून जातील यांतही संशय नाहीं व तोंडावरील माशा न उडणाऱ्या वरील सात्विक पशूंपेक्षां कोणासही या राजस बहाद्दरांचेंच वर्तन अनुकरणीय वाटेल यांत संशय नाहीं. इतकेंच नाहीं, तर ग्रंथकर्त्यानें श्रेष्ठ ह्मणून ठरविलेली तादात्म्यशक्तिही त्यांच्या अंगींच जास्त वसत आहे असें ह्मटल्यास फारशी चूक होणार नाहीं. परक्या शत्रूंशीं लढतां लढतां धारातीर्थीं ज्या आपल्या देशबांधवांनीं देह ठेविले त्यांच्याबद्दल करुणेनें आपल्या चेहऱ्याचा एकही स्नायु न हालूं देतां नंतर शत्रूची प्रीति संपादण्याच्या कामीं त्याच चेहऱ्याला खुलविणाऱ्या अधमाधमांचें राष्ट्र जिवंत रहाण्यापेक्षां तें सबंध शत्रुकोपाला आहुति पडलें- लें पुरवलें, असें आह्मींच नाहीं, तर ज्यांना नीतितत्त्वांचें रहस्य पूर्णपणें कळलें आहे असें ग्रंथकर्ते ह्मणतात ते कविही एक स्वरानें ह्मणतील.

परक्या शत्रूंनीं आपणास जिंकल्यावर ते क्षत्रियेतर जातींस ममतेनेंच वागवीत आले असें ग्रंथकर्ते ह्मणतात. पण इतर ब्राह्मण या त्यांच्या ह्मणण्याला खास रुकार देणार नाहींत. मुसलमान लोक एका हातांत कुराण व दुसऱ्या हातांत तरवार घेऊन जेव्हां पाठीमागें लागले तेव्हां पळतां पळतां ज्यांच्या पायांचे टांके ढील झाले तेच लोक आपली जीभ सैल सोडून वरील वाक्य उच्चारतील असें संभवत नाहीं. क्षत्रियेतर जातींस शत्रूकडून त्रास पोहोंचत नव्हता हें जर खरें ह्मटलें तर हल्लीं धर्मांतर झालेले ब्राह्मण चोहोंकडे दिसून येतात त्यांची वाट काय लावयाची ? मोंगल बादशहांमध्यें पाहिलें तर अकबराप्रमाणें समतेनें वागविणारे बादशाहा अपवादरूप, आणि औरंगजेबाप्रमाणें ब्राह्मणांचा छळ करणारेच फार, असें दिसून येईल. शिवाजी महाराजांचें ब्रीद कोणतें होतें ? तर गोब्राह्मणांचा सांभाळ करणें. क्षत्रियांचा सांभाळ करण्यासाठीं त्यांचा अवतार नव्हता ! समरांत आपल्या बांधवांच्या "मृत्यूचा फार्स" गमतीनें पहाण्याचें बक्षीस ब्राह्मणांना हेंच मिळावें ना !

असो. तर याप्रमाणें जातिभेद पाळून त्या द्वारें आपल्या उत्कृष्ट मनोवृत्ति कायम ठेविल्यानें, अर्थात् पारमार्थिक उन्नतीच्या मार्गानें, समाजास कशा तऱ्हेचें स्थैर्यसमाधान होतें हें आपण पाहिलेंच. भौतिक उन्नति आम्हांस शक्य नाहीं, असें ग्रंथकर्त्याचें मत आहे. पण ज्या मराठ्यांनीं आपल्या पराक्रमानें हां हां ह्मणतां अटकेपर्यंत-

चा मुलूख व्यापून टाकिला; ज्यांच्या घोड्यांनीं आपल्या खिंकाळण्यांनीं व टुगाण्यांनीं मोंगलांच्या प्रदेशाला आपला तबेला बनवून सोडिलें; ज्यांचे भाले क्षितिजावर चमकूं लागतांच शत्रु तो एक पळण्याचा इशाराच समजत;—त्याच विक्रमशाली मराठ्यांच्या जवळच्या वंशजांनीं वरील तऱ्हेचे दोन उद्गार काढण्याचें कांहीं कारण नाहीं. आमच्या अंगचें तेज दाखविण्याचा मार्ग बदलला आहे ही गोष्ट खरी आहे. तरी पण इंग्रज प्रभूच्या सौम्य राज्यछत्राखालीं आपण, कालांतरानें कां होईना, आपली भौतिक स्थिति सुधारूं यांत आह्मांस काडीमात्र संशय वाटत नाहीं. यासंबंधानें कै० चिपळूणकर शास्त्रीबुवांचा " आमच्या देशाची सांप्रतची स्थिति " हा निबंध अवश्य वाचण्याची वाचकांना शिफारस करितों.

भौतिक उन्नतीची आह्मां हिंदु लोकांस इच्छा नसते असेंही एक चमत्कारिक मत ग्रंथकर्त्यांनीं ठोकून दिलें आहे. शत्रुपक्षाच्या सर्व वाटा अडवून टाकण्याची ग्रंथकारांस एक वाईट खोड लागली आहे. पुनर्विवाहाची चाल अनिष्ट आहे इतकेंच सांगून गप बसल्यावर मग तत्वशोधनाचा कंडू शमावा कसा? ह्मणून पुनर्विवाह करण्याची सवलत दिली असतांही विधवा तो करण्यास राजी होणार नाहींत असें एक तत्त्व काढून तें स्थापित करण्याचा प्रयत्न करणें त्यांस भाग पडलें. भौतिक उन्नतीसंबंधानेंही तसाच प्रकार झाला आहे. भौतिक उन्नति इष्ट नाहीं इतकेंच प्रतिपादन केलें तर हे लबाड सुधारक लागलीच ती अनिवार आहे असें स्थापूं पहातील. ह्मणून त्यांना अपशकून करण्याकरितां घाईघाईनें स्वतःचा नासिकाछेद ग्रंथकारांकडून झाला आहे. पण अशानें स्वतःचें छिद्र सुधारकांच्या डोळ्यांसमोर मुद्दाम आणिल्यासारखें होतें हें ते विसरल्यासारखे दिसतात. विधवा पुनर्विवाहाच्या सवलतीनंतर ब्रह्मचर्य मोडतील अशी भीति जर बाळगावयास नको तर ती सवलत देण्याचें तुह्मी कां नाकारतां? स्वतःचें औदार्य आणि विधवांचें ब्रह्मचर्याविषयींचें प्रेम अशा दोन्ही गोष्टी एकसमयावच्छेदेंकरून स्थापिण्याची अमोल संधि आली असतां ती तुह्मी दवडावी कां? त्याचप्रमाणें ब्रह्मदेवानें जर हिंदुकुश पर्वताच्या आलीकडील प्रत्येक मनुष्याच्या हृदयांत विषयोपभोगांविषयीं तिटकारा पेरला आहे तर त्यापासून परावृत्त करण्यास एवढा खटाटोप पाहिजे कशाला? हा सर्व खटाटोप पाहूनच जर एखाद्याला तुमच्या विधानाच्या सत्यतेबद्दल शंका आली तर ती निरर्थक आहे असें ह्मणतां येणार नाहीं.

दिगंबर महाराजांकडून ग्रंथकार वदवितातः—" सर्व उपभोग जेवढे साधेसुधे व परिमित असतील तितके ते तेज, बल, आयुष्य, आरोग्य आणि मनाची प्रसन्नता यांस कारण होतात असा या भरतभूमीचा गुण आहे." या वाक्यांत 'साधेसुधे' या शब्दाच्या जोडीला ' परिमित ' हा शब्द मदतनीस पाठविल्यामुळें त्याची अब्रू राहिली आहे. ' अपरिमितपणा ' अर्थात् हिंदुस्थानांतच नाहीं, तर दुसऱ्या कोणत्याही देशांत मनुष्याच्या तेजोबलादिकांचा नाश करीलच करील. परंतु उपभोग जर आहाराबाहेर नसेल आणि उपभोग पचविण्याकरितां व्यायामादि साधनें जर अमलांत आणिलीं जातील तर साध्यासुध्या उपभोगांपेक्षां उंच प्रतीच्या उपभोगांनींच वरील पंचकडीची वृद्धि झालेली आढळेल. दिगंबरमहाराजांनीं स्वतःच्या समर्थनार्थ गरीबांच्या शक्तीची व चलाखीची त्यांच्या आहाराशीं तुलना केली

आहे. पण खरें पाहिलें असतां गरीब मनुष्याच्या अंगीं जी शक्ति असते ती त्याच्या मेहनतीचा परिणाम होय. तितकीच मेहनत त्याजकडून करवून नंतर त्यास दुधाचा, तुपाचा किंवा मांसाचा रतीब लाविला तर तो बळानें पूर्वीपेक्षां कितीतरीपट ज्यास्त वाढेल. गरीब लोकांच्या तोंडावर श्रीमंत लोकांपेक्षां तेज कमी असतें हा तर नेहमींचा अनुभव आहे. या हीन काळांतील राजेरजवाडे सुद्धां त्यांच्या उच्चप्रतीच्या आहारामुळें फारच सुदृढ असतात, चांगले कसलेले पहिलवान कसरतीनंतर स्निग्ध पदार्थांचीं ताटेंचीं ताटें पार करितात, वगैरे गोष्टी पाहिल्या ह्मणजे वरील विधानाचा कमजोरपणा तेव्हांच नजरेस येतो. इतकेंच नाहीं, तर उपभोग त्याज्य आहेत असें एका भागांत विधान करून खुद्द दिगंबर महाराज दुसऱ्या एका भागांत सात्त्विक सदभिरुचीची व्याख्या करीत ह्मणतातः—"सुवासिक पदार्थांचे भिन्न भिन्न सुगंध ओळखण्याची, व त्यांपैकीं जे अतिसूक्ष्म परंतु अधिक मनोहर असतात त्यांचाही उपभोग घेण्याची अंगीं योग्यता आली पाहिजे. याप्रमाणेंच सौंदर्य, गायनवादन, कवित्व वगैरे सर्व गोष्टींमध्यें मार्मिकपणा प्रकट करणें व गुणदोषविवेकानें त्यांचें सेवन करून आनंद पावणें हें सात्त्विकसदभिरुचीचें दर्शक होय. ही सदभिरुचि ब्राह्मणानें प्राप्त करून घेतली पाहिजे." ही प्राप्त करून घ्यावयास ब्राह्मणानें अर्थात् नानातऱ्हेचे विलास प्रथम अनुभविले पाहिजेत; कारण पुष्कळ उपभोग उपभोगिल्याशिवाय त्यांमधील खुब्याखाब्या कळण्याची त्याच्या अंगीं शक्ति यावयाची नाहीं. परंतु त्या विचाऱ्यास दिगंबर महाराज सर्व उपभोग पचूं देतील तर मात्र या सर्व गोष्टी होतील. नाहींतर त्यांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें एका हातानें पंचपक्वान्नाचें ताट पुढें करून दुसऱ्या हातानें लागलीच तें हिसकाविलें तर सर्वच कारभार आपटला!

खरें ह्मटलें तर पारमार्थिक उन्नतीची वृद्धि भौतिक उन्नतीच्या वृद्धीवर अवलंबून असते. प्रथम राष्ट्राची कीर्ति चोहोंकडे दुमदुमावयास लागून त्याचा अंतरात्मा गार झाला ह्मणजे मग उच्च विचार सुचावयास लागतात. जेवण होऊन पोट भरल्यावर मनुष्यास जे विचार सुचतात ते जसे बाकीच्या वेळच्या विचारांपेक्षां अधिक उदार असतात त्याचप्रमाणें एकंदर राष्ट्राच्या आत्म्यासंबंधानेंही स्थिति आहे. तपश्चर्येचा सहावा भाग साऱ्याऐवजीं देण्याचें अभिवचन देऊन ऋषिवर्य जेव्हां अरण्यांत स्वेच्छेनें व आनंदानें नांदूं लागले तेव्हांच त्यांच्या अंतःकरणांत उदात्त मनोवृत्तींचा संचार होऊं लागला. ज्या कवींसंबंधानें ग्रंथकर्त्यांच्या मनांत विलक्षण पूज्यभाव आहे त्यांच्या निर्माणकालासंबंधानें विचार केला तरीही भौतिक व पारमार्थिक उन्नतीच्या साहचर्याबद्दल आपली खात्री होईल. कालिदास भोजराजाच्या पदरीं होता. शेक्स्पिअरसाहेब तर महाभाग्यशाली इलिजाबेथ राणीच्या कालांत होऊन गेले. मोलियरसारखा उत्तम नाटककर्ता चवदाव्या लुईसारख्या महाप्रतापी राजाच्या कारकीर्दींत होऊन गेला. व्हॉल्टेअरला जरी त्याच्या अरसिक राजाचा आश्रय नव्हता तरी फ्रेडरिक-धि-ग्रेट सारखा कर्तृत्ववान् राजा त्याचा चहाता व परम मित्र होता. भौतिक व पारमार्थिक उन्नतींचें समानाधिकरण स्वतः ग्रंथकर्त्यांनेंही आपल्या नेहमींच्या धरसोडीच्या रीतीप्रमाणें जागोजागीं कबूल केलें आहे.

येथपर्यंत दिगंबर महाराजांच्या तत्त्वज्ञानाचें निरीक्षण झालें. आतां ज्यांची "विचारसरणी दुसऱ्या कोणासही येणें नाहीं" त्या भाऊसाहेबांच्या मतांची फोड करून काय निष्पन्न होतें तें पाहूं. या मतांचें दिग्दर्शन वर झालेंच आहे. प्रथम, आत्यंतिकसुखवादामुळें (utilitarianism) युरोपामध्यें धर्म मागें पडत चालला या गोष्टीबद्दल चवदाव्या भागांत विषाद प्रदर्शित करून, पस्तिसाव्या भागांत रूढि व धर्म यांमधील भेद वाढत जाऊन शेवटीं धर्मास रूढीशीं मिळवून घ्यावें लागतें, व रूढीच्या पोटांत सुधारणा असल्यानें तिची चलती होत जाते, अशा विधानांनीं रूढीचें प्रत्यक्षपणें, व सुधारणेचें व्यंजनेनें, धर्मापेक्षां महत्व ग्रंथकर्त्यांनें कां व्यक्त केलें आहे हें आह्मांस समजत नाहीं. त्याचप्रमाणें ज्याअर्थीं लोक कांहींएक कुरकुर न करितां धर्माला सोडून रूढीची कांस पकडतात, व ज्याअर्थीं कालांतरानें धर्म फारच विजातीय झाल्यामुळें त्याचें महत्त्व लोकदृष्ट्या कमी होतें, त्याअर्थीं त्यास रूढीच्या बरोबरीनें खेंचून आणावयास 'तो ईश्वरी अंश आहे' या कल्पनेची आवश्यकता कोठें उरली? तसेंच, जर दर पिढींत ज्ञानाच्या मानानें रूढि कमी अधिक वेगानें पुढें सरसावत जाते, तर या एकदोन पिढ्यांत इंग्रजी भाषेंतील अपरंपार ज्ञान आपणास एकदम लाधल्यामुळें त्या मानानें आपली सुधारणाही फारच झपाट्यानें झाली तर नवल कशाचें? तसेंच, रूढीच्या पोटांत सुधारणा असल्यामुळेंच लोक तिला अनुसरतात या विधानांतच ते जाणून बुजून धर्माचा तितक्यापुरता त्याग करतात असें दर्शवून नंतर त्यांच्या मनोवृत्तींस धक्का देणाऱ्यांस नांव ठेवावयास जागा कोठें राहिली? इत्यादि आणखीही बरेच प्रश्न उद्भवतात. "मुलें खेळविण्याच्या प्रेमकल्यापासूनही एका मोठ्या नीतितत्त्वाचा बोध" विद्याधरास काळप्रसंग न पहातां करून देण्याच्या ऐवजीं भाऊसाहेब जर वरील बिकट प्रश्नांचा उलगडा करण्याच्या खटपटींत पडले असते तर चांगलें झालें असतें. पण आह्मीं ही टीका लिहिण्यापूर्वींच ग्रंथकर्त्यांस व त्याच्या सर्व पात्रांस प्रत्येक विधानामागें संगतवारपणाचे किंवा तर्कशास्त्राचे शंभर खून माफ करण्याचें ठरवून चुकलों असल्यामुळें अशा क्षुल्लक गोष्टींचा विचार सोडून आह्मी मुख्य सिद्धांतांकडे वळतों.

कृतज्ञतादि गुणचतुष्टयाचें जितकें भाऊसाहेब महत्व समजतात तितकें किंवा त्याहूनही अधिक आह्मी समजतों. व ह्मणूनच अनिष्ट रूढि हाणून पाडणाऱ्या सुधारकांचें आह्मी अभिनंदन करितों. ज्या शूद्रांनीं भाऊसाहेबांची आजपर्यंत एकनिष्ठपणें सेवा केली ते जवळ येतांच त्यांची सांवली पडेल या भीतीनें त्यांनीं अंग चोरावयाचें ही कोणत्या जातीची कृतज्ञता? ज्या आज्ञाधारक मुलीनें भाऊसाहेबांची थुंकी वारंवार झेलली तिच्यावर वैधव्यदुःखाचा पर्वत कोसळतांच तें ओझें कमी करण्याकरितां त्यांनीं तिचा केशपाश उतरू पहाणें ही कोणत्या देशांतील दया, प्रेम, किंवा कृतज्ञता? आमच्या दयाळू सरकारानें सती जाण्याची चाल बंद केली नसती तर कदाचित् भाऊसाहेब आपल्या मुलीला न्हाव्याच्या ताब्यांत देण्याऐवजीं तिला आगींत लोटण्याकरितां अस्तन्या सारीत उभे राहिले असते. आणि मग "हिंदुधर्म आणि सुधारणा" या अमोल ग्रंथांत त्यांच्या कृतज्ञतेचे पोवाडे आले असते. वरील पवित्र शब्दचतुष्टयाचा जर याप्रमाणें ग्रंथकाराच्या क-

त्याप्रमाणें पाहिजे त्या अनिष्ट व दुष्ट चालीकडे उपयोग करण्यांत आला तर आमची खात्री आहे कीं, थोडयाच दिवसांत त्याचें महत्व नाहींसें होऊन "कृतज्ञता ह्मणजे कृतघ्नपणावरील पांघरूण," "सत्य ह्मणजे लबाडीवर घालावयाचा सुंदर मुखवटा," "दया ह्मणजे क्रूरतेवर चिकटविण्याचें बेगड" अशा व्याख्या सर्वमान्य होतील. वरील चार शब्द अशा कडक प्रकृतीचे आहेत कीं त्यांस पात्र होऊं पहाणारानें आपल्या अंगीं तशीच योग्यता आणिली पाहिजे. ते शब्द आपण होऊन वाटेल त्या व्यक्तीकडे किंवा रूढीकडे चालत जाणार नाहींत. या बोटावरील थुंकी त्या बोटावर दाखविण्याचा प्रकार या शब्दांसंबंधानें केला असतां त्यांची योग्यता लोक थुंकीपेक्षां अधिक समजणार नाहींत. ज्याप्रमाणें पत्त्यांच्या खेळांत एका डावाला लालबदाम, व दुसऱ्या डावाला चौकट, तर तिसऱ्या डावाला काळाबदाम हुकूम होऊं शकतो, त्याप्रमाणें काल मुलीला मांडीवर खेळविणें ही, आज तिला घरांतल्या नोकरासारखें खपविणें ही, व उद्यां तिला आगींत लोटून देणें ही—कृतज्ञता समजण्यानें नीतिमत्तेचा तोरा मिरविणाऱ्या भाऊसाहेबांच्या माथीं सर्व नीतितत्वांचा धुडगूस उडवून दिल्याचें श्रेय लवकरच येईल.

उच्च मनोवृत्तींचें महत्व व त्या रूढींनीं दृढ करण्याची आवश्यकता जुन्या व नव्या लोकांस सारखीच मान्य आहे. प्रश्न काय तो वर दर्शविल्याप्रमाणें कोणत्या रूढि इष्ट कार्य घडवून आणण्यास समर्थ आहेत हा आहे. व यासंबंधानें दोघांचा मोठा मतभेद आहे. जरी एखादी रूढि विशिष्ट व्यक्तींमध्यें इष्ट मनोवृत्ति उत्पन्न किंवा दृढ करील तरी साधारण जनसमूहावर तिचा काय परिणाम होईल याकडे प्रत्येक देशहितेच्छूनें लक्ष्य पुरविलें पाहिजे. जे कायदे, ज्या रूढि, किंवा जीं धर्मतत्वें आपणास प्रचलित करावयाचीं आहेत तीं सरासरीच्या शरीराच्या, बुद्धीच्या व नीतिमत्तेच्या मनुष्यावर काय परिणाम करितील हें प्रथम पाहिलें पाहिजे. आपला समाज क्षयरोग्यांचाच बनलेला आहे अशी कल्पना केली कीं, कायद्यांतील दंग्याधोप्यासंबंधाच्या कलमांना रजा दिली पाहिजे; षंढांचा आहे असें समजल्यास व्यभिचार, जबरीचा संभोग वगैरे कलमांवर धुरळा सांचूं दिला पाहिजे; व रामदास, तुकाराम, ज्ञानेश्वर, कबीर इत्यादिकांचा आहे असें कल्पिल्यास एकंदर कायद्याचीं पुस्तकें त्यांची नजर चुकवून अग्नये स्वाहा केलीं पाहिजेत. परंतु साधारण मनुष्यप्राण्यांशीं आपणास वागावयाचें आहे हें आपणास उमजलें ह्मणजे त्या सर्व पुस्तकांचा संग्रह अवश्य केला पाहिजे. जो प्रकार कायद्यांचा तोच रूढींचाही आहे. समाजांत सर्वच लोक सात्विक आचरणाचे नाहींत हें ग्रंथकारानें धर्माजीचें उदाहरण दिल्यावर कबूल केलेंच आहे. स्त्रियांच्या संबंधानें भाऊसाहेब ह्मणतात—"कामरूपी मनोवृत्ति किंवा शरीरवृत्ति इतकी प्रबळ आहे कीं, हीं इतकीं बंधनेंही स्त्रीस निर्बंधांत ठेवूं शकणार नाहींत." ज्याअर्थी समाजांतील शेंकडा नव्याण्णव मनुष्यांची नीतिमत्ता बेताबाताचीच आहे त्याअर्थी राहिलेल्या एकाला योग्य अशा रूढि अमलांत आणिल्यानें समाजाचा फायदा होईल का तोटा? समाजांतील सर्व व्यक्तींना समाधान होण्याजोग्या निरनिराळ्या रूढि पाडणें चांगलें, कीं सरसकट सर्व व्यक्तींना एकाच दाव्यांत बांधून त्यांना फरफटत ओढणें चांगलें? बिचाऱ्या अ-

बळांचें मुंडन करून त्यांना तुह्मी वैधव्याच्या तप्त तव्यावर परतूं लागलांत तर त्या कदाचित् मुक्या जनावरांप्रमाणें सर्व मुकाट्यानें सहन करितील. पण समजा, उद्यां सदाशिवभटजी, दत्तदीक्षित, नानाशास्त्री, दिनकराचार्य, भाऊसाहेब, बापूसाहेब वगैरे मंडळींना जर भगव्या वस्त्रांची दीक्षा दिली आणि सांगितलें कीं "समाजांत उच्च मनोवृत्ति असल्याशिवाय तो नीट चालणार नाहीं, आणि जीभ कापून टाकिल्यास सत्याचें रक्षण होतें, ह्मणून आपापल्या जिभा बाहेर काढून ओळीनें उभे रहा; मी आतां इतक्यांत न्हाव्यास बोलावून आणितों," तर ते आपल्या जिभा अर्पण करण्यास तयार होतील कीं असें उद्दामपणाचें भाषण करणाराची जीभ कापावयास तयार होतील ? बायकांसंबंधानें होत असलेल्या अन्यायाचें मंडन करतांना जी जीभ चुरचुर चालते, ती वरील विलक्षण सूचना ऐकून तिला रुकार देईल कीं आश्चर्यानें व भीतीनें बंद पडेल ? प्रत्येक स्त्रीच्या प्रेमौघास पतिप्रेमाव्यतिरिक्त कोठें तरी प्रशस्त मार्ग मिळाला ह्मणजे ती त्यांतच रममाण होते, या वेडगळ विधानाच्या समर्थनार्थ भाऊसाहेबांनीं न्यूटन, चार्ल्स ल्यांब, रामदास या महात्म्यांचीं उदाहरणें दिलीं आहेत. या उदाहरणांवरूनच मूळ विधानाचा लंगडेपणा दिसून येतो. जर या नियमाचें साम्राज्य सर्वत्र दिसून येतें तर त्यास पाठबळ देण्याला न्यूटनला त्याच्या गणितावरील ग्रंथापासून, ल्यांबला त्याच्या बहिणीच्या खाटे जवळून, व रामदासांस त्यांच्या मठामधून उठवून आणण्याचें काय प्रयोजन होतें? अशा कांहीं अपवादरूप मनुष्यांखेरीज इतर ठिकाणीं हा नियम आढळून येत नाहीं ह्मणूनच त्यांच्या समाधीचा भंग करणें भाग पडलें, असें अनुमान खुद्द भाऊसाहेबांनींच बिनचूक ह्मणून स्वीकारलेल्या मार्गांतून निघतें.

नीतितत्त्वें हीं आकाशांतील ध्रुवाप्रमाणें मार्गदर्शक असावीं. संसारयात्रेंत चुकलेल्या वाटसरास त्यांमुळें खरा मार्ग सांपडावा, पण त्यानें चुकून भटकूं नये ह्मणून त्यास सांखळदंडानें बांधून त्यांनीं खेंचीत मात्र नेऊं नये. ज्या प्रमाणें मनुष्याला अन्न, जल, निद्रा इत्यादिकांची आवश्यकता वाटते त्याप्रमाणेंच शेंकडा नव्याण्णव किंवा त्याहूनही अधिक मनुष्यांस वैवाहिक सुखाची आवश्यकता वाटते. दैवदुर्विपाकानें एक पति किंवा पत्नी गत झाल्यावर त्यांस पुनः संसारसुख अनुभविण्याचे मार्ग मोकळे ठेवणें हें प्रत्येक दूरदर्शी धर्मचालकाचें कर्तव्य आहे. कदाचित् एखादी परोपकारी स्त्री पतिसुखापेक्षां आप्तकृत्यें करण्याचें पत्करील, एखादा न्यूटन गणित शास्त्रास आपलें जीवित वहावयास कबूल होईल, किंवा एखादा रामदास धर्मसंरक्षणार्थ आमरण ब्रह्मचारी राहूं पाहील तर त्यास मोकळीक असावी. परंतु एकंदर जनसमूहाच्या हिताकडे दृष्टि देऊन फार कडक नाहींत किंवा फार सौम्य नाहींत अशाच रूढींचा प्रचार पाडणें इष्ट आहे. "विचाराच्या नंदनवनांतून प्रत्यक्ष कर्तव्यांच्या मृत्युलोकीं उतरणें फार विषाद आणणारें आहे खरें, परंतु उपाय काय ? ज्या मार्गानें आपणांस चालायाचें त्यांतील खांचखळगे, कांटेकुटे पाहून पाऊल टाकावयास नको काय ?" (पृष्ठ२९४) आतां सर्व स्त्रियांस रामदास स्वामींच्या तोडीला न बसविल्यानें त्यांची आह्मी बेअब्रू केली आहे असें भाऊसाहेब त्यांच्या कानांत घुसविण्याचा प्रयत्न करितील खरा. पण सत्यापुढें

त्यांच्या डुरकावणीचें आह्मी विशेष महत्त्व समजत नाहीं.

कोणत्याही चालींत पाहूं गेलें तरी थोडासा दुःखाचा अंश असतोच, व एखादें मोठें दुःख संवयीनें अंगवळणीं पडून जातें, अशाही तऱ्हेचे भाऊसाहेबांनीं उद्गार काढिले आहेत. पण या तत्त्वांवर पुनर्विवाहप्रतिबंध, केशवपन वगैरेंचें जर सहज समर्थन करितां येईल तर गुलामगिरीसारख्या नीच संस्थाही निष्कलंक होऊं पहातील; व अशानें आपल्या शहाण्या राज्यकर्त्यांस आपणावर जुलमी राज्य चालवून त्याचें मंडन करण्याचीं साधनें आपोआप दाखविल्यासारखें होईल. ह्मणून या पिळपिळीत युक्तिवादाचा विचार न करितां पुढें काय काय चमत्कार दृष्टीस पडतात हें पाहूं. भाऊसाहेबांच्या सत्यापलापाचा वाचकांस कंटाळा आला असेल; आणि "त्यांची विचारसरणी दुसऱ्या कोणास येणें नाहीं" ह्मणून त्यांना समाधान वाटत असेल. पण इतकें जरी त्यांना वाटलें तरी त्यांनीं भाऊसाहेबांना दोष देण्याचें कांहींच कारण नाहीं. कारण या पटाईत खोट्या गृहस्थानें आपल्या तत्त्वांची मीमांसा करितांनाच आपणास सोडवून ठेविलें आहे. सत्याची व्याख्या करितांना ते ह्मणतात:—"सत्य शब्दाचे जे दुसरे अर्थ आहेत त्यांचा धर्माशीं किंवा नीतीशीं इतका निकट संबंध नाहीं. सृष्टज्ञानासंबंधानें जें यथावत् विधान तें एक सत्य होय. आपल्या देखत घडलेल्या गोष्टींचें आपल्या समजुतीप्रमाणें यथावत् कथन, हें दुसरें सत्य होय." भाऊसाहेबांनीं ज्याअर्थीं या दोन्ही अर्थांपासून स्वतःची फारकत कायदेशीर रीतीनें करून घेतली आहे त्याअर्थीं त्यांना कोणत्याही वेळेस सृष्टज्ञानासंबंधानें किंवा त्यांच्या देखत घडलेल्या गोष्टींविषयीं मिथ्या विधान करण्यास हरकत नाहीं हें उघड आहे.

सारांश, अति उच्च प्रतीचा कित्ता समोर न मांडतां वस्तुस्थिति समोर ठेवून जर आपल्या चाली आपण सुधारत गेलों तर समाजाचें निःसंशय कल्याण होईल. समाजांतील व्यक्तींच्या मनाला त्यायोगें धक्का तर बसणार नाहींच. पण उलट अन्यायाच्या चाली नाहींशा झाल्यानें खऱ्या न्यायदृष्टीची कल्पना सर्वत्र जागृत राहील. समाजाला धक्का बसेल तरी कसा? कारण धर्म व रूढि यांमध्यें आजपर्यंत दर पिढीस थोडी थोडी फारकत होत गेली असल्यामुळें लोक हळू हळू धर्माबद्दल उदासीन होत चाललेच आहेत. आणि जर नुसती सुधारणा पोटांत असल्यामुळेंच लोक धर्माला झुगारून रूढीला जाऊन मिळतात तर एखादी रूढि त्यांच्या स्वभावास अनुसरून असल्यावर ती ते फारच आनंदानें स्वीकारतील हें उघड आहे. याचें उत्तम उदाहरण ह्मटलें ह्मणजे पुनर्विवाहाची सरशी. पुनर्विवाहांचे मोठे आंकडे सुधारकांस दाखवितां येणार नाहींत असें भाऊसाहेबांनीं मोठ्या दिमाखानें ह्मटलें आहे. पण एक तर प्रथम वधूंच्या मानानें पुनर्विवाह अर्थात् कमी व्हावयाचे; आणि दुसरें असें कीं, आजपर्यंत या देशांत या दिशेनें अनेक वेळां विचार होऊनही त्यांस मुळींच यश आलें नाहीं; अशा दोन गोष्टी मनांत आणिल्या असतां या पंचवीस तीस वर्षांत झाली ती सुधारणा खरोखर विलक्षण ह्मटली पाहिजे. हा प्रकार घडवून आणण्यांत इंग्रजी ज्ञानाच्या प्रसाराचा बराच वांटा आहे यांत संशय नाहीं. दुसरें उदाहरण सती जाण्याच्या चालीची बंदी, व तिसरें पाहिजे असल्यास बालिकासंभोगाची बंदी. या दोन चाली बंद केल्यामुळें लोकांच्या

मेंदूस विशेष धक्का बसला आहे असें दिसत नाहीं.

सुधारणा करावी, पण ती लोकांस रुचेल अशी सावकाश करावी, असें पुष्कळ धर्माभिमान्यांचें ह्मणणें असतें. पण कोणती सुधारणा सावकाश व कोणती मंद चालली आहे या संबंधानें धर्माभिमान्यांत सुद्धां विलक्षण मतभेद आढळून येतो. एखादा धर्माभिमानी स्वतःच्या मतानें मंद असलेली सुधारणा हातीं घेऊन पुढें येऊंद्या, ह्मणजे त्याच्याच धर्माभिमानी बंधूंकडून त्याचा जो छळ होईल त्यावरून त्याला या ह्मणण्याची सत्यता कळून येईल. चव्हाट्यावर बसून लोकांच्या सत्कृत्यावर कुत्सितपणें टीका केल्यानें या गोष्टीचा कधींही अनुभव येणार नाहीं. आज आपणास जीं मतें सर्वमान्य वाटत आहेत, तींच प्रथम जेव्हां त्यांच्या जनकांनीं लोकांसमोर मांडिली तेव्हां त्यांचा असाच छळ झाला. हिंदुस्थानांतील तीस कोटी लोक जेव्हां रांगेनें उभे राहून पुढें बरोबर उडी मारावयास तयार होतील तेव्हांच ती सुधारणा योग्य असें आह्मी समजूं.—असें ह्मणणारा स्वतःची बालिशता आणि सुधारणेच्या इतिहासाचें अज्ञान या दोहोंचें एकदम प्रदर्शन करितो.

प्रिन्सिपाल गोळ्यांनीं प्रस्तावनेंत "आंतून सुधारणेचा प्रयत्न करणारे" व "बाहेरून सुधारणा आरंभिणारे" असे दोन भेद कल्पून पहिल्या प्रकारच्या सुधारकांचे प्रयत्न पसंत केले आहेत. पण या दोन भेदांस वस्तुस्थितीमध्यें जागाच नाहीं हें थोड्या विचारानें दिसून येईल. प्रत्येक सुधारणा समाजाच्या आंतल्या स्थितीची भोंवतालच्या गोष्टींशीं तुलना केल्यानें उत्पन्न होते. या दृष्टीनें सर्वच सुधारक ( प्रिन्सिपाल साहेब सुद्धां ) "बाहेरून सुधारणा आरंभिणाऱ्यांच्या" वर्गांतच येतील. हा सुधारणेच्या स्फूर्तीसंबंधाचा विचार झाला. नवीन सुधारणेस जें रूप द्यावयाचें त्यासंबंधानें विचार केला तर सुधारक हे आपल्या सुधारणा खिस्त्यांच्या धर्मपुस्तकांतील वाक्यांवर न उभारतां वेद स्मृति इत्यादिकांवरच उभारीत आहेत हें तेव्हांच दिसून येईल. प्रार्थनासमाजाच्या मंदिराच्या आंतील प्रत्येक बाजूस आपणास वेदांतील उदात्त वाक्यें ठळक अक्षरांनीं लिहिलेलीं दिसतील; पेन्टेकास्ट साहेबांनीं जेव्हां पुण्यास खिस्तीधर्माच्या थोरवीनें पूर्ण आणि हिंदुधर्माचें लघुत्व सुचविणारें जोरदार व्याख्यान दिलें तेव्हां त्या व्याख्यानाची बरगडीन् बरगडी खिळखिळी करण्याला एक सुधारक वीरच पुढें सरसावला होता; आणि एल्फिन्स्टन कॉलेजच्या म्यूलर साहेबांनीं जेव्हां "राष्ट्राराष्ट्रांमधील धर्मशास्त्र" या विषयावर दक्षण विद्यालयांत व्याख्यान देऊन आपल्या सनातन धर्मावर भडिमार केला तेव्हां तो भडिमार व्याख्यात्यावर उलटवून आपल्या धर्माची अब्रू वांचविण्याचें काम दोन सुधारक गोलंदाजांनींच केलें; या व अशाच दुसऱ्या गोष्टींवरून धर्माभिमानी ह्मणविणाऱ्या लोकांस परधर्मविषयक औदासीन्यांत किंवा स्वधर्मविषयक प्रेमांत सुधारक रतिभर हार जाणार नाहींत हें उघड होईल.

सुधारकांमध्यें शंकराचार्य, रामदास वगैरे महात्म्यांसारखी धर्मश्रद्धा जागृत नसल्यामुळें त्यांनीं धर्मोन्नतीचें काम हातीं घेऊं नये असें या ग्रंथांत ह्मटलें आहे. जरी सुधारक धर्माभिमान्यांपेक्षां धर्मप्रेमांत रतिभर देखील कमी नाहींत तरी त्यांत वरील महात्म्यांच्या तोडीचे लोक निपजले नाहींत ही गोष्ट खरी आहे. पण सुधारकांनीं धर्माची सुधारणा आरंभिलेली नाहीं, तर रूढीची सुधारणा हातीं धरिली आहे, ही

गोष्ट ग्रंथकर्त्यानें विसरून जाऊं नये. रूढीशीं धर्माची तोंडमिळवणी करण्याचें दुर्घट कृत्य त्यांनीं ईश्वरी अंश असलेल्या एखाद्या भावी शंकराचार्यावर सोंपविलें आहे.

असो. आतां हीं महातत्वें ग्रंथकर्त्यानें रूढ चालीस कशीं लाविलीं आहेत याचा विचार करूं.

---

## दुर्दैवविलास अथवा पानिपतच्या युद्धाचें आर्याबद्ध वर्णन.

[ लि. आ. वि. ]

पानिपतचा रणसंग्राम ह्मणजे भारतीय युद्धाच्या तोडीचाच रणसंग्राम, असें ह्मणण्याचा प्रघात आहे. **काव्येतिहास**कारांनीं या प्रसंगाच्या दोन तीन बखरी छापून काढल्या, व **विविधज्ञानविस्तारां**तून काशीराज पंडिताच्या बखरीचें भाषांतर बाहेर पडलें; एवढी सामुग्री आमच्या मतें कादंबरीकारांस, नाटककारांस, व कवींस आपले प्रयत्न सुरू करावयास बस्स होती, व त्याप्रमाणें त्या सर्वांनीं अंशतः तरी आपले प्रयत्न सुरू करून तडीस नेल्याचें सध्या पानिपतच्या संबंधानें जे ग्रंथ बाहेर पडले आहेत त्यांवरून दिसतें. या विषयावर सध्यां जे ग्रंथ बाहेर पडले आहेत ते हेः—

कादंबऱ्या.
- (१) **पानिपतची मोहीम**—नागेश विनायक बापटकृत.
- (२) **लालन बैरागीण** अथवा **पानिपतचा घनघोर युद्धप्रसंग.** — सडेकर यांनीं छापलेलें.
- (३) **पानिपतचा मोहरा**—धनुर्धारीकृत.
- (४) '**पानिपतचा मुकाबला**'—शिरवलकर-कृत.

नाटकें.
- (५) '**पानिपतचा दुर्दैवी मोहरा**' अथवा **पानिपतचें तुमुल रणकंदन.** — नाट्यकथार्णवांतून प्रसिद्ध झालेलें किरात-कृत.

काव्य.
- (६) **दुर्दैवविलास** — बापूजी लक्ष्मण कुळकर्णी-कृत.

काशीराज पंडिताच्या बखरीचें भाषांतर बाहेर पडल्यास आज जवळ जवळ २७ वर्षें, व काव्येतिहाससंग्रहांतील बखरी बाहेर पडल्यास आज जवळ जवळ १२|१४ वर्षें झालीं. वरील ग्रंथ निर्माण होण्यास हा इतका काळ लागला, हें कितपत समाधानकारक आहे हें महाराष्ट्र सारस्वताच्या पुरस्कर्त्यांनीं व अभिमान्यानींच ठरवावें हेंच प्रशस्त; ह्मणून त्यासंबंधानें येथें कांहीं एक उल्लेख न करितां आज आमच्यापुढें आलेल्या प्रकृत प्रसंगावरील काव्यावरच आह्मी चार शब्द लिहिणार आहों.

भारतीय युद्धाच्या तोडीचा प्रसंग, आणि त्यावर रचिलेलें हें काव्य, अशा दृष्टीनें ह्या ग्रंथाकडे पाहतां हें काव्य अगदींच लहान झालें आहे. प्रस्तुत काव्य यापेक्षां दसपट मोठें होतें तरच त्यांतील भिन्न भिन्न प्रसंगांचे चित्रपट मनोहर व रमणीय झाले असते. एरव्हीं ते अर्धवट व अपूर्णच वाटतात, व त्यामुळें अर्थातच रसपरिपाक ज्या प्रकारें व्हावयास पाहिजे होता त्या प्रकारें झाला नाहीं, असेंच हें काव्य वाचीत असतां वाटतें. अंतःकरणास द्रववून टाकणारा एखादा प्रसंग वाचायास लागावें तों कवीनीं एखाद्या आर्येंतच त्या प्रसंगाचा शेवट करून एकदम दुसऱ्या चित्रपटाकडे लक्ष्य

ओढून न्यावें—असा प्रकार झाल्यामुळें जागजागीं मन विरस होतें. काव्य मोठें होतें तर कदाचित् त्यास प्रकाशन मिळणें अशक्य झालें असतें अशा भीतीनेंच कीं काय कवींनीं आपल्या काव्यास अग्निरथाचा वेग दिला आहे असें वाटतें. कसेंही असलें तरी अलीकडे कविताविषयक जीं लहान लहान रकटीं आणि पुस्तकें बाहेर पडतात त्यांपेक्षां हें सहस्रपटीनें बरें आहे. प्रथमतः विषयाची निवड उत्तम, त्यांत कवींची भाषा शुद्ध व साधी, व अलंकारांची योजनाही क्लिष्ट नाहीं; या तीन गोष्टी मिळाल्यामुळें एकंदरींत काव्य चांगलें झालें आहे असें ह्मणावें लागतें. कवींनीं हें काव्य सबंध आर्यावृत्तांतच लिहिलें आहे. त्यामुळें वाचतांना केव्हां केव्हां कंटाळवाणें वाटतें. तेंच कवींनीं यांत जर वृत्तवैचित्र्य ठेविलें असतें तर हें कोठेंही कंटाळवाणें न वाटतां उलट तें ज्यास्त रसभरीतच वाटलें असतें. भिन्न भिन्न प्रसंगांना अनुरूप अशी जर यांत वृत्तयोजना असती तर फार बहार उडती. यमक व अनुप्रास हीं साधण्याची कवींची हातोटी वर्णनीय आहे. आतां क्वचित् प्रसंगीं त्यामुळें कोठें अर्थहानि व कोठें ग्राम्यता हीं शिरलीं आहेत, पण अशीं स्थलें एकंदर काव्याच्या मानानें पाहूं जातां फारच थोडीं आहेत. कवींची कवितावधू ठुमकत मुरडत चालून व क्वचित् आपल्या नूपुरांच्या झणत्कारांनीं वाचकांच्या मनास सहज वेधून टाकते. याच कवितावधूचें हें ठुमकणें मुरडणें पाहून एखाद्या सुंदर वनांतून वळणें घेत घेत जाणाऱ्या स्फटिकमय रमणीय निर्झराची स्मृति होऊन तेथील वनश्रीचें सहजमनोहर रमणीयत्व डोळ्यांपुढें उभें राहतें.

प्रकृत काव्याचे ग्रंथकारांनीं नऊ भाग करून त्याचा **नवरत्नखचित हार** गुंफून, तो **करवीराधिप शाहूमहाराजां**च्या कंठीं अर्पण केला आहे.

पहिल्या भागांत रघुनाथराव दादांच्या पंजाबांतील स्वारीचें वर्णन आहे. याच स्वारींत दादासाहेब ८० क्रोड रुपयांचें कर्ज करून पुण्याकडे परतले. पुढें दादांचा व भाऊंचा जो खटका उडाला व ज्यामुळें भाऊसाहेब दुराणीवर चालून जाण्यास सिद्ध झाले त्या प्रसंगाचा उठाव दुसऱ्या भागांत केला आहे तो होण्यास हा प्रस्ताव बरा आहे. या भागांतील दुसऱ्या कवितेंत "बल्लाळ" याच्याशीं यमक जुळवीत असतां "घोटुनी लाळ" अशी शब्दयोजना करावी लागली आहे, ती ग्राम्य वाटते. त्याचप्रमाणें जांभळाच्या झाडाला "जंबूल" ह्मणून शब्द योजिला आहे. "जंबू"चें जंबूल कां करावें? केवळ मात्रा जुळण्याकरितां कवीस 'ल' पैदा करावा लागत आहे! अशानें भाषेंत अशुद्धें मात्र घुसडतात. तर असे अशुद्ध प्रयोग टाळावेत हेंच प्रशस्त होय.

दुसऱ्या भागांत काय विषय आहे त्याचा उल्लेख वरच केला आहे. भाऊंच्या व दादांच्या उडालेल्या खटक्याचें चित्र यांत चांगलें प्रतिबिंबित झालें आहे. **'भाऊसाहेबांच्या बखरी'**ला धरूनच बहुतेक कवि गेले आहेत. भाऊ जाण्याचा हेका धरून नानासाहेबांची परवानगी विचारीत असतां आपल्या **उदगीरच्या** विजयासंबंधानें असा उल्लेख करितात:—"चित्तीं मत्पूर्वयशाचि आणावें." हें सारें ठीक आहे. पण ही उदगीरची मोहीम 'पूर्व—यश' होण्याइतकी जुनी पुराणी झाली नव्हती. ती मोहीम आटपते न आटपते व भाऊंच्या ढाला पुण्याकडे परत

फिरतात न फिरतात तोंच दत्ताजी शिंद्याच्या वधाची बातमी येऊन पोंचली होती; व त्यामुळेंच पानिपतकडील मोहीम तावडतोब ठरली. असा प्रकार असतां कवींनीं भाऊंकडून उदगीरच्या विजयास "पूर्व-यश" ह्मणविणें अयुक्त दिसतें.

( आर्या ४८ वी ) भाऊसाहेबांचा हेकेखोर, दुराग्रही व मानी स्वभाव होता असें कवींस ह्मणावयाचें असतां "**आधीं**" या शब्दाशीं यमक जुळविण्याकरितां भाऊंचा स्वभाव किती तरी "**नादी**" करावा लागत आहे. भाऊसाहेब **नादी** नव्हते, याची इतिहास पूर्ण साक्ष देत आहे. त्याचप्रमाणें या **यमक**-कुंडांत आणखी एक आहुति पडत आहे ती पहा:— ( आर्या १२ वी ) वरच्या ओळींत "वक्र" शब्द आला आहे. त्याच्याशीं यमक साधण्याकरितां कवि "बंधुप्रेमाऽमृतीं" "कलह-तक्र" मिसळण्यास सिद्ध झाले आहेत! **अमृतांत विषच** कालविलें पाहिजे. तक्र कालविल्यानें तें फिकट पांढरें मात्र व्हावयाचें. जहर विष कालविल्याशिवाय त्याला काळा रंग चढायाचा नाहीं. अस्तु. या भागांतील दोषांसंबंधानें एवढेंच बस्स आहे. या भागांत कवींनीं एकदोन ठिकाणीं प्रसंगानुसार जे सार्वत्रिक अथवा सामान्य सिद्धांत गुंफिले आहेत ते मासल्याकरितां ह्मणून देतों.

रघुनाथरावदादा भाऊंस ह्मणत आहेत:—

करितीप्रवास सकटक संतत जे तेच सर्व अनुभवती.
वंध्या कधीं न जाणे भोगी जें प्रसवदुःख गर्भवती.१०
कलहास पात्र शत्रुचि, बंधु सदा प्रेमपात्र हो असती.
बंधुद्वेषे न सुखी, दुःख करी नित्य तन्मनीं वसती.१२

असें सांगून कवि कौरवपांडवांची व रावणबिभीषणाची स्मृति देऊन पुढें ह्मणतात:—

ज्ञात्या आप्त्यांनीं मनिं नित्य असावें धरून एकोपा;
कोपास एक आला तरि दुसऱ्यानें करूं नये कोपा.१६
चिंती मन एक परी प्राक्तन अन्यत्र चिंतितें हो तें.२६
राज्याऽशा मात्र बरी, युद्धाऽशा हीन वाटते कां ते ?
राज्याऽवन–वर्धन या दोन्हींसहि युद्ध लागतें. .७५

या भागांत दत्ताजी शिंद्यांच्या वधाचा प्रसंग जो वर्णिला आहे तो फारच त्रोटक आहे. हा कवींनीं बहुतेक चटावरच उरकून घेतला असल्याचें दिसतें. नाहींतर हा प्रसंग किती बहारीचा झाला असता!

तिसऱ्या भागांत होळकर नको नको ह्मणत असतां भाऊंचें जाणें, व त्या योगें मल्हाररावांस करावे लागणारे शब्दप्रहार, भाऊंचा व जाटाचा उडालेला खटका, व कुंजपूरची फत्ते, इतके प्रसंग गोंविले आहेत. हा एवढा भाग १७७ आर्यांत आटपल्यामुळें अर्थातच तो त्रोटक झाला आहे; व या त्रोटकपणामुळेंच जसा रसपरिपाक उतरावयास पाहिजे तसा उतरलेला नाहीं.

(आर्या दुसरी. ) **सातपुडा** आणि **विंध्याचल** एकच असें कवि ह्या कवितेंत स्पष्ट ह्मणतात. पण टीपेंत "विंध्याद्रि पर्वताच्या दक्षिणेस **सातपुडा**" असल्याचें कवि सांगत आहेत! या दोन्हींचा मेळ कसा घालावयाचा? २२ व्या आर्येंत विडंबन, उपहास, तिरस्कार अशा अर्थीं केलेली "**विनोद**" शब्दाची योजना प्रशस्त नव्हे. '**खचली मनांतचि उभारी**' उभारी शब्द गोंधळून टाकणारा आहे. '**तुह्मी**' शब्दाच्या कवि कोठें ३, कोठें ४, लागतील तशा मात्रा धरितात; मेळ ह्मणून नाहीं.

या भागांत कवींच्या कवित्वाची साक्ष देणारी आह्मांस एक गमतीदार कल्पना आढळली ती ही:–धरणीवरून जे आकाशांत धुळीचे प्रचंड

लोट गेले, ते गगनाला वर उचलून धरणारे स्तंभच आहेत कीं काय, अथवा ही धरणी "म्लेंच्छांपासून मला मुक्त करा" ह्मणून ह्या हेरांकडून—हे धुळीचे लोट हेच कोणी गुप्त हेर—परमेश्वरास सांगून पाठवीत आहे. ही कल्पना किती तरी गोड आहे!

या भागांत येणाऱ्या सामान्य सिद्धांतांचे एक दोन मासले पहा:—

..............समय विलोकून वर्तती ज्ञाते.
वेदांतविषय-मन्ना, अथवा बधिरास गान परिसविता
व्यर्थचि,कीं अंधातें जगत्प्रकाशक असेचजरि सविता.
अनुचितकर्मापासुनि होय हितांहून फारसा तोटा.६१
कोप प्रधान जेथें तेथें तो सद्विवेक लोपतसे. ९६
जित तें मृततुल्यचि तद्वधीं न पुरुषार्थ,सुज्ञ हें वदले.९९
...दुर्भाग्याला कळेल केंवि हित? १०७

(आर्या ४९ वी.) वरच्या ओळींत चरणाचे शेवटीं 'रोजमुरे' असा शब्द आला आहे. त्याचें दुसऱ्या चरणांत यमक जुळवीत असतां एक गमतीदार कल्पना कवीच्या लेखणींतून सहज उतरली आहे ती ही:—

भिंतींत जेंवि पाणी चिंता तशि ही तनूंत रोज मुरे.

भाऊसाहेबांची चिंतेनें कशी दशा होत होती हें वरील चरणांत फार बहारीनें ध्वनित केलें आहे. भिंतींत पाणी जिरून जिरून अखेरीस ती कशी ढांसळते हें ज्यांनीं पाहिलें असेल त्यांना ह्या कल्पनेचें सहजरमणीयत्व सहज दिसून येईल. असो.

४ थ्या भागांत—दुराणी विजयी होऊन बुंदेले युद्धांत पडतात, तेव्हां सर्व खवळून जातात; व मेहेंदळे शिंदे-होळकरांस टोंचून बोलतात, तेव्हां शिंदे प्रतिज्ञा करून शत्रूवर जाऊन जय मिळवून येतात; व मेहेंदळे मदत न करितां अलग राहिल्याबद्दल त्यांस शिंदे टोमणा देतात.

५ व्या भागांत—दुराणी बुंदेल्याचें शीर भाऊसाहेबांस नजर पाठवितो. त्या योगें ते अर्थांतच फार खवळून जातात. मेहेंदळे अलग राहिले ह्मणून असा प्रकार ओढवला, ह्मणून सर्व जण त्यांस दूषण देतात. तें ऐकतांच इरेला पडून मेहेंदळे शत्रूवर चालून जातात. पण दुर्दैवानें ते गारद होतात. त्यांची स्त्री सती जाते. त्यानंतर फार दुष्काळ पडतो. ह्मणून भाऊ दरबार भरवून शत्रूवर चालून जाण्याचा निश्चय करितात. येथपर्यंतचा कथाभाग अगदीं बखरीच्या क्रमानेंच कवींनीं वर्णिला आहे.

या भागांतील कांहीं सार्वत्रिक सिद्धांतांचीं स्थळें दाखवितों:—

शूरानें जिंकावें, जावें शत्रूस दुर्बलें शरण. ३३
.........कोणीही संकटीं सखा नाहीं ६६.
गर्वाचें घर खालीं वेळ न लागे जिरावयास मद.१००
जीवावर जे झाले उदार, त्यां कोण हो इतर वारी? १०३
परि तो जय त्यासचि हो लाभतसे,
स्वामिभक्त पूर्ण जया. ११४

५ व्या भागांतील मेहेंदळ्यांच्या कुटुंबाचे उद्गार चांगले आहेत. ती आपल्या पतीस ह्मणते:—

शतवर्षांत कधींतरि येणारच मृत्यु, तो रणीं आला;
तरि सर्वोत्तमचि पहा देहाला मरण तें न जीवाला.२८
मरण रणीं येण्याला लागतसे पूर्वजन्मकृत सुकृत;

दुसरी एक गोड आर्या पहा:—

ढालांवरती ढाला, खड्गावरि खड्ग आदळोनि दळीं
शब्द खणाखण होई; रणवाद्यें घोर गर्जती सगळीं.४०

याशिवाय या दोन्ही भागांत कांहीं विशेषसें नाहीं.

भाग ६ यांत पानिपतचें युद्ध, भाऊसाहेबांचे एकाएकीं विचार बदलणें, व विश्वासरावांचा मृत्यु, इतक्या गोष्टी आहेत.

( आर्या ४२ ) '**शेतकरी**' याच्याशीं यमक साधण्याकरितां वरच्या ओळींत "घालूनियां अरींत **हरी**" असें आहे. हरी शब्दाचा अर्थ काय? कवींनीं इतर शब्दांवर टीपा दिल्या आहेत पण या शब्दावर दिली नाहीं. त्याच प्रमाणें ६८ वी व ६९ वी आर्या पहा. यांत थोडा विरोध दिसतो. विश्वासराव 'घोड्यावरून जमिनीवर पडले' व मग त्यांचें कलेवर हत्तीवरील हौद्यांत घातल्याचें कवि सांगत आहेत. हा प्रकार काय ? ८२ व्या आर्येंत '**जाच**' शब्दाचा उपयोगही असाच अर्थहानि करणारा आहे. ३९—३७ आर्यांत कांहीं काव्यांश आहे. बाकी सर्व वर्णन सरळ बखरीप्रमाणेंच आहे. त्यांत कविकौशल्य कांहीं विशेषसें दिसत नाहीं. सार्वत्रिक सिद्धांताचीं एकदोन स्थलें आढळलीं तीं देऊन पुढच्या भागाकडे वळूं :—

**मनुजातें होते हो! विनाशकाळींच बुद्धि विपरीत.१४**
**आपण जें वचन दिलें, तें न्यायें सिद्धिला झटून रणीं;**
**वरि निजपूर्वज हंसतील, ऐशी आपण करूं नये करणी. १७**

भाग ७वा. 'हल्लीं, विल्ली' यांसारख्या साधलेल्या अनुप्रासांची जागजागीं पुनरुक्ति होणें काव्यास निरसपणा आणते. त्याच प्रमाणें एकदां मागें येऊन गेलेल्या कल्पना पुनः तशाच अलंकारांनीं सजवून पुढें मांडणेंही त्याज्यच होय. ३५ व्या आर्येत **सुधीरपा** शब्द आला आहे. याचा अर्थ—सुधीर ह्मणजे धैर्यवंत पुरुष आहेत त्यांचें पालन करणारा असा होतो. तेव्हां अर्थातच या शब्दाची योजना प्रस्तुत प्रसंगीं गैरशिस्त आहे.

भाऊंच्या व इभ्राहिमखानाच्या अंतकालासंबंधानें काशीराजाचे बखरींत जो उल्लेख केला आहे तो आमच्या कवींच्या वाचनांत आला नाहींसा दिसतो. तो येता तर त्यांस ह्या प्रसंगाचें वर्णन किंचित् जास्त ह्रदयद्रावक करितां आलें असतें. इभ्राहिमखानाच्या अंगावरील जखमांवर जहर विषाचा प्रयोग करून इभ्राहिमखानाचा शत्रूंनीं खून केला आहे. परंतु कवि दुराणीकडून खानाचा नुसता शिरच्छेदच करवीत आहेत. खानाचे स्वामिभक्तीचा भाग बरा साधला आहे. तरी पण त्यांत कवींचें उड्डाण अथवा भरारी दिसत नाहीं. या भागांतील सार्वत्रिक सिद्धांत पहाः—

**दैवापुढें न चालें यत्न...............**
**जोंवरि पुष्प फलान्वित तरुवर तोंवरच्चि सेविती पक्षी.**
**होतांच रुक्ष त्या निजपोषक वृक्षा न एकही लक्षी. ३०**
**कोण सुधीरावांचुनि साहिल शत्रुप्रताप सापकर. ३३**
**जीवावरी गुदरतां अनुसरती ते अधीर पापाला. ३९**
**अविचारी असतिल ते दूषण देतील वर्णितील भले.६५**
**प्रतिकूल काल येतां जाती सोडून ज्या परी मित्र,६६,**
**विपरीत काळ येतां कोणीही येत नाहिं कामास. ८२**

भाग ८ वा. या भागांत पानिपतच्या मोडानंतरचें वृत्त आहे. नानासाहेब पेशवे, गोपिकाबाई, रघुनाथराव दादा यांचा शोक, व नानासाहेबांचा त्यांतच मृत्यु होत आहे, तो प्रसंग यांत आला आहे. भाग अर्थातच करुणरसप्रधान आहे. हा भाग बराच वाचनीय झाला आहे. ४१ व्या आर्येंत **चोळी** शब्द आला

आहे त्याला कवि टीप देत नाहींत. ती नदी आहे, का पर्वत आहे, का **महेश्वराचे** जवळ एखादें खेडें आहे, कांहीं कळत नाहीं. खालील कल्पना किती गोड आहे पहाः—

जैशीं नदींत कमळें, तैशीं रुधिर-प्रवाहिं शिर-कमळें,
त्यावरती भ्रमर तसे यांवरती गृध्र तेथवां रमले. १

खालील सार्वत्रिक वचनें पहा:—

असतो सज्जन, ते परकृताऽपराध न मनीं कदा धरिती;
तत्संकटकालीं ते उपकारचि यापरी सदा करिती. ११
केला शोक कितीही, तरि गेले ते न येति माघारे.
आला जो जन्माला मृत्यु तयाला चुके न नालोकीं.१२

नानासाहिबांच्या स्थितीचें चित्र कवींनीं चांगलें रेखाटलें आहे. तें मूळ काव्यांतून वाचण्याची आह्मी आमच्या वाचकवर्गास शिफारस करितों. एकंदरींत हा भाग बरा साधला आहे.

**भाग ९ वा.** यांत कवीनें भाऊसाहेबांचे कडून या प्रसंगीं वेळोवेळीं ज्या चुका झाल्या त्या कथन केल्या आहेत, व शेवटीं काव्येतिहासकारांचे आभार मानून, आपल्या नांवाचा निर्देश करून काव्य समाप्त केलें आहे. या भागांत १९ पद्यें आहेत. पण यांत कवींनीं निरनिराळ्या वृत्तांची योजना केली आहे, हा एक यांत विशेष आहे. मागील एका भागांत **गीति** वृत्ताचा कवींनीं उपयोग केला आहे. ग्रंथाचे शेवटीं कवींनीं ग्रंथसमाप्तीचा शक दिला आहे तो १८१२ आहे. त्यावरून हें काव्य रचलें गेल्यानंतर ८ वर्षांनीं त्यास प्रकाशन मिळण्याचा योग जमून येत आहे; मला वाटतें कितीएक ग्रंथकारांचे ग्रंथ तयार होऊनही ते असेच कित्येक वर्षे कसरीच्या भक्ष्यस्थानीं पडण्याची पाळी येत असेल! पण **महाराष्ट्र भाषेला** जोंपर्यंत कोणी चांगला शाश्वतचा



वाली निर्माण झाला नाहीं तोंपर्यंत तिची अशीच दैना होणार हें अगदीं उघड आहे. हाही "दुर्दैवीविलासच" आहे! एकंदरींत **पानिपतच्या युद्धाचें वृत्त**—मग तें गद्यांत असो अथवा पद्यांत असो—तें ऐकण्याचा अथवा वाचण्याचा प्रसंग आला कीं प्रत्येक वेळीं प्रसंगानुसार कंठ सद्गदित होऊन, डोळे पाण्यानें भरून येतात; व केव्हां आनंदानें, केव्हां दुःखानें, तत्कालीन स्थितीशीं आपल्या मनाचें तादात्म्य होऊन मनोवृत्ति खळबळून जातात! असा प्रसंग फुरसतीच्या वेळीं पद्यांत वाचणें कोणाला आनंददायी—छेः दुःखदायी—होणार नाहीं! ही दुःखकथा वाचीत असतां मनास वाटणारा काव्यविषयक आनंद ज्यास पाहिजे असेल त्यानें हें काव्य अवश्य वाचावें.

"किरात."

---

# फिरंग्यांची इकडील हकीकत.

[ २२ पृष्ठावरून पुढें चालू. ]

याप्रमाणें इ० ७१९ पासून ह्मणजे ८ व्या शतकाच्या आरंभापासून तों १२ व्या शतकाच्या अखेरपर्यंत किंवा १३ व्या शतकाच्या आरंभापर्यंत चांगला ५०० वर्षांचा एक मनू होता. या ५०० वर्षांच्या मनूचे "बरोबरीचा, झगड्याचा, वरचढीचा" असे ३ पोटमनू पडतात. जवळ जवळ इ० ८५० पर्यंत बरोबरीचा पोटमनू होता. या पोटमनूमध्यें बादशहा आणि पोप यांच्यामध्यें एकंदरींत स्नेह असे. लोथेर बादशहा मरेपर्यंत स्थिति फारशी शोच्य नव्हती. पण पुढें एका वारसाचा वारसा रद्द करून दुसऱ्याचा वारसा मंजूर करण्याची राज-

कीय ढवळाढवळ पोपांनीं चालविली त्यामुळें, आणि कित्येक पोप दुसऱ्या बाजीच्या वर्गांतले जन्मादारभ्य असल्यामुळें झगड्याचा पोटमनू बळावला. या पोटमनूमध्यें बादशहाचाच पगडा एकंदरींत वर राहिला. इ० १०५० पर्यंत ह्मणजे पुरीं २०० वर्षें हा झगड्याचा मनू चालला होता. इ० १०५९ मध्यें निकोलासानें बादशहास धाब्यावर बसवण्याचें जें बीं पेरलें, तें हिल्दिब्राण्डच्या कारकीर्दींतला उन्हाळा जरी पुष्कळ कडक होता, तरी करपून न जातां इ० १०९९ मध्यें कोंभेजूं लागलें. लौकरच हा कोंभ वृक्ष होऊन पालवूं लागला, तो शिकंदराच्या कारकीर्दींत मुत्सद्दीपणाचें पाणी बरेंच मिळत गेल्यामुळें फुलला आणि इनोसेन्ताच्या कारकीर्दींत त्यास फळेंही लागलीं. इनोसेन्ताच्या कारकीर्दीमध्यें हा पोपाचा वरचढपणा जिकडे तिकडे फडकूं लागला. सारांश, बारीक विचार केल्यास पोपांच्या राजसत्तेचा आरंभ शिकंदराच्याच कारकीर्दीपासून झालेला मानणें जास्त सयुक्तीक ठरतें.

या सगळ्या गोष्टी डोळ्यांपुढें मांडलेल्या ठेवल्या, ह्मणजे सुलतानानें फिरंग्यांच्या राजाशीं उजू बोलणें न चालवितां पोपाच्या मार्फत बोलणें कां चालविलें, त्याचें इंगित लागलेंच लक्षांत येईल. फिरंग्यांचें व स्पेनचें हीं दोन राज्यें पोपांनींच पहिल्यानें जन्मूं लावलीं होतीं; इतकेंच नाहीं, तर कबूल केलेली खंडणी मिळेनाशी झाल्यास राज्य आपल्या तैनातीस लावून घेण्याचाही कित्ता पोपांनीं घालून ठेवला होता. जसे शिंदे आणि होळकर हे मूळचे पेशव्यांच्या आश्रितांपैकीं होते, तसे पुर्तुगाल्ये व इस्पेन्ये हे मूळचे पोपांच्या आश्रितांपैकीं मानण्यास अडचण नाहीं. या प्रकारचें मूळचें सेव्यसेवकांचें नातें असल्यामुळें फिरंग्यांस पोपाची आज्ञा मोडतां येण्याजोगी नव्हती. ह्मणून सुलतानानें पहिल्यानें बोलणें चालविलें, तें पोपाशींच चालवलें. तशांत धर्मसत्तेचि सगळी कळ पोपाचे हातीं असल्यामुळें आणि पालिस्तैनच्या पुण्यक्षेत्रीं अंमल सुलतानाचा असल्यामुळें, ख्रिस्तपुण्यस्थळांची धूळधाण पुढें सुलतानास करावयाची असल्यास अव्वल धर्माचार्याची कानउघाडणी करून त्यासच पहिल्यानें इशारत करणें योग्य होतें, हाही मुद्दा बऱ्याच महत्त्वाचा आहे. सारांश, सुलतानानें पहिल्यानें पोपाकडे दाद लागते कीं नाहीं तें पाहिलें हें ठीक केलें, हें असेंच केलें पाहिजे होतें, हीच एक उजू वाट होती. पण फिरंग्यांच्या राजास जसा राजकीय अंमल बजावण्यास, तसा पोपासही काथोलीक धर्माचा अंमल बजावण्यास जास्त मुलूख हवा होता—मिळून दोघांसही मुलखाचा लोभ सुटलेला होता. तशांत काथोलीक ह्मटले कीं पुतळ्यांचे व चित्रांचे कैवारी; आरब ह्मटले कीं जसे मूर्तींचे तसे पुतळ्यांचे आणि चित्रांचेही द्वेषी; या दोहोंमध्यें छत्तिसांच्याच आंकड्यांमधला मेळ असावयाचा. "माझ्या अंमलबजावणीचा मुलूख वाढल्यास आपल्याही अंमलबजावणीचा मुलूख वाढेल" अशा अर्थाचा जबाब राजाकडून पोपास मिळाला, असें जेव्हां सुलतानास समजलें, तेव्हां तो लगेच आर्मार सजवण्याच्या पुढच्या तयारीस लागला.

मन्वेलनेंही आरबांचा व्यापार साफ बुडवून टाकण्याचा निश्चय केला. एदन, हुरमुझ, मलाक्का हीं व्यापाराचीं ३ मोठीं बंदरें आरबांच्या ताब्यांत होतीं. एदनहून माल शिकंदर्या मुक्कामीं, हुरमुझहून बेरूतमुक्कामीं, आणि मलाक्काहून चीनमध्यें जात असे. चीनमधला माल मलाक्काच्याच

वाटेनें आरब इकडच्या दिशेस आणीत. याप्रमाणें या ३ उतारपेंठा बळकावण्याचा दृढ निश्चय करून, मनवेलनें गवर्नरकी ३ वर्षं आल्मीदास दिली आणि अंजदीव, कनानूर, कोचीन, किलोन, या चार ठिकाणीं फिरंग्यांच्या ताब्यांतली जागा जास्त मजबूत करून ठेवण्यास हुकूम केला. इ० १५०५ मध्यें मार्चच्या २५ वीस २२ मन्वारांचें आर्मार घेऊन आल्मीदा लिस्बोनहून निघाला. २२ मन्वारांपैकीं ११ माल आणण्यासाठीं व ११ मलबारच्या किनाऱ्यावर राखण्यासाठीं होतीं. १५०० शिपाई आर्मारावर चढलेले होते; खलाशी होते ते निराळे. सप्तंबरच्या १३ वीस अल्मीदा अंजदीव मुक्कामीं लागला. राजाच्या हुकुमाप्रमाणें येथें एक गड बांधून दोन तीन पडावांनिशीं एक कप्तान व ८० माणसें या ठिकाणीं अल्मीदानें ठेवलीं आणि कनानूरची दिशा धरली. २४ वी आक्टोबर रोजीं कनानूरास लागून गड बांधण्याची परवानगी राजापासून अल्मीदानें मिळवली. पुढें बांधलेल्या गडाचा हवाला ब्रितो जवळ देऊन, दीडशें माणसें व दोन गलबतें त्याच्या स्वाधीन केलीं आणि याच ठिकाणीं अल्मीदानें "राजमुख्त्यार" ( Viceroy ) अशी पदवी धारण केली.

कनानूर मुक्कामीं असतां विजयनगरच्या नरसिंगराय राजाचा हेजीब अल्मीदास भेटावयास आला, तें संभवतें; पण "आपली मुलगी पुर्तुगालच्या युवराजास देण्याचें बोलणें काढलें" ह्मणून फिरंगी ह्मणतात, तें मात्र निव्वळ गप्पेसारखें भासतें. निदान या काळीं असला संभव बिलकुल नव्हता. इतिहासामध्यें गप्पांशीं प्रसंग पडत नाहींसा नाहीं. दुतर्फी हकीकत जर दृष्टीस पडेल, तर खरें काय तें हुडकल्यास हातीं लागण्याचा संभव तरी असतो. पण इतिहासामध्यें पुष्कळ प्रसंग एकतर्फी हकीकतीशीं पडतात. दुतर्फी हकीकत सांपडली, तरी प्रसंगीं खरें कोणतें तें निवडतां येत नाहीं; कारण कधीं कधीं जो मुद्दा हुडकणारास पुष्कळ महत्वाचा वाटतो, तो एका हकीकतींतून अजीबात —कोणत्या तरी कारणानें—गाळलेला असतो. दुतर्फीही हकीकतीची जर अशी स्थिति खरोखरी असते, तर एकतर्फी हकीकतीची स्थिति जास्त शोच्य असल्यास नवल कोणतें ? मुद्दा संभाव्य असला, तरी तो खराच असतोसा नियम नाहीं. नरसिंगरायाच्या मुलीचें लग्न पुर्तुगालच्या युवराजाशीं झालें किंवा व्हावयाचें ठरलें, यांत बाहेरच्यास सर्व कांहीं संभाव्य वाटण्यासारखें आहे. पण तितक्यानें जर बाहेरचा ही गोष्ट खरी मानील, तर तो खचित खड्यांत पडला. हिंदूमात्र फिरंग्यांच्या गलबतावर खाणेंजेवणें अगदीं निषिद्ध मानीत असे व त्यामुळें इ० १५०० मध्यें जे नाईर कोचीनकरानें जामिनादाखल काब्रालच्या मन्वारावर पाठवले होते ते, सांजसकाळ बदलावे लागत,— ही माहिती फिरंग्यांनींच नमूद करून ठेवलेली आहे, व ही माहिती अगदीं बिनचूक दिसते. जर मलबारच्या नाईर जामिनांची ही अशी हकीकत होती, तर विजयनगरच्या महाराजांचे स्वप्नीं तरी आपली मुलगी फिरंग्यांच्या युवराजास देऊं पहाण्याची कल्पना येण्याचा संभव कितीसा आहे, त्याचा विचार विचारी वाचणारावरच सोंपवणें बरें. सारांश, असलें बोलणें काढल्याची गोष्ट निव्वळ गप्प मानणें हीच एक उजू वाट ठरते.

कनानूरहून अल्मीदा निघाला, तो पहिली नोवेंबर रोजीं कोचीन मुक्कामीं पोंचला. त्रिमम्प-

राच्या डोकीवर चढवण्यासाठीं एक सोन्याचा रत्नखचित मुकुट पुर्तुगालच्या राजाकडून अल्मीदानें आणला होता. पण त्रिमम्पर हा जुन्या हिंदू राजांच्या वर्गांत गणण्याच्या योग्यतेचा होता. ह्मातारपणीं संसाराशीं संबंध तोडून सकुटुंब अरण्यांत जाणें आणि तेथें एखाद्या यःकश्चित् माणसाप्रमाणें "आपला हात जगन्नाथ" या ह्मणीचा आश्रय करणें हें जुन्या काळच्या हिंदू राजांस अत्यंत इष्ट वाटत असे. हा संप्रदाय आज निदान आह्मां हिंदूंस वाईट वाटत नाहीं, व खरोखरच वाईट वाटूं नये. घरांत पाणी भरणारी लक्ष्मी जरी गजान्ताच्या पुष्कळ पलीकडे गेलेली असली, तरी तिच्याशीं राजविलास सोडून देऊन कांहीं वर्षें तरी एखाद्या अगदीं किरकोळाप्रमाणें घालवल्यानें बरेंच शहाणपण शिकतां येतें. गर्भश्रीमंतास हें शिक्षण अवश्यमेव हवें. हें अपूर्व अंजन मिळाल्यानें दृष्टि पुष्कळ विशाळ व मन पुष्कळ थोर होण्याचा संभव असतो. ब्राह्मणी धर्मानें जसें पहिल्या तसेंच चवथ्याही आश्रमांत हें शिक्षण—जसें रंकास तसें रावासही मिळून—गायत्रीच्या दरोबस्त अधिकाऱ्यांस नित्य करून ठेविलें होतें, या एका मुद्यांत पूर्वींच्या ब्राह्मणांचें सौभाग्य कोणाही पोक्तपणा आलेल्यास सहज कळण्याजोगें आहे. आज भांडवल आणि मजुरी या दोहोंमध्यें जो दांगडा झगडा सुरू झाला आहे, त्याचें मुख्य कारण गर्भश्रीमंतांस व त्यांच्या मुलांस "जगन्नाथ" झालेल्या "आपल्या हाता"चें शिक्षण नसतें हेंच दिसतें. जसें मुंज झाल्यानंतर, तसें उतार वयांत खुद्द राजानेंही हें शिक्षण घेण्याचा जो कित्ता पूर्वीं पडलेला होता तो फार फार सुरेख होता. या जुन्या काळांतल्या अतिसुरेख कित्यास अनुसरून त्रिमम्परानें सिंहासन सोडलें होतें आणि नम्बियदनची आज्ञा कोचीनच्या राज्यांत पाळण्यांत येत होती. त्यामुळें नम्बियदनास मुकुट मिळाला. अल्मीदानेंही कोचीन मुक्कामींच वस्ती स्वीकारली. इतकेंच कीं गडास जास्त मजबुती केली.

कलिकतकरानें या प्रसंगीं मिस्सरच्या सुलतानास आपणाकडे ओढून बरीच जंगी तयारी चालविली. पण लुदोविक नांवाचा एक बोलोनकर गोरा होता, त्यानें फकीराचा वेष घेऊन व कलिकत मुक्कामीं जाऊन फितलेले दोघे इताल्ये कलिकतकरांकडे होते त्यांच्याशीं वळण बांधलें आणि बरीच कच्ची हकीकत मिळवून गोरा कनानूर मुक्कामीं आला. तेथून कोचीन मुक्कामीं जाऊन सगळें गुप्त कारस्थान गव्हर्नरापुढें मांडलें. अंजदीवचा किल्ला सोडून देऊन, कनानूर व कोचीन या दोनच मुक्कामीं फिरंग्यांनीं आपलें ठाणें ठेविलें आणि ज्यास्त खबरदारी व ज्यास्त तयारी चालविली. इ० १५०६ सालीं मार्च १६वीस कनानूरच्या पुढें आपल्या लोकांनीं कलिकतकराचा व आरबांचा मोड करून ३००० मुसलमान कापले, असें फिरंगी इतिहासकार ह्मणतात.

कांहीं दिवसांनीं कनानूरकराच्या मनांत वैषम्य आलें आणि त्यानें कलिकतकराशीं वळण बांधलें. पण कनानूरकराचा पुतण्या फिरंग्यांच्या बाजूचा होता, त्याच्याकडून सगळी हकीकत कळत गेली आणि फिरंग्यांनीं कडेकोट तयारी चालविली. उभयतांच्या कटकटी चालल्या असतां, पुर्तुगालहून कुन्हाच्या आज्ञेतलीं ११ मन्वारें इ० १५०७ या सालीं आगष्टच्या २७ वीस येऊन पोंचलीं आणि त्यांनीं आणलेल्या ३०० लोकांमुळें फिरंग्यांची शेवटीं फत्ते झाली; अर्थातच कनानूरकरास फिरं-

त्यांस फायदेशीर अशा अटींवर तह करावा लागला. याही प्रसंगीं कनानूरकराचा पुतण्या फितलेला होता, त्याच्यामुळें कनानूरकरास जर्जर करण्याचें काम फिरंग्यांस बरेंच सोपें गेलेलें असावें. घरफुटीनें जितकें सामनेवाल्यास साधतां येतें, तितकें—घरफूट नसल्यास—नुसत्या तलवारीनें साधतां येत नाहीं; अर्थातच जर मुत्सद्दीपणा नाहीं, तर तलवार कितीही तिखट असली, तरी एकंदरींत बोंथट पडते.

पुढें मिस्सरच्या सुलतानानें फिरंग्यांस हैराण करण्यासाठीं मलिक अझ नांवाचा खंबायतकराचा सुभेदार दीव मुक्कामीं होता, त्याच्याशीं संधान बांधलें. उभयतांनीं मिळून चौल मुक्कामीं फिरंग्यांवर हल्ला केला. या प्रसंगीं अल्मीदाचा मुलगा लोरेन्झो ठार झाला आणि फिरंग्यांचीं कांहीं गलबतें व मचवे मुसलमानांनीं बुडविले. "लोरेन्झोचेंच गलबत बुडवून, सगळीं वरचीं माणसें मुसलमानांनीं कापून काढलीं व १९ खलाशी राहिले ते कैद करून खंबायतेस पाठविले" असें फिरंगी ह्मणतात. किती कापले ती संख्याही दिलेली नाहीं. तरी जर लढाई मोठ्या इरेस पडून झाली, तर एका गलबताच्या वर बुडालें किंवा बुडविलें नसेल, असें ह्मणणें किंवा समजणें थोडें विसंगत भासतें. फिरंगी किंवा गोरे असतील, त्यांस विसंगतपणा न दिसण्याचा किंवा दिसल्यास फारच थोडा दिसण्याचा संभव उघड आहे. तरी जे तिऱ्हाईत किंवा तिऱ्हाइतासारखे असतील—मग ते गोरे असोत वा काळे असोत—त्यांस या प्रकारें वर्णन केलेल्या हकीकतींत विसंगतपणाचा बराच अंश झळकल्याशिवाय रहाणार नाहीं.

आतां अल्मीदा व अल्बुकर्क या दोहोंमध्यें वैमनस्य पडून, जो मोठा तंटा जुंपला, त्याची विचिकित्सा करून, दोष कोणाचा तो पाहूं या, आणि शेवट कदाचित् फिरंग्यांस किती भयंकर व अपाय करणारा झाला असता, तिकडेही नजर पोंचवूं या.

कुन्हा इ. १५०६ सालीं एप्रिलच्या १८ वे तारिखेस लिस्बन नगरींतून निघाला. याच्याचबरोबर आल्फान्सो अल्बुकर्कची रवानगी झाली होती. अल्बुकर्काचें मन्वेल राजाशीं बरेंच खाजगी बोलणें झालें होतें. अल्मीदाचीं ३ वर्षें पुरीं झालीं, ह्मणजे राजमुख्त्यारकी अल्बुकर्कास देण्याचें मन्वेलनें कबूल केलें होतें. हुर्मुझ मुक्कामीं फिरंगी अंमल बसविण्याचा मन्वेलचा विचार पूर्वींही दाखल करण्यांत आला आहे. ११ मन्वारांवर मिळून ७०० हत्यारबंद लोक दिसतात. ६ मन्वारांवर ज्यापक्षीं ४०० लोक असून, अंमल अल्बुकर्काचा होता, त्यापक्षीं राहिलेल्या ५ मन्वारांवरच कुन्हाचा अंमल ठरतो. अल्बुकर्कास ज्या आणखींही कांहीं खाजगी आज्ञा होत्या, त्यांच्यामध्यें हुर्मुझ सर करून तेथें फिरंगी अंमल बसविण्याची आज्ञा मुख्य असावी. ह्मणून अल्बुकर्क इराणी अखाताकडे वळला आणि हुर्मुझ सर करून तेथें किल्ला बांधण्याचें काम त्यानें मनावर घेतलें. मुख्य कप्तानाचें हें करणें हाताखालच्या तीन कप्तानांनीं नापसंत करून बंड केलें. पुढें लौकरच खाणें व पाणी पुरेसें वर भरून, मुख्य कप्तानास न कळवितां तिघांनींही हिंदुस्थानाकडे शीड फिरविलें. कोचीन मुक्कामीं लागल्यानंतर तिघांनींही अल्बुकर्कावर अल्मीदापुढें फिर्याद केली. अल्मीदानें चौघांचें कमिशन नेमून, त्यास चौकशी करण्याचा हुकूम केला. अशा प्रसंगीं आगियार नांवाचा मुख्य कप्तान ३ मन्वारें घेऊन इ. १५०८ मध्यें पुर्तुगालहून हुर्मुझ मुक्कामीं किंवा त्या दिशेस फिरणाऱ्या अल्बुक-

कांस मदत करण्यासाठीं निघाला होता, तो कोचीन मुक्कामीं येऊन दाखल झाला आणि ३ वर्षें संपल्यामुळें राजमुख्त्यारकी अल्बुकर्कांच्या पदरीं टाकण्याचा जो मन्वेल राजाचा हुकूम होता, तो त्यानें अल्मीदापुढें ठेवला.

येथपर्यंत झालें तें ठीक झालें, त्यांत गैरसारखें फारसें दिसत नाहीं. बंडखोर कप्तानांच्या पदरीं कितीसा दोषटाकावा लागेल, त्याचें माप ठरवितां येणें थोडें कठिण आहे; तरी बंडखोरांस अगदीं दोषमुक्त करतां येत नाहीं. मुख्य कप्तानास वर्दी न देतां एकाएकीं व एकदम तिघांनीं कोचीनची दिशा धरली, हें अगदीं बेशिस्त काम केलें, याविषयीं मतभेद होणें नाहीं. या बेशिस्तपणाबद्दल तिघांसही शिक्षा हवी होती. पण तिघांनीं आपला बेशिस्तपणा लपवून ठेवून, सगळें खापर जर अल्बुकर्कांच्या डोकीवर फोडण्याचा यत्न केला, तर अल्मीदास सगळी कची हकीकत कळावी कशी? तरी अल्मीदानें वाजवीहून थोडी जास्त घाई केल्याची व अधिकार नाहीं अशा ठिकाणीं अधिकार चालविल्याची बळकट शंका येते. अल्बुकर्कावर व त्याच्या करणीवर अल्मीदाचा अधिकार पोंचत नाहीं; कारण अल्बुकर्क हा राजाचा उजू नोकर होता, अल्मीदाच्या द्वारें राजा अल्बुकर्कापासून नोकरी घेत होता असा भाग नव्हे. तरी धन्याचें नुकसान माझ्यानें पाहवलें नाहीं व त्यामुळें "लागलेंच कमिशन मजकडून नेमण्यांत आलें" ही सबब अल्मीदास सांगतां येणार नाहींशी नाहीं; व ही सबब सांगितल्यास ती अगदीं पोकळ मानणें वाजवी होणार नाहीं. जर तिघे कप्तान घरंदाज नसते, जर ते उचल्ये असते, तर त्यांच्यावर भरंवसा ठेवला ह्मणून अल्मीदावर दोषाचा बराच बोजा लादतां येता. पण तिघेही कप्तान पुर्तुगालमधल्या घरंदाजांपैकीं असून, मन्वेलच्या पिढीजाद्या नोकरांपैकीं होते. असल्यांवर व असल्यांच्या फिर्यादीवर भरंवसा ठेवल्याबद्दल अल्मीदास दोष देणें बरोबर नाहीं. याप्रमाणें येथपर्यंत अल्मीदावर उतावळेपणाचा मात्र दोष प्रसंगाप्रमाणें कमजास्त लादावा लागेल, अल्बुकर्कावर मात्र तिळभरही दोष लादतां येत नाहीं. बंडखोर कप्तान त्यास बिलकुल न विचारितां पळून गेले, तेथें त्याचा निरूपाय होता. राजरहस्य होतें तें जसें बंडखोर कप्तानांस तसें प्रसंगीं अल्मीदासही कळविणें अल्बुकर्काचें काम नव्हतें व तें त्यानें कळविलेंही नसतें. जरी कळविलें असतें, तरी अल्बुकर्क गप्पीदास मात्र ठरविण्यांत येता, आणि जसा बंडखोर कप्तानांचा तसा अल्मीदाचाही भरंवसा राजरहस्यावर न बसता. सारांश, राजरहस्य फोडण्यांत अल्बुकर्कास येथपर्यंत सवडच सांपडली नव्हती. जरी सवड सांपडती, तरी तें त्यानें फोडलें नसतें व तें न फोडल्याबद्दल त्यास कोणीही विचारी पुरुष दोष न देता. ह्मणून येथपर्यंत जें झालें तें एकंदरींत ठीक झालें. शिक्षा जर कोणास हवी होती, तर ती तिघांही कप्तानांस हवी होती; अल्मीदा शिक्षेस एकंदरींत पात्र नव्हता, अल्बुकर्क तर शिक्षेच्या शंकेच्या पलीकडे होता.

पण याच्या पुढचें अल्मीदाचें वर्तन अगदीं गैर, बेशिस्तपणाची एकंदरींत कमाल झालेली, सर्वतोपरी त्याच्या नांवास काळिमा लावणारें, असें होतें. तिघां कप्तानांच्या नादास लागून अधिकाराचा राजीनामा द्यावयाचा तो दिला नाहीं, या अल्मीदाच्या कृतीस शिक्षा कडकच हवी. असा कित्ता राजानें पडूं दिला कीं, राज्य बुडालें ह्मणून समजावें. अधिकाराचा राजीनामा द्यावयाचा तो न देतां, अल्मीदानें उलट दुर्मुखचा

सुभेदार सैफद्दीन व त्याचा दुय्यम अत्तर खोजा या दोघांसही अल्बुकर्काचें सगळें करणें रद्द केल्याचें पत्र पाठविलें. येथें मात्र अल्मीदानें हत्तीएवढी चूक केली. अल्बुकर्काच्या निव्वळ द्वेषानें हें काम झालेलें दिसतें. द्वेष म्हटला कीं, तेथें गैरवाजवीपणा आला. बड्या कामगारांनीं व त्यांतही गवर्नरानें, खाजगी गोष्टी कितीही मनांत येऊं लागल्या, तरी त्या महाराच्या सावलीप्रमाणें दूर ठेविल्या पाहिजेत. अलीकडचे कर्मठ ब्राह्मण महाराची सावली बाटवणारी समजतात. ब्राह्मणांमध्यें जे वेदांती किंवा भक्त असतात, त्यांचेंही मत तेंच आहे. तरी महार कोण?—याविषयीं मोठा वाद आहे. कर्मठ मंडळी—मग ती ब्राह्मणांची असो वा ब्राह्मणेतरांची असो—महार नांवाची जात आहे, त्या जातींतल्याची सांवली पडूं नये, म्हणून फारच खबरदारी ठेवते. पण वेदांती किंवा भक्तांची मंडळी असते, ती ब्राह्मणांची असो वा ब्राह्मणेतरांची असो, ती "महार" म्हणजे "खाजगी द्वेषा"च्या तोडीचे जे दुर्गुण असतात, त्या दुर्गुणांस "महार" शब्द लावते, व तसल्याच महारांची सांवली बाटवणारी समजून, जातीच्या महारांशीं दळणवळण ठेवण्यास नाखुश नसते. अल्मीदा बाहेरच्या महारांस शिवत होता व त्यांच्या हातचें प्रसंगीं खातपीतही होता; तरी तितक्यानें तो निंद्य समजणें वाजवी होणार नाहीं. पण पुढें जीं कामें अल्मीदानें केलीं, त्यांच्यामुळें तो निंद्यपणाचें निव्वळ माहेर झालेला मानल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. बाहेरच्या महारांशीं दळणवळण बाटवणारें नव्हे; जें दळणवळण आंतल्या महारांशीं चालतें, तेंच—जसें वेदांत्याच्या, तसें भक्तांच्याही दृष्टीनें—बाटवणारें ठरतें.

अल्मीदाचें पत्र अत्तर खोजानें अल्बुकर्कास दाखविलें, त्यांत कांहीं गैर केलें नाही. खोजा अत्तर अल्बुकर्कासच ओळखीत होता, अल्मीदास ओळखीत नव्हता. या पत्रावरून पुढें होणाऱ्या आगतस्वागताची अटकळ अल्बुकर्कास सहज करितां आली. लौकरच अल्बुकर्क आपल्या आर्मारानिशीं निघाला, तो इ० १५०८ मध्यें नोवेंबरच्या शेवटच्या आठवड्यांत किंवा त्या सुमारास कनानूर मुक्कामीं येऊन दाखल झाला. खलाशांचा पगार चुकता करून, अल्बुकर्कानें सगळें आर्मार गवर्नरच्या हवालीं केलें, आणि "जरी आपण २ वर्षें आणि ८ महिने हुर्मुझच्या आसपास फिरते राहिलों होतों, तरी राजाची आज्ञा तशी असल्यामुळें फिरते राहिलों होतों; असें असतां इतक्या अवधींत गवर्नराकडून आपणांस काडीचाही हातभार लावण्यांत आला नाहीं, म्हणून मात्र थोडा खेद होत आहे" अशा अर्थाचें पत्र अल्मीदास लिहिलें. या पत्रांत जर शेवटचा भाग नसता, तर बरें होतें. शेवटचा भाग अल्मीदास बराच राग आणणारा होता. तशांत राजाची आज्ञा अल्बुकर्कास होती, ती खाजगी होती. ती तशी होती, हें अल्मीदास माहीत कसें असणार? म्हणून पत्रांतला शेवटचा मजकूर वाचून, अल्बुकर्काचे हातून थोडा फाजिलपणा झालेला निदान तिऱ्हाइतास दिसणार आहे. जर अल्मीदानें अत्तर खोजास पत्र पाठविलें नसतें किंवा तें अल्बुकर्काच्या दृष्टीस तरी पडलें नसतें, तर या मजकुराबद्दल बराच दोष अल्बुकर्काचे पदरीं टाकावा लागता. पण गवर्नराच्या पत्रांतला मजकूर वाचून अल्बुकर्काच्या आंगाची लाही झाली असावी; व ती तशी लाही चाललेली होती, तिची बळकट आठवण होऊन पोक्तपणास थोडी रजा दिलेल्या अल्बु-

कर्कांच्या हातून शेवटचा मजकूर पत्रामध्यें जोडण्यांत आला असावा; ह्मणून या शेवटच्या मजकुराबद्दल अल्बुकर्कास फारसा दोष देणें बरोबर होणार नाहीं.

ज्या घडीस अल्बुकर्क कनानूर मुक्कामीं आला, त्या घडीस जशी अल्मीदाच्या तशी अल्बुकर्कांच्याही मनाची घडी बरीच बिघडली, त्यांत नवल नाहीं. दीव मुक्कामीं जो मुलगा पडला, त्याचा सूड काढण्याची तयारी चालली आहे, इतक्यांतच नवीन गवर्नरानें येऊन हजर रहावें, हें अल्मीदास मध्येंच विघ्न आल्यासारखें भासलें. सुडाची मनीषा पूर्ण होण्यापूर्वीं राजमुख्त्यारकी अल्बुकर्कांच्या पदरीं टाकण्याचा प्रसंग कोसळल्यामुळें, अल्मीदाच्या कपाळास आठी पडणें साहजीक होतें. अल्बुकर्क येऊन पहातो, तो तिघेही बंडखोर कप्तान अल्मीदाचे मसलती बनून गेलेले आढळले; ह्मणून अल्बुकर्कांच्याही पायाची आग मस्तकीं गेल्यास नवल नाहीं. याप्रमाणें दोघेही एकमेकांस पाण्यांत पाहूं लागले.

कांहीं दिवसांनीं अल्बुकर्कानें खांसा जाऊन खांसा अल्मीदाची भेट घेतली. तेव्हां एक महिन्याची मुदत अजून राहिलेली आहे, ती पुरी होतांच आपण राजमुख्त्यारकी हवालीं करूं, असें अल्मीदा ह्मणाला. कांहीं दिवसांनीं आपला चिटणीस सित्रा यास अल्बुकर्कानें अल्मीदाकडे पाठवलें व बरोबर दिलेले दस्तऐवज गवर्नरास दाखवण्यांस सांगितलें. " दीवहून परत येईपर्यंत हे दस्तऐवज असेच गुंडाळून ठेवावे " असें अल्मीदा सित्रास ह्मणाला. " आतां राजमुख्त्यारकी माझी लागल्यामुळें दीववर स्वारी करणें माझें काम आहे "असा उलट निरोप पुन्हा सित्राबरोबर अल्बुकर्कानें अल्मीदाकडे पाठविला. आणखींही उलटेसुलटे निरोप दोहोंनीं दिले घेतले. पण सगळे कप्तान अल्मीदानें वश करून घेतलेले जेव्हां दिसले, तेव्हां अल्बुकर्क कनानूरहून कोचीन मुक्कामीं गेला. कोचीन मुक्कामच्या फिरंग्यांनीं एकदम राजमुख्त्यारकी स्वीकारण्याची सल्ला दिली; पण ती अल्बुकर्कानें मंजूर केली नाहीं, तें ठीक केलें. जरी दाखवावा होता तितका व तसा शांतपणा व गंभीरपणा अल्बुकर्कानें कित्येक प्रसंगीं दाखविला नाहीं, तरी लष्करी वळण लागलेला अल्बुकर्क एकंदरींत घसरला नाहीं, हें कबूल केल्याशिवाय सुटका नाहीं. अल्मीदा मात्र—जसा उगाळलेला कोळसा, तसा अधिकाधिक काळा दिसतो. असल्यास योग्य शिक्षा ह्मटली ह्मणजे बऱ्याच लांब मुदतीच्या सक्त मजुरीची किंवा काळ्या पाण्याची; हलक्या शिक्षेनें असलें हट्टी व खुनशी माणूस वठणीस येण्यासारखें नसतें.

[ पुढें चालेल. ]

## प्लेटो.

[ २ ]

प्लेटोची शिक्षणपद्धति जरी व्याख्यानरूपी असे, तरी त्याचे सर्व ग्रंथ प्रश्नोत्तररूपी आहेत. आणि ही पद्धति विचारशक्तीचा विकास होण्याला विशेष उपयुक्त वाटल्यावरून, त्याच्या " रिपब्लिक " ग्रंथाचा संक्षेप प्रश्नोत्तर रूपानेंच दिला आहे. हा ज्या व्यक्तींमध्यें पुढील वादविवाद झाला असें दर्शविलें आहे, त्या सर्व व्यक्ति केवळ काल्पनिक आहेत असें समजावें. फक्त इतकें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, साक्रेटिस नां-

वाच्या व्यक्तींचीं जीं प्रश्नोत्तरें आहेत, तीं प्लेटोचीं.

एके दिवशीं **साक्रेटिस**, **ग्लाकन**, **आडिमांटस** आणि **पालेमार्कस**, असे चौघे **पालेमार्कसाच्या** घरीं गेले. त्या ठिकाणीं थ्रासिमाकस, क्लीटोफन, आणि **पालेमार्कसाचा** वृद्ध बाप **सिफालस** हे होते. **सिफालसाला साक्रेटिस** बरेच दिवस भेटला नव्हता; ह्मणून तो जरी देवांची पूजा करण्याला जाण्याच्या बेतांत होता, तरी क्षणभर थांबून त्यानें **साक्रेटिस** वगैरे मंडळीचें मनःपूर्वक स्वागत केलें. या प्रसंगीं जमलेल्या मंडळीचें जें परस्पर संभाषण झालें तें येणेंप्रमाणें:-

**सिफालस**—अहो साक्रेटीस, तुह्मीं मला भेटायाला वारंवार येत नाहीं. जर मला शक्ति असती तर मीच तुमच्या घरीं आलों असतों; परंतु वृद्धपणामुळें माझ्यानें इतकें दूर येववत नाहीं. शरीराची सुखोपभोग घेण्याची शक्ति जसजशी कमी होत जाते, तसतशी तुमच्या सारख्या गृहस्थांशीं संभाषण करून त्यापासून सुखोपभोग घेण्याची माझी इच्छा अधिकाधिक वाढत चालली आहे. यास्तव माझी अशी विनंती आहे कीं, तुह्मीं माझ्या येथें वारंवार येऊन तुमच्या संगतीचा आणि संभाषणाचा लाभ मला द्यावा.

**साक्रेटीस**—सिफालसजी, वृद्ध मनुष्यांशीं संवाद करण्यापेक्षां मला अधिक प्रिय अशी कोणतीही गोष्ट नाहीं. कारण कीं, ते आपल्या प्रवासाच्या शेवटाजवळ जवळ पोहोंचले आहेत, आणि तोच प्रवास पुढें मलाही करावा लागणार आहे. ह्मणून, या प्रवासाचा मार्ग सोपा किंवा कठिण असतो याविषयीं त्यांच्याकडून माहिती मिळविण्याची मला मोठी इच्छा होते. ह्मणून, आपण ज्या अर्थीं वृद्धत्वाचा बराच अनुभव घेतला आहे त्या

४

अर्थीं मला सांगा, कीं तारुण्यापेक्षां वार्धक्य अधिक दुःखद असतें काय ?

**सिफालस**—माझ्या वयाचे लोक जेव्हां येथें येतात तेव्हां बहुतकरून याच विषयावर आमच्या गोष्टी चालतात. कोणी ह्मणतो "मला अन्न पचत नाहीं;" कोणी ह्मणतो "मला पाणी सोसत नाहीं;" तिसरा ह्मणतो कीं "तारुण्यांतील सुखोपभोगाची माझी सर्वशक्ति नष्ट झाल्यामुळें आयुष्याचा एकदां शेवट होईल तर बरें असें मला वाटतें;" चवथा ह्मणतो कीं "सोयेरेधायेरे सुद्धां माझा अपमान करितात." याप्रमाणें वृद्धत्वापासून अनेक दुःखें प्राप्त होतात असें कित्येकांचें मत आहे. परंतु मला तर वाटतें कीं या दुःखांचा वृद्धत्वाशीं मुळींच संबंध नाहीं. वृद्धत्व जर या दुःखांचें खरें कारण असतें, तर मी वृद्ध असल्यामुळें मलाही त्यांचा अनुभव अवश्य आला असता; परंतु मला त्यांपैकीं एकाचाही यत्किंचित् सुद्धां अनुभव नाहीं. वस्तुस्थिति अशी आहे कीं, तारुण्यामध्यें मनुष्य कामक्रोधादि मनोविकारांनीं बद्ध असतो; परंतु जसजसा तो वृद्ध होत जातो, तसतसें कामक्रोधादिकांचें प्राबल्य कमी होतजाऊन, त्यांच्या पाशांतून तो मुक्त होतो; व यामुळें वार्धक्यामध्यें खरी शांतता व खरी स्वतंत्रता मनुष्याच्या अनुभवाला येते. या निर्दिष्ट दुःखाचें खरें कारण वृद्धत्व नव्हे, तर त्या त्या मनुष्याची मानसिक प्रकृति हें होय. शांत व विचारी मनुष्य—मग तो तरुण असो वा वृद्ध असो—नेहमीं सुखीच असतो; ज्यांच्या अंगीं शांतता व विचार यांचा अभाव ते सर्व नेहमीं दुःखी असतात.

**साक्रेटिस**—आपलें ह्मणणें सत्य आहे असें मला वाटतें. परंतु आपण जेव्हां

हीच गोष्ट इतरांना सांगतां तेव्हां त्यांना ही खरी वाटत असेल याविषयीं मला शंका आहे. पुष्कळ लोक असें ह्मणतात कीं, आपणाला वृद्धत्वामध्यें जें सुख होत आहे त्याचें खरें कारण आपली शांतता नव्हे, तर आपली संपत्ति होय.

**सिफालस**—असें त्यांना वाटतें खरें; आणि संपत्ति ही कांहीं अंशीं सुखाचें साधन आहे यांतही संशय नाहीं. तथापि लोक संपत्तीला वाजवीपेक्षां फाजील महत्त्व देत असतात. माझ्या मतें, नुकतेंच सांगितल्याप्रमाणें, आपली मानसिक प्रकृति आपल्या सुखाचें किंवा दु:खाचें मुख्य कारण होय.

**साक्रेटिस**—आपली संपत्ति वडिलोपार्जित आहे किंवा स्वकष्टार्जित आहे?

**सिफालस**—कांहीं वडिलोपार्जित आहे आणि कांहीं स्वकष्टार्जित आहे.

**साक्रेटिस**—हा प्रश्न विचारण्याचा माझा हेतु येवढाच कीं, आपण संपत्तीची पर्वा करीत नाहीं असें दिसतें; आणि ज्याची संपत्ति वडिलोपार्जित असते त्यांची बहुतकरून अशी स्थिति असते. परंतु ज्यांनीं स्वत:च्या कष्टानें संपत्ति मिळविली असते ते, आईबाप ज्याप्रमाणें मुलांवर लोभ ठेवितात, त्याप्रमाणें संपत्तीवर लोभ ठेवितात. अशा लोकांची संगति फार कंटाळवाणी असते; कारण त्यांना संपत्तिस्तोत्राच्या पठणाशिवाय कोणत्याही अन्य विषयासंबन्धानें बोलण्याला सुचत नाहीं. असो. आपल्या मतें संपत्तीपासून आपणाला अति मोठा असा कोणता लाभ झाला आहे?

**सिफालस**—संपत्तीपासून सर्वांत मोठा लाभ हा कीं, आपणापाशीं पाहिजे तितकी संपत्ति असली ह्मणजे, आपणाला अन्याय हा जो अत्यन्त निंद्य दुराचार तो करण्याचा प्रसंग येत नाहीं.

**साक्रेटिस**—अन्याय व न्याय ह्मणजे काय हें समजून घेण्याची मला मोठी इच्छा आहे.

**सिफालस**—अन्याय ह्मणजे आपल्या हिताकरितां खोटें बोलून दुसऱ्याला फसविणें, व दुसऱ्याला जें दातव्य आहे तें न देणें.

**साक्रेटिस**—तर मग आपल्या मताप्रमाणें न्याय ह्मणजे खरें बोलणें व दुसऱ्याचें दातव्य देऊन टाकणें. याच्यापेक्षा आणखीं कांहीं नाहीं?

**सिफालस**—साक्रेटिस, मला देवपूजेला जाण्याला उशीर होत आहे, याकरितां मला जाण्याची परवानगी देऊन, पालेमार्कस वगैरे मंडळीबरोबर तुह्मीं संवाद चालवावा. (असें ह्मणून सिफालस निघून गेला.)

**पालेमार्कस** (पुढें सरून)—साक्रेटिस, मला वाटतें कीं, न्याय ह्मणजे लोकांचें दातव्य देणें.

**साक्रेटिस**—परंतु अशी कल्पना करूं कीं माझ्या एका मित्रानें आपली एक तलवार माझ्याकडे ठेवण्याकरितां दिली, व पुढें तो जेव्हां ती परत नेण्याकरितां माझ्याकडे आला, तेव्हां तो वेडा झाला आहे अशी माझी खात्री झाली; तर अशा स्थितींत त्याची तलवार त्याच्या हातांत परत देणें योग्य होईल काय?

**पालेमार्कस**—नाहीं. परंतु यावरून असें सिद्ध होत नाहीं कीं, न्याय ह्मणजे दातव्य देणेंच नव्हे, तर इतकेंच कीं ज्याच्या योगानें आपल्या मित्राला इजा होईल असें कोणतेंही कृत्य न्यायी मनुष्यानें करितां नये,—जेणें करून आपल्या मित्रांचें हित होईल असेंच केलें पाहिजे.

**साक्रेटिस**—ह्मणजे तुमचें मत असें काय, कीं माझ्या मित्रानें माझ्याजवळ एकादी ठेव ठेविली, परंतु ती ठेव परत दिली असतां जर

त्याला इजा होईल, तर ती परत देणें ह्मणजे "न्याय" किंवा "दातव्य देणें" होत नाहीं?

पालेमार्कस--होय.

साक्रेटिस--बरें, पण आपल्या शत्रूचें जर आपण कांहीं देणें असेल तर तें दिलें पाहिजे किंवा नको?

पालेमार्कस--दिलें पाहिजे. परंतु ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं कोणत्याही मनुष्यानें आपल्या शत्रूचें एकच प्रकारचें देणें असतें,--ह्मणजे केवळ त्याला होईल तेवढी इजा करणें.

साक्रेटिस--या गोष्टीचा अमळ विचार केला पाहिजे. परंतु तुह्मी येवढें कबूल करितां काय कीं जो न्यायी आहे तो आपण दुसऱ्याला जें देणें रास्त आहे तें देतो? व असें करणें ह्मणजे तुमच्या मतें दातव्य देणें?

पालेमार्कस--ही गोष्ट मला कबूल आहे.

साक्रेटिस--मला आतां सांगा कीं वैद्यकापासून काय प्राप्त होतें, व तें कोणाला?

पालेमार्कस--वैद्यकापासून शरीराला आरोग्य प्राप्त होतें.

साक्रेटिस--आणि पाककलेपासून?

पालेमार्कस--अन्नाला पक्वता मिळते.

साक्रेटिस--आणि न्यायापासून?

पालेमार्कस--तुकतेंच सांगितल्याप्रमाणें न्यायी मनुष्याच्या मित्रांना हित व शत्रूंना अहित.

साक्रेटिस--बरें. पण रोगाच्या संबंधानें मित्रांचें हित व शत्रूंचें अहित करण्याची कोणाला योग्य शक्ति असते?

पालेमार्क--वैद्याला.

साक्रेटिस--आणि जलप्रवासांतील संकटांसंबंधानें?

पालेमार्कस--नाविकाला.

साक्रेटिस--परंतु न्यायी मनुष्याला आपल्या मित्रांचें हित व शत्रूंचें अहित करण्याची जी शक्ति असते, ती कोणत्या गोष्टीसंबंधानें?

पालेमार्कस--शत्रूंशीं युद्ध करणें व मित्रांशीं सख्य करणें यांच्यासंबंधानें.

साक्रेटिस--परंतु मनुष्य ज्यावेळीं आजारी नसतो त्यावेळीं त्याला वैद्याची गरज लागते काय?

पालेमार्कस--नाहीं.

साक्रेटिस--तसेंच ज्या मनुष्याला जलप्रवास करावयाचा नाहीं त्याला नाविकाची गरज लागते काय?

पालेमार्कस--नाहीं.

साक्रेटिस--तर मग ज्यावेळीं लढाईचा प्रसंग नसेल, त्यावेळीं--ह्मणजे शांततेच्या वेळीं--न्यायाची गरज नाहीं?

पालेमार्कस--असें ह्मणणें चुकीचें होईल.

साक्रेटिस--तर मग तुह्मीं असें कबूल करितां कीं लढाई व शांतता या दोन्हीं प्रसंगीं न्यायाची गरज लागते?

पालेमार्कस--होय.

साक्रेटिस--ज्याप्रमाणें धान्यप्राप्तीकरितां शेतीची?

पालेमार्कस--होय.

साक्रेटिस--आणि कपड्यांकरितां शिवणकामाची?

पालेमार्कस--होय.

साक्रेटिस--ठीक आहे. परंतु न्यायापासून शांततेच्या वेळीं कोणता उपयोग होतो?

पालेमार्कस--समय-ह्मणजे करार करण्यामध्यें.

साक्रेटिस--पण आपली प्रकृति सुधारून देण्याविषयीं ज्याच्याशीं आपण समय करितों

तो मनुष्य न्यायी असला पाहिजे किंवा वैद्यशास्त्रज्ञ असला पाहिजे?

पालेमार्कस—वैद्यशास्त्रज्ञ.

साक्रेटिस—आणि आपणाला नौकेंतून एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जावयाचें असतें तेव्हां आपण ज्याच्याशीं समय करितों तो मनुष्य न्यायी असला पाहिजे कीं नाविक असला पाहिजे ?

पालेमार्कस—नाविक.

साक्रेटिस—तर मग कोणत्या प्रकारच्या समयांसंबंधानें न्यायी मनुष्याची गरज लागते ?

पालेमार्कस—ज्यांमध्यें धनाचा संबंध आहे अशा.

साक्रेटिस—ठीक. परंतु धनाच्या उपयोगाच्या संबंधानें आपणाला न्यायी मनुष्याची गरज लागते काय ? उदाहरणार्थ, पैसे देऊन जर आपणाला एक घोडा घ्यावयाचा असेल तर घोड्यांची ज्याला परीक्षा आहे अशा मनुष्याची मदत घेतली पाहिजे ?

पालेमार्कस—खरें आहे.

साक्रेटिस—तर मग धनाचा असा एखादा उपयोग आहे काय, कीं ज्याच्या संबंधानें आपणाला न्यायी मनुष्याची गरज लागते ?

पालेमार्कस—ज्यावेळीं आपल्या धनाचा आपणाला तूर्त उपयोग नसल्यामुळें त्याचा आपणाला दुसऱ्याकडे न्यास करावयाचा असतो-ह्मणजे ठेवणी करावयाची असते.

साक्रेटिस—ह्मणजे ज्यावेळीं धन निरुपयोगी होतें त्यावेळीं न्यायाची गरज लागते ?

पालेमार्कस—असें दिसतें खरें.

साक्रेटिस—परंतु असें असेल तर न्याय खरोखर उपयोगी आहे किंवा नाहीं याबद्दल मला शंकाच वाटते. बरें, आतां मला सांगा कीं, लढाईमध्यें तरवारीनें शत्रूला वार करण्याची ज्याला शक्ति आहे, त्यालाच फक्त शत्रूचा वार चुकवितां येईलना ?

पालेमार्कस—उघडच आहे.

साक्रेटिस—आणि ज्या मनुष्याला एखादा रोग कसा होतो हें माहित असतें,—ह्मणजे ज्याला तो रोग उत्पन्न करण्याची शक्ति असते,—त्यालाच तो बंद करण्याचें सामर्थ्य असतें ?

पालेमार्कस—होय.

साक्रेटिस—तर मग ज्या मनुष्याला धन कोणत्या रीतीनें चोरिलें जातें हें माहित आहे,—ह्मणजे धन कसें चोरावें हें ज्याला चांगलें समजतें,—तोच धन सुरक्षित ठेवील ?

पालेमार्कस—वरील गोष्टी कबूल केल्यावर हें कबूल केलेंच पाहिजे.

साक्रेटिस—यावरून असें सिद्ध झालें कीं ज्या मनुष्याला तुह्मी न्यायी असें ह्मणणार तो चोरीच्या कामांत प्रवीण असला पाहिजे. आतां तुमचें असें ह्मणणें आहे कीं, न्यायी मनुष्यानें जी चोरी करावयाची ती मित्रांच्या हितासाठीं आणि शत्रूंच्या अहितासाठीं. यासंबंधानें मी असें विचारितों कीं, मित्र कोणाला ह्मणावयाचें व शत्रु कोणाला ?

पालेमार्कस—जो मनुष्य आपणाला दुराचरणी वाटतो तो शत्रु; जो सदाचरणी वाटतो तो मित्र.

साक्रेटिस—परंतु असें कधीं होत नाहीं काय, कीं जे मनुष्य आपणास सदाचरणी वाटतात ते खरोखर दुराचरणी असतात, व जे दुराचणी वाटतात ते खरोखर सदाचरणी असतात ?

पालेमार्कस—अशी चुकी वारंवार होते खरी.

**साक्रेटिस**--आणि अशी चुकी ज्यांच्याकडून होते त्यांना खरे सदाचरणी मनुष्य आपले शत्रु व खरे दुराचरणी मनुष्य आपले मित्र, असें वाटतें का ?

**पालेमार्कस**--होय.

**साक्रेटिस**--आणि तुह्मीं पूर्वीं सांगितलेल्या न्यायाच्या लक्षणाप्रमाणें, अशा मनुष्यांनीं सदाचरणी मनुष्याचें अहित व दुराचरणी मनुष्यांचें हित केलें पाहिजे ?

**पालेमार्कस**--होय.

**साक्रेटिस**—परंतु जे मनुष्य खरोखर सदाचरणी असतात ते न्यायी असतात, व त्यांच्याकडून कधींही अन्याय होणार नाहीं ?

**पालेमार्कस**--होय.

**साक्रेटिस**--तर मग तुमच्या ह्मणण्याप्रमाणें ज्यांच्याकडून कधींही अन्याय होत नाहीं अशा मनुष्यांना इजा करणें हें न्याय्य आहे का ?

**पालेमार्कस**--नाहीं, याला न्याय कोणीच ह्मणणार नाहीं.

**साक्रेटिस**--तर मग तुमचें ह्मणणें असें कीं, आपण सदाचरणी मनुष्याचें हित व दुराचरणी मनुष्याचें अहित केलें पाहिजे ?

**पालेमार्कस**—हें मत मला अधिक आवडतें.

**साक्रेटिस**—परंतु या मताप्रमाणें, जे मनुष्य स्वभावाच्या अज्ञानामुळें दुराचरणी मनुष्यांशीं मैत्री व सदाचरणी मनुष्यांशीं वैर करितात, त्यांनीं आपल्या त्या मित्रांचें अहित व शत्रूंचें हित केलें पाहिजे ? ह्मणजे पूर्वीं जें तुह्मीं ह्मणालां कीं न्याय ह्मणजे मित्रांचें हित करणें व शत्रूंचें अहित करणें, त्याच्याविरुद्ध मत आतां कबूल करीत आहां ?

**पालेमार्कस**—शत्रु व मित्र या शब्दांचा खरा अर्थ समजण्यामध्यें चुकी झाल्यामुळें ही विसंगतता झाली. याकरितां आतां आपण ती चुकी दुरुस्त करूं.

**साक्रेटिस**—ती चुकी कोणती ?

**पालेमार्कस**—जो मनुष्य सदाचरणी दिसतो तो मित्र असें समजणें व जो आपणाला दुराचरणी दिसतो तो शत्रु असें मानणें.

**साक्रेटिस**--आणि ही चुकी दुरुस्त कशी करावयाची ?

**पालेमार्कस**—आपण असें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, जो मनुष्य आपणाला सदाचरणी दिसतो व जो खरोखर तसा आहे तोच आपला मित्र; जो सदाचरणी नसून सदाचरणी भासतो तो मित्र नव्हे. त्याप्रमाणेंच शत्रूविषयीं.

**साक्रेटिस**--ह्मणजे तुह्मीं असें कबूल करितां कीं खरे सदाचरणी मनुष्य तेवढे आपले मित्र व खरे दुराचरणी तेवढे आपले शत्रू ?

**पालेमार्कस**--होय.

**साक्रेटिस**--आणि न्याय ह्मणजे, पूर्वीं ह्मटल्याप्रमाणें मित्रांचें हित आणि शत्रूंचें अहित करणें नव्हे, तर जे मनुष्य आपले मित्र असून खरोखर सदाचरणी असतील त्यांचें हित करणें, व जे मनुष्य आपले शत्रु असून खरोखर दुराचरणी असतील त्यांचें अहित करणें ?

**पालेमार्कस**--असेंच ह्मटलें पाहिजे.

**साक्रेटिस**--ठीक आहे; परंतु न्यायी मनुष्यानें कोणालाही इजा करणें योग्य होईल का ?

**पालेमार्कस**--आपण आतांच कबूल केलें ना, कीं न्यायी मनुष्यानें आपल्या दुराचरणी शत्रूचें नुकसान केलें पाहिजे ?

**साक्रेटिस**—बरें, घोड्याला जेव्हां इजा होते तेव्हां घोड्याचे जे विशेष सद्धर्म ते वृद्धिंगत होतात कीं ऱ्हास पावतात ?

**पालेमार्कस**---ऱ्हास पावतात.

**साक्रेटिस**---आणि हीच स्थिति इतर प्राण्यांची ?

**पालेमार्कस**---अर्थात्.

**साक्रेटिस**---तर मग मनुष्याला जर इजा झाली, तर मनुष्याचे जे विशेष सद्गुण त्यांचा ऱ्हास झाला पाहिजे ?

**पालेमार्कस**---होय.

**साक्रेटिस**---आणि न्याय्यता हा मनुष्याचा एक विशेष सद्धर्म आहे ?

**पालेमार्कस**---होय.

**साक्रेटिस**---तर मग ज्या मनुष्याला इजा केली जाते, त्याची न्याय्यता कमी होते, अर्थात् तो अन्यायी होतो ?

**पालेमार्कस**---उघडच आहे.

**साक्रेटिस**---परंतु गायकाचा जो विशेष गुण त्याच्या व्यापारानें, ह्मणजे गायनानें, दुसऱ्या मनुष्यामधील त्याच गुणाचा ऱ्हास होणें शक्य आहे काय ?

**पालेमार्कस**---असें कधीं होणार नाहीं.

**साक्रेटिस**---आणि एका मनुष्यामधील अश्वचातुर्यामुळें दुसऱ्यामधील त्याच चातुर्याचा ऱ्हास होईल काय ?

**पालेमार्कस**---नाहीं.

**साक्रेटिस**---तर मग जो मनुष्य खरा न्यायी आहे तो आपल्या त्या गुणाच्या व्यापारानें ह्मणजे न्याय्य वर्तनानें, दुसऱ्याला अन्यायी करील काय ?

**पालेमार्कस**---हें असंभवनीय दिसतें.

**साक्रेटिस**--- ह्मणजे न्यायी मनुष्य दुसऱ्याला कधींही इजा करणार नाहीं ?

**पालेमार्कस**---असें सिद्ध झालें खरें.

**साक्रेटिस**---यावरून असें स्पष्ट झालें कीं दुसऱ्या मनुष्याला इजा करणें,---मग तो आपला शत्रु असो किंवा मित्र असो,---कधींही न्याय्य होणार नाहीं, तर अन्याय्यच होईल ?

**पालेमार्कस**-असें आतां कबूल केलेंच पाहिजे.

**साक्रेटिस**---अर्थात् असेंही सिद्ध झालें कीं, दुसऱ्याचें दातव्य देणें हा न्याय आहे, ह्मणून मित्राचेंच हित करावें आणि शत्रुला पीडा करावी असें जर कोणी ह्मणेल, तर त्याचें ह्मणणें अन्यायाचें आहे.

**पालेमार्कस**-मलाही आतां असेंच वाटतें.

---

## तान्हाजी मालसुरे
### अथवा
## सिंहगडची मोहिम.

### प्रकरण चौथें.

(मागील अंकावरून पुढें चालू.)

तया पाहतां मावळे भोंवताले
मिळाले; तिहीं वृत्तही सांगिजेलें;
करी कष्टि त्या बंधुचें मृत्युवृत्त;
सुहृन्मृत्यु पोळी कुणाचें न चित्त ? ६८

प्रसंगासि त्या जाणुनी दूरदृष्टि
विचारी मनीं प्राज्ञ तो सर्व गोष्टी;
गिळी शोकदुःखाग्निच्या ज्वालमाला-
पयोधी[1] धरी जेंवि त्या वाडवाला[2]. ६९

स्थिरावी तयां धीर दे सैनिकांतें,
ह्मणे-" रे, गळे मित्र हो धैर्य कां तें ?
इथें प्राप्त झालों कड्यातें चढून
असे धैर्य तें का रणाहून ऊन[3] ? ७०

---

१ समुद्र. २ वडवाग्नीला. ३ उणें; कमी.

जयांचीं धडें शत्रुची पाठ घेती;
न सर्पा, न वाघा, पिशाचा न भीती;-
उडी घेति अग्नींत, पूरांत पूर्ण;-
असे शौर्य तें का रणाहून ऊन ? ७१

मराठे कधीं हार युद्धीं न खाती-
अशी ख्याति ते म्लेच्छही नित्य गाती;
तिला डाग लागेल आतां पळून!
असे कोणती लाज याहून ऊन ? ७२

जगावें जिणें कासया बायकांचें?
जिणें व्यर्थ खोजांचिया[1] नायकांचें!
पळाल्यास कीं आज आह्मीं इथून
स्त्रिया षंढ आह्मांहुनी काय ऊन ? ७३

पळोनी करीतां पळाया परांला,
ह्मणावें तरी काय आतां तुह्मांला!
जरी आज तुह्मीं इथोनी पळाल
तरी 'मावळे' नांव हें मावळाल! ७४

पळाया तरी मार्ग आहेत कोठें ?
कडे भोंवतीं कोटही मोठमोठे;
जयांच्या बळें वेंघलों तेहि दोर
अह्मीं छाटिले!-( मागला व्यर्थ घोर )७५

पळूं लागतां शत्रु येतील पाठी,
भली आमुची रास होईल मोठी!
कडे वाट पाताळिंची दावितील!
सुंणी[2], काग, गृध्रें, अह्मां सेवितील! ७६

पळे जो रणीं जाय तो रौरवातें[3],
पडे जो रणीं स्वर्ग हो प्राप्त त्यातें;
रणीं जो पळे त्यासि 'छीथू[4]' वरीते,
पडे त्या मिळे अप्सरा नोवरी ते! ७७

पळालों तरी मृत्यु, युद्धांत मृत्यु;-
पहा केवढा भेद दोघां परंतु!
असे मात्र तो खास आह्मांस आजी;
वदा कोणत्या मृत्युतें कोण राजी ? ७८

जरी भांडलों सर्वही खूब नेटें,
असे आस कीं-बायको, मूल भेटे;
पळाल्या नसे मात्र आशा कशाची-
स्वतांच्या जिवांची, मुलांमाणसांची. ७९

जगाया दिसे मार्ग हा कीं-लढावें,
रिपूच्या उरीं पाय द्यावा, चढावें!
करावा सई[1] दुर्ग हा हातहातीं[2]
रिपू 'आ' करोनी मुखें जों पहाती. ८०

अह्मीं सैन्य तान्ह्याविणें हें कबंधु[3]-
अहा रे प्रभो हारिला त्वां सुबंधु!
असो. बांधवांनो! उदेभान खासा
तयें पाडिला तो तुह्मीं पाहिलासा! ८१

अह्मांसारिखे शत्रु हेही कबंध,
तरी होउंद्या झुंज दोघां सबंध;
नकारे परी सोडुं मद्बांधवाला-
महारांकरीं पूरण्या तच्छवाला! ८२

तसे कोणि जे आप्तबंधू दुजांचे
तयाच्या सवें झोंपले प्राण ज्यांचे,
असे त्यागुनी त्यांस आह्मीं पळावें-
जळोरे जळो शौर्य ऐसें जळावें! ८३

जरी त्यांसि सांडोनि आतां पळाल,
स्थितीलाहि त्यांच्या तुह्मीं प्राप्त व्हाल;
महारेंच देती तुह्मां मूठमाती!-
गति स्वर्गिं होई तुह्मां उत्तमा ती! ८४

ध्वनी ऐकतां फक्त कानीं "शिवाजी"
त्यजी घांस तोंडांतला म्लेंछ[4]-वाजी;

---

१ खोजे-मोंगलांच्या जनानखान्यांत राबणारे नोकर. हे बहुश: षंढ असावयाचे. २ कुत्रीं. ३ नरकांत. ४ प्राप्तहोते; मिळते.

१ स्वाधीन. २ हातोंहातीं. ३ कबंधु=कबंध=धड; मस्तकावीण शरीर. ४ मुसलमानांचे घोडे.

स्त्रिया शत्रुच्या टाकिती गाभ देखा !
तयाचे अह्मीं दास ही लाज राखा ! ८५

"देह त्यागितां कीर्ति मागें उरावी"
"मना, सज्जना, हेंचि क्रीया धरावी !"
**समर्थां**चिया वाणिला आठवा हो !
मनाचा तसा आपुल्या ओघ[1] वाहो ! ८६

मरावें नरें कीर्तिरूपें जगाया !
नुरावें जनांहीं अकीर्तीस गाया !
नृ-योनींत येवोनियां नांव केलें
नसे, ते वृथा जन्मले आणि मेले ! ८७

गडेहो ! अह्मीं आमुचे पाठिराखे !
न येती अतां सोडवूं बाप-काके !
नृपाचें अह्मां पुण्य तैशी भवानी
असे तारिती ! कोण हें भाग्य वानी ? ८८

भितां, दुर्ग हा होय आह्मां स्मशान;
न भीतां, नृपा[1] हाच हो सद्म[2] शान !
दिला जीव नाहीं उगा तान्हयानें
धरोनी असा शुद्ध भावार्थ त्यानें ! ८९

चलारे, गड्यांनो सर्व या-चला या-
अरींच्या शिरांच्या करायासि लाह्या !
निदानीं स्वतां एकटा मी मरेन !
स्वयें बंधुच्या ह्या पथा आदरीन ! ९०

नसे का मला बंधुचा थोर शोक ?
न कंटाळलों आज मी मृत्यु-लोक !
कुटुंबासि माझ्या नसे कोणि पाता[3]-
नृपाकारणें मी तरी सिद्ध आतां ! ९१

वरी देव-कीं खालतीं एक राजा-
भरोसा असे त्यांवरी पूर्ण माझा !
स्वदेहासि देतां बळी तन्निमित्त
धरी भार तो तत्कुटुंबार्थ सत्य ! ९२

रहा कीं पळा; याल ते या; न या वा !
असां मर्द कीं बायका-शीघ्र दावा !
पहा ही घडी[1] शत्रु जिंकावयाची;
कधीं ही न ऐशी पुन्हा यावयाची ! ९३

गड्यांनो ! फिरा-हा निघालों पहा मी !
गड्यांनो ! चला वेळ ही फार नामी !
गड्यांनो ! खऱ्या सार्थकीं देह वोपा !
भला मार्ग हा स्वामिभक्तीस सोपा !" ९४

---

सूर्याजिनें वदुनि यापरि सैनिकांला
केलें उताविळ तयां समरोत्सवाला;
सैन्यौघ[2] तो प्रकुपित[3] ज्वरसा सवेग
आला पुन्हा उलटुनी अनिवार सांग ! ९५

तुंबळ युद्ध पुन्हा बहु झालें,
लालच लाल रणांगण न्हालें;
भव्य उभा भगवा गडिं झेंडा-
थाटत नाचतसे जणुं घेंडा ! ९६

अगण्य शरणागतांविण रणांत सूर्याजिनें
रिपूंस गति देउनी चढविले नभाचे जिने;
गडावरुनियां कडे उडुनि कैक जीवाकडे
बघूनि नच, घेति ते बिकट जीविता[4] सांकडें !

सु-विजय शिवसैन्या[5] लाधुनी, जीर्ण शाला-
अनल-वदन-लमा सूचवी तद्यशाला;
निरखुनि नृपवर्यें राजदुर्गी[6] प्रकाश
अमित लुटवियेली शर्करा सावकाश. ९८

[ **प्रकरण चौथें समाप्त.** ]

---

१ शिवाजीला. २ घर. ३ पालन करणारा.

१ वेळ. २ सैन्य+ओघ=प्रवाह. ३ कुपथ्यानें दूषित झालेला; पक्षीं, विकोपास चढलेला. ४ संकट. ५ शिवाजीच्या सैन्याला. ६ राजगडावर.

Printed at the "Ganpat Krishnaji" Press, Bombay, 20-7-99

फोडून बाहेर पडला आहे,–त्यानें अनेक घोडे, माणसें वगैरे ठार मारलीं आहेत,–तो केवळ प्रळयकाळाप्रमाणें संचार करीत आहे. अमात्य नंदनाची भगिनि त्याच्या तडाक्यांत एकटीच सांपडली आहे. तिच्या बरोबरचे सर्व रक्षक लोक वाघाच्या सपाट्यापुढें भिऊन कोणीकडच्या कोणीकडे पळून नाहींसे झाले आहेत. तरी कसेंही करून मदयंतिकेला सोडवा, तिचें रक्षण करा–रक्षण करा!' [ भवभूतीचें हें वर्णन नुसतें वाचण्याला देखील कंटाळवाणें, चमत्कारिक व अप्रासंगिक वाटतें. नाटकांत प्रयोगाच्या वेळीं तें साग्र ह्मणतां येण्याचा मुळींच संभव नाहीं. ]

हें ऐकतांच सर्वांची एकच गडबड उडाली. इतक्यांत बुद्धरक्षिता घाबऱ्यां घाबऱ्यां आली होती, तिला माधव एकदम पुढें सरसावून ह्मणाला, ' बुद्धरक्षितें, कुठें कुठें आहे तो ?'

माधव अकस्मात् तेथूनच पुढें आलेला पाहून मालतीला फार आनंद झाला व किंचित् भयही वाटलें. व ' अग बाई! हे इथेंच होते तर–' असें ह्मणून तिनें त्याच्याकडे सानंदाश्चर्य व ससाध्वस दृष्टीनें पाहिलें. अशा तऱ्हेनें एकाएकीं चकित होऊन मालती आपल्याकडे पहात आहे असें पाहून माधवाला मोठी धन्यता वाटली व तो ह्मणाला, ' मालतीनें यावेळीं आपल्या दृष्टिपातरूपी कमलमालेनें जणों मला घट्ट बांधून टाकलें आहे–एकसारख्या दुग्धधारेच्या प्रवाहानें स्नान घातलें आहे–पूर्ण विकसित अशा नेत्रांनीं जणों मला कवटाळलें आहे–किंवा मजवर जणों संतत अमृतवर्षाव केला आहे–असें मला वाटतें. ( वाघाच्या गडबडींत असले विचार माधवाच्या मनांत येणें शक्य दिसत नाहीं. )

बुद्धरक्षितेनें त्याला ह्मटलें, ' महाभागा तो पहा बागेबाहेरच्या राजमार्गाच्या तोंडावर!' हें ऐकून माधव मोठ्या आवेशानें चालूं लागला तें पाहून कामंदकी त्याला ह्मणाली, ' वत्सा माधवा, नीट सावधपणानें जा बरें. ' माधव वाघावर जातो असें पाहून मालतीला भीति वाटली व तिनें लवंगिकेला ह्मटलें, 'लवंगिके गडे, आतां कसें बरें होईल? हें मोठेंच संकट आलें. !'

इतक्यांत माधव बागेच्या दाराशीं गेला. तोंच त्याला वाघाचा सर्व प्रकार दिसून आला. त्यानें त्या प्रकाराचें वर्णन केलें आहे तें फारच अतिशयोक्तीचें आहे. ' वाघानें पुष्कळशीं माणसें मारून टाकिलीं–त्यांचें रक्त, मांस, अस्थि वगैरेंनीं सर्व रस्ता भरून कचकच झाली आहे–त्याच्यापुढें जाण्याची कोणाची प्राज्ञा नाहीं–सर्व लोक मार्ग दिसेल तिकडे पार पळून गेले आहेत.'

' अरेरे! आह्मी दूर आहों–ही कन्यका पहा–अगदीं वाघाच्या सपाट्यांत आलीच!' हें ऐकून सर्वांना फारच दुःख वाटलें, इतक्यांत कामंदकी व माधव हर्षानें ह्मणतात, ' पण तो पहा वाघानें मारलेल्या एका पुरुषाच्या हातांतून तरवार ओढून घेऊन मकरंद एकदम येऊन मध्यें उभा राहिला!' त्यावर सर्व जण– ' शाबास! महाभागा शाबास!' असें ह्मणतात, तोंच ' त्याला वाघानें मोठ्या जोरानें हल्ला करून जखमी केलें!'–हें ऐकतांच–'अरेरे, फार वाईट झालें, ' असे सर्वांच्या तोंडून उद्गार निघाले; तोंच पुनः, ' पण त्यानें त्या दुष्ट वाघाचा फडशा पाडला पहा!–'असें माधवानें व कामंदकीनें ह्मटलें. ( हें वर्णन फार सुरेख, अविशयुक्त व अगदीं यथास्थित असें आहे. )

इतकें होतें तोंच सर्वजण दाराशीं पोहोंचले होते. वाघाच्या मारामुळें मकरंद जखमी होऊन बेशुद्ध झाला आहे असें पाहतांच सर्वांना मोठीच भीति पडली व शंका वाटली. तो बेशुद्ध झालेला पाहतांच इकडे माधवही बेशुद्ध होऊं लागला व कामंदकीच्या अंगावर पडूं लागला. तेव्हां ती ह्मणाली, ' अरे असा काय अगदीं घाबरतोस व धीर सोडतोस ? चल काय झालें तें पाहूं–' असें ह्मणून सर्वजण निघून गेले.

[येथेंच हा अंक संपविण्याचें विशेष प्रयोजन दिसत नाहीं. फक्त बाग व बागेचा दरवाजा यांच्यामध्येंच सर्व मंडळीचें प्रसंगविशेषानें स्थलांतर झालेलें आहे.

हाही अंक नाटकदृष्ट्या बराच साधला आहे. ]

## अंक चौथा.

[ हा अंक वास्तविकपणें मागील अंकाचाच उत्तर भाग आहे. शंकरगृहाजवळील बागेंतून कामंदकी, मालती, माधव वगैरे मंडळी मकरंदाची काय अवस्था आहे तें पाहण्याकरितां गडबडीनें निघून गेली. इकडे मकरंदानें वाघाला ठार मारून मदयंतिकेला सोडविलें होतें. पण वाघानें केलेल्या प्रहारामुळें त्याला मूर्च्छा आली होती. मदयंतिकेनें त्याला सांवरून धरिलें होतें. त्याची ती अवस्था पाहून त्याला मंडळींनीं शंकरगृहांत आणिलें होतें. माधवानें मकरंदाला मूर्च्छा आलेली पाहिली, तोंच तोही मूर्च्छित झाला. त्याला लवंगिकेनें सांवरून धरलें होतें. दोघेही केव्हां व कसे शुद्धीवर येतात याविषयीं सर्वांला काळजी लागली होती. हा सर्व प्रकार कवीनें रंगभूमीवर कोणचाही बिभत्स भाग, मरण, युद्ध, रक्तपात वगैरे प्रत्यक्ष दाखविला जाऊं नये, असा नाट्य–शास्त्राचा नियम आहे त्यास अनुसरून केला आहे. यांत, मकरंदाला व्याघ्रप्रहारामुळें मूर्च्छा आलेली पाहतांच माधवही मूर्च्छित झाला, हा प्रकार माधवाच्या धीर व शूर स्वभावाला शोभत नाहीं. माधवाचें मकरंदावर अत्यंत व अकृत्रिम प्रेम होतें हेंच दाखविण्याला व मालतीच्या मनांत तितका अधिक मोह उत्पन्न होण्याकरितां कवीनें हा प्रसंग आणलेला असावा. पण त्यांत माधवाकडे गौणपणा आलेला आहे. हे दोन्ही अंक संलग्न ठेविलेले नाहींत. नाट्य-शास्त्रदृष्ट्या प्रकर्णाचे अंक दहाच असावेत असा नियम आहे, तो पाळणें अवश्य होतें हें एक, व रंगभूमीवर तींच पात्रें ताबड-तोब दुसऱ्या प्रवेशांत आणण्याचें हल्लीं-प्रमाणें पडदे वगैरेचें साधन नव्हतें हें दुसरें. अशीं याला दोन कारणें असावींत असें दिसतें. बाकी मकरंद मूर्च्छित झाला असून मदयंतिकेनें त्याला सांवरला आहे, अशा स्थितींत त्याला कांहीं मंडळींनीं शंकरगृहाजवळील बागेंत कामंदकी वगैरे होती तेथें आणून पोहोंचविला व त्याला पाहतांच माधव मूर्च्छित झाला, असें दाख-वितां आलें असतें. ]

माधव व मकरंद मूर्च्छित झालेले पाहून मदयंतिका कामंदकीला ह्मणाली, ' भगवति, माझ्याकरितां यांनीं आपला जीव धोक्यांत घातला. आपण कसेंही करून यांना शुद्धीवर आणा.' त्यावर बाकीच्यांनीं, ' हाय हाय !–इथें आह्मीं आतां काय तरी पाहावें–किंवा करावें? ' असें ह्मटलें. कामंदकीनें

दोघांच्याही अंगावर कमंडलूंतलें पाणी शिंपडलें, व 'तुह्मी दोघीही त्यांना पदरानें वारा घाला' असें सांगितलें. त्याप्रमाणें दोघींनींही केलें. थोडया वेळानें मकरंद शुद्धीवर आला, व माधव मूर्च्छित आहे असें पाहून त्याला ह्मणाला, 'मित्रा माधवा, अरे हें काय ? इतका घाबरलास कां ? हा पहा मी खुशाल आहें.' हें पाहतांच मदयंतिकेला आनंद वाटला व ती आपल्याशीं ह्मणाली, 'अग बाई, हा पहा मकरंदरूपी पूर्णचंद्र स्वच्छ उदयास आला.' मालतीनें माधवाच्या कपाळाला हात लावून ह्मटलें, 'लवंगिके, ऐकलेंस का—आपला प्रियसखा मकरंद शुद्धीवर आला ह्मटलें.' हें ऐकतांच, व मालतीचा हस्तस्पर्श होतांच, माधव शुद्धीवर आला व त्यानें मकरंदाला—'मित्रा साहसिका, ये, मला कडकडून भेट पाहूं' असें ह्मणून त्याला आलिंगन दिलें. [ मूर्च्छित झालेला माधव केवळ मालतीच्या हस्तस्पर्शानें शुद्धीवर आला, एवढें दाखविण्याकरितांच ही खटपट केली आहे. असाच प्रकार उत्तररामचरितांत दोन वेळां केला आहे. पण त्यांत व यांत फरक इतकाच आहे कीं, रामाला सीतेच्या करस्पर्शाचा पूर्वी अनेकवार अनुभव होता, व माधवाला हा मालतीचा करस्पर्श अगदीं पहिलाच आहे, व तो शुद्धीवर येण्याकरितां जणों बुद्ध्या या करस्पर्शाची वाटच पहात होता असें दिसतें. ] दोघेही शुद्धीवर आलेले पाहून कामंदकीला व सर्वांनाच आनंद वाटला. तितक्यांत बुद्धरक्षितेनें मदयंतिकेला 'हाच तो मकरंद' असें सुचविलें. त्यावर तिनें, 'हो, हें मीं तेव्हांच ताडलें हा माधव व हेच ते ह्मणून—' असें तिनें हळूच उत्तर दिलें. बुद्धरक्षिता पुनः ह्मणाली—'कां, मीं खरें बोललें होतें ना ?,' हें ऐकून 'होय, तुमच्यासारख्या भलत्याचीच कधीं प्रशंसा करणार नाहींत. मालतीचें प्रेम माधवावर बसल्याविषयीं लोकवार्ता आहे. तो तरी तसाच योग्य व रमणीय आहे'— असें ह्मणून पुनः ती मकरंदाकडे सप्रेम पाहूं लागली. हें कामंदकीच्या लक्षांत आलें व ती मनांत ह्मणाली, 'हा मकरंद व मदयंतिका यांच्या भेटीचा हा अपूर्व व रमणीय असाच योग दैवानें घडवून आणिला.—पण मकरंदा, तूं सुदैवानें मदयंतिकेचा प्राण वांचविण्याला ऐन वेळेवर कुठून येऊन पोहोंचलास ?' असें तिनें त्याला विचारिलें. तेव्हां तो ह्मणाला, 'मीं आजच गांवांत एक वार्ता ऐकिली. तिच्या योगानें माधवाचें चित्त अधिकच उद्विग्न व खिन्न होईल, असें जाणून अवलोकितेनें मला कुसुमाकरोद्यानाचा वृत्तांत कळविला होता ह्मणून तसाच तडक इकडे येत होतों; तोंच मार्गांत वाघाच्या तावडींत सांपडलेली ही कुलीन कन्या दृष्टीस पडली.'

हें ऐकून मालती व माधव कावरेबावरेसे झाले. कामंदकी मनांत ह्मणाली कीं, ही वार्ता बहुधा मालतीच्या वाग्दानाविषयींचीच असावी, तरी ती मोठ्यानें माधवाला ह्मणाली—'माधवा, आज मोठी खाशी गोष्ट झाली. मालतीनें तुला प्रेमबुद्धीनें शुद्धीवर आणिलें आहे. यावेळीं तूंही आपलें प्रेम तिला व्यक्त केलें पाहिजे.' माधव ह्मणाला, 'भगवती, माझ्या मित्राला वाघानें प्रहार केल्यामुळें मी मुर्च्छित झालों होतों—त्या मला इनें शुद्धीवर आणिलें व माझी चिंता घाल-

विणारें आनंदाचें वर्तमान सांगितलें. त्याच्याबद्दल तिला मी आपलें हृदय व जीवित बक्षिस देतों. तें तिनें कृपा करून मान्य करावें.' या माधवाच्या भाषणावर मालतीच्या वतीनें लवंगिकेनें-'माझ्या प्रियसखीनें आपण दिलेलें बक्षीस मान्य केलें बरें' असें ह्मटलें.

हें सर्व पाहून मदयंतिकेनें, ' या महाभागाला समयोचित भाषण फार उत्तम करितां येतें'- असें ह्मटलें. मकरंदानें उद्वेगाचें कारण ह्मणून ह्मटलें तें काय असावें बरें, असा मालती आपल्याशींच विचार करूं लागली. तोंच माधवानें त्याला, ' पण ती उद्वेगकारक वार्ता कोणची ? ' असें विचारिलें. इतक्यांत नंदनाकडील एक पुरुष येऊन मदयंतिकेला ह्मणाला, ' वत्से मदयंतिके, अमात्य नंदन दादासाहेबांनीं सांगितलें आहे कीं, महाराजांनीं ( परमेश्वर-याशब्दावरून हा कोणी मांडलिक राजा होता असें स्पष्ट दिसतें ) आपल्या घरीं येऊन आज अमात्य भूरिवसूवर व आमच्यावर मोठा विश्वास व अनुग्रह करून, स्वतः मालती आह्माला दिली. याकरितां आनंदमहोत्सवाच्या तयारीला लागूं या. लौकर परत ये.' यावर मकरंद ह्मणाला,'मित्रा, हीच ती वार्ता-' हें ऐकतांच मालती व माधव दोघेंही अगदीं बावरल्यासारखीं झालीं. पण मदयंतिकेला फार आनंद झाला, व ती मालतीला ह्मणाली, 'गडे मालती, तूं आणि मी लहानपणापासून एकाच गांवांत वाढल्याखेळलेल्या, यामुळें आजवर आपण प्रियसख्या व बहिणी सारख्या होतों. पण आतां तूं आमची गृहलक्ष्मी झालीस-'

तिला कामंदकी ह्मणाली, ' बाळे मदयंतिके, तुझ्या भावाला मालतीचा लाभ होणार हें फार चांगलें झालें बरें.' यावर, ' हें सर्व आपल्याच आशिर्वादाचें फळ. सखे लवंगिके, तुमचा लाभ झाल्यानें आमचे सर्व मनोरथ सुफल झाले गडे-' असें मदयंतिका बोलली. तेव्हां लवंगिका ह्मणाली, ' हो गडे, हें आह्मीं कां ह्मणायला पाहिजे ?'

नंतर मदयंतिका बुद्धरक्षितेस ह्मणाली, ' बुद्धरक्षिते, चला आतां आपण जाऊन विवाहमहोत्सवाच्या तयारीला लागूं.' असें ह्मणून त्या दोघीही निघाल्या. जातां जातां मदयंतिका बुद्धया मोठ्या प्रेमानें मकरंदाकडे पहात होती. हें कामंदकी व लवंगिका यांच्या लक्षांत आलें लवंगिका हळूच कामंदकीला ह्मणाली, ' भगवती, पाहिलें का मदयंतिका व मकरंद कसे एकमेकांकडे सारखे प्रेमानें व आनंदानें पाहताहेत ? मला वाटतें परस्परांच्या मनांत अत्यंत प्रेम जडलेलें आहे.' ( हेंही लवंगिकेचें भाषण लांबलचक आहे. ) त्यावर कामंदकी हंसून ह्मणाली, ' हो दोघेंही जणों दर्शनसुखाचा आकंठ अनुभव घेत आहेत, असें यांच्या या किंचित उघडलेल्या तिरकस व सप्रेम झालेल्या नेत्रकमलांच्या कटाक्षांवरून व्यक्त होत आहे. ( हें वर्णन होईतों मदयंतिकेला बुद्धया स्वस्थ मकरंदाकडे पहात उभें रहावें लागलें आहे. हा प्रकार सर्व संस्कृत नाटकांत कमजास्ती आढळतो. पण तो अशा तऱ्हेनें बुद्धया ओढून ताणून आणणें ठीक नाहीं. रंगभूमीवर चाललेल्या मुख्य कामाला अंतराय न होतां अशा तऱ्हेचे स्वगत किंवा जनांतिक भाषणाचे प्रसंग साधतां येतील तितके चांगले. ) नंतर मदयंतिका बुद्धरक्षितेला, ' पुनः या जीवदान देणाऱ्या प्राणप्रियाचें मला दर्शन घडेल का ?' असें ह्मणाली. तिला बुद्धरक्षितेनें-' हो, दैव अनुकूळ झालें

तर सर्व कांहीं घडेल' असें उत्तर दिलें. नंतर त्या दोघीही आलेल्या पुरुषासह निघून गेल्या.

[ राजानें नंदनाच्या घरीं जाऊन त्याला मालती दिली असें सांगितलें, हें वर्तमान मदयंतिकेला—पुरुषानें येऊन कळवीपर्यंत—ठाऊक नसावें हें कसें ? मालती व माधव यांचें अत्यंत प्रेम असून तिनें त्याला मनानें वरिलें आहे ही गोष्ट मदयंतिकेच्या समोर प्रकट व्हावी एवढ्या करितांच हें तिचें अज्ञान कल्पिलेलें दिसतें. ]

त्या निघून गेल्यावर माधव आपल्याशीं ह्मणाला, ' झालें—सर्वच आशा नाहींशी झाली. बिसतंतूप्रमाणें कोमल असा हा आशातंतु तुटलाच ह्मणावयाचा ! या माझ्या शरीरांत मोठा प्रखर आधि व व्याधि एकसारखा संचार करो. ! दुःख व संकटरूपी जोखड माझ्या मानेवर कायमचें बसो ! ब्रह्मदेव एकदांचा स्वस्थ सुखी होवो व मदनही कृतार्थ होवो !—अथवा मजवर प्रेम करणाऱ्या पण अप्राप्य जनाचा अभिलाष धरून मींच वेडेपणा केला, त्या मला हें योग्यच फळ मिळालें. तरी हें दानाचें वर्तमान कानीं पडतांच पहांटच्या प्रहरच्या निस्तेज व क्षीण चंद्रबिंबाप्रमाणें तिच्या मुखचंद्राची अवस्था झालेली पाहून तर माझ्या अंतःकरणाला फारच दुःख होत आहे.'

मालती व माधव यांची अशी दीन, निराश व उद्विग्न स्थिति झालेली पाहून कामंदकीलाही फारच वाईट वाटलें, व त्यांचें समाधान करण्याकरितां ती ह्मणाली ' अरे माधवा, भूरिवसु स्वतःच तुला मालती देईल असें का वाटलें होतें ?—नाहींना ? मग पूर्वींपेक्षां अधिक वाईट तें काय व कसें झालें?' यावर मकरंद ह्मणाला, ' ती पूर्वींच दिली गेली ह्मणून शंका वाटते, दुसरें काय ?' कामंदकी ह्मणाली, ' होय, ती वार्ता मीही जाणतें. पण नंदनाकरितां राजानें भूरिवसूजवळ मालतीची मागणी केली, तेव्हां भूरिवसूनें राजाला,—महाराजांना आपल्या कन्येविषयीं अखत्यार आहे—असें उत्तर दिलें. हेंही प्रसिद्ध आहेना ? आज तरी, राजानें स्वतः मालतीला दिली, असें त्या पुरुषानें येऊन सांगितलें. मनुष्यमात्रांचीं व्यवहारतंत्रें मनांत ठरलेलीं असतात, व पापपुण्याचा विचार तोंडांतून अक्षरें काढावीं त्यावर अवलंबून असतो. सर्व गोष्टी वचनावर अवलंबून असतात. भूरिवसूनें तें राजाला दिलेलें उत्तर मुळीं खोटें. मालती महाराजांची स्वतःची कन्या नव्हे, व दुसऱ्याच्या कन्येचें दान करण्याचा राजाला अधिकार आहे असें कोठें धर्मशास्त्रही नाहीं. तेव्हां याबद्दल कांहीं काळजी करावयाला नको. अरे मी अगदींच दुर्लक्ष करून स्वस्थ बसलें आहें, असें कां समजतां ? सवतीच्या पोरावर देखील येऊं नये असा दुःखद प्रसंग इच्यावर व तुझ्यावर यावा हें मला कधीं तरी योग्य वाटेल का ? तुमच्या संगमाविषयीं मी हरतऱ्हेनें—प्राणांचीही पर्वा न करितां यत्न करीत आहें —समजलां ?'

हें ऐकून मकरंदाची खात्री झाली व तो ह्मणाला, ' भगवती, आपण खरें व योग्य ह्मणतां. आपलें मन संसारापासून विरक्त झालें असूनही आपल्याला पोटच्या मुलांसारखा या मुलांविषयीं स्नेहामुळें व दयेमुळें द्रव येत आहे. आपल्या आश्रमधर्माच्याही विरुद्ध असा हा जो यत्न आपण मनापासून करीत आहां तो व दुसरें दैव हींच ही गोष्ट घडवून आणण्याला समर्थ आहेत.'

इतक्यांत—मालतीला घेऊन लौकर घरीं या, असा कामंदकीला मालतीच्या आईचा निरोप आला. तशा त्या उठून जाण्यास निघाल्या.

त्यांना पाहून माधव मनांत ह्मणाला,'हाय हाय! मालतीचा समागम मला हा इतकाच मिळाला ह्मणावयाचा. विधीनें माझ्या व मालतीच्याही मनांत एकदम प्रेम उत्पन्न केलें व मला अत्यंत आनंदसागरांत निमग्न केलें, पण तोच आतां उलटा शत्रु होऊन माझ्या सर्वांगाचा जसा दाह करितो आहे!'

जातां जातां मालतीलाही-'हाय हाय! या नयनानंदाचें हेंच शेवटचें दर्शन आपल्याला घडणार ना!-' असें वाटलें. लवंगिका ह्मणाली, 'अमात्यानें असा अविचार करून माझ्या प्रियसखीचा जीव संशयांत घातला.' हें ऐकून मालती ह्मणाली, 'माझी जगण्याची आशा पुरली; बाबांचाही दुष्टपणा व कापालिकत्व चांगलेंच दिसून आलें; दैवाचा दुष्ट व दारुण परिणामही व्यक्त झाला; यांत मी हतभागिणी दोष तरी कुणाला देवूं व शरण तरी कुणाला जाऊं? कोण माझें आतां रक्षण करणार?' असें बोलत बोलत अतिशय कष्टानें व दीनपणानें माधवाकडे पहात पहात मालती निघून गेली.

त्या गेल्यावर माधव आपल्याशीं ह्मणाला, 'भगवतीनें गोष्टी सांगितल्या, त्या केवळ स्नेहामुळें-माझें सांत्वन करावें ह्मणूनच. हर हर! आतां जगून काय फल! यापेक्षां मरण बरें, असें वाटूं लागलें आहे. आतां काय करावें बरें-हो, याला महामांसविक्रयाशिवाय दुसरा कांहीं उपाय दिसत नाहीं.' तो पुनः मोठ्यानें ह्मणाला, 'मकरंदा, तुला मदयंतिका प्राप्त होण्याची उत्कंठा आहे ना?' त्याला मकरंदानें उत्तर दिलें, 'हो तर, मला वाघानें जोरानें प्रहार केला असतांना आपल्या विस्कळित झालेल्या पदराकडे कांहींच लक्ष न देतां तिनें घाबरलेल्या तरुण हरिणीसारखें विलोल नेत्रांनीं पहात आपल्या अमृतमय अंगानें मला आलिंगन दिलें, तेव्हांपासून माझें मन कसें चंचल झालें आहे.'

त्यावर माधव ह्मणाला, 'मकरंदा, बुद्धरक्षितेची सखी-मदयंतिका-तुला प्राप्त होणें सहज आहे. कारण वाघाच्या सपाट्यांत तिच्या प्राणावर बेतलें तेव्हां तूं त्या वाघाला मारून तिचे प्राण वांचविलेस-आणि तशा प्रसंगीं तुझें गाढ आलिंगन तिला मिळालें, तेव्हां आतां ती इतरत्र कशी रममाण होईल? तसेंच त्या कमलनयनेचे नेत्र तुजकडे नुकतेच अत्यंत आतुरतेनें गुंतले होते व तिची मुद्रा स्तब्ध व रमणीय झालेली होती.'

नंतर मकरंद ह्मणाला, 'चला, या पारा व सिंधूच्या संगमावर स्नान करून नगरींत जाऊं.' असें ह्मणून दोघेही संगमावर गेले. तेथें पुष्कळशा सुंदर नागरिक स्त्रिया स्नानास आलेल्या होत्या, त्यांना पाहून माधवानें ह्मटलें, 'या दोन्ही महानद्यांचा संगम किती रमणीय दिसत आहे! कांहीं स्त्रिया नुकत्याच स्नान करून वर आल्या आहेत, व भिजलेलीं वस्त्रें सर्वांगाला चिकटलेलीं असल्यामुळें त्यांचे सर्व अवयव उंच सखल व स्पष्ट दिसत आहेत. पाण्यांतून वर येतांना आपले दोन्ही हस्त, सुंदर व सुवर्ण स्तनकलशावर स्वस्तिकाकार ठेविले आहेत. ही स्नान करणाऱ्या स्त्रियांची या वेळची शोभा अवर्णनीय दिसते.' असें ह्मणून दोघेही निघून गेले.

[या व मागल्या अंकांत कामंदकी, बुद्धरक्षिता व लवंगिका, यांनीं मालती व मदयंतिका यांच्या मनांत माधव व मकरंद यांच्याविषयीं प्रेम व आतुरता उत्पन्न करण्याचा यत्न फारच चांगला व बराच पोक्तपणानें केलेला आहे. यापुढें परस्परांच्या मनांत परस्परांविषयीं प्रेम आहे

किंवा नाहीं याची मुळींच शंका राहिली नाहीं. त्यांचा परस्पर मेळ घालून राजाला व नंदनाला कसें फसवावें, एवढाच कायतो विचार आहे. तोही मालती व माधव यांच्या संबंधापुरताच. कारण मदयंतिका व मकरंद यांच्या विवाहाला कांहीं हरकत होती असें मुळींच दिसत नाहीं. हा सर्व प्रकार जनसमाजाच्या चालीरीती पोक्त व शुद्ध असल्यावेळचा मात्र दिसत नाहीं. त्यांना निकृष्ट दशा लागत चालली होती. हा सर्व प्रतिष्ठितपणाचा कुंटणपणा आहे असें ह्मणायाला फारशी अडचण दिसत नाहीं. कामंदकीचें वर्तन अगदींच गर्ह्य आहे असें नाहीं. तरी तें असावें तितकें साफ, शुद्ध व तिच्या आश्रमाला शोभेल असें नाहीं. तसेंच तिच्या सर्व तजविजींत घटनाचातुर्यही ह्मणण्यासारखें दिसत नाहीं. पुष्कळसा दैवावर हवाला दिलेला आहे.

मानसिक व वाचिक सत्यासत्याविषयींचा कोटिक्रमही लक्षांत घेण्यासारखा आहे. त्यावरून तत्कालीन लोकसमाजाच्या स्थितीचें उत्तम अनुमान होतें. या दोन्ही अंकांत मालतीचें वर्तन केवळ बाला व मुग्धा स्थितीस अनुरूप असें ठेविलें आहे. पण कामंदकी व लवंगिका यांनीं तिच्या संकल्पनिर्मित प्रियसमागमसुखाचें वर्णन केलें आहे तें गैर, कांहींसें अश्लील व असंभाव्य आहे. कामंदकीनें आपल्या वकिलीचा परिणाम कसा काय होतो तें पाहण्याला बुद्ध्या माधवाला साक्षिभूत आणून ठेविला होता. अशाच तऱ्हेचा प्रकार दुष्यंताच्या दृष्टीस, शाकुंतलाच्या तिसऱ्या अंकांत अवचित पडला आहे. या दोहोंत किती तरी फरक आहे! वाघानें मकरंदाला प्रहार केल्याचें पाहूनच माधव मूर्च्छित होतो. हें त्याच्या मानसिक धैर्याला किंवा शौर्याला मुळींच शोभत नाहीं. त्याच्यापेक्षां तेथें जमलेल्या बायकांनीं व मालतीसारख्या मुलीनें देखील अधिक धैर्य दाखविलें आहे. हा प्रसंग देखील बुद्ध्या ओढून ताणून मातनीला त्याला सावध करितां येण्यास्तवच आणलेला आहे. त्यांत स्वारस्य नाहीं. मकरंदानें मदयंतिकेला वाघाच्या तडाक्यांतून सोडविलें याबद्दल त्याचें खरें अभिनंदन राजा किंवा नंदन यांनीं किंवा तत्पक्षीयांनीं कोणीही स्वतः किंवा दुसऱ्याच्या तोंडून देखील करविलेलें नाहीं. नंदनाकडून आलेला पुरुष देखील याविषयीं कांहींच बोलत नाहीं. हें कांहींसें चमत्कारिक दिसतें. मालती मिळण्याविषयीं अगदीं निराश होऊन शेवटीं माधवानें आतां महामांस ( नरमांस ) विक्रयावांचून दुसरा इलाज नाहीं असें ठरविलें. हा तांत्रिक विधि होता. यावरून व या नाटकांतील एकंदर प्रकारावरून भवभूतीच्या वेळीं तंत्रशास्त्राची व आगममार्गाची फारच प्रवृत्ति होती व त्याच्या द्वारानें अद्भुत सिद्धि प्राप्त करून घेतां येते अशी सर्व लोकांची समजूत होती असें ठरतें. याविषयीं पुढील अंकाच्या शेवटीं विचार येईलच. पुढील अंकांतील कापालिकाचा प्रवेश सुचविण्याकरितांच या अंकांत मालतीच्या शेवटच्या भाषणांत तिच्याकडून 'बापानें आपलें कापालिकत्व चांगलें व्यक्त केलें' असें वदविलें आहे.

शेवटच्या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें सिंधू व पारा नद्यांच्या संगमावर हल्लीं देखील एखाद्या पर्वणीच्या दिवशीं स्नान करणाऱ्या स्त्रियांची शोभा पाहावयास सांपडते. संगमावर दोन्ही नद्यांना बांधलेले प्राचीन घाट व दोनचार मंदिरें अद्यापि कायम आहेत; व सिंधूनदीच्या

डोहांत पाणी पुष्कळ व अथाग भरलेलें असतें, व किनाऱ्यावर दाट वृक्षच्छाया नेहमीं असते, यामुळें सर्वच देखावा मोठा रमणीय दिसतो. एखाद्या पर्वणीच्या दिवशीं स्त्रिया तेथील घाटांवर स्नान करीत असतांना, फोटोग्राफ घेऊन त्यावरून एखादी सुरेख तसबीर तयार करितां येईल. ]

## अंक पांचवा.

हा अंक बहुतेक वर्णनात्मक आहे. प्रथम कपालकुंडला नांवाच्या कापालिक अघोरघंट याच्या शिष्यिणीनें आकाशमार्गानें येऊन, तांत्रिक रीतीनें इष्ट देवतांचें स्तवन केलें आहे; व 'आपला गुरु मंत्रसिद्धिप्राप्त्यर्थ नदीवर स्मशानांतील कराला नांवाच्या चामुंडा देवीला एक उत्तम स्त्रीरत्न बळी देणार आहे, व तसें स्त्रीरत्न येथेंच आहे तें आतांच आणिलें पाहिजे-' असें ह्मणून ती निघून जाणार, इतक्यांत माधव महामांसविक्रय करण्याकरितां त्याच स्मशानांत आला होता, तो तिच्या दृष्टीस पडला. त्याला पाहून-' हा कामंदकीच्या प्रियमित्राचा पुत्र माधव, महामांस विक्रय करण्याकरितां-पिशाचांना अर्पण करून त्यांच्याकडून कांहीं कार्यसिद्धि करविण्याकरितां आलेला आहे. असो; आपल्याला त्याच्याशीं काय करावयाचें आहे?' असें ह्मणून ती निघून गेली.

यानंतर महामांस विक्रय करण्याकरितां ह्मणून नदीतीरावरील स्मशानांत माधव बीभत्स वेषानें आला. त्यानें स्मशानभूमि, तेथें जळणाऱ्या चिता, नदीचें दग्ध अस्थीनें भरलेलें पात्र, नदीतीरावरील भयानक दिसणारे वृक्ष इत्यादिकांचें वर्णन करून, नंतर, 'हा मी येथें महामांसविक्रय करण्याकरितां आलों आहें. हे पिशाचांनों, या हो या-' असें मोठ्यानें आमंत्रण दिलें. त्याबरोबर असंख्य निरनिराळ्या रूपांचीं व आकारांचीं भुतें व पिशाचें तेथें आलेलीं त्याला दिसूं लागलीं. त्यांचें त्यानें फारच बीभत्स व भय वाटण्याजोगें पुष्कळसें वर्णन केलें आहे. (हा सर्व भाग वर्णन या नात्यानें बरा साधला आहे.) त्याच्या आमंत्रणाप्रमाणें तो पिशाचांना महामांस अर्पण करणार इतक्यांत कोणाचा आर्तस्वर त्याच्या कानीं पडला. तो स्वर कोठून आला याचा शोध करावा ह्मणून तो इकडे तिकडे पाहूं लागला. तेव्हां स्मशानाच्याच एका भागांत असलेल्या कराला देवीच्या देवळाकडून हा आवाज येतो आहे, असें त्याला कळलें. तो आवाज कोणाचा हें पाहण्यास्तव तो तिकडे निघून गेला.

यापूर्वींच देवीच्या देवळांत, अघोरघंट व कपालकुंडला मालतीला घेऊन आलेलीं होतीं. त्या नगरांतील उत्तम स्त्रीरत्नभूत मालती आपल्या घरीं गच्चीवर निजली असतांना, अघोरघंटाच्या सांगण्यावरून कपालकुंडलेनें मंत्रसामर्थ्यानें तिला अचानक उचलून आणून देवीपुढें बली देण्याची सर्व तयारी केली होती. तिला लाल वस्त्रें नेसवून, लाल फुलांच्या माळा घालून, पुष्कळसें कुंकू फांसलेलें होतें. अघोरघंट व कपालकुंडला यांनीं आपल्या पंथास अनुसरून देवीची पूजा व स्तुति चालविली होती; व शेवटीं, 'हे देवी चामुंडे! भगवती, मंत्रसाधनाच्या आरंभीं नवस केल्याप्रमाणें ही पूजा व हा बळी मी तुला अर्पण करीत आहें, तो ग्रहण कर.-' असें ह्मणून तो मालतीला मार-

[ द. प्रै. कमिटीनें बक्षीस दिलेलें काव्य. ]

# अभिनवकादंबरी.

बाणभट्टाच्या कादंबरीचें धुंडिराज कवीनें आर्यावृत्तामध्यें सार काढिलें. त्याचें हें मराठी भाषांतर त्याच वृत्तामध्यें रा. रा. गंगाधर रामचंद्र मोगरे यांनीं केलें आहे. कथानकाच्या एकंदर ३६१ आर्या आहेत; शिवाय 'समर्पण,' 'प्रस्तावना' आणि 'मराठी ग्रंथकारांस प्रार्थना' मिळून ९० आर्या आहेत. कमिटीचे सेक्रेटरी ह्मणतात—"मूळ संस्कृतांतील गोष्ट प्रस्तुत "पुस्तकांत यथातथ उतरली आहे, आणि बा- "णाच्या कादंबरीची मराठी वाचकांस ओळख "करून देण्यास या पुस्तकाचा चांगलाच "उपयोग होईल....या कवितांमध्यें ग्रंथका- "रानें विलक्षण सौंदर्य, सहजता आणि सुगमता "आणिलीं आहेत असें आढळून येईल... "अशा सुबोध आणि सरळ कविता मराठी- "मध्यें क्वचित् दृष्टीस पडतात."

रा. ब. नारायणभाई दांडेकर लिहितात—"या "पुस्तकास भाषांतर ह्मणण्यापेक्षां मूळ पुस्तकच "ह्मणणें जास्त शोभेल. काव्यौघ मोठा प्रशंस- "नीय आहे."

नामदार म. गो. रानडे लिहितात—"आर्या- "वृत्तामध्यें कविता रचण्याची ग्रंथकाराची कुश- "लता आणि मराठीभाषेवरील त्यांचें प्रभुत्व, हे "या पुस्तकांतील विशेष गुण होत."

डा० भांडारकर ह्मणतात—"रचना सुबोध, "नदीच्या प्रवाहाप्रमाणें, आणि सुंदर असल्या- "मुळें हें पुस्तक चांगलें झालें आहे यांत बिलकुल "संशय नाहीं.

**आवृत्तिदुसरी:** किंमत चार आणे. ट. ख. अर्धा आणा.

**विविधज्ञानविस्तार** आफिसांत विकत मिळतील.

---

# करण वाघेला.

अर्थात्

## गुजराथचा शेवटला रजपूत राजा.

[ ऐतिहासिक कादंबरी. ]

ही कादंबरी मूळ गुजराथी भाषेंत आहे; विविधज्ञानविस्तारमध्यें तिचें भाषांतर भागशः प्रसिद्ध होत होतें तें आतां संपूर्ण झाल्यामुळें वाचकांच्या सोईसाठीं स्वतंत्र पुस्तकरूपानें काढीत आहों. एका महिन्याच्या आंत तयार होईल. या कादंबरीचे पहिले १० भाग कै० रा. रा. गणेश भिकाजी गुंजीकर बी. ए. यांणीं लिहिले; पुढील ६ भागांचें भाषांतर रा. रा. खंडेराव भिकाजी बेलसरे यांणीं केलें. गोष्ट अगोदरच वि. ज्ञा. विस्तारमध्यें प्रसिद्ध झाल्यामुळें तिच्या चांगुलपणाबद्दल विशेष लिहिण्याचें कारण नाहीं.

पुस्तकाची द्वादशपत्री सांचाचीं ६१० पृष्टें आहेत. पुस्तक चांगलें कापडी पुठयानें बांधलें जाईल.

किंमत आगष्ट महिन्यांच्या आंत दीड रुपया. मागाहून दोन रुपये पडतील. पुस्तकें व्ही. पी. नें पाठविलीं जातील.

---

**मनोरंजन आणि निबंधचंद्रिका मासिकपुस्तकामध्यें प्रसिद्ध झालेली—**

श्रीमती सौ० काशीबाई कानिटकर यांनीं रचिलेली

# रंगराव ( कादंबरी. )

उत्तम जाड कागदावर छापलेली आणि सुंदर बाइंडिंग केलेली अशी लवकरच प्रसिद्ध होईल. **तारीख ३१ आगष्ट सन १८९९ पर्यंत वर्गणी भरणारांस १॥ रु०, ट. खर्च ४ आ. मागाहून २। रु०, ट. ख. ४ आणे.**

**भाऊ गोविंद सापकर,**

**ज्ञानचक्षूचे मालक.**

॥ श्रीः ॥

# विविधज्ञानविस्तार.

A MONTHLY MAGAZINE

OF

MARATHI LITERATURE

FOR

Ladies and Gentlemen.

कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरितां.

पुस्तक ३०. जून १८९९. अंक ६.

विषय. अनुक्रमणिका. पृष्ठ.



मुंबईत

गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत छापिलें.

वर्षाची वर्गणी रुपये ३; टपालखर्च आणे ६

## सूचना.

'मनुष्याचें कर्तव्यकर्म' हा बरेच वर्षांपूर्वी आमच्या पुस्तकांत प्रसिद्ध झालेला विषय हल्लीं सोलापूर एथील एका वर्तमानपत्रांत पुनः प्रकाशित होत असतो. ठीक आहे. परंतु तो छापण्याबद्दल आमची परवानगी जरी विचारली नाहीं, तरी तो वि. ज्ञा. विस्तारामधून घेतला आहे इतकें कबूल करण्यास त्यांस संकोच कां वाटावा हें समजत नाहीं. दुसऱ्या पुस्तकांतून उतारे घेऊन, त्या पुस्तकाचें नांवही छपवूं पहाणें हें निःसंशय सभ्यपणाचें वर्तन नव्हे.

---

ज्या सालांत एकाद्या विषयास आरंभ होतो त्याच सालांत त्याचा शेवट करावा, अशी आमच्या नागपुरकर मित्राची सूचना आहे. आह्मांस ती मान्य आहे, आणि त्याप्रमाणें होतां होई तों वागण्याचा आमचा संकल्प आहे.

मागसलेले दोन अंक लौकरच वाचकांच्या हातीं मिळतील.

गुदस्त सालापासून विस्ताराचा आकार वाढल्यामुळें खर्चाचें मानही वाढलें आहे. इकडे लक्ष देऊन आमचे आश्रयदाते आपल्याकडील वर्गणीचा सत्वर उलगडा करतील तर मोठे उपकार होतील. सुज्ञांस यापेक्षां जास्त लिहिणें नको.

पत्ते बदलले असल्यास जरूर लिहून कळविण्याबद्दल आश्रयदात्यांस विनंती आहे.

---

## पोंच.

बडोदें ग्रंथसंपादक व प्रकाशक मंडळीकडून पुढील पुस्तकें आमच्याकडे अभिप्रायासाठीं आलीं आहेत, त्यांचा साभार स्वीकार करितों. मंडळीच्या प्रयत्नासंबंधानें आणि पुस्तकांसंबंधानें दोन शब्द लिहिण्याचें मनांत आहे. कधीं योग जमून येतो पाहूं. तथापि मंडळीचा हा उद्योग सर्व महाराष्ट्र वाचकांच्या उदार आश्रयास पात्र आहे, इतकें तरी तूर्त ह्मणणें वाजवी आहे.

१ हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास, भाग पहिला—मुसलमानी रियासत—ग्रंथकार रा. रा. गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए. २ वाईकर भटजी—ग्रंथकार रा. रा. रामचंद्र विनायक टिकेकर. ३ वक्तृत्वकला—ग्रंथकार रा. रा. लक्ष्मण त्र्यंबक पारनाईक बी. ए. ४ आरोग्यशास्त्र—ग्रंथकार डा० कृष्णराव विश्वनाथ धुरंधर. ५ प्रसिद्ध इतालियन देशभक्त माझीनी—ग्रंथकार रा रा. लक्ष्मण गोविंद घाणेकर, बी. ए.

वाईकर भटजी ही अपुरी कादंबरी आहे. ही पूर्वी आमच्या पुस्तकांत भागशः प्रसिद्ध होत असतिला थोडी भर घालून हा पहिला भाग प्रसिद्ध केला आहे असें प्रस्तावनेवरून दिसतें. अपुऱ्या स्थितींत प्रसिद्ध करण्याची ग्रंथकाराची उत्कंठा स्वाभाविक आहे. परंतु ग्रंथप्रकाशक मंडळीस इतकी घाई कां झाली याचें मात्र कारण नीटसें ध्यानांत येत नाहीं.

श्री.

# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ३०. अंक ६.

पुस्तकपरीक्षा.

## " हिंदुधर्म आणि सुधारणा."

[ ३ ]

या पुस्तकांतील नीतितत्त्वांच्या वरील अत्यंत संक्षिप्त विवेचनावरून, विशेषतः गुणचतुष्टया-च्या व्याख्यांच्या संदिग्धतेवरून, वरील तत्त्वें प्रचलित रूढींना ग्रंथकारांनीं कोणत्या रीतीनें लाविलीं असतील याची कांहींशी अटकळ वाचकांना करितां येईल. हवी तितकी घाणेरडी चाल असो, तिनें आजपर्यंत नाहीं नाहीं तो अनाचार उत्पन्न केलेला असो, समाजांतील समंजस लोकांचा पाहिजे तितका भाग तिला प्रतिकूल असो, एखाद्या डोळा चुकवून पळ-णाऱ्या सद्गुणाची गचांडी धरून तिच्याशीं त्याची सांगड घालून दिली ह्मणजे ग्रंथकारास आपल्या जबाबदारींतून मोकळें झाल्यासारखें वाटत असावेंसें दिसतें. या प्रकाराचें बालविवा-हाशीं बरेंच साम्य असल्यामुळें त्यास सात्त्विक प्रकारांत बसविण्यास कांहीं अडचण नाहीं. रूढि आणि सद्गुण हीं जरी एकमेकांपासून अतिशय भिन्न असलीं, " इश्श बाई " ह्मणून रूढि जरी सद्गुणापासून दूरदूर पळत असली, तरी त्या दोघांस एका बोहल्यावर बळजबरानें बसवून " शुभमंगल सावधान " उरकणाऱ्या सात्त्विक ग्रंथकाराची शाबास आहे खरी ! कदाचित् रूढीच्या चोरून पहाण्यावर किंवा खुद्कन् हंसण्यावर त्याची सर्व मदार असल्या-स न कळे ! पण आह्मांस हें वर्णन आटपतेंच घेतलें पाहिजे. कारण त्या वर्णनाच्या भरांत बालविवाहाचा अर्धामुर्धा भाग अगोदरच येऊन जाईल कीं काय अशी जबरदस्त भीति आहे.

प्रथम बालविवाहासंबंधानेंच विचार ग्रंथकारांचें पहिलें विधान असें आहे कीं दोन तीन वर्षांची असते तेव्हांपासून हृदयांत प्रेमाचा अंकुर हळूहळू वाढत याला प्रमाण कोणतें तर " तिच्या तिचे खेळ, तिची तान्ह्या मुलाविषयींचें वगैरे. आह्मांस तर या सर्व गोष्टींत भावाप्रमाणेंच दांडगी अनुकरणेच्छा मात्र दिसून येते. मनुष्याची माकडापासून जी उत्क्रांति झाली तिच्या सर्व पायऱ्या क्रम बालपणापासून प्रौढ दशेपर्यंत मनुष्यामध्यें सून येतात हा आधुनिक विद्वानांचा आहे. लहान मुलें—मुलगे किंवा मुली-असतात हें कोणाही सूक्ष्मदृष्टीच्या तेव्हांच दिसून येईल. पुरुषांना का

स्त्रियांना काय, दया ही शिक्षणानेंच प्राप्त होत असते. एखादी स्त्री आपल्या तान्ह्या बाळकास गोंजारतांना पाहून ज्याप्रमाणें एखाद्या मर्कटीनें आपल्या पिलांशीं हुबेहूब तसें वर्तन ठेवावें त्याप्रमाणेंच लहान मुलीनें भातुकलींत थोरपणाचा आव आणणें होय. मुलगा आपल्या कृतींत जसें बापाचें अनुकरण करितो त्याचप्रमाणें मुलगी आईचें करते. लुटुपुटूच्या कागदावर ऐटीनें शेरे देणाऱ्या मुलास ज्याप्रमाणें न्यायासनाची कल्पनाही नसते त्याप्रमाणें बाहुलाबाहुलीचें लग्न करितांना मुलीसही सात्विक प्रेमाची नसते. दोन्ही बोलूनचालून खेळ. बाहुलीस घट्ट पोटाशीं धरितांना मुलीला प्रेमाच्या गुदगुल्या होत असतात असें ह्मणणें आणि तिच्या स्तनांत मातृप्रेमामुळें दुग्धोद्भव होत असतो असें ह्मणणें सारखेंच समंजसपणाचें किंवा हास्यास्पद. अशा प्रसंगीं बाह्य कृतींचा मनोवृत्तींशीं कांहीं संबंध नसतो. मुलीचा उद्देश केवळ आपल्या आईचें किंवा हजारों पिढ्यापूर्वींच्या आपल्या आजीबाईचें अनुकरण करण्याचा असतो.

अशा काल्पनिक प्रेमांकुराची मुलीच्या हृदयांत स्थापना करून ग्रंथकार मातापितरांस त्यास सुदिशा लाविण्याविषयीं कळकळीनें उपदेश करितात. हा त्यांचा उपदेश फार स्तुत्य आहे खरा. पण सुदिशा लावणें ह्मणजे चतुर्भुज करणें हा अर्थ त्यांतून कसा निघतो तो त्यांचा त्यांनाच माहीत. मुलीला अविवाहित ठेविल्यानें तो प्रेमांकुर होरपळून जातो असा ग्रंथकारांचा आशय आहे कीं काय ? तसा आशय असेलच तर ग्रंथकारांचा निवळ भ्रम आहे असें आह्मी बेधडक ह्मणतों. मातापितरांच्या मध्यस्थीवांचून ज्या प्रेमाचा उद्भव झाला, जें प्रेम आठ वर्षें बाहुल्यांच्या चुंबनावरच जीव धरून राहिलें, तें आठव्या वर्षीं मुलीचें लग्न न झाल्यास आपल्या आवडत्या बाहुल्यांस अनाथ करून उडून जाईल हें संभवतें तरी का ? त्याचा आणखी चारपांच वर्षें बाहुल्यांवर किंवा मातापितरांवर निभाव लागणार नाहीं का ? त्या प्रेमाला टिकाव धरून रहाण्याला एखादी लाकडाची पुतळी किंवा तितक्याच उंचीचा खराखुरा नवरा अवश्य लागतोच कीं काय ? आणि मातापितरांचा किंवा भावंडांचा खुराक लाविला असतां तें मृत्युपंथाला लागावयाचेंच कीं काय ?

यानंतर बापूसाहेबकृत प्रेमांकुराच्या वाढीचा इतिहास आला आहे. तो गिबनकृत रोमन राज्याच्या नाशाच्या इतिहासाइतका बोधप्रद जरी नाहीं तरी त्याच्याहून लाखपटीनें हास्यरसप्रचुर आहे. प्रेमाच्या इमारतीस अवश्य लागणाऱ्या मालमसाल्यानें या ग्रंथाचीं दोन तीन सबंध पृष्ठें अडविलीं आहेत. त्यांपैकीं प्रमुख साहित्यें ह्मटलीं ह्मणजे हीं होतः-पुढील वर्तन कसें ठेवावयाचें याबद्दल विनयाचे बेत, चट्कन् नवऱ्याकडे पहाणें, पुनः खालीं मान घालणें, लग्नांतील चार दिवसांचें संघट्टन, मान मुरकणें, धोतरांच्या निऱ्या करणें, झट्कन् शेजारून निघून जाणें, “ इश्श बाई ” वगैरे उद्गार, खुद्कन् हंसणें, मान मुरकणें, उखाणा घेणें, वेणीफणी उत्तम करून दागदागिनें घालून झळकणें, “ गर्भाधानाचा धार्मिक ( ? ) विधि झाल्यानंतर ” स्पर्शमात्रास राजी न होणें. वरील मसाल्यापैकीं धोतराच्या निऱ्या करणें, खुद्कन् हंसणें वगैरेंचा प्रेमाच्या वाढीस होणारा उपयोग जगजाहीर आहे. धोतराच्या प्रत्येक निरीबरोबर किंवा खुद्कन् हंसण्याच्या लकेरीबरोबर

प्रेमाची इमारत हातभर वाढत जाते हा सार्वत्रिक अनुभव आहे. पण वरील मसाल्यांत वधूवरांच्या डोळ्यांतील चिपडाचें किंवा नाकांतील शेंबडाचें लुकण सांगण्यास ग्रंथकार कसे विसरले याचें नवल वाटतें!

वरील मालमसाल्यापैकीं बराच भाग प्रौढ वधूच्याही आटोक्यांतला आहे ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. कदाचित् अवयवांच्या भरदारपणामुळें लहान वधूइतका मोठा कोन साधून तिला मुरका न मारितां आल्याकारणानें किंवा अंगच्या नैसर्गिक भारदस्तपणामुळें खुद्‌कन् हंसणाच्या पंचमाबद्दल मंदहास्याचा षड्ज निघाल्याकारणानें जी हानि होईल तेवढीच काय ती. पण असें असूनही ग्रंथकारांनीं प्रौढेच्या प्रेमाच्या इमारतीवर चांगला शेरा मारिला नाहीं ही आमच्या दृष्टीनें अन्यायाची गोष्ट आहे.

दुसरें असें कीं, वरील साधनांचा सात्त्विक प्रेमाची वाढ करण्यांत हातखंडा असूनही स्वतः विद्याधराचें आणि रामचंद्रपंतांच्या चिरंजीवांचें आपापल्या स्त्रियांवर प्रेम नसलेलें ग्रंथकारानें दर्शविलें आहे, तें कां? पुष्कळ सुधारकांची तर वारयोषितांच्या घरीं ओळख होत असलेली या ग्रंथांत दाखविली आहे. सुधारकांची जर ही तऱ्हा तर वारांगनांना उदार आश्रय देण्यांत कमीपणा न समजणाऱ्या आणि शिमग्यांचा सण होईल तितक्या थाटमाटानें साजरा करणाऱ्या आमच्या धर्माभिमान्यांची काय अवस्था? बहुतेक सुधारक आणि धर्माभिमानी जर याप्रमाणें वारयोषितांचे कट्टे दोस्त बनूं लागले तर मग बालविवाहापासून उद्भवणाऱ्या सात्त्विक प्रेमाची महती गाण्यांत आपला कंठ सुकविण्यांत काय फायदा? पण चुकलों. सात्त्विक प्रेमाच्या व्याख्येंतच त्याची आणि कामविकाराची ग्रंथकारानें फारकत केली आहे. तेव्हां स्वस्त्रीशीं साळसूदपणानें वागून आपल्या राजस प्रीतीची तलफ एखादा मनुष्य वारयोषितेच्या घरीं भागवीत असल्यास नवल नाहीं.

यानंतर प्रीतीचा आणि व्यावहारिक फायद्याचा असे विवाहाचे दोन प्रकार कल्पून हिंदुलोकांच्या विवाहांत वरील दोन्ही प्रकारांतील हेतु साधतात असें विधान बापूसाहेबांनीं केलें आहे. व्यावहारिक फायदा बालविवाहाच्या योजनेंत कसा उत्पन्न होतो तो पहा. "वराची व त्याच्या कुटुंबाची सुस्थिति पाहण्याचें काम अधिक अनुभविक मातापितरांकडे गेल्यानें व्यावहारिक फायदा होतो." एकूण स्वतः वराची बुद्धि, अक्कल, नीतिमत्ता यांजकडे मुळींच पहावयास नको वाटतें? नवकोट नारायणाचे उधळे चिरंजीव थोड्याच वर्षांत आपल्या कमकुवतपणामुळें धुळीचे दिवे खावयास लागतात हें ग्रंथकारांना माहीत नाहीं वाटतें? नुसत्या मातापितरांच्या सुस्थितीकडे लक्ष्य पुरविल्यानें व्यावहारिक फायद्याची खात्री देतां येईल कीं मुलगा मिळविता झाल्यावर त्याच्या शहाणपणाकडे पाहून देतां येईल? प्रीतीचा उद्भव वर्णितांनाही ग्रंथकारानें अशींच वेंगरूळ प्रमाणें पुढें आणिलीं आहेत. "प्रेमाचा अंकुर फार दिवस पोसल्यानें तोही बळावतो." पोसल्यानें बळावतो हें आह्मांसही कबूल आहे. पण वधूवरांकडून पोसला गेला पाहिजे ना? ज्यांनीं साऱ्या जन्मांत (सारा जन्म ह्मणजे सारा आठ दहा वर्षांचाच हो!) एकमेकांस काळें का गोरें हें पाहिलें देखील नाहीं, अंतरपाट खालीं होण्याच्या अगोदर डोळा वांकडा करून एकमेकांकडे पहाण्याची ज्यांना चोरी,

अशा अर्भकांना लांबून पकडून आणून त्यांची घट्ट गांठ बांधणाऱ्या आणि नंतर " आतां प्रेमाचा अंकुर चांगला पोसून वाढवा बरें " अशी त्यांना निक्षून ताकीद देणाऱ्या मनुष्यास मूर्ख ह्मणावें कीं अधम ह्मणावें याचीच पंचाईत. सोडतींत ज्याप्रमाणें दोन ढिगांतील कोणत्याही दोन चिठ्या उचलून त्यांचा परस्परांशीं संबंध लावितात त्याप्रमाणें वधू आणि वर एके ठिकाणीं आणिल्यानें त्यांचें प्रेम एकमेकांवर जडतें असें गांभीर्यानें प्रतिपादन करणें ह्मणजे तर्कशास्त्राचा कडेलोट करणेंच होय. यापेक्षां त्या बिचाऱ्या लेकरांची अंधळी कोशिबीर काय वाईट? तिच्यांत ज्या मुलावर राज्य असतें त्याचे डोळे बांधून नंतर तो ज्याला शिवेल त्यावर राज्य येत असतें. पण बालविवाहाचा प्रकार कांहीं निराळाच. वराचे आजोबा वधूस पहावयास निघतात आणि वधूच्या आजोबाची भेट घेतात. सौंदर्य, गुण वगैरे ज्या मुख्य गोष्टी पहावयाच्या त्यांकडे डोळेझांक करून ( ही डोळे झांक व्हावयाला आजोबांचें अंधत्व आणि वधूच्या गुणांची अपूर्णावस्था हीं दोन्ही कारणें होतात ) हुंडा, मानपान वगैरे क्षुल्लक गोष्टींकडे बारकाईनें लक्ष्य पुरवून शेवटीं स्थलनिश्चय होतो. अर्थात् या विवाहाशीं ज्यांचा जन्माचा संबंध तीं अर्भकें या प्रकारानें एका बाजूसच राहून ज्यांचा या मर्त्य लोकाशीं संबंध फार झालें तर दोन चार वर्षांचाच असणार अशा गृहस्थांकडे प्रमुखत्व दिलें जातें. बरें, इतकेंही असून जर का वधूवरांचें प्रेम एकमेकांवर जडेनासें झालें तर लागलींच आजोबा वस्सकन अंगावर येऊन ह्मणावयास तयार कीं " कारट्यानों, आह्मीं आमचें कर्तव्य करून चुकलों. हुंडा, करणी, मानमान वगैरेकडे लक्ष्य पुरविण्यांत काडीइतकी तरी कसूर झाली का? मुख्य गोष्टी आह्मीं सर्व पाहिल्या आहेत. आतां प्रेम जडण्याचेंच काय तें राहिलें आहे. पण त्यांत काय आहे? तुह्मी आपलीं शस्त्रास्त्रें पाजळण्याचें सोडून गप्प काय बसलांत? मुरके मारा, निऱ्या करा, ' इश्श बाई ' ह्मणा. निदानींचें खुदूकन् हंसाल तर खरें? ह्मणजे पहाल प्रेमाचा लोंढा तुह्मांला आवरतो कीं काय तें. " याच आजोबांवर, समाजाच्या दुर्दैवानें आणि त्यांच्या सुदैवानें, जर का चवथा किंवा पांचवा विवाह करावयाची पाळी आली तर वधूचें रूप वगैरे पाहण्यांत ते तरण्या बांडासही मागें सारतील! असो, कोळसा उगाळावा तितका काळाच.

बालविवाहानें प्रेमाची वृद्धि कशी होते हें सांगतांना बापूसाहेब ह्मणतातः— " नवराबायकोचा परिचय फार दिवसांचा असल्यानें परस्परांचे स्वभाव, प्रपंच मांडण्याचे आधीं पुष्कळ दिवस त्यांस समजून येतात. त्यामुळें पुढें पश्चात्तापास कारण उत्पन्न होत नाहीं. " नुसतें स्वभावांचें ज्ञान असलें ह्मणजे पश्चात्तापास कारण रहात नाहीं, याचा अर्थ काय? केवळ स्वभावज्ञानानें जगांतील वैवाहिक असंतोष नाहींसा होत असेल तर बापूसाहेबांनीं जगावर अनंत कोट उपकार केले आहेत असें ह्मणावें लागतें. एकूण प्रत्येक विवाहाच्या वेळीं " वर हा मोठा मारका, दुष्ट, विषयलंपट, मूर्ख आणि लबाड आहे; आणि वधू ही खुनशी, कजाग, आळशी, बोलकी आणि अनीतिमान् आहे " अशा अर्थाचा एक प्राकृत मंत्र वैवाहिक मंत्रांमध्यें घुसडून दिला कीं झालें काम. जर का एखादा दोष वधूवरांच्या अंगीं लावावयाचा चुकून राहिल

तर मात्र मसलत फसेल ! पण दुर्गुणांची यादी पुरी असली आणि ती वधूवरांपुढें घडघड वाचून दाखविली ह्मणजे त्यांच्यामध्यें धुसफुस होण्याचें कारणच उरलें नाहीं ! ग्रंथकर्त्याच्या हातचलाखीची थोडी तरी कल्पना वाचकांस या लपंडावावरून खात्रीनें करितां येईल.

ग्रंथकारांची वैवाहिक प्रेमाची कल्पना फारच विलक्षण आहे. त्यांच्या मतें प्रेम ही वस्तु कापरासारखी उडून जाणारी आहे. जर का तिच्यावर लज्जेचें दडपण असेल तरच ती या मृत्युलोकांत वास्तव्य करील; नाहींतर भुर्रकन आकाशांत उडून जाईल. ही कल्पना ग्रंथकारांस कदाचित् पाश्चात्य चित्रकारांनीं काढिलेल्या मदनाच्या चित्रांवरून सुचली असावी. त्यांतील मदनाला पंख पाहून ग्रंथकारांनीं आपल्याही प्रेमविषयक कल्पनेला फांटे फोडिले असावेत ! एकूण ज्या लोकांत स्त्रियांमध्यें आपल्याइतकी लज्जा नसेल त्या लोकांमधील—उदाहरणार्थ इंग्रज लोकांमधील—जोडप्यांत उज्ज्वल प्रेम मुळींच आढळून येत नसलें पाहिजे. इतकेंच नाहीं तर आपणामध्यें सुद्धां नवराबायको एकांतांत असतांना त्यांचें प्रेम खिडकीवाटे पोबारा करीत असल्यास नवल नाहीं पण प्रेमाच्या या शीघ्रवाहित्वाची मीमांसा केल्यावर लागलींच ग्रंथकार सात्त्विक प्रेमाची व्याख्या करितांना ह्मणतातः—“ विलायतचे ग्लाडस्टन्साहेब व त्यांची पत्नी यांमध्यें सात्त्विक प्रीति असावी असें त्या उभयतांच्या वर्तनावरून दिसून येतें; असे दुसरेही कित्येक महात्मे तिकडे असतील. ” आतां या दोन विधानांची सांगड घालावी कोणी ? बापूसाहेब ह्मणतील: “ मी हवें तसें बरळलों ह्मणून विद्याधरानें तें पुस्तकांत नमूद करावयाचें नव्हतें. ” विद्याधरपंत ह्मणतीलः “ मी कसेंही असंबद्ध लिहिलें ह्मणून प्रिन्सिपाल गोळ्यांनीं तें छापावें कां ? ” प्रिन्सिपाल गोळे कानांवर हात ठेवून ह्मणतील: “ मी नुसत्या छापण्याचा आणि एक लांबलचक प्रस्तावना जोडण्याचा धनी, इतर गोष्टींशीं माझा कांहीं संबंध नाहीं. ” त्रिस्थळीं यात्रा करूनही अशीं मासलेवाईक उत्तरें मिळाल्यावर वाचकांची जी त्रेधा उडेल ती विचारावयास नको.

सात्त्विक प्रेमाचा उद्भव आणि व्यावहारिक फायदा असे बालविहाचे दोन धनात्मक परिणाम सांगून नंतर ग्रंथकार एक ऋणात्मक फायदा सांगतात. तो फायदा ह्मणजे बालविवाहानें स्त्रिया व्यभिचारी निघत नाहींत हा. पण यासंबंधानें येथें विस्तार करण्याऐवजीं ग्रंथकारांच्याच शब्दांनीं त्याचें खंडन करावें हें बरें. रामचंद्र व सीता यांच्या प्रेमाच्या वाढीचा इतिहास नमूद करितांना ग्रंथकार बापूसाहेबांकडून वदवितात:—“ रजोदर्शनापूर्वी कामवासना उत्पन्न होत नाहींत, व त्यानंतरही **बरेच दिवस** त्या उत्पन्न होण्याचें कारण नसतें; परंतु असें घडण्यास घरांतील वडील माणसांनीं मुलांवर नजर ठेविली पाहिजे. सुशील घराण्यांत हें **सर्वदा साध्य** असतें. ”

आतां बापूसाहेब बालविवाहाविरुद्ध येणाऱ्या आक्षेपांचें निराकरण कसें करितात तें पाहूं. बालविवाहापासून स्वतः वधूवरांस, संततीस आणि समाजास अनेक प्रकारचे तोटे होतात. त्यांपैकीं मुख्य स्थान शारीरिक हानीस दिलें असतां वावगें होणार नाहीं. यावर बापूसाहेबांचें उत्तर असें आहे:—पुरातन कालापासून आजमितीपर्यंत या देशांत बालविवाहाची चाल चालत आलेली आहे; असें असून आजपर्यंत शारीरिक ऱ्हास न होतां ज्या अर्थी तो याच पिढींत होत असलेला

दिसत आहे त्याअर्थी त्या ऱ्हासास बालविवाहाव्यतिरिक्त कारण असलें पाहिजे. या उत्तरास प्रत्युत्तर फार सोपें आहे. शरीराचा ऱ्हास आणि बालविवाह यांचा अशा रीतीचा कार्यकारणभाव आहे कीं बालविवाह दिसला कीं त्या मागोमाग होणाऱ्या ऱ्हासाचें खात्रीपूर्वक भविष्य करावयास कांहीं हरकत नाहीं. याचें कारण उघड आहे. ज्या गर्भाची शय्या अंगुष्ठमात्र लांबीची असावयाची तो गर्भ बाहेर राक्षसाच्या रूपानें न येतां वामनरूपानेंच यावयाचा हें सांगावयास वैद्यकीची फारशी जरूर नाहीं. आतां आजपर्यंत शरीराची हानि विशेष कां झाली नाहीं याचें कारण एक तर आपणामध्यें पूर्वीं बालविवाहाची चाल नव्हती हें, किंवा ती असून तिचे परिणाम रोंखून धरण्याला दुसरीं कारणें अस्तित्वांत होतीं हें असलें पाहिजे. बालविवाह आपणामध्यें किती दिवसांपासून आहे या प्रश्नाचा निर्णय पंडितवर्य प्रो. रा. रा. भागवत यांनीं नुक्ताच आपल्या " पुनरुद्वाह " या निबंधांत केला आहे. ब्राह्मणांमध्यें देखील बालविवाह फार अलीकडे सुरू झाला असें त्यांनीं सप्रमाण सिद्ध केलें आहे. आणि जरी घटकाभर बालविवाहाचें प्राचीनत्व कबूल केलें तरी आपल्या दांडग्या सवयी, शिक्षणाचा अभाव इत्यादि कारणांनीं त्याचे अनिष्ट परिणाम फारसे जाणवले नाहींत यांत विशेष आश्चर्य मानावयास नको.

बालविवाहानें पुरुषाच्या कर्तृत्वास प्रतिबंध होतो असा आक्षेप आणिल्यास त्यावर बापूसाहेब उत्तर देतातः—अशा प्रकारचा प्रतिबंध होणें शक्यच नाहीं. कारण पुरुष एखाद्या असामान्य उद्योगांत पडल्यास त्यांच्या स्त्रियांचा संभाळ करण्यास घरीं मातापितर तयार असतात. दुसरें असें कीं स्त्रिया पुरुषाच्या कर्तृत्वास आड कधीं येत नाहींत. कारण " आपलें घराणें ऊर्जित दशेस यावें ही इच्छा स्त्रियांमध्यें जेवढी प्रबळ असते, तेवढी पुरुषांतही नसते. " कां ? कशी दिली सुधारकांची रेवडी उडवून ? पुन्हा चकार शब्द काढितील कीं नाहीं !

साहसास प्रवृत्त होणाऱ्या पुरुषास मुख्य काळजी कायती स्त्रियेच्या अन्नपाण्याबद्दल किंवा तिच्या प्रतिबंधाबद्दलच असते असा जर बापूसाहेबांचा समज असेल तर तो चुकीचा आहे. कोणत्याही साहसाच्या उद्योगास जिवाची बेफिकिरी अवश्य लागते. पण ती आह्मां ब्राह्मण लोकांत—ह्मणजे सर्व उच्च जातींमध्यें—केवळ अशक्य असते. कारण पुरुषाच्या मरणाचे स्त्रीच्या जीवितावर अनिष्ट परिणाम जसे आह्मांमध्यें घडून येतात तसे फारच थोड्या लोकांत घडून येत असतील. अंथरुणास खिळलेल्या आणि एक दोन घटकेचा सोबती असणाऱ्या पुरुषाच्या डोळ्यांसमोर यमाचा पाश व दंड दिसण्या ऐवजीं न्हाव्याची धोपटी, वस्तरा, आणि पोळपाट लाटणें दिसूनच त्याचा जीव खालीं वर होत असेल. सरतेशेवटीं पुरुष मरतो, आणि बायको यमयातना भोगीत रहाते !

बालविवाहाचें ३५ व्या भागांत विवेचन करितांना त्यापासून होणारा आणखी एक अनिष्ट परिणाम भाऊसाहेबांच्या सांगण्यांत आला आहे. तो हाच कीं विधुराचा लहान मुलीशीं संबंध घडून आल्यानें स्त्रीस अकालीं मृत्यु, अंगवैकल्य वगैरे गोष्टी प्राप्त होतात, व प्रौढ स्त्रियांचा विवाह सर्वसंमत झाल्यानें अर्थात् ही अडचण दूर होईल. या आक्षेपावर उत्तरादाखल ह्मणून ३६ व्या भागांत भाऊसाहेबांनीं " निदान हल्लीं तरी मध्यम वयांतील पुरुष एक दोन मुलें असल्यास या कार्यास

( द्वितीय विवाहास ) तयार होत नाहींत. लोकमताचा अंदाज घेतां ही एक प्रबळ रूढि होणार असें लक्षण दिसतें." असा मोघम आशीर्वाद देऊन ठेविला आहे. पण जरी हा आशीर्वाद प्रमाणभूत मानिला तरी ज्यांना एकही मूल नाहीं अशा विधुरांच्या विवाहाची अडचण राहिली ती राहिलीच.

ग्रंथकारानें बालविवाहावरील जे थोडे आक्षेप ग्रथांत देऊन त्यांचें निराकरण करण्याचा प्रयत्न केला आहे ते सर्व मिळून एकंदर आणितां येण्यासारख्या आक्षेपांचा अल्प अंश होत. एक तर वधूवर लहान असल्यामुळें त्यांचे स्वभाव पक्वदशेप्रत आलेले नसतात, त्यामुळें परस्परांच्या स्वभावांतील वैषम्य विवाहाच्या वेळीं दिसून येत नाहीं; पण जों जों दोघें वयानें वाढत जातात तों तों तें अधिकाधिक दिसून येऊन उत्तरोत्तर वाढत जाणाऱ्या असंतोषास कारण होतें. लहानपणीं वधूवरांच्या दृष्टीस एकमेकांचे दोषच पडत असल्यामुळें परस्परांविषयीं सन्मानबुद्धि कितीशी जागृत रहात असेल याचीही शंकाच आहे. इतकेंच नाहीं तर बायकोदेखत पंतोजीनें केलेली उचलबांगडी, आईबापांनीं दिलेला मार वगैरे अपमानाच्या गोष्टी वारंवार पाहून नवऱ्याचा स्वाभिमान कितीसा टिकत असेल याचाही संशयच आहे. सासूकडून होणारा सुनेचा जाच तर सर्वप्रसिद्ध आहे. त्यामुळें पुष्कळदां सुनेच्या शरीराची माती होऊन सास्वासुनांमध्यें जन्माचें वैर पडल्याचें पुष्कळांच्या पहाण्यांत आहे. सासरीं कामाचा रगाडा सुनेच्याच माथ्यावर पडत असल्यामुळें श्रम आणि काळजी यांच्या योगानें तिच्या हाडांचीं काडें कशीं होतात हेंही नव्यानें सांगावयास नको. प्रथम वधूवरांचा जोडा उंचीनें परस्परांस शोभण्यासारखा असून नंतर मुलीची अंगकाठी फोंफावत गेल्यामुळें तोच जोडा कालांतरानें कसा गंगाजमनी दिसावयास लागतो हेंही पुस्तकांत वाचण्यापेक्षां अनुभवानेंच चांगलें कळण्यासारखें आहे. बालविवाहामुळें स्त्रीशिक्षणास कसा अकालीं मृत्यु येतो याचा अनुभव कुटुंबवत्सल मनुष्यास चांगलाच येत असेल. एखादी हुशार मुलगी मराठी तीनचार इयत्ता शिकून ट फ करावयास लागते न लागते तोंच पिंवळी होऊन गृहिणीपदास पोहोचविली जाते. सासरीं सासूच्या जाचाखालीं, नणदांच्या जुलमाखालीं, जावांच्या मत्सराखालीं आणि गृहकृत्याच्या ओझ्याखालीं त्या शिक्षणाची कशी काय वाढ होते याची चौकशी न केलेली बरी. बालविवाहाचा एक फारच अनिष्ट परिणाम ह्मटला ह्मणजे बालवैधव्य हा आहे. सदतिसाव्या भागांत दिलेल्या कोष्टकावरून दिसतें कीं चौदा वर्षांच्या आंतल्या वयाच्या मुलींमध्यें सुवासिनी आणि विधवा यांचें प्रमाण जवळ जवळ १७:१ असें आहे. याचा अर्थ इतकाच कीं केवळ लग्न चौदा वर्षांच्या आंत झाल्यामुळें अठरा मुलींपैकीं एकीस संसारसुखाचा गंध न मिळतां जन्मभर कोपऱ्यांत रडत बसावें लागतें. आणि याचें सर्व श्रेय कुणीकडून तरी मुलीस पिंवळी करून आपणावरची जबाबदारी काढूं पहाणाऱ्या आणि बाप ह्मणविणाऱ्या कसाबास!

भाऊसाहेब ह्मणतातः-"बालपणीं विवाह झालेल्या जोडप्यांत प्रेम नसतें, अशीं शंभरांत पन्नास उदाहरणें असतीं, तर बालविवाह तेव्हांच बंद पडला असता." वाहवा! केवढें तरी जाडें तर्कज्ञान हें! एकूण प्रत्येक समाजांत

आजपर्यंत ज्या चाली दम धरून राहिल्या आहेत त्या फारच चांगल्या असतात तर? घरीं पाहुणा आला असतां त्याच्या चरणसेवेला घरांतील स्त्रियांना पाठविण्याची जी चाल एका रानटी जातींत टिकाव धरून राहिली आहे ती सर्वोत्कृष्टच ह्मणावयाची? तशी असेल तर भाऊसाहेबांनीं ती आपल्या घरांत अवश्य सुरू करावी. आमच्या ह्मणण्याला भाऊसाहेबांच्या घरीं पाहुणचार घेणारा विद्याधर मान तुकावील यांत आह्मांला तिळप्रायही संशय वाटत नाहीं. केवळ वरील विधानाच्या जोरावर या ग्रंथांतील पाहिजे त्या घाणेरड्या सिद्धांताचें समर्थन करितां येईल. इतकेंच नाहीं तर " हिंदुधर्म आणि सुधारणा " हें पुस्तकही एकवर्ष जगल्यामुळें सर्वोत्तम ठरलें जाईल!

पण बालविवाहाचा सर्वांत अनिष्ट परिणाम अजून सांगावयाचा राहिलाच आहे. आपणांमध्यें हल्लीं जो दैववाद हाडीं पिंडीं खिळून गेला आहे तो बालविवाहाचेंच अपत्य होय. विवाह ह्मणजे आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. बायको जशी मिळेल त्याप्रमाणें संसार गोड किंवा कडू व्हावयाचा, मुलें सशक्त किंवा रोगी निपजावयाचीं, त्यांचें शिक्षण पूर्ण किंवा अपूर्ण व्हावयाचें, नवरा संपन्न किंवा कर्जबाजारी व्हावयाचा. फार कशाला? हल्लीं बोलके सुधारक आणि कर्ते सुधारक असा जो भेद निघाला आहे त्याच्या मुळाशीं पाहूं गेलें तर गृहिणीच सांपडावयाची. अशी जी आयुष्यांतील सुखदुःखाचें नियमन करणारी देवता ती जर पुरुषास कळूं लागण्यापूर्वीं त्याची संमति न घेतां परक्यांनींच निवडून त्याच्या शिरावर लादली तर विचारस्वातंत्र्य आणि आचारस्वातंत्र्य यांवरील त्याची निष्ठा उडून तो दैवाचा बंदा गुलाम बनल्यास नवल नाहीं.

आतां पुनर्विवाहाचा विचार करूं. या ग्रंथांतील या संबंधाचा भाग वाचतांना सामान्य वाचकाच्या चित्तावर हजारों दुःखाचे तरंग उठतात. प्रथमतः विधवेची अनाथ आणि करूणरसपूर्ण मूर्ति डोळ्यांसमोर उभी रहाते. या दुर्दैवी प्राण्यानें असा कोणता अपराध केला होता कीं, तिचें सौभाग्य नष्ट होतांच तिच्या दुःखावर डाग देण्याकरितांच कीं काय, तिच्या आप्तांनीं तिचें सौंदर्य हिरावून हातीं पोळपाट लाटणें देण्याला तयार व्हावें? ज्या चांडाळहृदयी भिक्षुकानें मधल्यामध्यें पैसा खाऊन एखाद्या बालिकेस एका थेरड्याच्या गळ्यांत बांधून तिजवर अकालीं वैधव्य आणिलें, तोच अधमाधम मंगलविधीमध्यें श्रेष्ठ गणिला जाऊन त्याच बालिकेचें दर्शन होतांच अपशकुन समजतो! एखादें मांजर समोर आलें कीं जितका उत्साहभंग होत नाहीं तितका विधवेचें तोंड दिसतांच होतो! स्वतःच्या एकुलत्या एक मुलाचा विवाहविधि कौतुकानें पहाण्याकरितां बोहल्यापर्यंत येण्याचीही त्या बापडीला चोरीच! अशा अपेष्टेमध्यें जर का त्या बिचारीचें वांकडें पाऊल पडलें तर तिची दैना विचारावयासच नको. जो समाज तिच्या दुराचरणाबद्दल सर्वथा जबाबदार तोच तिची विटंबना करण्यांत प्रमुखत्वानें वागतो! शेवटीं आईबापांकडून विषप्रयोग होऊन, स्वतः विहिरींत उडी टाकून, किंवा बालहत्या झाली असल्यास फांसावर लटकून तिच्या दुःखपूर्ण जीविताचा अंत होतो!

आधींच दुःखानें होरपळलेल्या या अभागिनीस भाऊसाहेबांनीं आपल्या तर्कशास्त्राच्या

भट्टींत ज्या रीतीनें भाजण्याचा सपाटा लाविला आहे ती पाहून मन थक्क होऊन क्षणभर तिच्या दुःखाचाही विसर पडतो. दुःखी मनुष्याबद्दल मन कळवळून जाणें हा मानवाचा देहधर्म आहे. या स्वाभाविक प्रेरणेला एकीकडे सारून जो त्या दुःखापासूनही एक तऱ्हेचें सुख मानितो त्या अधमाला चार पाय नाहींत म्हणूनच पशु म्हणावयाचें नाहीं, आणि विशाल देह नाहीं म्हणूनच राक्षस म्हणावयाचें नाहीं. ही कडक भाषा आह्मांस योजावी लागत आहे याबद्दल निरुपाय आहे. भाऊसाहेबांसारख्या कठिण पाषाणाच्या संसर्गानें आमच्या लेखनीचें टोंक तीक्ष्ण झाल्यास त्याचा दोष आह्मांकडे येत नाहीं.

भाऊसाहेबांनीं प्रथमतः पुनर्विवाहाच्या चालीपासून होणारा मोठा तोटा सांगून नंतर तीपासून विशेष कोणतेही नफे नाहींत असें प्रतिपादन केलें आहे; व सरतेशेवटीं पुनर्विवाह न केल्यानें विधवा स्त्रीस व तिच्या आप्तांस होणारे फायदे सांगून आपलें आख्यान संपविलें आहे. आतां पुनर्विवाहाचा मोठा तोटा कोणता ? तर प्रातिव्रत्याच्या बंधनाची शिथिलता. बालविवाहाची आवश्यकता प्रतिपादितांना भाऊसाहेबांनीं पातिव्रत्यासंबंधानें असे उद्गार काढिले आहेतः— "स्त्रीनें ईश्वराची व वडिलांची आज्ञा म्हणून पातिव्रत्य पाळलें पाहिजे. धर्म, शिष्टाचार आणि कायदा म्हणून तें पाळिलें पाहिजे. नवऱ्याशीं व स्वतःशीं करार म्हणून तें पाळलें पाहिजे. याशिवाय प्रेमानें व कुटुंबदयेनेंही तें पाळावें हें उचित आहे." या शुष्कशब्दजालानें स्त्रीचें समाधान होणार नाहीं हें भाऊसाहेब पूर्णपणें जाणून आहेत. कारण लागलींच तें असेंही ह्मणतातः—"कामरूपी मनोवृत्ति किंवा शरीरवृत्ति इतकी प्रबळ आहे कीं हीं इतकीं बंधनेंही स्त्रीस निर्वंधांत ठेवूं शकणार नाहींत." असो. ईश्वरानें पुरुषास हव्या तितक्या बायका करण्याची परवानगी ठेवून स्त्रीस मात्र कडकडित पातिव्रत्य ठेवण्याची आज्ञा केव्हां दिली ? वडिलांनीं आणि कुटुंबानें विधवेला कोणत्या तऱ्हेची दया दाखविली असते ह्मणून तिनें त्यांची आज्ञा पाळण्याकरितां किंवा त्यांजवर दया करण्याकरितां आपलें पातिव्रत्य उज्ज्वल ठेवावें ? धर्म, शिष्टाचार आणि कायदा या जाणून बुजून बदलणाऱ्या गोष्टी आहेत; आणि त्यांपैकीं धर्म व कायदा तर विधवेचीच तरफदारी करितात. ज्यावेळीं मराठी भाषेचाही अर्थ वधूला पूर्णपणें उकलतां येत नाहीं अशा अज्ञान दशेंत बोबडया बोलांनीं उच्चारिलेल्या संस्कृत वाक्यांमुळें जर नवऱ्याशीं किंवा स्वतःशीं करार उपस्थित होत असेल तर करार कायदेशीर व्हावयाला हेतु अवश्य आहे हें तत्त्व भाऊसाहेबांनीं ऐकिलें तरी नसावें किंवा जाणूनबुजून ते त्याकडे डोळेझांक तरी करीत असावेत. पातिव्रत्याची जशी समाजाला आवश्यकता आहे तशी पुरुषाच्या निर्मळ वर्तनाची नाहीं कीं काय ? वगैरे अनेक प्रश्नही याबरोबरच उत्पन्न होतात.

विवाहविधीमध्यें वधूवरांनीं उच्चारिलेल्या मंत्रांमुळें करार उत्पन्न होतो असें जरी क्षणभर गृहीत धरिलें तरी तो करार पतीच्या आयुष्यापुरताच धरावयाचा, का वधूच्या आयुष्यापुरता धरावयाचा, का पुढील जन्मांनाही लागू करावयाचा ? दुसरें असें कीं, पातिव्रत्य याचा अर्थ कोणता घ्यावयाचा ? एका पतीशींच इमानानें वागणें, का तो मेल्यावर ज्याच्याशीं संबंध घडून येईल त्याच्याशींही तितक्याच इमानेंइतबारें

वागणें ? दुसऱ्या पतीशीं विवाह केल्यानें स्त्रियांच्या पातिव्रत्यासंबंधीं कल्पनेंत भयंकर क्रांति होण्याचा संभव आहे कीं काय ? आजपर्यंत पुरुषांनीं दोन दोन तीन तीन बायकांशीं एकापाठीमागून एक लग्नें केल्यानें समाजाची कोणती उलथापालथ झाली आहे ? इंग्लंडसारख्या देशांत पातिव्रत्याचे पाश खळ्कन तुटल्यानें समाजाची दिवसेंदिवस भरभराट होत आहे का हानि होत आहे ?

भाऊसाहेब ह्मणतातः—“ पातिव्रत्याचे जे असे बळकट पाश स्त्रियांमध्यें स्वभावतः अवतरतात ते थोड्याशा सुखदुःखाकरितां कां छिन्नभिन्न करावे ”? पातिव्रत्याचे बळकट पाश कोणते ? नुकेंच वर भाऊसाहेबांनीं कामरूपी मनोवृतीच्या किंवा शारीरवृत्तीच्या प्राबल्याबद्दल एक व्याख्यान दिलें तें इतक्यांतच ते विसरले कीं काय ? पण भाऊसाहेबांकडून संगतवारपणाची अपेक्षा करणें ह्मणजे स्वतःच विसंगतपणाचा दोष करण्यासारखें आहे. “ थोड्याशा सुखदुःखाकरितां ” पातिव्रत्याचे पाश छिन्नभिन्न न करण्यासंबंधानें भाऊसाहेब उपदेश करितात; पण “ थोडेसें सुखदुःख ” या शब्दांची फोड त्यांनीं कोठेंच केली नाहीं. सुखाची किंवा दुःखाची उत्कटता मोजणारें उष्णतामापक यंत्र सांपडावें तरी कोठें ? खुद्द भाऊसाहेबांच्या हृदयासंबंधानें विचार केला तर दुःखाग्नींत होरपळणाऱ्या विधवेच्या डोळ्यांतून वहाणाऱ्या उष्ण अश्रुबिंदूंच्या प्रवाहांत किंवा पतिदर्शनानें सुखपर्वतावर बसणाऱ्या स्त्रीच्या शीतळ आनंदाश्रूंच्या ओघांत कर्तें पाण्याची चलबिचल यत्किंचित् सुद्धां दाखवणार नाहीं. स्वतः विधवेसंबंधानें विचार केला, तर तिला वैधव्यदुःख “ थोडेसें ” वाटत नसून दुःखाचा कळस वाटत असतें. आह्मांस तर प्रेक्षकाच्या लहरीवरून दुःखाची उत्कटता मोजण्यापेक्षां दुःखी मनुष्याच्या हृदयावरून ती मोजणें पसंत आहे.

पुनर्विवाहापासून कोणतेही फायदे होत नाहींत असें भाऊसाहेबांचें मत आहे. प्रथम तर पुनर्विवाह शक्यच नाहीं असें विधान करून नंतर जरी तो शक्य असला तरी त्यापासून कोणताही असाधारण फायदा होत नाहीं असें दाखविण्याकरितां त्यांनीं धडपड केली आहे. पुनर्विवाह शक्य नाहीं हें ऐकून तर पुष्कळ वाचक बुचकळ्यांत पडतील. तो जर शक्य नाहीं तर तो हाणून पाडण्याला भाऊसाहेबांनीं मुद्दाम अवतार घेऊन इतकीं पानें पांढऱ्याचीं काळीं कां केलीं ? त्याचप्रमाणें इंग्लंड आणि हिंदुस्थान या देशांमध्यें असा कोणता महत्त्वाचा फरक आहे कीं त्यामुळें एका देशांत हवे तितके पुनर्विवाह व्हावे आणि दुसऱ्यांत सुधारक भगीरथ प्रयत्न करीत असून एकही पुनर्विवाह होऊं नये ? वाचकांचा गोंधळ दूर करण्याकरितां भाऊसाहेबांचीं प्रमाणें येथें संक्षेपानें देतों: रामरक्षा जशी पिशाचांवर रामबाण, तसेंच या ग्रंथांतील या संबंधाचें विवेचन पुनर्विवाहावर रामबाण आहे. तें वाचल्यावर बिशाद नाहीं एकही विधवेची पुनर्विवाह करण्याची. त्याचा इंग्रजी तर्जुमा करून त्याच्या प्रती युरोपमध्यें फैलावल्यास तिकडेही पुनर्विवाह बंद पडेल अशी आशा करण्याला जागा आहे.

भाऊसाहेब ह्मणतातः—१९ पासून २० वर्षांपर्यंतच्या मुलांचे प्रथम विवाह नेहमी कन्यांशींच होणार; कारण त्यांना भुलवावयास विधवांच्या जवळ तारुण्याचें किंवा पैशाचें आमिष नसतें. ( सौंदर्याचें किंवा ज्ञानाचें आमिष

भाऊसाहेबांच्या राज्याच्या हद्दींत खिसगणतींत धरिलें जात नाहीं. ) दुसरें असें कीं, पहिलाच विवाह विधवेशीं करणें अमंगल मानिलें जाईल. बरें, हीं मुलें पहिली बायको जिवंत असतांना विधवेशीं लग्न करितील असें ह्मणावें तर ही चाल रूढीनें हल्लीं बंदच पाडिली आहे. ( ही चाल नर्मदातीरावरच विशेषेंकरून बंद पडल्यासारखी दिसते. कारण इतर ठिकाणीं एकाच वेळीं सवती सवती नांदत असल्याचें पुष्कळदा दिसून येतें. ) अशा प्रकारें मुलांची विल्हेवाट लावून टाकिली. आतां राहिले विधुर. हे तरूण असले तर प्रथम वरांतच गणिले जाऊन त्यांना मुली मिळतात. ( जोंपर्यंत मुली मिळत आहेत तोंपर्यंत कोणीही पुरुष विधवेकडे ढुंकून पहाणार नाहीं ! जगांतल्या सर्व लहान मुली नाहींशा झाल्या तरच कुठें विधवेवर लग्नाची पाळी यावयाची ! ) मध्यम वयांतील विधुर जर समंजस असतील तर पुनः पुनः लग्नच करणार नाहींत, मग विधवेशीं लग्न करण्याचा प्रश्न लांबच राहिला, ( बरें, समंजस नसतील तर ? पण भाऊसाहेबांच्या राज्यांत मध्यम वयांतील सगळेच पुरुष समंजस असावेसें दिसतें. यास प्रमाण खुद्दांची स्वारी ! ) आतां राहल्यांपैकीं राहिले उतार वयांतील कामांध किंवा संतानेच्छु पुरुष. यांपैकीं पहिल्या वर्गानें विधवांशीं विवाह करण्यास भाऊसाहेबांची कांहींच हरकत नाहीं. ( हरकत नसण्याचें कारण त्यांनीं स्वतःच पुढें दिलें आहे. ते ह्मणतात: "ते ···· निरुपाय झाल्यावांचून विधवेकडे वळणार नाहींत. रतिसुखाचे जे मार्मिक शोकी त्यांचा हा स्वभावच आहे; त्यास तुह्मी आह्मी काय करणार ? " ) संतानेच्छु पुरुष धर्मवेडाच असला पाहिजे. आणि तसा असल्यावर तो विधवेशीं विवाह करणार नाहीं. धर्मवेडा नसेल तर त्याला विधवेशीं लग्न करण्यालाही शिष्टाचार संमति देणार नाहीं. ( शिष्टाचारानें संमति दिली नाहीं तर घोडेंच अडलें ! )

एवंच, कोणताही पुरुष विधवेशीं लग्न करणार नाहीं. उलटपक्षीं, विधवाही कोणा पुरुषाशीं लग्न करणार नाहींत. कारण, सदाचारी विधवांपैकीं ज्या गरीब असतील त्यांच्याजवळ पैशाचें आमिष नसल्यामुळें त्यांचा विवाह होणार नाहीं; मिळवित्या असतील त्या गरीबांशीं किंवा वृद्धांशीं विवाह करण्यास तयार होणार नाहींत. दुराचारी विधवांपैकीं श्रीमंत असतील त्या लग्न करून आपली स्वतंत्रता गमावणार नाहींत, गरीब असतील त्या गरीबांशीं लग्न करणार नाहींत.

याप्रमाणें दांत आहेत तर चणे नाहींत, चणे आहेत तर दांत नाहींत, अशी पुरुषांची आणि विधवांची अवस्था होऊन पुनर्विवाहाची चाल अशक्य आहे असें मुद्देसूद प्रमाणांनीं ठाम ठरलें खरें !

आतां पुनर्विवाहापासून विशेष फायदे नाहींत, हें भाऊसाहेब कसें शाबीत करतात तें पाहूं:— पुनर्विवाहापासून फार झालें तर वैवाहिक सुख मिळेल. या पलीकडे त्याचा मोठासा उपयोग नाहीं. आतां या सुखाबद्दल विधवा स्त्रीस जर एखादा चांगला मोबदला मिळेल तर तिला त्या सुखाची विशेष मातब्बरी वाटणार नाहीं. हा मोबदला पुष्कळ स्त्रियांना अपत्यविषयक प्रेमाच्या रूपानें येतो. ज्यांना स्वतःचें अपत्य नसेल त्या दुसऱ्याचें अपत्य दत्तक घेऊन त्याच्या जीवावर वैवाहिक स्थिति तुच्छ मानितात. दत्तक घेण्याची चाल दिवसानुदिवस विशेष रूढ होत जाणार असें भाऊसाहेबांच्या होऱ्यांत

वागणें ? दुसऱ्या पतीशीं विवाह केल्यानें स्त्रियांच्या पातिव्रत्यासंबंधीं कल्पनेंत भयंकर क्रांति होण्याचा संभव आहे कीं काय ? आजपर्यंत पुरुषांनीं दोन दोन तीन तीन बायकांशीं एकापाठीमागून एक लग्नें केल्यानें समाजाची कोणती उलथापालथ झाली आहे ? इंग्लंडसारख्या देशांत पातिव्रत्याचे पाश खळ्कन तुटल्यानें समाजाची दिवसेंदिवस भरभराट होत आहे का हानि होत आहे ?

भाऊसाहेब ह्मणतात:—" पातिव्रत्याचे जे असे बळकट पाश स्त्रियांमध्यें स्वभावत: अवतरतात ते थोड्याशा सुखदुःखाकरितां कां छिन्नभिन्न करावे "? पातिव्रत्याचे बळकट पाश कोणते ? नुकेंच वर भाऊसाहेबांनीं कामरूपी मनोवृत्तीच्या किंवा शरीरवृत्तीच्या प्राबल्याबद्दल एक व्याख्यान दिलें तें इतक्यांतच ते विसरले कीं काय ? पण भाऊसाहेबांकडून संगतवारपणाची अपेक्षा करणें ह्मणजे स्वतःच विसंगतपणाचा दोष करण्यासारखें आहे. " थोड्याशा सुखदुःखाकरितां " पातिव्रत्याचे पाश छिन्नभिन्न न करण्यासंबंधानें भाऊसाहेब उपदेश करितात; पण " थोडेंसें सुखदुःख " या शब्दांची फोड त्यांनीं कोठेंच केली नाहीं. सुखाची किंवा दुःखाची उत्कटता मोजणारें उष्णतामापक यंत्र सांपडावें तरी कोठें ? खुद्द भाऊसाहेबांच्या हृदयासंबंधानें विचार केला तर दुःखाग्नींत होरपळणाऱ्या विधवेच्या डोळ्यांतून वहाणाऱ्या उष्ण अश्रुबिंदूंच्या प्रवाहांत किंवा पतिदर्शनानें सुखपर्वतावर बसणाऱ्या स्त्रीच्या शीतल आनंदाश्रूंच्या ओघांत तें पाऱ्याची चलबिचल यत्किंचित् सुद्धां दाखवणार नाहीं. स्वतः विधवेसंबंधानें विचार केला, तर तिला वैधव्यदुःख " थोडेंसें " वाटत नसून दुःखाचा कळस वाटत असतें. आह्मांस तर प्रेक्षकाच्या लहरीवरून दुःखाची उत्कटता मोजण्यापेक्षां दुःखी मनुष्याच्या हृदयावरून ती मोजणें पसंत आहे.

पुनर्विवाहापासून कोणतेही फायदे होत नाहींत असें भाऊसाहेबांचें मत आहे. प्रथम तर पुनर्विवाह शक्यच नाहीं असें विधान करून नंतर जरी तो शक्य असला तरी त्यापासून कोणताही असाधारण फायदा होत नाहीं असें दाखविण्याकरितां त्यांनीं धडपड केली आहे. पुनर्विवाह शक्य नाहीं हें ऐकून तर पुष्कळ वाचक बुचकळ्यांत पडतील. तो जर शक्य नाहीं तर तो हाणून पाडण्याला भाऊसाहेबांनीं मुद्दाम अवतार घेऊन इतकीं पानें पांढऱ्याचीं काळीं कां केलीं ? त्याचप्रमाणें इंग्लंड आणि हिंदुस्थान या देशांमध्यें असा कोणता महत्त्वाचा फरक आहे कीं त्यामुळें एका देशांत हवे तितके पुनर्विवाह व्हावे आणि दुसऱ्यांत सुधारक भगीरथ प्रयत्न करीत असून एकही पुनर्विवाह होऊं नये ? वाचकांचा गोंधळ दूर करण्याकरितां भाऊसाहेबांचीं प्रमाणें येथें संक्षेपानें देतों: रामरक्षा जशी पिशाचांवर रामबाण, तसेंच या ग्रंथांतील या संबंधाचें विवेचन पुनर्विवाहावर रामबाण आहे. तें वाचल्यावर बिशाद नाहीं एकही विधवेची पुनर्विवाह करण्याची. त्याचा इंग्रजी तर्जुमा करून त्याच्या प्रती युरोपमध्यें फैलावल्यास तिकडेही पुनर्विवाह बंद पडेल अशी आशा करण्याला जागा आहे.

भाऊसाहेब ह्मणतात:—१९ पासून २० वर्षांपर्यंतच्या मुलांचे प्रथम विवाह नेहमी कन्यांशींच होणार; कारण त्यांना भुलवावयास विधवांच्या जवळ तारुण्याचें किंवा पैशाचें आमिष नसतें. ( सौंदर्याचें किंवा ज्ञानाचें आमिष

भाऊसाहेबांच्या राज्याच्या हद्दींत खिसगण-तींत धरिलें जात नाहीं. ) दुसरें असें कीं, पहिलाच विवाह विधवेशीं करणें अमंगल मानिलें जाईल. बरें, हीं मुलें पहिली बायको जिवंत असतांना विधवेशीं लग्न करितील असें ह्मणावें तर ही चाल रूढीनें हल्लीं बंदच पाडिली आहे. ( ही चाल नर्मदातीरावरच विशेषेंकरून बंद पडल्यासारखी दिसते. कारण इतर ठिकाणीं एकाच वेळीं सवती सवती नांदत असल्याचें पुष्कळदा दिसून येतें. ) अशा प्रकारें मुलांची विल्हेवाट लावून टाकिली. आतां राहिले विधुर. हे तरूण असले तर प्रथम वरांतच गणिले जाऊन त्यांना मुली मिळतात. ( जोंपर्यंत मुली मिळत आहेत तोंपर्यंत कोणीही पुरुष विधवेकडे ढुंकून पहाणार नाहीं! जगांतल्या सर्व लहान मुली नाहींशा झाल्या तरच कुठें विधवेवर लग्नाची पाळी यावयाची! ) मध्यम वयांतील विधुर जर समंजस असतील तर पुनः पुनः लग्नच करणार नाहींत, मग विधवेशीं लग्न करण्याचा प्रश्न लांबच राहिला, ( बरें, समंजस नसतील तर? पण भाऊसाहेबांच्या राज्यांत मध्यम वयांतील सगळेच पुरुष समंजस असावेसें दिसतें. यास प्रमाण खुद्दांची स्वारी! ) आतां राहल्यांपैकीं राहिले उतार वयांतील कामांध किंवा संतानेच्छु पुरुष. यांपैकीं पहिल्या वर्गानें विधवांशीं विवाह करण्यास भाऊसाहेबांची कांहींच हरकत नाहीं. ( हरकत नसण्याचें कारण त्यांनीं स्वतःच पुढें दिलें आहे. ते ह्मणतातः "ते....निरूपाय झाल्यावांचून विधवेकडे वळणार नाहींत. रतिसुखाचे जे मार्मिक शोकी त्यांचा हा स्वभावच आहे; त्यास तुह्मी आह्मी काय करणार?" ) संतानेच्छु पुरुष धर्मवेडाच असला पाहिजे. आणि तसा असल्यावर तो विधवेशीं विवाह करणार नाहीं. धर्मवेडा नसेल तर त्याला विधवेशीं लग्न करण्यालाही शिष्टाचार संमति देणार नाहीं. ( शिष्टाचारानें संमति दिली नाहीं तर घोडेंच अडलें! )

एवंच, कोणताही पुरुष विधवेशीं लग्न करणार नाहीं. उलटपक्षीं, विधवाही कोणा पुरुषाशीं लग्न करणार नाहींत. कारण, सदाचारी विधवांपैकीं ज्या गरीब असतील त्यांच्याजवळ पैशाचें आमिष नसल्यामुळें त्यांचा विवाह होणार नाहीं; मिळवित्या असतील त्या गरीबांशीं किंवा वृद्धांशीं विवाह करण्यास तयार होणार नाहींत. दुराचारी विधवांपैकीं श्रीमंत असतील त्या लग्न करून आपली स्वतंत्रता गमावणार नाहींत, गरीब असतील त्या गरीबांशीं लग्न करणार नाहींत.

याप्रमाणें दांत आहेत तर चणे नाहींत, चणे आहेत तर दांत नाहींत, अशी पुरुषांची आणि विधवांची अवस्था होऊन पुनर्विवाहाची चाल अशक्य आहे असें मुद्देसूद प्रमाणांनीं ठाम ठरलें खरें!

आतां पुनर्विवाहापासून विशेष फायदे नाहींत, हें भाऊसाहेब कसें शाबीत करतात तें पाहूं:- पुनर्विवाहापासून फार झालें तर वैवाहिक सुख मिळेल. या पलीकडे त्याचा मोठासा उपयोग नाहीं. आतां या सुखाबद्दल विधवा स्त्रीस जर एखादा चांगला मोबदला मिळेल तर तिला त्या सुखाची विशेष मातब्बरी वाटणार नाहीं. हा मोबदला पुष्कळ स्त्रियांना अपत्यविषयक प्रेमाच्या रूपानें येतो. ज्यांना स्वतःचें अपत्य नसेल त्या दुसऱ्याचें अपत्य दत्तक घेऊन त्याच्या जीवावर वैवाहिक स्थिति तुच्छ मानितात. दत्तक घेण्याची चाल दिवसानुदिवस विशेष रूढ होत जाणार असें भाऊसाहेबांच्या होऱ्यांत

आलें आहे. पण अपत्यवती आणि ज्यांनीं दत्तक घेतला आहे अशा विधवा जरी एकीकडे ठेविल्या तरी इतर विधवा बऱ्याच मोकळ्या राहतात. त्यांची काय वाट लावावयाची? ह्मणून भाऊसाहेब एक अजब युक्ति काढतात. "आतां शेवटीं **मातृत्वस्थितीचा**...व्यापक अर्थ करणें जरूर आहे." भाऊसाहेब राहिलेल्या सर्व विधवांना सरसकट मातृत्वदीक्षा देऊन टाकितात. "देशाच्या रक्षणाकरितां प्रतिक्षणीं हत्यार खांद्यावर ठेवून (प्रतिक्षणीं हत्यार खांद्यावर ठेवावयाचें कसें?) जन्मभर सरहद्दीवर उभा राहणाऱ्या शूर शिपायानें लग्न करून संतति उत्पन्न केली नाहीं ह्मणून प्रजारक्षणासंबंधानें त्याचा पितृत्वाचा मान कमी होतो काय? त्याप्रमाणेंच घडोघडीं कुटुंबांत ज्या आपत्ति येतात त्यांचें निवारण करण्यास, जीवाचीही पर्वा न करून, जी विधवा स्त्री नित्य व जन्मभर सज्ज उभी असते, तिचें पुनर्विवाह न केल्यानें मातृत्व गेलें काय?" (ऐका! ऐका!!) "स्वतंत्र आप्त स्त्रीची मदत हिंदु दंपत्यास किती आवश्यक असते तें पाहिल्यास कुटुंबांत नांदलेली विधवा स्त्री आप्तकृत्यें करण्याचें सोडून रतिसुखाकरितां पुनर्विवाहाची गोष्ट मनांत आणील हें संभवत देखील नाहीं." कशाला संभवेल? जेव्हां एखादा मुद्दा स्थापिण्याचें मनांत आणून ग्रंथकर्ता लिहूं लागतो तेव्हां वाटेल ती गोष्ट त्याला संभवनीय किंवा असंभवनीय दिसावयास लागते. देवानें शक्यतेसंबंधानें सृष्टींत जे नियम घालून दिले आहेत त्यांचा अंमल विसकटून टाकावयाला दुराग्रहासारखें चांगलें साधन नाहीं.

पतिप्रेमाबद्दल दुसऱ्या तऱ्हेचें प्रेम मिळाल्यास विधवा संतुष्ट रहातील हा सिद्धांत भाऊसाहेबांस कोठें गवसला आहे हें कळत नाहीं. पुरुषांमध्यें पाहिलें तर वाचनाचा अतोनात हव्यास असलेले गृहस्थ सुद्धां विवाह करण्यास हौशीनें तयार होतात. घरांत स्वतःची बालविधवा कन्या असूनही तिला सुख देण्याचें सोडून वृद्ध पिते तिजपेक्षांही लहान वधूस आपल्या सुरकुतलेल्या मांडीवर ओढण्यास उत्सुक झालेले दृष्टीस पडतात. पुरुषांमध्यें जर ही स्थिति, तर स्त्रियांमध्येंच निराळी कां असावी? त्याचप्रमाणें, हिंदु दंपत्यास स्वतंत्र स्त्रीची आवश्यकता असते ह्मणून विधवा पुनर्विवाहास राजी होणार नाहीं, या वाक्याचा अर्थ काय? एकाची आवडनिवड दुसऱ्याच्या गरजेवर अवलंबून असते कीं काय? समजा, एखादा भामटा येऊन भाऊसाहेबांच्या पागोट्यास हात लावून ह्मणूं लागला कीं "भाऊसाहेब, ज्या अर्थीं मला तुमच्या पागोट्याची आवश्यकता आहे त्याअर्थीं तुह्मी मला प्रतिबंध करण्याचें मनांत आणाल हें संभवत देखील नाहीं." तर भाऊसाहेबांनीं रडावें का हंसावें? हाच प्रकार दंपत्यांना असलेल्या आप्त स्त्रियांच्या आवश्यकतेसंबंधानें नाहीं काय? पण हाच झोटिंगपाच्छाईचा मासला विधवाविवाहाच्या सर्व विवेचनभर आढळून येतो.

उदाहरणार्थ, विधवांनीं पुनर्विवाह न केल्यानें समाजास कोणते फायदे होतात हें दाखवितांना भाऊसाहेब काय ह्मणतात तें पहा. या आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांनीं आपलें सर्व गणिती ज्ञान ओतलें आहे. ते ह्मणतातः—हिंदु समाजांत सरासरीनें ८०००० कुटुंबें आहेत. यांमधील दंपत्यस्थितींतील स्त्रियांना बाळंतपणाखातर १६००० विधवांची गरज लागते. अशा स्त्रियां-

च्या मृत्यूमुळें २००० विधवांची टंचाई वाटूं लागते. आजारी मुलांच्या शुश्रूषेकरितां २००० विधवांचा तरी पुरवठा पाहिजे. त्याप्रमाणेंच कुटुंबवत्सल स्त्रियांच्या मागें पोरांचें खिल्लार लागलें ह्मणजे त्यांना दळण्याकांडण्याकडे पहाण्यास फुरसद नसते. याशिवाय विटाळ-शीपण वगैरे गोष्टी ध्यानांत घेतल्या ह्मणजे दर कुटुंबाला एक विधवा याप्रमाणें ८०००० कुटुंबांना ८०००० विधवा आवश्यक आहेत. आतां निरंतर वैवाहिक सुखांत लोळणाऱ्या दंपत्यांना वैधव्यांत पोळणाऱ्या विधवांची आवश्यकता वाटली ह्मणजे विधवांनीं एका पायावर तयार असलें पाहिजे, हें तर या भागांतील पहिलेंच सूत्र. त्याअर्थीं विधवांचें ब्रह्मचर्य हेंही त्या मागोमाग आलेंच पाहिजे ! " ती दूरची आप्त असेल तर तिच्याशीं आर्जवानें रहावें, तीस कपडालत्ता द्यावा, तिचीं मुलें पोसावीं, त्यांच्या विद्याभ्यासाचा व तिच्या यात्रा देवधर्मांचा खर्च सोसावा—या व अशा कृत्यांस कुटुंबवत्सल पुरुष तयार होतो. **नौकर ह्मणून ठेवलेल्या स्त्रीशींही असेंच आर्जवानें आणि प्रेमानें वागावें लागतें.** " शाबास ! भाऊसाहेब, शाबास ! काय तुमच्या मनाची थोरवी वर्णावी ! ज्या विधवा-कन्येची सत्यपालनाची प्रतिज्ञा ऐकून तुह्मी तीस धर्मराजाचे तोडीस नेऊन बसवितां, जिला तुह्मी आपल्या घराण्यास भूषण असें समजतां, जिला " किती जपूं " असें तुह्मांला झालें आहे आणि जिच्यापासून तुह्मी अक्कल शिकण्याची इच्छा करितां त्याच कन्येकडून तुह्मी नौकराप्रमाणें काम करवून नौकराशीं वागाल तितक्याच आर्जवानें आणि प्रेमानें तिच्याशीं वागणार ! येथें मात्र कमाल केलीत खरी !

पण या भाऊसाहेबनामधारी राक्षसाची नुसतें विधवांचें रक्त पिऊन तृप्ति होत नाहीं. तर तोंडीं लावावयाला पुरुषाच्याही रक्ताची त्याला जरूर आहे. प्रत्येक कुटुंबांत दोन पुरुष व तीन स्त्रिया असाव्या अशी इच्छा प्रदर्शित करून या रुधिरप्रियानें लागलींच या प्रमाणानें स्त्रियांची संख्या नसल्याकारणानें खेद प्रदर्शित केला आहे. आणखी कांहीं पुरुष परलोकवास पत्करून आपल्या विधवा निमूटपणें इतर दंपत्यांच्या हवालीं करतील तर भाऊसाहेबांचा हर्ष त्रिभुवनांत मावणार नाहीं ! मात्र हे उपकारी गृहस्थ सुधारक असतां कामाचे नाहींत हो ! कारण त्यांच्या स्त्रियांनीं पटापट पुनर्विवाह करून टाकिले ह्मणजे सगळेंच बिनसलें. या कामाला धर्माभिमान्यांनींच कंबर बांधून पुढें आलें पाहिजे ( ह्मणजे वर गेलें पाहिजे ) !

किती भयंकर आणि उलट्या काळजाची सूचना ही ! कुटुंबांतील चारजणांचें स्वास्थ्य रहाण्यासाठीं एक जणानें दुःखांत राहिलें पाहिजे ! एका जोडप्याची पुष्पशय्या सजविण्यासाठीं एका विधवेनें शरपंजरीं पडलें पाहिजे ! दंपत्यस्थितींतील एका स्त्रीस आराम वाटावा ह्मणून दंपत्यस्थितींतील दुसऱ्या स्त्रीनें कपाळचें कुंकू पुसून, हातच्या बांगड्या फोडून, केसास रजा देऊन गुलामासारखें खपण्यास तयार झालें पाहिजे ! समाजांतील अर्ध्या बायकांना पतिसुख मिळण्याकरितां अर्ध्या बायकांनीं पतिविरह भोगला पाहिजे. वहावारे तादात्म्यशक्ति ! वहावारे दया !! वहावारे प्रेम !!!

अशीं तत्त्वें एकत्र करून सादर केलेल्या ग्रंथाची ज्या समाजाकडून संभावना केली जाते त्या समाजाला गुलामगिरीसारख्या संस्थेस हंसण्याचा काय हक्क राहिला ? किंवा " आमच्या सुखाकरितां तुह्मीं निरंतर हालअपेष्टांत दिवस काढिले पाहिजेत " असें ह्मणून जर इंग्रजसरकारानें उद्यां पाठीवर चाबूक मारमारून

आलें आहे. पण अपत्यवती आणि ज्यांनीं दत्तक घेतला आहे अशा विधवा जरी एकीकडे ठेविल्या तरी इतर विधवा बऱ्याच मोकळ्या राहतात. त्यांची काय वाट लावावयाची? ह्मणून भाऊसाहेब एक अजब युक्ति काढतात. "आतां शेवटीं **मातृत्वस्थितीचा**...व्यापक अर्थ करणें जरूर आहे." भाऊसाहेब राहिलेल्या सर्व विधवांना सरसकट मातृत्वदीक्षा देऊन टाकितात. "देशाच्या रक्षणाकरितां प्रतिक्षणीं हत्यार खांद्यावर ठेवून ( प्रतिक्षणीं हत्यार खांद्यावर ठेवावयाचें कसें ? ) जन्मभर सरहद्दीवर उभा राहणाऱ्या शूर शिपायानें लग्न करून संतति उत्पन्न केली नाहीं ह्मणून प्रजारक्षणासंबंधानें त्याचा पितृत्वाचा मान कमी होतो काय? त्याप्रमाणेंच घडोघडीं कुटुंबांत ज्या आपत्ति येतात त्यांचें निवारण करण्यास, जीवाचीही पर्वा न करून, जी विधवा स्त्री नित्य व जन्मभर सज्ज उभी असते, तिचें पुनर्विवाह न केल्यानें मातृत्व गेलें काय ?" ( ऐका ! ऐका!! ) "स्वतंत्र आप्त स्त्रीची मदत हिंदु दंपत्यास किती आवश्यक असते तें पाहिल्यास कुटुंबांत नांदलेली विधवा स्त्री आप्तकृत्यें करण्याचें सोडून रतिसुखाकरितां पुनर्विवाहाची गोष्ट मनांत आणील हें संभवत देखील नाहीं." कशाला संभवेल? जेव्हां एखादा मुद्दा स्थापिण्याचें मनांत आणून ग्रंथकर्ता लिहूं लागतो तेव्हां वाटेल ती गोष्ट त्याला संभवनीय किंवा असंभवनीय दिसावयास लागते. देवानें शक्यतेसंबंधानें सृष्टींत जे नियम घालून दिले आहेत त्यांचा अंमल विसकटून टाकावयाला दुराग्रहासारखें चांगलें साधन नाहीं.

पतिप्रेमाबद्दल दुसऱ्या तऱ्हेचें प्रेम मिळाल्यास विधवा संतुष्ट रहातील हा सिद्धांत भाऊसाहेबांस कोठें गवसला आहे हें कळत नाहीं. पुरुषांमध्यें पाहिलें तर वाचनाचा अतोनात हव्यास असलेले गृहस्थ सुद्धां विवाह करण्यास हौशीनें तयार होतात. घरांत स्वतःची बालविधवा कन्या असूनही तिला सुख देण्याचें सोडून वृद्ध पिते तिजपेक्षांही लहान वधूस आपल्या सुरकुतलेल्या मांडीवर ओढण्यास उद्युक्त झालेले दृष्टीस पडतात. पुरुषांमध्यें जर ही स्थिति, तर स्त्रियांमध्येंच निराळी कां असावी ? त्याचप्रमाणें, हिंदु दंपत्यास स्वतंत्र स्त्रीची आवश्यकता असते ह्मणून विधवा पुनर्विवाहास राजी होणार नाहीं, या वाक्याचा अर्थ काय ? एकाची आवडनिवड दुसऱ्याच्या गरजेवर अवलंबून असते कीं काय ? समजा, एखादा भामटा येऊन भाऊसाहेबांच्या पागोट्यास हात लावून ह्मणूं लागला कीं "भाऊसाहेब, ज्या अर्थीं मला तुमच्या पागोट्याची आवश्यकता आहे त्याअर्थीं तुह्मी मला प्रतिबंध करण्याचें मनांत आणाल हें संभवत देखील नाहीं." तर भाऊसाहेबांनीं रडावें का हंसावें ? हाच प्रकार दंपत्यांना असलेल्या आप्त स्त्रियांच्या आवश्यकतेसंबंधानें नाहीं काय ? पण हाच झोटिंगपाच्छाईचा मासला विधवाविवाहाच्या सर्व विवेचनभर आढळून येतो.

उदाहरणार्थ, विधवांनीं पुनर्विवाह न केल्यानें समाजास कोणते फायदे होतात हें दाखवितांना भाऊसाहेब काय ह्मणतात तें पहा. या आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांनीं आपलें सर्व गणिती ज्ञान ओतलें आहे. ते ह्मणतात:—हिंदु समाजांत सरासरीनें ८०००० कुटुंबें आहेत. यांमधील दंपत्यस्थितींतील स्त्रियांना बाळंतपणाखातर १६००० विधवांची गरज लागते. अशा स्त्रियां-

च्या मृत्यूमुळें २००० विधवांची टंचाई वाटूं लागते. आजारी मुलांच्या शुश्रूषेकरितां २००० विधवांचा तरी पुरवठा पाहिजे. त्याप्रमाणेंच कुटुंबवत्सल स्त्रियांच्या मागें पोरांचें खिल्लार लागलें ह्मणजे त्यांना दळण्याकांडण्याकडे पहाण्यास फुरसद नसते. याशिवाय विटाळशीपण वगैरे गोष्टी ध्यानांत घेतल्या ह्मणजे दर कुटुंबाला एक विधवा याप्रमाणें ८०००० कुटुंबांना ८०००० विधवा आवश्यक आहेत. आतां निरंतर वैवाहिक सुखांत लोळणाऱ्या दंपत्यांना वैधव्यांत पोळणाऱ्या विधवांची आवश्यकता वाटली ह्मणजे विधवांनीं एका पायावर तयार असलें पाहिजे, हें तर या भागांतील पहिलेंच सूत्र. त्याअर्थी विधवांचें ब्रह्मचर्य हेंही त्या मागोमाग आलेंच पाहिजे! " ती दूरची आप्त असेल तर तिच्याशीं आर्जवानें रहावें, तीस कपडालत्ता द्यावा, तिचीं मुलें पोसावीं, त्यांच्या विद्याभ्यासाचा व तिच्या यात्रा देवधर्मांचा खर्च सोसावा—या व अशा कृत्यांस कुटुंबवत्सल पुरूष तयार होतो. **नौकर ह्मणून ठेवलेल्या स्त्रीशींही असेंच आर्जवानें आणि प्रेमानें वागावें लागतें.** " शाबास! भाऊसाहेब, शाबास! काय तुमच्या मनाची थोरवी वर्णावी! ज्या विधवाकन्येची सत्यपालनाची प्रतिज्ञा ऐकून तुह्मी तीस धर्मराजाचे तोडीस नेऊन बसवितां, जिला तुह्मी आपल्या घराण्यास भूषण असें समजतां, जिला " किती जपूं " असें तुह्मांला झालें आहे आणि जिच्यापासून तुह्मो अक्कल शिकण्याची इच्छा करितां त्याच कन्येकडून तुह्मी नौकराप्रमाणें काम करवून नौकराशीं वागाल तितक्याच आर्जवानें आणि प्रेमानें तिच्याशीं वागणार! येथें मात्र कमाल केलीत खरी!

पण या भाऊसाहेबनामधारी राक्षसाची नुसतें विधवांचें रक्त पिऊन तृप्ति होत नाहीं. तर तोंडीं लावावयाला पुरुषाच्याही रक्ताची त्याला जरूर आहे. प्रत्येक कुटुंबांत दोन पुरुष व तीन स्त्रिया असाव्या अशी इच्छा प्रदर्शित करून या रुधिरप्रियानें लागलींच या प्रमाणानें स्त्रियांची संख्या नसल्याकारणानें खेद प्रदर्शित केला आहे. आणखी कांहीं पुरुष परलोकवास पत्करून आपल्या विधवा निमूटपणें इतर दंपत्यांच्या हवालीं करतील तर भाऊसाहेबांचा हर्ष त्रिभुवनांत मावणार नाहीं! मात्र हे उपकारी गृहस्थ सुधारक असतां कामाचे नाहींत हो! कारण त्यांच्या स्त्रियांनीं पटापट पुनर्विवाह करून टाकिले ह्मणजे सगळेंच बिनसलें. या कामाला धर्माभिमान्यांनींच कंबर बांधून पुढें आलें पाहिजे ( ह्मणजे वर गेलें पाहिजे )!

किती भयंकर आणि उलट्या काळजाची सूचना ही! कुटुंबांतील चारजणांचें स्वास्थ्य रहाण्यासाठीं एक जणानें दुःखांत राहिलें पाहिजे! एका जोडप्याची पुष्पशय्या सजविण्यासाठीं एका विधवेनें शरपंजरीं पडलें पाहिजे! दंपत्यस्थितींतील एका स्त्रीस आराम वाटावा ह्मणून दंपत्यस्थितींतील दुसऱ्या स्त्रीनें कपाळचें कुंकूं पुसून, हातच्या बांगड्या फोडून, केंसास रजा देऊन गुलामासारखें खपण्यास तयार झालें पाहिजे! समाजांतील अर्ध्या बायकांना पतिसुख मिळण्याकरितां अर्ध्या बायकांनीं पतिविरह भोगला पाहिजे. वहावारे तादात्म्यशक्ति! वहावारे दया!! वहावारे प्रेम!!!

अशीं तत्त्वें एकत्र करून सादर केलेल्या ग्रंथाची ज्या समाजाकडून संभावना केली जाते त्या समाजाला गुलामगिरीसारख्या संस्थेस हंसण्याचा काय हक्क राहिला? किंवा " आमच्या सुखाकरितां तुह्मीं निरंतर हालअपेष्टांत दिवस काढिले पाहिजेत " असें ह्मणून जर इंग्रजसरकारानें उद्यां पाटीवर चाबूक मारमारून

त्याला काम करावयास लाविलें तर कुरकुर करावयाला जागा तरी कुठें राहिली ? ज्या मुखानें राष्ट्रीयसभेच्या अग्रस्थानीं स्वतःचे हक्क परकीयांनीं पाळावे ह्मणून कंठरव करावयाचा त्याच मुखानें आपल्या गृहांतील अनाथ अबलांच्या हक्कांची पायमल्ली करावयाची ! ज्या अधमास उंबरठ्याच्या आंतील पोटच्या गोळ्याचें दुःख कळण्याइतकी अक्कल नाहीं तोच येथून ४००० मैलांवर जाऊन आपले राजकीय हक्क स्थापूं पहातो ! धिःकार असो मनुष्याच्या आपलपोटेपणास ! धिःकार असो मनुष्याच्या दुराग्रहास आणि त्याच्या निरर्थक पांडित्यास !

अजून वाचकांस थोडीशी कळ सोसावयाची आहे. कारण जातिभेदाच्या प्रकरणाचा अजून विचार झाला नाहीं. जें तर्कशास्त्र, जी भूतदया बालविवाहाच्या आणि पुनर्विवाहाच्या विवेचनांत ग्रंथकारानें दाखविली आहे तीच जातिभेदाच्याही मीमांसेंत दाखविली आहे. हें ऐकून वाचकांस ग्रथकर्त्याच्या अविरोधाबद्दल सखेदाश्चर्य वाटल्यावांचून रहाणार नाहीं. प्रथमतः त्यानें जातिभेदाच्या उत्पत्तीचा इतिहास देऊन नंतर प्राचीन हिंदुधर्माचें रूपांतर कसकसें होत गेलें याचा माग लावण्याचा प्रयत्न केला आहे. ब्राह्मणांनीं स्वतः झीज सोसून शूद्रांवर अनंत उपकार केले आहेत हें विधान वेळीं अवेळीं पुढें पुढें आणण्यांत ग्रंथकर्त्यानें जें पुरोभागित्व दाखविलें आहे तें वगळलें असतां हा भाग तत्त्वदृष्ट्या आणि इतिहासदृष्ट्या वाचकांस बराच मनोरंजक वाटेल. पण पुढें जातिभेदाच्या शाश्वतीची चिन्हें सांगतांना त्यानें जो बाष्कळ कोटिक्रम केला आहे तो मात्र किळसवाणा आहे. हल्लीं पाश्चात्य विद्वानांचें जें मत झालें आहे कीं रामायणासारख्या इतिहासांत आणि पुराणांत ब्राह्मणांची यथेच्छ स्तुति केलेली आहे, ती बौद्ध धर्माचा पाडाव करून ब्राह्मणी धर्म स्थापण्याच्या उद्देशानें केली आहे, त्या मताच्या विरुद्ध ग्रंथकारानें असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे कीं, ब्राह्मणांचे ज्ञानमार्गी आणि सांसारिक असे दोन तट होते; त्यांपैकीं दुसऱ्या तटास खूष ठेवण्यासाठीं ब्राह्मणांची स्तुति पुराणांत करावी लागली; ती केली नसती तर पहिल्या वर्गाच्या हातून कनिष्ठ जातींची सुधारणा जोरानें झाली नसती. आतां, शूद्रादि वर्गांची जी सुधारणा झाली ती बहुतांशीं त्यांच्याच प्रयत्नांचा परिणाम आहे, हें विश्वामित्रादिकांच्या उदाहरणांवरून तेव्हांच उघड होईल. खुद्द ब्राह्मणांनीं शूद्रांची काय सुधारणा केली ? विद्येचें जें अगाध भांडार त्यांच्यापाशीं सांचलें होते त्यांपैकीं कितीसा भाग त्यांनीं शूद्रांस दिला ? कांहीं दिला नाहीं ही गोष्ट स्वतः ग्रंथकारांनींही कबूल केली आहे; इतकेंच नाहीं तर या ग्रंथाच्या ४२ व्या भागांत कनिष्ट जातींना अज्ञानांत ठेवून ब्राह्मणांनीं त्यांचें जें बुद्धिसामर्थ्य वांचविलें त्याबद्दल त्यांची पाठ थोपटली आहे ! हीं दोन हजार वर्षें शूद्रांची जात सारखी अज्ञानांधकारांत रहावी यापेक्षां ब्राह्मणांस कोणतीही गोष्ट लाजिरवाणी नाहीं, असें आह्मांस वाटतें. या अज्ञानाचा परिणाम ग्रंथकारांनीं सुचविल्याप्रमाणें त्यांस हितकर होवो किंवा अपायकारक होवो, कसा जरी झाला तरी त्यामुळें ब्राह्मणांच्या मूळच्या आपलपोटेपणांत काडीइतकेंही अंतर पडत नाहीं. ब्राह्मणांचा व शूद्रांचा सलोखा रहावा अशी आमचीही इच्छा आहे. पण झालेल्या गोष्टीबद्दल खेद प्रदर्शित न करितां उलट आपलीच पाठ थोपटण्यानें

त्यांच्या मधील द्वेषाग्नीस चेतविल्यासारखें मात्र होणार आहे.

"स्पर्श, सहभोजन व शरीरसंबंध या तिहीं-विषयीं कायते जातिभेदाचे निर्बंध आहेत—" असें ग्रंथकारानें २८ व्या भागांत ह्मटलें आहे. हे निर्बंध थोडेच झाले कीं काय? पशूंमध्यें आणि मनुष्यांत तरी याशिवाय असें कोणतें विशेष अंतर आहे? पशूंना आपण स्पर्श तरी करितों; शूद्रांस स्पर्शही करीत नाहीं. शूद्रांपेक्षां पशूंची सात्विकवृत्ति अधिक कीं काय?

आतां ग्रंथकर्त्यांच्या एका विलक्षण प्रमेया-कडे वळून नंतर जातिभेदाच्या प्रकरणाचा निरोप घेऊं. ग्रंथकार ह्मणतात:—"सर्व देशांत असा एक प्रकार दिसतो कीं वरिष्ट वर्गांत शिरण्याची इच्छा, व तद्विषयक प्रतिबंधास अन्याय असें ह्मणण्याचा कोटिक्रम जे लोक करितात, ते बहुधा वरिष्ठ वर्गांत घालण्यास नालायक असतात." या विधानाचा बेंगरूळ-पणा लहान पोरासही कळण्यासारखा आहे. ग्रंथकर्त्यांनें या विधानाचें व्यतिरेकानें समर्थन करण्याकरितां ग्लाड्स्टन साहेबांचें व शिवाजी महाराजांचें उदाहरण दिलें आहे. पण आधीं हीं उदाहणेंच अस्थानीं आहेत. या संबंधानें दाखलेच द्यावयाचे होते तर दादाभाई नवरोजी सारख्यांचे द्यावयास पाहिजे होते. पण तसें केल्यानें वरील विधान खोटें ठरलें असतें. कारण मग दादाभाईनीं पार्लमेंट सभेंत शिरण्याची इच्छा प्रदर्शित करून आपली नालायखी जाहीर केली असें ह्मणण्याचा प्रसं-ग आला असता. ग्लाड्स्टन साहेबांचे जें उदाहरण दिलें आहे तें वरील विधानास मुळीं-च लागू पडत नाहीं. ग्लाड्स्टन साहेबांनीं 'लार्ड' ची पदवी नाकारिली ती शालीनतेमुळें नाकारली नाहीं, तर अभिमानानें नाकारिली; असें असतां त्यांचा दाखला देण्यांत जागा अडविण्यापलीकडे काय लभ्यांश झाला? शिवाजीचें उदाहरण तर यापेक्षांही मौजेचें आहे. शिवाजी महाराजांना ब्राह्मण समजावया-चें असा ब्राह्मणांनीं ठराव केल्यास त्यांचे जातभाई क्रुद्ध होतील, या गोष्टीवरून शिवाजीमहाराजांच्या इच्छेचें अनुमान कसें करावयाचें? जातभाईंच्या क्रोधाचा आणि वरील विधानाचा बादरायण संबंध तरी लावावयाचा कसा? ज्याप्रमाणें राष्ट्रीयसभेच्या पीठावर उभा राहिलेला पिळपिळीत वक्ता थोर लोकांचीं नांवें मध्यें मध्यें उच्चारून टाळ्या मिळविण्याचा प्रयत्न करितो त्याप्रमाणेंच हास्यास्पद ग्रंथकर्त्यांचा शूद्रांस भेवडण्याचा वरील प्रयत्न आहे.

या विवेचनांत या ग्रंथसागरांतील जीं अमो-ल रत्नें वाचकांस सादर केलीं आहेत तीं एकं-दर रत्नांच्या पासंगासही पुरणार नाहींत. प्र-त्येक पाणबुड्याच्या हातीं दर बुडीस निरनि-राळीं रत्नें एकेकापेक्षां चढ अशीं सांपडतील असा आह्मांस भरंवसा आहे. ह्मणून या टीके-वरच मदार न ठेवितां वाचकांनीं मूळ ग्रंथाकडे धांव घ्यावी अशी आमची मनापासून इच्छा आहे. अशा ग्रंथाच्या प्रकाशनाचें कार्य प्रो. गोळ्यांनीं आपल्या शिरावर कसें घेतलें याचें आह्मांस अजून गूढ आहे. कदाचित् या ग्रंथाच्या ३९ व्या भागांत वर्णिलेल्या ब्राह्मणांमधील बुद्धिमां-द्याचाच हा एक परिणाम असेल.

या ग्रंथांतील नीतिशास्त्र "हम करे सो कायदा" अशापैकीं आहे. तर्कशास्त्र पोकळ व तकलादी आहे. ज्याप्रमाणें गणपतीच्या मेळ्यां-तील धर्माभिमान्यांचीं सोंगें घेतलेलीं पोरें सु-धारकांचीं सोंगें घेतलेल्या पोरांस दोन

ल्केन्यांत वठणीला आणितात त्याप्रमाणें भाऊसाहेब, बापूसाहेब वगैरे लोकांनीं विद्याधरास आपल्या बालिश प्रमाणांनीं वारंवार चीत केलें आहे खरें. पण त्या प्रमाणांचा समंजस लोकांवर परिणाम होईल अशी जर ग्रंथकर्त्यास किंवा प्रकाशकांस आशा असेल तर ती निर्मूल आहे. या ग्रंथांतली भाषा मात्र वाखाणण्यासारखी आहे. व तिजमुळें वरवर पहाणारे वाचक त्याजवर भाळून जात असल्यास नवल नाहीं. सृष्टिवर्णनांत तर ग्रंथकाराचा हातखंडा आहे हें आह्मी आनंदानें कबूल करितों. दुसऱ्या भागांत आषाढकृष्णपक्षांतील रात्रीचें केलेलें मनोरम वर्णन, विद्याधराच्या प्रवासांत त्याच्या नजरेस आलेल्या सृष्टिवैभवाचें बहारीचें चित्र, वगैरे पाहून वाचकांच्या वृत्ति तन्मय होऊन जातात. कधीं कधीं संभाषणाचेही उत्तम मासले या ग्रंथांत सांपडतात. लीलावतीच्या भाषणांत कादंबरींतील भाषणशैलीचें अनुकरण करण्याचा जो प्रयत्न ग्रंथकारांनीं केला आहे तो चांगलाच सिद्धीला गेला आहे. याप्रमाणें भाषासुंदरी ग्रंथकारास सर्वतोपरी वश असून त्यांनीं तिला कुमार्गाला लाविलें आहे हें फारच कृतघ्नपणाचें वर्तन म्हटलें पाहिजे.

असो, शेवटीं हा हास्यास्पद ग्रंथ लिहून आणि छापवून आह्मांस आणि आमच्या वाचकांस पोटभर हंसविल्याबद्दल ग्रंथकर्त्यांचे आणि प्रकाशकांचे उपकार मानून, पृष्ठसंख्येच्या मानानें बराच विस्तृत पण ग्रंथांतील दोषसमुदायाच्या मानानें अतिसंक्षिप्त असा हा लेख संपवितों.

---

# कांचनगडची मोहना.

हें पुस्तक आमच्या हातीं येऊन बरेच दिवस झाले. तथापि यापूर्वीं तत्संबंधीं आमचा अभिप्राय प्रकट करण्यास आह्मांस सवड झाली नाहीं. याबद्दल आह्मीं फार दिलगीर आहों.

आरंभींच एवढें सांगणें अवश्य आहे कीं, अशा प्रकारचें सर्वांगसुंदर पुस्तक आमच्या पहाण्यांत बरेच दिवस आलें नाहीं. 'कांचनगडची मोहना' ही कृति खरोखर फारच मोहक उतरली आहे. गोष्ट कल्पित तर खरीच, परंतु तिला इतिहासाचें अवगुंठन घातलें असल्यामुळें विशेष रमणीयत्व प्राप्त झालें आहे. हें अवगुंठन इतकें बेतवार बसलें आहे कीं, वेदांताच्या परिभाषेत, कल्पनेवर इतिहासाचा पूर्ण अध्यारोप झाला आहे. कादंबरीकार या भूमिकेंतील प्रकृत ग्रंथकारांची ही कृति इतकी मनोरम वठली याबद्दल त्यांचें आह्मीं मनःपूर्वक अभिनंदन करितों.

नाटकांतील कथाभाग सोळावे शतकाचे अखेरीस घडून आला अशी कल्पना केली आहे, असें ग्रन्थकार आपल्या पंक्तिपंचकात्मक प्रस्तावनेंत लिहितात. यावेळीं कांहीं मराठे सरदार अविंधसेवेंतच समाधान मानूं लागले होते; परंतु कांहीं सरदार वैरनिर्यातनाचा प्रसंग सांपडण्याची प्रतीक्षा करीत होते. हे दोन्ही प्रकार प्रस्तुत नाटकामध्यें चांगल्या प्रकारें वर्णिले आहेत.

विजयानगर व विजापूर यांजमध्यें लढाई होऊन विजयानगरचा पूर्ण नाश झाला तेव्हां प्रतापराव नांवाच्या सरदारानें मलीन झालेली कीर्ति पुन्हां उज्वल करण्याची प्रतिज्ञा केली.

कांचनगड नांवाच्या लहानच परंतु मजबूत किल्ल्यावर त्याचें ठाणें असून तेथें फौजफांटा खजिना व दारुगोळा यांची क्रमाक्रमानें त्यानें बरीच जमवाजमव केली. या सरदाराच्या अंगीं शौर्य, अभिमान वगैरे गुण ज्या मानानें होते, त्या मानानें राजकारणकुशलता व मनुष्यस्वभावाची परीक्षा हे गूण वास करीत नव्हते. कोणत्याही मनुष्यावर एकदां विश्वास टाकला ह्मणजे मागाहून त्याच्या वर्तनावर देखरेख ठेवण्याचें या सरदाराचें शील नव्हतें. सुदैवानें ज्या पत्नीशीं त्याचा विवाह झाला तीही वीरजाया व वीरमाता या अभिधानद्वयास योग्य अशीच निपजली. हीच प्रकृत नाटकाची नायिका होय. हिचें पाणिग्रहण करण्याचा हंबीरराव नांवाच्या एका विजापूरकरांच्या सरदाराचा फार हेतु होता. परंतु तो सिद्धीस न गेल्यामुळें प्रतापरावास कोणत्यातरी रीतीनें घोटाळ्यांत घालून मागाहून तिची मनधरणी करून तिला वश करून घ्यावें असा त्यानें संकल्प केला. या संकल्पाच्या निर्वाहार्थ उपायांचें विवेचन करितां करितां त्याला एक सुयोग सांपडला.

विजापूरकरांना प्रतापरावाकडून खंडणी पोंचत नसे. ही गोष्ट त्यांच्या सर्व सरदारांना फारच विषम वाटत असे. अनेक प्रसंगीं मागणी करण्यांत आली असतांही कांहींना कांहीं निमित्तानें ऐवज पटविण्याचें काम दिवसगतीवर टाकण्यांत आलें होतें. अखेरीस प्रतापरावाचा कावा लक्ष्यांत येऊन विजापूरकरांनीं आपला एक मुसलमान सरदार सैन्यासमवेत कांचनगडावर पाठविला. पिलाजीराव माने नांवाचा विजापूरकरांचा एक सरदार होता. हंबीररावाचें विजापूरकरांचे दरबारांत चांगल्या प्रकारचें वजन होतें ही गोष्ट त्यास पक्की माहीत होती, व त्याचा नाश करून आपली बढती करून घ्यावी हा त्याचा हेतु होता. मोहना प्राप्त न झाल्यानें हंबीररावाच्या चित्तास कशा प्रकारचा उद्वेग झाला होता हेंही त्यास माहीत होतें. ह्मणून हंबीररावास तिच्या प्राप्तीची लालुच लावून आपला कार्यभाग साधण्याचा त्यानें घाट घातला. ज्या वेळेस खानानें कांचनगडावर स्वारी केली त्याच वेळेस देवगडावर स्वारी करण्याचा बहाणा करून कांचनगडाकडेसच वळण्याची पिलाजीनें हंबीररावास सल्ला दिली. त्याप्रमाणें तो तेथें दाखल झाला. पिलाजीरावही आपलें सैन्य घेऊन तेथें आला. प्रतापरावाची कडेकोट तयारी असून बंदोबस्त उत्तम प्रकारचा होता. तेव्हां केवळ लढून किंवा वेढा देऊन गड हातीं येण्याचा संभव नव्हता हें पिलाजीरावास कळून चुकलें. अशा स्थितींत कोणत्या उपायाची योजना करावी या विचारांत असतां, प्रतापरावाच्या कटांत जाण्याची आपली इच्छा आहे असें दाखवून गडांत प्रवेश करण्याची त्यानें युक्ति लढविली. गडावर गेल्यानंतर प्रतापरावाच्या कारभारी मंडळींत दादासाहेब कोठारे नांवाच्या सरदारावर आपला कपटप्रयोग सफल होईल अशी कल्पना त्यास सुचली. या दादासाहेबांशीं लक्ष्मी नांवाच्या स्त्रीनें पाट लाविला होता. ही पहिली हुद्देसूळकरांची बायको व त्यांच्या मृत्यूनंतर पिलाजीरावानें आपला स्वीकार करावा अशी तिची उत्कट इच्छा. तिला आशेला गुंतवून तिच्या नवऱ्याची एकंदर स्थिति पिलाजीरावानें समजवून घेतली. हे गृहस्थ मद्य वगैरे मादक पदार्थांचे मोठे भक्त असल्याकारणानें व त्यांच्या स्त्रीची सर्वप्रकारची अनुकूलता असल्यानें पिलाजीरावास दारुगोळ्या-

च्या कोठाराच्या किल्ल्या हस्तगत करण्यास फारसे प्रयास पडले नाहींत. इकडे हंबीररावानें प्रतापरावाच्या कटांत सामील होण्याचा हेतु प्रकट करून गडावर जाण्याचा क्रम सुरू ठेविला. त्याची स्त्री यमुना ही मोहनेची लहानपणची मैत्रीण असल्यामुळें तीही केव्हां केव्हां गडावर येत असे. परंतु हंबीररावाचें खरें धोरण प्रतापरावाच्या लक्ष्यांत आलें नाहीं. मोहनेला एकटीला गांठून आपला अभिप्राय आविष्कृत करण्याचा योग साधावा अशी हंबीररावाची उत्कट इच्छा होती, व त्याप्रमाणें तसा प्रसंग एकदां घडून आला. त्यावेळीं मोहनेनें हंबीररावास झिडकारून त्याची अत्यंत निर्भर्त्सना केली. परंतु ही गोष्ट तिनें दवलतराव नांवाच्या विश्वासूक सरदारास मात्र कळविली व प्रतापरावांना न कळविण्याविषयीं त्याचेकडून अभिवचन घेतलें. असें करण्यांत तिचा हेतु प्रतापरावाचा चित्तक्षोभ न व्हावा हा होता. हा प्रकार घडून आला त्याच्या पूर्वींच खानाकडून थैली घेऊन त्याचा वकील आला होता. त्याची प्रतापरावांनीं यथेष्ट अवहेलना करून खानाशीं लढाईस उभें रहाण्याची सिद्धता केली होती. अशा स्थितींत हंबीररावाशीं उघडपणें शत्रुत्व करण्याचा प्रसंग हितावह होणार नाहीं असें जाणून मोहनेनें आपला झालेला अपमान सहन करण्याचा संकल्प केला. इकडे पिलाजीरावानें खानाच्या सैन्यावर छापा घालण्याची मसलत प्रतापरावास दिली ती त्याला रूचून तदनुरूप आचरण करण्यास तो सिद्ध झाला. हंबीरराव व पिलाजीराव ओलीस रहाण्याच्या मिषानें गडावर राहिले, व प्रतापराव खानाच्या सैन्यावर तुटून पडले. पिलाजीरावानें दादासाहेब कोठाऱ्यांची स्त्री लक्ष्मी इच्याशीं संधान बांधून दारूच्या कोठाराला आग लावून गडाचा दर्शनी बुरूज उडवून देण्याची सिद्धता केली. अशा स्थितींत हंबीररावानें मोहनेला गांठून ओढवलेल्या संकटाची तिला भीति घालून वश करण्याचा प्रयत्न केला. खानाच्या सैन्याची कत्तल करून प्रतापराव परत येतात तों अर्धा गड जमीनदोस्त झाला. हंबीरराव अधोकच लगट करावयास लागले तेव्हां मोहना कड्यावरून उडी टाकण्यास तयार झाली व तें तिचें साहस पाहून हंबीरराव आपल्या दुष्कर्मापासून परावृत्त झाला. इतक्यांत पिलाजी येऊन हंबीररावास घेऊन गेला. गडाखालीं जाऊन गडाला वेढा देण्याची तयारी केली पाहिजे असें पिलाजी हंबीररावास म्हणाला व त्याप्रमाणें त्यानें उद्योग आरंभिला. शस्त्रें खालीं ठेवून जे शरण येतील त्यांस त्यांच्या इच्छेप्रमाणें जाण्यास परवानगी दिली जाईल, असा निरोप पिलाजीनें गडावर पाठविला. ज्यांस शत्रूला शरण जावयाचें असेल त्यांना आडकाठी नाहीं व शत्रूशीं लढून समरांगणावर देह ठेवण्यांतच ज्यांस पुरूषार्थ वाटत असेल त्यांनीं शत्रूच्या अंगावर चालून जाण्यास तयार रहावें, अशी प्रतापरावानीं दंवडी पिटविली. मोहनेचा शेवटचा निरोप घेण्यासाठीं प्रतापराव तिच्या महालांत गेले, तेव्हां मोहनेनें त्यांच्याबरोबर जाण्याचा हट्ट घेतला. परंतु प्रतापराव त्या गोष्टीस कबूल होईनात. मोहना प्रतापरावांना सोडीना, तेव्हां स्वतःस सोडवून घेऊन ते जाऊं लागले; त्याबरोबर मूर्च्छित होऊन ती त्यांच्या पायांशीं पडली. स्त्रीमोहपाशांत न गुंततां प्रतापराव तसेच निघून गेले व पुढच्या तयारीस लागले. इकडे मोहना सावध झाल्यावर तिनें पुरुषाचा वेष घेऊन आपल्या पतीबरोबर

समरांगणांत जाण्याचा संकल्प केला. गडावरून उतरण्यापूर्वीं पुन्हा एकदां हंबीररावानें तिला गांठलें. त्यावेळींही पूर्वींप्रमाणें. मोहनेनें त्याची निर्भर्त्सना केली, त्याच्याशीं बुद्धिवाद केला, त्याला उपदेशाच्या चार गोष्टीही सांगितल्या; परंतु हंबीरराव कांहीं केल्या शुद्धीवर आला नाहीं. त्याला सर्व जग मोहनेशिवाय शून्य भासत होतें. त्याच्याशीं बोलतां बोलतां मोहना निघून गेली, परंतु तिच्या पतिव्रत्याच्या तेजामुळें तिला हात लावण्याची त्याची छाती झाली नाहीं. ती निघून गेल्यावर तो भांबावल्यासारखा उभा राहिला व थोड्या वेळांन तिच्या मागोमाग गेला. परंतु ती त्याच्या हातीं लागली नाहीं. ती पार प्रतापरावाच्या गोटांत निघून गेली, तेव्हां त्याचा निरुपाय झाला. अखेरीस मोहना ज्या सैन्यांत लढत आहे त्या सैन्याविरुद्ध लढावयाचें नाहीं असा संकल्प करून त्यानें आपला मंदिल फेंकून दिला व आपल्या तरवारीचे दोन तुकडे केले. मोहनेच्या पक्षाच्या तर्फेनें तरी लढूं का असा त्याच्या हाताखालच्या सरदारांनीं प्रश्न केला; तेव्हां सर्वांनीं सन्यासी किंवा बैरागी झालें पाहिजे असें त्यांस उत्तर मिळालें! पिलाजीरावाला हवा होता तसाच हा योग घडून आला. हंबीररावाचें सैन्य पळूं लागल्यास त्यांस पळूं द्यावें, परंतु खुद्द हंबीरराव व त्याची स्त्री यमुना यांस जाऊं द्यावयाचें नाहीं असा त्यानें सक्त हुकुम केला. इकडे प्रतापरावांनीं व मोहनेनें आपल्या शौर्याची कमाल केली. शत्रूचें सैन्य पुष्कळपटीनें अधिक असतांही त्यांनीं धैर्य सोडिलें नाहीं व क्षत्रियास उचित अशी त्यांनीं करामत केली. दोघांनाही जखमा झाल्या तथापि मुहूर्तमात्र विश्रान्ति घेऊन त्यांनीं पुन्हा आपली तरवार चालविली. अखेरीस दोघेंही अगदीं विकलांग झालीं व शत्रूचा माराही अधिक जोरानें होऊं लागला. जयप्राप्तीची त्यांस प्रथमपासूनच फारशी आशा होती असें नाहीं; तथापि; त्यांची हिम्मत विलक्षण असल्यामुळें तिच्या बळावर त्यांस शत्रूची बिशाद वाटत नव्हती. परंतु आतां ती हिम्मत खचूं लागली. पिलाजीच्या आशावृक्षास पल्लव फुटून फळें येण्याचा रंग दिसूं लागला. हंबीरराव व प्रतापराव यांस सस्त्रीक कैद करून बादशाहापुढें उभें केल्यावर बादशाह आपल्यास यथेष्ट पारितोषिक देईल, आपला मान मरातब वाढेल,–या व अशाच प्रकारच्या अन्य विचारांत पिलाजीराव अगदीं मग्न होऊन गेला. सर्वांत विशेष समाधान त्याला हेंच वाटत होतें कीं आपण रचलेल्या कपटव्यूहाचें पर्यवसान संकल्पानुरूप होणार. परंतु ही काल्पनिक सुखाची स्थिति फारवेळ टिकली नाहीं. कल्पनासृष्ट उच्च स्थानापासून तो लवकरच भ्रष्ट झाला. प्रतापरावाचे श्वशुर सूर्याजीराव मोहिते यांस पूर्वींच निरोप गेल्याप्रमाणें ते दहा हजार सैन्य घेऊन ऐनप्रसंगीं येऊन पोंचले. त्यामुळें सर्वच पारडें फिरून पिलाजीरावाच्या पक्षाचा मोड झाला व त्याला, हंबीररावाला आणि हंबीररावाच्या स्त्रीला दवलतराव व सूर्याजीराव यांनीं धरून आणिलें. परंतु हें आनंदाचें वर्तमान ऐकण्याचें मोहनेच्या नशिबीं नव्हतें. ही मंडळी येऊन दाखल होण्यापूर्वींच ती गतप्राण झाली. प्रतापराव जिवन्त होते एवढेंच. अन्तकाळच्या वेदनांनीं त्यांस पूर्णपणें घेरलें होतें, तशांत मोहनेला नष्टचेतन पाहून ते अधिकच विव्हल झाले. अखेरीस दवलतरावाच्या मस्तकावर आपला मंदिल ठेवावयास सांगून, हंबीरराव व यमुना यांस त्यांच्या गडावर नेऊन सोडून देण्याची ताकीद करून,

पिलाजीरावास वाटेल ती शिक्षा करण्याविषयीं परवानगी देऊन, व आपल्या श्वशुरास आपल्या लहान मुलास क्षत्रियास अनुरूप असें शिक्षण देऊन त्याचें संगोपन करण्याची विनंती करून, प्रतापरावांनीं प्राण सोडिला.

याप्रमाणें या नाटकांतील कथाभाग आहे. संविधानक क्लिष्ट नसून त्यांतील वृत्तांताची परंपरा सुसंगत आहे. असंभाव्य अशा गोष्टींचा संपर्क नसल्यामुळें त्याचा साधेपणाच मोहक झाला आहे. भिन्न भिन्न पात्रांच्या भूमिकेचा विकास क्रमाक्रमानें होत गेल्यानें रसपरिपाक चांगलाच उतरला आहे. अनेक रसांचें योग्य संमिश्रण यथावकाश झाल्यानें एकतानतेचा दोष आढळत नाहीं, व एकंदर कृति अधिक मनोरम भासते. प्रतापरावांची अतुल वीरश्री व लोकोत्तर स्वपक्षाभिमान, मोहनेचें मोहक सौंदर्य व त्याहूनही मोहक तिचा गुणगण, दवलतरावाची स्वामिनिष्ठा व सत्यप्रतिज्ञता, हंबीररावाची परस्त्रीमोहवशता व तिच्यामुळें त्याची झालेली दुर्दशा, यमुनेची पतिनिष्ठा व सहनशीलता, दादासाहेब कोठाऱ्यांची व्यसनासक्तता व तिच्या योगानें स्वामिसेवेंत पडलेलें अंतर, लक्ष्मीचें नीचस्त्रीस्वभावानुरूप चांचल्य, पिलाजीरावाचा उच्चपदप्राप्तीचा अभिलाष व तदनुरोधानें केलेलीं कृष्णकारस्थानें या सर्वांचें निरूपण समर्पक व बोधप्रद असें झालें आहे. नाटक हें संसाराचें चित्र या व्याख्येचा अतिक्रम प्रकृत ग्रंथांत झालेला आढळत नाहीं. नायक व नायिका यांच्यामध्यें अमानुष अशा गुणांचें प्रगटीकरण केलेलें येथें दृग्गोचर होत नाहीं. मनुष्यस्वभावाच्या उदात्त व नीच अशा दोन्हीं वृत्तींचें वर्णन येथें आहे. एकंदरीनें पहातां संविधानक निर्दोष आहे.

या नाटकामध्यें ज्या स्थलीं भिन्न भिन्न रसांचा आविर्भाव विशेष चित्ताकर्षक झाला आहे त्यांपैकीं कांहींचा येथें निर्देश करितों. अंक १ प्रवेश २ यांतील प्रतापरावानें विजापूरकरांच्या पक्षाकडे असलेल्या मराठेसरदारांची केलेली निर्भर्त्सना; त्याच अंकांतील प्रवेश ४ यांतील हंबीररावासंबंधानें स्वगतभाषण, व त्याच प्रवेशांतील मोहनेनें प्रतापरावाबरोबर समरांत जाण्याविषयीं केलेली विज्ञापना; अंक २ प्रवेश १ यांतील खानाचा वकील येण्यापूर्वीं व वकील आल्यानंतर विजापूरकर व तत्पक्षीय मराठे सरदार यांची केलेली निंदा; अंक ३ प्रवेश ३ व अंक ४ प्रवेश ३ यांतील आपल्या सैन्यास उद्देशून केलेलें प्रतापरावांचें भाषण; चवथ्या अंकाच्या अखेरीस आलेले प्रतापरावांचे आत्मगत विचार-यांमध्यें शौर्य, स्वपक्षाभिमान, प्रतिज्ञापालनाची उत्कट इच्छा, उत्साह व आवेश या गुणांचा आविर्भाव चांगल्या प्रकारचा उतरला आहे. हंबीररावाच्या बहुतेक भाषणांत शृंगाररसच आहे. तीं भाषणें मोहनेस उद्देशून असल्या कारणानें त्यांचा वाचकांस तिटकारा येतो, तथापि त्या पात्राच्या भूमिकेस तीं निःसंशय अनुरूप आहेत. तिसऱ्या व चवथ्या अंकांतील मोहनेच्या भाषणांत करुणरस असून तीं भाषणें हृदयद्रावक वठलीं आहेत. दादासाहेब कोठाऱ्यांच्या भाषणांपासून हास्यरसाचा परिपोष झाला आहे. परंतु एकंदर नाटकांत मौजेचे प्रवेश म्हटले म्हणजे ज्यांत मोहना व यमुना यांचा समागम झाला आहे, ते होत. आरंभींचाच हार गुंफण्याचा, व अंक १ प्रवेश ४ यामधील झोंपाळ्यावर बसून गाणीं म्हणण्याचा, हे प्रवेश फारच गमतीचे आहेत.

या नाटकांत पात्राच्या योग्यतेप्रमाणेंच भाषेची योजना बहुधा झाली आहे. दादासाहेब

कोठाऱ्यांच्या भाषणांत मात्र 'वृकोदर' 'मदिरेक्षणा' असे शब्द आढळतात ते आह्मांला प्रशस्त वाटत नाहींत. त्याच प्रमाणें 'नाकांतला बाल' 'कचाट्यांत' अशा प्रकारची शब्दयोजना आह्मास ग्राम्य वाटते. व 'प्रेमामृत जळून खाक होईल' हा अलंकार सदोष वाटतो. 'अपमानाच्या डागण्या देणारा मृत्यु' ह्मणजे काय हें स्पष्ट समजण्यासारखें नाहीं, व 'सुडाचें बीज पेरणें' ही कल्पनाही फारशी हृदयंगम नाहीं. कांहीं स्थलीं 'वयनी,' 'विचारतीस' असे प्रयोग अढळतात. महाराष्ट्राच्या कांहीं भागांत ते रूढ आहेत हें खरें, परंतु ते तसेच पुस्तकांत येऊं नयेत असें आह्मांस वाटतें.

गुणदोषाचें विवेचन करितां या नाटकांत गुणांचें आधिक्य व दोषांचें अल्पत्व आहे हें ह्मणण्यास आह्मांस फारच आनंद वाटतो. फावल्या वेळेंत अशाच प्रकारचे आणखी ग्रंथ तयार करून प्रकृत नाटककार महाराष्ट्र जनांच्या विशेष आदरास पात्र होतील अशी आह्मांस पूर्ण आशा आहे.

---

रावसाहेब

# विश्वनाथ नारायण मंडलिक.

## भाग सहावा.

स्वतंत्र व्यवसाय.

(१८७२—१८८०)

मागल्या अंकांत प्रकृत कालामध्यें रावसाहेबांनीं लिहिलेल्या राज्यव्यवस्थाविषयक लेखांविषयीं उल्लेख करून त्यांपैकी एकाविषयींची हकीकत लिहिण्यांत आली आहे. आतां आपण दुसऱ्या लेखाकडे वळूं. हा लेख खोती प्रकरणाविषयीं होय.

रावसाहेबांच्या एकंदर आयुष्यांत जे अनेक प्रकारचे उद्योग त्यांनीं केले त्या सर्वांमध्यें खोतांच्या हक्काची पायमल्ली न होऊं देण्यासाठीं त्यांनीं केलेला उद्योग श्रेष्ठ होय. या प्रकरणीं त्यांनीं तन मन व धन या तिहींचा उपयोग करून अक्षय्य अशा कीर्तीचा लाभ करून घेतला असें मागील भागांत सांगण्यांत आलेंच आहे. त्यांच्या उद्योगास १८६९ सालीं सुरवात झाली. पुढें १८७४ सालीं वतनदार खोतांचा संक्षिप्त इतिहास या नांवाचा त्यांनीं एक विस्तृत लेख प्रसिद्ध केला. खोत व त्यांचीं कुळें, आणि खोत व सरकार, यांजमध्यें लढा पडून जो वाद उपस्थित झाला होता त्या वादाचा योग्य प्रकारानें निकाल लागावा हा हेतु धरून उभय पक्षांच्या हक्कांचें यथार्थ स्वरूप निर्दिष्ट करण्याचा यत्न या लेखांत रावसाहेबांनीं केला आहे. आपलीं विधानें साधार आहेत हें दाखविण्यासाठीं प्रमाणभूत ग्रन्थांतून बरेच उतारे देण्यांत आले आहेत. विशेषत: क्यान्डी साहेबांनीं प्रसिद्ध केलेल्या पुस्तकाचा बराच उपयोग करण्यांत आला आहे.

आरंभीं 'वतनदार खोत' या संज्ञेनें कोणत्या प्रकारचे हक्क स्थापित होतात; हे खोत आपापल्या खेड्यांचे मालक असतात किंवा केवळ सरकारच्या जमिनीवरचा सारा वसूल करण्यापलीकडे त्यांचा हक्क पोंचत नाहीं, या प्रश्नांचा उलगडा करण्यांत आला आहे. पेली, चाप्लिन, डन्लाप, डावेल इत्यादि मुलकी अधिकाऱ्यांच्या भिन्न भिन्न मतांचें संकलन करून असा निष्कर्ष काढण्यांत आला आहे कीं, खोत हे केवळ दुसऱ्याचें द्रव्य व दुसऱ्याचे श्रम यांच्या फलांचा उपभोग स्वस्थ बसून घेणारे नव्हत. त्यांस जे हक्क प्राप्त झाले ते त्यांच्या कर्तृत्वानेंच झाले

आहेत. अव्वल मुसलमानी राज्यांत ओसाड व पडित जमिनीची लागवड व्हावी व निर्बाधपणें सरकारचा वसूल यावा या हेतूनें या लोकांना सनदा देऊन विशेष प्रकारचे हक्क देण्यांत आले होते. 'मिरास' व 'वतन' हे बहुधा समानार्थवाचक शब्द आहेत. मिराशी खोत व वतनदार खोत एकच ह्मणण्यास हरकत नाहीं. असें असतां मिरासदारांचे सर्व हक्क कायम राखून केवळ खोतांच्याच वतनाची किंमत कमी करण्याचें कांहीं अधिकाऱ्यानीं मनावर घेतलें. या संबंधानें क्यान्डी साहेबांनीं आपल्या ग्रंथांत पुढील मजकूर लिहिला आहे:–

"एकंदर प्रांताची पाहाणी करण्याचा प्रसंग-
"आल्याखेरीज वतनदार खोताकडून येणारा
"ठरावीक वसूल मध्येंच वाढवितां येत नसे ही
"गोष्ट इतिहाससिद्ध आहे व अनेकवेळां कबूल-
"ही करण्यांत आली आहे. खोतीवतन कमी
"करून धारेकरी किंवा रयतवार केल्याचें एक-
"ही उदाहरण सांपडत नाहीं. कुळाकडून वत-
"नदार खोतास किती धारा देण्यांत येत असे
"याची माहिती सरकारास नसे, असें सर्व अधि-
"काऱ्यांनीं कबूल केलें आहे. खोत व रयत यां-
"च्यामध्यें सरकारानें पडावें अशी कांहीं अ-
"धिकाऱ्यांनीं सूचनाही केली व तसें करण्यास
"पेशवाईतील कांहीं प्रकरणांचा त्यांनीं आ-
"धारही दाखविला. एतद्देशीय राजांच्या आ-
"मदानींत कशाही प्रकारचे अत्याचार झाले
"तरी ज्यांस ह्मणून सनदांच्या अन्वयें अधि-
"कार किंवा हक्क देण्यांत येत असत त्यांस
"तोशीस न देण्याविषयीं विशेष खबरदारी घे-
"ण्यांत येत असे. यासाठीं सनदी व बिनसनदी
"असें खोतांचे वर्गीकरण लक्ष्यांत न बाळगि-
"ल्यास अयुक्त अशीं अनुमानें काढलीं जा-
"ण्याचा संभव आहे."

यानंतर वतनदार खोतांना विशेष प्रकारचे हक्क आहेत हें दाखविण्याकरितां कांहीं खोतीगांवांचे कौल व सनदा भाषांतररूपानें दाखल करण्यांत आल्या आहेत व त्यांच्या अन्वयें पुढील अनुमान ठरविण्यांत आलें आहे:–

"या सनदांवरून निदान इतकें व्यक्त होतें
"कीं जो पूर्वीं केवळ अरण्यमय प्रदेश होता
"त्या ठिकाणीं मेहेनतमशागत करून खोतांनीं
"खेडीं वसविलीं आहेत. त्याकामीं त्यांनीं
"मोठमोठ्या रकमा खर्चीं घातल्या आहेत व
"अतोनात श्रम घेतले आहेत. जमीन वहिवा-
"टण्यासाटीं दुसऱ्या गांवाहून त्यांनीं शेतकरी
"आणिले आहेत व त्यांना ठरीव धान्यानें
"किंवा अर्धेलीनें अथवा दुसऱ्या कांहीं करारानें
"शेतें लावण्यास दिलीं आहेत. ठरल्याप्रमाणें
"खंड देऊन शिवाय खोताच्या स्वतःच्या
"वहिवाटीस असलेल्या शेतावर किंवा अन्यत्र
"महिन्यांतून कांहीं दिवस काम करावयास
"कुळांना जावें लागे. याबद्दल त्यांस वेतन
"मिळत नसे. मात्र जे दिवस अशा कामांत
"जात त्या दिवशीं त्यांची जेवणाची सोय
"होत असे. खोत व त्यांचीं कुळें यांच्या पर-
"स्पर व्यवहारांत कोणी हात घालीत नसे व
"हात घालण्याची मनाईही असे. खोताला
"आपलीं वतनाचीं गांवें विकणें झाल्यास अ-
"थवा गहाण टाकणें झाल्यास त्यास सरकारा
"कडून कोणत्याही प्रकारची हरकत घेतां येत
"नसे व घेतां येत नाहीं."

त्याचप्रमाणें खोती वतनाच्या जमिनींचा विभाग होऊं शकतो व तें वंशपरंपरेनें संक्रांत होतें हेंही सप्रमाण दाखविलें आहे. वंशपरंपरेनें प्राप्त झालेलें खोती वतन कलेक्टरसारख्या अधिकाऱ्याला हिरावून घेतां येत नाहीं, असें

कुलाबा जिल्यांतील एका प्रकरणांत सदर दिवाणी अदालतीनें ठरविलें आहे. रत्नागिरी जिल्ह्यांतील खोतांचे हक्क कुलाबा जिल्ह्यांतील खोतांच्या हक्कांहून विशेष आहेत ही गोष्ट सर्वसंमत आहे. वर निर्दिष्ट केलेले हक्क १८२५ सालीं ब्रिटिश सरकारानेंही आपल्या एका लेखांत कबूल केले आहेत व तेव्हांपासून त्यांचा उपभोग अव्याहत होत असतां नवा कायदा करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं व कायदा केलाच तर लोकांचें होणारें नुकसान भरून देणें भाग पडेल.

याप्रमाणें वतनदारखोतांच्या हक्कांचा प्रकार आहे, तेव्हां नवी पहाणी झाल्यास, त्यांची व्यवस्था कशी लावावी ? खोतीगांवांच्या कारभारांत सरकारनें हात घालण्यास कांहीं कारण उपस्थित झालें आहे काय ? झालें असल्यास अशा रीतीनें हात घालणें वाजवी आहे असें दाखवितां येईल काय ? एकंदर कागदोपत्रीं पुरावा पहातां या प्रश्नांचें नकारात्मकच उत्तर देणें भाग आहे असें रावसाहेबांनीं दाखविलें आहे. खोतीच्या पद्धतीपासून अमुक एक प्रकारचें नुकसान झालें आहे असेंही दृष्टोत्पत्तीस आल्याचा दाखला नाहीं. १८९१ सालीं लफूमन साहेबांनीं जो रिपोर्ट लिहिला आहे त्यांत स्पष्ट लिहिलें आहे कीं ,खोतांनीं आपल्या गांवांत ह्मणण्यासारखा जुलुम केल्याचा पुरावा चौकशी अंतीं त्यांस सांपडला नाहीं. १८३७ सालचा ग्लास साहेबांचा रिपोर्ट आहे त्यांतही अशाच प्रकारचा मजकुर आहे, व १८६७ सालापर्यंत खोतांच्या कारभारांत हात घालण्यास कोणत्याही प्रकारची सबब सांपडल्याचें दिसत नाहीं. अशी वस्तुस्थिति असतांही जर सरकारचा आपला उद्देश सिद्धीस न्यावयाचा आग्रह असेल तर कांहीं तरी तडजोड काढणें अत्यंत इष्ट आहे, अशा समजुतीनें प्रकृत लेखांत कांहीं सूचना केल्या आहेत. यापूर्वींच सर्वे कमिशनर कर्नल फ्रान्सिस व दापोलीचे रा. नारो बाबजी गोळे नांवाचे गृहस्थ यांजमध्यें तडजोडीबाबद कांहीं बोलणें झालें होतें. ती हकीकत रा. गोळे यांजकडून रावसाहेबांस कळली होती. त्याच मुद्यांच्या आधारावर प्रकृत लेखांतील सूचना करण्यांत आल्या आहेत. या सूचना तीन बाबींसंबंधानें आहेतः—( १ ) वर्कसजमीन; ( २ ) भातजमीन; व ( ३ ) वेठ. सरकारानें नवीन सर्वेच्या वेळीं खोतांना कोणत्या प्रकारचे हक्क राखून ठेवणें इष्ट व न्याय्य आहे याचेंही या लेखांत सविस्तर निरूपण केलें आहे.

याप्रमाणें प्रकृत लेखांतील मुख्य मुख्य मुद्यांचें केवळ दिग्दर्शन झालें. खोतीप्रकरणांसंबंधानें प्रस्तुत कालांतील रावसाहेबांची उद्योगसंतति सांगण्यापूर्वीं त्यावेळीं प्रसंग कसा येऊन पोंचला होता याचा संक्षेपानें निर्देश करणें आवश्यक वाटतें. खोतीवतनांचा आरंभ, त्यांची उपपत्ति, व खोतांचे हक्क, यांची माहिती वर लिहिलेल्या मजकुरावरून झाली असेलच. कोंकणप्रांत ब्रिटिश अमलाखालीं आल्यानंतर कांहीं कालपर्यंत खोतांची सर्व व्यवस्था नीट चालली होती. नंतर वादास आरंभ झाला. खोतांनीं शेतकीच्या कामासाठीं व स्वतंत्ररीतीनें शेतांची लागवड करण्यासाठीं बाहेरून लोक आणिले असले पाहिजेत हें उघड आहे, व त्यांस वाटेल तेव्हां दूर करण्याचा हक्क खोतांना असलाच पाहिजे. परंतु कांहीं पिढ्यांनंतर मुळच्या कुळांच्या वंशजांना आपल्या हक्कांचें स्वरूप निराळ्याच प्रकारें भासूं लागलें. ते आपल्या जमिनीवर वंशपरंपरेचा हक्क सांगूं लागले. अर्थातच

ही गोष्ट खोतांना संमत होईना व त्यांनीं आपल्या कुळांचा निग्रहपूर्वक निषेध केला. १८२० सालानंतर इंग्रज अधिकाऱ्यांचें तिकडे लक्ष्य गेलें व ज्याला जशी वाटली तशी हकीकत त्यानें सरकारांत लिहून पाठविली. खोत आपल्या कुळांवर बरीच अेरावी चालवितात हें पाहून कांहीं अधिकाऱ्यांनीं कुळांचा पक्ष घेतला, व पूर्वइतिहासाकडे दुर्लक्ष करून खोत हे केवळ आगंतुक असून न्यायानें त्यांस कोणतेच हक्क नाहींत असें त्यांनीं प्रतिपादन केलें. पुढें '१८६५ चा सर्वे आक्ट' झाला. खोतांचा समूळ उच्छेद करून रयतेस विशेष प्रकारचे हक्क देण्यासाठीं हा कायदा सरकारानें काढला अशी लोकांची त्यावेळीं साधारणपणें समजूत झाली. त्यामुळें जिकडे तिकडे बराच गोंधळ माजला. सरकारी अधिकाऱ्यांचें वर्तन ही लोकांची समजूत दृढ करण्यास कारणीभूत झालें. अशा स्थितींत न्यायसभेशिवाय अन्यत्र न्याय मिळण्याचा संभव नाहीं असें वाटून खोतांनीं फिर्यादीवर फिर्यादी केल्या व आपल्या कुळांना कायमचे कोणत्याच प्रकारचे हक्क नाहींत असें सिद्ध करण्याचा त्यांनीं यत्न केला. जिल्ह्यांतील कोर्टांनीं खोतांच्या तर्फे निकाल केला. पुढें सरकारानें वरिष्ठ कोर्टांत अपील केलें तेव्हां रीतीप्रमाणें वादविषयक प्रश्नांचें योग्य निराकारण झालेंच असतें. परंतु खालच्या कोर्टाप्रमाणेंच वरिष्ठ कोर्टाचा अभिप्राय पडेल अशी भीति वाटून सरकारानें आपसांत समजूत करून घेण्याचा घाट घातला. कांहीं बाबतींत सरकारचें ऐकण्यास खोतही कबूल झाले. एकंदर प्रकरण या रंगास आलें तेव्हांच वर निर्दिष्ट केलेला लेख रावसाहेबांनीं लिहिला.

हा लेख प्रसिद्ध झाल्यावर त्याविषयीं बरीच चर्चा सुरू झाली. त्यावेळीं मुंबई सरकारचे चीफ सेक्रेटरी चाप्मन साहेब होते. याच सुमारास रा. बळवंतराव लक्ष्मण परांजपे नांवाचे गृहस्थ चाप्मन साहेबांस भेटावयास गेले होते. हे गृहस्थ रेवेन्यू खात्यांत मोठ्या हुद्याला चढले असून हुशारी व कर्तृत्व या गुणांमुळें मोठा मान पावले होते. भेटीच्या प्रसंगीं रावसाहेबांच्या लेखासंबंधी गोष्ट निघाली, तेव्हां त्या लेखांत रावसाहेबांनीं आपलें स्वतःचें मत म्हणून कांहींच दिलें नाहीं, असें चाप्मन साहेब म्हणाले. ही गोष्ट बळवंतरावजींनीं रावसाहेबांना येऊन सांगितली. तेव्हां लेखांत केलेल्या सूचना रावसाहेबांनीं त्यांस वाचून दाखविल्या; व पुढें असें बोलून दाखविलें कीं, चाप्मन साहेबांनीं या सूचना वाचल्या तरी नसाव्या किंवा वाचल्या असूनही त्या त्यांस समजल्या तरी नसाव्या. बळवंतरावांनीं रावसाहेबांच्या म्हणण्यास रुकार दिला; परंतु चाप्मन साहेबांना ते तसें सांगतील किंवा नाहीं याविषयीं रावसाहेबांना शंकाच होती. असो. या लेखामुळें रावसाहेबांचें महत्व सरकारांत वाढलें असें दिसतें. चाप्मन साहेबांनीं भेटीची इच्छा दर्शवून भेटीच्या प्रसंगीं खोती प्रकरणाविषयीं त्यावेळीं घाटत असलेला सरकारचा ठराव रावसाहेबांना दाखविण्यांत आला. कांहा मुद्यांसंबंधानें रावसाहेबांनीं तेव्हांच आपलें मत दिलें व बाकीच्यांचा विचार करण्यासाठीं ठरावाचा मसुदा आपल्या घरीं पाठविण्याविषयीं सूचना केली. त्यावेळीं राजर्ससाहेब कौन्सलदार होते. त्यांनीं खोती प्रकरणासंबंधीं आपलें मत दिलें होतें तो लेख पाहण्याचीही इच्छा रावसाहेबांनीं प्रदर्शित केली. एकंदर प्रकरणाचा विचार करण्यासाठीं एक कमिटी नेमण्याचा विचा-

रही त्यावेळेस चालला होता. ह्मणून कमिटींत कोणते गृहस्थ असावे याविषयींही रावसाहेबांनीं आपलें मत व्यक्त केलें. त्यावेळीं सर फिलिप वुड्हौस हे गव्हर्नर होते. त्यांना जमीनबाबीच्या प्रकरणांत यथार्थ ज्ञान होण्याची मोठी आवड होती. रावसाहेबांजवळून खोती प्रकरणाची खरी माहिती मिळविण्याची त्यांनीं इच्छा प्रदर्शित केली. लीवार्नर साहेब प्रायव्हेट सेक्रेटरी होते, त्यांच्याशींही रावसाहेबांचा अनेक बाबतींत बराच वादविवाद झाला. नंतर कांहीं दिवसांनीं सरकारी ठरावाच्या मसुद्याविषयीं वादविवाद करण्याकरितां चापूमन साहेबांच्या घरीं कर्नल फ्रान्सिस व राजर्ससाहेब अशी मंडळी जमली. त्याप्रसंगीं रावसाहेबांनाही निमंत्रण करण्यांत आलें होतें. त्यावेळीं बराच वादविवाद होऊन रावसाहेबांनीं कांहीं मुद्यांवर आपलें मत विशेष आग्रहपूर्वक प्रतिपादन केलें. या एकंदर चर्चेचा परिणाम असा झाला कीं चौकशी करण्याकरितां सरकारानें एक कमिशन नेमलें. या कमिशनानें कागदपत्र तपासले, कांहीं खोतांच्या व सरकारी अधिकाऱ्यांच्या साक्षी घेतल्या, व अखेरीस एक रिपोर्ट सरकारांत पाठविला. त्या रिपोर्टाचा पूर्ण विचार करून १८७६ सालीं सरकारानें एक ठराव प्रसिद्ध केला. त्या वेळीं खोती प्रकरणासंबंधीं जे ह्मणून वादग्रस्त मुद्दे होते त्यांचा कायमचा निकाल लागावा असा सरकारचा हेतु होता. सरकारानें खोतांना कांहीं सवलती दिल्या, व ज्या कुळांचा जमिनीवर कोणत्याच प्रकारचा हक्क नव्हता अशा पुष्कळ कुळांना खोतांनींही कायमचे हक्क दिले. हा ठराव झाल्यामुळें सरकार व खोत यांची आपसांत समजूत होऊन कोर्टांत चालू असलेल्या फिर्यादी दोघांनींही परत घेतल्या. याप्रमाणें ह्या प्रकरणाचा त्यावेळीं निकाल झाला.

पुढें १८७९ सालीं खोतीगांवाची व्यवस्था कायम ठरवावी असा सरकारचा संकल्प होऊन आश्बर्नर साहेबांनीं एक मसुदा कौन्सलापुढें आणिला. त्याप्रसंगीं त्यांनीं जें भाषण केलें त्यांतील अनेक मुद्दे खोडून काढण्याच्या हेतूनें 'टाइम्स ऑफ इंडिया' वर्तमानपत्रांत प्रसिद्ध होण्यासाठीं रावसाहेबांनीं एक पत्र लिहिलें. आश्बर्नर साहेबांनीं आपल्या भाषणांत वस्तुस्थितीशीं विसंवादक अशीं अनेक विधानें केलीं होतीं, त्यांचें अयथार्थत्व रावसाहेबांनीं सप्रमाण दाखविलें. पुढें १८८० च्या आरंभीं खोती कायद्याच्या मसुद्यासंबंधानें रावसाहेबांनीं आपले विचार सरकारास पत्र लिहून कळविले. या पत्रांत हरकत घेण्यासारखीं जीं जीं कलमें होतीं त्यांचा निर्देश केला आहे: १८७६ सालीं झालेल्या ठरावाला विरूद्ध असलेल्या गोष्टींचा उल्लेख केला आहे व खोतांच्या खऱ्या हक्कांची पायमल्ली ज्यामुळें होण्यासारखी होती अशा वाक्यांचें दिग्दर्शन केलें आहे.

याप्रमाणें प्रकृत कालांत लिहिलेले जे दोन महत्त्वाचे राज्यव्यवस्थाविषयक लेख त्यांविषयींची हकीकत झाली. याशिवाय १८७६ सालीं दक्षिण प्रांतांत जो दुष्काळ पडला त्यासंबंधानें त्यांनीं एक लेख प्रसिद्ध केला. त्यांत त्यांनीं तीन मुद्यांचा विचार केला आहे. ते मुद्दे येणेंप्रमाणें:-[ १ ] सरकारी कामें काढून दुष्काळपीडित लोकांना मजुरी मिळण्याचें साधन प्राप्त करून देणें; [ २ ] धान्य किंवा अन्न देऊन लोकांची गरज भागविणें; [ ३ ] गुरें दुसऱ्या प्रांतांत नेण्यासाठीं लोकांस मदत करणें.

पहिल्या मुद्यासंबंधानें या लेखांत विशेष

लिहिलेलें नाहीं. फक्त रोज दोन आणे हा मजुरीचा दर महागाईच्या दिवसांत पुरेसा नाहीं, व ज्या रीतीनें एक पक्का शेर धान्य मजुरांच्या पदरांत पडेल अशी व्यवस्था होणें रास्त आहे, एवढेंच ह्मटलें आहे. दुसऱ्या मुद्यासंबंधानें लिहितांना अन्नसत्रें घालण्याविषयीं व माफक दरानें धान्य विकण्यासाठीं दुकानें घालण्याविषयीं सूचना करण्यांत आल्या आहेत. या प्रसंगीं इंदापूर तालुक्यांत ठिकठिकाणीं अन्नसत्रें घालण्याचा प्रयत्न रावसाहेबांनीं आपल्या स्नेह्यांच्या साहाय्यानें केला. व त्याच नमुन्यावर इतर तालुक्यांत व जिल्ह्यांत व्यवस्था लावण्याचा त्यांचा विचार होता हें या लेखावरून व्यक्त होतें. अन्नसत्रांच्या व्यवस्थेंत लोकांच्या चालीरीतींकडे लक्ष्य पुरविण्याविषयीं रावसाहेबांचा कटाक्ष होता हेंही या लेखावरून स्पष्ट होतें. धान्याचीं दुकानें घालून माफक दरानें धान्य विकल्यापासून जें नुकसान होईल तें लोकांनीं वर्गणी करून भरून द्यावें, किंवा म्युनिसिपालिटीच्या मदतीनें त्याची फेड करावी, व शेवटचा उपाय ह्मटला ह्मणजे सरकारानें आपल्या तिजोरींतून लागेल तेवढी रकम द्यावी. अशा प्रसंगीं अर्थशास्त्राचे नियम बाजूला ठेवणें मुळींच अप्रशस्त नाहीं असें रावसाहेबांनीं स्पष्ट लिहिलें आहे.

गुरांचें रक्षण होण्यासाठीं त्यांस मुंबईस आणण्याची कांहीं लोकांनीं कल्पना काढिली होती. परंतु ज्याअर्थीं मुंबईच्या पांजरपोळांत येणाऱ्या गुरांचीच सोय होईना ह्मणून चेंबूर भिवंडी वगैरे ठिकाणीं गुरें ठेवण्याची तजवीज करणें भाग पडलें, त्याअर्थीं देशावरचीं गुरें येथें आल्यास त्यांची व्यवस्था होण्याचा संभव नाहीं, व शिवाय गुरें आणण्याचा व नेण्याचा खर्चही बेसुमार होईल, असें रावसाहेबांनीं प्रतिपादन केलें. त्यांच्या मतें कानडा, रत्नागिरी, कुलाबा व ठाणें या जिल्ह्यांमध्यें सर्वत्र, व नाशिक, पुणें व सातारा या जिल्ह्यांतील मावळ तालुक्यांमध्यें चारशेंपासून पांचशेंपर्यंत गुरांची सोय होईल अशीं ठिकाणें कलेक्टर साहेबांनीं ठरवावीं. ज्याचीं दहापंधरा गुरें असतील त्यानें स्वत: आपल्या गुरांबरोबर जावें. ज्यांचीं दोन दोन तीन तीन गुरें असतील अशा चौघा पांच जणांनीं आपल्यापैकीं एकजण आपल्या गुरांबरोबर द्यावा. एक वर्षपर्यंत गुरें व गुराखी यांच्या पोषणाची तजवीज व्हावी, व बरसात सुरू होऊन पाऊस पडल्यानंतर त्यांना त्यांच्या गांवीं जाऊं द्यावें. अशा प्रकारची व्यवस्था करण्याचा उद्देश रावसाहेबांनीं जाहिर केला, व मुलकी अधिकाऱ्यांच्या साहाय्यानें तो सिद्धीस जाईल अशी त्यांची खात्री होती. आपल्या परिचयाच्या व आपल्या स्नेह्यांच्या परिचयाच्या मोठमोठ्या सुतोदारांना पत्रें पाठवून त्यांची या कामीं मदत मागण्याचा त्यांनीं विचार ठरविला. अशा रीतीनें गुरांचें रक्षण न केल्यास शेतकऱ्यांचें कायमचें नुकसान होईल व त्यांचा व्यवसाय चालणार नाहीं हें उघड होतें. पांजरपोळांच्या व्यवस्थापकांना पत्रें लिहून त्यांच्याकडूनही मदत मिळविण्याची खटपट रावसाहेबांनीं केली. अखेरीस या लेखांत अशी सूचना आहे कीं, जीं सरकारी कुरणें वर्षाच्या आरंभीं मक्त्यानें देण्यांत आलीं असतील तीं त्यांजपासून त्यांचें नुकसान भरून देऊन परत घ्यावीं व गुरांसाठीं मोकळीं ठेवावीं. मक्तेदार सामोपचारानें कबूल न झाल्यास त्यांच्याकडून कुरणें परत घेण्यासाठीं नवा कायदा करणें जरूर झाल्यास तसें सुद्धां करावें. कट्ट्या अर्थशास्त्र्यांना हा कोटिक्रम कदा-

चित् हास्यास्पद वाटण्याचा संभव आहे; वाटेल. परंतु जेव्हां लोकांच्या प्राणावरच प्रसंग येतो तेव्हां अर्थशास्त्राचे सिद्धांत एकीकडे ठेविलेच पाहिजेत, हें उघड आहे.

# चातुर्य आणि मनोरंजन.

### राजदरबारांत सत्याची किंमत.

कोणत्याही लेखकास आपल्या लेखावरील टीका प्रस्तुत काळीं जशी झोंबते तशीच पूर्व काळींही ती झोंबत असे. पण ह्या झणक्याचा जोर लेखकाच्या पदवीवर व अधिकारावर अवलंबून असे. ग्रंथकाराची पदवी व अधिकार ज्या मानानें जास्त त्या मानानें त्याला टीकाकाराच्या लेखापासून कमी जास्त संताप व्हावयाचा. रिशेल्यू एवढा थोर पुरुषाना, पण त्याच्या करूणरसपर्यवसायी नाटकांचा लोकांनीं गौरव केला नाहीं ह्मणून त्याचा भारी संताप झाला; इतकेंच नव्हे, परंतु त्याचाच समकालीन नाटककार कार्नेली याच्या सरस नाटकांची सर्वतोमुखीं स्तुति झालेली पाहून तो त्याचा हेवा करूं लागला !

प्रशियाचा प्रसिद्ध राजा फ्रेड्रिक–धि–ग्रेट याची समंजस, न्यायी, अत्यंत विवेकी आणि गुणिजनांचा चाहता ह्मणून मोठी ख्याति असे. बुद्धिमान आणि चतुर पुरुष जवळ बाळगिण्याची त्याला भारी आवड. यामुळें फ्रान्सचा प्रसिद्ध ग्रंथकार व्हॉल्टेअर हा त्याच्या इच्छेस मान देऊन त्याच्या दरबारीं जाऊन राहीपर्यंत त्याला समाधान ह्मणून वाटलें नाहीं. तो व्हॉल्टेअरशीं इतका स्नेहभावानें वागत असे कीं, त्यांची ही स्नेहग्रंथि कधीं तुटेल असें कोणीही भविष्य करण्याचें धाडस केलें नसतें. परंतु या निःसीम मैत्रीचा अंत झाला, आणि या गोष्टीस राजाचा ग्रंथकर्तृत्वाचा वृथाभिमान हें कारण झालें. आपण केलेल्या कांहीं कविता फ्रेड्रिकनें व्हॉल्टेअर यास दाखवून त्यांबद्दल त्याचें मत विचारिलें, आणि तें त्यानें स्पष्टपणें सांगितलें. परंतु तें मत प्रतिकूल पडल्यामुळें राजाला उघडच आवडलें नाहीं, आणि त्यावेळापर्यंतची मैत्री साफ विसरून जाऊन त्याच्या अंगांत अधिकाराचें वारें शिरलें. आतां ह्या वाऱ्याच्या सपाट्यांत आपल्या जीविताची धडगत नाहीं असें समजून बिचारा व्हॉल्टेअर तेथून पळून गेला. परंतु कवीपेक्षां राजाचा अधिकार मोठा असतो व राजदंड हा कवीच्या लेखणीपेक्षां अधिक बलवान् आणि दीर्घ असतो हें फ्रेड्रिकनें त्याच्या प्रत्ययास आणून दिलें. कारण त्यानें व्हॉल्टेअरला पकडून आणलें. पण त्याचें नशीब बलवत्तर कीं एखाद्या अंधारकोठडींत त्यास जन्मभर कुजत पडावें लागलें नाहीं !

सत्ताधीशाच्या लेखावर टीका केल्याचा परिणाम काय होतो हें फ्रेड्रिकपेक्षां सायराक्यूजचा जुलमी राजा डायोनिशिअस यानें जगास चांगलें दाखविलें. या राजास आपल्या कवित्वशक्तीचा भारी अभिमान असे, आणि आपण उत्तमोत्तम कवींपैकीं एक आहों असें त्यास वाटे. एकवेळ त्यानें आपल्या कांहीं कविता पॉलिक्सेनीज़ या सर्वमान्य तत्त्ववेत्त्यास ह्मणून दाखवून त्यांविषयीं त्याचें मत विचारिलें.

**पॉलि०**—माझें मत घेऊन आपणास काय करायाचें आहे ?

**डायो०**—ग्रंथकाराला होणाऱ्या सर्व मनो-

विकारांचा अनुभव घेण्याची माझी इच्छा आहे. आणि, मुकाट्यानें सांगितल्यास ठीक, नाहींतर माझ्या कविता ऐकून आपल्या मनावर काय परिणाम झाला हें मी सक्तीनें आपल्याकडून समजून घेईन.

**पॉलि०**—बरें तर, अफाट सैन्याधिपतीस उत्तर देतात तसें मी आपल्यास उत्तर देऊं, किंवा एखाद्या कवीस देतां येईल तसें देऊं ?

**डायो०**—या प्रसंगीं, आपल्या बरोबरीच्या माणसास जसें द्याल तसें.

**पॉलि०**—असें आहे तर मग आपल्या कविता अगदीं कनिष्ठ प्रतीच्या आहेत असें ह्मणणें मला भाग आहे.

**डायो०**—अगदीं कनिष्ठ प्रतीच्या ? काय-तुह्मी ह्मणतां याचा अर्थ तरी काय ?

**पॉलि०**—माझ्या ह्मणण्याचा अर्थ असा कीं, काव्यरचनेमध्यें शब्दांची जुळवाजुळव नीट रीतीनें करतां येण्यापेक्षां आपणास रणभूमीवर सैन्याची रचना चांगल्या प्रकारें करितां येते.

**डायो०**—( संतापून ) असें ज्यापेक्षां तुझें मत आहे त्यापेक्षां रसिकता आणि शिष्टाचार हे काय पदार्थ आहेत हें अझून तुला शिकलें पाहिजे असें दिसतें. करितां तूं दगडांच्या खाणींत जाऊन हे दोन्ही गुण आधीं शिकून ये.

**पालिक्सेनीज** न डगमगतां तेथून निघून गेला आणि खाणींमध्यें काम करूं लागला.

ह्या गोष्टीस एक वर्ष लोटल्यावर राजास त्याची आठवण झाली, आणि त्यास त्यानें पूर्वपदावर पुन्हा स्थापित केलें. पुढें एके दिवशीं, आपण दिलेल्या शिक्षेचा कांहीं परिणाम झाला कीं काय हें पहाण्याकरितां, त्या जुलमी राजानें भर दरबारांत स्वकृत कांहीं नवीन कविता ह्मणून दाखविल्या, आणि त्यांच्याविषयीं तेथें जमलेल्या सरदार दरकदार वगैरे मंडळीचें त्यानें मत विचारलें. तेव्हां, राजाबोले दाढी हाले, या न्यायानें—' उत्तम, ' ' उत्तमोत्तम ' ' न भूतो न भविष्यति ' इ० इ० प्रकारें एकावर एकानें ताण केली. शेवटीं पॉलिक्सेनीजची जेव्हां पाळी आली तेव्हां तो थोर तत्ववेत्ता मुकाट्यानें आपल्या जाग्यावरून उठून दरवाजाकडे जाऊं लागला. तें पाहून डायोनिशियसनें ओरडून विचारलें—अहो पॉलिक्सेनीज, आपण चाललां कोठें ?

त्या निर्भीड तत्ववेत्त्यानें शांतपणानें उत्तर दिलें—रसिकता आणि शिष्टाचार शिकण्याकरितां दगडांच्या खाणींत चाललों, सरकार!

---

परंतु सर्वच राजेलोकांस खोटी स्तुति आवडते असें नाहीं. फ्रान्सच्या १४ व्या लुई राजासारखा एखादा अपवादही आढळण्यांत येतो. या राजाबद्दल अशी गोष्ट सांगतात कीं, गद्यलेखनामध्यें याचा हातखंडा असे; परंतु ही निपुणता त्यास पद्यरचनेमध्यें साधली नव्हती. एकावेळीं त्यानें कांहीं पद्यें रचून बॉयलू नामक आपल्या दरबारांतील कविश्रेष्ठास दाखविलीं आणि तीं कशीं काय उतरलीं आहेत ह्मणून त्याचें मत विचारलें. बॉयलूनें ती पद्यें नीट वाचून पाहिलीं आणि कांहीं एक न बोलतां मुकाट्यानें तीं राजाच्या हातांत परत दिलीं.

राजा आश्चर्यचकित होऊन त्यास विचारतो—कसें काय कविराज, आमच्या कवितांसंबंधानें आपलें कसें काय मत झालें आहे ?

बॉयलूनें आपल्या नेहमीच्या सरळपणानें खुबीदार उत्तर दिलें—खुदावंत ! आपल्यास अमुक एक गोष्ट अशक्य आहे असें नाहीं. कांहीं मनांत आणाल तें करूं शकतां. वाईट

पद्यें रचण्याची हल्लीं महाराजांस इच्छा झाली, आणि महाराजांस त्यांत चांगलेंच यश आलें आहे.

लुई राजा—मि० बॉयल्, तुह्मीं उत्तम कवि आहां एवढेंच नाहीं, परंतु तुह्मी मोठे सत्यवादी गृहस्थ आहां.

दुसऱ्या एकावेळीं अशाचसारखा प्रकार घडून आला. राजानें कांहीं पद्यें रचून तीं आपल्या दरबारांतील गुणदोषपरीक्षणामध्यें निष्णात अशा एका ड्यूकास दाखविलीं आणि त्यास ह्मटलें—ड्यूकसाहेब, हीं पद्यें आज एकानें मजजवळ आणून दिलीं आहेत. हीं वाचून पहा, आणि मजप्रमाणेंच आपल्यासही हीं नीरस वाटतात कीं नाहींत हें सांगा.

ड्यूकनें तीं पद्यें काळजीपूर्वक वाचून पाहिलीं, आणि राजाकडे परत करून तो ह्मणाला—हुजूरचें मत इतर गोष्टींतल्याप्रमाणें या गोष्टींतही युक्त आणि यथार्थ आहे. कारण अशा नीरस आणि असंगत कविता माझ्या कधीं पाहण्यांत आल्या नाहींत.

लुई—या पद्यांची वास्तविक योग्यता काय आहे हें आपल्या तोंडून ऐकून मला आनंद झाला. कारण हीं पद्यें मी लिहिलीं आहेत, आणि हीं आतां मी अग्नीस अर्पण करणार.

असें ह्मणून तीं तो दिव्यावर धरूं लागला. हें पाहून ड्यूक भारी ओशाळला आणि झालेली चुकी दुरुस्त करण्याच्या हेतूनें ह्मणाला—हं-हं- हुजूर, मला तीं पद्यें पुन्हा एकदा पाहूंद्या. कारण मघां मीं तीं घाईघाईनें पाहिल्यामुळें मला त्यांची वास्तविक योग्यता समजण्यास वेळ मिळाला नाहीं.

लुई—छे, छे, तुह्मीं आपला खराखुरा अभिप्राय स्वच्छ अंतःकरणानें दिलेला आहे; आणि हीं माझीं वाईट पद्यें लोकांच्या हातीं पडण्यापेक्षां तीं अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडावीं हेंच योग्य होय.

असें ह्मणून त्यानें तीं पद्यें खरोखरच अग्निस्तृप्यतु केलीं.

परंतु या स्पष्टोक्तीबद्दल बॉयलू कवीवरील अगर ड्यूकवरील राजाच्या कृपेंत यत्किंचितही अंतर पडलें नाहीं.

---

## तान्हाजी मालसुरे
### अथवा
## सिंहगडची मोहिम.

### प्रकरण पांचवें.

सूर्याजी दुसरे दिवशीं सकाळीं, दुःखित होत्साता, स्वीकृतकार्यावर दृष्टि देऊन, मृतबंधूची व जिंकलेल्या किल्ल्याची नीट व्यवस्था लावून, शिवाजीमहाराजांस भेटावयास जातो. राजाकडून त्याचा व सैन्याचा सत्कार; शिवाजीमहाराज सर्वांचें सांत्वन करितात; उपसंहार.

वेळ—प्रभातकाळ.

उदयाचलावरि दिसे सविता—
त्रिजगाचिया अति सुखास विता;
अरुणप्रभा रुचिर ताम्र नवी
प्रतिशैल हेम[1]—नगसा बनवी. १

खग कोटरस्थ विपिनांतरिंचे[2]
करितात कूजित परोपरिचें;
निजपक्ष चंचु-पुट नीटविती,
क्रम नित्यचा अनुसरूं बघती. २

---

१ सुवर्ण पर्वत ( मेरु ) २ अरण्यांतील.

वृक-जंबुकादिक दरींत रिघे,
बघतांचि सूर्य भय अंतरिं घे;
रजनीचरें दिसत तीं लपती,
हत-वीर्य हो जरि तदीय[1] पती. ३

दिसती सुनीर[2] सरिं[3] ताम्ररसें,[4]
तशिं पुंडरीक[5]-कमळें सरसें;[6]
फुललीं स्थळोस्थळिं सुविस्तृत तीं;
वरि गुंगतात बहु भृंग[7]-तती. ४

शिरिं कांबळी कवळुनी गवळी
वनिं चारण्या हळु खिल्लार वळी;
खिळिलीं [9]हिमें भुइस जीं हरणें
करूं लागती हळुच वावरणें. ५

दिसती कृशोदरिपरी [10]सरिता
लघु-मध्यमा,[11] स्व-वसनांतरितां;[12][13]
स्फटिक-प्रभा, सुतनु, मंदगति,-
नगजा[14] सुभूषवित कीं जगती. ६

विलसे शिवें[15]-ध्वज गडीं भगवा
मृदु-वात-कंपित-पटाग्र नवा;
अरुणोदयीं अभय [16]डिंडिमही
उठवी गडांतुनि समूळ दुही.[17] ७

शिवराय-राजमणि-नाम-बळें
शक[18]-पक्षपाति थिजले सगळे;
गडिं तान्हयानुज[1] पुन्हा विजयी
स्थिति कां असे न तरि शांतमयी ? ८

दिसलें गडावरुनि आणि गडीं
जग शांतिची अनुभवीत घडी;
परि शून्य तें गमत खिन्न-मना
ज्वरितासि[2] पायसहि[3] दे वमना. ९

---

विलपे क्षणोक्षणिं, मनीं जळतो,
अति बंधु-वत्सलचि सोज्वळ तो;
प्रियबंधुचें निधन[4] ज्या रडवी,
शिवें[5]-सैन्य-नायक शिरा बडवी. १०

जग शांत आणिक सुरम्य दिसे-
गमलें तया परि कडू विखसें;
वरुनी महा शिरिं कुठार[6] पडे,-
पडुनी न घाय करि कैंवि घडे ? ११

जंव घोर तन्मनिं वसे पहिला,
जंव लोळवीत रिपुतें महिला,[7]
तंव मात्र शोक धरि सांवरुनी;-
जरि तो सुशांत गमला वरुनी. १२

प्रिय-वस्तु-दुःख किति आवरिलें
स्वयमेव तें फुटतसे वहिलें;[8]
न फुटे सुखें, फुटत पोरदसें;[9]
गिळितां जिवास अनिवार डसे. १३

अति शोक तो करित मालुसरा
शिशुसा रडे ढळढळां दुसरा;[10]
बहु तुंबलें हृदयिं शोकजळ,
फुटलें स्वयें झरुनि तें सकळ. १४

बडवी शिरासि, हृदयास पिटी,
निज बंधुच्या करि शवास मिठी;

---

१ चंद्र. २ उत्तम प्रकारचें ज्यांत पाणी आहे असें. ३ तळ्यांत. ४ तांबडीं कमळें. ५ पांढरीं कमळें. ६ सुंदर. ७ भ्रमरांच्या पंक्ति. ८ कळप. ९ दहींवरानें. १० नद्या—( यांतील सर्व विशेषणें—सरिता व नगजा—पार्वती—यांस सारखींच लागतात. ) ११ कटिभाग; पक्षीं, मध्यभाग. १२ वसन=वस्त्र; पक्षीं वसतिस्थान. १३ अंतरित=आच्छादून गेलेल्या. १४ नद्या; पक्षीं पार्वती. १५ शिवाजीराजाचा. १६ अभय दर्शविणारा दांडोरा—दवंडी. १७ परकेपणा—दुफळी, वैरभाव. १८ म्लेंछ.

१ सूर्याजी. २ ताप आलेल्याला. ३ दूध. ४ मृत्यु. ५ सूर्याजी. ६ कुऱ्हाड. ७ धरणीला. ८ खचीत. ९ पान्यासारखें. १० दुसरा ( मालुसरा )=सूर्याजी.

मुखिं मृत्तिका भरि, पडे धरणी,
करि आत्म–घातक अशी करणी. १५

धरितात सांवरून त्या नृवेरा,
कथितात गोष्टि बहु बोधपरा;
परि शोकतप्त–जन शांतविणें !
सहसा घडेल न सुसाधुविणें. १६

मिळती सभोंवति कुणी युवती,
गुण–लुब्ध विभ्रम–विलासवती;
निरखुनि त्या बघति वीरमणी,
नृपलक्षि हा परि अशा रमणी. १७

सकुमार, सुंदर लहान शिशु–
द्रवतील ज्यां बघुनि वन्य पशु–
जवळी उभे करिति कोणि सुधी !
बघेच न यास परि त्यांसि तधीं. १८

न विकार तद्हृदयिं शोकविना
पसरे–विदाहकहि जो कविंना;
असि–घात मूर्च्छवि न ज्या शतशा,
करि शोक–शंकु सुनिचेष्ट तशा. १९

पडला असे विकळ भूमितळीं,
प्रिय मावळे स्वजन त्याजवळीं;
बसले सखेद भयभीत मनीं,
करिती उपाय बहु तच्छमनीं २०

---

तंव एक सुंदरि पडे धरणी
तरुणी उभ्या असति त्यांमधुनी;
पडली न केवळच; उच्छ्वसना
हरि मूर्च्छना, भ्रमवि तन्नयना. २१

पडतां अशी बघुनि आत्मसखी
झणि घालुनी जल तदीय मुखीं,

१ नरश्रेष्ठा. २ म पाही. ३ अतिताप देणारा. ४ श्रेष्ठांनाही. ५ तरवारीचे घाय. ६ श्वासोश्वास.

नव–यौवना इतर ओरडल्या;
कुणि वक्ष पीटिति, कुणी रडल्या. २२

तंव माय ओरडत धांवुन ये,
कवटाळुनी धरित ती तनये;
भरिलें तिणें गगन शोक–रवें;
न अपत्य–शोक–गणना करवे. २३

पति–मृत्यु–दुःख करितां करितां
नयनीं जिच्या न खळल्या सरिता;
अति कोरडा पडत कंठ जिचा,
शिणवी वियोग जिजला पतिचा; २४

गतला न याम पतिच्या विरहें,
तंव ये जियेवरिच संकट हें;
स्व–सुतेस ती धरुनि मांडिवरी,
करि शोक दारुण अनाथ खरी. २५

परिसूनि त्या अति विलापरवा
निरखुन ती,–नच जिला परवा–
क्षण मावळे रिपुहि ते द्रवले,
करुणाश्रुंनीं नयन ओलवले. २६

इकडे स्वकीय सरदार गडी,
तिकडे अनाथ अबला उघडी;
बघुनी अतिव्यथित त्यां उभयां
स्थळ सोडवे न, धरवे न, तयां. २७

उठतात साह्य करण्यास तिला,
बसती न्यहाळुनि चमूपतिला;
वर खालिं ते करिति; यापरता
उपचार तो न घडला व्यथितां. २८

इतुक्यांत शुद्धिवर येइ जरा
सरदार कारुणिक मालुसरा;
उठला वरी खडबडोनि जवें,
मनिं हो सुसद्गदित शोक–रवें. २९

१ प्रहर. २ दयाळू.

दिसली पुढें ढळढळां रडती
निज कन्यकेस्तव वयस्क सती;
सरसावला सरस सायकसा;[1]–
बघतो विचार मनिं काय कसा. ३०
कळतांच ती उदयभानु–सती
गेत दुर्ग–पाल–वनिता सुदती–
विनवी धरोनि शिरिं पाय तिचे:
असतात शुद्ध–मति या प्रतिचे. ३१
तुळितां तिची तशि निजस्थिति ती,
गमली सती खरि अनन्य–गति;
निज दुःख–भार मुळीं तो विसरे:
दृढभाजकांत लघु[4] जेंवि सरे. ३२
वदला " बये, चरणिं किंकर हा
" नमितो तुला, मनिं निशंक रहा !
" मम मायशीच मज तूं गमसी !
" भगिनी तशी तव सुताहि मसीं ! ३३
" नलगे अहो रूदन, सुस्थिर व्हा;
" नलगे महौषधि, नकोचि दवा;
" दिसते कुपित्त–कृत घेरि खरी;
" ह्मणि येरि[5] सावध बघाल बरी. " ३४
निमिषांत तों खरिच ते सुमुखी
उठली, सभोंवतिं जनां निरखी;
करूं लागली उदयभानु–सुता
प्रमदाजनांसि कृति ज्या विहिता. ३५
सरसाविते पदर; कंचुकि ती
करिं नीटवी; मुरडि नेत्र किती !
नग कंठिंचे नथहि सांवरिते,
करिते वृथा कितिक भावें[6] रिते. ३६
मुरके; ह्मणे जननिला " चल गे !
बसणें इथें पळ मला नलगे ! "
न उठे, न जाय परि ते परँती,
बहु हावभाव करिते वरती. ३७
झिडकारिते क्षण रूसोनि दुरी,
कंवटाळुनी परत तीस धरी;
हंसते; पुन्हा रडरडोनि, हंसे;
क्षण एक भाव पुरता न वसे. ३८
पुसल्यासि उत्तर सुधें न वदे,
जननीस हेंहि परि उत्सव दे;
नुमजे कुणासि करि काय असें;
"जडलें" कुणी वदति "हीस पिसें." ३९
न कळे पित्यास्तव तिला भ्रम हो,–
समयीं अशा भ्रमति सुज्ञ अहो !
स्मर[1]–जन्य–चेष्टित तथापि बुधां
गमलें, जरी लपवि ती प्रमदा. ४०
सुम[2]–चाप–सायक–शरव्यहि जें
दिसलें तिचें उघड त्यां सहजें;
रण–शूर सुंदर अशा तरूणा
बघुनी वरार्थिनिस[3] होय रुणा[4]. ४१
पडतांचि जो विकळ, हेंहि पडे;
उठतां, उठे; प्रणय–दृष्टि जडे
तिचि ज्यावरी, सहज तोचि युवा
कविकल्पने विषय योग्य न वा ? ४२
परि जो स्वतां सरळ, शुद्ध सुधा,–
नुमजोनि ह्या कृति तिच्या विविधा,
चरितें तिच्या द्रवुनि मालुसरा
पितृशोक तत्कृतिस मानि खरा. ४३
निजदुःख अल्प अति मानुनियां,
समजावि ती सजननी तनया;
नृप–कार्य– भागहि पुरा मनिं घे,
प्रभुदर्शना त्यजुनि शोक निघे. ४४

१ बाण. २ उदेभानाची स्त्री. ३ मृत. ४ लघुभाजक. ५ ती. ६ हावभाव. ७ पलीकडे.

१ कामापासून उद्भवलेल्या चेष्टा. २ मदनाच्या बाणाचें शरव्य=लक्ष्य. ३ वर वरण्याची जिला इच्छा आहे अशी जी—अर्थात्, अविवाहिता. ४ ध्यास; वेड. ५ प्रेमदृष्टि ( नेत्रकटाक्ष ).

Printed at the " Ganpat Krishnaji' " Press, Bombay, 16-8-99

ण्याला तयार झाला, व तिला ह्मणाला—'मुली, आतां तुला कृतांत लवकरच हरण करणार, याकरितां तुझा जो कोणी प्रियकर असेल त्याचें स्मरण कर!' पुढें तिला तो मारणार, तोंच मालतीनें माधवाचें स्मरण केलें; व 'कसेंही करून माझें रक्षण करावें, निदान मेल्यावर तरी माझी विस्मृति होऊं देऊं नये,' असें अतिशय करूण स्वरानें ह्मटलें. ते तिचे शब्द, माधव शोध करीत आलेलाच होता, त्याच्या कानीं पडले. तेव्हां तो सपाट्यानें पुढें झाला. मालतीला एकदम आपल्याकडे ओढून घेऊन बाजूला करून त्यानें अघोरघंटाचा धिःकार केला, व तो त्याचें शासन करण्यास तयार झाला. माधव एकाएकीं दत्त ह्मणून उभा राहिलेला पाहून अघोरघंट थोडासा घाबरला. पण तितक्यांत पुनः सांवरून आपल्या मंत्रसिद्धीस आड आल्याबद्दल तो माधवावर फारच संतापला व त्याला मारण्यास तयार झाला. माधव ऐन वेळेवर आपल्यास सोडविण्यास आला, याचें मालतीला मोठें आश्चर्य वाटलें. तिला बराच धीर आला व 'तुह्मीं येथें या वेळीं कसे?' ह्मणून तिनें त्याला विचारिलें. तेव्हां 'कशा तरी अलौकिक उपायानें तुझी प्राप्ति व्हावी ह्मणून मी नरमांसविक्रयाकरितां स्मशानांत हिंडत होतों, तों तुझें रडें ऐकून येथें अकस्मात् दैवयोगानें प्राप्त झालों' असें त्यानें सांगितलें तें ऐकून मालतीला फारच आश्चर्य व भय वाटलें. त्यानें आपल्याकरितांच असें साहस करण्यास तयार होऊन ऐन वेळेवर आपले प्राण वांचविले यामुळें तर तिचें त्याच्यावर अतोनात प्रेम बसलें.

याप्रमाणें परस्पर भाषणें होत आहेत, व माधव व अघोरघंट एकमेकांस मारण्यास तयार होत आहेत, तोंच मालती वाड्यांतून नाहींशी झाल्याबद्दल बोभाटा झाला. तेव्हां कामंदकीनें आपल्या दिव्य दृष्टीनें पाहून, विचार करून,—'हें कृत्य अघोरघंटाशिवाय दुसऱ्याचें नाहीं. त्यानेंच तिला बळी देण्याकरितां कराळेच्या मंदिरांत नेली असावी, तिकडे जाऊन शोध करा, व मंदिराला घेरा घाला', असें सांगितलें. त्याप्रमाणें अमात्याच्या शिपायांनीं येऊन मंदिराला वेढा दिला. असें पाहून तर अघोरघंट व कपालकुंडला यांना फारच त्वेष आला. माधवानें मालतीला तिच्या आप्तजनांच्या स्वाधीन करून नंतर अघोरघंटाचें पारिपत्य करावें असा विचार करून त्याप्रमाणें केलें. युद्ध किंवा रक्तपात रंगभूमीवर होणें प्रशस्त नाहीं असा साहित्यशास्त्राचा नियम असल्यानें माधव व अघोरघंट लढत लढत, आणि मालती व कपालकुंडला त्यांना 'नीट सावधानानें लढा' असें उत्तेजन देत देत, निघून जातात.

[ हा सर्वच अंक चमत्कारिक आहे. यांतही दृश्यापेक्षां श्राव्य भागच विशेष आहे; व दोही बीभत्स व भयंकर असा आहे. अघोरी पंथाचें यावेळीं पुष्कळच प्रस्थ माजलेलें होतें, व त्यांच्या त्या बीभत्स मंत्रतंत्रोक्त क्रियांच्या योगानें त्यांना अलौकिक मंत्रसिद्धि प्राप्त होते, अशी बहुतेक लोकांची समजूत होती. या कामाला नरबली—त्यांतही होईल तेथवर उत्तमोत्तम स्त्रीरत्न बळी दिलें जातें, अशीही सामान्य जनांची समजूत होती. कपालकुंडला व सौदामिनी यांना वाटेल तेव्हां वाटेल तेथें हवेंतून उडून जातां येत होतें. यावरून कपालकुंडलेचा गुरु अघोरघंट हा याहूनही अधिक महत्त्वाच्या सिद्धि प्राप्त करून घेण्याच्या खटपटींत होता, हें उघड आहे. या अघोरी—शाक्त—पंथाचें दैवत शक्ति व शक्तिनाथ—पार्वती व शिव यांचीं उग्ररूपें—हें होतें. यांच्या सर्व स्तुतींत व स्तोत्रां-

त त्यांचेंच स्तवन केलेलें आहे. अद्यापि केवळ शक्तीची उपासना जारी झालेली नव्हती. हा सर्व प्रकार आरंभीं हठयोगावरूनच चालू झाला असावा व पुढें त्यांच्यांत हलकट, आततायी व व्यसनी लोक शिरून त्याला हें बीभत्स स्वरूप आलें असावें. अशा बीभत्स प्रकारांना योग्य असें स्थान ह्मटलें ह्मणजे स्मशानच असावयाचें, कारण भीतीमुळें व तेथील चमत्कारिक संसर्गामुळें तेथें कोणीही वेळीं अवेळीं क्वचितच जाणार. यामुळें या पंथाच्या लोकांना आपला बीभत्स व अमानुष प्रकार चालविण्याला स्मशाना सारखें स्वतंत्र व सोयीवार स्थळ क्वचितच सांपडणार. अशा ठिकाणीं ऐन संध्याकाळीं माधव आलेला पाहून कपालकुंडलेला आश्चर्य वाटलें. तो नरमांसविक्रयरूपी साहस करण्याला कां प्रवृत्त झाला असेंही तिच्या मनांत आलें. त्याला पाहतांच तिनें तो कामंदकीच्या मित्राचा पुत्र माधव असें ओळखलें. पण 'जाउंद्या, आपल्याला त्याच्याशीं काय करावयाचें आहे? आपण आपलें काम करावें,' असें ह्मणून ती निघून गेली होती. तिला गांवांतील सर्व गोष्टी ठाऊक होत्या असें दिसतें. तिनें संध्याकाळचें वर्णन केलें आहे, तें जरी उत्तमांतलें नाहीं तरी बरें आहे. माधवाच्या मनांत मालतीविषयींचेच विचार सारखे घोळत होते. तिचें प्रेम आपल्यावरच आहे ही गोष्ट त्याला पूर्णपणें व्यक्त झाली होती. पण त्याबरोबरच ती आपल्याला खास प्राप्त होत नाहीं अशीही त्याची खात्री झाली होती. तरी 'तिचा आपल्याशीं समागम होईल का? निदान तिचें तें सुंदरमुख तरी आपल्या दृष्टीस पडेल काय?' असें त्याला वाटत होतें. 'तिचा व आपला जन्मांतरींचा प्रेमसंबंध असावा व आतां तिला पाहिल्यावर तो प्रेमसंबंध पुनः जागृत झाला असावा. ती मिळण्याची मुळींच आशा नसतांही आपल्या मनांतील तद्विषयक अभिलाष कमी होत नाहीं. प्रेमाचा अप्रतिबंध प्रवाह चालूच आहे, व माझी वृत्ति केवळ तन्मय होऊन गेली आहे हें काय?' असा तो सारखा विचार करीत होता. 'मालतीचें सर्व रूप व गुण त्याच्या हृदयावर जणों पक्के कोरल्यासारखे, जडल्यासारखे, किंवा मदनाच्या पांचही बाणांनीं खिळून टाकल्यासारखे झालेले होते.' रात्रीच्या वेळीं स्मशानांत अनेक चिता पेटलेल्या होत्या. त्यामुळें त्या सर्व प्रदेशास एक चमत्कारिक शोभा आलेली होती. तिचें त्यानें चांगलें वर्णन केलें आहे. अशा वेळीं स्मशानांत नेहमी नानातऱ्हेचीं भूतें, प्रेतें, पिशाचें वगैरे असतात अशी सार्वत्रिक समजूत आहे. पण तिचें डोळ्यापुढें प्रत्यक्ष चित्र उभें राहण्याजोगें असें सविस्तर वर्णन या ठिकाणीं भवभूतीनें माधवाच्या तोंडून करविलें आहे. तसें–किंवा त्या तोडीचें देखील–इतरत्र क्वचितच आढळतें. हें वर्णन फारच बीभत्स व भयंकर आहे. त्याच्यावरून पिशाचयोनी व तिचे आहारविहार इत्यादिकांचें चित्र तयार करणें असलें तर फारसें कठिण पडणार नाहीं. पण भवभूतीच्या वेळीं लोकसमाजाच्या समजुती अशा बाबतींत कशा निकृष्टावस्थेप्रत पोंचल्या होत्या, तें स्पष्ट दिसून येतें. तेव्हांपासून अद्यापपर्यंत त्या समजुती बहुतेक तशाच आहेत व त्यांच्यामुळें जनसमाजाचें अतोनात नुकसान झालें व होत आहे, यांत शंका नाहीं.

माधवानें–'आपण महामांस विक्रयाकरितां आलों आहों, पिशाचांनों, या हो या!–' असें मोठ्यानें ह्मणण्याचा अवकाश, तों त्याच्याकडे असंख्य निरनिराळ्या तऱ्हेचीं पिशाचें धावून

आलीं. हें नरमांस माधवानें एखाद्या चितेंत जळत असलेल्या पुरुषप्रेताचें ओढून काढून घेतलें होतें, असें दिसतें. याचा उद्देश काय व त्यापासून कोणचें फल प्राप्त होणार होतें तें स्पष्ट सांगितलेलें नाहीं. हीं सर्व पिशाचें निःसत्व होतीं, त्यांना जड देह नव्हते. नुस्तें रूप मात्र दिसत होतें. ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. हा सर्व प्रकार चालला आहे तोंच मालतीचा आर्तस्वर त्याच्या कानीं आला. त्याचें वर्णन फार सुरेख आहे. माधव थोडासा पुढें गेला तोंच मालतीचें रडणें व बोलणें त्याला स्पष्ट ऐकूं आलें. ती लवंगिका व आपला पिता यांच्या नांवानें हाका मारीत होती. माधवाची पक्की खात्री होऊन तो तिला सोडविण्याकरितां गेला. अघोरघंट व कपालकुंडला यांनीं देवीचें व शिवतांडवाचें स्तवन केलें. या जागीं 'दंडक' नांवाचें वृत्त योजलेलें आहे. तें बहुधा दुसरीकडे फारसें उपयोगांत आणलेलें आढळत नाहीं. त्यांत शब्दरचनाच विशेष चमत्कारिक आहे, अर्थवैचित्र्य किंवा उत्तमसा अलंकार साधलेला नाहीं. अलीकडील मराठी नाटकांतील धांगडधिंग्याच्या लायकीचेंच हें स्तवन आहे. हें लांबलचक स्तवन होईपर्यंत माधव व मालती यांना एकमेकांकडे पहात स्वस्थ उभें रहावें लागतें हा दोष आहे. निदान मालतीचा स्वर ऐकूं येई इतक्याजवळ असलेल्या करालायतनांत जाण्याला माधवाला हें सर्व धांगडधिंग्याचें स्तवन संपे इतका वेळ लागला, असें तरी मानलें पाहिजे.

बळी देण्याकरितां मालतीला सिद्ध केलेली पाहतांच माधवाला फारच आश्चर्य वाटलें व क्रोध आला. इतक्यांत कपालकुंडलेनें तिला 'आतां तुझा मरणकाळ जवळ आला, आपल्या प्रियकराचें स्मरण कर' असें ह्मटलें, व अघोरघंटानें तिला मारावयाला तरवार उचलली. तिनें तशा त्यावेळीं—'प्राणप्रिया माधवा, परलोकीं गेलेल्या माझें तुह्मीं स्मरण करा; कारण मागें ज्याचें प्रियकर स्मरण करितात तो जन मेला असें नाहीं—' असें ह्मटलें. तेव्हां, 'इचें मन माधवावर बसलें आहे' असें कपालकुंडलेनें ह्मटलें. त्यावर 'कसेंही असो इला मारतोंच—' असें ह्मणून अघोरघंट देवीची प्रार्थना करून 'हा बळी ग्रहण कर,' असें ह्मणून तिला मारण्यास उद्युक्त झाला. इतक्यांत माधव मध्यें आला व त्यानें त्याला झिडकारिलें, व 'हा पहा तुला आतां होतास कीं नव्हतास, असा करून टाकतों' असें त्वेषानें ह्मटलें. हा माधवाचा प्रवेश मालतीच्या भाषणानंतर ताबडतोब झाला असता तर अधिक खुलता. माधवाला पहातांच मालतीला धीर आला. तिनें एकदम त्याला घट्ट मिठी मारली, व 'माझें रक्षण करा' असें काकुळतीनें ह्मटलें. अशा प्रसंगीं निःशंकपणानें मालतीनें मिठी मारल्याचा माधवाला अतिशय आनंद झाला. त्यानें तिचें समाधान केलें, व 'पहा, आतां या दुष्टाला त्याच्या क्रूरकर्माचें योग्य फल देतों—' असें ह्मणून तो अघोरघंटावर चवताळून जाऊं लागला. अघोरघंटानें त्रासानें—'हा कोण आमच्या कार्यांत विघ्न करण्याला आला?' असें ह्मणतांच 'कामंदकीचा सुहृत्पुत्र माधव—' असें कपालकुंडलेनें उत्तर दिलें. माधवानें मालतीला, 'हें कसें काय झालें?' ह्मणून विचारतां, 'मला कांहीं माहित नाहीं. गच्चीवर निजलेली येथें जागी झालें. पण आपण यावेळीं येथें कसे आलां?' असें तिनें त्याला विचारिलें. तेव्हां 'तुझ्या प्राप्तीची निराशा झाली, याकरितां महामांसविक्रय करावा ह्मणून स्मशानांत आलों. तेथें

तुझा करुणस्वर ऐकून येथें आलों.' असें माधवानें सांगितलें. हा सर्व प्रकार अशा गडबडीच्या प्रसंगीं बराच चमत्कारिक दिसतो. एक दुसऱ्याचा प्राण घेण्याला तयार झाला असतांना अशा रिकाम्या गोष्टी सांगत बसण्याला क्वचितच अवकाश सांपडतो. यानंतर माधव व अघोरघंट यांचा संवाद तरी अशाच तऱ्हेचा आहे. माधवानें मालतीचें केलेलें वर्णन, अकस्मात घडणाऱ्या गोष्टीचें वर्णन, व अघोरघंटानें माधवाची केलेली निर्भर्त्सना,–हे श्लोक बरेच चांगले, पण या प्रसंगाला अधिक पाल्हाळाचे आहेत. अघोरी पंथाच्या लोकांना या वेळींही सर्व लोक दुष्ट, पाखंड, चांडाल, समजत होते. व समंजस लोकांच्या मनांत त्यांच्याविषयीं फारशी भीति नव्हती असें माधवाच्या बोलण्यावरून दिसतें. माधव व अघोरघंट यांनीं एकमेकांस उद्देशून एकच धिःकाराचा श्लोक ह्मटला आहे. व पुढें त्यांनीं मालती व कपालकुंडला यांचें एकाच श्लोकानें शांतवन केलें आहे. हें ठीक नाहीं. यापासून रसभंग होतो. नंतर अमात्याच्या लोकांनींही कामंदकीच्या सांगण्याप्रमाणें देवीच्या देवळाला वेढा दिला. हें पाहून अघोरघंटाला अधिकच त्वेष आला, व दोघेही लढत लढत निघून गेले.

मंत्र, तंत्र, सिद्धि, देवी, नरबली, भूत, प्रेत, पिशाचें, इत्यादिकांच्या या अंकांत दिलेल्या वर्णनावरून भवभूतीचा कालनिर्णय करण्याला बरेंच साधन होतें. दंडीच्या दशकुमारचरित्रांतही जागजागीं अशाच तऱ्हेचें वर्णन दिलेलें आहे. तें यापेक्षांही दोन पावलें पुढें गेलेलें आहे ह्मटलें तरी चालेल. बाणाच्या हर्षचरित्रांतील चौथ्या उच्छ्वासांत अशाच तऱ्हेचें वर्णन एके जागीं दिलेलें आहे. या सर्वांवरून भवभूति बाणाच्या किंवा दंडीच्या पूर्वी झालेला नाहीं असें ह्मणतां येईल. बाण इसवी सनाच्या सहाव्या शतकांत झाला असें पाश्चिमात्य विद्वानांनीं अनेक प्रमाणांवरून ठरविलें आहे. व त्याचप्रमाणें दंडी सातव्या शतकांत झाला असें ठरविलें आहे. या मानानें भवभूति या दोघांच्या नंतर आठव्या शतकांत झाला असें ह्मणण्याला हरकत नाहीं. भुताखेतांच्या विषयींचें सविस्तर वर्णन या अंकांतल्या प्रमाणें इतरत्र क्वचितच आढळतें. या संबंधानेंही या अंकाला एक तऱ्हेनें बरेंच महत्त्व देतां येईल.]

---

## अंक सहावा.

मागील अंकांत सांगितल्याप्रमाणें, माधव व अघोरघंट लढत लढत गेले. माधवानें मालतीला तिच्या आप्तजनांच्या स्वाधीन केलें व अघोरघंटाशीं युद्ध करून त्याला ठार मारिलें. कपालकुंडलेनें अघोरघंटाचें साहाय्य करण्याच्या हेतूनें माधवाला प्रहार केला, पण ती स्त्री समजून माधवानें तिची उपेक्षा केली. अमात्याची मंडळी मालतीला घेऊन निघून गेली, व माधवही आपल्या बिऱ्हाडीं गेला. या एवढ्या महत्त्वाच्या कामगिरीबद्दल माधवाचें अमात्यानें किंवा राजानें अभिनंदन केल्याचें दिसत नाहीं. कदाचित् माधवानें तिचें रक्षण केलें ही गोष्ट बुद्धया दुसऱ्यांपासून लपवून ठेवण्याकरितां कवीनें असें केलें असेल. अघोरघंट मारला गेला व मालती हातची गेली याबद्दल अर्थातच कपालकुंडलेला फारच त्वेष आला, व तिनें याबद्दल माधवाचा सूड घेण्याचा निश्चय केला. ती ह्मणाली–' भुजंगाला मारल्याबद्दल सूड उग-

वण्याला त्याची स्त्री भुजंगी दांत ओंठ खाऊन तयार असल्यावर त्या भुजंगशत्रूला शांति किंवा चैन कोठून सांपडणार?—कसा तरी मी माधवाचा खचित सूड घेईन.' ( सापाला डंवचिलें असतां तो दांत धरितो व सवड सांपडेल तेव्हां सूड उगविण्याला टपलेला असतो, अशी त्या वेळींही दृढ समजूत असावी. )

मालती घरीं गेल्यावर लौकरच तिचें नंदनाशीं लग्न व्हावयाचें ठरलें. राजाच्या आज्ञेनें सर्वत्र तयारी चालली होती. 'लग्नाच्या वरातीसंबधानें सर्व राजेलोकांनीं वृद्ध लोकांच्या सांगण्याप्रमाणें चालावें, ब्राह्मण मंडळीनें विवाहकाळाला योग्य अशीं मंगलाष्टकें व मंत्र ह्मणावे, व सर्वांनीं आनंद करावा—' अशी राजानें आज्ञा दिली होती. 'वऱ्हाडी येण्याला अवकाश आहे तोंवर मालतीला विघ्ननिवारणार्थ नगरदेवतेच्या मंदिरांत दर्शनास न्यावें व तिच्या बरोबर नेहमीप्रमाणें अनुयात्रिक जनांनीं जावें,' असें भगवती कामंदकीच्या सांगण्यावरून अमात्याच्या स्त्रियांनीं सांगितलें. त्याप्रमाणें मालतीची जाण्याची तयारी व गर्दी चालली होती. त्या गर्दींत न मिसळतां माधवाचा सूड उगविण्याला टपत बसण्याकरितां कपालकुंडला निघून गेली.

[ माधवानें मालतीला अघोरघंटाच्या हातून सोडविल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं हा लग्नाचा मुहूर्त ठरला होता किंवा काय, तें स्पष्ट कळत नाहीं. तरी कांहीं दिवस गेल्यानंतर हा मुहूर्त धरला असावा असें दिसतें. ऐन लग्नाच्या दिवशीं लग्न लागण्याच्या पूर्वीं वधूला नगरदेवतेच्या दर्शनास पाठविण्याची चाल असावी. ]

या दर्शनाच्या निमित्तानें मालती देवीच्या मंदिरांत गेल्यावर आपला बेत ठरल्याप्रमाणें सिद्धीस न्यावा असें कामंदकीनें ठरविलें होतें. व तो बेत लवंगिका, माधव व मकरंद यांना सांगितला होता. मालती मंदिरांत येण्यापूर्वींच तेथें जाऊन लपून बसण्याबद्दल कामंदकीनें माधव व मकरंद यांस सांगितलें होतें. त्याप्रमाणें ते कलहंसासह तेथें होते, व त्यांनीं मालतीची वरात मोठ्या थाटानें तिकडे येत होती ती पाहून येण्याला कलहंसाला सांगितलें होतें. त्याप्रमाणें पाहून त्यांना सांगण्याकरितां तो गेला. त्या मंदिरांत काय व्हावयाचें होतें तें कलहंसाला माहित होतें असें दिसत नाहीं. माधव व मकरंद त्या देवालयांत होते. तेथें, 'मालतीला प्रथम पाहिल्या दिवसापासून आजवर एकसारख्या वाढत गेलेल्या तिच्याविषयींच्या प्रेमाचा शेवट परिणाम कसा काय होतो पाहावा; भगवतीनें घाट घातल्याप्रमाणेंच सर्व सिद्धीस जातें, किंवा मध्येंच कांहीं विपरीत होतें कोण जाणे—' अशी माधवाला अतिशय काळजी पडली होती. पण, 'भगवती कामंदकीचा घातलेला घाट कधीं फसावयाचा नाहीं' अशी मकरंद त्याची खात्री करीत होता. इतक्यांत कलहंसानें येऊन, 'मालतीची स्वारी घरून निघाली' असें कळविलें. त्यावर माधव ह्मणाला, 'खरेंच का ?' तेव्हां मकरंदानें त्याला ह्मटलें, 'अरे असें काय त्याला विचारतोस नुस्ती? निघाली इतकेंच नव्हे तर ती पहा जवळ देखील आली. तिच्या बरोबरच्या असंख्य वाद्यांच्या गजरानें व गडबडीनें कानटाळ्या देखील बसूं लागल्या. या मंदिराच्या खिडक्यांच्या जाळ्यांतून हा आवाज कितीतरी मोठ्यानें ऐकूं येत आहे! इकडे ये, या खिडकीच्या जाळींतून आपण पाहूं.' लग्नाच्या संबंधानें वाद्यें, ढोल वगैरे वाजत होते त्यांला मंगल—मृदंग असें ह्मटलें आहे. यावरून त्यांना निराळें नांव नव्हतें असें दिसतें.

कलहंसानें स्वारीच्या थाटाचें वर्णन केलें आहे, त्यांत स्वारीबरोबर पांढरीं शुभ्र छत्रें पुष्कळशीं होतीं, पुष्कळशा सुंदर स्त्रिया तांबूल खाल्ल्यामुळें दोन्हीं ओंठ आरक्त झालेल्या व आनंदानें मंगलगीतें ह्मणत स्वारीबरोबर येत होत्या. तसेंच उत्तम शृंगारलेल्या व नानातऱ्हेचे रत्नालंकार घातलेल्या अनेक हत्तिण्यांवर सर्व बायका बसल्या होत्या असें ह्मटलें आहे. [ त्यावेळीं हत्तीवरून वराती व स्वाऱ्या निघत होत्या; व हल्लींप्रमाणेंच हत्ती शृंगारले जात असत, व ढोल मृदंग वगैरे वाद्यें वाजवीत असत. या अंकांतील कलहंसाचीं सर्व भाषणें क्लिष्ट, समस्त, दूरान्वित, व त्याला न शोभणारीं अशीं आहेत. ] कलहंसाचें भाषण ऐकून माधव व मकरंद मंदिराच्या खिडक्यांच्या जाळ्यांतून स्वारीचा थाट पाहूं लागले. त्या स्वारीचें मकरंदानें वर्णन केलें आहे त्यावरून, बरोबर चित्रविचित्र रंगाच्या चीनांशुक—चीनी-रेशमी वस्त्राच्या—पताका होत्या. त्यांच्यावर बरोबरीच्या अलंकारांतील रत्नांवरून परावर्तन झालेले किरण पडल्यामुळें सर्व आकाशभर इंद्रधनुष्यें पडल्यासारखी शोभा आली होती असें ह्मटलें आहे. [ यावरून त्यावेळीं चीन देशांतून चित्रविचित्र वर्णाचीं चमकदार रेशमी वस्त्रें येत असत, असें दिसतें. हल्लीं देखील तशीं वस्त्रें तिकडूनच येतात. ] पुनः कलहंस ह्मणाला—'हें पहा, सोन्याच्या काठ्या हातीं असलेल्या भालदारांनीं पुढें होऊन लोकांना पैस केलें. तेव्हां बरोबरचे लोक कोंडाळें धरून दूर उभे राहिले, व लाल शेंदराचे पट्टे सोंडेवर व गंडस्थळावर ओढलेली व रत्नालंकारानीं शोभिवंत दिसणारी ही मोठी थोरली मालतीच्या स्वारीची हत्तीण व तिच्यावर असलेली मालती बहुतेक मंदिराजवळ येत आहे. मालती अगदीं म्लान व पांडुरमुख झालेली व प्रतिपदेच्या चंद्रकलेप्रमाणें क्षीण पण शोभिवंत दिसते आहे.'

त्यावर मकरंद ह्मणाला. 'मित्रा माधवा, पहा! मालतीनें सर्वांगावर विवाहसंबंधी वस्त्रालंकार धारण केले आहेत, पण तिचें मुख व सर्व अवयव कसे निस्तेज दिसताहेत. एखादी वेल आंतून सुकत चाललेली असून तिच्यावर फुलांचा शेवटचा बहार आलेला असावा तशी इची अवस्था दिसते. या अलंकारादिकांमुळें ती रम्य तर दिसते, पण तिच्या अंतःकरणाचा संताप करणारा मनोगत मदनदाहही व्यक्त होत आहे—अरे वाः हत्तीण खालीं बसविली देखील!'

इतक्यांत माधव आनंदानें ह्मणाला, 'अरे पहा—पहा—मालती खालीं उतरून कामंदकी व लवंगिका यांच्यासहित या इकडे मंदिरांतच येत आहे.' तोंच त्या तीघीही मंदिरांत आल्या. येतां येतां कामंदकी स्वतःशीं ह्मणाली, 'एकंदरींत हा जो मी आपल्या प्रिय मित्राच्या मुलांच्या लग्नाचा घाट घातला आहे तो विधात्याच्या कृपेनें सफल व कुशलपरिणामी होवो, व यांत कोणच्याही प्रकारची अडचण न येवो ह्मणजे झालें. देवांनीं माझें एवढें मागणें ऐकलें ह्मणजे मी एकदांची कृतार्थ झालें.'

मालतीही आपल्या मनांत या सर्व चाललेल्या प्रकाराबद्दल विचार करीत होती. 'अशा तऱ्हेनें आपल्या मनाविरुद्ध विवाह होण्यापेक्षां मरण आलेलें बरें' असें तिला वाटत होतें. व, 'आतां यांतून सुटण्याकरितां मरण येण्याला काय उपाय करावा? अभागी लोकांना मरण येणें आवडत असतें, परंतु त्यांच्या दुर्दैवामुळें

तें देखील त्यांना प्राप्त होत नाहीं; तेव्हां करावें तरी काय?'– असें ती ह्मणत होती.

लवंगिकेला पुढें काय काय प्रकार व्हावयाचा होता हें माहित होतें. मालतीच्या मनाची स्थिति व तिची ती चर्या पाहून तिलाही कसें-चसें वाटलें व या सर्व फसवाफसवीच्या प्रकारामुळें मालतीला बिचारीला मात्र फारच क्लेश होताहेत, असें ती ह्मणाली.

त्या तिघी आंत आल्या तोंच अमात्याकडून मालतीला घालण्याकरितां दागिने व वस्त्रें एका पेटाऱ्यांत घालून एक सेवक कामंदकीकडे घेऊन आला व ह्मणाला, 'भगवति! हे राजाकडून आलेले वस्त्रालंकार आहेत, ते देवतेच्या समक्ष मालतीच्या अंगावर घालावे, अशी अमात्याची आपल्यास विनंती आहे.' यावरून अमात्यही या कपटाच्या बेतांत सामिल होता असें दिसतें.

त्याला कामंदकी ह्मणाली, 'अमात्यांनीं सांगितलें तें फार योग्य आहे. हें देवालय मांगलिकस्थान, इथें असें केलेंच पाहिजे. काय काय अलंकार वस्त्रें आहेत दाखीव पाहूं.' [ देवतायतनाविषयीं कामंदकीनें चांगलीच आदरबुद्धि दाखविली आहे ह्मणावयाचें ! ]

त्यावर त्या सेवकानें, 'ही पांढऱ्या वस्त्राची चोळी–हें तांबडें उत्तरीयवस्त्र–ओढणी–हे सर्व अंगावर घालण्याचे दागिने–हें उटणीकरितां चंदन–या माळा–' असें ह्मणून आणलेले सर्व जिन्नस तिला दाखविले. [ अद्यापि देखील रांगड्या लोकांमध्यें वधूला असेच वस्त्रालंकार नेण्याची चाल आहे. ] ते सर्व पहात असतांना कामंदकीला कौतुक वाटलें, व 'हे सर्व वस्त्रालंकार मकरंदाला फारच चांगले शोभतील–व हे घालून नंदनाच्या घरीं तो जाईल व मदयंतिकेची व त्याची गांठ पडेल तेव्हां तिला मोठीच गंमत वाटेल–' असें ती आपल्याशीं ह्मणाली. नंतर ते सर्व वस्त्रालंकार ठेवून घेऊन तिनें त्या सेवकाला 'बरें ठीक आहे, असें अमात्याला जाऊन सांग' असें ह्मणून निरोप दिला; व लवंगिकेला ह्मटलें, 'तूं गर्भगृहांत मालतीला घेऊन जा व तेथें तिला वस्त्रालंकार घाल.' 'तोंवर आपण काय करितां,' असें तिनें विचारल्यावरून, 'मी या अलंकारांतील रत्नांची शास्त्ररीत्या बरीवाईट परिक्षा करितें' असें तिनें उत्तर दिलें. नंतर मालती व लवंगिका गर्भगृहांत गेल्या. तेव्हां माधव व मकरंद आंतील खांबाच्या आड उभे राहून पुढील प्रकार पाहूं लागले. कलहंसही तेथें होता.

आंत गेल्यावर, 'आतां आपल्याबरोबर फक्त लवंगिका मात्र राहिली आँ?' असें मालतीला वाटलें. अर्थात् आंत कांहीं गडबड झाली तर ही एकटीच आहे असें–किंवा आतां आपलें सर्व हितगुज सांगण्याला चांगली सवड आहे असें–तिला वाटलें. आंत गेल्यावर लवंगिकेनें तिला ह्मटलें, 'मालती, हें चंदन व हे पुष्पांचे हार–' हें ऐकतांच मालती कंटाळ्यानें व त्रासानें ह्मणाली, 'होय, मग काय ह्मणतेस?' त्यावर लवंगिका ह्मणाली, 'काय ह्मणजे, अग आज लग्नाचा मंगल महोत्सवाचा दिवस; हे घेऊन देवतांची पूजा कर.' त्यावर मालतीनें मोठ्या कष्टानें व दीनपणानें ह्मटलें, 'लवंगिके, या दुर्दैवामुळें प्राप्त झालेल्या दारुण व मरणप्राय प्रसंगामुळें माझें मन कसें पोळून गेलें आहे. तशांत मज हतभागिणीला तूं पुनः हीं मर्मच्छेदी भाषणें बोलून छळावेंस ना?' यावर लवंगिकेनें तिला ह्मटलें, 'अग, पण मग तुझ्या मनांत काय बोलावयाचें आहे? तुझें ह्मणणें तरी

काय ? ' मालतीनें उत्तर दिलें, ' ह्मणणें काय ? आपल्या मनोरथानुरूप फलप्राप्ती होण्याची अगदीं निराशा झालेलें मनुष्य जें बोलणार तेंच—' हे शब्द तिनें अगदीं निराशेनें व दीनपणानें उच्चारिले होते. ते ऐकून मकरंद माधवाला ह्मणाला, ' मित्रा ऐकलेंस ? ' त्याला माधवानें उत्तर दिलें, ' होय पण त्यापासून माझ्या अंतःकरणाला फारच असमाधान वाटतें. ' नंतर मालती लवंगिकेला गंहिवरून मिठी मारून ह्मणाली, ' गडे लवंगिके, तूं खरोखर माझ्या बहिणीसारखी. ही मी तुझी बहीण या वेळीं अगदीं अनाथ व मरणाच्या दाराशीं टेपलेली आहें. माझ्या जन्मापासून आजपर्यंत तूं मजवर सारखे उपकार केले आहेस. त्यामुळें माझा तुजवर प्राणापलीकडे विश्वास आहे. तो मनांत आणून मी तुला कडकडून भेटून मागणें मागतें. त्याला मान देणें असेल तर, कृपा करून मला हृदयांत ठेवून, त्या सर्व सौभाग्यश्रीच्या मंगलभूत माधवरूपी मूर्तीच्या मुखकमलाचें पोट भरून दर्शन घे. ' असें सांगतांना तिला रडूं आवरेनासें झालें. हा सर्व प्रकार पाहून माधवाला अत्यंत आनंद झाला व तो ह्मणाला, मित्रा मकरंदा, हीं मालतीचीं भाषणें माझ्या [illegible]चप्राणरूपी म्लान झालेल्या कुसुमांना विकरणारी जीवनवृष्टिच होत. तीं सर्व [illegible]ना मोहून टाकणारीं, व हृदयाला आनंद एकच रसायन, अशीं आहेत. खरोखर [illegible]च भाग्यवान कीं माझ्या कानीं हीं वच[illegible]डलीं.'

[illegible]क उत्तररामचरितांत तिसऱ्या [illegible] आहे. तेथें निराळ्या संबंधामुळें त्यांत कांहींसा फरक केलेला आहे. रसायन हा शब्द—हल्लींच्या मात्रा रसायन शब्दाच्या अर्थानें उपयोगांत आणिला आहे त्या संबंधानें हा श्लोक लक्षांत ठेवण्यासारखा आहे. भवभूतीच्या काळापूर्वींच रसविद्या, रसक्रिया, रसायनक्रिया व तिचा हल्लींप्रमाणेंच उपयोग या देशांत जारीनें होता असें सिद्ध होतें. यावरून वागभट्टकृत अष्टांगसंग्रह या ग्रंथाचाही कालनिर्णय होण्याला चांगलें साधन आहे. डा० गर्देकृत सदर ग्रंथाच्या भाषांतराची प्रस्तावना, व तिच्यावरील का० बा० लेले कृत टीका, यांच्यांत याविषयीं बराच उहापोह केलेला आहे. ]

पुनः रडें आवरून मालती ह्मणाली, ' लवंगिके, हें पहा, मी राहिलें नाहीं असें ऐकल्यावर, त्या शरीररत्नाला भलतेंसलतें कांहीं होणार नाहीं, व मी परलोकीं गेलें ह्मणून ते केवळ माझीच आठवण करीत राहून कसें तरी आयुष्य कंठित राहण्याचें न करतील, अशाविषयीं तूं कृपा करून स्वतः जप. एवढें केलेंस ह्मणजे ही तुझी प्रियसखी कृतार्थ होईल. '

हें ऐकून मकरंदाला देखील फारच चमत्कारिक वाटलें, व—' आतां मात्र करूणरसाची हद्द झाली ' असें तो ह्मणाला. त्यावर माधव ह्मणाला, ' ही हरिणाक्षी या वेळीं केवळ निराश व भयभीत झालेली आहे. हे तिचे अत्यंत करूण पण मनोहर व प्रेमळ आणि मोह उत्पन्न करणारे शोकाचे शब्द ऐकून एकदम माझ्या मनाला चिंता, विषाद, दुःख व आनंदमहोत्सव यांचा पूर आला आहे. '

मालतीचें हें सर्व बोलणें ऐकून लवंगिका तिला ह्मणाली.—' अगे मालती, हें काय भलतेंच बडबडतेस ? इडापिडा टळो. ! मी नाहीं बाई यापुढें असलें कांहीं ऐकायाची. ' त्यावर मालती तिला ह्मणाली, ' लवंगिके, तुह्माला या मालतीचा जीव प्यारा आहे, पण ही मालती

॥ श्रीः ॥

# विविधज्ञानविस्तार.


A MONTHLY MAGAZINE

OF

MARATHI LITERATURE

FOR

Ladies and Gentlemen.

कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरितां.

पुस्तक ३०. जुलै १८९९. अंक ७.


विषय. अनुक्रमणिका. पृष्ठ.




मुंबईत

गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत छापिलें.

वर्षाची वर्गणी रुपये ३; टपालखर्च आणे ६.

## कृतज्ञतेचा मासला.

विविधज्ञान जनीं जें विस्तारे काय ती अहा गोडी !
जोडी दुजी न ज्याला, स्तुति करितां फार ती गमे थोडी. १
सद्वाक्य एक त्याचें लेखाया पाहिजे किती ज्ञान;
प्रतिविषयांत विशारद निजतेजें पावलें गुरुस्थान. २

'केरळकोकिल.'

रा० कृष्णाजी नारायण आठले यांणीं थोड्या वर्षांमागें शेक्सपियर कवीच्या Midsummer Night's Dream या नाटकाच्या आधारें "मधुयामिनी स्वप्न" या नांवाचें एक नाटक रचून प्रसिद्ध केलें. त्याच्या प्रस्तावनेंत विविधज्ञानविस्तारासंबंधानें पुढील उल्लेख आढळतो.

" यासंबंधानें विविधज्ञानविस्ताराचे मुख्य एडिटर यांसही चार शब्दांची विनंती करावयाची " आहे. ती येथेंच करण्याविषयीं मी त्यांची परवानगी घेतों. महाराज, महाराष्ट्र भाषेंत जीं जीं " ह्मणून पुस्तकें आहेत, त्या सर्वांत विविधज्ञानविस्तारावर माझी अत्यंत पूज्य बुद्धि आहे. येवढेंच " नव्हे, पण **माझ्या अंगीं कवित्वस्फूर्ति किंवा लेखनस्फूर्ति ह्मणून जी कांहीं यत्किंचित् प्राप्त " झाली आहे ती त्यांचेच कृपेमुळें झाली आहे. ह्मणून मी त्यांस गुरुस्थानीं मानितों.** आणि " खरोखरच त्यांच्या लेखानें मला जितकें शिक्षण प्राप्त झालें व होत आहे, तितकें माझ्या साक्षात् " शिक्षकाकडूनही झालें नाहीं असें मला वाटतें.······ महाराज, आपला व माझा प्रत्यक्ष " जरी परिचय नाहीं, तरी **आपण थोर व वंदनीय पुरुष आहांत.**"

ज्या वर्षीं हा लेख प्रसिद्ध झाला त्या वर्षीं आणि त्यापूर्वीं बरींच वर्षें वि० ज्ञा० विस्ताराच्या 'मुख्य एडिटर' चा अधिकार नुक्तेच परलोकवासी झालेले रा० रा० **हरि महादेव पंडित** यांजकडे होता, आणि श्री० बापूसाहेब कुरुंदवाडकर यांच्या "पंचवटीस्थलनिर्णय" या लेखावर विविधज्ञानविस्तारांत थोड्या दिवसांवर जी टीका आली आहे ती याच 'थोर व वंदनीय' पुरुषाचे हातची आहे, हेंही आतां वर्तमानपत्रांतून आणि मासिकपुस्तकांतून बहुतेकांस माहीत झालें आहे.

वरील अत्यंत स्तुतिपर लेख प्रसिद्ध होऊन बारा वर्षे लोटलीं, परंतु आह्मी आजवर त्याजकडे लक्ष दिलें नाहीं. याचें कारण, आह्मी त्यावेळीं या लेखास विशेष महत्व दिलें नाहीं—आणि आतांही देतों असें नाहीं. परंतु कोणी मनुष्य विकारवश होऊन, सभ्यतेस झुगारून देऊन, जर अद्वातद्वा बहकूं लागला तर केव्हां केव्हां त्यास त्याच्या पूर्व वर्तनाचें स्मरण देणें जरूर पडतें. वरील लेख लिहिणारे आठले हेच जर 'केरळकोकिळ' नांवाच्या छोटेखानी मासिकपुस्तकाचे संपादक असतील तर त्या पुस्तकांत नुक्ताच जो वरील 'थोर व वंदनीय' अशा 'गुरुस्थानीं' मानिलेल्या पंडितांबद्दल अत्यंत खोटसाळ, निंदाप्रचुर असा एक ग्राम्य लेख आला आहे तो त्यांच्या कृतज्ञतेस शोभण्यासारखा आहे असें ह्मणण्याचें धाडस कोणीही शुद्धीवर असलेला मनुष्य करणार नाहीं. कै० पंडितांनीं पंचवटीसंबंधानें प्रतिपक्ष जो केला तो आपले विद्वान् मित्र श्री० बापूसाहेब कुरुंदवाडकर यांच्याशीं केला; कोकिळकारांबरोबर केला नाहीं. आणि तोही त्यांच्या निमंत्रणावरून. विद्वान् विद्वानांशींच वाद करतात. असें असतां धनिकापुढें लाङ्गूलचालनाचा प्रकार करून, आपण होऊनच गुरुस्थानीं मानलेल्या थोर व वदंनीय पुरुषाची निंदा करण्यास प्रवृत्त व्हावें हें काम क्षुद्र बुद्धीच्या मनुष्याशिवाय दुसऱ्या कोणाकडूनही होणें नाहीं. कोकिळमधील लेखांत जीं खोटसाळ

श्री.

# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ३०. अंक ७.

## विजयनगरचें प्राचीन हिंदु साम्राज्य.

विजयनगर ऊर्फ हंपी हें जुनाट इतिहासप्रसिद्ध शहर मद्रास इलाख्यांत बल्लारी जिल्ह्यांत तुंगभद्रेच्या कांठीं आहे. गदगपासून बल्लारी-गुंटकल जंक्शन ह्मणून जो सदर्न मराठा रेल्वेचा एक फांटा आहे त्यावरील ह्यास्पेट स्टेशन हें ह्या प्राचीन शहराकडे जाण्यास फार सोयीचें आहे. येथून विजयनगर अवघें ७ मैल आहे. विजयनगरास विद्यानगर असें जुनें नांव असून त्याच्या नजीकच, तुंगभद्रेच्या पैलतीरीं, अनागोंदी नामक एक लहान गांव आहे. त्याचा समावेश पूर्वी ह्याच नगरांत करीत असत, एवढेंच नव्हे, तर तेथील विद्यमान राजास विजयनगरचा राजवंश असें अद्यापि मानितात. ह्या नगराच्या दक्षिणेस उंच उंच अभेद्य पर्वतावलि असून ती विजयनगरच्या राज्यसत्तेचें परशत्रूंच्या हल्ल्यापासून उत्तम प्रकारें संरक्षण करीत असे. एकीकडे तुंगभद्रेचा अर्धवर्तुलाकार सरित्प्रवाह परचक्रास अलंघनीय असल्यामुळें तो त्या नगराचा नैसर्गिक संरक्षक होऊन राहिला होता. हे पर्वत व हा सलिलप्रवाह पौराणिक कालापासून प्रसिद्ध आहेत. वाल्मीकि रामायणांतील अरण्यकांडामध्यें ऋष्यमूक पर्वत व पंपासरोवर ह्मणून ज्या स्थानांचा नामनिर्देश केला आहे तींच हीं होत. विजयनगर येथील सरित्प्रवाहास अद्यापि "पंपासरोवर" असें नांव चालत आहे व तुंगभद्रेसही "पंपानदी" असें ह्मणतात. तेव्हां रामायणांत वर्णिलेलीं प्रसिद्ध स्थलें तीं हींच होत असें मॉनिअर उइल्यम्स्, ग्यारट् व रीव्हज ह्या पाश्चात्य पंडितांनीं ठरविलें आहे. 'पंपा' ह्या शब्दावरून अर्वाचीन 'हंपी' हा शब्द झाला असावा असें मानण्यास हरकत नाहीं. प्राचीन शिलाले[illegible] संशोधनपटु 'इन्डियन् अन्टिक्केरी' चे [illegible]दक मि. फ्लीट ह्यांचें असें मत आहे कीं [illegible]नडी भाषेंमध्यें 'प' ह्या अक्षराबद्दल [illegible] आदेश करितात, त्या अर्थीं "पंपा" [illegible] "हंपा" व त्यावरून 'हंपी' असें रूप[illegible] असावें. ह्याबद्दल इतर ग्रंथकारांचेही [illegible] अभिप्राय आहेत. विजयनगराच्या [illegible] सीतासरोवर, चक्रतीर्थ, अंजनोपर्वत, मात[illegible] बलिदहनस्थल, माल्यवंत पर्वत वगैरे जीं स्थानें प्रसिद्ध आहेत त्यांवरून पौराणिक कथेशीं त्यांचा पुष्कळ संबंध जुळतो. अयोध्याधीश श्रीरामचंद्र हे रावणानें सीता हरण करून नेल्यानंतर तिच्या शोधाकरितां ह्या स्थलीं आले होते,

व लक्ष्मणासहवर्तमान पंपा सरोवराच्या तीरीं राहिले होते. त्या वेळीं हा प्रांत वालीच्या ताब्यामध्यें होता. वाली महाप्रबल झाला असून त्यानें सुग्रीवास राज्यच्युत करून हांकून लाविलें होतें. तेव्हां तो मातंगऋषीजवळ मातंग पर्वताच्या गुहेमध्यें आश्रयास जाऊन राहिला होता. श्रीरामचंद्र आल्याची वार्ता कळतांच त्यानें त्यांची भेट घेऊन, मला राज्यारूढ करा, ह्मणजे मी सीताशुध्यर्थ साह्य करीन असें त्यांस कळविलें. त्यावरून श्रीरामचंद्रांनीं वालीचा वध करून सुग्रीवास गादीवर बसविलें. जेथें वालीचा वध केला त्या स्थलास अद्यापि 'वालीदहनस्थलम्' असें नांव आहे. नंतर रामचंद्रांनीं माल्यवंत पर्वतावर कांहीं दिवस वास केला. तेथें हनुमान् येऊन त्यांस भेटला व त्यानें सीतेची वार्ता कळविली. तेव्हां रामचंद्रांनीं सुग्रीव व हनुमान् ह्या उभयतांसह लंकेवर स्वारी केली. ह्या पौराणिक कथेंतील सर्व स्थलें अद्यापि येथें आहेत; व भाविक लोक परमपूज्य भावानें त्यांचें दर्शन घेऊन स्वतःस पूनित मानितात. पंपासरोवरासंबंधानें रामायणामध्यें राम आणि मत्स्य ह्यांचा जो मौजेचा संवाद वर्णिला आहे त्याचा अनुभव अद्यापि येथें येतो. राम व लक्ष्मण सीतेचा शोध करीत करीत जेव्हां पंपासरोवरीं आले तेव्हां तेथील अपूर्व शोभा पाहून राम लक्ष्मणास ह्मणतात :—

पश्य लक्ष्मण पंपायां बकः परमधार्मिकः ।
शनैर्मुञ्चति पादाग्रं प्राणिनां वधशंकया ॥

"हे लक्ष्मणा! पहा या पंपासरोवरांतील बगळेही केवढे धार्मिक आहेत ते! तो बगळा पहा पायाखालीं एखादा जीवजंतु चिरडेल या शंकेनें कसा हळू हळू पाय टाकतो आहे तें!" हें रामाचें भाषण ऐकून एक मत्स्य रामास ह्मणतो:—

सहवासी विजानाति सहवासिविचेष्टितम् ।
बकं किं वर्ण्यसे राम येनाहं निष्कुलीकृतः ॥

"हे रामा, कोणाची वागणूक कशी आहे हें त्याच्या शेजाऱ्यास विचारावें. त्यांनाच ती माहीत. अरे, तूं ह्या बगळ्यास मोठा धार्मिक व हिंसाभीरु ह्मणून मानितोस, पण ह्यानें माझ्या सर्व कुळाचा नाश करून केवळ मला एकट्यालाच फक्त जिवंत ठेविलें आहे!"

ह्या सुरस पद्यांमध्यें काव्यप्रसिद्ध रमणीय पंपासरोवराचें वर्णन थोडक्यांत कसें व्यक्त केलें आहे हें रसिकांच्या लक्षांत तेव्हांच येईल. हे "नासाग्रे क्षणमेकपाददमन" करणारे बाह्यधवल तापसी अद्यापि पंपासरोवराच्या तीरप्रांतीं पुष्कळ असून, ते प्रेक्षकजनांस एक आनंदकारक दृग्विषयच होऊन राहिले आहेत! अस्तु.

वरील माहिती पौराणिक कालांतील झाली. आतां अर्वाचीन इतिहासाकडे वळणें अवश्य आहे. राजकीयदृष्ट्या विजयनगरचा इतिहास अत्यंत महत्त्वाचा असून, हिंदुस्थानांतील वैभव, विद्या व कलाकौशल्य ह्यांच्या उत्कर्षाचा तो एक अद्वितीय आदर्शच होय असें ह्मणण्यास हरकत नाहीं. हिंदूंच्या साम्राज्य सत्तेचा अभ्युदय, हिंदुधर्माचें सोज्वळ स्वरूप, त्यांच्या विद्वत्तेचा उज्वल प्रकाश, त्यांच्या अपार बुद्धिमत्तेचें अलौकिक तेज, त्यांच्या कलाकौशल्याची लोकोत्तर सुधारणा, त्यांच्या वाणिज्याचा खरा उत्कर्ष, त्यांच्या संपत्तीचा अगणित संचय-इत्यादिकांची जर कोणास माहिती पाहिजे असेल तर ती विजयनगरच्या इतिहासांत जितकी मिळेल तितकी इतरत्र क्वचित् सांपडेल. अर्थात् प्रत्येक जिज्ञासु वाचकास ह्या एके काळीं वैभवाच्या शिखरास पोहोंचलेल्या विजयनगरच्या साम्राज्या-

च्या इतिहास समजण्याची उत्कट इच्छा झाल्यावांचून राहत नाहीं. शिवाय त्या इतिहासाचें अल्पसें तरी ज्ञान झाल्यावांचून, विजयनगरच्या सांप्रतच्या भव्य व विशाल, परंतु दुःखसंवेदक व उद्वेगकर, अशा जीर्णस्थलांचें अवलोकन हें कालाच्या कुटिल गतीचें चित्र मानवी हृदयावर प्रतिबिंबित करण्यास व उदात्त विचार उद्भूत करण्यास विशेष कारण होणार नाहीं.

विजयनगरासारख्या बलाढ्य राष्ट्राचा साधार व विश्वसनीय इतिहास उपलब्ध असावा असें कोणासही वाटणें साहजीक आहे. परंतु तें खरें नाहीं असें मोठ्या दुःखानें ह्मणावें लागतें. तेलगू व संस्कृत भाषेमध्यें विजयनगरच्या कित्येक राजांचे गुणवर्णनपर व स्तुतिपर ग्रंथ आहेत. परंतु, ते काव्यात्मक असल्यामुळें विशेष अलंकारिक आहेत. त्यांमध्यें कवींची रसनानटी कल्पनामय रंगभूमीवर स्वैर नृत्य करीत आहे, त्यामुळें इतिहासदृष्ट्या त्यांचें महत्त्व कमी आहे. तेलगू व संस्कृत ग्रंथांखेरीज पुष्कळ मुसलमान ग्रंथकारांचे ग्रंथ आहेत. परंतु, त्यांमध्यें फेरिस्ता ह्याच्या इतिहासावांचून निःपक्षपातदृष्टीनें लिहिलेला एकही ग्रंथ नाहीं. ह्या प्राचीन राज्याच्या इतिहासाची अशी शोचनीय स्थिति आहे तरी प्राचीन शिलालेख, ताम्रपट यांवरून प्राक्कालीन इतिहाससंशोधक पाश्चात्य विद्वानांनीं त्याची पुष्कळ माहिती मिळविली आहे. डा० बर्नेल व सुवेल ह्यांनीं ह्या कामीं फार परिश्रम केले आहेत. त्याचप्रमाणें ह्मैसूर प्रांतामध्यें मि. रायस नामक एका युरोपियन विद्वानानें ४२९ शिलालेख जमविले असून त्यानें विजयनगरच्या राजांची पुष्कळ माहिती उपलब्ध करण्याचा यत्न चालविला आहे. अर्थात् हे शिलालेख विजयनगराच्या इतिहासाची ओळख करून देण्यास पुष्कळ साहाय्यभूत आहेत ह्यांत शंका नाहीं. ह्या शिलालेखांप्रमाणेंच विदेशीय प्रवाशांनीं लिहिलेलीं हिंदुस्थानांतील प्रवासवर्णनें विजयनगरच्या इतिहासाची पुष्कळ ओळख करून देतात. ह्या सर्वांच्या आधारानें विजयनगरच्या साम्राज्याची संस्थापना, अभ्युदय आणि विलय इतक्यांचें चांगलें स्वरूप लक्षांत येतें. तें संक्षेपें करून येथें सादर करितों.

विजयनगरच्या राज्यसंस्थापनेचा काल इ. स. १३३६ हा मानिला जातो. तेराव्या शतकाच्या अखेरीस दक्षिणेमध्यें देवगिरी, वारांगळ इत्यादि हिंदु राज्यें स्वातंत्र्याचा व वैभवाचा उपभोग घेत असतां, कालचक्राच्या विचित्र गतीनें त्यांस ऱ्हासकाल प्राप्त झाला, आणि उत्तरेकडून मुसलमानांच्या स्वाऱ्या दक्षिणेंमध्यें होऊं लागल्या. त्यावेळीं अनेक प्रतिकूल कारणें उत्पन्न होऊन हिंदुराज्यांची संघशक्ति नाहींशी झाली व तीं राज्यें मुसलमानसत्तेच्या स्वाधीन झालीं. १३१८ सालीं देवगिरीचें स्वातंत्र्य नष्ट झालें, व यादवकुलाधिपति राजा रामचंद्रदेव हा धारातीर्थीं पतन पावला. ह्या दोन प्रमुख राज्यांची अशी वाताहत झाल्यामुळें द्वारसमुद्र, चोलमंडल, मधुरा वगैरे ठिकाणच्या इतर हिंदु राजांना अविंधसत्तेस हार जाणें भाग पडलें, आणि हिंदु धर्माचा उच्छेद होण्याचा समय प्राप्त झाला. त्या वेळीं सर्व लोकसमूहामध्यें पुन्हा जागृति उपन्न होऊन स्वराज्यसंस्थापनेचा प्रयत्न झाला. त्याचेंच फळ विजयनगरच्या हिंदु साम्राज्याची स्थापना हें होय.

महाराष्ट्रांमध्यें ज्याप्रमाणें शिवाजी उत्पन्न झाला त्याप्रमाणें दक्षिण हिंदुस्थानामध्यें

**हक्कराय ऊर्फ हरिहर** उत्पन्न झाला. तो ह्या राज्याचा मूळ संस्थापक होय. हक्कराय हा वारांगळच्या नामशेष झालेल्या राजघराण्यांतील कोणी पुरुष असावा किंवा म्हैसूरच्या होयसाल राजांच्या सरदारांचा वशंज असावा. त्याबद्दल खात्रीलायक माहिती मिळत नाहीं. ह्या राजास साह्य करण्यास त्याचा **बुक्क** अथवा बुक्कराय नामक भाऊ फार उपयोगी पडला असें दिसतें. तथापि सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, शिवाजीस ज्याप्रमाणें रामदास स्वामींनीं महाराष्ट्र राज्यसंस्थापनेचे कामीं अतिशय साह्य केलें, त्याप्रमाणेंच प्रख्यात विद्यारण्य स्वामींनीं ह्यास विजयनगरचें राज्य स्थापण्याच्या कामीं साह्य केलें. किंबहुना स्वामींनीं हिंदुधर्मसंरक्षणार्थ हें राज्य स्थापन केलें असें ह्मटलें तरी चालेल.

विद्यारण्य स्वामी ह्यांचें मूळचें नांव **माधव** असें होतें. ह्यांस सायनमाधव असेंही नांव दिलेलें आढळतें. हे पंपाक्षेत्रांत जन्मले असून आपल्या वयाच्या ४० व्या वर्षापर्यंत गृहस्थाश्रमी होते. त्यांची स्थिति अत्यंत दारिद्र्यमय असल्यामुळें निर्वाहाकरितां ते भिक्षा मागत असत. एकदां ते विरूपाक्षेश्वर देवाच्या दर्शनास गेले असतां तेथें कोणी सिद्ध पुरुषानें त्यांस एक स्तोत्र दिलें, व त्याचा पाठ करण्यास सांगून आशीर्वाद दिला कीं, याच्या प्रभावानें तुला द्रव्य प्राप्त होईल. नंतर त्यांनीं त्या स्तोत्राचा पाठ केला व गायत्रीपुरश्चरणही केलें. परंतु द्रव्य ह्मणून मिळेना. शेवटीं त्यांनीं त्रासून चतुर्थाश्रम घेतला व पुढें तपश्चर्या सुरू केली. तेव्हां प्रत्यक्ष देवता प्रसन्न होऊन तिनें त्यांस विद्यापारंगत होशील असा आशीर्वाद देऊन "विद्यारण्य" हें नांव दिलें. आणि तुझ्या हातून साडेतीन घटका सुवर्णाची पर्जन्यवृष्टि होईल असा वर दिला. त्यानंतर स्वामींनीं सुवर्णाची वृष्टि केली व सर्व लोक सुखी करून "विद्यानगर" वसविलें, अशी दंतकथा आहे. मि. ग्रिबल नामक इतिहासकारानें याबद्दल जी हकीकत दिली आहे ती येणेंप्रमाणें:—

"विजयनगरच्या राज्याची संस्थापना इ० स० १३३६ सालीं सुरू झाली व ती इ० स० १३४३ मध्यें पूर्ण झाली, असें स्थूलमानानें मानिलें जातें. ह्मणजे गुलबर्ग्याच्या राज्यापूर्वीं (इ० स० १३४८) थोडीं वर्षेंच हें राज्य संस्थापित झालें असें ह्मटलें तरी चालेल. ह्या नवीन हिंदुराज्याचा अभ्युदय **सायण** नामधारी सुप्रसिद्ध वेदभाष्यकार विद्यारण्य स्वामी ह्यांच्या साह्यानें विशेष लवकर झाला ह्यांत शंका नाहीं.......अशी दंतकथा सांगतात कीं, वारांगळच्या राज्याचा नाश झाल्यानंतर बुक्क व हक्क हे दोन भाऊ ह्या स्वामींकडे गेले व त्यांनीं त्यांजकडे साह्य मागितलें. स्वामींनीं त्यावेळचा आणीबाणीचा प्रसंग तेव्हांच ध्यानांत आणिला; आणि देवगिरी व वारांगळ हीं दोन हिंदुराज्यें नष्ट झाल्यामुळें दक्षिणहिंदुस्थानामध्यें मुसलमानांस अनेक स्वाऱ्या करण्यास फावलें होतें, ह्मणून त्यांच्या प्रतिकारार्थ कांहींतरी चांगलें साधन करून ठेवणें अवश्य आहे असें जाणून त्यांनीं त्यास मदत करण्याचें कबूल केलें. असें सांगतात कीं, स्वामींस एका देवतेचा दृष्टांत होऊन तिनें त्यांना द्रव्याचा गुप्त ठेवा दाखविला. स्वामींनीं तें द्रव्य ह्या बंधूंच्या उपयोगीं पडेल असें समजून त्यांना दिलें. ह्या द्रव्याच्या साह्यानें त्यांनीं राज्यस्थापना करून एक नवीन नगर बांधलें, व त्यास स्वामींच्या सन्मानार्थ "विद्यानगर" असें नांव दिलें."

1 Gribble's History of the Deccan.

ह्या हकीकतीवरून असें दिसून येतें कीं, स्वामींनीं सुवर्णाची वृष्टि न करितां सुवर्णाची भूमिगत ठेव दिली ! तथापि दोहींचें तात्पर्य एकच आहे. विद्यारण्य स्वामींनीं विजयनगरच्या राज्य संस्थापनेस उत्तम प्रकारचें साह्य केलें ह्यांत कांहीं शंका नाहीं. शिवाजीची रामदासावर ज्याप्रमाणें भक्ति जडली होती त्याप्रमाणें बुक्करायाची ह्या स्वामीवरही जडली होती. शिवाजीनें स्वतःस राज्याभिषेक केला त्यावेळीं रामदास स्वामींस प्रथम राज्याभिषेक करण्याचा विचार केला होता ह्मणून आख्यायिका आहे. त्याचप्रमाणें बुक्करायानें विद्यारण्य स्वामींसही राज्याभिषेक करून त्यांस "कर्नाटक–सिंहासन–स्थापनाचार्य" असें नांव दिलेलें एका जुन्या बखरींत लिहिलें आहे. ह्यावरून ह्या स्वामींची योग्यता व कर्तृत्वशक्ति व्यक्त होते. हे स्वामी सर्व विषयांमध्यें किती पारंगत होते हें त्यांच्या अनेक ग्रंथांवरून व्यक्त होत आहे. त्यांनीं वैद्यशास्त्रावर माधवनिदान; धर्मशास्त्रावर कालमाधव, ब्रह्मगीता, शतप्रश्नकल्पलतिका; व्याकरणविषयावर, माधववृत्ति; जैमिनी सूत्रावर न्यायमाला; पाराशर सूत्रावर पाराशर माधवीय; वेदांत प्रकरणावर पंचदशी–वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. ह्यांशिवाय वेदभाष्य व सर्वदर्शनसंग्रह प्रसिद्धच आहेत. यांपैकीं पाराशर माधवीय ग्रंथांत त्यांनीं आपलें वृत्त येणेंप्रमाणें दिलें आहेः–

> श्रीमती जननी यस्य सुकीर्तेर्मायणः पिता ।
> सायणो लोकनाथश्च मनो बुद्धिः सहोदरः ॥१॥
> यस्य बौधायनं सूत्रं शाखा यस्य च याजुषी ।
> भारद्वाजकुलं यस्य सर्वज्ञः स हि माधवः ॥ २ ॥

अर्थः–ज्याची आई श्रीमती, बाप मायण, भाऊ सायणाचार्य, ज्याची तैत्तिरीय यजुः शाखा व सूत्र बौधायन असून गोत्र भारद्वाज होतें तो हा माधव.

बहुतेक ग्रंथांवर ह्या स्वामींचें नांव माधव असेंच आहे. सर्वदर्शनसंग्रह व वेदभाष्य यांवर यांचें नांव सायणमाधव असें आहे. आणि पंचदशीवर मात्र विद्यारण्य असें नांव आहे. अर्थात् सायणमाधव असें संयुक्त नांव लिहिण्याचें कारण समजत नाहीं. ह्यांचे गुरु श्रीशंकराचार्य होते असें पंचदशीच्या प्रारंभींच्या " नमः श्रीशंकरानंदगुरुपादांबुजन्मने " इत्यादि मंगलस्तवनावरून व्यक्त होतें. बुक्करायाप्रमाणेंच हरिहर रायाचीही यांजवर फार भक्ति होती; व तो सर्व राजकीय कामांत त्यांचीच सल्लामसलत घेत असे. ह्या स्वामींनीं आपल्या ६० व्या वर्षी बहुत तीर्थयात्रा केल्या व शेंकडो पंडितांस वादामध्यें जिंकिलें. हे स्वामी शांकरदर्शन मताचे असून त्यांचा मठ हंपी येथें अद्यापि विद्यमान आहे. हे तेथेंच समाधिस्थ झाले. तेथें त्यांची समाधि व तिच्यावर त्यांची एक मूर्ति विराजित केलेली अद्यापि प्रेक्षकांस अवलोकन करावयास सांपडते. ह्या स्वामींचे अनेक हस्तलिखित ग्रंथ सन १८११ मध्यें कर्नल् म्याकन्झी यांस जमिनींत पुरलेले सांपडले, ते सांप्रत विलायतेंतील ग्रंथसंग्रहालयांत आहेत.

विजयनगरसारख्या प्रचंड साम्राज्याचें संस्थापन करण्याचें श्रेय ज्या सत्पुरुषानें मिळविलें त्याची माहिती प्रत्येक इतिहासजिज्ञासु वाचकास किंचित् विस्तारपूर्वक समजणें इष्ट वाटल्यावरून ती वर सांगितली. आतां खुद्द विजयनगरच्या राजांकडे वळूं. विजयनगरचें राज्य सन १३३६ पासून सन १५६५ पर्यंत सरासरी २२९ वर्षें

१ भारतवर्षीय अर्वाचीन कोश.

टिकलें. तितक्या अवधींत एकंदर तीन घराण्यांतील पुरुषांनीं राज्य केलें. पहिल्या घराण्यामध्यें हरिहरराय, बुक्कराय, दुसरा हरिहर, देवराय, विजय भूपति, दुसरा देवराय आणि विरूपाक्ष इतके राजे झाले. ह्यांच्याकडे इ०स० १३३६ पासून इ०स०१४८७ इतकीं वर्षे राज्य होतें. ह्या राजांनीं साम्राज्यसत्ता स्थापन करून दक्षिणेंत मुसलमानी अमलाचा प्रवेश बिलकुल होऊं दिला नाहीं. पहिला राजा हरिहरराय ह्यानें, सन १३४२ मध्यें वारांगळ येथून मुसलमानलोकांस घालवून देण्याकरितां जें राजमंडळ तयार झालें होतें, त्यास पूर्ण साह्य केलें. ह्यानेंच कानडा प्रांत काबीज केला. आफ्रिकन प्रवासी कोणी Ibn Baluta हा सन १३४२ मध्यें होनावर येथें आला होता. त्यानें होनावरचा मुसलमान सुभेदार विजयनगरचा अंकित होता ह्मणून लिहिलें आहे. दक्षिणकर्नाटकांतील राजे याचे मांडलिक ह्मणवून त्यास करभार देत असत. या राजानें कायदेकानू आणि वसुलाची पद्धति सशास्त्र अमलांत आणिली. याच्यामागून बुक्कराय हा गादीवर बसला. ह्यानें इ०स० १३५८–७४ इतकीं वर्षे राज्य केलें. ह्या राजाचे अनेक शिलालेख सांपडले आहेत. त्यांवरून हा अत्यंत पराक्रमी होता असें दिसून येतें. ह्यानें जैन व वैष्णव ह्यांचा वाद मिटविल्यामुळें तो सर्व प्रजेस अत्यंत प्रिय झाला होता. त्याचा प्रधान ब्राह्मण होता व सेनापति जैन होता. ह्यावरून उभय ज्ञातींमध्यें त्यानें किती ऐक्य केलें होतें हें सहज दिसून येईल. ह्याच्यामागून दुसरा हरिहर गादीवर बसला. तो महाप्रतापी निपजून त्यानें आपल्या गुणांनीं आपणास " वीरप्रताप " असें पद मिळविलें. ह्याच्या कारकीर्दींत विजयनगरची राज्यसत्ता फार प्रबळ झाली. ह्यानें दक्षिण देश पादाक्रांत केला आणि गोव्यांतून मुसलमान लोकांस हांकून लाविलें. ( सन १३८० ). ह्यानेंही आपल्या बापाप्रमाणें धर्माचे बाबतींत फार समता ठेवून शैव, वैष्णव व जैन ह्या सर्वांस प्रेमभावानें वागविलें. विद्यारण्यस्वामींचा धाकटा भाऊ सायणाचार्य ह्मणून जो होता तो याचा दिवाण होता असें ह्मणतात. ह्या राजाच्या मागून सन १४०४ मध्यें दुसरा बुक्कराय ऊर्फ देवराय गादीवर बसला. त्याचा माधव मंत्री ह्मणून प्रधान होता. त्यानें राज्यव्यवस्था इतक्या उत्तम तऱ्हेनें केली कीं, कावेरी नदीचा महाप्रचंड कालवा अद्यापि त्याच्या नांवानें चालत आहे. ह्याच्या कारकीर्दींत कर्नाटक व तेलंगण सर्व पादाक्रांत झालें. ह्याच्यामागून वीरराय हा गादीवर बसला, आणि त्याच्या नंतर देवराय हा अधिपति झाला. देवराय ह्याच्या कारकीर्दींत विजयनगरची फारच भरभराट झाली होती. ह्याच्या कारकीर्दींतले जे शिलालेख उपलब्ध झाले आहेत, त्यांवरून अंग, वंग, कलिंग वगैरे देशांतले राजे ह्याचें दास्य करीत होते असें दिसतें. ह्याच्या पदरीं दहा हजार मुसलमान घोडेस्वार होते. तैमूरलंगाचा मुलगा व समरकंदचा सुलतान शहारुख यानें अबदुल रझाक ह्मणून एक वकील ह्या राजाच्या दरबारीं पाठविला होता. तो मंगलोर येथें इ०स०१४४४ मध्यें आला. तो विजयनगरामध्यें सात महिने होता. त्यानें विजयनगरचें पुढें लिहिल्याप्रमाणें वर्णन केलें आहे:—

" विजयनगर शहर असें आहे कीं या जगतांत त्यासारखें दुसरें शहर नेत्रांस पाहावयास मिळणार नाहीं, किंवा त्याचें वर्णन ऐकावयास सांपडणार नाहीं. त्या शहरास गगनचुंबित भिंतींचे एकापुढें एक असे सात कोट

असून प्रत्येक कोट गृहपंक्तींनीं सुशोभित झालेला आहे. येथील बाजाराची लांबी रुंदी पाहून मनुष्य क्षणैक थक्क होऊन जातो. सुगंधित पुष्पें येथें सदा सर्वकाळ मिळतात, पण त्यांतल्या त्यांत गुलाब तर वर्णनीयच असतात. सराफ लोक पाच, हिरे, माणकें इत्यादि जड जवाहीर विक्रीसाठीं निःशंकपणें उघडें मांडितात. चोरांचें भय त्यांस स्वप्नांत देखील ठाऊक नाहीं. राजवाड्यांतील दरबारांत न्यायाचें काम चालू असतें. येथील राजाचें भांडार भुयारांत ठेविलेलें असून तें भुयार सोन्याच्या रसानें ओतप्रोत भरलेल्या विहिरीप्रमाणें दिसतें. येथील टांकसाळींत खालील नाणीं पाडित असतः–

सोन्याचीं—वराह किंवा पगोडा, परताब आणि फनाम.

चांदीचें–तार.

तांब्याचें–जितल.

या नाण्यांचें कोष्टकः–

तांब्याचे ३ जितल= १ चांदीचा तार.

१ चांदीचा तार= १ सोन्याचा फनाम.

१६ फनाम = १ परताब.

२ परताब = १ वराह किंवा पगोडा."

ह्या वर्णनावरून विजयनगरच्या समृद्धीची कल्पना सहज करितां येईल. देवरायानंतर विजय उर्फ मल्लिकार्जुन आणि विरूपाक्ष असे दोन राजे झाले. ते दुर्बल व विलासी होते. विरूपाक्ष हा निपुत्रिक होता. त्यामुळें त्याचे मागून नरसिंह नामक राजा गादीवर बसला. ह्यास विरूपाक्षानें दत्तक घेतलें होतें. नरसिंह राजापासून जे पुरूष गादीवर बसले त्यांस "नरसिंह घराणें" असें ह्मणतात. नरसिंह हा अतिशूर व बलाढ्य राजा होता. ह्यानें सर्व कारोमांडल किनाऱ्यांवर आपली सत्ता प्रस्थापित केली. वेलोर, चंद्रगिरी हे किल्ले त्यानें हस्तगत केले. वास्को डिगामा ह्याच्या कारकीर्दींत हिंदुस्थानांत आला व त्यानें ह्या राजाच्या वकिलापासून किल्ला बांधण्याची परवानगी घेतली. ह्या नरसिंहाच्या कारकीर्दींमध्यें Wartherna ह्मणून एक इतालियन प्रवासी आला होता. त्यानें विजयनगरचें अपार वैभव पाहून आश्चर्यचकित होऊन पुढील वर्णन केलें आहे.—

" त्याच्या पदरचे ब्राह्मण त्याचें असें वैभव गात कीं, त्याला अहर्निश ६०००० रुपयांचें उत्पन्न असे. तो कोणाना कोणाशीं तरी युद्धसंग्रामांत नेहमीं जुंपलेला असे. त्या काळीं घोडे दुर्मिळ असत तरी त्याजपाशीं जे ४०००० घोडेस्वार होते, त्यांच्या घोड्यांची किंमत प्रत्येकीं १००० पासून ३००० रुपयांपर्यंत होती. ह्याशिवाय त्याच्या पिलखान्यांत ४०० हत्ती व कांहीं रथ होते. तो ख्रिस्ती लोकांशीं फार स्नेहानें वागे आणि पोर्तुगीज लोक त्यास फार मान देत असत. तो भरजरीची टोपी डोकीस घालीत असे. व युद्धास जातांना पट्टयाचा पोशाख करून वरून भरजरी व रत्नें लावलेली दुशाल घेत असे. त्याच्या घोड्यावरील अलंकार इतके बहुमूल्य असत कीं त्यांची किंमत इतालींतील एखाद्या धनाढ्य शहरापेक्षांही अधिक होईल. त्याच्या पदरीं तीन चार मांडलिक राजे, अनेक सरदार व पांच सहा हजार स्वार असत."

ह्या प्रवाशानंतर सन १५१४ मध्यें Duarte Barbosa ह्मणून एक पोर्तुगीज प्रवासी आला होता. त्यानें विजयनगरचें वर्णन येणेंप्रमाणें केलें आहेः—

"विजयनगर हें शहर सपाटीवर असून त्याच्या एका बाजूस एक भव्य कोट, दुसरे बाजूस एक रमणीय नदी, व तिसरे बाजूस एक उंच

पर्वत होता. हें शहर फार मोठें आणि गजबज-लेलें असे. त्यामध्यें अनेक सुंदर राजवाडे, भव्य रस्ते आणि चौक होते. राजा रायलू ने-हमीं शहरांतच रहात असे. तो अनेक विला-सांत गर्क होऊन राजमंदिरांतून बाहेर पडत नसे. तो गौरवर्ण असून उंच होता व त्याचे केंस काळे भोर होते. ह्या राजाच्या खिजमतींत राजवाड्यांतच रहाणाऱ्या अनेक युवति असत. त्या नाच, गायन इत्यादि नाना प्रकारांनीं राजाचें मन रंजवीत असत. ····· अनेक पालख्या व घोडेस्वार राजवाड्याच्या दरवाज्यावर नेहमीं सज्ज असत. त्याच्या द्वारीं २०००-३००० रुपये किंमतीचा एक एक असे ९०० हत्ती झुलत होते. तसेंच ५००।७०० किंवहुना १०००।१२०० किंमतीचा एक एक असे २०००० घोडेही होते. त्याच्या सरदारांपैकीं अनेक सरदार निरनिराळ्या प्रांतांतून येऊन त्याच्या नोकरीस रहात व आपला धर्म पाळून त्याची नोकरी बजावीत असत. शांततेच्या वेळीं शहरांत परदेशीयांची दाटी असे. या शहरांत अनेक श्रीमंत गृहस्थ, असंख्य मूर व्यापारी व सावकार, आणि दूर देशांतील अनेक धनाढ्य लोक वास्तव्य करीत होते. ते आपआपल्या धर्मानें वागून सुख भोगीत असत. या राज्यांत न्याय चोख मिळत असे व व्यापार तर अतोनात होई. अनेक प्रकारच्या जड जवाहिराचा विजयनगरमध्यें जणुं पाऊसच पडत होता. तेथें माणकें पेगू प्रांतांतून, हिरे दक्षिणेंतून, मोत्यें ऊर्मझहून व दक्षिण हिंदुस्थानांतून येत असत."

इ. स. १५१२ मध्यें कृष्णरायदेव म्हणून जो राजा गादीवर बसला त्याच्या कारकीर्दींत विजयनगरचा जितका अभ्युदय झाला होता तितका मागें कधींही झाला नव्हता. ह्या राजानें इ. स. १५१२ पासून १५३० पर्यंत राज्य केलें, तितक्या कालास विजयनगरचा उत्कर्षकाल ( Golden age of Vijayanagar ) असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या राजाचा अपप्या दिक्षित नांवाचा प्रधान होता. ह्याच्या कारकीर्दीमध्यें विजयनगरच्या अमलाखालीं कृष्णा व कावेरी ह्या नद्यांमधला सर्व मुलूख आला होता. ७७ राजे विजयनगरचे मांडलिक होते. विजापूर, गोवळकोंडा, पेनुकोंडा, चित्तलदुर्ग, म्हैसूर, वेलोर, कृष्णगिरी हे विजयनगरभूपतीस सामंतचक्रप्रभु समजून त्यास ह्या वेळीं करभार देत असत. कृष्णरायानें शिवसमुद्र, उदयगिरी, कनकगिरी, आणि वारांगळ ह्या संस्थानांवर स्वाऱ्या करून तीं हस्तगत केलीं. गजपति राजांचा कलिंगदेश पादाक्रांत केला. येवढेंच नव्हे तर सन १५२० मध्यें त्यानें विजापूर आणि गोवळकोंडा ह्या दोन्ही मुसलमान बादशाहांकडून आलेल्या प्रचंड सैन्याचा पराभव केला. हा राजा जसा पराक्रमी होता तसाच मोठा विद्याभिलाषीही होता. कानडी व तेलगू वाङ्मयाची ह्याच्या कारकीर्दींत फार अभिवृद्धि झाली. ह्याच्या दरबारामध्यें अचाट बुद्धीचे आठ विद्वान् पंडित व कवि होते. त्यांच्या विद्वत्तेची बरोबरी करण्यास अष्टदिशांस कोणीही नव्हते; म्हणून त्यानें त्यांस अष्टदिग्गज असें नांव दिलें होतें. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:-१ अल्लासानी पेदण्णा. ह्यानें मनुचरित्र लिहिलें आहे. २ नंदी अथवा मुक्क तिमन्ना. ३ अय्यलराजू रामभद्रय्या. ४ कवि धूर्जटि, ५ मध्यगिरी मल्लन्ना. ६ भट्ट मूर्ति. ७ तेन्नल्ला रामकृष्ण. ८ अप्पया दीक्षित. शेवटच्या पंडिताची कीर्ति व विद्वत्ता सर्वश्रुतच आहे. ह्या राजाचा कोटिकन्यादान-ताताचार्य ह्मणून गुरु होता. कृष्णरायाचे पदरीं सैन्य पुष्कळ होतें, व

त्याचा द्रव्यकोशही फार प्रचंड होता. त्याच्या खजिन्यांत ९ कोटि द्रव्य शिलक होतें. त्याच्या राज्यांत सर्व बाबी मिळून ८४ लाख रुपये वसूल होत असे. जमीनमहसूल,घरपट्टी, बंदरपट्टी, कांचपट्टी, जातपट्टी वगैरे वसुलाच्या अनेक बाबी होत्या. तुंगभद्रेचे अनेक कालवे व विजयनगरांतील प्रचंड देवालयें ह्याच्याच कारकीर्दीत बांधलीं गेलीं. सीझर फ्रेडरिक नामक एका इटालियन प्रवाशानें ह्याच्या कारकीर्दीचें असें वर्णन केलें आहे कीं, "मी पुष्कळ राजांचे दरबार पाहिले; पण विजयनगरच्या राजदरबाराची बरोबरी करणारा एकही दरबार पाहिला नाहीं. येथील राजवाड्यास ९ दरवाजे आहेत, व तितक्या ठिकाणीं सक्त पहारे आहेत. इतक्या पाहाऱ्यांतून जेव्हां आंत जावें तेव्हां राजाधिराजांचा सुंदर दरबार दृष्टीस पडतो." ह्याच प्रवाशानें शहराचा घेर २४ मैल होता असें लिहिलें आहे. तात्पर्य, कृष्णरायाच्या कारकीर्दीत विजयनगरच्या वैभवाचा अगदीं कळस झाला असें ह्मटलें तरी चालेल. कृष्णराय हा १५३० मध्यें मृत्यु पावला व त्याच्या मागून रामराज नामक राजा गादीवर बसला. हा राजा राजव्यवहारदक्ष नसल्यामुळें विजयनगरचे मांडलिक राजे विभक्त होऊन ती गादी कमजोर झाली. विजयनगर येथें विलास रंग फार वाढून ठिकठिकाणचे स्वेच्छाचारी व सत्ताभिलाषी सुभेदार स्वतंत्र रीतीनें वागूं लागले. अर्थात्, विजयनगरची अशी शोचनीय स्थिति झाल्यामुळें बहामनी राज्याच्या ज्या पांच प्रचंड शाखा प्रबल होत चालल्या होत्या, त्यांनीं दक्षिणेमध्यें यदृच्छेनें विस्तार पावणाऱ्या मुसलमानी राजसत्तेस प्रतिबंध करणाऱ्या ह्या विस्तीर्ण व जुनाट राज्यतरूचा समूळ विध्वंस केला. तालीकोट येथें विजापूर, गोंवळकोंडें, बेदर वगैरे ठिकाणच्या बादशहांनीं मिळून विजयनगरच्या रामदेवराय राजाशीं घनघोर युद्ध करून त्यास ता० २५ जानेवारी १५६५ मध्यें समरांगणांत ठार केलें! सर्व दक्षिणेंतील हिंदु साम्राज्याचा फार प्राचीन तरू उन्मळून पडला! मुसलमानांनीं विजयनगरची सर्व संपत्ति लुटून नेली आणि हिंदुधर्माचा उच्छेद केला!! ह्या दुर्धर प्रसंगाचें वर्णन पोर्तुगीज इतिहासकार "फेरिया सुझा" ह्यानें केलें आहे, तें येणेंप्रमाणें:—

"इ० स० १५६६ या वर्षी, दक्षिणेंतील यवन राजे व विजयनगर यांमधील विनाशकारक युद्धामुळें हिंदुस्थानचा व्यापार अगदीं बसला. विजयनगरच्या त्या वेळच्या राजाचें वय ९६ वर्षांचें होतें. त्याचा युद्धांत पहिल्यानें जय झाला; पण शेवटीं पराभव होऊन तो लढाईतच मृत्यु पावला. जरी तेथील लोकांनीं लढाईचा शेवट होण्यापूर्वींच १५५० हत्ती भरून जडजवाहीर व खजिना, आणि कमींतकमी दहाकोट रुपयांचें सोनें, तसेंच राजाचें बहुमूल्य सिंहासन पळविलें होतें, तरी यवन लोक तें शहर ५ दिवसपर्यंत एकसारखें लुटीत होते. ह्या लुटीपैकीं एकट्या आदिलशहाच्या वांट्यास कोंबडीच्या अंड्याएवढा एक मोठा हिरा, आणि एक त्यापेक्षां लहान पण विलक्षण आकाराचा हिरा अशीं दोन अमूल्य रत्नें येऊन शिवाय इतकें जवाहीर आलें कीं त्याची किंमतच होणार नाहीं. अझून जीं देवळें अस्तित्वांत आहेत तीं पाहिलीं असतां त्यांतील प्रत्येक कोनाकोपऱ्यांत मुसलमानांनीं लुटीकरितां बारीक रीतीनें शोध केला होता अशी साक्ष मिळते."

असो, ह्यावरून विजयनगरच्या नाशाची कल्पना सहज करितां येईल. तालीकोटच्या ल-

ढाईनंतर विजयनगरची भरभराट पुन्हा कधींही झाली नाहीं. मृत राजाचा एक वंशज चंद्रगिरीस पळून गेला व त्यानें पुन्हा अनागोंदी येथें लहानसें राज्य स्थापन केलें. मुसलमानांनीं व पेशव्यांनीं तें राज्य तसेंच कायम ठेविलें. अद्यापि निजामाच्या राज्यामध्यें अनागोंदी नांवानें हें लहानसें संस्थान चालत आहे. येथील राजास त्या प्रांतांतले लोक अद्यापि पूज्य मानितात.

विजयनगर हें शहर सांप्रत अगदीं ओसाड झालें असून तेथील दगडी राजवाडे, प्रचंड देवालयें, उत्तुंग गोपुरें हीं आपलें पूर्वींचे वैभव नष्ट झाल्यामुळें शोकाक्रांत झालीं आहेत, असें प्रेक्षकांस वाटल्यावांचून रहात नाहीं. ह्या सर्व स्थलांचें दीनस्वरूप पाहून कालाच्या विचित्र गतीचें स्मरण होतें; आणि भर्तृहरीचा–

> सा रम्या नगरी महान् स नृपतिः
> सामन्तचक्रंच तत् ।
> पार्श्वे यस्य च सा विदग्धपरिष-
> त्ताश्चंद्रबिम्बाननाः ॥
> उन्मत्तः स च राजपुत्रनिवह-
> स्ते बन्दिनस्ताः कथाः ।
> सर्वं यस्य वशादगात् स्मृतिपथं
> कालाय तस्मै नमः ॥ १ ॥

हा श्लोक नेत्रांपुढें येऊन कालास वंदन करणें भाग पडतें.



# बेकनूचे निबंध.

## धर्मामध्यें एकी.

धर्म हा मानवी समाजाची मुख्य ग्रंथी असल्यामुळें तो ऐक्याच्या खऱ्या बंदांत सुव्यवस्थित असणें ही सुदैवाची गोष्ट आहे. धर्मसंबंधाचे तंटे व भेद हीं अरिष्टें मूर्तिपूजक लोकांना माहित नव्हतीं. याचें कारण असें होतें कीं, मूर्तिपूजकांचा धर्म पुष्कळ अशीं ठरींव संस्कार व विधि यांचाच बनलेला होता; त्यांत अचल श्रद्धाविषयक सिद्धांत विशेष नव्हते. कारण, त्यांचा धर्म कोणत्या प्रकारचा होता याची कल्पना तुह्मांला एका गोष्टीवरून करतां येईल; ती गोष्ट हीं कीं त्यांच्या धर्माचे मुख्य अध्यापक व आचार्य कवि हे होते. पण खऱ्या देवांत हा गुण आहे, कीं तो मत्सरी देव आहे; आणि ह्मणून त्याची पूजा व त्याचा धर्म यांत कोणत्याही प्रकारचें मिश्रण किंवा कोणी भागीदार खपणार नाहीं. ह्मणून चर्च्यची* एकी, त्या एकीचीं फळें कोणतीं, तिच्या मर्यादा कोणत्या, व उपाय कोणते, याविषयीं थोडें सांगूं.

एकीचीं फळें (देव फार खूष होतो, व यांतच इतिकर्तव्यता आहे, हें मुख्य फळ; पण याशिवाय) दोन आहेत; एक, जे चर्च्यच्या बाहेर आहेत त्यांच्या संबंधाचें; दुसरें, चर्च्यच्या आंत आहेत त्यांच्या संबंधाचें. आतां पहिल्याविषयीं:–हें खचित कीं, सर्वांपेक्षां पाखंडें व फुटी हे अत्यंत मोठे दोष आहेत; होय, नीतीच्या भ्रष्टाचारापेक्षांही मोठे.

* चर्च्य ह्मणजे ख्रिस्ती धर्मसंस्था.

कारण, जसें भौतिक देहामध्यें एकाद्या बाईट दोषापेक्षां एकादा घाय किंवा भेग अनिष्ट असते, तसेंच आध्यात्मिक देहामध्यें. ह्मणजे लोकांना चर्च्यच्या बाहेर ठेवण्यास व जे चर्च्यमध्यें आहेत त्यांना बाहेर घालविण्यास एकीचा भंग जसा कारणीभूत होतो तसें दुसरें कांहीं होत नाहीं. ह्मणून जेव्हां अशी स्थिति होते कीं, कांहीं लोक ख्रिस्ताला पाखंड्यांच्या पंथांत शोधितात व कांहीं चर्च्यच्या बाह्यस्वरूपांत शोधितात तेव्हां " बाहेर जाऊं नका " हे शब्द लोकांच्या कानांत निरंतर श्रुत झाले पाहिजेत. मूर्तिपूजकांचा अध्यापक * ( ज्याचा स्वाभाविक ओढा ख्रिस्ती धर्माच्या बाहेरील लोकांची विशेष काळजी घेण्याकडे होता ) ह्मणतो–" जर एकादा मूर्तिपूजक आला, आणि त्यानें तुमचीं भांडणें ऐकलीं तर तुह्मी वेडे आहां असें तो ह्मणणार नाहीं काय ? " आणि खरोखर, जेव्हां नास्तिक व धर्मबाह्य लोक धर्मामधलीं इतकीं असंबद्ध व परस्परविरुद्ध मतें ऐकतात तेव्हां ते चर्च्यला पराङ्मुख होतात व निंदक बनतात. असल्या गंभीर विषयांत थट्टेचा उपयोग करणें बरोबर नाहीं. पण तिच्यावरून एकीचा अभाव चांगल्या रीतीनें व्यक्त होतो. उपहासांत निष्णात असा एक गृहस्थ ‡ आहे; त्यानें काल्पनिक ग्रंथालयाची एक यादी करून त्यांत एका पुस्तकाचें नांव असें नमूद केलें आहेः " पाखंड्यांचा नाच. " कारण त्यांच्या प्रत्येक पंथांत वेगवेगळीं आसनें किंवा प्रणाम असतात; ते पाहून, पवित्र वस्तूंचा उपहास करण्याला उद्युक्त होणारे असे जे प्रपंचासक्त लोक व पापबुद्धि राजकारणी पुरुष त्यांना हंसूं आल्यावांचून राहणार नाहीं.

जे चर्च्यच्या आंत आहेत त्यांच्या संबंधाचें फळ शांतता हें आहे. शांततेमध्यें अनंत सुखें आहेतः–ती श्रद्धा स्थापित करते; ती परहितबुद्धि प्रज्वलित करते; चर्च्यची बाह्य शांतता हृदयामध्यें शांति उत्पन्न करते; आणि वादविवाद लिहिण्याचे व वाचण्याचे श्रम तिच्यामुळें इंद्रियदमन व भक्ति यांमध्यें पर्यवसान पावतात.

एकीच्या मर्यादांसंबंधानें; त्या मर्यादांचें खरें स्थान ठरविणें अत्यंत महत्त्वाचें आहे. या संबंधानें दोन परमावधि दिसतात. कारण कित्येक धर्मवेड्यांना संधिकरणाची गोष्ट तिरस्करणीय वाटते. " साम काय, येहू ?"– " तुला सामाशीं काय करावयाचें आहे ? माझ्यामागें हो कसा+." त्यांना सामाची गोष्ट नको. आपला पक्ष व आपले अनुगामी असले ह्मणजे झालें. दुसऱ्यापक्षीं, कित्येक लाओडिसियन्स×व अनास्थ लोक असतात; त्यांना वाटतें कीं, धर्मसंबंधीं दोन मतें असतील तेव्हां आपण मध्यें राहिलें व दोहोंमध्येंही आपलें अंग ठेविलें, ह्मणजे आपण त्यांचा समेट केला असें होईल. ह समेट चतुराईचे समजावयाचे ! जणूं काय, देव व मनुष्य यांमध्यें ते इनसाफ करणार ! ह्या दोन्ही परमावधि टाळल्या पाहिजेत. आमच्या तारण

* सेन्ट पॉल. ‡ राबेले.

+ हा बैबलांतील उतारा आहे. ( २ किंग्स ९.१८) × लाओडिसियन ख्रिस्तीलोक स्वधर्माविषयीं उदासीन होते. ते थंडेही नव्हते व गरमही नव्हते.

करणारानें[१] ख्रिस्त्यांचे जे नियम स्वतः लिहिले आहेत त्यांतील दोन विपरीत वाक्यांचें जर यथायोग्य व स्पष्टपणें विवरण करण्यांत आलें तर ह्या परमावधि टाळतां येतील. तीं वाक्यें हीं:– " जो आमच्या बाजूला नाहीं तो आमच्या विरुद्ध आहे. " आणि पुनः "जो आमच्या विरुद्ध नाहीं, तो आमच्या बाजूचा आहे." ह्मणजे जर धर्मांतील आधारभूत व तात्विक मुद्दे, व श्रद्धेला अनावश्यक पण मत, अनुक्रम व सद्धेतु यांसंबंधाचे मुद्दे, यांतील भेद लक्षांत आणून ते वेगळे ठेवले, तर वरील परमावधि टाळतां येतील. कित्येकांना ही गोष्ट क्षुल्लक व अगोदरच झालेली आहे असें वाटेल. पण ती जर कमी पक्षपातानें होईल तर तिचा स्वीकार अधिक होईल.

ह्यासंबंधानें मी माझ्या अल्प समजुतीप्रमाणें फक्त ही सल्ला देऊं इच्छितोंः मनुष्यांनीं दोन प्रकारच्या वादविवादांनीं देवाच्या चर्च्यमध्यें फूट न पाडण्याविषयीं सावधगिरी ठेविली पाहिजे. एक प्रकार–जेव्हां वादाच्या मुद्याचा विषय अत्यंत क्षुद्र व फुसका असतो, आवेश व झगडा करण्याच्या योग्यतेचा नसतो, व केवळ प्रतिषेधानेंच पेट घेणारा असतो. कारण, एका ( ख्रिस्ती ) आचार्यानें याविषयीं असें लिहिलें आहेः " खरोखर तर ख्रिस्ताच्या आंगरख्याला शिवण नव्हती; पण चर्च्यचीं वस्त्रें निरनिराळ्या रंगांचीं होतीं." यावर तो ह्मणतो, वस्त्रांमध्यें वैचित्र्य असावें, छिद्र असूं नये. एकी वेगळी व एकरूपता वेगळी. दुसरा प्रकार–जेव्हां वादाच्या मुद्यांतील विषय मोठा असतो, पण तो वाजवीपेक्षां फाजील सूक्ष्म व दुर्बोध करण्यांत येतो; तो इतका कीं त्यांतील खरें तत्त्व बाजूस राहून तो केवळ बुद्धीची कुशाग्रता दाखविणारा होतो. विचारी व समजूतदार मनुष्य कधीं कधीं अज्ञानी माणसें एकाद्या बाबतींत विरुद्ध मतें देतांना ऐकतो; त्याला पक्कें माहित असतें कीं, त्या भिन्नमतवाद्यांच्या मनांतील आशय एकच असतो; पण त्यांचा कधींही मेळ पडायाचा नाहीं. आणि मनुष्यामनुष्यांमधील विचारांमध्यें जर इतका फरक आहे, तर आकाशांतील देव–जो अंतःकरण जाणतो–तो दुर्बल माणसें कित्येक बाबतींत एकमेकांविरुद्ध जरी मतें देतात तरी त्यांच्या मनांतील भाव एकच असतो, हें जाणत नसेल काय ? व दोन्ही मतें त्याला सारखींच आवडत असतील, हा विचार आमच्या मनांत येऊं नये काय ? असल्या वादविवादांचें स्वरूप सेन्ट पॉलनें आपल्या सूचनेंत व उपदेशांत उत्तम रीतीनें सांगितलें आहे. " नवीन नवीन शब्दजाल व खोट्या नांवाच्या शास्त्राचे विरोध टाळा. " विरोध नाहींत तेथें मनुष्यें विरोध उत्पन्न करतात, आणि ते नव्या शब्दांनीं व्यक्त करतात; हे नवे शब्द इतके ठाम असतात कीं अर्थाप्रमाणें शब्द असावा त्याऐवजीं शब्दाप्रमाणें अर्थ करण्यांत येतो. खोटा समेट अथवा ऐक्यता यांतही दोन प्रकार आहेत; एक–जेव्हां समेटाला फक्त गाढ अज्ञान आधारभूत असतें; कारण अंधारांत सर्व रंगांची एकवाक्यता होतेः दुसरा, मुख्य मुद्यांच्या

[१] येसूख्रिस्त.

संबंधानें विरुद्ध मतें स्वीकारून समेट होतो तेव्हां. कारण अशा कामीं खरें व खोटें नाबुकाडनाझाराच्या मूर्तीच्या बोटांतील* लोखंड व माती यांप्रमाणें आहेत; त्यांची फूट होईल, पण त्यांचा एकजीव होणार नाहीं.

ऐक्यता साधण्याच्या उपायांविषयीं: धर्मसंबंधीं एकी साधतांना किंवा दृढ करतांना, परहितबुद्धि व मानवी समाज यांचे नियम शिथिल किंवा नष्ट न होतील ही खबरदारी मनुष्यांनीं ठेविली पाहिजे. ख्रिस्ती लोकांत दोन तरवारी आहेत–पारमार्थिक व ऐहिक; व धर्मरक्षणाच्या कामीं दोहोंनाही योग्य काम व स्थान आहे. पण आपण तिसरी तरवार धरतां नये; ही महंमदाची तरवार अगर तिच्यासारखी. ह्मणजे धडधडीत निंद्य प्रकार, देवनिंदा, किंवा राज्याविरुद्ध कारस्थान असलाले प्रसंग खेरीजकरून लढायांनीं किंवा रक्तपाताच्या छलांनीं धर्माचा प्रसार करूं नये; मग राजद्रोहाला थारा देणें, कट व बंडें यांना उत्तेजन देणें, लोकांच्या हातीं तरवार देणें, इत्यादि गोष्टी तर लांबच राहिल्या: ह्या गोष्टींनीं सर्व प्रकारच्या राज्यव्यवस्थेची धूळधाणी होते; आणि राज्यव्यवस्था ही तर देवाचा कायदा आहे. कारण असें करणें ह्मणजे पहिला पट्ट+ दुसऱ्यावर आदळण्याप्रमाणें आहे; ह्मणजे मनुष्यें ख्रिस्ती आहेत हें अशा रीतीनें दाखवायाचें कीं, तीं मनुष्यें आहेत हें आपण विसरावें. **आगामेम्नाननें** आपली मुलगी बळी दिली हें कृत्य **लुक्रिशियस** कवीनें जेव्हां पाहिलें तेव्हां तो ह्मणाला– "इतकें अघोर कृत्य करविण्यास धर्म समर्थ झाला ना !" पण त्याला जर फ्रान्समधील कत्तल+ किंवा इंग्लंडांतील दारूचें कारस्थान× माहित असतें तर त्यानें काय बरें ह्मटलें असतें ? तो होता त्यापेक्षां सातपट अधिक एपिक्यूर* व नास्तिक झाला असता. कारण जसें धर्माच्या बाबतींत ऐहिक तरवार उपसण्याचें काम मोठ्या विचारानें करायाचें आहे, तसें, ती तरवार सामान्य लोकांच्या हातीं देणें हें कृत्य राक्षसी आहे. तें **अनाबाप्टिस्ट** व दुसऱ्या चंडिका यांजकरितां ठेवावें. जेव्हां शैतान ह्मणाला कीं–"मी वर चढेन आणि देवासारखा होईन" तेव्हां त्याचें बोलणें देवनिंदात्मक होतें; पण देवाचें सोंग आणून "मी खालीं उतरेन आणि शैतानासारखा होईन" असें त्याच्याकडून वदविणें हें अधिक देवनिंदात्मक आहे. आणि धर्माच्या नांवानें राजाचा खून करणें, लोकांची कत्तल उडविणें,

* बाबिलोनचा राजा नाबुकाडनाझार यानें स्वप्नांत एक पुतळा पाहिला, त्याचें हें वर्णन आहे. त्या स्वप्नाचा अर्थ दानियेलनें सांगितला.

+ सिनाई पर्वतावर देवानें आपल्या बोटांनें लिहिलेले दगडाचे दोन पट्ट मोशेला दिले. पहिल्यावर मनुष्याचीं देवासंबंधाचीं कर्तव्यें व दुसऱ्यावर मनुष्यासंबंधाचीं कर्तव्यें लिहिलेलीं होतीं.

+ फ्रान्सचा राजा ९ वा चार्लस याच्या हुकुमावरून फ्रान्समधील पाखंडी लोकांची कत्तल इ. स. १५७२ या सालीं झाली.

× पार्लमेन्ट सभा ज्या गृहांत भरे त्याच्या खालीं भुयार करून त्यांत बंदुकीची दारू भरून ठेवलेली होती, व सभा भरल्यावर दारूला आग लावावी ह्मणजे सर्व सभासद एकदम मृत्युमुखांत पडतील, हा हेतु होता. पण बेत फसला. हें कृत्य रोमन क्याथलिक पक्षाचें होतें असा साधारण समज होता. इ. स. १६०५.

* एपिक्यूरसनें एक पंथ स्थापन केला होता. या पंथाचे लोक ईश्वर मानीत नसत. खावें, प्यावें, चैन करावी, असें त्यांचें मत होतें. या पंथाच्या माणसाला एपिक्यूर ह्मणत.

संस्थानें व राज्यव्यवस्था उलथून पाडणें, इत्यादि क्रूर व अति दुष्ट कृत्यें करणें हें देवनिंदेपेक्षां चांगलें आहे काय? असें करणें ह्मणजे खरोखर पवित्र आत्मा कबूतराच्या रूपानें खालीं न आणतां गिधाड किंवा डोमकावळ्याच्या रूपानें आणणें होय; आणि ख्रिस्ती चर्च्यरूपी नौकेला चांचेलोकांच्या किंवा खुनी लोकांच्या नौकेचा बावटा लावणें होय. ह्मणून ज्या गोष्टी व जीं मतें असें करणारीं आहेत तीं चर्च्यनें आपल्या अनुशासनानें व रायसांनीं, राजांनीं आपल्या तरवारीनें, आणि सर्व विद्वानांनीं ( ख्रिस्ती अथवा, नैतिक ) आपल्या लेखणीनें सदोष ठरवून त्यांना नरकाची वाट दाखवावी हें अत्यंत आवश्यय आहे. हें बऱ्याच अंशीं झालेंच आहे. खरोखर धर्मसंबंधीं विचारांच्या शिरोभागीं मेषिताचा हा पुढील विचार ठेवावा. " मनुष्याच्या क्रोधानें देवाच्या न्यायकर्तृत्वाचें काम आपल्यावर घेऊं नये. " आणि एका सुज्ञ आचार्याचें ह्मणणें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तो खुबीदार रीतीनें ह्मणतो-" जे दुसऱ्यांचीं मतें जबरदस्तीनें फिरविण्याविषयीं आपलें अनुमोदन देतात व त्याप्रमाणें अंमलबजावणी करतात, त्यांचा त्यांत बहुधा कांहीं तरी स्वार्थ असतो. "

## कापट्य ( ढोंग ) व सत्यापलाप.

सत्यापलाप हा केवळ मिणमिण्या प्रकारचा व्यवहार किंवा शहाणपणा होय. कारण खरें केव्हां सांगावें हें जाणण्याला व खरें सांगण्याला खंबीर बुद्धि व खंबीर अंतःकरण लागतें. ह्मणून जे कमकुवत राजकारणी मनुष्य असतात तेच मोठे सत्यापलाप करणारे असतात.

तासितस ह्मणतो-" लिव्हिया आपल्या नवऱ्याचे डावपेंच व आपल्या मुलाचा सत्यापलाप ह्या दोहोंनाहीं चांगली पुरी पडणारी होती." यावरून आगस्टस हा डावपेंचांनीं किंवा राजनीतीनें व तिबेरियस सत्यापलापानें युक्त होता असें झालें. आणि पुनः जेव्हां व्हेस्पेशियनाला व्हितेलियसाविरुद्ध बंड करण्यास म्युसियानस उत्तेजन देतो तेव्हां तो ह्मणतोः " आगस्टसाच्या मर्मभेदक बुद्धीविरुद्ध किंवा तिबेरियसाची पराकाष्ठेची सावधगिरी व मख्खपणा यांविरुद्ध आम्ही उठत नाहीं. " डावपेंच अथवा राजनीति, आणि सत्यापलाप अथवा मख्खपणा हे गुण व वर्तनक्रम भिन्न भिन्न आहेत, व ते वेगवेगळे ठेवायाचे आहेत. कारण एकाद्या मनुष्याची जर इतकी कुशाग्र बुद्धि असली कीं कोणत्या गोष्टी उघड कराव्या आणि कोणत्या छपवाव्या, आणि कोणत्या अर्धवट दाखवाव्या आणि कोणाला, व केव्हां ( यालाच राजनीतीच्या कला व जीवनक्रमाची कला असें तासितसनें ठीक ह्मटलें आहे ) हें त्याला समजत असलें, तर सत्यापलापाची सवय ही त्याला एक विघ्न व दुर्बलता होते. पण जर मनुष्याची बुद्धि तशी होत नाहीं तर, साधारणपणें, त्याला आंतल्या गांठीचा व छद्मवेशी होण्याला चिंता नाहीं. कारण ज्या कामीं मनुष्याला किरकोळ बाबतींत वेळ मारून नेतां येत नाहीं त्या कामीं साधारणपणें अत्यंत सुरक्षित व सावधगिरीचा मार्ग धरणें चांगलें; जसें, ज्याला चांगलें दिसत नाहीं त्याणें जपून चालावें. हें खचित कीं, आजपर्यंत जे अत्यंत कार्यक्षम पुरुष होऊन गेले ते व्यवहारांत उघड्यामनाचे व

निष्कपट होते; व निश्चितपणा व सत्य भाषण यांविषयीं त्यांची कीर्ति होती. पण ते सुयंत्रित अश्वांप्रमाणें होते. कारण केव्हां थांबावें व केव्हां वळावें हें त्यांना उत्तम रीतीनें सांगतां येत असे; आणि सत्यापलाप करणें अवश्य आहे असें ज्या प्रसंगीं त्यांना वाटे त्या प्रसंगीं जर त्यांनीं सत्यापलाप केला तर असें होई कीं, त्यांच्या प्रामाणिकपणाविषयीं व व्यवहारसरलत्वाविषयीं जो समज अगोदर दूरवर पसरलेली होती तिच्यामुळें ते बहुतेक निसटून जात.

ह्या लपवणुकीचे व आत्मगोपनाचे तीन प्रकार आहेत;पहिला—मख्खपणा, पोटांत ठेवणें, आणि गुप्तपणाः ह्मणजे मनुष्य जेव्हां लोकांच्या नजरेखालीं येत नाहीं व आपल्याविषयीं पत्ताच लागूं देत नाहीं. दुसरा—सत्यापलाप, निषेधार्थी; जेव्हां मनुष्य आपलें खरें स्वरूप खुणांनीं व कोटिक्रमांनीं उलटें भासवितो. तिसरा—ढोंग, आस्तिकार्थी; जेव्हां मनुष्य आपलें जें स्वरूप नाहीं तें युक्तिप्रयुक्तीनें आणि बुद्ध्या आहेसें भासवितो आणि ढोंग करतो.

यांपैकीं पहिला प्रकार गुप्तपणा, यासंबंधानें विचार करूं. खरेंच तर, गुप्तपणा हा पापश्रवणगुरूचा+ सद्गुण आहे; आणि खरें पाहिलें असतां गूढ मनुष्य पुष्कळ पापकथनें ऐकतो. कारण बडबड्यापाशीं आपलें गुह्य कोण सांगेल? पण जर मनुष्य तोंडाचा घट्ट आहे असें समजलें तर हा त्याचा गुण गुह्य गोष्टी आपल्याकडे ओढून घेतो; जसें कोंडलेली हवा खुल्या हवेला ओढून घेते. आणि ज्या अर्थी पापश्रवणामध्यें गुह्य गोष्ट उघड करण्यांत येते ती ऐहिक कार्याकरतां नव्हे, तर, मनुष्याच्या अंतःकरणांतलें ( पापाचें ) ओझें उतरावें ह्मणून, त्या अर्थी गूढ मनुष्यांना त्या प्रकारें पुष्कळ गोष्टींचें ज्ञान होतें. पण इतकेंच कीं मनुष्यें आपल्या मनावरचें ओझें काढून टाकतात, आपल्या मनांतील गोष्टी सांगत नाहींत. सारांश, गुह्य गोष्टी उघड होतात त्या ऐकणाराच्या गुप्तपणामुळें. शिवाय ( खरें सांगायाचें तर ) नागवेपणा जसा शरीराला तसा मनालाही विशोभित आहे, आणि माणसें जर निखालस उघड्या मनाचीं नसलीं तर तेवढ्यावरून त्यांच्या रीतरिवाजांना व त्यांच्या कृत्यांना कांहीं थोडेंथोडकें पूज्यत्व येत नाहीं. जे लोक वाचाळ व भडभडे आहेत त्यांजविषयीं इतकेंच सांगायाचें कीं, ते बहुधा वृथाभिमानी व भोळेही असतात. कारण जो आपल्याला माहित असलेलें बोलतो तो माहीत नसलेलेंही बोलेल. ह्मणून लिहून ठेवा कीं गुप्तपणाची सवय शहाणपणाची आहे व नैतिकही आहे. आणि यासंबंधानें मनुष्याच्या चेहऱ्यानें बोलण्याचें काम जिभेकडे सोंपवावें हें चांगलें. कारण मनुष्याचें अंतर्याम त्याच्या चेहऱ्यावरून उघडकीस यावें हा मोठा दुर्बलपणा व दगा होय. याचें कारण असें आहे कीं, अनेक वेळां मनुष्याच्या शब्दापेक्षां त्याच्या चेहऱ्याकडेच अधिक लक्ष असतें व त्यावरच अधिक विश्वास बसतो.

दुसरा प्रकार सत्यापलाप, याविषयींः सत्यापलाप हा अनेक वेळां गुप्तपणाला

+ ख्रिस्ती लोकांतील रोमन क्यायलिक पंथामध्यें अशी चाल आहे कीं, नियमित काळीं प्रत्येक माणसानें आपलीं पातकें एका पाद्रीपुढें एकान्तांत निवेदन करावीं. त्या पाद्रीला Confessor ह्मणजे पापश्रवणगुरु असें ह्मणतात.

अवश्यमेव जडलेलाच असतो. तो इतका कीं, जो मनुष्य तोंडाचा घट्ट असतो तो कांहीं अंशीं तरी सत्यापलाप करणारा असलाच पाहिजे. कारण लोक फार धूर्त असतात; ते गुह्यरक्षक मनुष्याला अगदीं उदासीन वृत्तीनें व आपला कल न दाखवितां राहूं देणार नाहींत. ते प्रश्न करकरून त्याचा असा पिच्छा पुरवितील, त्याला बोलायाला लावतील, व त्याचें त्द्गत काढून घेतील, कीं त्यानें अगदींच मौन धरलें नाहीं ( व मौन धरणें अयुक्तिक होईल ) तर त्याला एक ना दुसऱ्या बाजूकडे कल दाखविलाच पाहिजे. अथवा त्यानें कल दाखविला नाहीं तरी त्याच्या भाषणावरून जें अनुमान निघालें असतें तें ते त्याच्या मौनावरून काढतील. दुटप्पी व द्व्यर्थी भाषणांविषयीं इतकेंच सांगायाचें कीं, तीं फार वेळ टिकत नाहींत. सारांश, सत्यापलापाला थोडा तरी अवकाश दिल्यावांचून कोणीही मनुष्य गूढ होऊं शकत नाहीं.

पण तिसरा प्रकार ह्मणजे ढोंग व खोटें सोंग; हें मी अधिक दोषार्ह व कमी शहाणपणाचें समजतों ( मोठ्या व विरळा गोष्टींतील ढोंग शिवायकरून ). ह्मणून ढोंगाचा साधारण प्रचार हा दुर्गुण आहे. तो स्वाभाविक खोटसाळपणा किंवा भित्रेपणा यांपासून उत्पन्न होतो: अथवा ज्या मनामध्यें मोठे दोष आहेत त्या मनापासून होतो. असल्या मनाच्या मनुष्याला आपले दोष अवश्य लपवायाचे असतात; ह्मणून तो दुसऱ्या बाबतींतही ढोंगाची सवय करतो. तसें न केल्यास कदाचित् त्याची सवय मोडेल.

ढोंग व सत्यापलाप यांचे मोठे फायदे तीन आहेत. पहिला—विरुद्धभावाला झोंपेंत ठेवणें व त्याला अवचित गांठणें. कारण जेव्हां मनुष्य आपले हेतु प्रसिद्ध करतो तेव्हां तें त्याचें करणें त्याच्या प्रतिपक्षाला जागें करण्याला डंकाच होतें. दुसरा—मनुष्याला पाय मागें घेण्याची सवड ठेवणें; कारण जर एकाद्यानें उघड बोलून एखादें काम अंगावर घेतलें तर तें त्यानें सिद्धीस नेलें पाहिजे, किंवा हार तरी खाल्ली पाहिजे. तिसरा—दुसऱ्याच्या मनांतील भाव सहज काढून घेतां येणें. कारण जो आपलें मन मोकळें करतो त्याला इतर लोक सहसा विरुद्धपणा दाखविणार नाहींत; पण त्याला मनसोक्त बोलूं देतील, व आपणही मोकळ्या मनानें बोलण्याचें मिष करून त्याचे विचार काढून घेतील. ह्मणून "खोटें बोल आणि खरें काढ" अशी जी स्पानियर्ड लोकांमध्यें ह्मण आहे ती चांगली धूर्तपणाची आहे: जणुं काय ढोंग केल्यावांचून खरें शोधून काढण्याला दुसरा मार्गच नाहीं.

जसे तीन फायदे आहेत तसे तीन तोटेही आहेत. पहिला, ढोंग व सत्यापलाप यांच्याबरोबर साधारणपणें भित्रेपणाचा आभास असतो: हा कोणत्याही कामांत उद्दिष्ट हेतु साधण्याच्या आड येतो. दुसरा—ह्या गुणांमुळें पुष्कळांचीं मनें शंकित होऊन घोटाळ्यांत पडतात: तसें झालें नसतें तर त्यांनीं त्याला कदाचित साह्यही केलें असतें; तें नसल्यामुळें मनुष्याला आपले हेतु एकट्यानेंच साधावे लागतात. तिसरा व सर्वांत मोठा तोटा हा कीं, व्यवहारामध्यें जीं मुख्य साधनें—विश्वास व श्रद्धा—तीं त्याला नाहींशीं होतात. उत्तम प्रकारची स्थिति ह्मटली ह्मणजे, मनमोकळेपणाविषयीं कीर्ति व लौकिक असावा; गुह्यरक्षणाची सवय असावी; प्रसंगानुसार सत्यापलाप करतां यावा; व दुसरा उपाय नसल्यास, बहाणा करण्याचें सामर्थ्य असावें.

---

## प्रेम.

संसारापेक्षां रंगभूमि ही प्रेमाची अधिक ऋणी आहे; कारण रंगभूमीच्यासंबंधानें पाहिलें तर, प्रेम हा आनंदपर्यवसायी नाटकांचा नेहमीचा व शोकपर्यवसायी नाटकांचा कधीं कधीं विषय असतो. पण संसारांत तो फार नासाडी करतोः कधीं सायरन+ प्रमाणें; कधीं चंडीप्रमाणें. तुह्मांला असें आढळेल कीं, जितके मोठे व योग्यतेचे पुरुष होऊन गेले, (प्राचीन अगर अलीकडील, ज्यांची स्मृति राहिली आहे) त्यांमध्यें प्रेमातिशयानें वेडा झालेला असा एकही नाहीं; यावरून असें सिद्ध होतें कीं, महान् पुरुष व महत्कार्य ह्या दुर्बलतादर्शक विकाराला दूर ठेवतात. तथापि रोमच्या राज्याचा निम्मेचा भागीदार **मार्कस आन्तोनियस** आणि दसमवीर व विधिदाता **आपियस क्लॉदियस** हे तुह्मी वगळले पाहिजेत. यांपैकीं पहिला तर विषयलंपट व अपरिमित होता; पण दुसरा मायाहीन व शहाणा होता. आणि ह्मणूनच असें दिसतें (पण क्वचित्) कीं, प्रेमाला उघड्या अंतःकरणांतच प्रवेश करतां येतो असें नाहीं; तर सुसंरक्षित अंतःकरणांत देखील, चांगला पाहारा नसल्यास, करतां येतो. "आह्मी एकमेकांना बरेंच मोठें नाटकगृह आहों" असें **एपिक्यूरसचें** ह्मणणें आहे, तें नादान आहे. जणुं काय, मनुष्य आकाशाचें व सर्व उमद्या पदार्थांचें चिंतन करण्याकरतां उत्पन्न केलेला असून, त्यानें लहानशा मूर्तीपुढें गुढघे टेंकावे आणि (पशूंप्रमाणें) तोंडाचा नाहीं तरी डोळ्यांचा गुलाम बनावें, याशिवाय दुसरें कांहीं करूं नये; डोळे त्याला याकरतां दिलेले नसून श्रेष्ठतर कामाकरतां दिलेले आहेत. ह्या विकाराचा अतिरेक पाहून चमत्कार वाटतोः तो वस्तूंचें स्वरूप व त्यांची किंमत किती तरी फुगवतो. सर्वकाळ अतिशयोक्तीचें भाषण फक्त प्रेमांत शोभतें, आणखीं कोठें शोभत नाहीं. आणि अतिशयोक्ति फक्त बोलण्यांतच असते असें नाहीं. अत्यंत मोठा खुशामत्या ह्मटला ह्मणजे ज्याचा तो असें ह्मटलें आहे, तें बरोबर आहे; दुसरे सर्व लहान लहान खुशामत्ये त्याचें धोरण ठेवतात; पण प्रेमबद्ध मनुष्य खचित त्याहीपेक्षां मोठा खुशामत्या आहे. कारण प्रेमबद्ध मनुष्य आपल्या प्रीतिपात्राच्या चांगुलपणाविषयीं जितकी अकटोविकट कल्पना करतो तितकी स्वतःविषयीं करणारा असा गर्विष्ठ मनुष्य आजवर झाला नाहीं. आणि ह्मणूनच असें ह्मटलें आहे कीं, "प्रेम करून शहाणें असणें अशक्य आहे." हा दोष दुसऱ्यांना काय तो दिसतो, प्रेमपात्राला तो दिसत नाहीं, असेंही नाहीं; प्रेमपात्राला तो सर्वांहून अधिक दिसतोः प्रेम परस्पर असलें तर मात्र नाहीं. कारण हा खरा नियम आहे कीं, प्रेमाला बक्षिस मिळतें तें प्रतिप्रेमाचें अथवा अंतस्थ व गुप्त तिरस्काराचें. हा विकार जर दुसऱ्या वस्तु गमावून न राहतां आपल्या स्वतःलाही गमावितो तर मनुष्यांनीं त्याजविषयीं किती तरी खबरदारी घेतली पाहिजे. दुसरे तोटे कोणते हें कवीच्या कथेंत चांगल्या रीतीनें चित्रित केलें आहेः ज्यानें हेलेनला पसंत

+ सुंदर स्त्री. प्राचीन खलाशांची अशी समजूत असे कीं, कांहीं बेटांमध्यें सायरन नांवाच्या सुंदर स्त्रिया होत्या त्या खलाशांना भुलवून त्यांचा नाश करीत.

केलें त्यानें ज्यूनो व पालास यांच्या देणग्यांचा त्याग केला. कारण जो प्रेमविकाराची अतिशय महति मानतो तो संपत्ति व शहाणपण ह्या दोहोंना अंतरतो. ह्या विकाराला दुर्बलतेच्या काळींच भरतें येतें; ह्मणजे मोठ्या भरभराटींत व मोठ्या विपत्तींत. तरी विपत्तिकाळीं त्या गोष्टीकडे फारसें लक्ष जात नाहीं. हे दोन्ही काळ प्रेमाला प्रज्वलित करतात व अधिक तीव्र करतात, आणि याच कारणावरून तो मूर्खतेचा बालक आहे असें दर्शवितात. जे प्रेमाला वश झाले तरी तो मर्यादेंत ठेवतात, व आपल्या वजनदार कामापासून व जीवन कृत्यांपासून अगदीं अलग ठेवतात, ते फार चांगलें करतात. कारण जर का प्रेम एकदा कामाच्या आड आलें तर तो मनुष्याच्या कर्मगतींत बिघाड करतो व उद्दिष्ट हेतूची सिद्धि अशक्य करतो. लष्करी लोक प्रेमाच्या आधीन असतात याचें कारण काय असेल तें असो; मला वाटतें याचें कारण हें असावें कीं, ते मदिरासक्त असतात. कारण संकटांना बहुधा विषयभोगांचा मोबदला पाहिजे. मनुष्याच्या स्वभावांत अशी एक गुप्त प्रवृत्ति आहे कीं दुसऱ्यांवर प्रीति करावीः ती प्रवृत्ति जर एका किंवा थोड्याशा व्यक्तींवर खर्च झाली नाहीं तर स्वाभाविकपणें ती पुष्कळांवर पसरते; व ती मनुष्याला दयालु व परहितेच्छु करतेः हें मठवासी जोग्यांमध्यें कधीं कधीं दिसून येतें. वैवाहिक प्रेम मानवजाति उत्पन्न करतो; मैत्रप्रेम ती परिपूर्ण करतो; पण बदफैल प्रेम ती भ्रष्ट व नीच करतो.

---

[ पुस्तकपरीक्षा. ]

## बस्तिविधि.

या विषयावर कोल्हापूर एथील डा. वामन बाजी कुळकर्णी यांनीं कांहीं महिन्यापूर्वीं आपण वाचलेला निबंध छापून आमचेकडेस अभिप्रायास्तव पाठविला आहे. विषय शास्त्रीय पडल्यामुळें त्यावर अभिप्राय देण्याचें काम इतके दिवस लांबणीवर टाकावें लागलें. डा. कुळकर्णी यांचा हेतु—या निबंधाचा सर्व लोकांनीं विचार करावा, व बस्तिविधिसंबंधानें लोकांचा जो गैरसमज आहे तो दूर करून या विधीच्या सर्वत्र प्रसाराविषयीं लोकमत जागृत करावें, असा आहे. याकरितां पहिल्यानें त्यांच्या निबंधाचा गोषवारा देऊन, नंतर आह्मांस त्यासंबंधानें जे विचार सुचतात ते लिहितों.

सुमारें वीस वर्षांपूर्वीं अमेरिकेमधील डा. हॉल नांवाच्या गृहस्थास क्षयाची भावना झाली होती, व नामांकित डाक्टरांच्या सभेनें त्यांचा रोग असाध्य आहे असें सांगितलें. पण स्थूलांत्रांतील मळ बस्तिविधीनें काढून टाकल्यास शरीर निरोगी होऊन मनुष्य दीर्घायु होईल असें त्यांना केवळ अंतःप्रेरणेनें वाटलें, व त्याप्रमाणें त्यांनीं स्वतः बस्ति घेण्यास सुरवात केल्याबरोबर त्यांचा रोग साफ बरा झाला. यावरून सर्व रोग एकहेतुमूलक आहेत, ते बाहेरचे जंतु शरीरांत गेल्याशिवाय उत्पन्न होत नाहींत, व अन्नपचनक्रियेंत बिघाड झाल्याशिवाय ते शरीरांत शिरत नाहींत, असा एक व्यापक सिद्धांत त्यांनीं काढला आहे. त्यांनीं पुढें ह्मटलें आहे कीं, या जंतूंचा नाश करण्याकरितां पचनक्रिया चांगली चालली पाहिजे, व याकरितां पचनेंद्रियांपैकीं मुख्य नळा ( Alimentary Canal ) साद्यंत स्वच्छ राहिला पाहिजे. ह्मणून

धौति आणि बस्ति हे प्रयोग करावे. " धौति " ह्मणजे वरून जठर धुवून काढणें व "बस्ति" ह्मणजे खालून गुदद्वारें विपुल पाणी घेऊन स्थूलांत्र स्वच्छ करणें. पचनक्रियेचें स्वरूप समजण्यासाठीं, पचनेंद्रियांपैकीं महास्रोताची लांबी ३२ फुट आहे, व त्याचे सप्तपथ, जठर, क्षुद्रांत्र व स्थूलांत्र हे चार भाग आहेत, असें सांगून-लालापिंड, यकृत्पिंड, अनामकपिंड, ( Pancreas ) वगैरे इतर पचनेंद्रियें यांचें वर्णन केलें आहे. मुखांत अन्न गेल्यापासून त्याचेवर लाळ, जठररस, पित्त वगैरे निरनिराळ्या पाचक रसांचा कसकसा परिणाम होतो, अन्न गुदापर्यंत कसें जातें, त्यांतील पोषक रस रक्तांत कसे शोषिले जातात, व बाकी मळ स्थूलांत्रांत कसा तयार होतो, यासंबंधाचें थोडक्यांत चांगलें वर्णन केलें आहे. पुढें मलावष्टंभ झाल्यानें कायकाय परिणाम होतात; विशेषत: सुधारलेल्या लोकांत चहा, विडीचा झुरका, ' डोस ' अगर ' पेग ' वगैरे भलत्यासलत्या संवईनीं या शतकांत कोणकोणते परिणाम दृष्टीस पडतात; व त्यांमुळें मलावष्टंभ होऊन कफक्षय, मूळव्याधी, भगेंद्रादि विकार कसे होतात– वगैरे गोष्टींचें मोठें चटकदार वर्णन केलें आहे. पुढें वांतीचीं औषधें, एरंडेल वगैरे रेचक औषधें, आणि धौति व बस्ति यांची तुलना करून, धौति व बस्ति कसे करावे, व पूर्वींचे हटयोगी कसे करीत असत, व हल्लींचा प्रकार कसा आहे, याविषयींही थोडक्यांत माहिती दिली आहे. व त्यापासून कोणकोणते फायदे होतात, वगैरे सांगून हठयोगांतील फलश्रुति दिली आहे. पुढें ताप, कालरा, हगवण, आमांश वगैरे रोगांत या विधीचा अति उपयोग होतो असें सांगून, व बस्तिविधि हा नैसर्गिक आहे असें सिद्ध करण्याचा प्रयत्न करून, त्यांनीं या विधीसंबंधी इतिहास दिला आहे. डा. कुळकर्णी यांच्यामतें हे दोन्ही विधि अनादि आहेत; व हठयोग आणि आर्यवैद्यक यांवरील ग्रंथांत यासंबंधाचें सविस्तर वर्णन केलें आहे असें सांगून, बस्ति कसा घ्यावा या विषयाची सूक्ष्म माहिती दिली आहे. शेवटीं या विषयावर "Wilson's New Hygiene आणि FarmField and Fireside Chicago हे दोन ग्रंथ वाचण्याची शिफारस केली आहे. प्लेगच्या दिवसांत धौति व बस्ति केल्यापासून फायदा होईल असें आपलें मत सांगून, व पुढें " अर्वाचीन अपचारशास्त्रापैकीं ( उपचारशास्त्र तर नसेलना ? ) " स्नान व श्वासनिरोध " यांवर निराळा निबंध लौकरच प्रसिद्ध करण्याचें आश्वासन देऊन, दरम्यान थंड पाण्याचें स्नान, पांच पंचवीस नमस्कार, व कांहीं वेळतरी प्राणायाम केल्यास आयुर्वृद्धि होईल अशी शिफारस करून, त्यांनीं निबंध पुरा केला आहे.

एकंदर निबंध वाचला ह्मणजे, सकृद्दर्शनीं, वामनरावजींनीं तो फार घाईनें व निष्काळजीपणानें लिहिला असावा व त्यामुळेंच त्यांनीं भाषेकडे फार दुर्लक्ष केलें असावें असें वाटतें. काव्यनाटकादि ग्रंथ लिहितांना भाषेकडे जितकें बारीक लक्ष द्यावें लागतें, तितकें शास्त्रीय विषयावर ग्रंथ लिहित असतां देण्याची जरूरी नाहीं, असें जरी कदाचित् ह्मटलें, तरी सर्वथा दुर्लक्ष करून चालणार नाहीं; व वाटेल तशा ग्राम्य व कर्णकटु प्रयोगांची योजना केल्यास बिचाऱ्या भाषेच्या नैसर्गिक निर्मल स्वरूपास कलंक लावण्याचा दोष कधींही क्षम्य होणार नाहीं. असल्या प्रकारचे दोष या निबंधांत बऱ्याच ठिकाणीं आढळतात. जसें:– "पुढें अन्न ढकलिलेल्या क्रिया," "असले [illegible]

नाहीं." "जठरांतून घाण पदार्थ जाऊन." वास्तविक या ठिकाणीं "घाणेरडे" असा शब्द पाहिजे. तसेंच "स्थूलांत्र जर विशेष भरींव नसेल," या ठिकाणीं "भरलेलें" हाच शब्द पाहिजे. "भरींव" या शब्दाचा तेथें भलताच अर्थ होतो. असे आणखी कितीतरी प्रयोग सांपडतील ! अनुस्वारांची तर जिकडे तिकडे रेलचेल उडवून दिली आहे. कित्येक ठिकाणीं अर्थ दिल्याशिवाय पारिभाषिक इंग्रजी शब्दांचा उपयोग केला आहे. "काईल" "आल्कली" वगैरे शब्दांचा अर्थ इंद्रियविज्ञानशास्त्राची माहिती असल्याशिवाय कळण्याचा संभव नाहीं, हें डा. कुळकर्णी यांस माहित असलें पाहिजे. इंग्रजी पारिभाषिक शब्दांचें भाषांतर करितांना ज्या नवीन शब्दांची योजना केली आहे ते शब्द यथार्थ नाहींत. जसें:-(पान ७ प्यारा २) "Emulsion" या शब्दाला "एकीकरण" हा शब्द योजिला आहे. पण त्यापासून खरा अर्थबोध होत नाहीं. वास्तविक त्या ठिकाणीं "क्षीरीभवन" हा शब्द चांगला शोभता; कारण तूप, चरबी वगैरे पदार्थांचें जें रूपांतर होतें, तें दुधासारखें होतें. व दूध हें जात्याच चरबीचें रूपान्तर होऊन बनलेलें एक मिश्रण आहे. अशाच प्रकारचें रूपांतर अन्नांतील चरबींत होतें; ह्मणून या क्रियेस "क्षीरीभवन" हें नांव सार्थ होईल. परंतु त्याबद्दल आह्मी डा. कुळकर्णी यांस फारसा दोष देणार नाहीं; कारण शास्त्रीय विषयांवरील इंग्रजी ग्रंथांचें मराठींत भाषांतर करितांना, मराठींत पारिभाषिक शब्दांचा भरणा फारच कमी असल्यामुळें, ग्रंथकारांस पदोपदीं भारीच पंचाईत पडते, व मुळांतील शब्दांच्या अर्थास अनुसरून नवीन शब्द त्यांस तयार करावे लागतात; आणि नवीन शब्द तयार कसे करावे याविषयीं अझून कांहींच नियम ठरलेले नसल्यामुळें, निरनिराळे ग्रंथकार आपापल्या मनास वाटेल त्याप्रमाणें नवीन शब्द दडपून देत असतात; मग ते शब्द अन्वर्थक असोत अगर नसोत. यामुळें कित्येक शब्दांची फारच दुर्दशा होते, व केवळ मराठी वाचकांचा फारच गोंधळ उडतो. ही जी आमच्या भाषेची शोचनीय स्थिति आहे, ती लौकर सुधारण्याकडे प्रत्येक महाराष्ट्रभाषाभिमान्याचें लक्ष गेलें पाहिजे, व कांहीं तरी योग्य तोड काढून या महत्त्वाच्या प्रश्नाचा कायमचा निकाल लाविला पाहिजे. एक दोन ठिकाणीं रा. वामनरावजींनीं मध्येंच इंग्रजी शब्द व वाक्यच्यावाक्य घुसडलें आहे. १२ व्या पानावर "Well begun is half done" या इंग्रजी ह्मणीची योजना केली आहे. तसेंच १६ व्या पानावर "वैद्यवर्ग किंवा डाक्तरवर्ग अति Conservative आहेत" असें लिहिलें आहे. या विक्षिप्त वाक्यरचनेस काय ह्मणावें हें आह्मांस कळत नाहीं. या वाक्यांचा अर्थ निवळ मराठी जाणणाऱ्या वाचकांस कसा कळावा? त्या ठिकाणीं वामनरावजींना मराठी शब्द घालतां आले नाहींत, किंवा आयत्या वेळीं शब्द न सुचल्यामुळें हे असले गंगाजम्नी प्रयोग करणें त्यांना भाग पडलें, हें कांहींच समजत नाहीं. असो. यापुढें तरी असल्या प्रकारचे दोष रा. वामनरावजींकडून होऊं नयेत, अशी त्यांस सूचना देऊन आतां मुख्य मुद्यांकडे वळूं.

डा० कुळकर्णी यांस डा० हॉल यांचा अनुभव व त्यावरून त्यांनीं काढलेलीं अनुमानें संमत आहेत, व त्यांस अनुसरून सर्व रोगांत बस्तीचा उपयोग करावा अशी ते शिफारस

करितात. ही शिफारस करितांना त्यांनीं सारासार विचार केलेला दिसत नाहीं, किंवा त्यांस तसा विचार करण्यास फुरसत मिळाली नसावी. याचें कारण काय असावें बरें? आम्हांस तर असें वाटतें कीं, डॉ० हॉलप्रमाणेंच यांनाही मनुष्य प्राण्यांना रोगांपासून होणारे हाल पाहवेनात, म्हणून रोग आणि वैद्य या दोघांच्याही तडाख्यांतून मनुष्यप्राण्याची एकदम सुटका करावी या हेतूनें, मोठ्या दयार्द्र अंतःकरणानें, डा. हॉलच्या कृपेनें आपणास मिळालेली जी ही अखंडानंद देणारी नवीन बुट्टी, ती आपल्या देशबांधवांस देण्याचा त्यांनीं निश्चय केला, व तो मागेंपुढें न पाहतां लगेच अमलांतही आणला. हें त्यांनीं आपलें कर्तव्यकर्म केलें; पण आमच्या कर्मांत, त्या बुट्टीचा उपयोग करण्यापूर्वी, तिला कसास लावून परीक्षण करण्याचें आलें आहे.

प्रथम डा० वामनरावजी हे रोगांच्या कारणांसंबंधानें काय म्हणतात तें पाहूं:—पान ३, ओळ ९, या ठिकाणीं ते लिहितात कीं, "प्राणिमात्रास जे कांहीं रोग होतात ते सर्व एक-मूल ( एकहेतुमूलक ) आहेत, असें जें मत आहे तें खोटें ठरविणेचें धाडस कोणी करूं शकणार नाहीं. " शाबास ! पण आणखी पुढें काय म्हणतात तें पहाः( पान १९, ओळ १६) " १०० रोगांपैकीं ९९ रोगांचें बीज अवष्टंभांत असतें म्हटलें तरी चालेल. !" बिचाऱ्या वामनरावजींस थोडासा संशय उत्पन्न झाल्यामुळें, दहा पंधरा पानें लिहिलीं नाहींत तोंच भीत भीत शेंकडा पांच टक्के कापून देण्याची त्यांना पाळी आली ! पण हें मत तरी कोठें ठाम आहे? कदाचित् त्यांत कांहीं चूक असेल तर, " असें म्हटलें तरी चालेल " म्हणून ते उडवाउडवीच करितात. इतकेंही करून हा धरसोडीचा प्रकार कोठें आटोपला आहे? (पान ३ ओळ ११) येथें ते काय म्हणतात पहा–" सर्व रोग हे शरीरांत बाहेरचे जंतू गेल्याशिवाय उत्पन्न होऊं शकत नाहींत, आणि हे जंतू अन्नपचनक्रियेंत कांहीं बिघड झाल्याशिवाय शरीरांत उत्पन्न होत नाहींत. " पण ( पान १० ओळ १८ येथें ) " बालपणापासून ते वृद्धपणापर्यंत जे कांहीं रोग होतात ते सर्व या स्थूलांत्रांत मलसंचय व जंतुसंचय झाल्यामुळें होणार(!) असें कांहीं लोक सिद्ध करण्याचा प्रयत्न करीत आहेत. " आणि परत ११ व्या पृष्ठावर "असो, साधारण सर्व विकारांचें मूल **कोठेंतरी** अपचनक्रिया हें होय, " असेंही म्हणतात! या लिहिण्यास ताळ ना तंत ! आमच्या मतें, " सर्व रोग एक–मूल आहेत " हें विधान करण्याचें धाडस वामनरावजींनींच केलें आहे व तें खरें आहे हें सिद्ध करण्याचा बोजा त्यांचेवर पडतो. हें मत खोटें आहे असें सिद्ध करण्यास धाडसाची जरूरीच नाहीं. आर्यवैद्यक किंवा आंग्लवैद्यक यांवरील कोणतेही रोगनिदानसंबंधाचे ग्रंथ नुसते वर वर चाळून पाहिले तरी रा. वामनरावजींचीं विधानें खोटीं आहेत, हें तेव्हांच लक्षांत येण्यासारखें आहे. आर्यवैद्यकांत तर सर्व रोगांचें कारण **कफ, वात, पित्त** यांच्या त्रिपुटींत आणून सोडलें आहे. परंतु आंग्लवैद्यकानें या त्रिपुटीस धुडकावून देऊन निरनिराळ्या रोगांचीं कारणें निरनिराळीं आहेत, असें प्रतिपादन केलें आहे. पण कोठेंहीं केवळ "अवष्टंभ" हा सर्व रोगांचें मूल किंवा मुख्य कारण आहे असें प्रतिपादन केलेलें नाहीं, हें वामनरावजींस ठाऊक असलेंच पाहिजे. असें असतां त्यांनीं हें असलें खुळें

व विक्षिप्त मत प्रसिद्ध करण्याचें धाडस केलें आहे! व तसें करण्याकरितां, मेडिकल कॉलेजांत पांच वर्षें अभ्यास करून संपादन केलेल्या ज्ञानास पहिल्यानें त्यांनीं सोडचिटी दिली असावी, असें आह्मांस कष्टानें ह्मणावें लागतें.

त्यांनीं पाहिलें कीं आंग्लवैद्यकांतील रोगनिदानाची मोठी खटपट व आर्यवैद्यकांतील त्रिदोषांची लटपट पाहिजे कशाला? ह्या ह्या सर्वांस धुडकावून, आणि आणा सर्व रोग संपुष्टांत! एकदां सर्व रोगांचें एक कारण आहे असें ठरलें ह्मणजे मग चिकित्साही करण्यास फार सोपें! शें पांचशें औषधांची नांवें, त्यांचीं प्रमाणें व अनुपानें वगैरे ध्यानांत ठेवण्याचा त्रास करावा कोणी? ह्मणून त्यांनीं ही चांगली शक्कल काढली, व आयुर्वेदमंदिरांत प्रवेश होण्यास मार्गांत ज्या ह्या अनेक अडचणी होत्या त्या साऱ्या हाणून पाडून आपल्या मतें एक सरळ राजरस्ता केला. पण उपयोग काय? बिचाऱ्या मेडिकल कॉलेजांतील विद्यार्थ्यांच्या कपाळांतील कटकट अझून सुटत नाहीं व पुढें सुटण्याची आशा सुद्धां दिसत नाहीं.

वर जे तीन चार उतारे दिले आहेत त्यांवरून तीन सिद्धांत निष्पन्न होतात. ते येणेप्रमाणें:--
(१) सर्व रोगांचें-निदान शेंकडा ९९ रोगांचें-मूळ एक आहे. (२) सर्व रोग जंतूंपासून उत्पन्न होतात. (३) हे जंतु शरीरांत शिरण्यास अपचनक्रिया--मग ती कोठेंतरी होवो--हें कारण होय. यावर आह्मी रा. वामनरावजींस पुढील प्रश्न विचारतों.

(१) सर्व रोग जर एकमूल आहेत तर तें मूळ कोणतें? जंतु किंवा अपचनक्रिया? दोन्ही असल्यास या दोहोंतून प्रधान कोणतें व गौण कोणतें? तसेंच जंतु व अपचनक्रिया हीं दोन्ही मिळून एकच आहेत किंवा निरनिराळीं आहेत? निरनिराळीं असल्यास त्यांस एकमूल कसें ह्मणावें?

(२) सर्व रोग जंतुजन्य आहेत या सिद्धांतास आधार काय? डोळ्यांतील मोतीबिंदू, अर्श, दुष्टव्रण, किंवा दुष्टग्रंथी (Cancer), मधुमेह, निरनिराळ्या जातींचे अर्बुद किंवा गुल्म रोग यांत जंतु असतात काय? असल्यास त्यांचें स्वरूप काय?

(३) देवी, गोंवर, आदि करून वैस्फोटिक ज्वर, तसेंच सूतिकाज्वर, धनुर्वात, उपदंश, रक्तकुष्ठ या रोगांस अपचनक्रिया हें कारण किंवा मूळ आहे कीं काय?

या तीन प्रश्नांचा डा. कुळकर्णी यांनीं साधार उलगडा केल्याशिवाय त्यांचे सिद्धांत आह्मांस बिलकुल कबूल करितां येणार नाहींत. आमचें स्वतःचें मत असें आहे कीं, सर्वच रोग जंतुजन्य नाहींत व सर्वच रोग अपचनक्रियेमुळें उत्पन्न होत नाहींत. दुसऱ्या प्रश्नाच्या सदराखालीं दिलेल्या रोगांत आजपर्यंत कसलेच जंतु सांपडलेले नाहींत. निरनिराळ्या जंतुजन्य रोगांचीं कारणें निरनिराळीं आहेत; व निरनिराळ्या रोगजनक जंतूंचें स्वरूप व जीवनप्रकार हीं इतकीं भिन्न आहेत व त्यांपासून शरीरावर होणारे परिणामही इतके भिन्न आहेत कीं, त्या सर्वांवर एकच चिकित्सा कधींही लागू पडणार नाहीं. सर्वच जंतु एक सारख्या स्थितींत शरीरांत कधींही उत्पन्न होत नाहींत. एका स्थितींत जर एका रोगाचे जंतु उत्पन्न होऊन वाढले तर त्याच स्थितींत दुसऱ्या रोगाचे जंतु वाढतील असें नाहीं. बहुधा एका जातीच्या जंतूंच्या वृद्धीस जी स्थिति अनुकूल आहे तीच स्थिति दुस-

ऱ्या जातींच्या जंतूंस प्रतिकूल किंवा मारकही होते, ही गोष्ट डा० कुळकर्णी यांस माहित असेलच. शिवाय सर्वच जंतु मुखावाटे शरीरांत जात नाहींत; त्यांचा शरीरांत प्रवेश होण्याचे प्रकारही भिन्न भिन्न आहेत. यासंबंधानें विस्तारभयास्तव आह्मांस जास्ती लिहितां येत नाहीं. ह्मणून रोगजंतुविज्ञानशास्त्रा ( Bacteriology ) वरील ग्रंथ वाचण्याची रा० वामनरावजींस शिफारस करतों, ह्मणजे आमचें मत खरें किंवा खोटें आहे तें समजेल.

आतां वामनरावजी सर्व लोकांस असा सल्ला देतात कीं, कोणत्याही रोगांत प्रथम बस्तीचा उपयोग करावा, व नंतर डाक्टर किंवा वैद्य यास बोलवावें. पण इतकेंच सांगून ते उगी राहत नाहींत, तर अमेरिकन ग्रंथकाराप्रमाणें तेही उदार अंतःकरणानें काय उपदेश करितात पहा. ( पान २० ):-- " जर डाक्टर बस्ति नको ह्मणत असतील तर त्यांस परत बोलावूं नये..... ........जुलाब (!) वगैरे औषधें देऊन जठराची रसायनशाला करणाऱ्या डाक्टरांस रजा द्यावी." केवढा हा त्यांचा निःपक्षपातीपणा ! डाक्टर हे आपले व्यवसायबंधु, तरी त्यांच्यावर सुद्धां सणसणीत कोरडा ओढण्यास त्यांनीं मागें पुढें पाहिलें नाहीं ! बरें, इतक्यावरच आटोपलें का? नाहीं. त्यांची उत्कंठा इतकी वाढली आहे कीं, " असा दिवस येईल तो सुदिन- " असें समजण्यास ते तयार आहेत. परंतु याचें "कारण मात्र वेगळें आहे." तें काय, तें ऐका! तें हें कीं— " ज्या वेळेस या विषयासंबंधानें असें लोकमत होईल, त्या वेळेस इतर बाबींत ह्मणजे सामाजिक व राजकीय बाबींतही लोकमत असेंच जय पावेल यांत कांहीं शंका नाहीं. " कां? केवढी अगाध तर्कशक्ति! काय हें दांडगें भविष्य !! रा. वामनरावजींनीं आपल्या अचाट कल्पनाशक्तीच्या जोरावर कशी खाशी युक्ति काढली पहा ! त्यांच्या मतें आमच्या देशाचा उत्कर्ष व सुधारणा हीं केवळ बस्तिविधीवर अवलंबून आहेत. या संबंधानें एकदां लोकमत जागृत करा, ह्मणजे सगळें बस्तान जुळलेंच ह्मणून समजा ! मग देशबांधवहो, विनाकारण उशीर कां करितां? न्याशनल कांग्रेस, सामाजिक परिषद् (सोशल कान्फरन्स) वगैरे भगीरथ प्रयत्न करण्याच्या भरीस कां पडतां ? करा एकदां या अजब युक्तीचा उपयोग ! वरून धौति, व खालून बस्ति यांचा लावा रोज सपाटा ! ह्मणजे मग काय ? तुमचें व तुमच्या देशाचें नष्टश्वर्य संपलेंच असें समजा ! तुमचा अस्तास गेलेला वैभवसूर्य पुनः लौकरच उदय पावेल बरें !

पण आमचें दुर्दैव हात धुवून इतकें आमच्या पाठीस लागलें आहे कीं, रा. वामनरावजींचा उपदेश आमच्या लोकांस रुचेलसा वाटत नाहीं; मग हा सोन्याचा दिवस तरी उगवणार कसा? असें आहे तरी त्यांच्या उपदेशाकडे अगदींच दुर्लक्ष करूं नये, व त्यापासून आपला बराच फायदा होण्यासारखा आहे, हेंही आह्मी मोठ्या आनंदानें सांगतों. बस्तीचा उपयोग सर्व रोगांत जरी होणार नाहीं, तरी त्यापासून कधींहीं नुकसान होणार नाहीं हें आह्मीं खात्रीनें सांगतों; व जेव्हां जेव्हां मलावष्टंभ होतो तेव्हां तेव्हां रेचक किंवा सारक औषधें घेण्यापेक्षां बस्ति घेऊन कोठा साफ करणें हेंच विशेष हितकर. तसेंच, जठरविकार, आम्लपित्त, अग्निमांद्य, पोटशूळ, मूळव्याधी वगैरे विकारांत रेचक घेण्यापेक्षां बस्तिच घ्यावा. तसेंच कोणत्याही जातीच्या तापांत व मुख्यत्वें करून संततज्वरांत ग्लानि आली असतां, मलावरोध-

नाशाकरितां बस्ति दिल्यास शौचास साफ हो-ऊन ग्लानि बिलकुल वाढत नाहीं. याप्रमाणें बस्तीचा फार उपयोग होतो. पण तो देण्याचा हेतु इतकाच कीं, कोठयांत मलसंचय झाला असेल, किंवा वायूनें पोट फुगलें असेल, तर तो कोठा मोकळा करावा; यापलीकडे कांहीं नाहीं. केवळ बस्तीनें रोग बरे होतील असा जर समज असेल, तर तो चुकीचा आहे असें आह्मी ह्मणतों. इतकेंच नव्हे तर, दरएक रोगांत बस्तीचा उपयोग करावा ही डा. कुळकर्णी यांची शिफारस ऐकून, सर्व रोग्यांस भला भक्कम सोनामुखीचा जुलाब देणाऱ्या एका अडाणी वैद्याच्या नकलेची आह्मांस आठवण होते व हांसूं येतें.

प्लेगवर बस्तीचा उपयोग कितपत होईल याविषयीं खुद्द वामनरावजींसच शंका आहे. पण डा. बहादुरजी व डा. चोकशी हे आपल्या दवाखान्यांत ( इस्पितळांत ? ) याचा फार उपयोग करीत असत असें ते शेवटल्या पानावर ह्मणतात; परंतु चौकशीअंतीं आह्मांस असें समजतें कीं, प्लेगवर रामबाण उपाय ह्मणून त्यांनीं बस्तीचा कधींच उपयोग केलेला नाहीं; फक्त मलावरोध झाला ह्मणजे तितक्यापुरताच बस्ति देत असत. बस्तीपासून प्लेगवर कांहीं विशेष परिणाम होतील या हेतूनें अझूनपर्यंत कोठेंही प्रयोग केल्याचें आमच्या ऐकिवांत नाहीं. पान १८, प्यारा २, येथें डा. बहादुरजी आपल्या शिष्यवर्गास वामनरावजी ह्मणतात त्याप्रमाणेंच उपदेश करीत असत, वगैरे मजकूर लिहिला आहे. परंतु त्यासंबंधानें त्यांचा बराच गैरसमज झालेला असावा असें आह्मांस वाटतें. शिवाय, त्यावरून सर्व रोगांत बस्ति करावा व तो रोगप्रतिबंधक आहे, किंवा सर्व रोग एकमूल आहेत, असें डा. बहादुरजींचें मत होतें, असें बिलकुल सिद्ध होत नाहीं. डा. बहादुरजी आपल्या रोग्यांची कशी चिकित्सा करीत हें प्रत्यक्ष आह्मांस ठाऊक आहे. ते उठल्यासुटल्या कधींही बस्ति देत नसत, व कफक्षयादि विकार केवळ बस्तीनें बरे होतात, असें ते कधींही ह्मणत नसत, हें आह्मी खात्रीनें सांगतों. बाकी, बस्तीचा उपयोग करूं नये असें तेही ह्मणत नसत, व आह्मींही ह्मणत नाहीं.

आतां बस्ति कसा करावा याविषयीं वामनरावजींनीं फारच चांगली माहिती दिली आहे. शिवाय धौति कसा करावा याविषयींची माहितीही चांगली आहे. पण १२ व्या पानावर, हठयोगी लोकांच्या धौतिसंबंधाच्या मजकुरांत "वासोधौति," "दंडधौति," "रंभादंड" वगैरे काय गडगुड आहे तें आह्मांस समजत नाहीं. वामनरावजींनीं अमळ जास्त माहिती दिली असती, तर एवढा गोंधळ उडाला नसता. बस्तिविधीच्या नव्या व जुन्या प्रकाराविषयींची माहिती सांगतांना, वामनरावजी ( पान १८-१९ ) ह्मणतात कीं, "योगी लोकांचा मार्ग सांगण्याची मला ताकत नाही; पण तो अतिउत्तम. यंत्राशिवाय, कोणाच्या मदतीशिवाय, भांड्याशिवाय, हा करण्याचा मार्ग. ........ पाण्यांत नाभिपर्यंत बसून हत्तीच्या सोंडेप्रमाणें वर पाणी ओढून घेणें, व बाहेर येऊन मळ व पाणी बाहेर टाकणें." पण पुढें ( पान २० ) 'पश्चांक्षेपन(?)' या सदराखालीं ते काय ह्मणतात तें पहा: "पाण्यांत बसल्यास बाहेरच्या दाबानें पाणी आंत जाईल इतका सोपा मार्ग आंतड्याचा नाहीं." या दोन परस्परविरोधी मतांचा मेळ कसा बसवावा हें आह्मांस समजत नाहीं. परंतु वामनरावजींनीं मात्र त्यास एक उत्तम शक्कल काढली, व तंट्याचें बीजच मोडून टाकलें. ते पुढें ह्मणतात

( २०-२१ ) कीं, "पण त्या वादांत न शिरतां, हठयोगांतील मार्ग हल्लींच्या मार्गांपेक्षां चांगले असें मी प्रांजलपणें वर कबूल केलें आहे." वाहवा! हा चांगला प्रांजलपणाचा मासला!! योगी लोकांचा मार्ग ठाऊक नाहीं असें आपणच कबूल करितात, आणि त्याच तोंडानें तो चांगला आहे असेंही कबूल करितात! ज्या विषयाची आपणास माहिती नाहीं त्या संबंधाचें आपलें अज्ञान कबूल करणें व त्याच्या गुणदोषांसंबंधानें कांहींच विधानें न करितां तटस्थ राहणें यांत प्रांजलपणा आहे, किंवा, माहीत नसलेल्या विषयावरही आपल्या मनास वाटेल तसें विधान करणें यांत प्रांजलपणा आहे बरें? आमच्या मतें तटस्थ वृत्तींतच प्रांजलपणा आहे.

हठयोगांतील मार्ग व त्याच्या फलश्रुति खऱ्या असोत किंवा खोट्या असोत, तो आमचा विषय नाहीं. ह्मणून आह्मांस अनुभवशीर माहिती मिळेपर्यंत आह्मीं कधींही आपलें मत देण्याचें धाडस केलें नसतें. तसेंच हठयोगांत अमुक एक क्रिया सांगितली आहे व तिचें फळ अमुक आहे—मग तें संभवनीय असो अगर नसो—तें आपलें 'बाबावाक्यं प्रमाणं' ह्मणून खरें मानावयाचें, इतकी आमच्या मनाची तयारी नाहीं, हेंही आह्मीं प्रांजलपणें कबूल करितों.

आतां बस्तिविधीसंबंधाचा इतिहास रा० वामनरावजींनीं जागोजागीं थोडक्यांत चांगला सांगितला आहे, व त्यावरून हा विधि अनादिकालापासून आमच्या देशांत माहित आहे असें सिद्ध केलें आहे. त्या संबंधानें जास्त माहिती त्यांस देतां आली असती, परंतु विस्तारभयास्तव त्यांस तसें करतां आलें नसावें. एकंदरींत दिलेली माहिती चांगली आहे.

येथपर्यंत आह्मांस या निबंधांतील ठळक ठळक मुद्यांसंबंधानें जें कांहीं सांगावयाचें तें सांगितलें; त्यावरून वामनरावजींचा व आमचा बऱ्याच गोष्टींत मतभेद आहे, असें सहज दृष्टोत्पत्तीस येईल. तथापि हा निबंध फार उपयोगी आहे, व साधारण सोप्या व सरळ भाषेंत लिहिला आहे त्यामुळें सर्वांस सहज समजण्यासारखा आहे. यांतील बऱ्याच गोष्टी प्रत्येकानें ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत, ह्मणून हा प्रत्येकानें वाचून याचा विचार करावा, अशी आह्मी आमच्या वाचकांस शिफारस करितों. अभिप्राय देतांना गुण व दोष या दोहोंचाही विचार करावा लागतो, त्याप्रमाणें आह्मीं यांतील गुण दोष दोन्ही दाखविले आहेत. ज्या मुद्यांसंबंधानें आमचा मतभेद आहे, त्याविषयींचें विवेचन कदाचित् डा. कुळकर्णी यांस रूचणार नाहीं, पण त्यास आमचा निरुपाय आहे. एकंदरींत रा० वामनरावजींचा हा प्रथम प्रयत्न आहे हें लक्षांत ठेवलें ह्मणजे, त्यांतील दोषांपेक्षां गुणांकडेसच लक्ष दिलें पाहिजे असें वाचकांच्या ध्यानांत येईल. शिवाय निरपेक्ष बुद्धीनें लोकसेवा करण्याचा त्यांनीं जो हा मार्ग पत्करिला आहे तो खरोखर प्रशंसनीय आहे, व त्याबद्दल ते स्तुतीस पात्र आहेत. पुढें त्यांनीं हा आपला उद्योग असाच चालू ठेवावा, अशी त्यांस प्रेमपूर्वक सूचना करून त्यांचा आतां निरोप घेतों.



## अंबु—कण.

[ **विषय**—आकाशांतून पावसाचा एक बिंदु समुद्रांत पडत असतां त्याचे मनाची स्थिति; तो मोत्याचे शिंपलींत पडतो; मोतीं होऊन सार्वभौम राजाचे मस्तकावर बसतो. ]

हा हा ! जातों लयाला—क्षणहि न उरतों—
प्राण आले उराशीं;
आतां ग्राशील मातें अपरिमित महा—
भूत हा अंबुराशी;
ज्याणें पृथ्वीस साऱ्या जखडुनि वळसा
घातला कंकणाचा,
ऐशाशीं पाड कैंचा अति परिमितशा
अंबुच्या या कणाचा ? १

जेथें कोट्यानुकोटी गडपचि सरिता
प्रांवृषामाजि[1] होती,
तेथें क्षुद्रोत्तमाची मम तनु—महती
बोलिजे काय हो ती !
जो कां अत्यल्प देखा जलचर करितो
स्वल्प फूत्कार, तेणें
झालेल्याही कणाशीं करिल मम वपू
साम्य कीं काय नेणें. २

ज्या या विक्राळ पोटीं अगणित दडल्या
पर्वतप्राय नौका,
त्यांमाजी मृत्यु—भीतिं—स्तिमित[2] मुखिं उठे
घर्म—बिंदू विलोका !
तोही स्पर्धेंत माझ्या जय मिळविलची—
येवढ्या सूक्ष्म देहा
त्राता विश्वेश्वरा तूं ! तुजविण दुसरा
आसरा नाहिं हा हा ! ३

आहे आकाश—गेहीं मम जनन; पुन्हा
शुद्ध मेघोदरांत;
मोठ्या दात्यांत दाता जनक; किति तरी
प्राण त्याचे करांत !
म्यां त्याच्या लेंकरानें अनु—कृति अणुही
नाचरीतां विशेष
जावें, हें दुःख मोठें! मृत खचितचि तो—
जो नुरे नामशेष ! ४

ऐशा विचारीं असुनी निमग्न
आला लयाच्या समया सुलग्न;
तों स्वाति—बिंदु—ग्रहणार्थ होती
आशावती उन्मुख[1] येक शुक्ती[2]. ५

दिला तिणें हात तया कणातें
मातेपरी कल्पुनि आपणातें;
चुंबोनि त्या पोटिं धरी सु—भीता[3]
मुक्ताफळांची बहुसाळ माता. ६

असा पुनर्जन्म बघोनि, वास
करी तिथें गात जगन्निवास—
महा—मती थोर कृतज्ञ थेंब
उत्तीर्ण व्हाया तदुरावलंब. ७

स्वच्छोदरीं स्वच्छ शुभांग बाळ
दिनोदिनीं वाढत तो सुढाळ;
धरोनि मुक्ताकृति दिव्यरूप
व्हाया जणों आत्म—कुल—प्रदीप. ८

ते माउली पोषिहि त्यास मोदें,
चंद्रप्रभा पोषि जशीं कमोदें;+
तों पूर्ण वाढीप्रति पावतांची
काया दुभंगी जननी स्वतांची. ९

---

१ पावसाळ्यांत.
२ मरणाच्या भीतीनें जड झालेलें.

१ वर तोंड केलेली अशी. २ शिंपली.
३ फार भ्यालेल्याला. + एक फार लहान पण फार सुवासिक कमळाची जात.

कीं पुत्ररत्नासि न होउ बाधा
मात्रर्थ तो घेइ उरासि रंध्रा;
कृपाळु माता, मुलगा कृतज्ञ–
परस्परां आळवितात तज्ञ. १०
सुवर्ण संध्यासमयांत शुक्र–
कीं पाळ[1]र्णी गोंडस बालवक्त्र–
कीं पुष्पपर्णावृत मोगरीचें–
खुले तसें शिंपित तेंहि साचें. ११

पुढें महा दक्ष परीक्षकांनीं
सुवृत्ति त्याची परिसून कानीं,
त्या सर्वभौम प्रभुच्या गृहातें
नेलें करोनी बहु आग्रहातें. १२
विशाळ, तेजाळ, सुरंग, गोल–
त्या मौक्तिकाचें न कळेच मोल:
गुणाढ्य तें; तो गुणलुब्ध भूप;–
तदर्थ वेंची कनका अमूप. १३
असे गुणा मोल, न तें जडाला;
असे जरी संग तयां जडो[2]ला–
गुणत्व जातें परि तें गुणाचें
रत्नासि गांठी पडतांचि साचें. १४
गुणें सुवर्णेंच इथें स्वतांला
या मौक्तिकाच्या महदाश्रयाला
केलें. चढे तो मुकुटाग्र–भागीं!
सत्संग पैं उद्धरितो अभागी. १५

हा सूक्ष्मवारि–लव गा परमाणु, पूर्वीं
पाळी समुद्र–वलयांकित जो मेहोर्वी[3]
त्याचे बसे शिरिं सुपूज्य, कृतार्थ, सार्थ!
नाहींच–जें न करि ईशकृपा समर्थ. १६
ती माय–शिंप तशि रत्नकरंड[4] साची
अंत:पुरांत बनली परमावधीची;
त्यां जाहलें उभयतां सुख मायलेंकां;
आली फळा सुकृति दोन्हिहि पक्षि देखा! १७
हा कोण, कोठिल, कुठें पडला, कसा हो?–
त्याला कशास्तव, कधीं, अनुपम्य लाहो?–
ही कोण, काय करि, कां फळ येत तीस?–
कर्तव्य केंवि वरिलें तिहिं सद्गतीस? १८

या गोष्टीचें जें गमे ज्यास तत्व,
तें तें तो तो स्वीकरो अप्रमत्त–
ऐसी आहे प्रार्थना श्रोतृवृंदा.
घेतो मुंगीपासुनी प्राज्ञ बोधा. १९

[ लि. आ. वि. ]

## पुरुषसूक्त.

पुरुषसूक्त ब्राह्मणानें नेहमीं ह्मणावें. शरीर-शुद्धीसाठीं न्यास करावयाचा असतां, तसेंच ईश्वरपूजा वगैरे करावयाची असतांना, पुरुषसूक्त ह्मणावें. हा जो परिपाठ आज अव्याहत[1] चालत आला आहे व पुरुषासूक्ताचें इतकें जें माहात्म्य मानलेलें आहे तें कां? याचा उलगडा करण्यासाठीं पुरुषसूक्ताचा अर्थ पाहिला पाहिजे. अर्थ समजला ह्मणजे अर्थां-तच पुरुषसूक्त कोणत्या देवतेची स्तुति कर-ण्यास सांगतें आहे हें समजेल, व त्यावरून पुरुषसूक्ताचें महत्त्व साहजिकच लक्षांत येईल.

पुरुषसूक्त जर सूक्ष्मदृष्टीनें[2] पाहिलें तर त्या-मध्यें दोन देवता सांगितल्या आहेत, असें आढळून येईल. ( १ ) विराट्पुरुष, व ( २ ) पुरुष. "विराट्पुरुष" कोणता व "पुरुष" कोणता हें पुरुषसूक्तामध्येंच स्पष्टीकरणानें उघ-

१ पाळण्यांत. २ जडलेला. ३ मह+उर्वी=पृथ्वी. ४ करंडा, डबा.

१ लाभ. २ लक्षपूर्वक.

ड करून सांगितलें आहे. " विराट्पुरुष " या शब्दावर श्रीमच्छांकराचार्यांनीं भाष्य करतांना " विविधानि राजन्ते वस्तूनि अत्र इति " असा विग्रह केला आहे. त्यावरून " विराट् " शब्दाचा अर्थ " ज्यामध्यें अनेक वस्तु प्रकाशित होत आहेत तो विराट् " असा सहज दिसतो. त्याचप्रमाणें पुरुषसूक्तामध्येंही विराट्पुरुषाचें वर्णन असें केलें आहे:—

**चंद्रमा मनसो जातः चक्षोः सूर्यो ऽजायत॥मुखादिन्द्रश्चाग्निश्च प्राणाद्वायुरजायत ॥ १३ ॥ नाभ्या आसीदंतरिक्षं शीर्ष्णोः द्यौः समवर्तत ॥ पद्भ्यां भूमिर्दिशः श्रोत्रात्तथा लोकाँ अकल्पयन् ॥ १४ ॥**

अर्थ—या विराट्पुरुषाचें चंद्रमा हें मन; सूर्य हे डोळे; इंद्र व अग्नी हें तोंड; वारा हा प्राण; अंतरिक्ष ही बेंबी; आकाश हें डोकें; पृथ्वी हे पाय; दिशा हे कान; तसेंच इतर तारागण हे त्याचे इतर अवयव आहेत, असें समजावें.

या पुरुषसूक्तांतील विराट्पुरुषाच्या देहाच्या वर्णनावरून " विराट् " शब्द हा " विश्व " शब्दाचाच पर्याय आहे असें ह्मणावें लागतें. जसा " विराट् " या शब्दानें " सूर्य, चंद्र व नक्षत्रें " वगैरेचा बोध होतो तसाच " विश्व " शब्दानेंही होतो. तात्पर्य " विराट्पुरुष " या शब्दावरून " सर्व दृश्य व अदृश्य जग " घ्यावयाचें. यामध्यें मतभेद असण्याचें कारण नाहीं. विराट् पुरुषामध्यें जसा सर्व जड वस्तूंचा समावेश होतो, तसाच चैतन्याचाही समावेश होतो. ' मनुष्य " शब्द उच्चारल्याबरोबर शरीर व जीव या दोहोंचाही बोध होतो तसाच " विराट् " शब्दावरून दोहोंचाही—जड व चैतन्य—यांचा समावेश होतो. तात्पर्य, जो कोणी सृष्टिनियन्ता सर्वव्यापी परमेश्वर आहे तोच हा पुरुषसूक्तांतील " विराट् " होय. हा " जडसृष्टि " रूपानें साकार आहे, व " चैतन्य=जीवसृष्टि " रूपानें निराकार आहे. असो, याप्रमाणें पुरुषसूक्तामधील एका उपास्य देवतेचें वर्णन झालें.

आतां दुसऱ्या " पुरुष " या देवतेचा संबंध पहावयाचा. " पुरुष " देवतेची खरी कल्पना मनांत आणून देणाऱ्या दोन ऋचा पुरुषसूक्तामध्यें आहेत त्या अशा:—

**सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ॥ सभूमिं विश्वतो वृत्वा अत्यतिष्ठद्दशांगुलम् ॥१॥ ब्राह्मणो ऽस्य मुखमासीद्बाहूराजन्यः कृतः॥ ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत ॥ १२ ॥**

अर्थ—( श्रीमच्छंकराचार्यांनीं " सहस्र " शब्दावर भाष्य करतांना हा शब्द उपलक्षणार्थक आहे असें सांगून " सहस्र " शब्दानें " हजारों, लाखों किंवा कोटयावधी " असा अर्थ करावयाचा असें सांगितलें आहे. त्यावरून पुढील अर्थ केला आहे )—या पुरुषाला हजारों डोकीं आहेत, हजारों डोळे आहेत, हजारों पाय आहेत. हा या पृथ्वीवर चहूंकडे व्यापून आणखी उरला आहे. ॥ १ ॥ या पुरुषाचें ब्राह्मण हे तोंड, क्षत्रिय हे याचे बाहु, वैश्य हे याच्या जांघा, व शूद्र हे याचे पाय आहेत. ॥ १२ ॥

श्रीमच्छंकराचार्यांनीं "पुरुष" शब्दावर भाष्य करतेवेळीं " . सर्वप्राणिसमष्टीरूप यः पुरुषः सः अयं सहस्रशीर्षा " असें ह्मटलें आहे

याचा अर्थ-सर्व प्राण्यांचा समुदाय मिळून जें एक रूप होतें, तोच हा पुरुष व त्यालाच हजारों डोकीं आहेत-असा होतो. सर्व प्राण्यांचा समुदाय मिळून गांव-शहर-प्रांत-देश-राष्ट्र-राष्ट्रसमुदाय होतात. तेव्हां पुरुष या शब्दावरून देश किंवा राष्ट्र असा बोध घ्यावयाचा. पशु, पक्षी, मनुष्य व इतर बारिकसारिक जीवजंतु मिळून "सर्वप्राणिसमष्टि-रूप" अर्थात् पुरुषसूक्तांतील "पुरुष," व त्याचाच अर्थ "समाज, देश किंवा राष्ट्र" होय.

यावरून पाहतां पुरुषसूक्तामध्यें जी उपास्य देवता प्रथमतः सांगितलेली आहे ती "**पुरुष=राष्ट्र**" होय व नंतर त्याहून मोठी देवता ती "**विराट्=विश्व.**" विश्वाची उपासना मानसिक करावयाची हें उघडच आहे. पण राष्ट्राची उपासना मात्र शरीर व मन या दोनही साधनांचा पूर्ण उपयोग करून करावयाची. ज्या देशामध्यें शारीरिक व मानसिक उद्योग योग्य दिशेनें चालले आहेत ते देश पुढें आहेत व जे देश आपलें शारीरिक व मानसिक कर्तव्य विसरत चालले आहेत ते मागसलेले आहेत; हें आपणास अगदीं स्पष्ट दिसतें आहे.

या "राष्ट्र पुरुषाचे" चार अवयव आहेत, असें वरील १२ व्या ऋचेंत सांगितलेलें आहे. जशी मनुष्याच्या शरीराला तोंड, बाहु, जांघा व पाय हे चार अवश्य पाहिजेत, त्यांच्याशिवाय चालावयाचेंच नाहीं, तसेंच राष्ट्राचें आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे या "राष्ट्र पुरुषाचे" चार अवयव आहेत. जसें मनुष्याच्या एका अवयवाला गळूं झालें किंवा एखादा अवयव तुटून पडला तर सर्व अव्यवस्था होते, व जसा प्रत्येक उद्योगामध्यें अडथळा येतो, तसेंच या चार वर्णांपैकीं एका वर्णाचा नाश झाला किंवा एका वर्णानें आपला धंदा सोडला तर राष्ट्राचें होतें. मग जर या राष्ट्रपुरुषाचें सर्वांग छिन्नभिन्न झालेलें असलें किंवा सर्व अवयव आळशी बनलेले असले तर काय अवस्था होईल हें निराळें सांगणें नकोच. तात्पर्य, सर्व अवयव चांगले शाबूत व मजबूत असतां मनुष्य जसा कोणताही उद्योग करून आपला नांवलौकिक किंवा लोकांवर उपकार करण्यास समर्थ असतो, हात पाय मोडले असतां त्याच्याकडून जसें कांहींच होत नाहीं; तसें चातुर्वर्ण्यानें एकजुटीनें आपआपले उद्योगधंदे संभाळून राष्ट्राची सेवा केली असतां राष्ट्र पुढें सरसावतें.

चातुर्वर्ण्य कोणतें, व ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य-शूद्र कोणाला म्हणावयाचें, याचा खुलासा श्रीमद्भगवद्गीतेमध्यें श्रीकृष्णानें उत्तम रीतीनें केलेला आहे. त्याचा आशय असाः-(१) **ब्राह्मणः**-ज्याणें पुष्कळ विद्या मिळवून त्यावर विचार केला आहे. देशकालवर्तमानाचा विचार करून सध्यां काय केलें पाहिजे हें ज्याला उत्तम रीतीनें कळतें, जो चांगली सल्लामसलत लोकांना देतो, असा जो विद्वान् मनुष्य असेल तोच ब्राह्मण होय. (२) **क्षत्रियः**-जो रणांगणामध्यें शौर्य गाजवितो, शत्रूला कधींही पाठ दाखवीत नाहीं. नेहमी वीरश्रीनें युक्त असून जो दुष्ट शत्रूंचा नाश करून राज्यामध्यें शांतता राखतो, तोच मनुष्य क्षत्रिय होय. (३) **वैश्यः**-सर्व प्रकारचे व्यापार करून, द्वीपांतरीं जाऊन तेथें मोठमोठे व्यापार करून जो देशाची संपत्ति वाढवितो व शेतकी करून जो धान्य उत्पन्न करतो तो मनुष्य वैश्य समजावा. (४) **शूद्रः**-जो नोकरी चाकरी करून दुसऱ्यांच्या

सेवेमध्यें दिवस घालवितो, व कोणताही स्वतंत्र धंदा जो करीत नाहीं, त्याला शूद्र ह्मणावयाचें.

या व्याख्यांचा व इतर ठिकाणीं चातुर्वर्णाच्या ज्या व्याख्या आढळतात त्यांचा विचार केला असतां ब्राह्मण–क्षत्रिय–वैश्य–शूद्र या चार शब्दांना विद्वान्–शूर–व्यापारी–व नोकर असे चार शब्द पर्याय योजण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. तेव्हां विद्वान, शूर, व्यापारी व नोकर हे या राष्ट्रपुरुषाचे अवयव आहेत हें ठरलें; व यांच्याच उद्योगावर राष्ट्राची भरभराट सर्वस्वी कशी अवलंबून आहे हेंही थोडयाशा विचाराअंतीं सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

ब्राह्मणानें फार विद्वान् होऊन देश विद्वत्तेनें व विचारानें ऊर्जित दशेला आणावयाचा. क्षत्रियानें आपल्या बाहुबलानें शत्रूंचा नायनाट करून व्यापार, धंदे व विद्वत्ता यांना उत्तेजन द्यावयाचें. वैश्यानें व्यापारधंदे करून, कारखाने उभारून, किंवा जमिनीची लागवड करून, देशाचें सुख वाढवावयाचें. व या तीन वर्णांच्या लोकांची चाकरी शूद्रांनीं करावयाची. हे चार प्रकारचे लोक प्रत्येक देशामध्यें असतातच. जसे विद्वान्, शूर, व्यापारी व शूद्र हे हिंदुस्थानांत आहेत तसेच ते यूरोपमधील व अमेरिकेंतील राष्ट्रांमध्येंही आहेत. चातुर्वर्ण्य हिंदुस्थानांतच आहे व बाहेर नाहीं असें नाहीं. तें प्रत्येक राष्ट्रामध्यें आहेच व असलेंच पाहिजे. परंतु फरक इतकाच कीं, हिंदुस्थानांतील चारही वर्ण आपआपले धंदे सोडून आळशी बनत आहेत, व इतर देशांतील चार वर्ण झपाटून उद्योग करीत आहेत. ते आपआपले उद्योग यथासांग करीत असल्यामुळें त्यांचा "राष्ट्रपुरुष" बळकट आहे व आमचा "राष्ट्रपुरुष" क्षयरोगी बनत चालला आहे. जर आमच्या राष्ट्रपुरुषाच्या अंगांत पुन: टवटवी आली पाहिजे असें कोणाला वाटत असेल तर त्यानें या पुरुषसूक्तांतील ऋचेचा गर्भितार्थ लक्षांत आणून " राष्ट्रपुरुषाचे " उत्तम भक्त बनलें पाहिजे. राष्ट्राची जो सेवा करणार नाहीं, तो अर्थातच या राष्ट्रपुरुषाच्या दु:खामध्यें भर टाकीत आहे, असें पुरुषसूक्तावरून उघड दिसतें. हातांनीं अन्न उचलून तोंडांत घातलें पाहिजे; पायांनीं चालून अन्न मिळवून आणलें पाहिजे; तोंडानें चावून गिळलें पाहिजे; इतके व्यवहार झाले असतां जसें मनुष्याला सुख होतें, त्यांतील एक व्यापार बंद पडला तर जसें नुकसान होतें, तसेंच ब्राह्मणांनीं विचाराचा, शूरांनीं शौर्याचा, वैश्यांनीं व्यापारीपणाचा, व शूद्रांनीं नोकरीचा देशासाठीं विनियोग करून उत्तम व्यवस्था केली असतां राष्ट्राला सुख होतें.

या पुरुषसूक्तांतील वैदिक उपदेशाचा भावार्थ लक्षांत आणून जर आपल्या हिंदुस्थान देशाकडे लक्ष पोंचविलें तर आपल्याला काय आढळून येईल बरें ? जाडे विद्वान् व देशकल्याणासाठीं विचार करणारे व ज्ञानाचा प्रसार करणारे ब्राह्मण किती आहेत ? बाहुबलानें समरांगणामध्यें शत्रूला चीत करणारे क्षत्रिय कोठें आहेत ? देशामध्यें राहून व तसेंच देशांतरीं जाऊन व्यापार करून हिंदुस्थानांत संपत्ति मिळवून आणणारे वैश्य कोठें आहेत ? व शूद्र काय करीत आहेत ? विद्येचा घोंट सातांसमुद्रांपलीकडून येणार, व तो वेताचाच मिळणार; परकीयांच्या शब्दांमधून त्याचें ज्ञान करून घ्यावयाचें ! शिवाय विद्यादानामध्यें साहजिकच पक्षपात होत असल्यामुळें सणसणीत विद्वान्, स्पष्टवक्ता व हिताच्या गोष्टी सांगणारा व राष्ट्राचें हित करणारा ब्राह्मण सध्यां दिसत नाहीं

यांत आश्चर्य नाहीं. सातांसमुद्रांपलीकडच्या लोकांकडे पालन करण्याचा मक्ता दिला असल्यामुळें क्षत्रियांचें क्षत्रियपण नाहींसें होऊन 'शौर्य' शब्द कोशामध्येंच राहिला तर त्यांत नवल कोणतें ? व्यापाराच्या दगदगीमुळें सर्वस्वाचा त्याग करण्यालाही आह्मी मागें पुढें पहात नसल्यामुळें, आमच्यांतील वैश्यवर्गाचा ऱ्हास होऊन परकीय वैश्य येथें येऊन श्रीमंत होत आहेत हें प्रत्यक्ष दिसत आहेच. ब्राह्मणांचा डोळा चाकरीवर, क्षत्रियाचाही चाकरीवर, व वैश्याचाही तेथेंच. तेव्हां तीनही हिंदुस्थानचे वर्ण केवळ शूद्र बनत आहेत; व शूद्र बनत असून-" आह्मीं ब्राह्मण आहोंत, आह्मी क्षत्रिय ( सरदार ) आहोंत " असें ह्मणून घेण्याला त्यांना लज्जा कशी वाटत नाहीं याचेंच आश्चर्य वाटतें. जे ब्राह्मण वसिष्ठ, वामदेवादिक--विद्वत्तेच्या तेजानें देदीप्यमान झालेल्या-ऋषींच्या कुळांमध्यें उत्पन्न झाले आहेत, त्यांनीं विद्वत्तेला फांटा देऊन नोकरी पत्करून शूद्र बनावें काय ? सूर्यवंश व सोमवंश यांसारख्या क्षत्रियश्रेष्ठांच्या कुळांमध्यें उत्पन्न झालेल्या क्षत्रियांनीं नोकरी पत्करून शूद्र व्हावें काय ? व जर ब्राह्मणक्षत्रियांसारखे उच्चवर्ण राजरोसपणानें आपलीं कामें विसरून शूद्र बनतात तर मग इतर खालच्या वर्णांनीं काय पाहिजे तें केलें तर त्यांत नवल नाहीं. अशा प्रकारचा वर्णसंस्कार झाल्यामुळेंच हिंदुस्थानास ही अशी हीनतम अवस्था प्राप्त झाली आहे.

तेव्हां पुरुषसूक्ताचा अर्थ लक्षांत आणून चातुर्वर्ण्यांतील लोकांनीं आपआपलीं कर्तव्यें ओळखलीं पाहिजेत व तीं योग्य रीतीनें बजाविलीं पाहिजेत. तरच पुरुषसूक्ताच्या नित्य पठनापासून जो खरा उपयोग व्हावयाचा तो होईल. आमच्या पूर्वजांपेक्षां जरी आमचें ज्ञान जास्त वाढलें नाहीं तरी त्यांणीं मिळविलेलें ज्ञान तरी आह्मी पूर्णपणानें पाहिलें पाहिजे, व त्यांच्या सांगण्याप्रमाणें तरी वागलें पाहिजे. आमच्या पूर्वजांच्या-अर्थात् ऋषींच्या-सांगण्याप्रमाणें वागण्यांतच आमचें खरें कल्याण आहे यांत मुळींच शंका नाहीं.

श्री. दा. सातवळेकर.

## फर्ग्युसन विलाप.

[ माजी गव्हर्नर सर जेम्स फर्ग्युसन यांची पत्नी ते काठेवाडांत प्रवास करीत असतां मुंबईंत महामारीनें एकाएकीं निवर्तली. त्यावेळीं ती गर्भवती होती. त्या प्रसंगास अनुलक्षून कवीनें नामदार साहेबांचा विलाप खालील पद्यांत वर्णिला आहे.]

भोगाया वैभवा तूं मजसह दयिते आर्यभूमींत येशी,
संगें राहोनि माझ्या दिवसनिशिं हरायासही मच्छ्रमासीं;
इच्छा माझीतुझीही सफल न सखये जाहली तोंच काळें
नेलें कां गे अहा हा तुज निजसदनीं ओढुनी प्रेमशाले ! १

मागें ठेवुनियां तुला प्रियतमे त्या गुर्जराधीश्वरा
स्थापाया स्वपदीं वटोदरपुरा गेलों निघोनी खरा;
तेव्हां तूं इतक्यांतची परि मला जाशील गे सोडुनी
स्वप्नींही मव्हती अनिष्ट शिरली ही कल्पना ह्या मनीं! २

जरी सौख्यें होतों अनुभवित मी राजसदनीं
तरी होतां तूझी स्मृति सहज ये नीर नयनीं;
कधीं खातां पीतां शयन करितांही न विसरे—
अशा कांता कां गे त्यजुनि मज जाशी प्रियकरे? ३

गृहीं परततांच मी करुनि राज्यकार्यश्रमा
बघूनि ह्मणि येउनी मजसमीप चेतोरमा
सदैव रमवावया झटतसे मला जी स्वयें—
कशी मजशीं तीच तूं त्यजुनि आजि जाशी प्रिये? ४

बसवुनि नृपा राज्यीं यावें तसेंच तुझ्याकडे;
परि न विधिची इच्छा तैशी—कसें मग तें घडे ?
अहह ! जवळी अंतःकाळीं तुझ्या नसवे मला—
ह्मणुनि चटका चित्ताला ह्या विशेषचि लागला !५

जातां तुला त्यजुनि गर्भवतीस गेहीं
माझ्या मनीं उपजला द्रवलेश नाहीं—
ऐसें ह्मणोत जन सर्व सुखें ! परंतु
कांते कधींच ह्मटलें नसशील हें तूं ! ६

उद्यानांतहि मस्कराश्रय जिला चालावया लागला;
जातां किंचित दूर काय गमला जीला बहू भागला;
त्या तुझी नवनीतकोमल तनू मार्गश्रमें घाबरी
कांते हो न, ह्मणून केवळ तुला ठेवोनि गेलों घरीं !७

जी तूं बालरविप्रवालकिरणीं घर्मार्द्र होतां तनु
श्वासोच्छ्वास वमीत ठेविशि मम स्कंधीं स्वकीया हनु—
कैशी ती अबला तुझ्यासम सखे न्यावी प्रवासांत मी!
नेतांही मज हांसणार नव्हते पृथ्वीवरी ह्या कमी ! ८

अंतःकाळीं सखे ! तूं स्मरुनि खचित ह्या
निर्दया प्राणमित्रा
दुःखें झालीस भारी अससिल बहुधा
व्याकुला चारुगात्रा !
सांगूं मी काय ! होतां स्मरण मज तुझें
कंठ दाटून ये हा !
वाटे आतां सुखाचें स्थलचि न उरलें
ह्या न चित्ता न देहा !९

प्रभुवरचरणाच्या राहुनीयां समीप
वरिशिल दयिते तूं स्वर्गिं सौख्यें अमूप;
परि मजवर आतां कोपला काळ पाहीं—
असुनिहि सुख सारें भोगतां येत नाहीं ! १०



# तान्हाजी मालसुरे
## अथवा
# सिंहगडची मोहिम.

## प्रकरण पांचवें.

( मागील अंकावरून पुढें चालू. )

मूर्च्छावती होति न कन्यका ही;
आक्रोश मोठा घडता न कांहीं;
सूर्याजि हाही पडता तसाच;—
होणार जें जें घडतेंच साच. ४५

हा कोण ? ही आतुर कोण बाला ?—
यदुबंधु हो काळ जिच्या पित्याला—
प्रेमा जडावा तरि तो कसाच ?
होणार जें जें घडतेंच साच. ४६

प्रेमाचें या जाहलें काय शेखीं,
त्यातें येथें कोण हो प्राज्ञ लेखी ?
सूर्याजीही नेणतो त्यासि भोळा,—
ज्याचा लागे स्वामि—कार्यासि डोळा. ४७

त्या शांतवूनी उभय स्त्रियांला,
दुर्गावरी स्थापुनि रक्षकांला,
स्वबंधुची लावुनि सुव्यवस्था,
मार्गस्थ हा होय ससैन्य आतां. ४८

तटप्रांत ओलांडितां वन्य—मार्गी
निघे खालता, स्वैर जेथें निसर्ग;
कडे थोर, मोठ्या दऱ्या, खोल खोरीं,
भलीं गर्द रानें पदावीण कोरीं. ४९

थाटले वन—तरू घनदाट
वाल्लिंचे निबिड कुंज अफाट;
वन्य पक्षि—पशु—संघ अभीक
हिंडती सपरिवार अनेक. ५०

[ पुढें चालेल. ]

१ सृष्टिक्रम. २ निर्भय.

Printed at the "Ganpat Krishnaji" Press, Bombay, 3-9-99

कांहीं नको आहे.' तेव्हां लवंगिकेनें तिला विचारिलें-'अगे, असें कसें ह्मणतेस? असें कधीं होईल का?' मालतीनें उत्तर दिलें- 'होईल का ह्मणजे? अगे, तुह्मीच नाहींका मला एका जनाची खचित प्राप्ति होईल अशी बळकट आशा उत्पन्न होण्याजोग्या गोड गोड गोष्टी सांगून, आजवर मला जिवंत ठेवून, शेवटीं हा असला घाणेरडा प्रकार माझ्या नशिबीं आणिलात? आतां मी निश्चय ठरविला आहे कीं, त्या माझ्या परमेश्वर-रूपी प्रियकराच्या परोक्षच त्याच्या गुणांचें कीर्तन करीत निष्कलंकपणानें आपले प्राण द्यावे. या माझ्या हेतूच्या आड मात्र माझी प्रिय-सखी न येवो.' असें ह्मणून ती रडत रडत लवंगिकेच्या पायां पडली. तेव्हां मकरंद ह्मणाला. 'इथें मात्र प्रेमाची व स्नेहाची सीमा झाली खरी.' मालती लवंगिकेच्या पायां पडली, तोंच लवंगिकेनें माधवाला खुणाविलें. तें पाहून मकरंदानें त्याला तिच्या जागीं जाऊन हळूच उभें राहण्यास सांगितलें. त्यावर माधवानें, 'या वेळीं भयामुळें मला कांहींच सुचत नाहीं' असें ह्मटलें. त्याला मकरंदानें, 'अरे अभ्युदय होण्याच्या खऱ्या स्थितीचें हेंच उत्तम लक्षण, जा—' असें ह्मणून त्याला लवंगिकेच्या जागीं जाऊन उभें राहण्यास लाविलें. मालती खालीं पडल्यापडल्याच लवंगिकेला उद्देशून ह्मणाली, 'प्रियसखे लवंगिके, इतका अनुग्रह मजवर करच.' त्यावर तिला माधव ह्मणाला, 'हे सुंदरी, सरले, प्रिये! हें साहस करण्याची इच्छा सोड, व हा शोक टाकून दे. तुझा विरहरूपी त्रास व दुःख सोसण्याला माझें चित्त पात्र नाहीं.' हें भाषण ऐकूनही तें लवंकिकेचेंच समजून मालती पुनः ह्मणाली 'सखे, हा माझा प्रणाम तुझ्यानें कधीं उल्लंघन करवणार नाहीं.' त्यावर पुनः माधव मोठ्या आनंदानें ह्मणाला, 'तुझ्या विरहामुळें मलाही खरोखर दारुण आयास होत आहेत, याकरितां हे रंभोरु! ऊठ. तुझ्या मनांत येईल तसें कर. पण मला एकदां आलिंगन दे.'

[ हीं माधवाचीं दोन्ही भाषणें थोडींशीं चमत्कारिक आहेत. लवंगिकेच्याबदली तीं त्याच्या तोंडांत घातलीं आहेत ह्मणावें, तर त्यांतील अर्थ तिला जुळत नाहीं, व तीं संस्कृतांत आहेत. खास माधवाचींच ह्मणावीं, तर स्वर पालटलेला मालतीच्या लक्षांत आपल्यावांचून कसा राहील? तिचे नेत्र अश्रूंनीं भरलेले होते, यामुळें कदाचित् तिला स्पष्ट दिसलें नसेल. पण तिच्या कर्णेंद्रियांत किंवा स्पर्शेंद्रियांत कांहीं फरक झाला होता असें ह्मणतां येत नाहीं. व शब्दावरून मालतीच्या मनांत शंका आली असती तर—व ती येणें रास्तही होतें—गळ्यांत बकुलमाला घालण्याचा पुढील अप्रतिम प्रसंग न साधता. हे श्लोक कां घातले हें कळत नाहीं. ते अपवार्य तरी ह्मटले पाहिजेत; किंवा लवंगिकेच्या तऱ्हेवर तरी बोलावयाला पाहिजेत. ]

हें भाषण ऐकून लवंगिकेनें एकदाचें आपलें ह्मणणें मान्य केलें असें वाटून मालतीचें थोडेंसें समाधान झालें. तिनें उठून डोळे मिटलेले किंवा अश्रूंनीं मंद झालेले असतांनाच त्याला आलिंगन दिलें. त्याच्या कठिण शरीराचा स्पर्श होतांच, तिला लवंगिकेच्या शरीराचा स्पर्श आज असा कठिणसा कां लागतो अशी शंका आली, व ती ह्मणाली, 'यावेळीं अश्रूंनीं दृष्टि रुद्ध झाली असल्यामुळें तुझें स्पष्ट दर्शन होत नाहीं. पण तुझ्या अंगाचा स्पर्श आज असा

कठिणसा व परकासा कां लागतो बरें ?' [ यावरून तिला स्पर्शवैचित्र्य ओळखतां आलें हें उघड आहे. तसें शब्दवैचित्र्य ओळखितां आलें नसावें हें कसें ? वास्तविकपणें मालतीचीं हीं दोन्ही भाषणें किंवा माधवाचीं वरील दोन्ही भाषणें गाळलीं पाहिजे होतीं, किंवा त्यांतील बहुतेक भाग स्वगत पाहिजे होता. त्याच्यामुळें शोभा न येतां असंभाव्यपणा मात्र व्यर्थ अधिक आला आहे. ]

मालती पुढें ह्मणाली, ' सखे, आज तूं मजवर मोठाच अनुग्रह केलास. तूं कृपा करून माझ्यावतीनें दोन्ही हात जोडून, मस्तकावर ठेवून, त्यांना विनंती कर कीं, ' या हतभागिणीला, प्रफुल्लित कमलाची शोभा हरण करणारें व पूर्णेंदुवत् सुंदर अशा आपल्या मुखारविंदाचें नीट डोळे भरून दर्शनही घडलें नाहीं. प्रियसमागमाविषयीं कधीं सिद्धीस न जाणारे विचार मनांत नेहमीं धारण करूनच अंतःकरण तळमळत असे, अशा स्थितींत मी दिवस काढले. विरहज्वरानें शरीराचा संताप होत असल्यामुळें नेहमीं सखीजनाला मजपासून त्रासच होत गेला. स्वभावतः आनंद देणारी पण माझ्या विरहाग्नीचा अधिक भडका करणारी अशी चंद्रिका व मलयानिल इत्यादिकांची अनर्थपरंपरा कशीतरी आजवर मी सोशिली. परंतु हल्लीं मात्र माझी अगदीं निराशा झाली आहे'—असें त्यांना सांग. लवंगिके, ' तूं देखील माझें स्मरण करीत जा. ही स्वतः श्रीमाधवांनीं गुंफलेली मनोहर बकुलमाला या मालतीच्या जीवापलीकडे समजून तूं जपून ठेव, व आपल्या गळ्यांत तिला नेहमीं धारण कर बरें.' असें ह्मणून तिनें आपल्या गळ्यांतून बकुलमाला काढून, ती वर पहात लवंगिकेच्या समजून माधवाच्या गळ्यांत घातली. तोंच माधव लवंगिकेच्या जागीं उभा असून आपण एवढा वेळ बोललों तें त्यालाच असें तिच्या लक्षांत आलें. त्याबरोबर तिची अवस्था फारच चमत्कारिक झाली—ती तशी होणें साहजिकच होतें,—तिची भयानें गाळण झाली, सर्वांगास कंप सुटला, व ती अतिशय लज्जित होऊन एकदम एकीकडे सरली.

मालतीच्या आलिंगनापासून माधवाला फारच आनंद झाला व समाधान वाटलें. तो ह्मणाला, ' इच्या शरीरस्पर्शानें या वेळीं कर्पूरहार, हरिचंदन, चंद्रकांतद्रव, शैवल आणि मृणाल, इत्यादि सर्व शीतल वस्तूंचा अर्क काढून माझ्या सर्वांगाला लावल्यापेक्षांही अधिक शीतलता वाटते.'

मालती थोडीशी सावध होऊन त्रासानें ह्मणाली, ' अगबाई ! लवंगिकेनें फसविलें तर मग !'

हें ऐकून माधव तिला ह्मणाला, ' हे सुंदरी, तूं आपलें दुःख मात्र निवेदन केलेंस—पण तुजकरितां दुसऱ्याची कशी अवस्था झाली आहे आणि त्याला कशा व्यथा होत आहेत तें तुला कळत नाहीं—ऐक.

' प्रखर विरहज्वरानें होणारा शरीराचा तीव्रदाह, तुझा संकल्पसमागम अनुभवून पुढें तो सर्व मिथ्या आहे असें कळतांच होणाऱ्या वेदना, आणि केवळ तुझ्या प्रेमळ भाषणावरच जीवन अवलंबून राहणें, इत्यादिकांचा अनुभव घेत आजवर मींही दिवस काढले नाहींत काय ? यांत तुजकडे दोष नाहीं का ?'

त्यावर लवंगिका ह्मणाली, ' गडे मालती, खरोखर तुला हा यांनीं अगदीं योग्य दोष दिला.' तसेंच कलहंस ह्मणाला, ' वाहवा ! काय

सुरेख घाट जमून आला आहे तरी !'

मकरंद ह्मणाला, 'महाभागे मालती, हा ह्मणतो असेंच खरें. तूं याच्याविषयीं प्रेमवत्सल आहेस अशी याची खात्री असल्यामुळें यानें आजवर कसेतरी हे दिवस काढले. आतां तुझा विवाहकंकणानें युक्त असा पाणिरूपी प्रसाद मिळून त्याला चिरकालिक सुख प्राप्त होवो, व तुह्मां उभयतांचे मनोरथ सफल होवोत !'

[ हा प्रसंग खरोखरच अप्रतिम साधला आहे. पण यांत कलहंसासारखें गौणपात्रही सामिल कां करून ठेविलें तें कळत नाहीं. मालतीच्या दुःखाची परमावधि करून तिच्या तोंडून तिचें खरें खरें हृद्गत खुद्द माधवाला कळविलें, व पुढें तिला प्रत्यक्ष माधवाची प्राप्ती करून दिली. यावेळीं मालतीच्या मनाची स्थिति चमत्कारिक होणें व तिच्या बालस्वभावास अनुसरून ती केवळ स्तब्ध होऊन जाणें, हेंही साहजिक आहे. या प्रसंगांतही संगीत शाकुंतलांतील तिसऱ्या अंकांत लताकुंजांत शिरतांना दुष्यंतानें शकुंतलेचा ' छळितो तुजला परि मज जाळी ' वगैरे प्रणय उपालंभ केला आहे त्याचें स्मरण होतें.—पण शाकुंतलांतील उपालंभ अधिक सरस आहे. ]

मकरंदाचें बोलणें ऐकून लवंगिका त्याला कांहींसें थट्टेनें ह्मणाली, ' महानुभावा, मालतीनें यांना स्वतःच हृदयाशीं घट्ट आलिंगून धरिलें. आतां कंकणालंकृत कराची काय अपेक्षा राहिली ? '

हें ऐकतांच मालतीच्या लक्षांत तिचा भाव आला, व ती चकित झाली, आणि, ' लवंगिका कन्यकाजनाला अयोग्य असें भलतेंच कांहींतरी सुचविते आहे ' असें ह्मणाली.

हें सर्व होत आहे तोंच, कामंदकीही मोठ्या पोक्तपणानें आंत येऊन मालतीला ह्मणाली, ' अग भित्रे, काय हें ? ' तिला पाहतांच मालतीच्या जीवांत जीव आला. कारण तेथील बाकीची सर्व मंडळी तिला मुळींच बोलूं देखील देत नव्हती. तिनें एकदम कामंदकीला घट्ट मिठी मारिली. तिला धीर देण्याकरितां कामंदकी प्रेमळपणानें तिच्या हनुवटीस हात लावून ह्मणाली.—' मालती, प्रथम दृष्टादृष्ट होतांच ज्याच्यावर तुझें मन बसून पुढें अगदीं परवश झालें व शरीर म्लान झालें, व ज्याची तुजविषयीं अशीच स्थिति झाली, तोच तुझा तरुण प्रियकर तुझ्यापुढें उभा आहे. तेव्हां हा वेडेपणा सोड. विधात्याचें कौशल्य व्यक्त होवो व मदनही सकाम होवो. '

त्यावर लवंगिका बुद्ध्या मालतीला लावून व माधवाच्या माहात्म्याचें स्मरण करून देण्याकरितां ह्मणाली, ' भगवती, कृष्णचतुर्दशीच्या दिवशीं निर्भयपणानें स्मशानांत संचार करून अद्भुत साहस करणारा व स्वभुजदंडानें प्रचंड पाखंडाचा समाचार घेणारा हा साहसी माधव. त्याला पाहून माझ्या प्रियसखीला कांपरें भरलें तें ठीकच. '

लवंगिकेच्या या खुबीदार भाषणाचा भाव मकरंदाच्या लक्षांत आला, व त्यानें तिची त्याबद्दल तारीफ केली. मालती हा सर्व प्रकार पाहून गांगरून गेली. तिला कांहींच सुचेना व ती दीनपणानें—' अहो बाबा, अग आई—' असें ह्मणाली.

पुढें कामंदकीनें माधवाला जवळ बोलावून ह्मटलें, ' माधवा, ही महाअमात्य भूरिवसूची परम योग्य व एकुलतीएक कन्या मालती, योग्य संबंध जुळवून आणणारा विधि, मन्मथ व मी असे मिळून हल्लीं तुला अर्पण करितों. ' इतकें बोलतां बोलतां तिला रडूं आलें. मकरंदानें

तेवढ्यांत, ' वा: भगवतीच्या पायांच्या पुण्य-प्रतापानें आमचे मनोरथ आज सफल झाले-' असें ह्मटलें. माधवानें कामंदकीला रडूं आलेलें पाहून ह्मटलें, ' भगवती, याबद्दल आपल्याला रडूं कां आलें ? ' तेव्हां कामंदकी छाटीनें डोळे पुसून ह्मणाली, ' माधवा, ऐक, तुला एक माझी विनंती आहे. ' माधव ह्मणाला, ' छे: हें काय ! विनंती !-काय आज्ञा आहे ? ' त्याला कामंदकी ह्मणाली, ' माधवा, तुजसारख्याची प्रीति नेहमीं कुशलपरिणामी असते. अनेक कारणांमुळें मलाही तूं मानतोस. तरी या सुवदनेचा तूं केव्हांही अनादर मात्र करूं नको, एवढीच माझी प्रार्थना आहे. प्रथमपरिचयापासूनच इच्यावर त्वां मजप्रमाणेंच दया केली पाहिजे. ' इतकें बोलून ती त्याच्या पायां पडूं लागली. तोंच माधवानें ' हाँ-हाँ-हें काय !, आपल्या वात्सल्यामुळें आपण हें काय भलतेंच करितां ! ' असें ह्मणून तिला उठविलें.

[ याठिकाणीं कामंदकीच्या पात्राचेंही खरें मर्म कवीनें उत्तम रीतीनें व्यक्त केलें आहे. कसाही आनंदाचा प्रसंग असला तरी मुलीला देतेवेळीं प्रत्यक्ष तिची आई किंवा दुसरे जवळचे आप्त इष्ट-विशेषत: स्त्रिया-यांना शोक होतो व तो व्यक्तही होतो, हें कवीनें येथें स्पष्ट केलें आहे. ]

तिला मकरंदानें उत्तर दिलें, ' भगवीत, ही मोठी कुलीन, दृष्टीनेंच आनंद देणारी, अकृत्रिम व अतिशय प्रेम करणारी, अत्यंत गुणवती-व उज्ज्वल अशी आहे. यांपैकीं एकेक गुण वशीकरणाचें उत्तम साधन आहे. तशांत ही आपलीच आहे, तेव्हां हें सांगायाला का पाहिजे?'

नंतर कामंदकीनें ह्मटलें, ' मालती ! ' तिच्या वतीनें लवंगिकेनेंच-' काय आज्ञा ? ' असें ह्मटलें; तिला बोलण्याला अवकाशच दिला नाहीं.-' हें पहा, स्त्रियांना प्रिय, मित्र, बंधु, सर्व काम, धन दौलत, किंबहूना प्रत्यक्ष पंचप्राण, सर्व कांहीं पतिच होय. तसेंच पतींना सर्व कांहीं स्त्रिया होत. ही गोष्ट तुह्मी दोघेंही पक्की लक्षांत ठेवा बरें. '

[ नवरा बायकोच्या खऱ्या संबंधाचें हें किती सुरेख व थोरपणाचें वर्णन आहे ! हल्लींची पाश्चात्यलोकांची दृश्य समजूत याहून अधिक काय आहे ?-व आपल्यांत याच्यांतील कितीसा अंश अवशिष्ट आहे ? ]

यावर दोघांच्याही वतीनें मकरंद व लवंगिका यांनीं ' होय, जशी आपली आज्ञा-' असें उत्तर दिलें.

नंतर कामंदकीनें मकरंदाला ह्मटलें, 'मकरंदा, हे वैवाहिक वस्त्रालंकार अंगावर घालून तयार हो. ' त्याप्रमाणें तो एकीकडे जाऊन पोशाक करूं लागला. [ या ठिकाणीं चित्रजवनिका असें लिहिलें आहे. वास्तविक याची कांहीं आवश्यकता नव्हती. कारण, मंदिरांत सर्वत्र एकांतच होता. पण यावरून त्यावेळीं रंगभूमीची व्यवस्था एकदोनच पडद्यांनीं होत असे, असें स्पष्ट दिसतें. ]

यावर माधवानें ह्मटलें, ' भगवती, यांत मकरंदाला बरेंच संकट व त्रास पडेल, नाहीं का ? ' तेव्हां ' अं: त्याची चिंता तुला कशाला ? ' असें कामंदकीनें त्याला उत्तर दिलें. यावरून पुढील बेत माधवाला अवगत झालेला नव्हता असें दिसतें. तो ह्मणाला, ' बरें, आपण सर्व जाणतांच. ' इतक्यांत मकरंद मालतीचा वेश घेऊन आला व त्याला थट्टेनें ह्मणाला, ' मित्रा, मीं मालती झालों पहा. ' तेव्हां माधवानें त्याला आलिंगन देऊन हंसत हंसत ह्मटलें-

वा: वा: अशा मालतीवर भुलणारा नंदन मोठाच भाग्यवान !'

नंतर कामंदकीनें त्यांला ह्मटलें, 'मालती, माधवा, तुह्मी दोघेंही या दाट झाडांच्या मधून आमच्या विहाराच्या मागच्या उद्यानवाटिकेंत जा. तेथें अवलोकितेनें लग्नाचें सर्व साहित्य लावून ठेविलें आहे. तिकडे जातांना रस्त्यांत व त्या उद्यानवाटिकेंत पानवेली, पोफळी, महाळुंगांचीं झाडें वगैरे अनेक तऱ्हेचे सुंदर सुंदर वृक्ष आहेत व त्यांच्यावर अनेक मत्त कोकिल आनंदानें शब्द करीत आहेत. ते व तो सर्व प्रफुल्लित प्रदेश तुह्मां उभयतांचें कल्याण करील. मकरंद आणि मदयंतिका येईपर्यंत तुह्मी तेथेंच थांबा.' हें ऐकून मकरंदही लौकरच मदयंतिकेसह येणार, असें पाहून आपलें हें दुसरें हित होणार याबद्दल माधवाला अधिकच आनंद झाला. त्याला कलहंसानें, 'कां हो, हेंही होणार ना ?' असें विचारिलें. त्यावर माधवानें त्याला–'अरे हो, यांत शंका कसली ?' असें उत्तर दिलें. लवंगिकेनें मालतीला, 'कां ऐकिलेंस ?' असें विचारिलें. नंतर कामंदकी ह्मणाली, 'लवंगिके, चला आपण जाऊं.' असें ह्मणून त्या जाऊं लागल्या. तेव्हां मालतीनें 'लवंगिके, तूं सुद्धां जाणार ?' असें ह्मटलें. त्यावर तिनें मुरक्यानें– 'अग हो, आतां आह्मीं कशाला हव्या–' अशा अर्थाचें उत्तर दिलें; व कामंदकी, लवंगिका व मकरंद निघून गेलीं. नंतर माधवानें मालतीचा हात धरिला, त्यावेळीं त्याला अतिशय आनंद होऊन तो ह्मणाला–'एखादा निदाघतप्त हत्ती सरोवरांतून सोंडेनें नालासकट कमळ ग्रहण करितो, त्याप्रमाणें हा मी अनंगसंतापानें तप्त होत्साता या सुंदरीचा स्कंधापासून रोमांच उभे राहिल्यानें कंटकित झालेला, कोमल व स्वेदोद्गमानें ओलसर अंगुलीनीं व्याप्त, असा पाणी कितीतरी आनंदानें ग्रहण करीत आहें!' असें ह्मणून माधव मालतीसह निघून गेला.

[ या सर्व नाटकांत हा अंक फार चांगला वठलेला आहे. तो सर्वोत्तम आहे असें जरी नाहीं, तरी उत्तमांपैकी आहे असें ह्मणतां येईल. लवंगिका व कलहंस यांच्या भाषणांत ठराविक दोष आहेतच, तरी पात्रांचे स्वभाव–विशेषतः मालती, कामंदकी व लवंगिका यांचे–फार चांगले साधले आहेत. ब्राह्मणांच्या मुलामुलींचे विवाह (चोरून कां होईना ) बौद्ध जैन विहारांत होत असत, व ते पुढें मान्य ठरत असत, असें सिद्ध होतें.

पद्मपुराच्या आसपास पानमळे असतील–व अद्यापिही कांहीं कांहीं गांवीं आहेत. पण तेथें पूगद्रुम–पोफळीचीं–झाडें असण्याचा संभव दिसत नाहीं. कारण तेथील हवापाणी त्यांना हवें तसें नाहीं, फारच रूक्ष आहे. कदाचित् हजार वर्षांमागें तें याहून चांगलें असलें तर नकळे. तसेंच कंकोळाचीं झाडेंही या भागांत मुळींच होत नाहींत. कवीनें हें वर्णन केवळ अलंकारिक केलें आहे.

मालतीकरितां आणलेले वस्त्रालंकार मकरंदाला कसे आले, व तो ते घालून बाहेर आला तेव्हां इतर सख्यांनीं व सेवकांनीं त्याला ओळखलें कसें नाहीं, हा तरी प्रश्नच आहे. तसेंच कामंदकीच्या मनांतील बेताप्रमाणें सर्व गोष्टी पार पडून मकरंद मदयंतिकेसह येता व लग्नेंही लागतीं तरी, राजाला व नंदनाला फसविल्याबद्दलचा प्रतीकार कसा व्हावयाचा होता तें कांहींच कळत नाहीं. कामंदकीनें सर्वच दैवावर हवाला ठेविलेला दिसतो. ]

## अंक सातवा.

मागील अकांत वर्णन केल्याप्रमाणें मकरंद मालतीच्या वेशानें कामंदकी व लवंगिका यांच्या बरोबर हस्तिणीवर बसून अमात्य भूरिवसूच्या वाड्यांत गेला. त्याचें उत्तम वेशांतर झालेलें असल्यानें, व कामंदकीच्या चातुर्यामुळें, व ती प्रदोषवेळा असल्यामुळें, खरा प्रकार नंदनाच्या लक्षांत आला नाहीं. त्याचें त्याच्याशीं —मालतीशीं ह्मणून—लग्न झालें, व तो वधूला घेऊन आपले घरीं परत आला. त्याला विचारून भगवती कामंदकी परत गेली. त्या दिवशीं नंदनाच्या घरीं नववधूच्या गृहप्रवेशाचा महोत्सव असल्यामुळें सर्व परिजन गडबडींत व थकले भागलेले व जागच्याजागीं विश्रांति घेत पडलेले होते. त्या रात्रीं चांदणेंही नव्हतें. याच रात्रीं मदयंतिकेला मालतीचा वेश धारण केलेल्या मकरंदाकडे आणून व खुबीदारीनें त्याला प्रकट करून, मदयंतिकेचें व त्याचें संधान जमवून, दोघांनाही चोरून कामंकीच्या विहारांत नेऊन, तेथें त्यांचें लग्न लावण्याचें ठरविलें होतें. गृहप्रवेश झाल्याबरोबर त्याच रात्रीं आपल्या अप्रतिम नववधूचा उपभोग घेण्याच्या उद्देशानें नंदन मोठ्या थाटानें व उमेदीनें मालतीकडे ह्मणून आला. त्यानें तिची पुष्कळ तऱ्हेनें हातापायां पडून देखील विनवणी करून वश करण्याचा यत्न करून पाहिलें. पण मालतीरूपी मकरंदानें त्याला मोठ्या रागानें व त्रासानें झिडकारलें. नंदन बलात्कार करूं लागला तेव्हां त्यानें त्याला सपाटून लाथ मारून झुगारून दिलें. तेव्हां नंदन संतापून चडफडत, 'मला अशा या तश्या सारखा कौमारबंधकीचा—लग्नापूर्वीच पुरुषसंभोग घडलेलीचा—संपर्क नको. पुनः असल्या वेश्वेशीं मी संबंध ठेवीन तर शपथ, '—अशी प्रतिज्ञा करून चडफडत व रागानें दांत ओंठ खात निघून गेला. याच प्रसंगानें बुद्धरक्षिता मदयंतिकेला मालतीची समजूत करण्याला ह्मणून घेऊन आली. हा सर्व प्रकार बुद्धरक्षितेनेंच प्रस्तावनेदाखल सांगितला आहे.

या सर्व भागांत बऱ्याच गोष्टी विचार करण्याजोग्या आहेत. मकरंद मालतीचा वेश घेऊन प्रथम भूरिवसूच्या घरीं गेला. तेथें अमात्य व त्याच्या घरची सर्व मंडळी या गुप्त मसलतींत होतीच असें घेऊन चाललें, तर त्यांपैकीं कोणी याबद्दल बभ्रा केला नाहीं हें साहजिकच आहे. पण नंदन लग्नाकरितां वधूच्या पित्याच्या घरीं—हल्लीं देखील चाल आहे त्याप्रमाणें—आपली बहीण मदयंतिका व इतर घरची बायका मंडळी, यांच्यासह आला असावा. लग्नाचा सर्व सोहाळा झाला त्यांत नंदनाकडील कोणीही मालतीचें—मकरंदाचें—मुखावलोकन केलें नाहीं किंवा तिच्याशीं बोललें नाहीं, हें कसें ? लग्नसोहाळा मुकाट्यानें व बाहुलाबाहुलीच्या लग्नाप्रमाणें चालला होता किंवा कसें ? मंत्र, होम, पाणिग्रहण, कन्यादान व प्रतिग्रहादिक ब्राह्मणाच्या लग्नांत अवश्य असणारे विधि मुळींच झाले नाहींत कीं काय ?

शिवाय भूरिवसूसारख्या महाअमात्यानें अशा फसवणुकीच्या प्रकाराशीं विवाहासारख्या महत्त्वाच्या विधींत देखील बुद्ध्या प्रत्यक्ष संबंध ठेविला, हें त्याच्या मोठेपणाला, योग्यतेला व धार्मिकतेला कितपत शोभतें ? हा सर्व प्रकार त्याला न समजतां झाला असें संभवत नाहीं. लग्नाच्या दिवशींच, किंबहुना लग्नानंतर ताब-

उतोबच, वधूचा गृहप्रवेश झाला हें हल्लींच्याही बिजवराच्या लग्नाच्या चालीशीं विरुद्ध नाहीं. हें व त्याच रात्रीं वधूवरांचा संयोग होणें या गोष्टी नेहमींच्या प्रचारांतल्या सारख्या वर्णन केलेल्या आहेत. त्यांत कांहीं विशेष होतें असें कवीला वाटलेलें दिसत नाहीं. यावरून या चाली भवभूतीच्या वेळीं प्रचारांत होत्या व त्याही ब्राह्मणांमध्यें असें ठरतें. हा लग्नाचा प्रकार व हल्लींचा भातुकलीचा किंवा बहुतेक पाळण्यांतील लग्नाचा प्रकार यांत कितीतरी अंतर आहे ! हें अंतर कां पडलें, याचा विचार करूं जातां भवभूतीच्या कालानंतर हळू हळू या देशांत मुसलमानांची सत्ता झाली, व स्वातंत्र्य नष्ट झालें तसतसी समाजाचीही अवनति होत गेली व त्या अवनतीचेंच हें फल झालें, असें कोण ह्मणणार नाहीं ! पहिली विवाहाची चाल रूढि व शास्त्र यांना संमत असून योग्य व साधी होती. पण हल्लींची—आहे तें ठीकच आहे झालें !

भूरिवसूच्या घरीं मकरंदाला कोणी ओळखिलें नाहीं तेव्हां नंदनाच्या घरींही याबद्दल फारशी विचारपूस कवीनें होऊं दिली नाहीं. हें ठीकच आहे.

नंदनानें मालतीला कौमारबंधकी असें ह्मटलें आहे. हें विशेषण मुली उपवर झाल्यावर लग्न होण्याची चाल असेल अशा स्थितींतच लागू पडतें. हल्लींच्या स्थितींत लागू पडण्याचा संभवच नाहीं. याचा पुढें लवंगिकेनें मदयंतिकेला टोला देण्यांत फार चांगला उपयोग केला आहे.

लवंगिका व मालतीचा वेश घेतलेला मकरंद अशीं नंदनाच्या अंतःपुरांत होतीं. वेशधारी मालती, नंदनावर रागाचा आवेश आणून त्रासानें निजली होती, व लवंगिका तिच्याजवळ बसलेली होती. अशा संधीस बुद्धरक्षिता मदयंतिकेला मालतीची समजूत करण्याला ह्मणून, परंतु वस्तुतः मकरंदाची भेट करून देण्याकरितां, घेऊन आली. कामंदकीनें रचिलेला हा सर्व व्यूह कसा काय पार पडतो याविषयीं मकरंदाला मोठीच शंका होती. बुद्धरक्षितेच्या सांगण्याप्रमाणें मदयंतिका येते किंवा नाहीं कोण जाणें, याविषयीं तो लवंगिकेशीं बोलत होता, इतक्यांत पैंजणाच्या घागऱ्या वाजल्या त्यावरून, 'तीच आली, अगदीं संशय नाहीं,–तूं तोंडावरून पांघरूण घेऊन निजल्याचें सोंग घे–' असें लवंगिकेनें त्याला सांगितलें.

आंत येतां येतां मदयंतिकेनें बुद्धरक्षितेला ह्मटलें–' गडे, खरेंच का मालतीनें दादाला असें झिटकारून इतकें नाराज केलें ? ' तिनें ' होय ' ह्मणतां ' चल तर, त्या वेड्या मालतीची आपण जाऊन चांगली कानउघाडणी करूं ' असें ह्मटलें; व आंत येतांच ती लवंगिकेला ह्मणाली–' गडे लवंगिके, तुझी प्रियसखी मालती जागी आहे का झोंपीं गेली आहे पहा बरें. ' लवंगिकेनें उत्तर दिलें–' या, अशा इकडे या, या पलंगाच्या एका कोंपऱ्यावर हळूच बसा. तिला जागी करूं नका. इतका वेळ बिचारी त्रासांत व रागांत सारखी तळमळत होती. आतांच कुठें थोडा डोळा लागला आहे. ' येथपासून सर्वच संवाद सुरेख व खुबीदार साधला आहे.

हें ऐकून मदयंतिका ह्मणाली, ' कां बरें, रागावयाला आणि त्रासावयाला वेडीला काय झालें ?' लवंगिका यावर मोठ्या तोऱ्यानें ह्मणाली, 'हो खरेंच, आपल्या दादासारखा नव्या नवरीला

वश करण्याच्या कामीं चतुर, सुकुमार, शहाणपणाचीं भाषणें बोलणारा, प्रेमळ व न रागावणारा, असा उत्तम नवरा मिळाल्यावर माझ्या प्रियसखीला त्रासावयाला काय झालें मेलें !'

हें मदयंतिकेच्या मतें उलटें दूषण ऐकून ती ह्मणाली, 'बुद्धरक्षिते, पाहिलेंसना ही कशी उलटी आह्मांलाच टोमणें देतो आहे ती ?' बुद्धरक्षिता हें सर्व जाणतच होती. पण बुद्ध्या त्रयस्थपणा दाखविण्याकरितां ह्मणाली–' हो, उलट आहे–आणि नाहीं ही.' तेव्हां मदयंतिका ह्मणाली–' तें ग कसें ?' बुद्धरक्षितेनें उत्तर दिलें, 'अगे, हें पहा, प्रत्यक्ष नवरा पायां पडला असतां लाजाळूपणानें त्याचा मान केला नाहीं, यांत तिच्याकडे कांहीं दोष येत नाहीं, असें नाहीं. तसेंच, या नववधूच्या विरूद्ध व दांडगाईच्या वर्तनानें रागावून थोरपणा व कुलीनपणा विसरून, तुमच्या दादांनीं तोंडांतून अयोग्य व अभद्र शब्द काढले, याबद्दलचा दोष तुमच्यावर येतो. मदयंतिके, कामसूत्रकारांनीं ह्मटलें आहे—' स्त्रिया व पुष्पें एक सारखींच सुकुमार; त्यांचें सेवन विश्वास न पटलेल्यांनीं दांडगाईनें व घाईघाईनें करण्याचा यत्न केला तर त्या तात्काल समागमद्वेषी व वैरी होतात.'

बुद्धरक्षिता बरीच आपल्या तर्फेचें बोलली, असें पाहून लवंगिका कांगाव्यानें डोळ्यांत पाणी आणून ह्मणाली–' घरोघर पुरुषांचे कुलकन्यकांशीं विवाह होतात ह्मणून बाई लज्जेनें पराधीन, निरपराधी व सुकुमार अशा गरीब गायीवर–ती बायको झाली ह्मणून–अरेरावपणानें तोंड सोडून कोणी भलतीच आग पाखडतांना आपण नाहीं कधीं पाहिलें, किंवा ऐकिलें ! हे शब्द–शब्द कसचे, डागण्या त्याजन्मभर मुलींच्या हृदयांत सलत व टोंचत असतात, व त्यांचें स्मरण झालें कीं, काळजाला घरे पडतात. सासरीं राहण्याविषयीं मुलींचीं मनें विटतात तीं यामुळेंच. हो असा अपमान कुणाला सहन होईल?—याकरितांच बरें का मुली जन्माला आल्या न आल्या कीं सर्व बांधवजनाला इतकें वाईट वाटतें तें !'

हा सर्व कांगावा पाहून अर्थातच मदयंतिकेला वाटलें कीं, ही इतकी कळवळून बोलते आहे तेव्हां दादानें तसेंच कांहीं अयोग्य–अभद्र भाषण केलें असेल. तिनें बुद्धरक्षितेला विचारिलें तेव्हां ती ह्मणाली, 'हो आह्मींही ऐकिलें आहे.' तेव्हां मदयंतिकेला अधिकच उत्कंठा झाली व ती ह्मणाली–' काय–काय तें?' त्यावर–' मला इतउत्तर तुज कौमारबंधकीशीं कांहींएक कर्तव्य नाहीं–असें नंदन बोलला' असें बुद्धरक्षितेनें सांगितलें. तें ऐकतांच मदयंतिकेलाही खरोखर फारच वाईट वाटलें. व ती कानांत बोटें घालून ह्मणाली,—' अग बाई—काय हें भाषण–काय हा उपमर्द ! छेः, छेः, गडे लवंगिके, यापुढें मी तुला आपलें तोंड दाखविण्याला सुद्धां योग्य नाहीं. तरी मी कांहीं बोलूं का ? माझाही तुजवर थोडासा हक्क आहे.'

लवंगिका ह्मणाली, 'अग हो, मी तुझीच आहें.' त्यावर मदयंतिका ह्मणाली, 'आमच्या दादाची दांडगाई राहूं दे एकीकडे, तरी सुद्धां तुह्मी त्याच्याशीं असें वागणें योग्य नाहीं. किती झालें तरी तो नवरा. तसेंच इला अयोग्य अशा रीतीनें व अमर्यादपणानें दादा बडबडण्याचें कारणही तुह्मी जाणत नाहीं असेंही नाहीं.' तिला लवंगिका ह्मणाली, 'काय, असेंही कांहीं झालें आहेका ? तें काय आह्मांला नाहीं बाई ठाऊक!,

विधानें आहेत, वस्तुविपर्यास आहेत, अथवा बाष्कळ प्रलाप आहेत त्यांस उत्तर देण्याचा यत्न करणें ह्मणजे वृथा कालक्षेप आणि स्थलक्षेप करणें आहे. तें काम आह्मी करणार नाहीं. आणखीही पाहिजे तितकें बाष्कळ लिहून आणि सज्जननिंदा करून खुशाल कोकिळानें धन्यता मानावी.

गच्छ सूकर भद्रं ते ब्रूहि सिंहो मया जितः ।
पण्डिता एव जानन्ति सिंहसूकरयोर्बलम् ॥

## सूचना.

आमच्या कित्येक आश्रयदात्यांकडे वर्गणीची रकम बरीच येणें राहिली आहे. त्यांसंबंधाचा आंकडा त्यांजकडे पाठविण्यांत येईल. चुकभूल पाहून बाकीचा उलगडा लौकर करण्याविषयीं त्यांस विनंती आहे. मोठे उपकार होतील.

पत्ते बदलले असल्यास लिहून कळविण्याबद्दल आश्रयदात्यांस विनंती आहे.

# पोंच.

१. प्रोफेसर भाऊसाहेब नाटक–रा. रा. विनायक शिवराम खरे यांनी रचिलें. रोजच्या व्यवहारांत घडून येणाऱ्या गोष्टींचें यांत चित्र आहे. नाटक शोकपर्यवसायी केलें आहे. परंतु तें अगदीं विसंगत दिसतें. आनंदपर्यवसायी झालें असतें तरच तें चांगलें दिसलें असतें. तें शोकपर्यवसायी पाहिजे ह्मणून व्यर्थ नायकनायिकेचा प्राण घेतला आहे. तसेंच नाटक आटपशीर करण्याचा उद्देश असल्यामुळें कित्येक ठिकाणीं रसपरिपोष व्हावा तसा झाला नाहीं असें वाटतें. 'भाषा फार साधी, सोपी व चित्ताकर्षक आहे'–असें कै० रा. रा. हरि महादेव पंडित यांच्याप्रमाणें आमचेंही मत आहे.

२. बालशुश्रुषा–डा० विष्णु कृष्ण परुळकर यांनीं केलें.

रा. रा. शंकर नारायण भागवत यांनीं तापावर, खोकल्यावर वगैरे देशी औषधें तयार केलीं आहेत आणि तीं लोकांस घेण्यास सोईवार पडावीं ह्मणून त्यांची किंमत एकेक आणा ठेविली आहे. यांतील सात प्रकारचीं औषधें त्यांनीं आह्मांकडे अभिप्रायार्थ पाठविलीं आहेत. गरीब आजारी लोकांनीं याचा अनुभव घेऊन पहावा, अशी त्यांस शिफारस आहे.

॥ श्रीः ॥

# विविधज्ञानविस्तार.

## A MONTHLY MAGAZINE

OF

## MARATHI LITERATURE

FOR

Ladies and Gentlemen.

कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरितां.

पुस्तक ३०. आगष्ट १८९९. अंक ८.

विषय. अनुक्रमणिका. पृष्ठ.



मुंबईत
गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत छापिलें.
वर्षाची वर्गणी रुपये ३; टपालखर्च आणे ६.

महाडकर वर्गणीदार—पत्र पोंचलें. सूचनेचा योग्य विचार होईल.

श्रीमती सौभाग्यवती **काशीबाई** कानिटकर यांनीं या अंकांत "चांदण्यांतील गप्पा" या सदराखालीं जी एक गोष्ट लिहिली आहे तिला 'गयादिनाचे उपकार' हें प्रथमत: नांव दिलें होतें, परंतु ग्रंथकर्त्रीनें त्या गोष्टीस 'मारुतीचा प्रसाद' असें नवीन नांव दिलें आहे.

---

# पोंच.

---

**कुसुममाला**—हें पुस्तक रा. रा. मोरो गणेश लोंढे यांणीं लिहिलें. यांत कै. विश्वनाथ नारायण मंडलिक मृत्यु, शिवाजीचे आत्मगत विचार, इ० आठ विषयांवर कविता आहेत; आणि त्या चांगल्या साधल्या आहेत. अर्थबोधार्थ टीपाही फार द्याव्या लागल्या नाहींत. यासंबंधानें साधारणपणें रा. लोंढे यांचें प्रस्तुत पुस्तक यांच्या इतर पुस्तकांला अपवाद आहे.

---

**नीतिसौंदर्य**—इंग्लंड देशांत **मेरी कॉरेली** नांवाची एक प्रसिद्ध ग्रंथकर्त्री आहे. तिच्या ग्रंथांत मनुष्यस्वभावद्योतक आणि सृष्टिनिरीक्षणासंबंधाचे जे निरनिराळ्या ठिकाणीं उल्लेख आहेत ते Beauties of Mary Coreli या इंग्रजी ग्रंथांत ग्रथित केले आहेत. त्याच्या आधारें प्रस्तुत 'नीतिसौंदर्य' हें पुस्तक रा. कृष्णाजी नानाजी अस्नोडकर यांनीं मराठींत लिहिलें आहे. पुस्तकास दिलेलें नांव आंतील विषय वाचून पहातां जरी अन्वर्थक दिसत नाहीं तरी पुस्तक वाचनीय आणि संग्राह्य आहे. निर्णयसागर छापखान्यांत मुद्रणकलेची किती सुधारणा झाली आहे, याची साक्ष प्रस्तुत पुस्तक उत्तम प्रकारें पटवील.

---

कै० **काशीनाथ त्रिंबक तेलंग** यांचें पद्यात्मक चरित्र—रा० रा० दामोदर फटुबा भांडारी यांनीं आर्यावृत्तांत रचिलें आणि परवां तेलंगांच्या पुण्यतिथीच्या वेळीं प्रसिद्ध केलें. कवितेच्या चांगुलपणाबद्दल डा० **भांडारकर** आणि रा. रा. **रामभाऊ गुंजीकर** यांचे अनुकूल अभिप्राय आहेत, ही गोष्ट आमच्या होतकरू कवीस भूषणावह आहे. सतत प्रयत्नानें ते मराठींत एक चांगले कवि बनतील.

तेलंगांचें सविस्तर चरित्र त्यांचे निकट स्नेही नारायणराव चंदावरकर लिहित आहेत, ह्मणून बरेच दिवस बातमी आहे; आणि तें काम करण्यास ते सर्वांशीं योग्य आहेत यांत संशय नाहीं. परंतु तेलंग स्वर्गवासी होऊन सहा वर्षें लोटलीं तरी अजून त्यांचें हें चरित्र प्रकाशांत येत नाहीं. याचें कारण काय बरें असावें? कदाचित् चरित्रलेखनास हवी तशी सामुग्री त्यांस मिळत नसेल; ह्मणून अंगीकृत कार्याचा त्याग करणें योग्य होणार नाहीं. आमची आशा आहे कीं, 'हिंदुयुनियन क्लब'चो मंडळी—जिनें न्यायमूर्ति रानडे आणि डा० भांडारकर यांस व्यासपीठावर बसवून तेलंगांच्या दोन पुण्यतिथी जागविल्या ती—येत्या सालच्या पुण्यतिथीच्या दिवशीं तेलंगांचें चंदावरकरांनीं लिहिलेलें चरित्र लोकांच्या हातीं देऊन आपल्या माजी अध्यक्षांच्या ऋणांतून स्वत: मुक्त होईल आणि दुसऱ्यांसही मुक्त करील.

---

श्री.

# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ३०. अंक ८.

## उद्भिज्जचमत्कार.*

( उत्तरार्ध. )

**सज्जन हो!**

गेल्या वर्षी " **उद्भिज्जचमत्कार** " या नांवाचें जें मीं या स्थळीं व्याख्यान दिलें, त्यांत हातीं घेतलेल्या विषयाचा **पूर्वार्ध** झाला. त्यांत वनस्पतींच्या संरक्षक अवयवांचें-ह्मणजे मुळें, कांडें, आणि पल्लवसमुदाय यांचें-वर्णन करून पुष्पांच्या अवयवांचें आणि त्यांच्या परस्पर-कार्यकारणसंबंधाचें दिग्दर्शन केलें. फलधारण झाल्यावर फलांच्याठायीं कोणकोणते प्रकार घडून येतात; तीं परिपक्क दशेस कशीं येतात; बीजोत्पत्ति कशी होते; बीजांची वृद्धि होत असतांना त्या बीजांच्या घटनेंत कोणकोणते फेरफार होतात; वनस्पतींच्या निरनिराळ्या वंशांचा विस्तार होण्याचें सामर्थ्य प्राप्त करून घेण्यांत बीजांच्याठायीं कोणकोणतीं साधनें प्राप्त होतात; बीजप्रसरण ह्मणजे काय आणि तत्प्रीत्यर्थ बीजांच्या घटनेंत आणि विशेषतः बीजकवचांत कोणकोणते चमत्कार घडून येतात; व य[illegible] शुद्ध नैसर्गिक योजनांनीं वनस्पतींचे [illegible] कोणत्या प्रकारें होत असतें; या सर्व [illegible] आजच्या व्याख्यानांत निरूपण करण्याचे [illegible] योजिलें आहे.

मागच्या वर्षी माझें व्याख्यान पुरें झाल्यानंतर शिष्टसंप्रदायानुसार माझ्या व्याख्यानाबद्दल माझे आभार मानण्याच्याप्रसंगीं एका वि[illegible] जें सुबोध भाषण केलें त्यांत त्यांनीं उद्भि[illegible] टींतील ज्या कांहीं विशेष चमत्कारिक अ[illegible] स्पतींचें वर्णन केलें व कांहीं **म्यांड्रागोरा**[illegible] चे मनुष्यावयवकृति साक्षात् नमुने दाखव[illegible] त्यांवरून मला असें वाटलें कीं, मी माझ्या [illegible]ख्यानास " **उद्भिज्जचमत्कार** " हें नाम[illegible] न दिल्यामुळें कित्येकांचा असा समज [illegible] असावा कीं, " **उद्भिज्जचमत्कार** " ह्मणजे [illegible]स्पतींमध्यें जें कांहीं विशेष चमत्कारिक [illegible] त्याचेंच वर्णन करण्याचा माझा विचार [illegible] परंतु तसें नाहीं. तर, संपूर्ण सृष्टींतील [illegible] कोटींत ज्या अर्थी वनस्पतींचा समावेश [illegible] येतो; ह्मणजे, ज्या अर्थी **जरायुज**, **अंडज**

* प्रस्तुत व्याख्यान लेफ्टेनंट कर्नल कान्होबा रणछोडदास कीर्तिकर, इंडियन मेडिकल सर्व्हिस, यांनीं मुंबईच्या हेमंतोत्सवांत ता० २३ आणि ३० मार्च १८९९ या दोन रोजीं दिलें. या विषयाचा पूर्वार्ध वि. ज्ञा. वि. २७व्या पुस्तकाच्या ७।८ अंकांत छापलेला आहे.

श्री.


# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ३०. अंक ८.


## उद्भिज्जचमत्कार.*

( उत्तरार्ध. )

**सज्जन हो!**

गेल्या वर्षीं " **उद्भिज्जचमत्कार** " या नांवाचें जें मीं या स्थळीं व्याख्यान दिलें, त्यांत हातीं घेतलेल्या विषयाचा **पूर्वार्ध** झाला. त्यांत वनस्पतींच्या संरक्षक अवयवांचें–ह्मणजे मुळें, कांडें, आणि पल्लवसमुदाय यांचें–वर्णन करून पुष्पांच्या अवयवांचें आणि त्यांच्या परस्परकार्यकारणसंबंधाचें दिग्दर्शन केलें. फलधारण झाल्यावर फलांच्याठायीं कोणकोणते प्रकार घडून येतात; तीं परिपक्व दशेस कशीं येतात; बीजोत्पत्ति कशी होते; बीजांची वृद्धि होत असतांना त्या बीजांच्या घटनेंत कोणकोणते फेरफार होतात; वनस्पतींच्या निरनिराळ्या वंशांचा विस्तार होण्याचें सामर्थ्य प्राप्त करून घेण्यांत बीजांच्याठायीं कोणकोणतीं साधनें प्राप्त होतात; बीजप्रसरण ह्मणजे काय आणि तत्प्रीत्यर्थ बीजांच्या घटनेंत आणि विशेषत: बीजकवचांत कोणकोणते चमत्कार घडून येतात; व या सर्व शुद्ध नैसर्गिक योजनांनीं वनस्पतींचें पुनरुज्जीवन कोणत्या प्रकारें होत असतें; या सर्व गोष्टींचें आजच्या व्याख्यानांत निरूपण करण्याचें मीं योजिलें आहे.

मागच्या वर्षीं माझें व्याख्यान पुरें झाल्यानंतर शिष्टसंप्रदायानुसार माझ्या व्याख्यानाबद्दल माझे आभार मानण्याच्याप्रसंगीं एका विद्वानानें जें सुबोध भाषण केलें त्यांत त्यांनीं उद्भिज्जकोटींतील ज्या कांहीं विशेष चमत्कारिक अशा वनस्पतींचें वर्णन केलें व कांहीं **म्यॉंड्रागोरा** मुळांचे मनुष्यावयवकृति साक्षात् नमुने दाखल केले, त्यांवरून मला असें वाटलें कीं, मी माझ्या व्याख्यानास " **उद्भिज्जचमत्कार** " हें नामाभिधान दिल्यामुळें कित्येकांचा असा समज झाला असावा कीं, " **उद्भिज्जचमत्कार** " ह्मणजे वनस्पतींमध्यें जें कांहीं विशेष चमत्कारिक असेल, त्याचेंच वर्णन करण्याचा माझा विचार होता. परंतु तसें नाहीं. तर, संपूर्ण सृष्टींतील सप्राणकोटींत ज्या अर्थीं वनस्पतींचा समावेश करितां येतो; ह्मणजे, ज्या अर्थीं जरायुज, अंडज आणि

---

* प्रस्तुत व्याख्यान लेफ्टेनंट कर्नल कान्होबा रणछोडदास कीर्तिकर, इंडियन मेडिकल सर्व्हिस, यांनीं मुंबईच्या हेमंतोत्सवांत ता० २३ आणि ३० मार्च १८९९ या दोन रोजीं दिलें. या विषयाचा पूर्वार्ध वि. ज्ञा. वि. २७ व्या पुस्तकाच्या ७।८ अंकांत छापलेला आहे.

**स्वेदज** कोटींप्रमाणेंच **उद्भिज्जकोटी**चें जीवन-चरित्र **सजीवकोटीं**त–ह्मणजे **सप्राणकोटीं**त-गणितां येतें, त्या अर्थीं वनस्पतींस प्रायः जरी जनांमध्यें **सप्राणकोटीं**त गणण्याचा संप्रदाय नाहीं, तरी त्यांस **सप्राणां**तच गणिलें पाहिजे. हा जो चमत्कार आपल्या अनुभवांत येतो, तेव-ढ्याचपुरता मी " **उद्भिज्जचमत्कार** " या सं-ज्ञेंत अर्थ धरिला होता, आणि तो आजच्या प्रसंगींही कायम आहे. उद्भिज्जांत ज्या अनेक विशेष चमत्कारिक वस्तु देशोदेशीं, स्थळो-स्थळीं, आपल्या पाहण्यांत येतात त्यांचा वि-शेषरीत्या उल्लेख करण्याचा माझा यत्किंचितही विचार नव्हता; **जरायुज, स्वेदज,** आणि **अंडज** अशा प्राण्यांच्या जीवनाचा विचार मनीं आ-णून, **उद्भिज्जांचें** सारें जीवन किती चमत्कारिक आहे, हाच हेतु धरून या विषयावर बोलण्या-चें योजिलें होतें, व हेत्वनुरूपच बोलण्याचा रोंख होता, असें स्पष्ट सांगणें आज मला अवश्य वाटतें. पुनः कधीं या स्थळीं अथवा अन्यत्र व्याख्यानाचा योग येईल, तर उद्भिज्जकोटींतील **विशिष्ट चमत्कारांचें** वर्णन करीन अशी मी आशा बाळगितों. एवढें सांगून गेल्या वर्षीं योजिलेल्या विषयाच्या अवशिष्ट भागाचें विवे-चन करण्यास आतां प्रारंभ करितों. यांत सात प्रकरणांचा समावेश केला आहे, तो येणेंप्रमाणें:-

## ( प्रकरण पहिलें. )

### फलधारण झाल्यावर फलांच्याठायीं कोणकोणते प्रकार घडून येतात.

पुंकेसरांतील परागकण स्त्रीकेसराच्या अग्र-भागावरील इंद्रियांवर पडले ह्मणजे **सबीज-**वनस्पतिवर्गामध्यें गर्भधारणास प्रारंभ होतो. आतां गर्भधारणाचें स्थान कोणतें याचा प्रथम विचार करूं. स्त्रीकेसराच्या खालच्या भागास, " गर्भाशय " ह्मणून एक पोकळी असते, तिच्या अंतर्भागीं गोलाकृति अथवा अंडाकृति एक अथवा अनेक पिंड असतात; त्यांस मी " **गर्भपिंड** " अशी संज्ञा देतों. परागकणाचा स्त्रीकेसरनलिकेच्या अग्रभागाशीं संयोग झाला ह्मणजे, परागकणाच्या बाह्यत्व-चेंतील रंध्रांतून त्याच परागकणाच्या अंत-स्त्वचेचा कांहीं भाग नलिकारूप धारण करून स्त्रीकेसरनलिकेंत प्रवेश करितो. प्रवेश केल्या-नंतर, हळू हळू ही **परागनलिका** वाढत जाते. ही **परागनलिका** वाढत असतांना स्त्रीकेसरन-लिकेमध्यें एका प्रकारचा डिंक अथवा शर्कराम-य स्निग्धरस उत्पन्न होऊन परागनलिकेची स्त्रीकेसरनलिकेमधील प्रवेशक्रिया सुलभ करितो; इतकेंच नाहीं, तर त्या **परागनलिकेचें** पोषण करून, तिची वृद्धि करण्यास साहाय्यकारी होतो. हा उद्भिज्जांमधील कार्यकारणसंबंध, तसाच सेव्यसेवक भावसंबंध–अथवा पोष्यपोषकसंबंध ह्मणा, किती विस्मयकारक आहे! या स्निग्ध रसाला " **परागनलिकावाहकद्रव** " अशी संज्ञा आहे. हा पदार्थ गर्भधारण-कालींच उद्भूत होतो, अन्यकालीं होत नाहीं, हें सांगणें अवश्य आहे. त्याचप्रमाणें, हा पदार्थ ज्या स्त्रीकेसरांचा परागणकणांशीं सं-योग झाला आहे त्यांतच उद्भूत होतो, इतरांत होत नाहीं, हेंही सांगणें अवश्य आहे. हा रस जणुं काय परागनलिकेस आश्वासन देतो कीं–' हे फलसिद्धिकारिणी परागनलिके! तूं ये! कितीही दूर गर्भधारणस्थान असलें, तथापि मी तुला तेथवर नेऊन पोंहचवीन. मजकडून कांहीं उणें पडूं देणार नाहीं; मी आपल्या कामीं तत्पर आहें; तूंही तत्पर अ-

सलीस, तर आपण उभयतां ज्या वनस्पतींच्या ठायीं वास करीत आहों त्या वनस्पतींच्या पुनरुज्जीवनाचें कार्य साधूं; आणि ज्या पुष्पाच्याठायीं आपण आहों, त्या पुष्पाला फलधारण करण्याची शक्ति देऊं; व त्यांत बीजोत्पत्ति होईल अशी आपण यथाशक्ति योजना करूं.' मित्रहो! विचार करून पाहाल तर, हा सामान्य चमत्कार नव्हे. असो. कधीं कधीं ही परागनलिका अनेक इंच लांब वाढत जाते. हिचा नियोजित अंत ह्मटला ह्मणजे, गर्भाशयाचें मुख; तेथपर्यंत एकदांची ही नलिका येऊन ठेपली ह्मणजे गर्भधारणाच्या क्रियेस प्रारंभ होतो. आतां हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, परागसंयोगानें स्त्रीकेसरनलिकेंत ज्या कालीं आणि ज्या मानानें मीं सांगितलेले हे चमत्कार घडून येतात, त्याच कालीं आणि त्याच मानानें **गर्भाशयाच्या** व **गर्भपिंडांच्याही** घटकावयवांत तसेच विस्मयजनक फेरफार घडून येत असतात. ह्मणजे **गर्भपिंडाच्या** सूक्ष्म **आद्यपिंडांत** अशी कांहीं विलक्षण शक्ति प्राप्त होते कीं, स्त्रीकेसरनलिकेंतून यथानुक्रम ह्मणजे एकाच दिशेनें **गर्भाशयाकडेच** मार्गक्रमण करित आलेल्या **परागनलिकेचा गर्भाशयाच्या** मुखाशीं संयोग झाला कीं, **गर्भपिंडांत बीजधारणक्रियेस** प्रारंभ होतो. त्याचें सूक्ष्मरीत्या वर्णन करणें आपणांस कंटाळवाणें वाटेल, ह्मणून येवढेंच सांगतों कीं, ज्या पुष्पाच्याठायीं **बीजधारणास** प्रारंभ होतो, त्या पुष्पाच्याठायीं **फलधारण** झालें असें समजावें. उद्भिज्जशास्त्ररीत्या "**फलधारण**" आणि "**बीजधारण**" या संज्ञा समानार्थी आहेत असे लक्षांत ठेवावें. बीजधारणास प्रारंभ झाला ह्मणजे स्त्रीकेसरनलिका हळू हळू शुष्क होते; कधीं कधीं ही नलिका "**क्लीमाटीस**" नामक वल्लीच्या फळामध्यें परिपक्व झालेल्या फळासह पिसाच्या रूपानें पाहण्यांत येते. आतां, जरी "**बीजधारण**" आणि "**फलधारण**" या केवळ पर्यायसंज्ञा आहेत असें मी ह्मटलें आहे, तथापि कांहीं "**फळें**" ह्मणून जीं आपण खाद्य पदार्थांत गणितों, त्यांमध्यें गर्भाशयाहून भिन्न अशा पुष्पांतर्गत भागांचा अथवा पुष्पावयवांचा समावेश होतो. उदाहरणार्थ—सफरचंद, कलिंगण, कांकडी, भोंपळा, पेरू इत्यादि फळें घेऊं या. या फळांमध्यें खाद्य जो मुख्य पदार्थ आहे, तो **पुष्पवटिकेचा** वृद्धि पावलेला प्रकार होय. तो गर्भाशयाच्या आच्छादनाशीं संमीलन पावून तयार झालेला असतो. **अननस** ह्मणून जो पदार्थ आपण **फळ** ह्मणून खातों त्यांत अनेक पुष्पांचे एकाच देंठावर असणारे **गर्भाशय** व **पुष्पसमुदायाचीं आच्छादनें** यांचा समावेश असतो; **अंजीर, वडाचीं, उंबराचीं, पिंपळाचीं फळें** घ्या; त्यांत उद्भिज्जशास्त्ररीत्या "**फळ**" ह्मणून जें कांहीं आहे, त्याची संख्या अगणित आहे. त्यांतील प्रत्येक बीजास फळाची संज्ञा देतां येते; परंतु साधारण प्रचारांत, त्या फळांच्या समुदायाला जें फलधारण करणाऱ्या शर्करायुक्त रसभरित वटिकेचें आच्छादन असतें, त्यासच आपण फळ अशी संज्ञा देतों. ह्मणजे **अंजीर** ह्मणून जीं फळें गणिलीं जातात तीं उद्भिज्जशास्त्ररीत्या **फळें** नव्हेत, तर केवळ त्यांमध्यें **अनेक फळें** सिद्ध झालेलीं असून, तीं **फलधारण करणाऱ्या** आंतल्या फळांस वेष्टन करणारीं, पुष्पांच्या देंठांची वृद्धि होऊन तयार झालेलीं, शुद्ध शर्करामिश्रित आसनेंच होत. याप्रकारें निर्दिष्ट केलेल्या

उदाहरणांवरून असें दिसून येईल कीं, जरी "**फलधारण**"–ह्मणजे गर्भपिंडांच्या ठायीं "**बीजधारण**" होणें–हा उद्भिज्जवर्गांत सर्वतोपरी साधारण नियम आहे, तथापि गर्भधारण ह्मणजे अनेकप्रकारें बीजांची प्राप्ति होण्यास व त्यांचें संरक्षण करण्यास पुष्पांचे, पुष्पवटिकेचे अथवा पुष्पाच्या देंठांचे जे जे कांहीं भाग कारणभूत होतात, त्यांस साधारण प्रचारांत "**फल**" अशी संज्ञा देतां येते.

आतां गर्भाशय परिपक्कदशेस येत असतांना त्यांत होणारे प्रकार थोडक्यांत सांगतों.—

हे प्राय: तीन प्रकारचे गणिले आहेत; ते येणेंप्रमाणें:—

## ( पहिला प्रकार. )

गर्भाशयांतील कांहीं भागांत नवी व्यवस्था होणें; ह्मणजे कांहीं स्थळीं **विशेष "वृद्धि" होणें.** हा प्रकार **धोत्र्याच्या** फळांत व **बाहव्याच्या** शेंगेंत दिसून येतो. धोत्र्याच्या पक्क फळाचे चाकूनें मधोमध दोन आडवे तुकडे केले, ह्मणजे त्या तुकड्यांमध्यें चार पांढरे पडदे दिसून येतात. आरंभीं, धोत्र्याच्या गर्भाशयाची व्यवस्था–ह्मणजे धोत्र्याच्या स्त्रीकेसराच्या बुडाशीं जी व्यवस्था असते ती–तपासून पाहिली असतां, गर्भाशयांत दोनच पांढरे पडदे असतात असें दिसून येतें; परंतु गर्भाशयांत गर्भधारण झालें कीं हळू हळू त्यांत दोहोंच्या ऐवजीं चार पडदे होतात. हें मी आपणांस प्रत्यक्ष दाखवितों. ( यानंतर डाक्टर साहेबांनीं गर्भाशयांत गर्भधारण होण्यापूर्वींचा स्त्रीकेसराचा कापलेला भाग व दुसरा धोत्र्याच्या शुद्ध फळाच्या मध्यभागांतून हा आडवा कापलेला भाग दाखविला. त्यांत दोहोंच्या ठिकाणीं चार पडदे होते. ) आतां हे दोन जास्त पडदे कसे झाले असा प्रश्न निघतो. तर ऐका. पुष्पाच्या देंठांतून निघणाऱ्या ज्या भागांवर स्त्रीकेसरांत मध्यरेषेच्या दोन बाजूंस गर्भपिंड जडलेले असतात, ते दोन भाग, बीज वाढत असतांना, वृद्धिंगत होतात; त्या काळीं त्या प्रत्येक भागांत दुसरा एक आगंतुक असा श्वेत पडदा उद्भूत होतो. तसेंच, बाहव्याच्या फुलांतील स्त्रीकेसर, गर्भधारणापूर्वीं तपासून पाहिला, तर त्यांत एकच पोकळी असते असें दिसून येईल; ह्मणजे, ज्याप्रमाणें वाटाण्याच्या शेंगेंत एकच पोकळी असते, त्याचप्रमाणें बाहव्याच्या शेंगेंतही आरंभीं एकच पोकळी असते; गर्भधारण झाल्यानंतर वाटाण्याच्या शेंगेमध्यें ही पोकळी, जरी तींत अनेक वाटाणे असले तरी, कायम राहते. परंतु बाहव्याच्या स्त्रीकेसरांत गर्भधारण झालें कीं, त्यांतील दरएक बीजासभोंवती एक एक टणक असा आडवा पडदा उद्भूत होतो. तेणेंकरून बाहव्याच्या शेंगेंत जितकीं बीजें असतात, तितके निरनिराळे आडवे पडदे असतात. ते मी आपणांस येथें प्रत्यक्ष दाखवितों.

## ( २ ) गर्भाशय परिपक्कदशेस येत असतांना त्यांत होणारा दुसरा प्रकार.

हा वर सांगितलेल्या प्रकाराच्या उलट आहे; ह्मणजे येथें **गर्भाशयां**तील कांहीं भागांची **वृद्धि** न होतां उलट त्या भागांचा, गर्भाशय परिपक्क होत असतांना, **ऱ्हास** होतो. उदाहरणार्थ–**ओक** आणि **हेझल** हे जे थंड प्रदेशांत उत्पन्न होणारे प्रसिद्ध वृक्ष आहेत, त्यांच्या स्त्रीकेसरांत आरंभीं तीन तीन पोकळ्या असतात. पुष्पाच्या त्रिकोशधारी स्त्रीकेसरांत गर्भधारणक्रिया घडून आली ह्मणजे. प्रत्येक पोकळींत ह्मणजे

**गर्भपिंडांत** एकेक बीज, अशा मानानें तीन बीजांची प्राप्ति न होतां अवघ्या फुलांमध्यें दोनच बीजें तयार होतात; अर्थात् दोनच कोशांत, ह्मणजे एकएका कोशांत एकएक या मानानें, बीज सिद्ध होतें. तिसरा कोश व त्यांतील गर्भपिंड नाश पावतात.

मुंबईनजीक वांद्रें मुक्कामीं राहणाऱ्या माझ्या एका आंग्लदेशीय मित्रानें, चीन देशांत वाढणारें झाड मुंबईंत एका बागेंत लावलेलें फळास आलें आहे, त्याचीं फळें मजकडे पाठविलीं आहेत. तीं टेंभुर्णीच्या जातीचीं आहेत. त्या फळांत पांचांच्या ऐवजीं कोठें चारच बीजें आहेत.

शाळेंत शिकणाऱ्या शिशुजनांची अभ्यासपराङ्मुखता झाली, ह्मणजे आपल्या देशांत जशी आपण वेताच्या छडीची योजना करितों, तशी त्याच्या ऐवजीं **इंग्लंड देशांत** “ **बर्च** ” नामक वृक्षाच्या मऊ काठीची योजना करीत असतात; त्या “ **बर्च** ” वृक्षाच्या पुष्पांत प्रारंभीं दोन **गर्भाशय** असतात; तेणेंकरून त्यांत दोन बीजें असावीं; परंतु **गर्भधारणक्रिया** समाप्त झाल्यानंतर, त्यांतील एकाच गर्भाशयांत गर्भधारण होतें; दुसरा **गर्भाशय** ऱ्हास पावतो. अर्थात् तेथें दुसरें बीज प्राप्त होण्याचा मार्गच उरत नाहीं. तसेंच आमच्या ठाणें शहरीं अतोनात वाढणाऱ्या “ **वावळ्या** ”च्या प्रचंड आणि असंख्य फलदायी वृक्षांच्या प्रत्येक फळांत एकच बीज दिसण्यांत येतें.

**( ३ ) गर्भाशय परिपक्वदशेस येत असतांना त्यांत होणारा तिसरा प्रकार:—**

हा प्रकार पेरू, लिंबें, संत्रीं, पपनस, बेलफळ, कवीठ, गोरखचिंच, टोम्याटो इत्यादि फळांत वडून येत असतो. या फळांमध्यें जो कांहीं अपूर्व, प्रसंगीं अत्यंत रुचकर आणि परमसुखकारक असा पदार्थ सिद्ध होतो, तो गर्भाशयांतील घटकावयवांचाच रूपांतरें अंश होय असें समजलें पाहिजे. विलायतेमध्यें “ **स्ट्राबेरी** ” नामक जें एक अत्यंत रुचकर फळ तेथील ग्रीष्मऋतूंत तयार होत असतें, त्याचा “ **फळ** ” ह्मणून जो कांहीं अंश आहे तो आपल्या “ **अनर्श्या** ”वर घोळविलेल्या **अफू**च्या बीजांच्या एवढा, ह्मणजे **खसखशी** एवढा क्षुद्र असतो. जर “ **स्ट्राबेरी** ” फळाची योग्यता तेवढया क्षुद्र व शुष्क बीजाच्याच विचारानें ठरविली, तर ती कांहींच नाहीं असें ह्मणावें लागेल. “ **स्ट्राबेरी** ” हें फळ मीं विलायतेंत तीन वर्षें सेवन केलें आहे; जसा आमचा ग्रीष्मकाळचा **आंबा**; जसें **चिन**देशींचें “ **लिची** ” नामक मधुर आणि रुचकर फळ; जसें **जावा, सिंगापूर** इत्यादि बेटांतील अत्यंत रुचकर फळांपैकीं “ **मंगुस्तान** ” नांवाचें फळ; त्याप्रमाणेंच विलायतचें ह्मणजे इंग्लंडदेशचें “ **स्ट्राबेरी** ” नामक फळ अत्यंत सुगंधयुक्त, मधुर आणि रुचकर आहे. आपल्या लोकांच्या समजुतीप्रमाणें **काशी पंढरीक्षेत्रीं** जाऊन जसें **देवाच्या भेटीस जाणें**, तसें विलायतेस जाऊन “ **स्ट्राबेरी** ” फळाची रुचि घेणें होय, असें मी समजतों. त्याचप्रमाणें “ **टोम्याटो** ” ह्मणून जें फळ आह्मीं त्या देशीं खातों त्याची, व आमच्या हिंदुस्थानांत झालेल्या “ **टोम्याटो** ”ची रुचि कांहीं निराळी आहे. विलायती “ **टोम्याटो** ” फळें विशेष रुचकर आहेत याचें कारण काय ? तर तें फळ त्या देशीं होत असतांना त्या फळामध्यें रुचकर शर्कराम्लादि रसांची योग्य प्रमाणानें सिद्धि होण्याची तत्परता हें होय. ही सुरस सिद्धि आमच्या देशांत निपजलेल्या “ **टोम्या-**

टो " नामक फळांत नाहीं हें मी निश्चयानें सांगतों.

## ( प्रकरण दुसरें. )

## फळें कशीं परिपक्क होतात ?

फळें एक**गर्भाशयी** अथवा अनेक**गर्भाशयी** असतात.

( १ ) **एकगर्भाशयी** फळांचा मासला शिंबिधान्य उत्पन्न करणारीं फळें–प्रचारांत ज्यांस " शेंगा " असें ह्मणतात त्या–होत. तसेंच आंबा, बदाम, जर्दाळू, आलुबोखार, माठ, तांदुळजादि भाज्यांचीं फळें अथवा बीजें ( येथें **फळ** तेंच **बीज** असें समजलें पाहिजे ) हीं एकगर्भाशयी होत; बदामाच्या, तसेंच जरदाळूच्या कठिण फलकोशांत कधीं कधीं दोन बीजें आढळण्यांत येतात, हा केवळ विचित्र प्रकार समजावा. जसें मनुष्यप्राण्यांस जुळीं मुलें होणें हें साधारण नियमाविरूद्ध आहे, तसेंच एका बदामाच्या अथवा जर्दाळूच्या आठींत दोन बीजें अथवा दोन दाणे असणें हें साधारण नियमाविरूद्ध आहे.

( २ ) **अनेक गर्भाशयी फळांचे** विविधप्रकार पहाण्यांत येतात ते येणेंप्रमाणें:—तांदूळ, गहूं, जव, जोंधळा, मक्का, वरी, नाचणी, बेलफळ, कवीठ, गोरखींचच, मुरुडशिंग, खसखशीचें फळ ( ज्याला प्रचारांत खसखशीचें फूल असें ह्मणतात तें ), बादयान, वेलची, धोत्रा, भेंडा, लालआंबाडी, उंडी, मंगुस्तान, लीची, अळू, टेंभरें, बोरें, रांजणें, तोरणें, आंवळे, बिलिंबें, काकडें, हरडा, बेहडा, काजू, भिलावा, आंबाडा, शेगट, केळें, देवकेळीचें फळ, मुळ्याच्या मोगऱ्या, पपनस, लिंबें, नारिंगें, संत्रीं, अक्रोड, द्राक्षें, धणे, बडिशेप, जिरें, नारळ, सुपारी, ताडफळ, पेरू, जांब, जायफळ, कलिंगण, चिबूड, टकमक, देवडांगरीं, भोंपळा, शिरोळा, पडवळ, कांकडी, कारलें, कटोंलें, गोमेटीं, तोंडलीं, परवरें, पोपया, सफरचंद, डाळिंब,–हीं फळें आपल्या देशांत निरनिराळ्या ऋतूंत यथाकालीं आपल्या पाहण्यांत येतात. या फळांच्या संबंधानें एक मुख्य गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे, ती ही कीं, हीं फळें, त्यांचि आकृति, व त्यांची खाद्य फळांत गणना, कोणत्याही प्रकारची असो; तीं रूचकर असोत कीं नसोत; तीं कडू असोत, गोड असोत, कीं आंबट असोत; तीं सेवनीय असोत कीं विषारी असोत, पोषक असोत कीं तारक असोत, कीं मारक असोत; तीं, व येथें न सांगितलेलीं अशीं दुसरीं अनेक फळें, आपापल्या झाडांवरील एकाच पुष्पापासून प्राप्त होत असतात.

आतां, अनेक पुष्पें, एकाच देंठावर स्थापित असून, त्यांपासून जीं आपणास फळें प्राप्त होतात तीं येणेंप्रमाणें:–हिमालय पर्वतावर वाढणाऱ्या सुंदर **देवदार** वृक्षाचें फळ; **अननस, अंजीर, उंबर, पिंपळाचें** व **वडाचें** फळ; **फणस**, लहु ( कोकणांत यास **ओट** ह्मणतात ), **ब्रेडफ्रुट** ( विलायती फणस ), **तुती** ह्मणजे **अंबोर**.

**तुती**च्या फळांत जो रूचकर खाद्य भाग असतो तो पुष्पवटिकेची वृद्धि झाल्यामुळें सिद्ध होतो. **अंजीर, उंबर, वड, पिंपळ** यांचीं फळें हीं, त्यांचीं असंख्य पुष्पें धारण करणाऱ्या लांब, खोल, अथवा रूंद देंठांची वृद्धि होऊन जो मऊ आणि रूचकर असा त्या पुष्पांना व तज्जनित बीजांना परिवेष्टन करणारा पदार्थ, त्यापासून सिद्ध होतात. आतां हीं जीं अनेक फळें निदर्शित

केलीं, तीं **गर्भधारण**काळीं अत्यंत क्षुद्रावस्थेंत असतात. तीं वाढत असतांना खाण्याच्या लायक नसतात. कांहीं आंबट असतात, कांहींकांमध्यें तुरटपणा, तसाच बेचवपणा असतो. तर, हीं फळें काळें करून कशीं रुचकर होतात, त्यांच्याठायीं मधुरपणा कसा येतो, व तेणेंकरून तीं उत्तम खाद्य पदार्थांच्या योग्यतेस कशीं येतात, याचा आतां विचार करूं. उदाहरणार्थ एक साधारण द्राक्षफळ घ्या; तें अपक्क असलें ह्मणजे फारच आंबट असतें; थोडेंसें तुरट असतें; तेंच परिपक्क झालें ह्मणजे अत्यंत मधुर असतें. हीं फळें परिपक्क होऊन सुकलीं, ह्मणजे आपणांस **मनुका, बेदाणा, खिसमिस**, इत्यादि अपूर्व गोडीचे, अमृततुल्य पदार्थ प्राप्त होत असतात; व आपण त्यांचा नेहमीं आपल्या पक्वान्नांत उपयोग करीत असतों. तर, ही त्यांच्या ठायींची परम आल्हादकारक मधुररसयोजना त्यांजमध्यें कशी प्राप्त होते, हा प्रश्न सहज निघतो. तर ऐका! या संपूर्ण सृष्टपदार्थांच्या ठायीं सजीव कोटींत अनेक गूढ क्रिया कालानुसार होत असतात; आणि या व्याख्यानमालिकेच्या गेल्यावर्षींच्या माझ्या व्याख्यानांत वनस्पतिवर्गाची मी सजीवकोटींत गणना केलीच आहे. अर्थात् जे जे प्रकार फळांच्याठायीं घडून येतात ते ते प्राणिजांच्या रसायनक्रियेच्या आणि जीवनव्यापारांच्या नियमानुरूप होत असतात असें मानिलें पाहिजे.

आजकाल पाश्चिमात्य रसायनशास्त्रज्ञांचे शोध हे आमच्या संपूर्ण ज्ञानाचें केवळ उगमस्थानच समजलें पाहिजे. जसें त्यांचे शोध आज इतर व्यवसायांत आमच्या उपयोगीं पडत आहेत, तसे वनस्पतींच्याविषयीं आज जें आह्मांस अत्युत्तम ज्ञान प्राप्त होत आहे, त्यांतही ते आमच्या कामीं पडत आहेत. या शोधकांच्या दक्षतेमुळें, जें ज्ञान आह्मांस आज प्राप्त होत आहे, तें अपूर्व समजलें पाहिजे. फलधारणाच्या तसेंच फळें परिपक्कदशेस पावण्याच्या क्रियेविषयीं जें ह्मणून ज्ञान आह्मांस उपलब्ध आहे, त्याचा गोषवारा आतां थोडासा देतों. रसायनशास्त्रवेत्ते असें ह्मणतात कीं, पुष्पांच्या ठायीं, ह्मणजे त्यांच्यामधील स्त्रीकेसरांत, गर्भधारण झालें ह्मणजे फळांची वृद्धि होत असतांना "**कार्बन**" नामक मूलतत्त्वाचा अंश कमी होत जातो; तेणेंकरून त्या फळाच्या ठायींचें कठिणपण जाऊन, तें नरम ह्मणजे मऊ होऊं लागतें. सूर्याच्या प्रखर तेजानें जो पानांतून प्राणवायु त्यक्त होतो तो या फळांतून, त्याचें बाह्याच्छादन जर पानांप्रमाणें हिरव्या रंगाचें नसलें तर, त्यक्त न होतां प्राणवायूच्या ऐवजीं "कार्बन्–डै–ऑक्सैड" नामक वायु त्यक्त होतो. हा प्रकार विशेषेंकरून ज्या फळांचें बाह्याच्छादन मऊ आणि रसभरित असतें त्यांत दिसून येतो.

---

## ( प्रकरण तिसरें. )

## फळांत होणारे रसायनचमत्कार.

हे फळांच्या रूपान्वयें व कालस्थित्यनुरूप होत असतात. फळांचें बाह्य कवच शुष्क असलें तर तें पांडुरवर्णाचें अथवा पिंगट असतें, व त्यांत काष्ठमय पदार्थांची घटना होते; ही काष्ठमय घटना झाली, ह्मणजे पुढें त्या फळाच्या बाह्यत्वचेंत रसायनक्रिया होत नाहीं; परंतु ज्या नूतन सिद्ध फळांची बाह्यत्वचा रसभरित असते, तीं फळें पक्क दशेस येवूं लागलीं, ह्मणजे त्यांच्या बाह्यत्वचेंत अनेक रंग प्रगट होतात. इतकेंच नाहीं, तर रुचकर खाद्य

पदार्थांचा अंशही वृद्धिंगत होतो; आणि तेणेंकरून अशा प्रकारचें फळ खाण्यास विशेष लायक होतें, व त्यांत रुचकर मधुरशा रसांची सिद्धि होते. प्रथमारंभीं त्यांत **आम्लरस** असतो, व त्यांत अनेक प्रकारचे **क्षार** उद्भूत होतात. हा **आम्लरस** व हे **क्षार** निरनिराळ्या फळांत निरनिराळ्या रूपांनीं पाहण्यांत येतात. उदाहरण:—द्राक्षांमध्यें "**टार्टारिक**" **आसिड** विशेष असतें, आणि थोडा **पोटासिअम् बायटारट्रेट**" क्षार असतो. सफरचंदांत व चिंचेंत "**मेलिक**" **आसिड** असतें; हीं फळें पक्व झालीं तरी त्यांतील रुचिकर अम्लत्व नष्ट होत नाहीं. परिपक्व झालेल्या उत्तम प्रकारचे "**कलमी**" आंब्यांत फारसा अम्लांश नसतो. किंचित् असला तर "**पायरी**" आंब्यासारख्या फळांस विशेष रुचि येते. आंबाड्यांत फारसा शर्करेचा अंश सिद्ध होत नसतो. करमर, बिलिंबें, करमरी आंवळे, हीं फळें परिपक्व झालीं, तरी त्यांत रुचकर आंबटपणा असावयाचाच; पानावळ्यांत व अंत्रुणांत, तसेंच करवंदांतही मधुरसमिश्रित अम्लत्व असावयाचेंच. लिंबें, नारिंगें, पपनस, यांत "**सिट्रिक**" **आसिड** असतें, तरी माधुर्याचा अंश विशेष असतो. बेलफळ अपक्वदशेंत तुरट असतें, पक्वदशेंत तें थोडेंसें गुळचट लागतें; हा गुळचटपणा अंशतः त्यांतील गुंदामुळें आहे; तसेंच अंशतः तो शर्करेच्या पायीं असावा असा माझा अजमास आहे. गोरख चिंच थोडी आंबट, थोडी गुळचट असते. बोरांत गोडी आणि आंबटपणा समतोल असतात, ह्मणून बोरें मुलांबाळांस अत्यंत प्रिय आहेत. पोपईत "**मेलिक**" "**सिट्रिक**" आणि "**टार्टारिक**" या तीनही **आसिडांचे** क्षार असतात; तथापि शर्करेचा अंश विशेष असल्यामुळें त्यांत अम्लत्वाचा पूर्ण अभाव दिसून येतो. आमच्या मुंबापुरस्थ **गार्स्लिंग साहेबांसारख्या** फलशाकाहाराभिलाषी पाश्चिमात्यांनीं पोपईच्या शुद्ध माधुर्यास भुलून असें ह्मटलें आहे कीं, उत्तम कलमी आंबा आणि उत्तम पोपईचें पक्व फळ यांची सारखीच रुचि आहे ! ह्मणजे घोडा आणि गाढव हीं सारख्याच योग्यतेचीं आहेत असें ह्मणण्यासारखीच जुळणी यांनीं केली, असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं. कोठें "इंद्राचा **ऐरावत** आणि कोठें शामभट्टाची तट्टाणी !" तात्पर्य काय कीं, आंबा तो आंबाच, आणि पोपई ती पोपईच. पोपई कितीही मधुर रसभरित असली, तथापि "**आफोस**" "**पायरी**" इत्यादि **कलमी** आंब्यांत जी रुचि आहे ती पोपईच्या ठायीं येणें, अथवा आणणें, सर्वथा असाध्य आहे. आतां मी पोपईची हेळणा करितों असें समजूं नका. जसा मी उद्भिज्ज शास्त्राचा सामान्य परंतु अनेक वर्षांचा अनुभविक भक्त आज आपणापुढें उभा आहें, तसाच मी वीसवर्षें वैद्यक्रिया करीत आलेला माणूस आहें. जशी उद्भिज्जशास्त्ररीत्या रुचीच्या मानानें पोपईची आंब्याशीं बरोबरी व्हावयाची नाहीं, तशी वैद्यशास्त्रदृष्ट्या आंब्यांची श्रेष्ठता उरत नाहीं. इतकेंच नाहीं तर, आंब्याची पोपईशीं बरोबरीही होणें कठिण आहे असें मी जाणतों. "कोठें इंद्राचा ऐरावत," इत्यादि या ह्मणीचा येथेंही उपयोग करितां येईल. या वैद्यकदृष्टिसंबंधानें पोपई ही इंद्राचा ऐरावत, आणि आंबा ही शामभट्टाची तट्टाणी, एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे. कारण ज्याला अग्निमांद्याची पीडा आहे, त्याला आंबा विषतुल्य होतो, ह्मणून तो सर्वथैव वर्ज्य आहे; परंतु पोपई हिरवी खा, कीं पिकलेली खा,

अथवा त्याच्या पर्णशाखादि भागांतील चिकट दुधासारख्या रसाचें, अग्निमांद्याच्या निरसनार्थ, अन्नाबरोबर सेवन करा; गुण यावयाचाच. गुण जरी आला नाहीं, तरी तन्मिश्रित अन्नानें अपाय व्हावयाचा नाहीं; तसेंच अशा स्थितींत आंब्यापासून अपाय निःसंशय होईल, असें समजा.

जीं फळें पक्व होण्यापूर्वी तुरट असतात, तीं पिकल्यावर गोड झालीं, ह्मणजे त्यांचा तुरटपणा बराच नाहींसा होतो; आणि कांहीं राहिलाच तर तो रुचकर लागतो. आतां, फळांचीं बाह्याच्छादनें परिपक्व होऊं लागलीं ह्मणजे त्यांत शर्करा सिद्ध होऊं लागते; आणि त्यांच्या ठायीं अम्लत्व उत्पन्न करणाऱ्या शुद्ध **आसिडाचा** अंश कमी होतो. त्यांच्यामध्यें या प्रकारचे फेरफार होण्यासाठीं प्रखर सूर्यतापाची आणि मोकळ्या हवेची आवश्यकता आहे. अंधःकारांत अथवा दाट छायेंत जें फळ वाढतें, त्यांतील अम्ल पदार्थ कायम राहतात; त्यांत शर्करा सिद्ध होत नसते. नुसता सूर्यप्रकाश त्यांना प्राप्त झाला तर थोडीशी शर्करा प्राप्त होऊन तीं फळें गुळचट मात्र लागतात. फळें परिपक्व होऊं लागलीं ह्मणजे त्यांतून "**कार्बन्-डाय्-ऑक्सैड**" वायु निघत असतो. तशीच पाण्याची वाफही निघत असते; अर्थात् त्या मानानें त्यांतील द्रवांश कमी होतो. अशा प्रसंगीं त्यांच्यांत उष्णतेचा अंशही वाढत असतो. आंबे "**चेपणीस**" घातल्यावर ते ज्या वेळीं पिकूं लागतात, त्या वेळीं ते हाताला किती गरम लागतात हें बहुतेकांस माहीत असेलच. बहुतेकांस नसलें तरी कांहीकांस ऐकून तरी ठाऊक असेलच. "**आलिव्ह**" ह्मणून एक दक्षिण युरोपांत, विशेषेंकरून इताली देशांत व स्पेन देशांत, दांडी बोराच्या आकाराचें फळ होत असतें; तें पक्व झालें, ह्मणजे त्याच्या बाह्याच्छादनांतून, तें जरा चेपलें कीं, पुष्कळ तेल निघतें. फळाच्या बाह्याच्छादनांत तें परिपक्वदशेस येत असतांना तेल सिद्ध होण्याचा हा विलक्षण प्रकार वनस्पतिवर्गींतील दुसऱ्या कोणच्याही फळांत झालेला आढळण्यांत आलेला नाहीं.*

**इतालीचे** व **स्पेन** देशचे लोक या **आलिव्ह** तेलाचा उपयोग खाद्यपदार्थ तळण्याच्या कामीं करितात. तसेंच भाजीपाला शिजविण्यांतही त्या तेलाचा उपयोग करितात; हें तेल रुचकर आहे, यांत तळलेले पदार्थ फारच सुग्रास असतात. केशवर्धनशक्ति या तेलांत उत्तम आहे असें ह्मणतात. आमच्या देशांत उत्तम तिळांचें तेल जसें सर्व प्रकारें चांगलें असतें, तसेंच हें "**आलिव्ह**" तेल समजावें. केशवर्धनप्रीत्यर्थ कोणत्याही प्रकारची आजपर्यंत योजना करण्याचा मला प्रसंग आला नाहीं, परंतु इतर रीत्या "**आलिव्ह**"

* हें व्याख्यान चालत असतां मध्येंच एक तरुण श्रोता उठून स्वार्णे असा प्रश्न केला कीं-" लिंबें, नारिंगें, चकोत्रे, यांत तैलांश नसतो काय ?" यास डाक्टर कीर्तिकरांनीं तेव्हांचे तेव्हांच समाधानकारक उत्तर दिलें, तें येणेंप्रमाणें:—लिंबें, नारिंगें, चकोत्रे, बेलफळें, संत्रीं, कढिनिंब, तिर्फळ, इत्यादनेक फळांच्या बाह्याच्छदनामध्यें, तसेंच त्यांच्या पानांमध्यें तैलांश असतो. पण माझ्या विचाराचा रोंख असा आहे कीं, यद्यपि लिंबांनारिंगांत हा तैलांश असला, तथापि यांतील तेलाचा संबंध निराळा आहे. "आलिव्ह" फळांतील तेल, तें फळ परिपक्वदशेस येतांना, तयार होतें. लिंबादि फळांच्या त्वचेंत व पानांत जें तेल असतें त्याचा फलपरिपक्वताक्रियेशीं कांहींच संबंध नसतो.

तेलाचा मला उत्तम अनुभव आहे. हें तेल उद्भिज्जांतील एक अत्यद्भुत चमत्कार आहे.

कांहीं फळें परिपक्क झाल्यावर पुढें तीं सडूं लागतात, व त्यांस कुजट वास येऊं लागतो. तीं कुजूं लागलीं ह्मणजे त्यांची गोडी हळू हळू नाहींशी होते, व पुन: त्यांच्याठायीं आंबटपणा येतो. फळें सिद्ध झाल्यापासून तीं परिपक्कदशेस येण्याचा काळ निरनिराळ्या झाडांसंबंधानें निरनिराळ्या मानानें पाहण्यांत येतो. बहुतेकांस महिनेच्या महिने लागतात. तृणधान्यें तयार होण्यास थोडेच दिवस लागतात; हिमालयपर्वतावरील देवदाराच्या वृक्षाचीं फळें परिपक्कदशेस येण्यास एक सबंध वर्ष लागतें.

फळें पक्क होत असतांना, जर तीं झाडांवरच असलीं तर, त्यांच्या आसपासचीं आणि विशेषेंकरून त्यांच्या देंठावरचीं पानें खुडून टाकूं नयेत. कारण तसें केल्यानें फळांत जी गोडी यावयाची ती येत नाहीं; अर्थात् पानें फळाच्या परिपक्कतेला अवश्य आहेत असें समजलें पाहिजे. आतां हें एक लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं, कांहीं झाडांच्या पानांतील रस जरी घशाशीं खवखवतो, तरी त्या झाडांचीं फळें रूचकर असून त्यांत खवखव उत्पन्न करणाऱ्या पदार्थाचा लेश मुळींच नसतो. यास उदाहरण:—तुतीच्या पानांचा दुधासारखा पांढरा आणि चिकट रस फार खवखव उत्पन्न करणारा आहे; परंतु फळ सुरेख, लाल किरमिजी रंगाचें, अथवा दुग्धवर्ण, व अत्यंत रसभरित आणि रूचकर असतें. त्या रसांत चिकटपणाचा मुळींच अभाव असतो. तसेंच अंजिराच्या पानांतून व डाहळ्यांतून वाहणारा चिकट व दुधासारखा पांढरा रस जिव्हेवर ठेविला असतां तो फार तीव्र लागतो. अंजीर अपक्क असले, ह्मणजे तेही तसेच लागतात. व तेच परिपक्क झाले, ह्मणजे त्यांत शर्करा इतकी सिद्ध होते कीं ते उन्हांत सुकवून ठेवितां येतात; व शर्करेवांचून दुसरें त्यांत फारसें कांहीं नसतें. असे सुके अंजीर, अनेक देशांतून आलेले, आमच्या मुंबईच्या बाजारांत पहाण्यांत येतात. हे अत्यंत पौष्टिक आहेत. जसे आरब लोक भाकरीबरोबर खजूर खाऊन रहातात तसे इतालीदेशांत कांहीं लोक सकाळीं कांहीं ताजे अंजीर भाकरीबरोबर खाऊन यथेच्छ न्याहारी करितात. सारांश, पानांतून अथवा डाहाळ्यांतून फळांत येणारे अनिष्ट अथवा अरूचिर रसादि पदार्थ, फळें परिपक्क होत असतांना, अत्यंत रुचिर आणि प्रिय होतात; इतकेंच नाहीं, तर ते पौष्टिकही होतात. ही फळांच्या घटकावयवांच्या ठायीं मोठी विलक्षण शक्ति आहे, असें समजावें. बेरें वाईट धान्य निवडून काढण्याकरितां अथवा पिठांतून खडे वगैरे निराळे करण्यास मनुष्यास आपली अक्कल खरचून सुपें चाळण्या इत्यादिकांची योजना करावी लागते. परंतु फळांच्या सूक्ष्म पिंडांच्या ठायीं अशी कांहीं अनुपमेय शक्ति आहे कीं, त्यांच्यात्यांच्यांत योग्य काळीं योग्य असे फेरफार होऊन जें अनिष्ट असतें तें अत्यंत प्रिय करण्याचें सामर्थ्य त्यांस प्राप्त होतें; जें अरूचिर असतें, तें त्यांचें त्यांसच अत्यंत रूचकर करितां येतें; जें हानिकारक असतें तें त्यांच्याच पायीं त्यांत पौष्टिक होतें; हा उद्भिज्जांच्याठायीं सामान्य चमत्कार नव्हे.

[ पुढील अंकांत संपूर्ण. ]

---

# चांदण्यांतल्या गप्पा.

## गोष्ट २.

### " गयादिनाचे उपकार. "

आह्मी सर्वजण आज आमच्या अंगणांत लौकर जमा होऊन गोष्ट केव्हां सुरू होते ह्मणून वाट पहात बसलों होतों. आज गोष्ट सांगण्याची पाळी एका पोक्त गृहस्थावर आली होती. त्यांनीं बऱ्याच वेळां गोष्ट सांगण्याचें कबूल केलें होतें. पण सांगण्याची वेळ आली, कीं ती कांहीं तरी निमित्तानें ते टाळीत. आज अगदीं त्यांचा पिच्छा पुरवावयाचा असा आह्मी निश्चय केला, व त्याप्रमाणें जेवणखाण लौकर आटपून अंगणांतल्या खाटांवर येऊन बसलों.

शुद्ध षष्ठि असल्यामुळें चांदणें बेताचेंच होतें. चंद्रकोर पश्चिमेकडे वळली होती. चंद्राबरोबरच एक देदिप्यमान् चांदणीही अगदीं चंद्रासरशी चालली होती. जणुं काय चंद्र व रोहिणी एकमेकांचा हात धरून आपल्या निवासस्थानीं चाललीं आहेत! किंवा उभयतां समुद्रस्नानास निघालीं असतां, रोहिणी आपल्या स्त्रीस्वभावास अनुसरून 'मला बाई भय वाटतें. मी नाहीं पाण्यांत पाय ठेवायची! आपल्याला आपलें जायचें तर जा करा स्नान!–' असें ह्मणत मागें सरकत आहे, व तें पाहून चंद्र जसा कांहीं तिचा हात धरून तिला ओढीत ओढीत– 'अग वेडे! माझ्यासारखा पोहणारा तुजबरोबर असतां तूं कां इतकी भितेस? चल आपण स्नान करूं!' असें ह्मणून पाण्यांत बुडी मारण्यास प्रवृत्त झाला आहे! वारा मंद मंद वाहत होता. पूर्वेकडून नक्षत्रगण झपाट्यानें नभोंगणांत येत होता. जणुं काय चंद्ररोहिणी, जोड्यानें, एकमेकांचा हात धरून समुद्रांत उतरत आहेत तें कौतुक पहाण्यास ही सर्व मंडळी लगबगीनें व घाईघाईनें जमली आहे!

चंद्र पश्चिमेकडे बराच खालीं गेल्यामुळें झाडांच्या सांवल्या लांब लांब पडल्या होत्या व वाऱ्यानें तीं झाडें थोडथोडीं हालत होतीं. जणुं काय सर्व दिवसभर परोपकाराचें काम करून तीं थकलीं भागलीं आहेत असें दिसे. बिचाऱ्या वृक्षांसारखे परोपकारी दुनियेंत कोणी नसतील. परोपकार करावयाचा, याशिवाय त्यांना दुसरी गोष्ट माहीत नाहीं. ऊन असो, पाऊस असो, सोसाट्याचा वारा सुटलेला असो. सर्व प्रसंगीं वृक्ष तटस्थ वृत्तीनें आपल्या आश्रयास राहिलेल्या पक्षिगणाचें रक्षण करितात. येवढेंच नाहीं, तर आह्मी माणसांनीं कुऱ्हाड घेऊन त्यांचे बुंधांवर घातली व त्यांस समूळ खणून काढण्याचा विचार केला, तरी ते त्या कुऱ्हाड घालणारास उन्हाची बाधा होऊं नये ह्मणून त्याजवरही छायाच करितात. असे अत्यन्त परोपकारी वृक्ष आतां सांवलीच्या रूपानें आपली जागा सोडून पलीकडे शेतांत आट्यापाट्या खेळण्यास गेले आहेत. त्यांचीं पानें वाऱ्यानें हालत आहेत. त्यामुळें ते जणुं काय हस्तसंकेतानें एकमेकांस बोलावीत आहेत. आमच्या झोंपडीच्या भोंवतालचे ह्मातारे ह्मातारे आम्रवृक्ष सुद्धां सांवलीच्या रूपानें पलीकडच्या शेतवडींत खेळण्यास गेले आहेत असें भासे, व प्रत्यक्ष आमच्या झोंपड्या देखील तो खेळ बघावयास जाण्याचा यत्न करीत आहेत असें दिसे.

हे पहा सभोंवतालचे डोंगर एखाद्या प्रचंड भुईकोट किल्ल्याच्या तटासारखे दिसत आहेत.– अथवा सृष्टीनें आह्मां वनवासी लोकांचें रक्षण

करण्यास्तव जणुं काय हे जागले निर्माण केले आहेत, व ते उभे राहून राहून कंटाळले म्हणून घोंगड्या पांघरून एकमेकांला चिकटून बसले आहेत! त्यांतील कांहींजणांनीं झोंप टाळण्याकरितां रानांत पेटलेले राव व डोंगरावरील वणवे ह्याच जशा चिलमा त्या पेटवून ते ओढीत बसले आहेत! चंद्रकोर फारच खालीं गेल्यामुळें आकाश कृष्णवर्ण किनखाबी छतासारखें सुंदर दिसत आहे. जिकडे तिकडे शांत व गंभीर झालें आहे. वृक्षांवरून क्वचित् फडफड असा शब्द ऐकूं येत आहे. जवळपास बोलणाऱ्या माणसांच्या शब्दांचा कुठें भास होत आहे. या निवांत वेळीं फक्त जागल करणारीं कुत्रीं व रात्रीं संचरणारीं कोल्हीं यांच्या शब्दांनीं मात्र खूप गोंगाट करून सोडला आहे.

अशा वेळीं आमचे त्या रात्रींचे गोष्ट सांगणारे गृहस्थ धोंडोपंत जेवणखाण आटपून, खांद्यावर एक खादीचें फडकें, अंगांत कांहीं नाहीं, नेसलेल्या पंचाचे सोगे मोकळे सोडलेले, हातांत चंची, तिची नाडी भुईवर लोळतेच आहे, व सुपारीचें खांड चघळीत चघळीत व अंमळ हास्य करीत-असे आपल्या झोंपडींतून बाहेर पडले.

अंगणांत आल्यावर ते म्हणाले-"काय बोवा, तुम्ही गोष्ट सांगायला सांगतां मला? मी रेव्हेन्युमधला माणूस. बारनिशी करितां करितां हें पहा मनगटाच्या सांध्याचें हाड देखील निखळलें! मला आपले पंधरा एके पंधरा ठाऊक! मला गोष्टी कोठून येणार? आतां तुम्ही सांगाच म्हणतां, तर या इथें सागांवच्या मारुतीच्या देवळांत कांहीं वर्षांपूर्वीं घडलेली गोष्ट परवां मला एकानें सांगितली ती सांगतों. तिच्यापासून मोठ्यांनीं व विशेषतः लहान मुलांनीं व त्यांच्या आईबापांनीं उपदेश घेण्यासारखा आहे.

ते गृहस्थ म्हणाले:--कालें खिंडींतून येतांना खालचीं लहान गांवें मोठीं मजेदार दिसतात. तीं लहान लहान केंबळाचीं छपरें, जवळजवळ वसलेले गांव, वरून फारच नामो दिसतात. बांध घालून केलेलीं चौकोनी, तिकोनी, अष्टकोनी, षट्कोनी अशीं तीं सुंदर कुंडाच्या रूपाचीं शेतें, त्यांच्या बाजूला तीं लहान मोठीं झाडें व पेंढ्याचीं उडवीं, यांची शोभा दिसते. खिंडीच्या पायथ्याशीं अशीं तीनचार गांवें आहेत. त्यांतील **तळवडा** या गांवांत **केरोबा** नांवाचा एक पांचकळशी राहत होता. तो सुतारकामांत फारच वाकबगार व चतुर होता. **अलीबाग, पेण, पनवेल, नागोठणें** वगैरे ठिकाणीं त्याच्या कारागिरीच्या कामाची ख्याती होती.

भव्य वाडे व सुंदर देवळें, सोईस्कर व टुमदार बंगले वगैरे कोणास बांधावयाचे झाले तर त्यांत **केरोबा** हा कामावर असावयाचाच. **चेऊल, रेवदंड्यापासून नागोठणें** वगैरे ठिकाणच्या नामांकित इमारती त्याच्या हातच्या चातुर्याची साक्ष देत आहेत. त्याला पैसा अतोनात मिळे. नवरा अतिशय पैसा मिळवता असल्यावर बायको कशाला कामधंद्याला हात लावील? ती घरांत आहे नाहीं पहात देखील नसे. अक्षयीं खाटेवर बसून असावयाची. घरांत गड्यांनीं वगैरे कामें करावयाचीं. **केरोबा** कामावरून आल्यावर दोघांनीं जेवायाचें व गप्पासप्पा मारून वेळ घालवावयाचा. **केरोबा** कामावर गेल्यावर त्याची बायको **विठाबाई** आपल्या शेजारपाजारच्या बायका जमवून इकडच्या तिकडच्या गप्पा मारीत बसावयाची.

त्यांत एक दोघी वाईट बाया होत्या, त्यांच्या संगतीनें तिला दारू पिण्याचें व्यसन लागलें. त्यामुळें मृत्युलोकीं राहून स्वर्ग कसा आहे तो पहावयाची तिला चटक लागली! स्वतः घेतां घेतां, आयाबाया आल्यावर पाहुणचाराकरतांही तिचा उपयोग होऊं लागला. मग रोज एक डझन अर्धा डझन बाटल्यांचा खप होऊं लागला. व त्याबरोबर पैशाचाही फन्ना उडूं लागला. **केरोबा** तर दररोज संध्याकाळीं, घरीं येतांना, कलालाच्या दुकानांत सोबत्यांसह गेल्याशिवाय आले असें कधीं झालेंच नाहीं. अशा रीतीनें दोघांचे दिवस चालले असतां **विठाबाईस** एक मुलगा झाला. त्याचें नांव **आनंदा** ठेविलें. आईबाप व्यसनी, व **केरोबास** आतां पैसाही विशेष मिळेनासा झाला. मग मुलाची कोण काळजी घेणार? मुलगा चार पांच वर्षांपासून रस्त्यांतल्या मुलांत खेळे. त्याच्या अंगावर धड स्वच्छ कपडा सुद्धां नसे. बापाचें व्यसन व आईचें व्यसन परमावधीस पोहोंचलें, तेव्हां मुलानें तरी दुसरें काय करावें? **केरोबाला** आतां कामधंदा कांहींच मिळत नसे. कारण याला काम देऊन हा करीलच असा कांहीं नेम नसे; ह्मणून लोक त्याला कामच देईनातसें झालें. दोघेंही व्यसनाधीन व ऐदी असल्यानें दारूस व खाण्यापिण्यास पैसे कोठून मिळणार? मग एकमेकांवर कातावणें, शिवीगाळ, भांडाभांडी, व वेळीं मारामारी, हीं सुरू झालीं; व या सगळ्यांचा परिणाम रडण्यांत होऊं लागला. रोज शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं येऊन यांचीं भांडणें तोडावीं, असा नित्याचा क्रम चाललेला असे. घरांत जें ज्याच्या हातीं सांपडेल तें त्यानें ध्यावें, विकावें व त्याची दारू घेऊन प्यावी. अशानें घरांत काय राहणार? जी **विठाबाई** अक्षयीं खाटेवर नटून बसावयाची तिला आतां पुरतें घोंगडीचें पट्टेंही बसावयास मिळेनासें झालें. जी सदोदित सजलेली बसावयाची तिच्या गळ्यांत एक सोन्याचा मणीही मिळण्याची मारामार पडली. नेसत्या लुगड्यास दोन तीन प्रकारचे तुकडे जोडलेले दिसत; व चोळीच्या ठिगळांची तर संख्याच नसे. अन्न असलें तर असलें, नसलें तर नसलें. दारू मिळाली कीं झालें. शेजारपाजारच्या बायाबापड्यांना भुलथापा देऊन, गोड बोलून, आर्जव करून, तुमचीं कामें करतें ह्मणून, पैसे मिळवी. एखादवेळ शेजारी बायांना दया आली तर त्यांनीं येवढें तेवढें द्यावें. मुलगा **आनंदराव** तर फाटकींतुटकीं चिरगुटें अंगावर घालून अक्षयीं सडकेवर हिंडे, व येणाऱ्याजाणाऱ्याजवळ हात पसरून मिळेल तें खाई. याप्रमाणें त्या **केरोबाच्या** कुटुंबाची स्थिति अत्यन्त हृदयद्रावक होऊन गेली!

**केरोबानें** व **विठाबाईनें** सुधारावें ह्मणून त्यांच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं आपलेकडून पराकाष्ठा केली, पण त्या दोघांच्या व्यसनांत किंचित् देखील बदल होईना. शेवटीं त्यांतच तीं मेलीं. मनुष्यांनीं गजबजलेल्या एवढ्या सर्व जगांत **आनंदा** मात्र अगदीं एकटा पडला. त्याचीं आईबापें होतीं तेव्हांही त्याला वेळच्या वेळीं खाणेंपिणें व ममतेचा शब्द ठाऊक नव्हता. मग आतां तर त्याला कोणीच नाहींसें झालें. तेव्हां बिचाऱ्याची कोण काळजी वाहणार? आणखी त्याला भूक लागली का तहान लागली ह्मणून कोण चौकशी करणार?—किंवा त्याच्या दुखण्याबाण्याची काळजी

व्हाणार?— अथवा त्याला नीतीच्या, बोधाच्या व सद्वर्तनाच्या गोष्टी सांगणार? तो एखाद्या जंगली झाडासारखा आपोआप वाढला. त्याला शिक्षण अथवा वळण मुळींच मिळालें नाहीं. जंगली झाड जसें पाहिजे तिकडे फुटत जातें व वाढतें तशी त्याची स्थिति झाली.

**आनंदा** दिवसभर इकडे तिकडे करून कसें तरी पोट भरी व रात्रीं आपल्या खोपटांत पडे. शेजारीं लेंकुरवाळ्या बायका असत त्या त्याला कधीं कधीं खाऊं जेवूं घालीत. पण त्या बापड्या गरीब. त्यांच्या स्वतांच्या मुलांचीच पोट भरण्याची मारामार, त्या त्याला दररोज कोठून काय देणार? हवेसाठीं जवळच्या मोठ्या गांवचे चांगले चांगले संभावित लोक **सागां**-**व**च्या देवळाच्या आसपास येऊन झोंपड्या उभारून राहिले होते. एका संक्रांतीच्या दिवशीं सकाळीं सभोंवतालच्या बायका वाणवसा कर-ण्यास मारुतीच्या देवळांत जमल्या होत्या. त्यांपैकीं कितीएकांनीं देवापुढें नारळ फोडले; कोणी देवापुढें खारका ठेवल्या; कोणी बदाम, कोणी खडीसाखर, कोणी कांहीं, कोणी कांहीं ठेविलें. तें सर्व गुरव व गुरवांचीं मुलें उचलीत व मध्येंच त्यांचा डोळा चुकवून कांहीं तरी पदार्थ **आनंदा** उचलून पटकन् खिशांत टाकी. हा त्याचा नेहमींचा क्रम असल्यामुळें त्याला ती विद्या बरीच साध्य झाल्यासारखी झाली होती. डोळा चुकवून पदार्थ कसा खिशांत टाकावा या कामांत स्वारी बरेच दिवसांपासून चांगलीच प्रवीण झाली हाती. संक्रांत असल्यामुळें देवदर्शनास लोक पुष्कळच येत होते. त्यांत एक झातारा परदेशी भय्या दर्शनास येऊन त्यानें देवापुढें चारपांच केळीं, एक नारळ व पेढ्यांचा पुडा ठेविला. देवाचें दर्शन घेऊन, कापूर लावून, तो प्रदक्षिणेस गेला. ही संधि साधून **आनंदानें** थोडेसे पेढे व दोन केळीं पटकन् उचलून खिशांत टाकलीं. हें त्या झातार्‍यानें पाहिलें. त्याला तें बरें वाटलें नाहीं. झातारा भारीच पापभीरु होता. त्याचें नांव **गयादीन. गयादीन** आपल्या जातीच्या लोकांसारखा फारसा उग्र दिसत नव्हता. त्याच्या वयाला पन्नाशी उलटून गेली होती. तो अंगांत एक मोठा सदरा घाली; डोकीस गुलाबी अथवा पांढरा स्वच्छ फेटा बांधी. कपाळास त्यांच्या चालीप्रमाणें सर्व कपाळभर गंध लावून त्याला भिंवयांपर्यंत ओरखडे ओढलेले असत. त्याची काठी बहुतकरून आडवी बगलेंत मारलेली असे व तो अंगावर दुहेरी धोतर ब्राह्मणासा-रखें एका खांद्यावरून घेऊन दुसर्‍या हाताच्या बगलेखालून मागें टाकी. तो फार उंच नव्हता. अंगानें थोडा जाडच होता. त्याच्या तोंडावर देवीचे वण पुष्कळ होते. मिशा पांढर्‍या सफेत झाल्या होत्या. तोंड वाटोळें होतें. मुद्रा नेहमीं शांत दिसे. त्याचा प्रामाणिकपणा त्याचे मुद्रे-वरून व्यक्त दिसे. तो कुठेंही व केव्हांही अक्षयीं भगवन्नामाचा जप करीत असे. त्याच्या हातांत एक लहानशी स्मरणी अक्षयीं असे. **गयादीन** को-ठें कोणाशीं अद्वातद्वा बोलतांना व चकाट्या पिटतांना दिसला नाहीं. तो कोणाचे घरीं फा-रसा जात नसे आणि कोणाचे भानगडींत पडत नसे. सकाळ संध्याकाळ देवदर्शनापुरता आपल्या झोंपडीच्या बाहेर पडे.

**गयादिनानें** प्रदक्षिणा घालतांना **आनंदाचें** हें कृत्य पाहिलें. त्याला तें बरें वाटलें नाहीं. देवाला नमस्कार करून घरीं जातेवेळीं तो **आनं-दाला** ह्मणाला—"बेटा, मी तुला मिठाई खाया-

ला देतों चल." असें ह्मणून गयादिनानें त्याचा हात धरिला व त्याला आपले बरोबर घेऊन तो चालूं लागला. लहान मुलांला मिठाईच्या नांवांतच कांहीं जादू असते. कडू औषध पिणें, कठिण काम करणें, या गोष्टी मिठाईच्या मध्यस्थीनें लहान मुलांकडून करवून घेतां येतात. हें झालें इतर मुलांबद्दल. मग आनंदासारख्या मुलाला त्या शब्दानें जादूसारखी भूल पडली तर त्यांत नवल तें काय ?

भुकेच्या वेळेस गोळाभर भात मिळण्याची ज्यास पंचाईत, त्यास मिठाई कोठली? आनंदा जादूनें भारल्यासारखा गयादिनाचे बरोबर पावलें टाकीत चालला. गयादिनानें पुलाच्या खालच्या आंगास असलेल्या चहाचे दुकानांतून थोडी जिलबी, भजीं, बेसनाचे लाडू व दोन पेले चहा विकत घेतला, व तो आपल्या झोंपडीकडे जाऊं लागला. आनंदाला त्या जिलबीचा व भज्यांचा वास अप्रतिम वाटला, आणि गयादिनाचे झोंपडींत केव्हां जाईन व केव्हां त्यांवर ताव देईन असें त्यास झालें !

गयादिनाची झोंपडी सडकेच्या उजव्या अंगास पुलापासून सरासरी तीन चारशें पावलें एका शेतांत होती. झोंपडी कैबळाची होती. सभोंवतीं कारव्यांचा कूड होता. झोंपडीला पुढें एक लहान पडवी उतरली होती. पडवीच्या आंत गेल्यावर एक माजघर, त्यांत एक खोली व पलीकडे एक स्वयंपाकघर होतें. पलीकडे सरपणकाडी ठेवण्यास एक लहान पडवी उतरली होती. पुढच्या पडवींत एक खाट होती, त्या खाटेवर गयादिनानें आनंदाला बसावयास सांगून तो आंत गेला. तेथें त्यानें आणलेलें सामान ठेविलें. नंतर तो बाहेर आनंदाजवळ खाटेवर येऊन बसला.

'बेटा आनंदा ! तुझ्या खिशांत काय ?' असें गयादिनानें विचारतांच आनंदा कावराबावरा होऊन गयादिनाकडे पाहूं लागला. मिठाई देतों ह्मणून ह्यातान्यानें मला येथें आणून ही काय पीडा मागें लागली असें त्याला वाटलें, व तो घाबरला.

गयादिनानें तोच प्रश्न पुनः केला. त्यावर आनंदानें कांपत कांपत व भीत भीत-"काय-कायहो ? माझ्या खिशांत? कांहीं नाहीं-" असें उडवाउडवीचें उत्तर दिलें.

त्यावर गयादिनानें पुन्हां तोच प्रश्न केला. "तुझ्या खिशांत पेढे व खारका नाहींत ?"

आनंदा—ह्या आहेत.

गयादीन—त्या कोणाच्या ?

आनंदा—माझ्या.

गयादीन—त्या तुला कोणी दिल्या ?

आनंदा—मला त्या—ह्यानें दिल्या.

गयदीन—तो हा कोण ?

आनंदा—तो देवळांत आला होता तो, त्यानें दिल्या.

गयादीन—बाळा आनंदा ! असा एका गुन्ह्याबरोबर दुसरा गुन्हा नकोस करूं. तूं मारुतीच्या पुढचे ते जिन्नस नाहीं घेतलेस ? देवापुढें ते जिन्नस मी ठेविले. मी प्रदक्षिणेला गेलों असें पाहून तूं तेथें असलेल्या लोकांचा डोळा चुकवून ते उचललेस. मीं तुला पाहिलें. मग आतां उगीच नाकबूल कां जातोस ? मी तुला कांहीं मारहाण करीत नाहीं. पण त्या लोकांच्या जिनसा तूं चोरल्यास, हें फार वाईट केलेंस. तुला आईबाप नाहींत, वेळच्यावेळीं—किंवा केव्हांही—तुला तुझ्या घरीं कांहीं खाण्यास नाहीं हें मला ठाऊक आहे. तरी तूं अशा रीतीनें कोणाची वस्तु चोरून घ्यावी हें

फार वाईट आहे. तुझ्या खिशांत काय आहे तें पाहूं तर दे.

**गयादिनाचे** बोलण्याचा स्वर, त्याची प्रेमभरित पण थोडी निग्रही मुद्रा, वगैरे पाहून **आनंदा**च्यानें नाहीं ह्मणवलें नाहीं. त्यानें त्या जिनसा खिशांतून बाहेर काढिल्या व **गयादिना**पुढें ठेविल्या. त्याला आतां मेल्यापेक्षांहीं मेल्यासारखें झालें. त्यानें केलेल्या गुन्ह्याबद्दल त्याला पुरा पश्चात्ताप झाला. आतां हा झातारा कांहीं न बोलेल तर बरें, आपली आतां याचे हातून कशी सुटका होते, असें त्यास वाटलें.

**गयादिनानें** त्याला पुष्कळ उलटसुलट प्रश्न केले. त्यामुळें तर तें पोर फारच भ्यालें.

**गयादीन**—बेटा, या जिनसा मारुतीपुढें होत्या कीं नाहीं ?

**आनंदा** ( डोळे चोळीत चोळीत )–होय.

**गयादीन**—मग त्या कोण घेतो ? त्यावर कोणाचा हक्क ? तुझा का गुरवाचा ?

**आनंदा**—-गुरवाचा.

**गयादीन**—-मग त्या तूं कां घेतल्यास ? हे यांत पैसेही आहेत. तूं ही चोरी केलीस. तूं जेव्हां या जिनसा घेतल्यास तेव्हां तुला वाटलें असेल कीं या उचलतांना तुला कोणी पाहिलें नसेल. पण बेटा, परमेश्वर सर्वांचीं एकुणएक कृत्यें बघतो. तो चांगल्यावाइटावर नजर ठेवून त्या त्या प्रमाणें फळ देतो. तुजसारख्या लहान पोरक्या पोरानें असा अन्याय करावा हें त्याला खपलें नाहीं. तुला चार समजुतीच्या गोष्टी सांगून वाटेवर आणण्यास देवानें मला आज्ञा दिली आहे. तूं अशाच लहान लहान चोऱ्यामाऱ्या करतां करतां पुढें मोठा दरवडेखोर बनला असतास व कित्येक बिचाऱ्या महात्म्यांचे शिव्याशाप घेतास. कित्येक लोकांना, त्यांच्या श्रमाचा पैसा चोरून, अन्नान्न करावयाला लावतास. शेवटीं कधींनाकधीं सरकारचे शिपायांच्या हातीं सांपडतास, व ते तुझे हाल हाल करून तुजकडून तुझे गुन्हे कबूल करवून न्यायाधीशापुढें तुला उभा करते. तेथें तुजकडे पाहून त्वेषानें लोक कपाळास आंठ्या घालते. तूं तुरुंगांत केव्हां जाशील याची ते वाट पहात बसते. अशावेळीं तुला कोणी सोडवायाला वगैरे नाहीं असें पाहून तुला कृतकर्माचा पश्चात्ताप झाला असता. पण तेव्हां त्याचा काय उपयोग ? बुडणारा जोंपर्यंत पाण्याच्या धारेंत सांपडून गिरक्या खाऊं लागला नाहीं तोंपर्यंत त्याला बचावण्याचे यत्न साध्य होतात. एकदां भोंवऱ्यांत सांपडल्यावर मग काय ? त्याप्रमाणें तुझी स्थिति झाली असती. पण आतां शहाणा हो. हे जिन्नस चोरल्याबद्दल देवाची व गुरवाची पश्चात्तापपूर्वक क्षमा माग. आणखी, येथून पुढें अशा कृत्याला प्रवृत्त होऊं नको.

हें **गयादिनाचें** बोलणें ऐकून बिचाऱ्या **आनंदा**ला रडेंच कोसळलें. त्यानें ते जिन्नस खालीं ठेवून आपल्या फाटक्या कोटानें तोंड झांकून घेतलें. त्याला आपलें तोंड कोणाला दाखवूं नये असें झालें. तो किती वेळ तरी गुढग्यांत डोकें घालून व कोटानें तें झांकून घेऊन बसला !

**आनंदा**ची अशी स्थिति झाली हें पाहून **गयादिना**सही गहिंवर आला. त्यानें त्याला पोटाशीं धरिलें. आपल्या धोतरानें त्याचे डोळे पुसले व तो त्याला ह्मणाला–" **आनंदा !** तूं फार चांगला मुलगा आहेस. मुला, तुजकडून झालेल्या अपराधाचा तुला पुरा पश्चात्ताप झाला आहे. तेव्हां तूं देवाची प्रार्थना कर. पुन्हा असें कर-

णार नाहीं, अशी शपथ घे. आणि हे पैसे आणि जिन्नस ज्याचे त्याला परत दे. त्याची क्षमा माग आणि या माझ्या झोंपडींत येऊन रहा. मला जी कांहीं अर्धी मिळते आहे त्यांतील तुला चतकोर देईन. आतां तुझ्या या कृत्याबद्दल देवाची क्षमा मागूं व नंतर आपण फराळ करूं.

**आनंदानें** तोंड वर केलें तों त्याचे डोळे लाल झाले होते व तोंड अगदीं उतरून गेलें होतें. **गयादिनानें** सांगितल्याप्रमाणें त्यानें देवाची प्रार्थना केली व क्षमा मागितली, व याउपर आपल्याला सद्बुद्धि दे, असें देवास विनविलें. त्याचें हें सर्व अंतःकरणापासूनच्या कळवळ्याचें कृत्य होतें हें पाहून **गयादिनास** फार फार समाधान वाटलें. प्रार्थना झाल्यावर आणलेल्या पदार्थांचा त्या दोघांनीं फराळ केला. नंतर ते दोघे गुरवाच्या घरीं त्याचे जिन्नस त्याला देऊन त्याची क्षमा मागावयास गेले.

**गयादीन** हा पलटणींत नोकरी करून पेन्शन घेऊन सुखवस्तू राहिलेला होता. त्याला बारा रुपये पेन्शन होतें. त्याला एक मुलगा अगदीं **आनंदा** येवढाच होता. त्याची बायको, मुलगा व तो तिघेही पूर्वी मोठ्या सुखांत होतीं. परंतु दैवाला त्यांचा आनंद खपला नाहीं. दैव कोणाचा हेवा करीत नाहीं? बिचाऱ्याचा एकुलता एक मुलगा विषमासारख्या भयंकर तापाला बळी पडला. त्याची आई ( **गयादिना**ची बायको ) मुलाच्या पाठोपाठ सहाच दिवसांनीं आपल्या मुलास भेटावयास गेली! बिचाऱ्या **गयादिना**ची त्या दोघांतून एकालाही करुणा आली नाहीं. तिला अपत्यवियोग दुःसह होऊन, जन्माचा सोबती ह्मणून ह्मटलेल्या आपल्या पतीला सोडून ती आपल्या प्रिय पुत्राच्या भेटीस गेली. झालें, येऊन जाऊन कुटुंबाचीं तीन माणसें त्यांत दोहोंची ही वाट, बिचारा एकटा प्राणी राहिला! मुलगा व बायको मेल्यावर तो अगदीं विदेही झाला. रात्रंदिवस परमेश्वरचिंतनांत तो आपला काळ घालवी. **गयादिना**चा मुलगा **माधवप्रसाद** अगदीं **आनंदा**सारखा दिसे व वयानेंही त्याचेच येवढा होता. **गयादीन** जेव्हां जेव्हां मारुतीचे दर्शनास येई, तेव्हां तेव्हां **आनंदा** त्याचे दृष्टीस पडला कीं त्याचे पोटांत भडभडून येई व डोळे पाण्यानें भरून येत. असें जरी होई तरी त्याला **आनंदा**कडे पाहावेंसेंच वाटे, व एखादेवेळीं देवदर्शनास आल्यावेळीं जर **आनंदा** तेथें आसपास नसला तर त्याला बरें वाटत नसे. **आनंदा**ला आईबाप कोणी नसून अन्नान्नगत होऊन तो रस्तोरस्तीं हिंडे, हें पाहून **गयादिनास** फार वाईट वाटे. आजपर्यंत शेंकडों वेळां त्याला आश्रय द्यावा असें त्याच्या मनांत येऊन गेलें, पण तसा योग आला नाहीं. तो आज सहजगत्या घडून आला.

( पुढील अंकांत समाप्त. )

---

रावसाहेब

## विश्वनाथ नारायण मंडलिक.

### भाग सहावा.

स्वतंत्र व्यवसाय.

( १८७२—१८८० )

मागील अंकांत वर निर्दिष्ट केलेल्या कालांत रावसाहेबांनीं लिहिलेल्या राज्यव्यवस्थाविषयक लेखांविषयीं माहिती पूर्ण करण्यांत आली आहे. आतां प्रकृत कालामध्यें सार्वजनिक संस्थांसंबंधीं रावसाहेबांनीं जो उद्योग केला

त्याविषयीं लिहिणें हें पूर्व स्वीकृत क्रमाला अनुरूप होय. परंतु त्या विषयाकडे वळण्यापूर्वीं एका विशेष गोष्टीचा उल्लेख करून तदनुषंगानें जो महत्त्वाचा कार्यभार रावसाहेबांनीं उचलिला त्याचा निर्देश करणें अवश्य आहे. ही गोष्ट रावसाहेबांची १८७४ सालीं झालेली कौन्सलांतील नेमणूक होय.

नवीन कायदे करण्याच्या कामीं प्रजाजनांपैकीं प्रमुख मंडळीची मदत घेण्याविषयीं नियम झाल्यानंतर बरेच दिवसपर्यंत मोठमोठे सरदार, जाहगीरदार, जमीनदार किंवा शेटसावकार यांसच कौन्सलांत घेण्याचा प्रघात पडला होता. कौन्सलाचें काम इंग्रजी भाषेंत चालावयाचें हें उघड आहे; व त्या भाषेच्या ज्ञानाचा वर निर्दिष्ट केलेल्या वर्गांतील लोकांमध्यें पूर्ण अभाव असल्यामुळें त्यांच्या नेमणुकीपासून सरकारास मुळींच मदत होण्याचा संभव नव्हता. तेव्हां वस्तुतः कायदे करण्याचें काम सरकारी अधिकाऱ्यांच्या हातांतच रहात असे व एतद्देशीय कौन्सलदार मंडळी केवळ बाहुल्याप्रमाणें सभेला शोभा देत असत. जसजसा आंग्ल विद्येचा प्रसार अधिक होत चालला तसतसा इंग्रजांच्या राज्यव्यवस्थेचें स्वरूप व तिचे गुणदोष यांजकडे जनपदांच्या विचाराचा ओघ वळत चालला व सरकारालाही सुशिक्षित लोकांची सल्ला घेणें व त्यांस अधिकार देणें जरूर वाटूं लागलें. रावसाहेबांसारख्या विद्वान्, बुद्धिमान्, निष्ठावान् व मानधन पुरुषाची कौन्सलांत योजना झाली ही गोष्ट त्या धोरणाला अनुरूपच होती. अशा प्रकारच्या मानास आपली पात्रता रावसाहेबांनीं यावेळीं सिद्ध करून दाखविली होती. क्रमाक्रमानें सार्वलौकिकविषयांत मन घालून धनाची अपेक्षा न करितां अश्रान्त परिश्रम करण्याचें व्रत त्यांनीं स्वीकारिलें होतें, व त्या व्रताचें परिपालन निष्ठापूर्वक करण्याचा त्यांचा यत्न सतत चालू असे. विद्याव्यासंग, द्रव्यार्जनाचा व्यवसाय व ग्रंथरचना हे उद्योग कायम ठेवून यापूर्वीं सार्वजनिक कामांत जे त्यांनीं श्रम घेतले होते त्यांचा विचार केला, म्हणजे सरकारानें जो त्यांचा मान केला त्या मानास ते अत्यंत योग्य होते हें कोणीही कबूल करील. शिवाय अशा गृहस्थाचा सन्मान केल्यानें सरकारानेंही आपलें गुणग्राहित्व व्यक्त केलें ही गोष्ट त्यांस मोठी भूषणास्पद आहे. सरकारी अधिकाऱ्यांस रावसाहेबांच्या अंगचे गुण समजण्याचे नुकतेच एक दोन महत्त्वाचे प्रसंग आले होते व त्या प्रसंगीं रावसाहेबांविषयीं त्यांचा ग्रह अनुकूल झाला असावा हें अनुमान सहज होण्यासारखें आहे. मुंबईंतील म्युनिसिपालिटीच्या कारभारांत क्राफर्डसाहेबांच्या कारकीर्दींत जी अव्यवस्था झाली तिचें परिमार्जन करण्याच्या कामीं रावसाहेबांनीं दीर्घपरिश्रम केले होते, व नवीन कायदा करण्याच्या बाबतींत त्यावेळचे गव्हरनर सर सीमोर फिट्झरल्ड यांनीं रावसाहेबांची सल्ला घेतल्याविषयीं पूर्वींच्या भागांत उल्लेख करण्यांत आला आहे. त्यानंतर खोतीकामांतही सरकारी अधिकाऱ्यांचा व रावसाहेबांचा बराच संबंध आला. याप्रमाणें उच्चप्रतीच्या मानास रावसाहेबांनीं जरी आपली पात्रता व्यक्त केली होती तरी त्यांच्या गुणसमुदायांत एक दोन गुण असे होते कीं, ते साधारणतः अधिकारिजनांस पसंत पडण्यासारखे नव्हते. कोणत्याही विषयाचें पर्यालोचन करून तत्संबंधी जो राव-

साहेबांचा ग्रह होत असे त्यापासून केवळ भिडेखातर किंवा मुर्वतीस्तव परावृत्त होण्याचें त्यांचें शील नव्हतें. शिवाय जी गोष्ट पथ्य आहे ती अप्रिय असली तरी बोलण्यास ते केव्हांही मागें घेत नसत. कार्यक्षमता, बुद्धिमत्ता, धारणाशक्ति, विचारप्रागल्भ्य इत्यादि गुणांनीं आपणास सर्वतोपरि श्रेष्ठ मानणाऱ्या उच्चप्रतीच्या युरोपियन अधिकाऱ्यांना, तच्छंदानुवर्तनाचें व्रत स्वीकारणाऱ्या लब्धप्रतिष्ठ मंडळीशीं बहुधा प्रसंग असल्यामुळें, रावसाहेबांच्या अंगचे हे गुण आवडण्यासारखे नव्हते. हा सर्व प्रकार लक्ष्यांत आणिला ह्मणजे **सर फिलिप वुड्हौस** यांनीं रावसाहेबांची कौन्सलांत योजना केली ही गोष्ट त्यांच्या विसदृशशीलाची द्योतक आहे असें ह्मणावें लागतें.

रावसाहेबांना हा जो मान मिळाला तो सर्वांना पसंत होऊन त्याबद्दल सर्वांनीच त्यांचें व सरकारचें अभिनंदन केलें. या उच्चपदप्राप्तीमुळें आपल्यावर कशा प्रकारची जबाबदारी येऊन पडली याचें ज्ञान रावसाहेबांना पूर्णपणें होतें, व कार्यनिर्वाहाची योग्य व्यवस्था करण्यास ते सिद्ध झाले. प्रथमच ज्या दिवशीं ते कौन्सलांत गेले त्या दिवशींची हकीकत दैनिकवृत्तांत लिहितांना त्यांनीं पुढें लिहिल्याप्रमाणें उल्लेख केला आहे:—

"२४-८-७४—कौन्सलाच्या सभेला गेलों.
"एकंदरीनें काम आवडतें, परंतु जबाबदारी मोठी आहे. कौन्सलदार मंडळीमध्यें बरोबरीनें
"कार्यभार उचलणारा असा एकादा समर्थ
"जोडीदार मात्र नाहीं. रोगे हे गृहस्थ चांगले
"होतकरू आहेत, परंतु त्यांचें पूर्वशिक्षण
"असावें तितकें नाहीं."

१८७४ सालापासून १८८४ सालापर्यंत रावसाहेबांनीं स्थानिक सरकारच्या कौन्सलदारीचा मान सतत भोगिला. मात्र **सर रिचर्ड टेंपल** यांच्या कारकीर्दींत १८७८ व १८७९ या सालांमध्यें त्यांनीं तें काम सोडिलें होतें. स्वातंत्र्यप्रियता व स्वत्वाभिमान हीं रावसाहेबांच्या स्वभावाचीं मुख्य अंगें होतीं. त्यांचा टेंपल साहेबांच्या अरेरावी कारभाराशीं मेळ पडण्यासारखा नव्हता. अशा अधिकाऱ्याच्या हातून आपला अपमान करून घेण्यापेक्षां प्राप्त झालेल्या उच्चपदाचा त्याग करणें त्यांस श्रेयस्कर वाटलें. असें सांगतात कीं, एका प्रसंगीं वर निर्दिष्ट केलेल्या गव्हर्नर साहेबांनीं केवळ अधिकाराच्या जोरावर रावसाहेबांची कांहीं प्रकरणांत संमति मिळविण्याचा यत्न केला, तेव्हां रावसाहेबांनीं शिष्टाचारांचें उल्लंघन न करितां निर्भयपणें साहेब महशुफांना 'आपण आतां मध्यप्रांतांत नाहीं' याचें स्मरण ठेवण्याविषयीं विनंती केली. मध्यप्रांत ह्मणजे नागपूर येथें टेंपल साहेब चीफ कमिशनर होते. तो प्रांत खालसा करून मागाहून ब्रिटिश राज्यास जोडला असल्यामुळें तेथें त्या वेळीं शिक्षणाचा प्रसार विशेष झाला नव्हता, व राज्यव्यवस्थाही इतर इलाख्यांप्रमाणें नियमबद्ध नव्हती. ह्मणून 'राजा करील तें कारण व बांधील तें तोरण' असा तेथें प्रकार होता. त्यास अनुलक्षून रावसाहेबांनीं वरील सूचना केली हें सहज समजण्यासारखें आहे. गव्हर्नरसारख्या अधिकाऱ्याला असें मर्मभेदक उत्तर देणें मोठ्या छातीचें काम आहे; व एवढ्या एका प्रसंगावरूनच रावसाहेबांच्या स्वभावाची जात समजण्यासारखी आहे.

कौन्सलदारीच्या मानास रावसाहेब पूर्णपणें पात्र होते असें वर सांगितलें आहे. परंतु त्या मानास अंगभूत असलेल्या कार्यभाराचा निर्वाह करण्याची त्यांच्यामध्यें विशेष योग्यता होती ती कोणत्या कारणामुळें, हें येथें सांगितलें पाहिजे. त्यांचा विद्याव्यासंग, त्यांची बुद्धिमत्ता व त्यांची कार्यक्षमता या गुणांचा वर उल्लेख केलाच आहे. हे त्यांचे गुण त्यांना सर्व कामांत सारखेच उपयोगी पडण्यासारखे होते. परंतु त्यांची गृहस्थिति, त्यांची व्यवसायपरंपरा व त्यांचें विविधविषयकज्ञान–ही सामग्री कौन्सलदारीचें काम करण्यांत त्यांस विशेष उपयुक्त होती. अशा प्रकारच्या सामग्रीची सिद्धता फार थोड्याच पुरुषांना अनुकूल असते. स्वतःच्या घरची मोठी खोती असल्याकारणानें जमीनदार व कुळें यांचा परस्पर संबंध, दोघांच्याही स्थितीचें खरें स्वरूप, दोघांनाही व्यवहारांत येणाऱ्या अडचणी, सरकारी अधिकाऱ्यांचें वर्तन, या गोष्टींचें ज्ञान त्यांस सहजच झालें होतें; व रावसाहेबांचा स्वभाव विशेष चौकस असल्यामुळें या विषयांचा त्यांस अधिकच परिचय झाला होता. अध्ययनाची समाप्ति झाल्यानंतर राजसेवेचा योग घडून आल्यामुळें भिन्न भिन्न प्रदेशांत प्रवास होऊन तेथील लोकांची स्थिति, त्यांचे आचार व त्यांचे विचार समजून घेण्याची त्यांस सवड मिळाली, आंग्लराज्य व्यवस्थेचें सूक्ष्म अवलोकन करण्यास संधि सांपडली, व युरोपियन अधिकाऱ्यांशीं विशेष संघट्टन होऊन त्यांच्या गुणदोषांचें यथार्थ स्वरूप समजण्यास अवकाश झाला. पुढें वकिलीच्या व्यवसायाचें अवलंबन केल्यामुळें कायद्यांचें ज्ञान होऊन त्यांची तीव्र बुद्धि अधिकच निशित झाली, आणि त्यांच्या अंगीं वाक्पटुत्व व वादप्राविण्य अधिक आलें. परवशतेच्या फेऱ्यांत सांपडल्यापासून परप्रत्ययनेयबुद्धित्व हा दोष आपल्यामध्यें बहुधा सर्वसाधारण आहे. त्यापासून रावसाहेब बरेच अलिप्त असल्याकारणानें प्रकृत बहुमानाला त्यांची पात्रता विशेष होती. प्रमाणाशिवाय कोणतेंही विधान करण्याची त्यांना संवय नव्हती. त्यामुळें त्यांचें वजन चांगलें पडत असे व हा गुण कौन्सलदारीचें काम करण्यांत त्यांस फार उपयोगी पडण्यासारखा होता. सद्धेतु धरून उद्योग करण्याचा त्यांचा संप्रदाय असल्यामुळें व कोणत्याही कारणामुळें सत्वापासून च्युत न होण्याचा त्यांचा निर्धार असल्यामुळें त्यांची छाप पडल्याशिवाय केव्हांही रहात नसे. आंग्ल अधिकारी प्रसंगविशेषीं विकारवश झाले तरी वास्तविक गुणांची पारख करण्याचें बहुधा त्यांच्या अंगीं सामर्थ्य असतें. ह्मणून अप्रिय वाटण्यासारखें असलें तरी जें पथ्य असेल तेंच बोलण्याचा रावसाहेबांचा बाणा त्यांच्या बहुमानास उत्तरोत्तर अधिकच कारणीभूत होण्याचा संभव होता. सरकारच्या तर्फेचे सभासद अधिक असल्यामुळें, लोकपक्षाकडील सभासद सर्वच रावसाहेबांसारखे बाणेदार असते तरी कौन्सलापुढें आलेल्या एकाद्या लोकहिताच्या प्रश्नाचा अनुकूल असा निकाल लागणें दुरापास्त होतें. मग लोकपक्षाकडील सभासदही बहुधा अधिकारिजनच्छन्दानुवर्ती असल्यावर लोकपक्षाचें समर्थन करण्याचें ज्यानें ब्रीद पत्करलें असेल अशा एकाद्या पुरुषाच्या प्रयत्नास कितपतसें यश येईल हें सहज समजण्यासारखें आहे. अशा रीतीनें एकंदर परिस्थिति उत्साहभंजक असतांही रावसाहेब अंगीकृत-

कार्यापासून च्युत झाले नाहींत. बहुमत त्यांच्या तर्फेनें होणें अशक्य होतें. तथापि आपल्या प्रतिपादनाचें यथार्थत्व इतर सभासदांच्या चित्तांत भरविण्याचा यत्न केल्याशिवाय ते केव्हांही राहिले नाहींत; व त्यांचा प्रयत्न कधीं कधीं सफलही होत असे.

रावसाहेब कौन्सलदार असतांना अनेक प्रसंगीं त्यांस सरकारी वकिलाचें कामावर नेमण्यांत आलें होतें. सरकारी वकील हा सरकारचा नोकर असल्याकारणानें लोकांच्या तर्फेनें त्यास कौन्सलांत बसतां येत नाहीं. तेव्हां अशा प्रसंगीं दोहोंपैकीं एका मानाचा त्याग केल्याशिवाय गत्यंतर नसावयाचें. रावसाहेबांचें शील लक्ष्यांत आणिलें ह्मणजे त्यांनीं कोणता मार्ग स्वीकारला असता याविषयीं कोणासच शंका वाटण्याचें कारण नव्हतें; परंतु अशी पंचाइतच रावसाहेबांना पडली नाहीं. सरकारानें बहुमानपूर्वक त्यांना दोन्ही पदांचा उपभोग घेतां यावा अशी तजवीज केली. एकीकडे कौन्सलदारीचा राजीनामा घेऊन दुसरीकडे त्यांची त्याच कामावर नेमणूक करण्यांत येत असे. एवढ्याच गोष्टीवरून रावसाहेबांची योग्यता कशा प्रकारची होती हें समजण्यासारखें आहे. 'नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्त्ता' असें कवीनें ह्मटलें आहे तें यथार्थ आहे; व अशाप्रकारचें दुष्कर कृत्य करणारे जे पुरुष असतील त्यांस ह्मणूनच श्रेष्ठ कोटींत गणण्यास कोणताही प्रत्यवाय नाहीं. सरकार व प्रजाजन या दोघांच्याही आदरास पात्र होण्याचा मान फार थोड्यांसच लाभतो.

सर फिलिप वुड्हौस यांच्या कारकीर्दींत रावसाहेबांची फारच चहा होती. यावरून रावसाहेबांच्या अंगचे गुण साहेब महसुफांस पूर्णपणें ज्ञात होते व त्या गुणांचा पुरस्कार करण्याचीही त्यांना हौस होती असें दिसतें. या कालांत रावसाहेबांना अनेक प्रकारचे मान मिळाले. त्यांचा पुढें योग्यस्थलीं निर्देश करण्यांत येईलच. परंतु ज्या एका मानाचा प्रकृत कथानकाशीं संबंध आहे तेवढ्याविषयींच येथें उल्लेख करणें अवश्य आहे. कौन्सलदारीच्या जागेवर रावसाहेबांची योजना झाल्यावर थोड्याच कालानें मुंबई येथील 'शेरिफ' या अधिकारावर नवीन नेमणूक करण्याचा प्रसंग आला. मान मोठा, काम थोडें व कमाई पुष्कळ, अशा विरूद्ध लक्षणांचा योग या पदप्राप्तींत पूर्वीं जुळून येत असे. आलीकडे द्रव्यप्राप्तीचें अंग या अधिकारांतून कमी झालें आहे, परंतु पूर्वीं शेरिफचें काम मिळालें ह्मणजे एका वर्षांत पन्नास साठ हजार रूपयांची प्राप्ति असे. असा हा अधिकार रावसाहेबांना द्यावा असें गव्हर्नरसाहेबांच्या मनांत आलें. हा द्रव्यार्जनाचा योग सहज दवडण्यासारखी रावसाहेबांची या वेळीं स्थिति नव्हती. वकिलीचें बस्तान चांगलें बसलें होतें तथापि ह्मणण्यासारखा वित्तसंग्रह त्यांच्या जवळ झाला नव्हता. अशा स्थितींत गव्हर्नरसाहेबांच्या इच्छेला मान दिल्यानें रावसाहेबांचें सर्वस्वी हित होण्यासारखें होतें. परंतु चित्त द्विधा होण्यास एक महत्त्वाची सबब होती. एकसमयावच्छेदेंकरून शेरीफ व कौन्सलदार या दोन्ही पदांचा उपभोग घेण्याची सवड नव्हती. केवळ द्रव्यप्राप्तीकडे नजर देऊन शेरिफचें पद स्वीकारलें असतें, तर कौन्सलदारीमुळें उपलब्ध झालेल्या बहुमानाचा त्याग करावा लागता. अशा रीतीनें धन व मान यांची तुलना कर-

ण्याचा प्रसंग आला असतां रावसाहेबांसारख्या मनस्वी पुरुषानें मानाची प्रधानता व धनाचें गौणत्व ठरविलें हें त्यांच्या शीलास अनुरूपच होतें. केवळ कौन्सलदारीचें काम सोडावें लागेल एवढ्याचसाठीं रावसाहेबांनीं शेरिफचा अधिकार नाकारिला. असो.

आतां प्रकृत कालामध्यें कौन्सलापुढें कोणकोणतीं कामें आलीं व त्यांचा निकाल लावण्यासंबन्धानें रावसाहेबांनीं कोणत्या प्रकारची मदत केली याविषयीं थोडक्यांत उल्लेख करून हें प्रकरण समाप्त करूं.

रावसाहेब कौन्सलदार झाले त्या वेळीं वतनांसंबंधींच्या कायद्याचा विचार सुरू होता. या कायद्याविषयीं रावसाहेबांनीं बऱ्याच सूचना केल्या व अखेरीस त्यांनीं जें भाषण केलें त्यांत पुढें लिहिल्याप्रमाणें त्यांनीं अभिप्राय प्रदर्शित केला:—

"आतां मोघम व सवलतीच्या कायद्यांचा
"काल निघून गेला आहे. आतां जे नवे काय-
"दे आपण करितों त्यांची व्याप्ति ठरलेली
"असते, व त्यांचा अंमलही सक्तीनें
"होत असतो. या कायद्याअन्वयें सर-
"कारी अंमलदारांना जबर अधिकार प्राप्त झाले
"आहेत व त्या अधिकारांचा योग्य विनियोग
"होण्याविषयीं सक्त तजवीज झाली पाहिजे.
"त्याचप्रमाणें त्यांचें उल्लंघन झाल्यास प्रजा
"जनांचा न्याय ज्या संस्थांकडून होतो
"त्याच संस्थांपुढें अधिकाऱ्यांचाही न्याय
"झाला पाहिजे. असें झालें ह्मणजे
"अगदीं गरीबगुरिबांना सुद्धां आपल्या
"दुःखांचा प्रतीकार करून घेण्यास सवड आहे,
"असें आश्वासन मिळाल्यासारखें होईल."

या नंतर जमीनमहसुलासंबन्धाच्या नव्या कायद्याचा उपक्रम झाला. प्रकृत कालामध्यें रावसाहेबांनीं जो विशेष महत्त्वाचा कार्यभाग उरकला तो या कायद्यासंबंधानेंच होय व तद्विषयक विवेचन किंचित् विस्तारपूर्वक करणें अवश्य आहे. ह्मणून इतर किरकोळ बाबींचा उल्लेख करून नंतर त्या विषयाकडे वळलें असतां सोईचें होणार आहे.

या किरकोळ बाबी पुढें लिहिल्याप्रमाणें:— जकातीचा कायदा; मामलतदारांसमोर येण्याऱ्या वहिवाटीच्या फिर्यादींबद्दलचा कायदा; सिटी सर्वेचा कायदा; जलमार्गानें जाणाऱ्या लोकांसाठीं ज्या नौका असतात त्यांच्या व्यवस्थेविषयींचा कायदा; मुंबई शहराच्या जमीन महसुलाचा कायदा; सक्तीनें देवी टोंचण्याचा कायदा; कापसांत भेळ न होऊं देण्याविषयींचा कायदा; दारूअपकारीचा कायदा; व मुंबई म्युनिसिपालिटीच्या कायद्याची दुरुस्ती.

या सर्व विषयांचें विवेचन सर्वप्रकारची माहिती मिळवून रावसाहेबांनीं आपल्या नेहेमींच्या रीतीप्रमाणें केलें. प्रत्येक बाबतींत सरकारी अधिकाऱ्यांचा व त्यांचा मतभेद झाला. जेथें विरुद्धपक्षाचें ह्मणणें समर्पक वाटलें तेथें रावसाहेबांनीं दुराग्रहानें आपलेंच ह्मणणें कायम केलें नाहीं. परंतु केवळ गव्हर्नरसाहेब किंवा कौन्सलदार एकाद्या मताचें अवलंबन करितात ह्मणून त्यांस अनुमोदन त्यांनीं केव्हांही दिलें नाहीं. जकातीच्या कायद्याची वाटाघाट होत असतांना रावसाहेबांनीं असें निक्षून सांगितलें कीं, सरकारानें केलेल्या रस्त्यांचा उपयोग करणाऱ्या सर्वांनींच जकात दिली पाहिजे हें ह्मणणें यद्यपि वाजवी आहे तथापि ज्यांनीं ह्मणून लोकलफंडाचा कर

दिला असेल त्यांच्याकडून लोकलफंडांतून केलेल्या सडकांचा उपयोग करण्याबद्दल जकात घेणें सयुक्तिक होणार नाहीं: अशा लोकांकडून सरकारजमेंतून केलेल्या रस्त्यांचा उपयोग केल्याबद्दल मात्र जकात घेणें वाजवी होईल. सक्तीनें देवी टोंचण्याच्या कायद्यासंबंधानें रावसाहेबांनीं असें बोलून दाखविलें कीं, केवळ वासरांच्याच लसीचा उपयोग करण्याची खबरदारी घेतली असतां लोक फारशी हरकत घेणार नाहींत. उपदंशासारखे रोग परंपरेनें लहान मुलांच्या शरीरांत संक्रान्त होण्याचा संभव असतो व त्यामुळें मुलांच्या लशीनें देवी टोंचल्या असतां तसले रोग जडण्याची भीति आहे. कापसाच्या भेळीसंबंधाच्या कायद्याचा मसुदा कौन्सलापुढें आणितांना रेव्हन्सूक्राफ्ट साहेबांनीं एतद्देशीय कौन्सलदारांवर अनास्थेचा आरोप केला होता, तो रावसाहेबांना सहन न होऊन त्यांनीं आपल्या भाषणाच्या आरंभीं पुढें लिहिल्याप्रमाणें त्या आरोपाचा प्रत्यादेश केलाः—

" या कायद्याचा मसुदा सभेपुढें आण-
" णाऱ्या नामदार गृहस्थांनीं एतद्देशीय सभा-
" सद युरोप व अमेरिका या खंडांमध्यें चालत
" असलेल्या घडामोडींचें यथार्थ ज्ञान प्राप्त क-
" रून घेतात याबद्दल त्यांचा जितका गौरव
" करणें वाजवी होतें तितका त्यांनीं केला
" नाहीं हें मला दुःखानें ह्मणावें लागतें. स्वतःच्या
" संबंधानें मी इतकें बोलूं शकतों कीं, सुशिक्षित
" प्रजाजनांना अशा विषयासंबंधानें जितकी
" आस्था असावी तितकी आह्मांला खचित
" आहे. मला अशी आशा वाटत आहे कीं
" दिवसानुदिवस युरोप व अमेरिका या खंडांत
" चालू असलेला राजकीय व्यवहार समजून
" घेण्याची आह्मांला अधिकच इच्छा होत
" जाईल. विद्येचा प्रसार होत चाललाच आहे.
" तेव्हां लवकरच आमचे सुशिक्षित लोक
" इतके बहुश्रुत व चतुरस्त्र होतील कीं, पाश्चा-
" त्यांच्या बरोबरीनें राजकीय विषयांवर वाद-
" विवाद करण्यास ते समर्थ होतील. हा इष्ट हेतु
" साधण्याच्या कामीं आमच्या लोकांना ब-
" ऱ्याच हरकती येतात ही गोष्ट निर्विवाद
" आहे. तथापि आमच्या हातून होण्यासारखा
" आहे तितका यत्न आह्मी करीत आहों."

आतां जमीन महसुलाच्या कायद्यासंबंधानें रावसाहेबांनीं कशा प्रकारचा उद्योग केला हें सांगावयाचें राहिलें. पूर्वींच्या अनेक नियमांच्या व कायद्यांच्या ऐवजीं एकच कायदा करण्याचा सरकारचा या वेळीं विचार ठरून, १८७५ सालीं चापमन साहेबांनीं कायद्याचा मसुदा तयार केला. या विषयाशीं रावसाहेबांचा पूर्वपरिचय बराच होता. १८६५ सालचा सर्वेचा कायदा झाला तेव्हां रावसाहेबांनीं त्यांतील कांहीं बाबींविरुद्ध तक्रार थेट विलायतेपर्यंत नेऊन पोंचविली होती, हें मागील भागांत सांगितलेंच आहे. त्यावेळीं रावसाहेब नुकतेच वकिलीचा धंदा करूं लागले होते, व लोकांमध्यें व सरकारामध्यें त्यांचें वजन फारसें नव्हतें. आतां ते कौन्सलदार झाले असल्यामुळें व वादविषयाचें विवेचन करण्याची क्षमता पूर्वींपेक्षां अधिक प्राप्त झाल्यामुळें आपल्या विचाराचें स्वरूप अधिकाऱ्यांना दर्शविण्याची त्यांना अपूर्व संधि मिळाली होती. ती संधि व्यर्थ दवडावयाची नाहीं असा संकल्प करून अव्याहत उद्योग करण्यासाठीं त्यांनीं कंबर बांधिली. प्रथमतः १८०० पासून १८७५ सालापर्यंत सर्व हिंदुस्थान देशामध्यें झालेल्या जमीनबाबींच्या कायद्यांचें अवलो-

कन करून त्यांतील मुख्य मुख्य कलमांचें टिपण करण्याची त्यांनीं सुरुवात केली. हें काम किती श्रमाचें होतें याची कल्पना सहज होण्यासारखी आहे. परंतु एकंदर विषयाचें महत्त्व लक्ष्यांत आणिलें ह्मणजे त्याचें पूर्ण विवेचन करण्यास अशा श्रमाची आवश्यकता होती व त्याशिवाय रावसाहेबांचें समाधान होण्यासारखें नव्हतें. असो. मसुद्याचें प्रथम वाचन झालें तेव्हां प्रस्तावनारूप जें रावसाहेबांनीं भाषण केलें त्यामध्यें ज्या कांहीं महत्त्वाच्या गोष्टींविषयीं उल्लेख करण्यांत आला होता त्या पुढील अवतरणावरून समजण्यांत येतील:—

"१८२७ सालचा १७ वा कानू अमलांत "असतांना सुतीदारांना जे हक्क व ज्या सव- "लती होत्या त्या प्रस्तुतच्या कायद्यानें पूर्णपणें "नाहींशा होतील असें दिसतें. त्या कानूच्या "अन्वयें जमीन महसुलाची व्यवस्था कशी "व्हावी याबद्दलचे नियम मात्र अंमलदारांच्या "माहिती करितां ठरविण्यांत आले होते. परंतु ह्या "कायद्याची मजल फारच पुढें गेली आहे. ह्या "कायद्याअन्वयें सुतीदारांच्या कांहीं वर्गासंबं- "धानें पूर्वीं न झालेले असे नियम ठरविण्यांत "येत आहेत. एकंदर हिंदुस्थान देशांत असा "प्रकार चालू करण्याचें हें पहिलेंच उदाहरण "आहे, तेव्हां त्याचा आस्थापूर्वक आणि पोक्त "विचार होणें जरूर आहे. हा कायद्याचा "मसुदा सिलेक्ट कमिटीपुढें जाईल तेव्हां "एकंदर सर्व गोष्टींचा विचार करितांना जर "मद्रासइलाख्यांतील जमीन महसुलाच्या काय- "द्यासंबंधी प्रिव्हिकौन्सलांत नुकत्याच झाले- "ल्या चर्चेकडे त्यांचें लक्ष जाईल, तर त्यांस "असें दिसून येईल कीं, प्रस्तुत कायद्यासारखे "विशिष्ट मुद्यासंबंधाचे कायदे वास्तविक ज- "रूर नसतां केले तर नुकसान होण्याचा "संभव आहे ही गोष्ट विचार करण्या- "सारखी आहे. जरूरच पडेल तेव्हां नवा "कायदा करूं नये असें माझें ह्मणणें नाहीं. "परंतु आवश्यकता नसून असे कायदे करण्यांत "आले असतां ते अहितकारक होत.

"हेतुपत्रकांत असें सांगितलें आहे कीं, "१८६५ सालापूर्वीं सर्वेचें काम प्रसंगानुसार "काढलेल्या वटहुकुमाअन्वयें चालत होतें व "१८६५ सालीं कायदा करणें जरूर झालें. "माझ्या मतें ही समजूत केवळ चुकीची आहे. "विशिष्ट प्रकारच्या कायद्याची त्या वेळेस "जरूर नव्हती. या इलाख्यांत सुतीदारांचे एक "किंवा दोनच प्रकार नसून पुष्कळ आहेत. "या गोष्टीची १८६५ सालीं व त्यापूर्वींही "विस्मृति झाली असें दिसतें. प्रथमत: सर्वेसंबं- "धानें जो कायदा झाला तो घाटावरील प्रदे- "शासंबंधानें झाला असें मी समजतों. पुढें "तोच कायदा भिन्नप्रकारच्या परिस्थितीच्या "प्रांतांना जेव्हां लागू करण्यांत आला तेव्हां तो "लागू पडेना यांत आश्चर्य नाहीं."

प्रथम वाचन झाल्यावर सिलेक्ट कमिटी नेमण्यांत आली. त्यांत रावसाहेब होते. मसुद्याची वाटाघाट होण्यापूर्वीं त्याचें भाषांतर व्हायाचें असतें, व भाषांतर करण्यापूर्वीं सिलेक्ट कमिटीकडून संमतिप्रदर्शक असें एक पत्र जावें लागतें. तसें पत्र तयार होऊन रावसाहेबांकडे सहीला गेलें. तेव्हां त्यांनीं सही करण्याचें नाकारिलें व पुढें लिहिल्याप्रमाणें कारणें दिलीं.

"या पत्रावर मला सही करितां येत नाहीं. "कायद्याचा विचार करण्यासाठीं कमिटीची "बैठक होण्यापूर्वींच या पत्राचा मसुदा तयार "करण्यांत आला होता असें अंडर सेक्रेटरी

" सांगतात. असें आहे तर कायद्याची मुळींच
" वाटाघाट न करितां तें पत्र गेलें अ-
" सतें तरी चाललें असतें. या कायद्यांतील
" अनेक कलमें मला पसंत नाहींत ह्मणून
" या पत्रावर मला सही करितां येत नाहीं. हीं
" कलमें कोणतीं हें मीं कमिटीला कळविलेंच
" आहे. कांहीं बाबींची वाटाघाट करण्यास मी
" केव्हांही तयार आहें, परंतु कांहींचा मला
" अधिक विचार केला पाहिजे व त्यांजविषयीं
" अधिक माहितीही मला मिळाली पाहिजे."

वरील प्रकार १८७५ सालीं घडला. त्या-नंतर कायद्याची प्रसिद्धि, त्याचा निरनिराळ्या भाषांमध्यें तर्जुमा, त्याजवर लोकांच्या मताचें प्रकाशन, व त्याची कमिटींत वाटाघाट, या कार्यपरंपरेंत दोन वर्षें गेलीं. १८७७ सालच्या जून महिन्यांत कौन्सिलची सभा भरली, तेव्हां सर्व कलमांचा क्रमशः विचार सुरू झाला. सिलेक्ट कमिटीमध्यें जो वाद झाला व जो निर्णय ठरला तो रावसाहेब व महंमद अल्ली रोगे यांस संमत झाला नाहीं, ह्मणून त्यांनीं आपल्या सहीचें एक निराळेंच पत्रक प्रसिद्ध केलें; त्यांतील मुद्यांचा आशय येणेंप्रमाणें:—

" फेरबदल करून प्रस्तुत समयीं या काय-
" द्याच्या मसुद्यास जें स्वरूप आलें आहे त्याव-
" रून आह्मांला असें दिसतें कीं, जमिनीवरचे
" लोकांचे जे कांहीं विशिष्ट प्रकारचे हक्क अ-
" सतात त्यांकडे या मसुद्यांत मुळींच दुर्लक्ष्य
" केलेलें आहे. हा प्रकार केवळ अन्याय्य आहे.
" एकंदर इलाख्यामध्यें 'वतनदार' वगैरे सं-
" ज्ञांनीं ओळखले जाणारे जमीनदारांचे अनेक
" वर्ग आहेत, त्यांचे त्यांच्या जमिनीवर मालकी-
" चे हक्क आहेत व ते त्यांचे हक्क कबूलही
" करण्यांत आले आहेत. गुजराथेंत सुद्धां
" गांवठाणांवर लोकांचा मालकीचा हक्क अस-
" तो ही गोष्ट पेडर, ट्रेव्हर इत्यादि अधिकाऱ्यां-
" नीं मान्य केली आहे. १८६५ चा आक्ट १
" यांत 'जमिनीचे मालक' व 'व्यक्तिविशे-
" षांच्या जमिनी' यांजविषयीं उल्लेख आहे.
" असें असूनही मालकीच्या हक्काचें नवीन
" कायद्यांत नांव देखील नाहीं. शिवाय alie-
" nated ह्मणजे 'दुसऱ्यास तोडून दिलेली जमी-
" न' या शब्दाची जी व्याख्या करण्यांत
" आली आहे त्या व्याख्येवरूनही जमिनीवर
" लोकांचा मालकीचा हक्क नाहीं असें गृहीत
" घेतल्यासारखें दिसतें.

" लोकांना दिलेल्या ज्या जमिनी आहेत व
" ज्या सरकारच्या आहेत त्यांजमधील भेद
" स्पष्टपणें दाखवून त्यांचा निर्देश करणें अव-
" श्य आहे. परंतु असें करण्यांत आलेलें नाहीं.
" मुद्याच्या शब्दांच्या ज्या व्याख्या दिल्या आहेत
" त्यांमुळें अर्थबोध स्पष्ट न होतां गोंधळ
" मात्र होतो. सरकारच्या ताब्यांत असलेल्या
" जमिनीचा विनियोग ज्याप्रमाणें सरकारास त्यां-
" च्या इच्छेप्रमाणें करितां येतो त्याचप्रमाणें
" प्रजाजनांच्या मालकीच्या जमिनींचा त्यांसही
" करितां यावा. तसा विनियोग त्यांस करितां
" येतो हें ठाणें जिल्ह्यांतील एका प्रकरणांत हाय-
" कोर्टानें ठरविलें आहे.

" सुतीदार व त्यांचीं कुळें यांचा जो पर-
" स्पर संबंध आहे, त्याविषयीं नवीन कायद्यांत
" असलेलीं कलमेंही फारच आक्षेप घेण्या-
" सारखीं आहेत.

" गांवठाण ह्मणून नेमून दिलेल्या जमिनी-
" वर सारा घेण्याची वहिवाट सिद्ध करण्यांत
" आली नाहीं. १८६८ सालचा आक्ट ४
" झाला तेव्हां या विषयाची पूर्णपणें वाटाघाट

" झाली होती व तेव्हां ठरलेल्या नियमांत आ-
" तांच फेरबदल कां करण्यांत येत आहे हें
" समजत नाहीं. त्या नियमांमुळें कांहीं नुकसान
" झालेलें जोंपर्यंत प्रत्ययास आलें नाहीं तों-
" पर्यंत त्यांचें परिवर्तन करण्याचें कारण नाहीं.
" सदर कोर्ट व हायकोर्ट यांच्या निवाड्यांमध्यें
" वर निर्दिष्ट केलेल्या जमिनीवर साऱ्याची आ-
" कारणी करणें वाजवी नाहीं असाच एकसा-
" रखा अभिप्राय आहे. आधुनिक अर्थशास्त्र-
" कार सुद्धां असें कबूल करितात कीं, घरें बां-
" धण्यासाठीं उपयोगांत आणिलेली जमीन व
" इतर जमीन यांजमध्यें विलक्षण तफावत
" आहे. या इलाख्यांत तर ती जमीन इतकी
" पवित्र मानण्यांत येते कीं, तिच्या नांवानें श-
" पथ घेण्याची वहिवाट पडलेली आहे. तेव्हां
" अशा प्रकारच्या जमिनीवर रिवाजाविरुद्ध
" सारा आकारण्याचीं कलमें दूरवर विचार केल्या-
" शिवाय मंजूर करूं नयेत हेंच कौन्सिलास
" शोभण्यासारखें आहे.

" जमिनींतील खनिज द्रव्यें व पुरलेले नि-
" धि यांजवर सरकारचा हक्क आहे, व यांचा
" तपास करण्याकरितां सरकारी अधिकाऱ्यास
" कोणत्याही जमिनीवर जाऊन ती उकरण्याचा
" हक्क आहे, असें जें एक कलम आहे तेंही
" आह्मांला मान्य नाहीं. ब्रह्मदेशांतील काय-
" द्यावरून हें कलम प्रस्तुत मसुद्यांत घालण्यांत
" आलें आहे. पहिल्या मसुद्यांत हें कलम नव्हतें,
" व सिलेक्ट कमिटीपुढें जो मसुदा आला त्यां-
" तही हें नव्हतें. कमिटीचें काम संपतां संपतां हें
" घालण्यांत आलें, परंतु तसें करण्याचा हेतु
" सांगण्यांत आला नाहीं. "

मसुद्याचें द्वितीय वाचन झालें तेव्हां सर्व क-
लमांचा क्रमशः विचार झाला. त्यावेळीं राव-
साहेबांनीं बहुतेक महत्त्वाच्या कलमांवर आक्षेप
घेतले. प्रत्येक कलमाचा विचार होई तेव्हां
रावसाहेब आपली हरकत पुढें आणण्यास सिद्ध
असत व त्यांची प्रत्येक सूचना बहुमतानें ना-
पसंत ठरे. त्यावेळच्या वादविवादाची प्रसिद्ध
झालेली हकीकत वाचली ह्मणजे चमत्कार वा-
टल्यावांचून रहात नाहीं. कलम पुढें आलें ह्म-
णजे रावसाहेबांनीं फेरफार सुचवावा. सरकारतर्फे
एका कौन्सलदारानें नाकबुली प्रदर्शित करावी,
व वादविवाद होऊन अखेरीस सरकारच्या तर्फे
सात मतें व रावसाहेबांच्या तर्फे चार मतें पडून
मूळ कलम कायम व्हावें: असा एकसारखा चा-
ललेला प्रकार पाहून कोणालाही उद्वेग येण्याचा
संभव आहे. निदान विरोध करण्यास जो उत्साह
आवश्यक असतो त्याचा भंग तरी अशा रीतीनें
झाल्याशिवाय रहाणार नाहीं. परंतु आरंभीं जी
वृत्ति होती तीच रावसाहेबांनीं अखेरपर्यंत कायम
राखिली व प्रारब्धकार्याचा त्याग केला नाहीं.
सरकारी कौन्सलदार ह्मटले ह्मणजे आपआपल्या
विषयांत पारंगत; शिवाय त्यांचा प्रथमपासूनच
तो व्यवसाय असल्यामुळें एकंदर सगळ्या खु-
ब्या त्यांस पूर्णपणें अवगत; तशांत सर्व कागद-
पत्र लागतील तेव्हां पहाण्याची त्यांस सवड;
अशा स्थितींत सरकारानें पूर्वी वाटाघाट करून
कौन्सिलापुढें आणिलेल्या मसुद्यावर आक्षेप
घेणें व सरकारतर्फेच्या सर्व कौन्सलदारांनीं
विचारिलेल्या प्रश्नांस उत्तरें देण्यास तयार असणें
हें फारच दुष्कर आहे. ह्मणूनच रावसाहेबांसार-
ख्या असंख्य व्यवसायव्याप्त एतद्देशीय कौ-
न्सलदारानें सरकारी कौन्सलदाराबरोबर जमीन
महसुलाच्या कायद्यासारख्या भानगडीच्या
प्रकरणांत वाग्युद्ध करण्यास सज्ज व्हावें व उघड

उघड यशःप्राप्तीची आशा नसतांही अखेरपर्यंत पराङ्मुख न व्हावें ही गोष्ट त्यांस अत्यंत भूषणावह आहे. या कामीं रावसाहेबांनीं शारीरिक श्रम सोसले, मानसिक अस्वस्थता सहन केली, व पैशाचेंही नुकसान करून घेतलें. महंमदअली रोगे यांची रावसाहेबांस अव्वलपासून अखेरपर्यंत पूर्ण मदत होती. इतर एतद्देशीय सभासदांनींही बहुतेक प्रसंगीं रावसाहेबांच्या तर्फे मत देण्याचें साहस केलें याबद्दल ते प्रशंसेस पात्र आहेत. शेवटीं मात्र एका बाबतींत सोराबजी शापुरजी बंगाली व दुसरे एक गृहस्थ यांनीं रावसाहेबांचा पक्ष सोडला तेव्हां रावसाहेबांच्या तर्फे महंमदअली रोगेच राहिले होते. गांवठाणावरच्या हक्कासंबंधीं असलेल्या कायद्याच्या कलमांचा जेव्हां विचार चालला होता, तेव्हां महमदअलींनीं गव्हर्नरसाहेबांना रावसाहेबांच्या सूचना मान्य करण्याविषयीं आग्रहपूर्वक विनंती केली, त्यासमयीं त्यांनीं स्पष्टपणें असें बोलून दाखविलें कीं, सरकारानें ज्या कायद्याचा पुरस्कार केला तो कायदा कौन्सलांतून पार पडला ह्मणून समजण्यास हरकत नाहीं. कौन्सलांतील सभासदांपैकीं अधिक संख्या सरकारी अधिकाऱ्यांची असते, व जो पक्ष सरकारानें स्वीकारिला तो त्या अधिकाऱ्यांस संमत नसला तरी त्याचें समर्थन केल्याशिवाय त्यांस गत्यन्तर नसतें; जमीनमहसुलाच्या कायद्यांत फेरबदल करण्याविषयींच्या सूचनांवर अनुकूल व विरुद्ध अशीं जीं मतें पडलीं त्यांची मीमांसा केली असतां असें दिसून येईल कीं, बहुतेक प्रसंगीं सर्व युरोपियन सभासद एका बाजूचे व एतद्देशीय सभासद एका बाजूचे झाले होते; जसे कांहीं दोन तट असावे व विशिष्टप्रकारच्या लोकांना विशिष्ट तटाचा अभिमान असावा तसा प्रकार कौन्सिलामध्यें झालेला दिसतो; एतद्देशीय सभासदांचा पक्ष नेहेमींच दुर्बल असणार, तेव्हां त्यांस केव्हांही यशःप्राप्ति होण्याचा संभव नाहीं. तथापि आपलीं स्वतःचीं मतें प्रदर्शित करण्याचें त्यांचें कर्तव्य आहे; कारण कीं कौन्सिलाकडून अहितकारक असे कायदे मंजूर झाले तर प्रत्यक्ष किंवा परंपरेनें त्यांचे परिणाम एतद्देशीय सभासद व त्यांचे गरीब देशबांधव यांसच भोगावे लागतील.

[ पुढें चालेल. ]

## आईची थोरवी व तिचीं कर्तव्यें.

### भाग पहिला.

यं मातापितरौ क्लेशं सहेते संभवे नृणाम् ।
न तस्य निष्कृतिः शक्या कर्तुं वर्षशतैरपि ॥

मनुः

**आई व तिचें मूल**—आईनें आपलें मूल मांडीवर घेतलें आहे व ती त्यास पाजीत आहे, असें चित्र काढून जर त्याकडे आपण पाहत बसलों, तर आपल्या तोंडांतून काय उद्गार निघतील बरें ? ' अवर्तन ! हें चित्र कितीतरी मनोहर आहे ! यापेक्ष व स्वस्त प्रेक्षणीय व जास्त मनोवेधक दुसरें कि घरमेंडेल काय ? ' पहिलेंच मूल मांडीवर घेऊन नाई त्यास स्तनपान देत आहे हें पाहून ज्याचें अंतःकरण द्रवत नाहीं, तो खरोखर सात्विक वृत्तीचा मनुष्य नसला पाहिजे. त्याला मनुष्य ह्मणणें योग्य नाहीं. आजपर्यंत जगांत जे मोठे नामांकित चित्रकार होऊन गेले, त्यांनीं आई व तिचें स्तनपान करणारें अर्भक, या हृदयास पाझर फोडणाऱ्या

पण साध्या देखाव्याचें हुबेहुब चित्र काढण्याचा प्रयत्न केला आहे; परंतु त्यांतली खरी खुबी त्यांस न साधल्यामुळें ते निराश झाले आहेत. चित्रकारांमध्यें अति विख्यात जो राफेल—ज्याला हव्या त्या देखाव्याची खुबी हुबेहुब उतरण्याची परमेश्वरानें जणूं काय देणगीच दिली होती—तो या साध्या गोष्टीचें हुबेहुब स्वरूप वठविण्याचा कित्येक वर्षें सारखा यत्न करीत होता; पण त्याच्या हातून मनाप्रमाणें तें वठलेंच नाहीं. गोष्ट पाहिली तर दररोजच्या पाहण्यांतली, अगदीं साधी; तरी मोठमोठे कलमबहादर चित्रकार मोठ्या चातुर्यानें ती चित्रांत उतरण्याचा यत्न करितात, तरी मूळ गोष्टींतली खुबी उतरत नाहीं ती नाहींच !

सर्व भाषांमध्यें आई या अर्थाचा शब्द किती गोड व आनंदकारक आहे ! मुलांस बोलतां येण्यापूर्वीं तीं प्रथम 'आई' हा शब्द उच्चारूं लागतात. तसेंच आपणांस कांहीं ठेंच लागली, हात कापला, किंवा एकदम कांहीं जखम झाली, किंवा वेदना होऊं लागली, तर आरंभीं आई हाच शब्द तोंडीं येतो. या शब्दांत कांहीं विलक्षण प्रेम आहे. तसेंच आपल्या अपत्यांबद्दलचें आईस वाटणारें प्रेमही अमर्याद व अहेतुक असतें. त्यांच्यावर [illegible]ी जशी भक्ति असते, तशी कोणाची क[illegible] विरळाच. 'कळवळ्याची जाति, करी [illegible]ाविणें प्रीति' ही उक्ति अपत्यांबद्दलच्या [illegible] या वर्तनास किती बरोबर लागू पडते ! मूल होईपर्यंत कोणत्याही स्त्रीच्या स्वभावाची खरी परीक्षा होत नाहीं. मूल झाल्यानंतर तिच्या स्वभावांत पोक्तपणा येऊन, जे गुण तिच्या अंगीं आहेत असें कोणासही पूर्वीं वाटत नव्हतें, तेच गुण स्वाभाविकपणें तिजमध्यें दिसूं लागतात. तिचा पोरकटपणा जाऊन तिच्या अंगीं भारदस्तपणा येऊं लागतो, व तिचा भेकडपणा नाहींसा होऊन तिच्या अंगीं धैर्य येतें. अपत्यांबद्दल वाटणारें प्रेम, अपत्यसंगोपनास लागणारी सहनशीलता व शांति, इत्यादि निरनिराळ्या गुणांचा प्रादुर्भाव तिजमध्यें दिवसेंदिवस जास्त दिसूं लागतो. सारांश, जे गुण आपणांत आहेत अशी कल्पना सुद्धां तिला नसते ते गुण स्वाभाविकपणें तिच्यांत येऊन तिला भूषणदायक होतात.

अपत्यांविषयींचें आईचें प्रेम व बापाचें प्रेम यांतही फरक असतो. आपला मुलगा आपलें नांव चालवील, तो चांगला निघाल्यास आपण प्रख्यातीस येऊं व आपल्या वंशाची कीर्ति होईल, असें बापास वाटत असतें. मुलाच्या अंगीं कांहीं चांगला गुण असल्यास तो आपल्यामुळेंच आहे असेंही बापास वाटूं लागतें. परंतु आईच्या प्रेमाचा प्रकार याहून फारच भिन्न असतो. तिचें प्रेम फारच शुद्ध असतें. केवळ अपत्यांकरितांच तें असतें, त्यांत कोणतीही भेसळ नसते. मुलावर तिचें प्रेम प्राणापलीकडे असतें. ती त्याच्या बऱ्याकरितां हवीं तीं संकटें व हाल सोसण्यास आणि त्याची हवी ती कामगिरी बजावण्यास नेहमीं तयार असते. मूल आजारी असतांना त्याच्याजवळ रात्रीच्यारात्री कुरकुर न करितां राहून, व स्वतःस कितीही श्रम पडले तरी ते मुळींच मनांत न आणतां, ती एकसारखी झटत असते. इतर लोकांनीं त्याच्या बरें होण्याबद्दलची आशा सोडिली तरी तिला आशा वाटतच असते; त्याच्याबद्दल आतां कांहीं भीति नाहीं असें जरी दुसऱ्यांस वाटलें तरी तिची भीति कायमच असते; त्याला बरें होण्यास जरी फार वेळ लागला

तरी कंटाळा न करितां त्याच्या संबंधानें प्रत्येक प्रकारचें कंटाळवाणें काम सुद्धां फार शांतपणानें व प्रेमानें ती करीत असते. आज कांहीं गुण येईल, उद्या कांहीं बरें वाटेल, असें मनांत आणून सर्व प्रकारचे हाल सोसण्यास ती तयार असते. दुसऱ्या कोणास दुःख होत असतां तिचें अंतःकरण कदाचित् कळवळून जाणार नाहीं; परंतु आपलें मूल त्या स्थितींत आहे असें तिच्या दृष्टीस पडतांच ती त्याच्या दुःखनिरसनार्थ कोणी कांहीं ह्मटलें तरी तिकडे लक्ष न देतां, मोठ्या उमेदीनें तयार होते व त्याची शुश्रुषा करूं लागते. ऐन संकटाच्यावेळीं सर्वांनीं आपणांस सोडिलें, तरी आपली आई आपणांस मदत करण्यास आपल्या संन्निध असतेच. आपण एकादी मोठी चुकी केली असतां त्याबद्दल बरें वाईट बोलून आपणांस ताळ्यावर आणावयाचें असल्यास, कांहीं क्रोध न दाखवितां अंतःकरणापासून वाईट वाटत आहे असें दाखवून, आपणांस ताळ्यावर आणण्याचा ती एकसारखा प्रयत्न सुरू ठेविते. आपण तिच्या अंतःकरणांत सदैव वास करितों व ती आपणास कधींही विसरत नाहीं. आईच्या अपत्यप्रेमांत जें विलक्षण मार्दव असतें तें फारच चिरस्थायी असतें. ह्मणूनच रामदासस्वामींनीं ह्मटलें आहे कीं:—' बालक जाणेना मातेसी, तिचें चित्त बाळापाशीं. ' तिच्या अंतःकरणांतील एकंदर कोमल वृत्तींमध्यें अपत्यप्रेमाची वृत्ति फारच बलवत्तर असते. आपलपोटेपणामुळें या प्रेमांत कधींच अंतर पडावयाचें नाहीं. कसाही धोक्याचा प्रसंग आला तरी हें प्रेम ढळावयाचें नाहीं. अपत्याच्या कमी योग्यतेमुळें तें कमीही व्हावयाचें नाहीं, किंवा त्याच्या कृतघ्नतेमुळें तें ऱ्हासही पावावयाचें नाहीं; अपत्याच्या सोयीसाठीं वाटेल त्या आत्मसुखाचा त्याग करावयास सदा सर्वकाळ आई तयारच असते. त्याच्या सुखासाठीं स्वतःच्या वाटेल त्या आनंदावर पाणी सोडण्यास ती मागें पुढें पाहत नाहीं. त्याची कीर्ति झाली असतां तिला केवढें तरी भूषण वाटतें! त्याचा अभ्युदय झाला असतां तिच्या आनंदास पारावार नाहींसा होतो. " अपत्यावर एकादें संकट आलें तर तें अपत्य केवळ त्या संकटामुळेंच तिला अधिक प्रिय वाटूं लागतें. त्याची कांहीं कारणामुळें नाचक्की झाली तरी सुद्धां तिच्या प्रेमांत यत्किंचित् सुद्धां कमीपणा होत नाहीं. " सारांश, ' कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति–' या उक्तीचें प्रत्यंतर जगाचें बारिक रीतीनें अवलोकन करणारास दररोज दिसण्यासारखें आहे; असो.

घरगुती कामांत सुद्धां सूज्ञ आई जर पाहणारीसवरणारी असली तर परिणाम फारच चांगला होतो. तिच्या योगानें घराला शोभा येते व त्याचें सौंदर्य वाढतें. तिच्या कर्तबगारीनें तें विश्रांतिस्थान बनतें. सर्व प्रकारचा नीटनेटकेपणा राखून सर्व व्यवस्था करण्याची हातोटी तिला साधलेली असते. घरांत चिरकाल शांतता राहण्याकरितां जें चांगलें वळण सर्वांस लागणें इष्ट आहे, तें तीच लाविते. तिचें वर्तन प्रेमळ असून भारदस्तपणाचें असल्यामुळें व स्वार्थत्यागाची ती केवळ मूर्तिच असल्यामुळें घरांतल्या माणसांवर सहजिकपणेंच तिचें वजन बसतें. तिजपुढें व्रात्य मुलें तावडतोब आज्ञाधारक बनतात. त्यांस ताळ्यावर आणण्याकरितां तिला कडक उपाय योजण्याची मुळींच जरूर पडत नाहीं. घरांत सर्वत्र व्यवस्था व स्वच्छता असल्यामुळें पोटापाण्याच्या धंद्यानें श्रमून घरीं आलेल्या घरधन्याची चित्तवृत्ति शांत होऊन त्याचा थकवा नाहींसा होतो. तिच्या

गोड सान्निध्याचा परिणामच असा होतो कीं, सर्व संसारचक्र फार सुरळीत रीतीनें चालूं लागतें. दुर्दैवाचा फेरा येऊन आई घरांतून नाहींशी झाल्यास गृहप्रभा नष्ट झाल्यासारखी होते. प्रभातकाळीं व रात्रीं सृष्टिसौंदर्याची जी मजा दिसते ती पुनःपुनः त्या त्या वेळीं दिसेल; व वसंतऋतु संपतांच त्यांतली बहार नाहींशी झाली तरी हिंवाळा गेल्यावर तो ऋतु परत येतांच ती पुनः आपल्या दृष्टीस व मनास रंजवील. परंतु आई नष्ट झाल्यानें रिती झालेली जागा कशानेंही भरून येत नाहीं. कुटुंबांतून आई नाहींशी झाली ह्मणजे त्या कुटुंबांत ती असतांना जो अपूर्व आनंद दृष्टीस पडत असे तो पुनः कधींच दिसून येत नाहीं. हरएक कामासंबंधानें वेळच्यावेळीं सावधगिरी ठेवून त्यास जपणें, सर्वांचें सुखदुःख जाणणें, ज्याच्या त्याच्याकडून योग्य काम घेणें, मुलांबाळांस फारसा कडकपणा न दाखवितां योग्य वेळीं जपून ताळ्यावर आणणें, व एकंदर संसाराचा गाडा सुरळीत चालू ठेवणें, हीं कामें शाहण्या आईकडून जशीं चांगलीं होतात तशीं दुसऱ्या कोणाकडूनही व्हावयाचीं नाहींत. तसेंच ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं न गडबडतां धैर्य धरून प्रसंग पार पाडणें, व त्या प्रसंगीं स्वतःला कितीही दुःख झालें तरी तें मनांत न आणणें, वगैरे कामांस लागणारी गंभीरता तिच्या अंगीं असते. अशा प्रसंगीं तिच्या अंगचा धिमेपणा दृष्टीस पडतो व तिची सहनशीलता दिसून येते. ही तिची वृत्ति पाहून सभोंवतालच्या माणसांस सुद्धां काम करण्याचें स्फुरण येतें. सारांश–सारासारविचार, दूरदृष्टि, दक्षता, चातुर्य व स्वार्थत्याग, इत्यादि संसारोपयोगी व थोर गुण आईमध्यें दिसण्यांत येतात. ह्मणून 'आईसारखें दुसरें दैवतच नाहीं' असें जें विद्वानांचें वचन आहे तें अगदीं यथायोग्य आहे.

आजपर्यंत या जगांत जे मोठमोठे लोक होऊन गेले त्या बहुतेकांस मोठेपणा केवळ त्यांच्या आयांमुळे प्राप्त झाला ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. त्यांची बुद्धिमत्ता, त्यांचें अलौकिक धैर्य, त्यांची नीतिमत्ता, त्यांचें औदार्य, वगैरे गुण त्यांच्या आंगीं त्यांच्या आयांपासून आलेले दिसतात. 'सुशीलो मातृपुण्येन' अशा लोकांची मातृभक्तिही त्यांच्या गुणांप्रमाणेंच मोठी असते. महाराष्ट्राचें नांव ज्या तेजस्वी महापुरुषानें गाजविलें व आपल्या अजब शिताफीनें व अनुपम कर्तबगारीनें औरंगजेबासारख्या कावेबाज व मसलती बादशाहास व शाइस्तेखानासारख्या कुरेबाज सरदारास सुद्धां चकवून तोंडांत बोट घालावयास लाविलें, त्या शिवाजी महाराजांची मातृभक्ति केवढी होती हें त्यांचा जीवनवृत्तांत वाचणारांस ठाऊक आहेच. अगोदर दादोजीकोंडदेवाचा व नंतर रामदासस्वामींचा उच्च प्रकारचा बोध ग्रहण करून तदनुसार चोख वर्तन करण्यास शिवाजी महाराज तयार झाले यास तरी सुशील, ईश्वरपरायण व शाहण्या जिजाबाईचेंच गृहशिक्षण कारण होय. तसेंच, ज्याचे अतुल पराक्रम सर्व जगास विदित झाले आहेत, व ज्याचा यशोदुंदुभि अमेरिकेंत सारखा दुमदुमत आहे, त्या प्रसिद्ध जॉर्ज वाशिंगटनाचें चरित्र वाचणाऱ्यांची पक्की खात्री होईल कीं, त्या महापुरुषाच्या हातून जें काय झालें, त्या बहुतेकाचें श्रेय त्याच्या मातेलाच दिलें पाहिजे. जॉर्ज अकरा वर्षांचा असतां त्याचा बाप निवर्तला. तेव्हां त्या कुटुंबा-

च्या संसाराचा सर्व बोजा त्याच्या आईवर पडला. ही स्त्री जर कच्च्या हिंमतीची असती, तर सर्वच अव्यवस्था होऊन या कुटुंबाची व त्यांतील मुलाबाळांची व एकंदर मालमत्तेची दुर्दशा होऊन गेली असती. पण त्या वेळेस मनाचा समतोलपणा राखून या बाईनें मोठया धीरानें एकंदर मालमत्तेची नीट व्यवस्था लाविली, व मुलाचें संगोपन व्यवस्थित रीतीनें करून त्याचें शिक्षण सुद्धां स्वतःच्या देखरेखी खालीं करविलें. दूरदर्शित्व, प्रामाणिकपणा, करारीपणा वगैरे ज्या गुणांनीं **वाशिंग्टन** कीर्तीच्या शिखरास चढला व कृतज्ञ लोकांच्या स्तुतीस पात्र झाला, ते गुण केवळ त्याच्या आईनें त्यास लाविलेल्या वळणाचें फल होय. तसेंच **इंग्लंडांत पहिल्या चार्ल्स** राजाच्या वेळीं राजा व प्रजा यांच्या दरम्यान बेबनाव होऊन जें भयंकर रण माजलें, व ज्याचा शेवट राजाच्या शिरच्छेदानें झाला, त्या आणीबाणीच्या व धामधुमीच्या प्रसंगीं ज्यानें आपली असाधारण कर्तबगारी लोकांस दाखवून त्यांस विस्मित केलें, त्या वीरमणि **क्राम्वेल**ची हकीकत ऐकावी तेव्हां त्याच्या बापाचें नांव फारसें ऐकण्यांत न येतां त्याच्या आईचेंच नांव ऐकण्यांत येतें. कोणत्याही प्रसंगीं दुसऱ्याची मदत न घेतां स्वतःच्या पायांवर उभें राहण्याचा या स्त्रीचा बाणा असे. **क्राम्वेल**ची अढळ धर्मश्रद्धा, त्याचा दृढनिश्चय, त्याचा धिमेपणा व स्वभावाचें स्थैर्य, इत्यादि गुण त्याच्यांत त्याच्या आईकडून आलेले होते. तसेंच **फ्रान्स** देशांत बंडखोरांनीं १६ व्या **लुई** राजाचा वध केल्यावर जी अंदाधुंदी माजली होती, ती हां हां ह्मणतां चट्सारी नाहींशी करून ज्यानें देशचे देश पादाक्रांत केले व आपल्या अद्वितीय शौर्यानें सर्व **युरोपखंड** हालवून सोडिलें, त्या वीरशिरोमणी **नेपोलियन**ची आपल्या आईबद्दलची भक्ति फार होती व तिची सेवा करण्यास तो नेहमीं तयार असे. " माझ्यामध्यें कांहीं चांगुलपणाचा भाग असेल व माझ्या हातून जर कांहीं नांव घेण्यासारखें कृत्य झालें असेल, तर त्या सगळ्याचें यश माझ्या आईलाच दिलें पाहिजे व त्याबद्दल तिचीच स्तुति केली पाहिजे– " असे उद्गार तो नेहमीं आपल्या मित्रांजवळ काढीत असे.

सदहूप्रमाणेंच देशचेदेश काबीज करून त्या त्या ठिकाणच्या राजांस ज्यानें पादाक्रांत केलें व शेंकडो–हजारो–प्रांतचे प्रांत लुटले, जाळिले, उध्वस्त केले आणि स्वपराक्रमानें तीन्ही खंडांत आपलें नांव अजरामर केलें, त्या प्रतापी **शिकंदर बादशाहा**ची गोष्ट सुद्धां अशीच आहे. अशा प्रकारचीं इतिहासप्रसिद्ध पुष्कळच उदाहरणें देतां येतील. **शिकंदरबादशाहा**च्या आईचा स्वभाव फार जालीम असून ती महत्वाकांक्षी असल्यामुळें तिच्या मुलांस तिजपासून कधीं कधीं बराच त्रास सोसावा लागे. एके प्रसंगीं **शिकंदर बादशाहा** एशिया खंडांत ठिकठिकाणीं स्वाऱ्या करून प्रांतचेप्रांत काबीज करीत असतां त्याचा प्रधान **अँटिपेटर** याजकडून त्यास एक पत्र आलें, त्यांत–" आपली आई राज्यप्रकरणीं कामांत सुद्धां ढवळाढवळ करिते व त्यामुळें मला फार त्रास होतो " असें लिहिलें होतें. त्यावर त्या बादशाहाच्या तोंडांतून असे उद्गार बाहेर पडले: "माझ्या आईच्या डोळ्यांतून अश्रूचा एक थेंब पडला तर अशीं सहाशें पत्रें पुसून जाऊन तीं व्यर्थ होतील, हें **अँटिपेटर**ला कळत नाहीं. " तात्पर्य, या जगाच्या रंगभूमीवर वर नमूद केल्यासारखीं जीं अनेक पात्रें येऊन

गेलीं, त्यांच्या कृतींत कितीही भिन्नता दिसली, तरी आपल्या आईचे आपण ऋणी आहों, आपल्या अंगीं मोठेपणा असलाच तर तो आपल्या आईमुळें आहे, अशा समजुतीच्या बाबतींत मात्र त्यांचें पूर्ण साम्य दिसतें.

याप्रमाणें आईची थोरवी वर्णावी तितकी थोडीच होणार आहे. तिऱ्हाईत मनुष्यानें एकाद्या मुलास ताळ्यावर आणण्याकरितां दोन दोन तीन तीन तास उपदेश करून कशीही खटपट केली तरी जो इष्ट परिणाम घडून येत नाहीं, तोच परिणाम आईच्या दोनचार शब्दांनीं सहज घडून येतो. लहान मुलास शिक्षक बारा महिन्यांत जें शिकवील तेंच आई मोठ्या प्रेमळ रीतीनें दोन महिन्यांत शिकवील, असा सर्वत्र अनुभव आहे. पण ज्याप्रमाणें सुज्ञ आईपासून होणाऱ्या कल्याणाचें वर्णन करावें तितकें थोडेंच, त्याचप्रमाणें वाईट आईकडून होणाऱ्या दुष्परिणामांचें वर्णन करावें तितकें कमीच होणार आहे. विचारशून्य, आळशी, असमंजस अशी आई असल्यामुळें किती मुलांच्या आयुष्याची नासाडी झाली असेल ? किती मुलांचें आयुष्य व्यर्थ गेलें असेल? आपल्या आईच्या अंगीं निश्चय नसल्यामुळें, तिनें आपले फाजील लाड केल्यामुळें, व तिला सारासार विचार करण्याची संवय नसल्यामुळें, आपणास लागावें तसें वळण लागलें नाहीं व आपली बुद्धि भलत्याच मार्गाकडे लागली, असें मनांत येऊन हळहळणारे कितीक तरी असतील !

' लहानपणीं तूं माझ्या मनांत सुनीतीचीं तत्त्वें बिंबवून दिलींस व मजकडून जीं कांहीं आज सत्कृत्यें यथाशक्ति घडत आलीं आहेत, तीं त्याचींच फळें आहेत—असें वारंवार माझ्या मनांत येऊन, तुझे उपकार मजकडून कधींच फिटावयाचे नाहींत असें वाटूं लागतें. ' अशा अर्थाचें पत्र एका प्रसिद्ध गृहस्थानें आपल्या आईस पाठविलें तें वाचून तिला कितीतरी धन्यता वाटली असेल !

आपलें कर्तव्य—मग तें लहान असो किंवा मोठें असो—उत्तम प्रकारें बजाविलें जाऊन त्याचें सुफल आपल्या पाहण्यांत आलें असतां जें समाधान वाटतें व जो विलक्षण आनंद होतो त्याचें वर्णनच करितां येत नाहीं. त्यांतली बहार ज्यास त्याचा अनुभव आला असेल त्यासच ठाऊक. उलटपक्षीं, आपणास लहानपणीं कोणत्याही प्रकारचें चांगलें वळण आपल्या आईनें लाविलें नाहीं, आपलें संगोपन व्हावें तसें झालें नाहीं,—ह्मणून सर्वतोपरि आपण अगदीं हताश झालों, अशा अर्थाचे आपल्या अपत्यांकडून निघालेले उद्गार जर एकाद्या आईनें ऐकिले तर तिला काय वाटेल, ह्याची कल्पना वाचकांनींच करावी.

[ पुढें चालेल. ]



Printed at the " Ganpat Krishnaji' " Press, Bombay, 30-9-99

मदयंतिका ह्मणाली, 'अग, त्या थोर व महानुभाव माधवावर मालतीचें मन बसलें व उभयतांचीं प्रेमाचीं भाषणेंही झालीं. त्याविषयीं लोकांत पुष्कळच चर्चा झाली. त्याचाच हा परिणाम, समजलीस? तेव्हां गडे लवंगिके, इच्या मनांतून नवऱ्याविषयींचा वैरभाव पार काढून टाका बरें! नाहींतर मोठा दोष येईल, कळलें? निष्कंप दारुण अशा मुली लोकांच्या मनांत मोठा संताप उत्पन्न करितात. ही शंका मी घेतली असें, किंवा मी असें सांगितलें एवढें, मात्र नका ह्मणूं बरें कोणाजवळ!'

हें एकतांच लवंगिकेनें मोठा रागाचा व त्रासाचा झटकारा दाखविला व एकदम तिला ह्मटलें, 'जा गे! ठाऊक आहेस! लोकांच्या भलत्या बडबडीवर विश्वास ठेवून वेड्यासारखें कांहीं तरी बडबडतेस! जा, तुझ्याशीं काय बोलायचें आहे!'

तेव्हां मदयंतिका तिला ह्मणाली, 'वा: असें काय बरें रागावतेस? क्षमा कर! असें मोघम मोघम कां बरें बोलतां? मालतीचा सगळा जीव कां प्राण केवळ माधवावर अटकला आहे, हें आपण नाहीं का जाणत? केतकीच्या पानाप्रमाणें फिकट पडलेलें व दुर्बल पण सुंदर अशा अवयवांनीं युक्त व केवळ माधवानें गुंफलेल्या बकुलमालेच्या आधारावरच जणों जिवंत दिसणारें शरीर—तसेंच माधवाचें तें पहांटच्या निस्तेज चंद्रबिंबाप्रमाणें फिकट व कृश झालेलें शरीर—कोणी बरें पाहिलेलें नाहीं? तसेंच त्या दिवशीं, कुसुमाकरोद्यानाजवळील राजमार्गाच्या तोंडावर आपली सर्वांची गांठ पडली होती, त्यावेळीं मालती व माधव यांचे परस्परचकित, उल्हासयुक्त, सकौतुक व आतुर असे मदनपरवशतेच्या विकारामुळें होणारे प्रेमाचे कटाक्ष आणि तितक्यांतच मालतीला महाराजांनीं दादाला दिल्याचें वर्तमान कळतांच, त्या दोघांचीही चित्तवृत्ति व सर्व शरीराची स्थिति अकल्पित अग्निवर्षाव व्हावा त्याप्रमाणें उद्विग्न व म्लान झालेली मी स्वत: पाहिली नाहीं का?—हो पण, मला गडे आणखींही एका गोष्टीची आठवण झाली—' त्यावर लवंगिका ह्मणाली, 'ती कोणची बरें दुसरी गोष्ट?'

मदयंतिका ह्मणाली, 'अग, त्यावेळीं मला जीवदान देणारा तो महाभाग शुद्धीवर आलेला पाहून, कामंदकीच्या सूचनेवरून मालतीनें ही आनंदाची वार्ता सांगितल्याबद्दल माधवानें मालतीला आपलें हृदय व जीवित बक्षीस ह्मणून दिलें व तिच्या वतीनें तूंच, 'त्याचा आम्ही स्वीकार केला' असें नाहीं का ह्मटलेंस?'

हें ऐकून बाकीचा सर्व भाग बुद्ध्या सोडून देऊन लवंगिका ह्मणाली, 'हो गडे, पण तो महाभाग कोणचा हें मी अगदींच विसरलें.' भाषणाचा ओघ मकरंदाकडे कळविण्याची लवंगिकेनें ही उत्तम युक्ति योजिली. मदयंतिका मकरंदाविषयीं सकाम झालेलीच होती. तिनें अर्थातच पूर्वींचा बोलण्याचा रोंख सोडून दिला व तिला मोठ्या उत्सुकतेनें व आनंदानें ह्मटलें—'गडे लवंगिके, तें तूं विसरलीस कशी? स्मरण कर. त्या दिवशीं त्या दुष्ट वाघाच्या तावडींतून माझे प्राण वांचण्याची मुळींच आशा नव्हती. त्या प्रसंगीं ज्या नरवीरानें मोठ्या धैर्यानें आपल्या देहाची पर्वा न करितां वाघाला मारून मला प्राणदान दिलें व त्याच्या ऐवजीं हा देह आमरण आपला करून घेतला, व ज्याला याकरितां वक्षस्थळावर त्या क्रूर व्याघ्राचा दारुण नखप्रहार सोसावा लागला, तो महाभाग—तुला नाहीं कां आठवत?' हें तिचें उल्लसितप-

णाचें भाषण ऐकून लवंगिका बुद्धया ह्मणाली, ' हो–तो मकरंद ! ' हें ऐकतांच मदयंतिकेच्या मनांत आनंदानें गुदगुल्या झाल्या व ती ह्मणाली, ' काय सखे लवंगिके, काय ह्मटलेंस ? '

लवंगिका ह्मणाली,—' ह्मटलें मकरंद तो महाभाग. ' नंतर तिनें तिच्या अंगावर लडिवाळपणानें व थट्टेनें हात फिरवून संस्कृतांत ह्मटलें ' अगे मदयंतिके, आह्मी एक बाई जसें तूं ह्मणालीस तशाच आहोंत, समजलें ? पण आपण मोठ्या विशुद्ध, मुग्ध, व कुलीन कन्या, त्यांचीही सहज बोलतां बोलतां अशी विकल व कदंब पुष्पाप्रमाणें पुलकित अवस्था कां बरें झाली ? ' आपली खरी अवस्था लवंगिकेच्या लक्षांत आली, हें पाहून मदयंतिका लज्जित झाली व तिला ह्मणाली, ' अग, माझी अशी थट्टा कां बरें करतेस ? त्या महाभागानें आपल्या जीवाची पर्वा न करितां माझे प्राण वाचविले. त्यावेळचें त्याचें स्मरण झालें ह्मणजे साहजिकच कोणाचीही अशी चमत्कारिक स्थिति होईल. तसेंच त्यावेळीं त्याची तरी कशी स्थिति झाली होती ! त्यानें मजसाठींच आपले अमूल्य प्राण संकटांत घातले होते. माझा स्पर्श होतांच त्याच्या मनाची स्थिति चमत्कारिक झाली व वाघाच्या नखांच्या प्रहारामुळें तो मूर्च्छित झाला व तरवारीवर टेंकून कसा तरी उभा होता. हें सर्व तूंही पाहिलें नाहींस असें नाहीं. ' हें बोलतां बोलतां मदयंतिकेची चित्तवृत्ति व शरीराची स्थिति केवळ तन्मय झाली. तें पाहून बुद्धरक्षिता ह्मणाली–' हो, तें सारें प्रियसखीच्या शरीराची स्थितिच स्पष्ट दाखविते आहे. '

मदयंतिका अधिकच लज्जित होऊन थोडीशी मुरक्यानें ह्मणाली–' जा गडे ! मैत्रिणीच्या विश्वासामुळेंच माझी ही फजीती झाली ह्मणायची. ' त्यावर लवंगिका तिला ह्मणाली, ' सखे मदयंतिके, हें पहा, जें कळायाचें तें तर आह्मांला कळलेंच, आतां उगीच लपंडाव कशाला ? कृपा कर, आतां आपण प्रिय मैत्रिणींप्रमाणें आनंदानें सुखादुःखाच्या गोष्टी बोलत बसूं. ' त्यावर बुद्धरक्षिता ह्मणाली, ' हो, लवंगिका ह्मणते तेंही खरेंच. हें फारच चांगलें. ' मदयंतिका ह्मणाली, ' तुह्मी ह्मणाल तसेंच. मी तुमच्या बाहेर थोडीच आहें. ' हें ऐकून लवंगिका ह्मणाली—' अगे, तर मग तुझा वेळ तरी कसा जातो ? '

यावर मदयंतिकेनें आपली स्थिति वर्णन करण्यास आरंभ केला. ती ह्मणाली, ' प्रियसखे लवंगिके, बुद्धरक्षितेचें भाषण व वर्णन ऐकून माझें प्रेम अगोदरच त्या महाभागावर फारच बसलें होतें–त्याच्याविषयीं माझ्या मनांत वरचेवर अनेक तऱ्हेचे मनोरथ येत व अतिशय उत्कंठा वाटे;–व हें सर्व पुनः तेव्हांच नाहींसें होई. पुढें मी केवळ दैवावर हवाला ठेवून अगदीं निराश होऊन बसलें. कधींतरी क्वचित् त्याचें दर्शन होऊं लागलें. तेव्हांपासून माझ्या मनाला दारुण व दुर्वार मदन फारच संताप करूं लागला. माझें चित्त उत्कंठित असे, यामुळेंच कसेतरी माझे प्राण वांचले. विरहाग्नीनें होरपळणाऱ्या शरीराची ती स्थिति पाहून माझ्या परिजनांना फारच काळजी वाटूं लागली. बुद्धरक्षितेनें वेळोवेळीं दिलेल्या आश्वासनामुळेंच मी कसेतरी कष्टानें दिवस काढीत आहें. त्याच्याविषयींच नेहमीं मनांत विचार असल्यामुळें मी झोंपेंत देखील मोहित होतें, व तो महाभाग माझ्या डोळ्यांसमोर दिसूं लागतो. तोही मजकडे मदांध, प्रेमळ, चंचल, व आतुर दृष्टीनें टक लावून पहात असतो; व

मत्तकोकिलासारख्या गंभीर व मधुर शब्दानें वरचेवर मला-' अगे मदयंतिके, इकडे ये ! ' अशा हाका मारितो-माझ्या मागें लागतो, तेव्हां माझे स्तन स्फुरण पावतात व माझें उत्तरीय खालीं पडतें. तो माझा पदर बळजबरीनें येऊन धरील या भीतीनें माझें काळीज धडधडां उडूं लागतें. तशांतच तो येऊन लगट करून मला त्रास देतो. मी उत्तरीय सोडून तशीच पुढें पळूं लागतें. तोंच तो येऊन मला धरतो. मी आपल्या दोन्ही बाहूंनींच आपले स्तन झांकूं लागतें पळण्याच्या गडबडींत मे खला सुटून पायांत अडखळूं लागते. त्यामुळें नीटसें पळतां येत नाहीं. मी प्रतिकूल बोलत असतें तिकडे तो मुळींच लक्ष देत नाहीं, व मोठ्या आदरानें व प्रेमानें बोलून बोलून माझा राग कांहींसा कमी करितो, व माझें तें वर्तन पाहून माझी थट्टा करितो. माझ्यानें कांहीं बोलवत नाहीं. मी नुस्ती त्याच्याकडे रागानें सारखी पाहूं लागतें. मला तो आपल्या प्रचंड बाहूंनीं घट्ट आंवळून धरितो. त्याच्या वक्षःस्थळावर वाघाच्या नखांच्या जखमांचे व्रण आहेत ते वक्षस्थळावरील पत्रावलीसारखे भासतात. नंतर मोठ्या आवेशानें तो माझी वेणी धरून माझें मुख वळवितो आणि त्या निश्चळ व निरुद्ध श्वास झालेल्या मुखाकडे स्वच्छंदपणें पाहतो, व माझ्या डाव्या गालावर आपला तो पुंजित अधर ठेवून चुंबन घेतो. तेव्हां माझ्या सर्वांगावर आनंदानें रोमांच येतात. त्यावेळीं, भय, आनंद, संभ्रम व मोह इत्यादि विषम मनोविकारांच्या मुळें माझी वृत्ति विलक्षण होते व माझे डोळे कावरेबावरे होतात. अशावेळीं तो कांहीं भलतेंच साहस करूं लागतो व मजला भलतीच गोष्ट करण्याविषयीं विचारितो. इतकें सर्व प्रत्यक्ष अनुभवितें आहें तोंच मी जागी होतें. त्यासरशीं एकदम सर्वच प्रकार शून्यारण्यासारखा पाहून माझी स्थिति अगदींच दीन व खिन्न होते. अशा तऱ्हेनें मी कशीतरी दिवस कंठितें आहें. '

हें सर्व झोंपेंतलें संकल्पनिर्मित प्रियसमागमसुखाचें वर्णन मदयंतिकेनें मोठ्या आनंदानें चालविलें होतें. हें भाषण चमत्कारिक, शब्दरचनेच्या योगानें व कांहीं कांहीं जागीं आशयावरूनही मदयंतिकेसारख्या कुलीन कुमारीला शोभण्याजोगें नाहीं. तें संपतांच लवंगिकेनें तिची थट्टा करण्याकरितां बुद्धया तिला ह्मटलें, 'पण कां गे मदयंतिके, खरेंच स्पष्ट सांग, त्यावेळची तुझी ती चर्या पाहून, खरा प्रकार बुद्धरक्षितेनें ओळखिला असें तिच्या चेष्टेखोर व आनंदित चेहऱ्यावरून लक्षांत येऊन, तुझ्या निऱ्या परिजनाच्या दृष्टोस पडूं नयेत ह्मणून तूं आपलें ढुंगण पलंगपोसानें झांकून घेत असतेस किंवा नाहीं.

[ हा भाग प्रियसख्यांच्या रहस्यांतील भाषणांत येण्यासारखा आहे व अशा तऱ्हेची थट्टा तरुण मुली आपसांत कदाचित् करीतही असतील. पण अशीं भाषणें उघडपणें ग्रंथांत किंवा काव्यांत येणें अश्लीलपणाचें लक्षण आहे. हें भाषणही भवभूतीनें लवंगिकेसारख्या दासीच्याच तोंडीं घातलें ही मोठी मेहेरबानगी केली. हा भाग गाळण्यासारखा आहे. त्यापासून रसाचा किंवा कथानकाचा कोणत्याही तऱ्हेनें पोष झालेला नाहीं. शिवाय मागें एकवेळ वर्णन केल्याप्रमाणें अशा तऱ्हेचे सुरतव्यापार प्रत्यक्ष घडल्याचे विचार खऱ्या अनुभवरहित कुलकन्यांना येणें संभवत नाहीं. यासंबंधाचे त्यांचे विचार मुग्ध व अस्पष्ट असले पाहिजेत. ]

ही उघड उघड केलेली थट्टा मदयंतिकेला अर्थातच आवडली नाहीं व ती ह्मणाली, ' जा

गडे, ही कोण मेली भलतीच थट्टा ! अशानें मी नाहीं तुझ्याशीं मुळींच बोलायाची.' त्यावर बुद्धरक्षिता ह्मणाली, 'मदयंतिके, ही मालतीची प्रियसखी–तेव्हां असें बोलली, यांत नवल काय ?' तिला मदयंतिकेनें ह्मटलें, 'छे: बाई, असा मालतीला विनाकारण दोष नको देऊं.'

इतकीं भाषणें होऊन मदयंतिका आपल्या बेताला बरीच तयार झाली आहे असें पाहून बुद्धरक्षिता तिला ह्मणाली, 'गडे मदयंतिके, विश्वासभंग करणार नाहींस तर तुला मी एक गोष्ट विचारितें.' आपला हिला विश्वास नाहीं याबद्दल थोडेंसें रागावून मदयंतिका तिला ह्मणाली, 'अगे, आजवर मी कधीं विश्वासभंग केला आहे वाटतें, ह्मणून तूं मला असें ह्मणतेस ? गडे, तूं आणि लवंगिका दोघी केवळ माझ्या हृदयासारख्याच मी समजतें बरें.'

बुद्धरक्षिता ह्मणाली, 'मकरंद जर पुनः तुझ्या दृष्टीस पडला तर तूं काय करशील ?' तिला तिनें उत्तर दिलें, 'काय करीन—अगे, हें पहा, मी त्याच्या प्रत्येक अवयवाकडे सारखी दृष्टि लावून आपल्या डोळ्यांचें प्रथम पारणें फेडून घेईन.' त्यावर बुद्धरक्षिता पुनः ह्मणाली 'पण कंदर्पजननी रुक्मिणीला पुरुषोत्तमानें बलात्कारानें आपली सहधर्मिणी केली तसें मकरंदानें मदनविकारवश होऊन तुला करण्याचा यत्न केला, तर तूं काय करशील ?' तिला मदयंतिका मोठ्या कष्टानें दीर्घ उसासा टाकून ह्मणाली, 'अग, मला उगीच अशीं खोटीं आश्वासनें कशाला देतेस ?' बुद्धरक्षिता ह्मणाली–' तरी पण सांग तर खरें काय करशील तें ?' तिच्या वतीनें लवंगिकेनें उत्तर दिलें. 'अगे, तिनें काय सांगावयाचें ? तिच्या त्या दीर्घ उसाशानें नाहीं कां कळविलें ?' त्यावर मदयंतिका पुनः ह्मणाली, 'सख्यांनो, त्या महाभागानें आपले प्राण धोक्यांत घालून हा माझा देह त्या दिवशीं त्या दुष्ट वाघाच्या तावडींतून जिंकून घेतला, तेव्हांपासून या शरीराची मी मालकीण कोठें राहिलें आहें ?' हें ऐकून लवंगिका ह्मणाली, 'हें बोलणें इच्या मोठेपणाला योग्य असेंच आहे.' बुद्धरक्षिता ह्मणाली, 'मदयंतिके, हें बोलणें लक्षांत ठेव बरें.'–इतक्यांत मध्यरात्रीचा गजर झाला. तो ऐकून मदयंतिका ह्मणाली, 'काय, नुकतीच दोनप्रहर रात्र झाली आहे. चला मी आतांच जाऊन नंदनाची चांगली फजीती करितें व लागलें तर त्याच्या पायांदेखील पडून तो मालतीशीं अनुकूल होईल असें करितें.'–असें बोलून ती जाण्याकरितां उठूं लागली, तोंच मकरंदानें तोंडावरून पांघरूण काढून तिचा झट्कर हात धरिला. मदयंतिकेला प्रथम मालतीच जागी झाली असें वाटलें, व ती ह्मणाली, 'सखे मालती, जागी झालीस का ?' इतक्यांत तिनें मकरंदाच्या तोंडाकडे पाहिलें, तेव्हां त्याला ओळखून कांहीं हर्षानें व कांहीं भयभीत होऊन ती ह्मणाली, 'अग बाई ! इथें कांहीं आणखींच प्रकार आहे.'

तिला मकरंद ह्मणाला, 'हे रंभोरू, भिऊं नको. तुझ्या कंप पावणाऱ्या स्तनाचा भार सोसण्याला तुझा मध्यभाग पात्र नाहीं. आतांपर्यंत तूंच आपल्या संकल्पसमागमसुखाचें वर्णन करितांना प्रशंसा केलेला त्वत्प्रेमपात्र हा तुझा दास इथेंच आहे.'

नंतर मागील अंकांत कामंदकीनें मालतीच्या हनुवटीला हात लावून ह्मटलें होतें त्याचेंच अनुकरण करून, बुद्धरक्षितेनें मदयंतिकेच्या हनुवटीला हात लावून तिचें तोंड वर

करून तिला ह्मटलें–' तुझ्या हजारों मनोरथांनीं आवृत्त झालेला तोच हा तुझा प्रियकर. हल्लीं या तुझ्या दादाच्या घरांतील सर्व नोकर चाकर निजलेले आणि प्रमत्त आहेत. हा गडप अंधार पडला आहे. तूं आपल्या कृतज्ञतेला स्मरून ही कल्याणकारक गोष्ट कर. मणिनूपूर आवाज न होईल असे वर सारून चल आमच्या बरोबर, सर्व निघून जाऊं.'

हें ऐकून मदयंतिका तिला ह्मणाली, 'पण बुद्धरक्षिते, आपण सर्वांनीं जायचें तरी कुठें?'

बुद्धरक्षिता ह्मणाली, 'अगे, जेथें पूर्वीच मालती गेली आहे तेथें.' हें ऐकून फारच आश्चर्य वाटून मदयंतिका ह्मणाली, 'काय, मालतीनें देखील असलें साहस केलें!' तिला बुद्धरक्षिता ह्मणाली, 'होय. तशांत तूं आतांच नाहीं का ह्मणालीस कीं, या जिंकून घेतलेल्या शरीराची मालकीण मी आतां कुठें राहिलें आहें ह्मणून?' हें ऐकून मदयंतिकेच्या मनाची स्थिति कशीशीच झाली. तिच्या डोळ्यांला पाणी आलें. एकीकडे मकरंदाविषयींचें अतोनात प्रेम–व तेंही स्वतःच नुकतेंच प्रगट केलेलें– तिला त्याच्याबरोबर जाण्याला सांगत होतें; इकडे हा चोरीचा सर्व प्रकार आपल्या कुलीनपणाला बट्टा आणणारा आहे, असें करणें योग्य नव्हे, आपल्याला लोक काय ह्मणतील, दादाची केवढी फजीती होईल, वगैरे विचारही तिच्या मनांत येऊं लागले; व काय करावें तें तिला सुचेना. मालतीनेंही असें साहस केलें हें ऐकून तर तिला अधिकच चमत्कारिक वाटलें व ती रडूं लागली. तिला बोलण्याला सवडच न देतां बुद्धरक्षिता ह्मणाली, 'महाभागा मकरंदा, माझ्या प्रियसखीनें स्वतःला तुला अर्पण केलें आहे बरें.' त्यावर मकरंद ह्मणाला, 'वाः फारच उत्तम झालें. मी आज मोठीच मिळविली. माझ्या यौवनाला आज खरी बहार आली, व मन्मथानें कृपा करून एक मोठेंच जोखड खांद्यावरून उतरलें व माझे मनोरथ परिपूर्ण केले. तर चला आतां बाजूच्या चोरदारानें येथून निघून जाऊन आपलें काम साधूं.' असें ह्मणून सर्वजण बाहेर पडले. त्यावेळीं निबिड अंधकार पडला होता व सर्वत्र सामसूम होतें, यामुळें मार्गाला एक विलक्षण प्रकारची शोभा आलेली होती. थंडगार वायु सुटला होता त्याचें वर्णन करीत मकरंद ह्मणाला, 'हा वायु मोठमोठ्या वाड्यांच्या गच्च्या व सज्जे यांच्यावर फिरून आलेला आहे. यामुळें त्याच्यांत सुरा, माल्य, गंध, इत्यादिकांचे परिमळ मिश्र झालेले आहेत. त्याच्यांत कापुराचाही उग्रटसा वास येत आहे. यावरून यावेळीं तरुण पुरुष अभिनव वधूंच्या सन्निध नूतन समागमसुख अनुभवीत आहेत असें तो स्पष्ट दाखवितो आहे'—असें ह्मणून सर्वजण निघून गेले.

[ हा अंक नाटकाच्या संबंधानें मागील इतर अंकांपेक्षां बराच चांगला साधला आहे. भाषणें चांगलीं खुबीदार व व्यवस्थित आहेत, व कथानक बरेंच चांगलें जुळविलें आहे. ]

---

## अंक आठवा.

मागील अंकांत मकरंद, मदयंतिका, लवंगिका व बुद्धरक्षिता यांच्यासह नंदनाच्या घरांतून रात्रीं चोरून निघाल्याचें वर्णन केलें आहे; व साहव्या अंकाच्या शेवटीं मालती व माधव देवीच्या मंदिरांतून परभारें कामंदकीच्या विहारांत गेलीं व तेथें मकरंद व मदयंतिका येण्याची वाट पाहात राहिलीं, असें वर्णन आहे. या अंकांत मालती व माधव यांचें विहारांत अस-

त्या वेळचें भाषण व मकरंद व मदयंतिका विहारांत येऊन पोहोंचेपर्यंतची हकीकत दिलेली आहे. मालती व माधव विहारांत असतांना अवलोकिता त्यांच्याजवळच होती. भूरिवसूच्या घरीं नंदनाच्या विवाहाचा सोहाळा उरकल्यानंतर कामंदकी विहारांत परत आली. अवलोकिता तिला भेटून तिचें पादवंदन करून, मालती व माधव विहारांतील विहिरीवर स्नान करून जवळच्या फरसावर बसलीं होतीं तेथें परत आली. हे ग्रीष्मऋतूचे दिवस होते. त्या दिवसांत बहुतेक लोक संध्याकाळीं थंड पाण्यानें स्नान करीत असत. त्याप्रमाणेंच दिवसभर झालेली गर्मी व त्रास दूर करण्याकरितां मालती व माधव यांनीं स्नान केलें होतें. त्यांचेजवळ दुसरें कोणी नव्हतें. विहारांत आल्या वेळेपासून मालतीनें आपल्याशीं भाषण तरी करावें झणून माधवानें अनेक तऱ्हेनें उपाय चालविले होते. पण ते सर्व व्यर्थ गेले होते. त्यावेळीं ऐन संध्याकाळची वेळ होती. ग्रीष्मऋतूंतील संध्याकाळची वेळ कामी जनांना मोठ्याच बहारीची असते. त्या वेळेचें त्यानें यथार्थ वर्णन केलें आहे. नुकताच थोडा थोडा चंद्रप्रकाश पडूं लागला होता. त्यामुळें निबिड अंधकार हळू हळू थोडथोडा हटत चालला होता. हें वर्णन मागील अकांत दोनप्रहर रात्रीपर्यंत चांदणें नसल्याचें वर्णन आहे त्याच्याशीं विरुद्ध आहे. सुगंध व शीतल असा केतकीपरागयुक्त वायु सुटून शरीराला आनंद देत होता. अशा वेळीं, या मुग्ध मालतीला कशा तऱ्हेनें बरें राजी करावें—असा विचार करून कांहीं वेळानें तो तिला झणाला:'प्रिये मालती, या वेळीं थंडगार पाण्यानें स्नान केल्यामुळें तुझें शरीर कसें गार व तापहारक झालेलें आहे. अशा वेळीं माझ्या शरीराचा दाह दूर कर झणून मी तुला किती तऱ्हेनें विनवीत आहें, तरी तूं अजून मजविषयीं परकी भाव धरितेस, असें कां बरें ? तुझ्या वेणीच्या शेवटापासून जलबिंदु गळताहेत व तुझ्या स्तनांच्या मध्यभागाचा ओलेपणा अद्यापि नाहींसा झाला नाहीं. शीतल जलस्पर्शामुळें तुझ्या सर्वांगावर पुलकोद्भव झालेला आहे, तोंवर हे प्रिये, कृपा करून एकदां तरी मला आलिंगन दे.

' मी केवळ मूढ व मुग्ध झालों आहें. मला जणों जिवंत करण्याकरितांच चंद्रकिरणांच्या स्पर्शानें प्रस्रवण होणाऱ्या चंद्रकांत मण्याच्या हारासारखा तुझा स्वेदबिंदुयुक्त बाहुरूपी हार माझ्या गळ्यांत घाल ! अशी अगदीं निर्दय कां बरें होतेस ?

' अथवा, तें राहूंदे वाटेल तर, पण नुसतें भाषण करण्याला देखील हा जन तुला योग्य वाटत नाहीं कीं काय ? या माझ्या फार दिवसांपासून दग्ध झालेल्या शरीराला शांति देणाऱ्या मलयानिल व चंद्रकिरणादिकांचा लाभ न झाला तर न होवो; पण हे किन्नरकंठी ! निदान या व्यथित व क्षुधित झालेल्या माझ्या कर्णांना प्रमत्त कोकिलाच्या शब्दाप्रमाणें मनोहर अशा तुझ्या शब्दरसाचें तरी पान घडूं दे.'

इतक्यांत अवलोकिता तेथें येऊन पोहोंचली आणि झणाली,' मालती, तूं तरी विलक्षण आहेस. माधव कुठें क्षणभर दृष्टिआड झाला तर, मला वरचेवर,—' अग बाई, किती तरी वेळ झाला त्यांना जाऊन—पुन: मला सारखे डोळे भरून पाहण्याला केव्हां सांपडेल—आतां येतांच मी त्यांना असें घट्ट धरीन—कुठें जाऊं देणार नाहीं—घट्ट मिठी मारीन'—असें उत्कंठेनें झणत होतीस, ती तूं आतां अशी !'

हें ऐकून माधवाला मोठें कौतुक वाटलें, व तो आपल्याशीं ह्मणाला, ' शाबास, भगवतीच्या या मुख्य शिष्यिणीचें काय तरी हें उत्तम चातुर्य?–व बोल तरी किती गोड व मार्मिक ! धन्य आहे ! ' नंतर तो मालतीला ह्मणाला, ' मालती, अवलोकिता ह्मणते हें खरें का ? ' त्यावर मालतीनें मुरक्यानें व कांहींसें नखऱ्यानें मस्तक हालविलें, व—' वाः कांहीं तरीच मेलें बोलायचें ! ' असा अर्थ सुचविला. [ हें मस्तक हलविणें फारच खुबीदारीनें या जागीं आणिलें आहे. याच्यांत जो खरा अर्थ गार्भित आहे तो कितीही बोलून व्यक्त होण्यासारखा नाहीं. अशा गोष्टीवरूनच कवीची खरी मार्मिकता कळून येते. ]

इतकें होऊनही मालती कांहींच बोलत नाहीं असें पाहून माधवानें तिला ह्मटलें, ' तूं न बोलशील तर तुला माझ्या, अवलोकितेच्या व लवंगिकेच्या गळ्याची शपथ आहे. ' हें ऐकतांच मालती लाजत लाजत ह्मणाली, ' मला नाहीं मेलें कांहीं ठाऊक. ' इतकें बोलून ती लाजून गप राहिली. माधवाला तिच्या तेवढ्या त्या झोंकदार व मुरकत बोललेल्या शब्दांचेंच मोठें कौतुक वाटलें. पण इतक्यांत तिच्या तोंडाकडे त्याचें लक्ष गेलें, तों ती अश्रु गाळीत होती. तें पाहून तो ह्मणाला, ' अवलोकिते, हें काय ? या मृगनयनेच्या स्वच्छ गालांवरून अश्रुजलाचा प्रवाह चालला आहे. सुंदर कपोलावरील दीप्तिरूपी अमृताचा घोट घेण्याकरितां चंद्रानें मृणालदंडाप्रमाणें आपला किरणरूपी रुपेरी दंड इच्या कपोलावर टाकला आहे, असें दिसतें. '

माधवाचें भाषण ऐकून अवलोकिता ह्मणाली, ' मालती, अशी रडतेस कशाकरितां ? ' मालती तिला ह्मणाली—' प्रियसखी लवंगिका जाऊन किती तरी वेळ झाला ! तिच्याशिवाय असा कसा वेळ काढावा बाई कोण जाणें ! तिची कांहीं वार्तासुद्धां कळत नाहीं. '

माधव ह्मणाला, ' अवलोकिते, कां–काय ह्मणते ? ' तिनें उत्तर दिलें, ' अरे, कसचें काय, तुझ्याच शपथेवरून तिला लवंगिकेचें स्मरण झालें. तिच्याकरितां हिचें मन उत्कंठित होऊन ही रडते आहे. '

त्यावर माधवानें सांगितलें—' नंदनाच्या घरापर्यंत जाऊन तिकडील समाचार आणण्याकरितां मी आतांच कलहंसाला पाठविलें आहे. '

' अवलोकिते, पण भगवतीचा सर्व बेत नीटपणें पार पडेल का ? मदयंतिका आपल्याला लाभेल असें तुला वाटतें का ? '

' माधवा, यांत संशय कसला ? वाघाच्या पंजाच्या प्रहारानें मकरंद मूर्च्छित झाला होता. तो शुद्धीवर येण्याची खबर सांगणाऱ्याला त्वां भगवतीच्या व आमच्यासमक्ष आपलें हृदय व जीवित्व इनाम दिलेंस; तसें आतां जर तुला कोणी, मकरंदाला मदयंतिका प्राप्त झाली, असें आनंदाचें वर्तमान कळविलें तर त्याला तूं काय इनाम देशील बरें ? ' असें अवलोकितेनें ह्मटलें. त्याचा भावार्थ माधवाच्या तेव्हांच लक्षांत आला; व हिणें हें भाषण बुद्धया काढलें आहे असा विचार करून तो ह्मणाला, ' ही पहा, कामकाननांतील अलंकारभूत बकुलवृक्षाच्या पुष्पांची कशी तरी गुंफलेली, मालतीच्या प्रथमदर्शनाची साक्षीभूत बकुलमालाः ती मी गुंफलेली ह्मणून इनें सखीच्या हातून घेऊन आपल्या प्रशस्त स्तनांच्या सहवासांत ठेवली; व त्या विवाहाच्या दुर्धर प्रसंगीं ती प्रेमसर्वस्वभूत माला पुनः माझ्या हातींच यावी या हेतूनें तिनें

लवंगिकेच्या ह्मणून माझ्याच कंठांत अर्पण केली. तीच मी पुन: तिला बक्षीस देईन झालें.' [ येथें व्यर्थ पुनरुक्ति झाली आहे. कदाचित मालतीला बकुलमालेच्या सर्व हकीकतीचें पुन:स्मरण करून द्यावें असा हेतु असला तरी तो अनवश्यक आहे. तिला बकुलमालेचें उत्तम स्मरण असलेंच पाहिजे. ]

हें ऐकून अवलोकिता ह्मणाली, 'मालती, ही बकुलमाला तुला फार प्रिय आहेना ? पहा बरें— ती दुसऱ्या कोणाच्या हातीं न पडो.' त्यावर मालती मनांत ह्मणाली, 'मला जें हवें तेंच ही बोलली, ठीक आहे.' इतक्यांत, 'जवळच पावलांची चाहूल ऐकूं येते आहे' असें अवलोकिता ह्मणाली, व माधवानें वळून पाहून ह्मटलें—'अरे, हा कलहंस आला.' हे शब्द माधवाच्या तोंडांतून निघतात तोंच कलहंस, 'मकरंद मदयंतिकेसह येत आहे' असेंच सांगणार, असें ताडून मालतीनें लगबगीनें माधवाला ह्मटलें, 'मदयंतिकेच्या लाभानें आपण कृतार्थ झालां.' त्याबरोबर माधवानें तिला प्रेमालिंगन दिलें व 'वा: फार चांगलें झालें' असें ह्मणून, बकुलमाला काढून तिच्या गळ्यांत घातली. अवलोकिता ह्मणाली, 'भगवतीनें बुद्धरक्षितेला मोठीच जोखमीची कामगिरी सांगितली होती. ती तिनें उत्तम पार पाडली ह्मणायाचें.' इतक्यांत लवंगिकाही येत आहे असें पाहून मालती आनंदानें ह्मणाली, 'अग बाई, लवंगिकाही आलीशी दिसते.' असें ह्मणून सर्वजण आनंदानें उठून उभे राहिले.—तोंच—

कलहंस, लवंगिका, मदयंतिका व बुद्धरक्षिता घाईघाईनें तेथें आली, व लवंगिका गडबडीनें व घाबऱ्यां घाबऱ्यां ह्मणाली, 'महाभागा, रक्षण करा ! रक्षण करा ! अर्ध्या वाटेंत नगररक्षकांनीं मकरंदाला रोकाटोक केली. इतक्यांत कलहंस आला, त्याच्याबरोबर त्यानें आह्मांला इकडे पाठविलें.' तोंच कलहंस ह्मणाला, 'आह्मी इकडे निघून येत असतांना या दुसऱ्या बाजूनेंही बराच कलकलाट ऐकूं येत होता, यावरून आणखीं दुसरे लोकही चौकीदारांच्या साहाय्यास येत असावे असें दिसतें.' हें ऐकून मालती ह्मणाली—'अवलोकिते ! हाय हाय ! एकदमच हर्ष आणि उद्वेग उत्पन्न करणारा हा प्रसंग पहा कसा अवचित प्राप्त झाला ! आतां काय तरी करावें ?'

माधव ह्मणाला, 'सखे मदयंतिके, यावें ! फार चांगलें झालें, त्वां आमच्या घरावर मोठाच अनुग्रह केलास. एकट्याचा पुष्कळांशीं सामना पडला आहे ह्मणून तूं घाबरून उद्विग्न होऊं नको. तो एकटा व प्रतिपक्षी पुष्कळ ही गोष्ट त्याच्याविषयीं मुळींच विचार करण्यासारखी नाहीं, समजलीस ? वज्रनखांनीं युक्त असलेला सिंहाचा प्रचंड कर हत्तीच्या गंडस्थलाचें सहज विदारण करितो. त्याचें साहाय्य असलें ह्मणजे त्याला अनेक हत्तींची देखील मुळींच पर्वा नसते, मग इतर विकिर पशूंची कथा काय? तो तोच महाभाग आहे. हा पहा, मीही आतांच जाऊन त्या माझ्या पराक्रमी मित्राचें साहाय्य करितों.' असें ह्मणून कलहंसासह तो निघून गेला. हें पाहून सर्वजणी ह्मणाल्या, 'पण हे महानुभाव सुखरूप परत येतील तरी का ?'

त्यावर मालती ह्मणाली, 'अवलोकिते, बुद्धरक्षिते, लौकर जाऊन हें सर्व वर्तमान भगवतीला कळवा कसें ! गडे लवंगिके, तूंही जाऊन त्यांना सांग कीं आमच्यावर दृष्टि देऊन कृपा करून मोठ्या सावधपणानें वागा.' हें ऐकून लवंगिका

## कांचनगडची मोहना.

हें सुरस नाटक रा. रा. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर बी. ए. यांणीं लिहिलें आहे.

किंमत १२ आणे. ट. हा. एक आणा.

पुस्तकें विविधज्ञानविस्तार पुस्तकालयांत आणि पुण्याचे चित्रशाळेंत विकत मिळतात.

---

बिक्रीस तयार.

## करण वाघेला

अर्थात्

गुजराथच्या शेवटला रजपूत राजा.

[ ऐतिहासिक कादंबरी. ]

ही कादंबरी मूळ गुजराथी भाषेत आहे; विविधज्ञानविस्तारमध्यें तिचें भाषांतर भागशः प्रसिद्ध होत होतें तें आतां पूर्ण झाल्यामुळें वाचकांच्या सोईसाठीं स्वतंत्र पुस्तकरूपानें तयार केलें आहे.

या कादंबरीचे पहिले १० भाग कै० रा. रा. गणेश भिकाजी गुंजीकर बी. ए. यांणीं लिहिले; पुढील ६ भागांचें भाषांतर रा. रा. खंडेराव भिकाजी बेलसरे यांणीं केलें. गोष्ट अगोदरच वि. ज्ञा. विस्तारमध्यें प्रसिद्ध झाल्यामुळें तिच्या चांगुलपणाबद्दल विशेष लिहिण्याचें कारण नाहीं. पुस्तकाचीं द्वादशपत्री सांच्याचीं ६१० पृष्ठें आहेत. पुस्तक चांगलें कापडी पुठ्यानें सुरेख नकसी व सोनेरीअक्षरें यासह बांधलें आहे.

किंमत दोन रुपये. व्ही. पी. खर्चसह दोन रुपये पांच आणे.

---

[ द. प्रै. कमिटीनें बक्षिस दिलेलें काव्य. ]

## अभिनवकादंबरी.

[ आवृत्ति दुसरी. ]

बाणभट्टाच्या कादंबरीचें धुंडिराज कवीनें आर्यावृत्तामध्यें सार काढिलें. त्याचें हें मराठी भाषांतर त्याच वृत्तामध्यें रा. रा. गंगाधर रामचंद्र मोगरे यांनीं केलें आहे. कथानकाच्या एकंदर ३६१ आर्या आहेत; शिवाय 'समर्पण,' 'प्रस्तावना' आणि 'मराठी ग्रंथकारांस प्रार्थना' मिळून ५० आर्या आहेत. कमिटीचे सेक्रेटरी ह्मणतात—"मूळ संस्कृतांतील गोष्ट प्रस्तुत "पुस्तकांत यथातथ्य उतरली आहे, आणि बा-"णाच्या कादंबरीची मराठी वाचकांस ओळख "करून देण्यास या पुस्तकाचा चांगलाच "उपयोग होईल....या कवितांमध्यें ग्रंथका-"रानें विलक्षण सौंदर्य, सहजता आणि सुगमता "आणिलीं आहेत असें आढळून येईल... "अशा सुबोध आणि सरळ कविता मराठी-"मध्यें क्वचित् दृष्टीस पडतात."

रा. ब. नारायणभाई दांडेकर लिहितात—"या "पुस्तकास भाषांतर ह्मणण्यापेक्षां मूळ पुस्तकच "ह्मणणें जास्त शोभेल. काव्यांव मोठा प्रशंस-"नीय आहे."

नामदार म. गो. रानडे लिहितात—"आर्या-"वृत्तामध्यें कविता रचण्याची ग्रंथकाराची कुश-"लता आणि मराठीभाषेवरील त्यांचें प्रभुत्व, हे "या पुस्तकांतील विशेष गुण होत."

डा० भांडारकर ह्मणतात—"रचना सुबोध "नदीच्या प्रवाहाप्रमाणें, आणि सुंदर असल्या-"मुळें हें पुस्तक चांगलें झालें आहे यांत बिलकुल "संशय नाहीं.

किंमत चार आणे. ट. ख. अर्धा आणा.

**विविधज्ञानविस्तार आफिसांत विकत मिळतील.**

॥ श्रीः ॥

# विविधज्ञानविस्तार.

A MONTHLY MAGAZINE
OF
MARATHI LITERATURE
FOR
Ladies and Gentlemen.

कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरितां.

पुस्तक ३०. सप्टेंबर १८९९. अंक ९.

अनुक्रमणिका.



मुंबईत

गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत छापिलें.

वर्षाची वर्गणी रुपये ३; टपालखर्च आणे ६.

☞ आपल्याकडील आश्रयाची रकम लौकर पाठवून देण्याविषयीं लैब्ररींचे सेक्रेटरी आणि इतर आश्रयदाते यांस विनंती आहे. चालू सालचे बाकी राहिलेले तीन अंक लौकरच वाचकांच्या हातीं मिळतील अशी आशा आहे.

---

'आईची थोरवी आणि तिचीं कर्तव्यें' हा जो विषय आमच्या पुस्तकांत येत असतो त्यास आधार एका इंग्रजी पुस्तकाचा आहे.

---

कोल्हापूर येथें निघत असलेलें मासिकपुस्तक 'ग्रंथमाला' हें आतां १७२ पृष्ठांचें निघूं लागलें आहे. यांपैकीं ८० पृष्ठें रा. राजवाडे यांच्या ऐतिहासिक जुन्या लेखांस देण्याची व्यवस्था केली आहे. बाकी पृष्ठांत पूर्ववत् शास्त्रीय वगैरे लेख प्रसिद्ध होऊन, शिवाय चालू वाङ्मयावरही 'सारसंग्रह' या सदराखालीं लेख येणार आहेत. आपल्या पुस्तकाची उपयुक्तता वाढविण्यासाठीं प्रो. विजापूरकर यांचा प्रयत्न अत्यंत स्तुत्य आहे आणि त्यास मासिक पुस्तकांच्या भोक्तयांकडून योग्य उत्तेजन मिळावें अशी आमची इच्छा आहे. हें मासिक पुस्तक संपादकांच्या हेतूप्रमाणें सुरळीत चालल्यास मराठी भाषेचें एक मोलवान भूषण होईल.

---

**विद्याविनोद** या मासिक पुस्तकाचा दुसऱ्या वर्षाचा पहिला अंक मिळाला. नवीन वर्षापासून या मासिकाची पृष्ठसंख्या ६४ केली आहेः यांत पुराणें, कादंबऱ्या, नाटकें, थोर पुरुषांचीं चरित्रें, ग्रंथपरीक्षण इत्यादि विषयांचा समावेश यथावकाश केला जातो. 'सारिकाशतक' ह्मणून या सालापासून एक विषय सुरू केला आहे. श्रीमंत माधवराव पेशव्यांसाठीं 'हितोपदेशाच्या' धर्तीवर नानाफडणविसांनीं या १०० गोष्टी एका विद्वान् गृहस्थाकडून लिहविल्या होत्या आणि त्या सारिकेच्या मुखानें ह्मणून वदविल्या आहेत, ह्मणून यास सारिकाशतक असें नांव दिलें आहे. प्रस्तुत अंकांत आलेल्या भागावरून पाहतां सदहु विषय मनोरंजक आणि बोधप्रद होईल असें वाटतें. विद्याविनोद मासिक पुस्तक लोकांच्या आश्रयास पात्र आहे, आणि तो मिळून याची उत्तरोत्तर भरभराट व्हावी अशी आमची इच्छा आहे.

आमच्या मासिक पुस्तकांची अशाच रीतीनें भरभराट झाली पाहिजे. उलट रीतीनें कित्येक मासिकांची झालेली स्थिति पाहून, अथवा दुसऱ्यांनीं आपल्या आश्रयदात्यांचें नुकसान न करितां निरुपायानें महिने गाळले असतां त्यांस हसणारांना जेव्हां अंकचे अंक गिळावे लागतात तेव्हां मात्र फार वाईट वाटतें.

---

पुस्तकांची पोंच पुढील अंकीं देऊं.

श्री.


# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ३०. अंक ९.


## उद्भिज्जचमत्कार.

[ मागील अंकावरून पुढें चालू. ]

जीं जीं फळें कच्चीं असतांना, ह्मणजे अपक्वदशेंत असतांना, त्यांचीं बाहेरचीं आच्छादनें हिरव्या रंगाचीं असतात, त्यांच्या त्या बाहेरच्या आच्छादनांत घडून येणाऱ्या रसायनक्रिया ह्या त्यांच्या त्यांच्या पानांच्या ठायीं घडून येणाऱ्या रसायनक्रियांसारख्याच असतात. ह्मणजे सूर्याच्या प्रकाशांत तीं फळें असलीं, तर जसा सूर्यप्रकाशाच्या रसायनक्रियेच्या योगानें पानांच्या घटकपिंडांपासून "**प्राणवायु**" त्यक्त होऊन वातावरणांत निघून जात असतो, त्याचप्रमाणें हिरव्या रंगाच्या, ह्मणजे अपक्व फळांच्या बाहेरच्या, आच्छादनापासून **प्राणवायु** त्यक्त होऊन, वातावरणांत निघून जात असतो. परंतु विशेष आश्चर्यकारक प्रकार हा आहे कीं, तेंच हिरव्या रंगाचें कच्चें फळ पिकूं लागलें, ह्मणजे त्याच बाहेरच्या आच्छादनांतून उलट प्रकार घडून येतो; ह्मणजे "**कार्बन डाय ऑक्सैड**" वायु त्यक्त होऊन, तीं फळें आपल्या बाहेरच्या आच्छादनद्वारा **प्राणवायूचें** शोषण करून घेत असतात. हा फळें परिपक्व होत असतांना घडून येणारा चमत्कार अद्भुत आहे. उद्भिज्जकोटींतील कार्यकारणसंबंधाचा हा एक अवर्णनीय प्रकार आहे, असें कबूल करणें भाग पडतें. **डॉक्टर ब्रौन** नामक एका अनुभवशीर उद्भिज्जशास्त्रज्ञानें असें स्पष्ट ह्मटलें आहे कीं, फळें ज्या वेळेस नुकतींच सिद्ध झालेलीं असतात—अर्थात्, तीं ज्या वेळेस अपक्वदशेंत असतात, त्या वेळीं त्यांच्या सूक्ष्म पिंडांची घटना, त्यांची व्यवस्था, आणि त्यांचा उद्योगक्रम हीं अवघीं, पानांच्या अंतर्भागांतील सूक्ष्म पिंडांची घटना, व्यवस्था, आणि उद्योगक्रम यांसारखींच असतात; परंतु एवढेंच लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, हा सर्व प्रकार फळें ज्या वेळीं नुकतींच सिद्ध झालेलीं असतात, त्याच वेळीं घडून येत असतो.

आतां, मी पूर्वींच सांगितलें आहे कीं, या स्थितीस फळें येऊन पोंहचलीं ह्मणजे हळू हळू त्यांच्याठायीं "टार्टारिक्," "मॅलिक्," "सिट्रिक्" आदिकरून अम्लपदार्थ सिद्ध होतात. या अम्लपदार्थांस आज मी महाराष्ट्रभाषेंत नांवें देऊं शकत नाहीं; व देण्याचें धाडसही करीत नाहीं. हा कार्यभाग मी रसायनशास्त्रज्ञांवर सोंपवितों. मागेंच मी या व्याख्यानांत सांगितलें आहे कीं, अम्लपदार्थयुक्त जीं

अपक्क फळें असतात, तीं परिपक्क होऊं लागलीं ह्मणजे त्यांतील अम्लांश कमी होत जाऊन शर्करेचा अंश वाढत जातो. हा प्रकार ज्यावेळीं घडून येतो, त्यावेळीं फलांतर्गत सूक्ष्मपिंडांत विलक्षण रसायनक्रिया घडून येतात, असें दृष्टोत्पत्तीस येतें. ह्मणजे अपक्क अशा फळांत असणाऱ्या गुंदादि पदार्थांपासूनही शर्करा सिद्ध होत असते. जर्दाळूसारखीं कांहीं फळें परिपक्क होत असतांना त्यांत विशेष वर्णनीय प्रकार असा आहे कीं, त्या काळीं त्या फळांतील " मेलिक " आसिडाचा ( ह्मणजे अम्लपदार्थांचा ) अंश बिलकुल नाहींसा होतो; राहिला तर फारच थोडा असतो. परंतु अफ्गाणिस्तानांत कंदाहार, शालकोट इत्यादि प्रदेशीं उत्पन्न होणारीं " पीच " व " अलुबोखार " नामक मधुराम्ल व अत्यंत रूचकर फळें परिपक्क होत असतांना, त्यांतील " मेलिक् " आसिडाचा ( ह्मणजे अम्लपदार्थांचा ) अंश वाढत जातो. या फळांत हा अम्लांश जसा वाढत जातो, तसाच शर्करांशही वाढत जातो; ह्मणून हीं फळें पक्क झालीं असतां खाण्यास विशेष रूचकर असतात. मुंबईसारख्या शहरांतील बाजारांत, व दारोदारीं, अफ्गाणी व इराणी फिरस्ते उन्हांत सुकविलेले " अलुबोखार " विकीत असतात; व मुंबईत ज्या दुखणाईत लोकांस अन्नाची इच्छा नसते, त्यांस " अलुबोखार " खावयास दिल्यास त्यांच्या जिव्हेस रुचि येते, हें मी अनुभवावरून सांगतों. आणखींही एक असाच चमत्कार आहे कीं, " अलुबोखार " फळें परिपक्क होत असतांना त्यांतील गुंदाचा अंश कमी होत जातो; परंतु " जर्दाळू " आणि " पीच " नामक फळें, तीं परिपक्क होत असतांना त्यांतील गुंदाचा अंश वाढत जातो. हीं फळें ताजीं परिपक्क झालेलीं प्रत्यक्ष पाहिल्यावांचून हे चमत्कार लक्षांत येण्यासारखे नाहींत. सन १८७९।८० सालांत, मी बलुचिस्तान व अफ्गाणिस्तान या देशांत लढाईच्या वेळीं लश्करावरोबर फिरत असतांना, या फळांच्या परिपक्कदशेंत त्यांचें यथेच्छ सेवन करीत असतांना जो अनुभव मला प्रत्यक्ष प्राप्त झाला, त्या अन्वयें, या फळांविषयीं मी आज विशेष विस्तारानें लिहूं शकत आहें. लढाईच्या प्रसंगीं घरदार सोडून जाणें, आपली प्रिय पत्नि, आपले आप्त सुहृद् यांची भेट पुनः होईल कीं नाहीं याची शंका, असा प्रसंग फार दुःसह आहे. अशा प्रसंगीं जे जे अनेकप्रकारचे सृष्टपदार्थज्ञानवर्द्धनाचें सुयोग स्थलविशेषीं केवळ सुदैवानें प्राप्त होतात, ते विशेष स्मरणीय असतात. ह्मणून त्याकाळीं, आतांच निर्दिष्ट केलेल्या फळांच्या संबंधानें मला जो अनुभव प्राप्त झाला त्याचें या कालीं मला स्मरण होत आहे. त्याचा किंचित् विस्तारानें उल्लेख केला याची मला क्षमा असावी. माझ्या विशेष अनुभवाचें मी सुखानें गौरव करीत आहें, असें समजावें. असो.

फळांच्या संबंधानें आणखीं एक चमत्कार ध्यानांत ठेवण्यासारखा असा आहे कीं, कांहीं आंबट व गुंदमय फळें कच्चीं असतां शिजविल्यास तीं गुळचट लागतात. याचें कारण असें आहे कीं, तीं शिजत असतां उष्णतेच्या योगानें त्यांतील अम्लांश आणि गुंद यांची एकमेकांवर रसायनक्रिया घडून त्यांच्या ठायीं शर्करेचा अंश उत्पन्न होतो. उन्हाच्या तापानें आणि सूर्यप्रकाशानें ( ह्मणजे केवळ उजेडाच्या योगानें ) कांहीं फळांत जशी शर्करा सिद्ध होते, तद्वतच हा प्रकार होय.

येथवर, साधारण प्रचारांत ज्यांस फळें अशी संज्ञा आहे त्यांचें विवरण झालें.

## प्रकरण तिसरें.

**बीजप्राप्ति कशी होते ?** पूर्वीं सांगितल्याप्रमाणें एवढें मात्र लक्षांत ठेवावें कीं, उद्भिज्जशास्त्रदृष्ट्या, कांहीं वृक्षतरूलतांमध्यें **बीज** आणि **फळ** हे एकाच शब्दाचे पर्याय आहेत. उदाहरण—तृणधान्यें जीं आहेत, तीं फळें या संज्ञेखालीं गणिलीं जातात; त्याप्रमाणेंच तीं बीजेंही आहेत. परंतु शिंबीधान्यें घ्या, त्यांत बीज ह्मणून जो पदार्थ आहे तो फळांच्या—ह्मणजे शेंगांच्या—आंतला भाग होय. तसेंच भोंपळा, कांकडी, सफरचंद, धोतरा, वांगीं, पेरू, बोरें वगैरे ज्यांस आपण फळें ह्मणतों, त्यांत बीज ह्मणून कांहीं निराळाच—ह्मणजे निराळ्या आकृतीचा, निराळ्याच घटकावयवांनीं सिद्ध असा—एक पिंडरूप पदार्थ अथवा अनेक पिंडरूप पदार्थ असतात.

आतां **बीज** या संज्ञेनें कोणताही पदार्थ आपणापुढें आला, तर तो कसा सिद्ध होतो, याचा आपणांस विचार करणें आहे.

आह्मीं माणसें इहपरदेशीं प्रायः असें कल्पितों कीं, प्रारंभीं जेव्हां विश्वकर्म्यानें संपूर्ण सृष्टि आपल्या लीलाचातुर्यानें निर्माण केली, तेव्हांच त्यानें प्राणिमात्रास जन्म दिला; अर्थात् मी या व्याख्यानाच्या पूर्वार्धांत सांगितलेंच आहे कीं उद्भिज्ज वर्गाची **सप्राणांत** गणना आहे; व ती कशी हें सप्रमाण सिद्ध करूनही दाखविलें आहे. तेव्हां, या सामान्य कल्पनेच्या योगानें जशी मानव, पशु, पक्षि, कृमि, कीटकादि प्राण्यांच्या उद्भवाची शंका मुळींच उरली नाहीं, तशी उद्भिज्ज प्राण्यांच्या प्राथमिक उद्भवाचीही आह्मांस तिळमात्र शंका नसावी, हें योग्य वाटतें. जेथें कल्पनाच करणें आहे, तेथें ती एका प्राणिवर्गाची, एका माणसाची, अगर जनावराची मात्र करितां येते, दुसऱ्या ह्मणजे उद्भिज्जांसारख्या प्राणिवर्गाची कल्पना करितां येत नाहीं, हें ह्मणणें न्यायानुसार होणार नाहीं, अशी माझी पूर्ण खातरी आहे. तेव्हां सृष्टींत ज्याप्रमाणें प्रारंभीं मानवादि प्राणि पूर्णरीत्या सिद्ध होऊन आले असें कल्पिलें आहे, त्याप्रमाणेंच उद्भिज्जकोटिही संपूर्ण सिद्ध झाली असावी, अशी कल्पना करण्यास कांहींच प्रत्यवाय दिसत नाहीं.

तें कांहीं असो. जशी मानवादि प्राण्यांत बीजप्राप्ति होते, तशी उद्भिज्जकोटींतही होते, हें पूर्वभागांत केवळ ध्वनित केलें आहे इतकेंच नाहीं; तर ती तशी निखालस होते, असें सिद्ध करितांना ज्यां ठिकठिकाणीं स्पष्ट उल्लेख केला आहे. त्या उल्लेखाच्या समर्थनार्थ आणखी कांहीं सांगतों, तिकडे लक्ष द्यावें. प्राणिमात्रांचें **बीज** ह्मणजे पुत्रकन्यादि जशी संतति, तसें उद्भिज्जांच्या संततीचा पाया, त्यांच्या फळांतील बीजें, असें समजावें. ज्याप्रमाणें कन्यापुत्रांच्याद्वारें मानवादि प्राण्यांची वंशवृद्धि होत असते, त्याचप्रमाणें वनस्पतिवर्गांतील अनेक व्यक्तींची वंशवृद्धि त्यांच्या फलांतर्गत बीजांच्यापायीं होत असते, हें निर्विवाद आहे.

आतां या बीजांची "**सबीज**" वनस्पतिवर्गांत कोणत्या प्रकारची व्यवस्था असते, याचा थोडक्यांत विचार करूं. एका मानवी दंपत्यास एका खेपेस प्रायः एकच अपत्य प्राप्त होतें; प्रसंगीं दोन; क्वचित् तीन प्राप्त होतात. मर्कटादि उच्चवर्गाच्या प्राण्यांस एकाहून जास्त होण्याचा मार्ग आहे. गाई, गाढवी, शेळ्या,

घोड्या, यांतही तसाच प्रकार घडून येतो; डुकरी कुत्र्या, मांजरी, ससे यांस एका वेळीं त्याहूनही जास्त संतति होत असते; पक्षी, मत्स्य, उरगादि कोटींत त्याहूनही जास्त संतति गणिली आहे. उद्भिज्जवर्गाची बीजधारणशक्ति यांहूनही विशेष चमत्कारिक आहे. असें ह्मणतात कीं, खसखसनामक वनस्पतीच्या एका लहानशा झाडावर ३०,००० बीजें सिद्ध होतात. रे साहेबांनीं हीं बीजें प्रत्यक्ष मोजून पाहतां एका खसखशीच्या झाडावर त्यांस ३२,००० सांपडलीं. तंबाखूच्या लहानशा झाडावर ४०,००० बीजें असतात, असें प्रख्यात **लिनियस** साहेब ह्मणतात. आपल्या देशांत वाढणाऱ्या वावळ्याच्या झाडावर पांचलक्ष एकोणतीस हजार बीजें असतात, असें **डोडार्ट** साहेब ह्मणतात. " **रेटिक्युलारिया माकूसिमा** " नामक एका **अळंब्याच्या** जातीच्या क्षुद्र वनस्पतीवर एक कोटीचा बीजसमुदाय असतो ! किती ही बीज सिद्ध करण्याची शक्ति !

## प्रकरण चौथें.

आतां बीजांची वृद्धि होत असतांना त्या बीजांच्या घटनेंत कोणकोणते फेरफार होतात, याचा थोडा विचार करूं.

पुष्पांच्या गर्भाशयांत गर्भपिंडांच्याठायीं योग्य कालीं गर्भधारण झालें, ह्मणजे त्या गर्भपिंडांच्या कवचांत, तसेंच त्यांच्या अंतर्भागांत अनेक प्रकार घडून येतात. त्यांच्या मधला अवघा मृदुपणा हळू हळू कमी होत जातो; आणि त्यांतील सूक्ष्म घटकावयव घट्ट होत जातात.

आतां बीजांच्या संबंधानें दोन विचार करावयाचे:—१ बीजांची आकृति; २ बीजांकुर.

## बीजांची आकृति.

बीजांची आकृति अनेक प्रकारची असते. साधारण बोरांचीं बीजें, बजरबट्टू, चौधारीचीं बीजें हीं गोलाकार असतात; गारंबीचीं चापट गोलाकार; वालांचीं कधीं अंडाकार, कधीं गोलाकार; दांडी बोराचीं बीजें लांबट असतात; लाल व पांढऱ्या गुंजांचीं बीजें, तसेंच सागरगोटे, कमळकांकड्या ( ह्मणजे आपल्या देशांतील तलावांस सुशोभित करणाऱ्या, मधुमक्षिका भ्रमरादि प्राण्यांचा दिवसभर ज्या सुरम्य पुष्पांच्या सभोंवती गुंजारव होत असतो, अशा कुमुदिनी यांची फळें ) अंडाकार असतात; शिर्दोडी, हरिण दोडी, मांदार इत्यादि वल्लीवनस्पतींचीं बीजें चापट, केवळ पत्राकृति असतात. मिरची, वांगें, यांचीं बीजें तसेंच खसखस या नांवाचें बीज, हीं वक्राकार ह्मणजे गुडघ्याच्या आकाराचीं असतात; इंद्रजव नांवाचीं पांढऱ्या कुड्याचीं बीजें नौकाकृति असतात.

प्रत्येक बीजाला एक अथवा दोन आच्छादनें असतात. या आच्छादनांच्या आंतल्या भागास बीजांचा मुख्य अंश असतो. ज्या बीजांस दोन आच्छादनें असतात, त्यांतील बाहेरच्या आच्छादनास मी " **बहिराच्छादन** " अशी संज्ञा देतों; अर्थात् त्यांच्या आंतल्या आच्छादनास " **अंतराच्छादन** " अशी संज्ञा योग्य आहे. बीजाचें " **बहिराच्छादन** " हें प्राय: गुळगुळीत असतें; कधीं कधीं उटंगणासारख्या बीजांच्या बाह्यकवचांमध्यें कांहीं चमत्कार दिसून येतात, ते येथें प्रत्यक्ष दाखवितों. हें पहा ! या कांचेच्या भांड्यांत पाणी आहे, त्यांत मी हीं उटंगणाचीं सुकीं चापटलेलीं बीजें टाकितों. त्यांचा पाण्याशीं संयोग झाला

ह्मणजे त्यांच्या बहिराच्छादनावरचे दाट केश तरतरीत उभे राहून त्या बीजास कांहीं चमत्कारिक रूप प्राप्त होतें. तसेंच भेंड्याच्या जातीच्या म्यालो नामक बीजाच्या बहिराच्छादनांत कांहीं एक गुंदासारखा पदार्थ असतो; तो इसपगुल, अळशी इत्यादि जीं कांहीं ओषधी बीजें आहेत त्यांच्याही बहिराच्छादनांत असतो, तो येथें प्रत्यक्ष पाहून घ्यावा.

बीजांच्या बहिराच्छादनांत नानाप्रकारचे सुरम्य रंग पाहण्यांत येतात. प्रायः यांचा रंग पिंगट अथवा तांबूस असतो. उदाहरण—बदाम, आणि अक्रोड; पिस्ते अनेक रंगी असतात. त्यांच्या कवचींत जो सुरेखपणा दिसण्यांत येतो तो कोणत्याच बीजांत नाहीं असें मला वाटतें. उत्तम किरमिजी, उत्तम हिरवा रंग, व थोडासा पिंगटवर्ण यांचा एकाच कवचांत स्थलविशेषीं संकर होऊन जो रंगचमत्कार पहाण्यांत येतो तो अत्यंत वर्णनीय आहे. विधात्याच्या या चित्रलेखनशक्तीमध्यें काय अर्थ असेल तो न कळे; चित्रकलेला सीमाच नाहीं, असें मात्र दिसण्यांत येतें! असो. दुसऱ्या कित्येक बीजांच्या बहिराच्छादनांचें परीक्षण करून पाहूंया. देवकेळीच्या बीजांच्या बहिराच्छादनाचा रंग कोळशासारखा काळा; एरंडाच्या बीजाचा चित्र विचित्र काळा पांढरा; गोकर्णीचा पिंगट काळा; खसखशीचा रंग हस्तिदंताच्या रंगासारखा शुभ्र; शेंदरीच्या बीजांचा रंग शेंदरी; हीं बीजें हातांत धरून चोळलीं असतां त्यांच्यावरचा दाट शेंदरी रंग सहज दिसण्यांत येतो; हात व बोटें तत्काल शेंदरीं होऊन जातात. गुंजांचा रंगही तसाच—कांहींकांत पांढरा, कांहींकांत लालभडक असून, जेथें बीज फलकोशाच्या आंतल्या भागाशीं जोडलेलें असतें तेथें काळा कुळकुळीत असतो. शेंदरीच्या फळांत आणि वालांच्या व गुंजांच्या बहिराच्छादनांत हा एक फेर दिसण्यांत येतो कीं, शेंदरीच्या बीजांचा रंग,—तीं चोळलीं असतां मी सांगितलें आहे कीं, हातास लागतो; तसा वालांचा व गुंजांचा रंग कदापि लागत नसतो. जणूं काय तो लाखेनें पक्काच केला आहे.

वाल, गुंजा, भांग, रामफळ, सिताफळ, बकुल, सागरगोटे, वाटाणे, एरंड इत्यादि बीजांचें बहिराच्छादन गुळगुळीत असतें. कळोंजी नामक ओषधीबीजांच्या बहिराच्छादनास सुरकुत्या असतात. तंबाखूच्या बीजाच्या बहिराच्छादनावर अनेक रेषा असतात. भुयमुगांच्या दाण्यांचें बहिराच्छादन पातळ पारदर्शक पापोद्र्यासारखें असतें. खसखशीच्या बहिराच्छादनावर लहान मोठे, मधाच्या पोळ्यांत मधासाठीं असणाऱ्या कोशांसारखे कोश असतात. अंबोरी ह्मणजे तुतीचीं बीजें यांस अत्यंत सूक्ष्म कांटे असतात देवकापशी व शाल्मलीच्या बीजांवर मऊ तंतु असतात; त्यांपासून आपणांस "कापूस" ह्मणून अत्युपयोगी असा पदार्थ प्राप्त होतो. कापशीच्या बीजापासून जो आपणांस फायदा होतो त्याचें उदाहरण पाहूं लागलों तर फार दूर जावयास नको. तें याच स्थळीं मिळेल. आपलीं पागोटीं, आपले आंगरखे, आपलीं धोतरें परिधान करून जे आपण श्रोतृजन येथें विराजमान झालां आहां, ते या कापशीच्या बीजकवचाच्या उपयुक्ततेचें सर्वतोपरी उदाहरण देत आहां. हेमंतऋतूंतील सर्दी वगैरे उपद्रव टाळण्याकरितां, या मजपुढें बसलेल्या समाजांत कित्येकांच्या आंगांत चतुष्पदांच्या उर्णात्मक फलानेलादि वस्त्रांची योजना झाली असेल. तथापि प्रायः आपल्या देशांत सांप्रत शरीरसंरक्ष-

णार्थ ज्या वस्त्रांचा आपण सर्वसाधारण उपयोग करीत असतों, तीं केवळ कापसापासूनच तयार होत असतात. आमचा बिछाना कापसाचा; आमची उशी, गादी, पासोडी कापसाची; आमचें धोतर कापसाचें; आमची बंडी, आमचा अंगरखा, आमचें पागोटें, आमच्या शेतकऱ्याचें एकच आवरण–ह्मणजे शुद्ध लंगोटी–हीं सर्व कापसाचींच होत. हा आमचा सर्व वस्त्रप्रावरणप्रकार जो आह्मीं पाहतों तो कापशीच्या बीजाच्या बहिराच्छादनाचा प्रभाव होय.

कांहीं फळें, बीजधारणानंतर, बीज परिपक्वदशेस येत असतांना, अनेक विलक्षण पदार्थ तयार करीत असतात. याचें एकच उदाहरण देतों. तें हें कीं, आह्मी पानाच्या विड्यांत खातों ती जायपत्री! ही जायपत्री–नाहीं फळ, नाहीं बीज, नाहीं बीजाचें बहिराच्छादन, वस्तुतः जायपत्री ही एक, फळ आणि बीजाचें बहिराच्छादन यांच्यामध्यें असणारा, तैलंगी ब्राह्मणासारखा आगंतुक पदार्थ होय. आतां कदाचित् आपण असा प्रश्न कराल कीं, **तैलंगी ब्राह्मणासारखा ह्मणजे काय?** तर तुह्मांस ठाऊकच आहे कीं, मुंबापुरस्थ आमच्या लोकांत ब्राह्मणभोजनानिमित्त ज्यांस आमंत्रण असेल ते येण्यापूर्वींच अनेक अनिमंत्रित तैलंगी ब्राह्मण भोजनासाठीं मध्येंच घुसतात; त्याचप्रमाणें, जायपत्री जायफळांत नको अशी दिसत असतांनाही तेथें ती प्राप्त होते. तेव्हां हा शुद्ध तैलंगी ब्राह्मणाच्या अनिमंत्रित स्वार्थसाधनाचाच प्रकार समजावयाचा.

वनस्पतींच्या व्यवस्थित घटनेविषयीं पुढें कांहीं समज होईल तो होवो. हल्लीं जो समज आहे त्यावरून जायपत्रीसारखा पदार्थ बीजांच्या सभोंवतीं असणें याची काय योजना असावी याचें आह्मांस अजून पूर्णज्ञान झालें नाहीं. येणेंप्रमाणें बीजांच्या आच्छादनांचें वर्णन झालें. आतां बीजांचा दुसरा भाग ह्मणजे जो बीजांकुर त्याचें थोडक्यांत स्वरूप सांगतों.

## २. बीजांकुर.

बीजांकुर हा बीजांचा अत्यंत अवश्य भाग समजला पाहिजे. उदाहरणार्थ खसखशीचें एक बीज घ्या, त्यास उभें हातांत धरून त्याचा वरपासून खालपर्यंत छेद करा; त्यांत तीन भाग दिसून येतात. अगदीं बाहेरचा भाग तें कवच, अगदीं मधला भाग बीजांकुर. त्यांच्या दरम्यान जो प्रदेश त्यांत बीजांकुरासाठीं योजिलेल्या पोषक द्रव्यांचा समुदाय. या समुदायास इंग्रजींत प्रायः "**आल्ब्युमेन**" अशी संज्ञा आहे. कोणी त्यास "**एन्डोस्पर्म**" अथवा "**पेरिस्पर्म**" असें इंग्रजी पुस्तकांत ह्मणत असतात. मी त्या बीजपोषक द्रव्यसमुदायास "**बीजांकुरप्रतिपालक**" अशी संज्ञा देतों. कांहीं बीजांत–ह्मणजे चणे, वाटाणे, वाल, उडीद, मूग इत्यादि शिंबी धान्यांत–हा बीजांकुरांचें प्रतिपालन करणारा "**आल्ब्युमेन**" नामक द्रव्यसमुदाय पहाण्यांत येत नसतो, असें उद्भिज्जशास्त्रज्ञांचें ह्मणणें आहे. या बीजांकुरप्रतिपालक द्रव्यसमुदायाचा कार्यभाग इतकाच असतो कीं, बीजांकुर वाढत असतांना बीजांस योग्य त्या पोषक पदार्थांची सामग्री तयार करावी. ज्या बीजांत या साधनसामग्रीचा अभाव असतो तीं बीजें वनस्पतींच्या पुनरुज्जीवनकार्यांत मुळींच उपयोगाचीं नाहींत, असें समजतां कामानये. कारण चणे, वाटाणे, आदिकरून जीं शिंबी धान्यें आपण पहातों, व जीं आपल्या देशांत उत्तम पोषक

अन्नाच्या ठिकाणीं योजितों त्यांत जरी " आल्ब्युमेन " पदार्थ नसतो, तरी या धान्यांतील बीजांच्या अंकुरांचें प्रतिपालन करणारा पिष्टमय पदार्थ त्यांच्या डाळींत असतोच. त्याही पदार्थास पाश्चिमात्य उद्भिज्ज शास्त्रकारांनीं " **आल्ब्युमेन** " या संज्ञेखालीं कां गणिलें नाहीं हें एक गूढच आहे. कारण उद्भिज्जसिद्ध " **आल्ब्युमेन** " पदार्थ कांहीं एकाच प्रकारचा आहे, असें त्यांनीं वर्णिलें नाहीं; उलट, तो पदार्थ निरनिराळ्या वनस्पतींच्या बीजांच्या ठायीं निरनिराळ्या रूपांनीं असतो असें निरूपण केलें आहे. उदाहरण-गहूं, तांदूळ, बाजरी, वरी, जव, जोंधळे, नाचणी इत्यादि तृणधान्यांत हा " **बीजांकुरप्रतिपालकपदार्थ** " **पिष्टमय** असतो; खसखस, नारळ, एरंड, जेपाळ, बदाम, काजू, चारोळी इत्यादि बीजांत **तैलरूपानें** असतो; काफी व खजूर यांच्या बीजांत तो **हस्तिदंतासारखा** टणक असतो; या सर्वांस जर " **आल्ब्युमेन** " ह्मणतां येतें तर शिंबीवर्गांच्या डाळींत असणारा पिष्टमय पदार्थ याला " **आल्ब्युमेन** " कां ह्मणूं नये असा माझा **इंग्लिश** उद्भिज्जशास्त्रज्ञांला प्रश्न आहे.

बीजांचा मुख्य अंश ह्मटला ह्मणजे त्यांतील बीजांकुर. सपुष्पवनस्पतींत हा बीजांकुर स्पष्ट दिसून येतो. यावांचून सपुष्पवनस्पतींचें पुनरुज्जीवन बीजांत होत नसतें. या बीजांकुराचे तीन भाग पाहण्यांत येतातः–(१) " **आद्यमूल** " अथवा **मूळाचा अंकुर**; (२) " **आद्यपूर्ण** " अथवा बीजारोपण झाल्यावर जीं एक अथवा **दोन पानें** असतात तीं; (३) **तृणधान्यासारख्या एकदल वनस्पतींत असणारा एक दाणा**; अथवा शिंबी धान्यासारख्या **द्विदल वनस्पतींत असणाऱ्या दोन डाळी**; यांचा विशेष विचार पुढें करण्यांत येईल.

---

## प्रकरण पांचवें.

वनस्पतींच्या निरनिराळ्या वंशांचा विस्तार होण्याचें सामर्थ्य प्राप्त करून घेण्यांत बीजांच्याठायीं कोणती शक्ति असते याचा आपण आतां थोडासा विचार करूं. या शक्तीला " **बीजजीवनशक्ति** " अशी मी संज्ञा देतों; बीज फळांतून अथवा झाडावरून वाळून पडलें कीं त्यांत कांहींच जीव राहिला नाहीं असें समजूं नये. त्यांतील जीवनशक्ति कांहीं विलक्षण प्रकारची आहे. निरनिराळ्या वनस्पतींच्या बीजांत ही शक्ति निरनिराळ्या कालमानानें जागृत असते. अर्थात् ही शक्ति नष्ट होण्याचा अवधि निरनिराळ्या जातींच्या बीजांत निरनिराळ्या प्रमाणानें असतो. मोहऱ्या, तीळ, एरंड इत्यादि ज्या बीजांत तैल गुंदादि पदार्थ विशेष असतात, त्यांची पुनरुज्जीवनशक्ति लवकर नष्ट होते. आतां ज्या बीजांची पुनरुज्जीवनशक्ति नष्ट झाली आहे, तीं बीजें खाद्य नाहींत असें मात्र कोणी समजूं नये; एवढें मात्र खरें, कीं कांहीं बीजें नष्टजीवन झालीं तर तीं लवकर कुजूं लागतात, तेव्हां मात्र त्या बीजांची खाद्यपदार्थांत गणना करितां येत नाहीं. काफीचें बीज जरी हस्तिदंतासारखें टणक आहे, तथापि त्याचें फळ परिपक्क झाल्यावर, ह्मणजे बीज सिद्ध झाल्यावर, थोडक्याच काळानें नष्टजीवन होतें. जर काफीच्या बीजापासून काफीचे नवे रोंपे पाहिजे आहेत, तर काफीचें बीज तयार झाल्यापासून थोडक्याच दिवसांच्या आंत तें जमिनींत पेरिलें पाहिजे. चणे, वाटाणे, इत्यादि शिंबी धान्यें फारवर्षें टिकतात. " **हारिको** "

नामक वनस्पतिच्या शेंगा मुंबईंत "***फरसबी**" या नांवानें विकत मिळतात. त्यांतील बीजांच्या जीवनशक्तीची केवळ पराकाष्ठाच आहे; **डॉक्टर पुशे** नामक एका **फ्रेंच** ग्रंथकारानें लिहिलें आहे कीं, **टुर्नफोर्ट** शहरांतील उद्भिज्जपदार्थसंग्रहालयांतून आणविलेल्या **हारिकोच्या** बीजांपासून रोंपे वाढवितां येऊन त्यांपासून शेंगाही प्राप्त झाल्या आहेत. हीं बीजें शंभर वर्षांहून कमी काळाचीं नाहींत असें खातरीनें सांगतां येतें. तृणधान्यें प्रायः लवकरच नष्टजीवन होतात. दीर्घकाल जीवनशक्ति केवळ टणक बीजांतच विशेष असते आणि नाजूक बीजांत कमी असते, असें नाहीं; जीवन शक्तीचा आणि बीजांच्या कठिणपणाचा फारसा संबंध आहे असें समजूं नये. कांहीं अत्यंत क्षुद्र व दिसण्यांत नाजूक अशा बीजांच्या ठायीं जीवनशक्ति कांहीं अपूर्व प्रकारची असते. मुंबई, पुणें, इत्यादि शहरांतून अलीकडे "**लुसर्न**"**घास** ह्मणून जी वनस्पति घोड्यांस खावयास घालतात, तिचें बीज फारच नाजूक व सूक्ष्म आहे. त्याविषयीं **डॉक्टर पुशे** असें ह्मणतात कीं, पंधराशें वर्षांच्या एका थडग्यांतून हीं बीजें काढून जमिनींत पेरल्यानंतर त्यांपासून रोंपे त्वरित प्राप्त झाले. **डॉक्टर लिंड्ले** यांनीं विलायतेंत एका थडग्यांतून "**राजबरी**"नामक खाद्य फलदायक वनस्पतीचें सातशें वर्षांचें जुनें बीं आणून **लंडन** शहरांतील "**हॉर्टिकल्चरल् सोसैटी**"**च्या** बागेंत लाविलें; त्यापासून जे रोंपे झाले, त्यांचा विस्तार अझून पाहण्यांत येतो आहे, असें **डॉक्टर पुशे** यांणीं आपल्या ग्रंथांत ह्मटलें आहे. हल्लीं **सिंहलद्वीपांतील** "**पेराडिनिया**" शहरांतील नामांकित बागेची व्यवस्था पाहणारे डॉक्टर **ट्रैमन** हे कांहीं वर्षांमागें विलायतेंतील **ब्रिटिश म्यूझियम**नामक **लंडन** शहरांतील **पदार्थसंग्रहालयांत** तैनातीस असतांना, त्यांच्या अनुभवास असें आलें कीं, तलावांत उगवणाऱ्या एका जातीच्या कमलांचें बीज, **सर हान्स-स्लोन** नामक देशोदेशींच्या **पदार्थांचा समुच्चय** करणाऱ्या विद्वानानें आपल्या संग्रहीं आणून ठेविलें होतें; तें त्याच्या मरणानंतर **ब्रिटिश म्यूझियमांतील** अधिकाऱ्यांच्या स्वाधीन झालें. तें सुमारें शंभर वर्षांनीं पेरिल्यावर त्यापासून रोंपे निघाले. **स्लोन** साहेब सन १७५३ सालीं निवर्तले; आणि बीजारोपण सन १८६६ सालीं झालें. या प्रकारचीं बीजजीवनशक्तीचीं अनेक विलक्षण उदाहरणें देतां येतील, परंतु विस्तारभयास्तव येथेंच हें प्रकरण पुरें करितों.

* हा "फ्रेंच बीन" या इंग्रजी शब्दाचा अपभ्रंश आहे.

---

## प्रकरण सहावें.

आतां **बीजप्रसरण** ह्मणजे काय, आणि बीजकोशांत घडून आलेले आणि तत्प्रीत्यर्थ घडून येणारे चमत्कार, यांविषयीं थोडेंसें सांगतों.

**बीजप्रसरण** ह्मणजे वृक्षाच्या ठायीं बीजधारण होऊन, त्यापासून बीज व्यक्त होऊन अन्यत्र कसें जातें आणि त्याचें स्थलांतर कोणत्या रीतीनें होतें, ते प्रकार होत. या क्रियेचे मुख्य दोन विभाग करितां येतातः— **पहिला प्रकार**, बीजकवचांत कांहीं विशिष्ट चमत्कारिक योजना झाल्यामुळें जो होतो तो; यास मी "**नैसर्गिक प्रकार**" अशी संज्ञा देतों. **दुसरा प्रकार**, प्राणिजकोटींतील द्विपद, चतुष्पद प्राण्यांच्या साहाय्यानें होतो तो. यास मी "**कृत्रिम-प्रकार**" अशी संज्ञा देतों. आतां या **नैसर्गिक कृत्रिम प्रकारद्वयाचें** स्पष्टीकरण करितों.

**पहिला नैसर्गिक प्रकारः**—यांत दोन भेद आहेत. हे दोन्ही भेद मोठे विलक्षण आहेत. नारळ आपल्या देशांत अनेक ठिकाणीं होतात; विशेषें ते समुद्रकांठच्या जमिनींत उत्तम निपजतात; व ते कोंकणप्रांताचें सौभाग्यच आहेत असें मी समजतों. तसेंच ते मलबार, कोचीन, सिंहलद्वीप, व हिंदीमहासागरांतील अवघ्या बेटांचें एक संपत्तिद्वारच आहेत अशी माझी कल्पना आहे. या नारळाचें फळ, सोडणासगट माणसाच्या डोक्याएवढें प्रायः असतें. आतां हें पाण्यावर टाकिलें तर बुडत नाहीं, वरच तरतें, यामुळें तें ज्या स्थळीं पिकतें, त्या स्थळापासून जलमार्गानें अनेककोस प्रवास करून निराळ्याच देशच्या दूर किनाऱ्यावर येऊन आदळतें. कल्पना करा कीं, आफ्रिकाखंडाच्या आसपासच्या **सिशेलीस** बेटांत सिद्ध होणारा, आमच्या बैराग्यांच्या हातांतला भिक्षा घेण्याचा जो कृष्णवर्ण तुंबा, हा सिशेलीस बेटांतून निघून आमच्या मलबारच्या किनाऱ्यावर येऊन पडला तर तो कोठून आला? तो किती दूरची मजल करून आला आहे याची साधारण मनुष्यास कल्पना तरी होईल काय? कोणी ह्मणतील,—आणि ह्मणतातही—कीं तो समुद्रांत उत्पन्न होणारा एक नारळ आहे. समुद्राच्या बुडाशीं त्याचीं झाडें आहेत; तेथून तो वाहून येत असतो. खरा प्रकार तर निराळाच आहे. तो हा कीं, **सिशेलीस** द्वीपांत वाढणारें हें चार माणसांच्या डोक्याएवढें नारळाच्या जातीचें फळ समुद्रकांठीं वाढतें; आणि तें समुद्रांत पडून, अवघा हिंदीमहासागर वलांडून, आमच्या मलबार किनाऱ्यावर येऊन पडतें. हा नारळ दिसण्यांत आहे जड, पण पाण्यांत पडला असतां नावेसारखा तरून ६०० कोसांची मजल करून येतो! या पृथ्वीगोलाच्या मध्यरेषेंत अमेरिका खंडांत वाढणारे नारळ महासागराच्या लाटांत पर्यटन करीत करीत, **स्कांडिनेव्हियाच्या** किनाऱ्यावर, ह्मणजे थेट उत्तर ध्रुवाकडे गेल्याचें आपणांस ग्रंथांतरीं आढळून येत आहे! **स्कांडिनेव्हियामध्यें** जर या नारळांना पाहिजे तेवढी उष्णता व सूर्यप्रकाश हीं प्राप्य असतीं, तर तेथेंही हे नारळ पिकले असते. असो, तात्पर्य काय कीं एका देशांतील फळ, समुद्राच्या लहरींच्या योगानें, दुसरे देशीं प्रकट होतें; हा बीजप्रसरणाचा एक नैसर्गिक प्रकार आहे. हें वाहत जाणारें फळ जरी माणसाच्या डोक्याएवढें अथवा त्याच्याहून चौपट असलें तरी तें वजनानें हलकें असल्यामुळें साहजीक एका देशाहून दुसरे देशीं वाहून जातें.

दुसरा **नैसर्गिक प्रकार** विशेष चमत्कारिक आहे. तो बीजांच्याठायीं छत्ररूपानें आपल्या दृष्टीस पडतो. हीं पहा मांदाराचीं बीजें; भांबुर्डीचीं बीजें; हरिणदोडी; शिरदोडी, इत्यादि छत्र धारण करणारीं बीजें. आकाशांत जसें "**बलून**" उडत असतें तशीं हीं बीजें या श्वेतपिसारी छत्राच्या योगानें एका जागेवरून अनेक कोस दुसऱ्या जागीं जात असतात. टेटूच्या आणि **वरस** नामक वृक्षाच्या बीजांत कांहीं निराळाच प्रकार दिसतो. त्यांत पिसारा नसतो; पण बीजांसभोंवतीं पातळ पंखांसारखी योजना असते. तसेंच मुचकुंदाच्या बीजास एकाच बाजूनें पंखाच्या सारखा पिसारा असतो; तेणेंकरून वायूच्या संसर्गानें त्या बीजाचें स्थलांतर होऊं शकतें. आतां हा स्थलांतराचा प्रकार बीजाच्याचठायीं असतो असें नाहीं. तो कांहीं अवघ्या फलांतही दिसण्यांत

येतो. यास उदाहरणः–वावळ्याचें फळ, माधवलतेचें फळ, महारुखाचें फळ, ज्या वृक्षापासून शिसवी लांकुड प्राप्त होतें त्याचें फळ, बिबळ्याचें फळ; हीं मी आपणांस प्रत्यक्ष दाखवितों.

( २ ) बीजप्रसरणाच्या दुसऱ्या योजनेस मी **कृत्रिमप्रकार** अशी संज्ञा दिली आहे. यांत तीन भेद आहेत:—

**भेद पहिला.** कांहीं फळें मेंढ्या बकऱ्यांच्या लोंकरीस चिकटून दूर प्रदेशीं जात असतात. यास उदाहरण—लहान व थोरल्या चिकण्याचीं फळें, निचारडीचीं फळें, घुपा अथवा गोखरूचीं फळें, कांहीं प्रकारच्या गवताचीं फळें; या फळांच्या बाह्यकवचास बारीक बारीक कांटे असल्यामुळें, शेतांतून ज्या वनस्पतींवर तीं असतात, त्या वनस्पतींस मेंढरें, बकरीं लगटून जाऊं लागलीं, ह्मणजे त्यांचीं फळें त्या जनावरांच्या लोंकरींत अडकून राहतात. येणेंकरून तीं एका स्थळाहून दुसऱ्या स्थळीं गेलेलीं आढळण्यांत येतात.

**भेद दुसरा.** कांहीं फळें उंदीर आणि पक्षी गिळतात. त्यांचीं बीजें त्यांच्या जठरांत पचन न पावतां अवघींच विष्ठेच्याद्वारें आंतड्यांतून बाहेर पडून, बीजांकुरोद्भवाला योग्य स्थळीं समर्थ होतात. याचमुळें कडूनिंबाचीं बीजें, वड, उंबर, पिंपळ यांचीं बीजें, बांद्यांचीं बीजें पक्ष्यांच्या जठरांतून प्रवास करून, वृक्षांच्याठायीं अथवा जमिनीवर पडलीं असतां, त्यांपासून भावी वनस्पतीचा, ह्मणजे बीजांच्याठायीं असलेल्या अंकुराचा उद्भव होतो. वडाचीं, अगर पिंपळाचीं झाडें खजुरीवर किंवा ताडावर जीं होतात, अथवा मोडकळ स्थितींत आलेल्या किल्ल्याबुरुजांवर अथवा जुन्या घरांच्या भिंतींवर जीं प्रचंड वाढलेलीं पाहण्यांत येतात, तीं कोणीं माणसानें तेथें लाविल्यानें झालेलीं नसतात; तर त्या कडुनिंब, वड पिंपळ उंबरादिवृक्षांचीं फळें खाणाऱ्या पक्ष्यांच्या विष्ठेच्या द्वारें त्या वृक्षांचीं बीजें खजुरी ताड इत्यादि वृक्षांच्या वरती पडून त्या बीजांपासून तज्जातीय रोपें तेथें उगवतात. हें अनुभवावरून सांगतां येतें.

**भेद तिसरा**–हा मनुष्यांपायीं घडून येतो. व्यापाराकरितां एका देशांतून दुसऱ्या देशांत जी फलधान्यादि पदार्थांची देवघेव होत असते ती या सदराखालीं येते. त्याचा येथें विशेष विचार मी आतां विस्तारभयास्तव करीत नाहीं. आपल्या देशांत जे कांहीं पाश्चिमात्य सुरम्य फलपुष्पपत्रदायक वृक्ष दिसून येतात त्यांसंबंधीं वर्णन करूं लागलों तर आणखी एक विशेष व्याख्यान ऐकण्यास आपणास तयार व्हावें लागेल.

---

## प्रकरण सातवें.

आतां वनस्पतीचें **पुनरुज्जीवन** ह्मणजे काय हें संक्षेपानें सांगून या व्याख्यानाची समाप्ति करितों. बीजांच्याठायीं जो अंकुर असतो तो योग्य काळीं, योग्य स्थळीं पडला, त्याला पाहिजे तेवढा सूर्यप्रकाश, पाहिजे तेवढें पाणी, आणि योग्य तेवढ्या मानानें उष्णता हीं प्राप्त झालीं, ह्मणजे अंकुरोद्भव होतो. अंकुरोद्भव झाला ह्मणजे वनस्पतीचें पुनरुज्जीवन झालें असें समजावें. ह्मणजे पूर्वीं सांगितलेलें "**आद्यमूळ**" खालीं, जमिनीकडे वाढून जातें; आणि "**आद्यपत्रें**" उलट दिशेकडे जातात; व आद्यमूळ आणि आद्यपत्रें यांच्यामध्यें जो भाग असतो त्याचें **कांड** होतें. येणेंप्रमाणें पेरण्याच्या आधीं जें बीज शुष्क आणि निर्जीव आहे असें दिसत होतें तें पेरल्यावर त्यांतील सजीवपणाचें निदर्शन होतें.

आतां ही बीजांच्या ठायीं जी जीवनशक्ति आहे तिची साधारण मनुष्यास कल्पना तरी करितां येईल काय ?

असा या वनस्पतींचा नानाविध चमत्कार आपणास पावलोपावलीं दिसून येत असतो ! तस्मात् उद्भिज्जकोटि ही सृष्टिसौंदर्याची एक अपूर्व शाखाच होय. एका पाश्चिमात्य कवीनें असें ह्मटलें आहे कीं, संपूर्ण सृष्टिचमत्कारांविषयींचा कौतुकभाव मानवी प्राण्यामध्यें केवळ नैसर्गिकरीत्या वास करितो. तो केवळ त्याच्या स्वभावाचा अंश होय. यद्यपि विश्वकर्म्यानें आपल्या क्रियाकौशल्यानें प्रत्येक पदार्थ विशिष्ट चिन्हांनीं रेखित करून इतर पदार्थांपासून व्यक्त केला आहे-ह्मणजे एकजातीच्याच दोन वस्तूंत कांहींना कांहीं भिन्नत्व असावयाचेंच, त्या एकजातीय दोनही वस्तु सर्वतोपरी एकसारख्याच नसावयाच्या; तथापि, त्या सर्वांत न्यूनाधिक्यभावें कांहींना कांहीं सौंदर्य असावयाचेंच; आणि त्या सौंदर्याचा, विविध पदार्थांत विविधरीत्या आह्मांस अनुभव येतोच येतो. आतां, आह्मां मानवांस विचारवैचित्र्यामुळें त्या विविध पदार्थांच्या विविध सौंदर्याचें सारखेंच अनुमान करितां येत नाहीं, हा दोष केवळ अज्ञानामुळें होय. सुशिक्षितांस व ज्ञानी लोकांस, सृष्टिसौंदर्याचें हें अनुमान साहजिक करितां येतें; तसेंच प्रसंगीं विशेषही करितां येतें; अशिक्षितांस आणि अज्ञान्यांस त्या सौंदर्याचें अनुमान कमी होत असतें, कधीं मुळींच होत नसतें, असा अनुभव आहे. परंतु हा विश्वाचा प्रचंड पसारा पाहून-ह्मणजे केवळ नेत्रांनींच अवलोकन करून, परमेश्वराच्या अगाध लीलेचें ज्याला ज्ञान होत नाहीं, अथवा ज्याला यत्किंचित् कल्पनाही होत नाहीं, अथवा ज्याला त्या लीलेचा विस्मय वाटत नाहीं, ज्याचें अंतःकरण सद्गदित होत नाहीं, असा हतभाग्य माणूस कोणीच नाहीं.

**शार्मण्य** देशच्या **शिल्लर** नामक विख्यात नाट्यकवीनें एका ठिकाणीं वनस्पतिवर्गास उद्देशून असा उद्गार प्रदर्शित केला आहे:—"हे निवांत उद्भिज्जविस्तारा ! तुझ्या उत्तम व्यवस्थित प्रशांततेमध्यें परमेश्वराच्या हस्त कौशल्याचा भास होतआहे! आह्मां मानवांना अतर्क्य, अज्ञेय, असाध्य, असें सौंदर्य तुझ्या पोटीं, तुझ्या आसमंताद्भागीं दिसून येत आहे ! त्याच्या योगानें माझ्या जिज्ञासेची संपूर्ण स्फूर्ति या सकलविश्वाच्या चैतन्यरूपी निर्माणकर्त्याकडे धांव घेते ! हे उद्भिज्जसमुदाया ! हे वनस्थ, जलस्थ, पाषाणस्थ, काष्ठस्थ, वृक्ष, तरु, वल्ली लतादि सजीव पदार्थ हो ! तुह्मी केवळ शांततेचे आदर्शच आहां, असें मला वाटतें; तुमच्यापायीं जगदीश्वराच्या स्वरूपाचें माझ्या ठायीं प्रतिबिंब उठलें आहे असें वाटतें !"

मित्रहो ! या **शार्मण्य** देशीय **शिल्लर** नाट्यकवीची ही उक्ति मजसारख्या अत्यल्प अशा आर्यदेशीय बांधवाला, वनस्पतिवर्गाचा अभ्यास करीत असतांना अत्यंत आल्हाद देऊन माझ्या मनामध्यें अशी प्रेरणा उद्भूत करिते कीं, जणुं काय ती ह्मणते-जा, आणि होईल त्या युक्तीनें, योजितां येईल त्या उपायांनीं, भारतीय वनस्पतींच्या शोधनार्थ आपल्या देशबांधवांना उद्युक्त कर ! या सामाजिक उन्नतीच्या प्रसंगीं, अनेक विद्याव्यासंगी लोकांचें मन अनेक प्रकारच्या खटपटींत पडूं पाहात आहे. कोणी राष्ट्रीय उन्नतीसाठीं यत्न करीत आहेत; कोणी महाराष्ट्र वैभव वाढविण्यासाठीं यत्न करीत आहेत; कोणी सद्धर्मसंस्थापना करू

पाहत आहेत. कोणी आपली गृहस्थिति सुधारूं पाहात आहेत. तर तूं जा आणि आपल्या देशबांधवांस सांग, कीं ज्याप्रमाणें तुम्ही या आत्मोन्नतीच्या आणि देशोन्नतीच्या व्यवसायांमध्यें अत्यंत श्रम करीत आहां, त्याप्रमाणेंच उद्भिज्जशास्त्राचें शोधन करण्यांत अथवा अध्ययन करण्यांत श्रम करा ! मित्रहो ! या भरतभूमीच्या पृष्ठावर उपजीवन करणाऱ्या उद्भिज्ज्यांचा अभ्यास केल्यानें, आपणास आपलें अनेकरीत्या हित करून घेण्याचा मार्ग मोकळा आहे. तसाच तो सर्वरीत्या इष्ट आहे. तसेंच, या देहाला ज्या नानाविध व्याधि प्राप्त होतात त्यांपासून आपलें संरक्षण करून घेण्यासारख्या अनेक वनस्पति आहेत. त्यांचा आपपरप्राणसंरक्षणार्थ अभ्यास करा. त्या वनस्पतींमध्यें जे कांहीं गुणावगुण आहेत त्यांची आजकालच्या शास्त्रनियमानुरूप परीक्षा करा; व पूर्वकालीं जे वाग्भट, चरक, भावमिश्रादि ज्ञाते होऊन गेले त्यांच्या ग्रंथांतरीं ज्या वनौषधींचें गुणदोषवर्णन होऊन गेलें आहे त्यांचें संशोधन करा; त्यांची ओळख पाडून घ्या; त्यांच्या ठायीं असलेल्या गुणावगुणांची पुनरुक्ति करा आणि आपल्या शरीरास ज्या व्याधि प्राप्त होतात त्यांपासून निष्ठेनें, यथाशक्ति होईल तितकें, परित्राण करण्याचा मार्ग मोकळा करा. हा मार्ग श्रोतृमंडळींत सर्वांसच साध्य आहे असें नाहीं; इष्ट आहे असेंही नाहीं; ज्यांस तो इष्ट आहे, प्राप्य आहे, त्यांसच ही माझी करद्वय जोडून विज्ञप्ति आहे.

---

# चांदण्यांतल्या गप्पा.

"मारुतीचा प्रसाद."

[ मागील अंकावरून पुढें चालू. ]

**आनंदा** गयादिनाचे घरीं राहूं लागतांच त्याच्यामध्यें किती तरी बदल झाला ! जो **आनंदा** एक खूप मोठा फाटकामळका कोट घालून हिंडे, तोच **आनंदा** आतां चांगले धुवट व आंगानेटके कपडे घालूं लागला. त्याला नेसावयास धोतरें मिळूं लागलीं. त्याच्या डोकीस टोपीचा कधीं स्पर्श नव्हता ती आतां चांगली टोपी आली, व पायांस जोडा मिळाला. **गयादिनानें आनंदास** जवळच्या गांवच्या शाळेंत घातलें. त्यामुळें देवळासमोरच्या सडकेवर धुळींत कवड्या खेळणें, सडकेवरून जाणाऱ्या टांग्यांच्या मागें धांवत सुटणें, आल्यागेल्या वाटसरापुढें हात पसरणें व तोंड वेंगाडणें, वगैरे सर्व गोष्टी त्यानें सोडून दिल्या. आतां फक्त शाळेंत जातां येतां मात्र तो त्या सडकेवर येई व देवाचें दर्शन घेई. त्याच्यासारखीं उनाड पोरें त्याला खेळावयास हांक मारीत, पण **आनंदा** तिकडे जाईनासा झाला. असो. **गयादीन** त्याला तास दोनतास घरीं देखील शिकवी. दोन वेळ शाळा, बाकी शिकणें, यांत सारा वेळ जाऊं लागल्यानें त्याला वाईट मुलांच्याकडे बघण्यास सुद्धां होत नसे. मग त्यांच्याशीं खेळणें कुठलें ?

**आनंदा** बुद्धीनें चलाख असल्यामुळें शाळेंतले धडे भराभर व चांगले करी. त्यामुळें शाळेंत त्याचा नंबर नेहमीं पहिला असे. घरीं **गयादीन** रात्रीं व पहांटे नीतीच्या, सदाचरणाच्या, परोपकाराच्या व दातृत्वाच्या गोष्टी सांगे. यामुळें तो मुलगा फारच चांगला झाला.

एक दिवस शनवारची दुपारची शाळेला सुट्टी होती. **गयादिना**बरोबर **आनंदा** देवाला आला होता. तो घटकाभर देवळाजवळच्या पुलाच्या वरवंडीवर वनशोभा व येणाराजाणारांची धांदल पाहत बसला होता. त्यांत आणखी त्या दिवशीं हनुमानूजयन्ती होती. त्यामुळें देवदर्शनास लोकांची दाटी झाली होती. आसपासच्या खेड्यांतले लोक एकसारखे दर्शनास येत होते. सडकेवर गाड्यांची अगदीं खेंचाखेंच झाली होती. जवळच्या एका गांवांतील **मथुरादास** या नांवाचा एक श्रीमान् गृहस्थ त्यादिवशीं देवदर्शनाकरितां आपल्या गाडींत बसून येत असतां, त्याचा घोडा एका बैलगाडीच्या बुरख्याला पाहून बुजला व मस्ती करूं लागला. बिचारा घोडेवाला तर खालीं आलाच, घोड्याचे वागदोर ओढतां ओढतां **मथुरादासा**चे हाताचीं सालडीं निघालीं, व लगाम लागून लागून घोड्याचें तोंड रक्तबंबाळ झालें. तरी त्याची मस्ती ह्मणून थांबेना. हें **आनंदानें** दुरून पाहिलें व तो **मथुरादासा**च्या साह्याला तीरासारखा धांवला. घोडा मागें मागें सरकत सडकेच्या खालीं गाडी घालणार होता, त्याला **आनंदानें** लगाम खेंचून पुढें ओढला. त्याचे मानेवर थाप मारून त्याचे कानबिन पिरगळून त्याला शांत केला. गाडी उभी राहतांच शेट **मथुरादास** यांनीं गाडीखालीं उडी टाकिली. त्यांनीं आपले घोडेवाल्याची चौकशी केली, तों तो मागून लंगडत लंगडत येतांना दिसला. मग त्यांचा जीव थोडा स्वस्थ झाला. देवळाजवळ गाड्यांची व माणसांची एकच गर्दी झाली होती. अशा गर्दींत गाडी नेली तर घोडा पुन्हा बुजेल ह्मणून त्यांनीं **आनंदास** घोडा धरून उभा रहाण्यास सांगितलें व आपण देवदर्शनास निघून गेले.

थोड्या वेळांत घोडेवालाही लंगडत लंगडत आला. त्याला कांहीं फारसें लागलें नव्हतें. पण गुढघ्यास खरचटलें होतें व पाय मुरगळला होता. थोड्यांत चुकलें, नाहीं तर बिचारा ठारच मरावयाचा.

देवदर्शन घेऊन शेट **मथुरादास** गाडींत बसले. घोडेवाला मागें चढला. **आनंदानें** घोड्याचा कायदा चढवला व शेटजींना रामराम करून तो जाण्यास निघाला. शेटजींनीं खिशांत हात घातला, व जें हातांत आलें तें घाईघाईनें त्याच्या हातावर टाकलें व त्यांची गाडी भरधांव चालू झाली.

शेटजींनीं काय दिलें ह्मणून **आनंदानें** पाहिलें तों ते चार रुपये होते. त्याला असें वाटलें कीं, दोन आण्याचे पैसे देण्याच्या इराद्यानें त्यांनीं गडबडींत चुकून आपल्याला हे चार रुपये दिले. त्यानें ते रुपये तसेच खिशांत पुडी करून ठेविले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं नित्य कृत्य आटोपून **आनंदा** शेट **मथुरादास** यांच्या बंगल्यावर गेला. तों शेट पुढच्या ओटीवरच खुर्ची टाकून हुक्का पीत बसले होते. **आनंदाला** पहातांच त्यांच्या मनांत आलें कीं, हा आणखी कांहीं मागण्याकरितां आला आहे.

**आनंदानें** आंगणांतूनच शेटजींना रामराम केला, व वर चढून त्यानें आपल्या खिशांतली पुडी त्यांचे हातावर टाकिली; व तो मोठ्या नम्रपणानें ह्मणाला, 'शेट साहेब, काल आपण गडबडीनें चार ढब्बूंच्या ऐवजीं हे चार रुपये चुकून मला दिलेत. ते हे मी परत आणले आहेत. महाराज, माझी कालची चाकरी आणा-

दोन आण्यापेक्षां ज्यास्त झाली नाहीं. आपण घोड्याच्या गडबडींत चुकून दिलेले हे रुपये ठेवावे.'

हें **आनंदाचें** सरळ व प्रामाणिकपणाचें वर्तन पाहून शेटजींना फार आश्चर्य वाटलें. शेटजींना प्रामाणिक माणसाची किंमत फार वाटे. मग तो भिकारी असो कीं कुबेर असो. त्यांनीं **आनंदास** खालीं बसावयास सांगून त्याची सर्व हकीकत विचारून घेतली. **आनंदानेंही** ती सर्व सांगितली व तो शेवटीं ह्मणाला:– 'मी एकवेळ फार द्वाड मुलगा होतों; परंतु मजवर हे सर्व **गयादीन**बावाचे उपकार आहेत.' असें ह्मणतांना **आनंदाच्या** डोळ्यांत आंसवें उभीं राहिलीं.

**आनंदाची** हकीकत ऐकून शेटजींनाही फार दया आली. त्यांनीं **आनंदास** तीच पुडी बक्षिस देऊन आणखी दोन रुपये बक्षीस दिले, व संध्याकाळीं मी मारुतीला येईन तेव्हां **गयादिनास**ह तूं मला तेथें भेट, असें त्यास सांगितलें.

घरीं गेल्यावर त्यानें सर्व हकीकत **गयादिनास** सांगितली व ते रुपये त्याजवळ दिले. तेव्हां **गयादीन** ह्मणाला:--बेटा, परमेश्वर चांगल्यावाइटाचें फळ देतो ह्मणून मी जें ह्मटलें होतें, त्याचें हें घे प्रत्यंतर. तूं आतां चांगल्यारीतीनें वागलास ह्मणून तुला त्यानें चांगलें बक्षिस दिलें. आणि तसाच देवापुढचा नारळ, खारका खातास तर कदाचित् देव तुला चाबकाचें बक्षिस देता.

संध्याकाळीं देवळाच्या पडवींत **गयादीन** व **आनंदा** शेटजींच्या गाडीची वाट पहात बसले. ठरलेल्या वेळीं शेटजींची गाडी देवळाजवळ आली. आनंदानें आपल्या कालच्या मित्राच्या पाठीवर थाप मारून लगाम धरला. शेट गाडी- खालीं उतरले. **गयादिनानें** लवून आदबीनें त्यांना मुजरा केला. त्यांनीं विचारल्यावरून त्यानें **आनंदाची** सर्व हकीकत सांगितली.

**गयादीन** ह्मणाला:—' महाराज, परमेश्वराचे दयेनें व तुमच्यासारख्यांच्या आशीर्वादानें **आनंदाला** आजपर्यंत कसाबसा मी बाळगला. पण आतां माझें ह्मातारपण झालें. माझी या लोकची यात्रा संपत संपत मी अगदीं शेवटीं परलोकच्या पायरीशीं येऊन ठेपलों आहें. केव्हां पुढें पाय टाकीन याचा काय नेम ? तेव्हां आपल्यासारख्यांचा जर त्या गरीबाला आश्रय मिळेल तर चांगलें होईल. प्राण्यास प्रेम करण्यास कोणी तरी लागतें. अमका एक आपल्यावर प्रेम करितो, एवढ्यानेंच माणसास कितीतरी आधार वाटतो, त्याचे मनाला धीर येतो, व एवढ्या थोरल्या अफाट जगांत आपलें असें ह्मणण्यास कोणी तरी आहे, असें त्यास वाटतें. पण माझ्यामागें या ईश्वराचे प्राण्यास कोणी नाहीं. तो माझ्या जातीचा नाहीं. पण भगवानानें आह्मां दोघांची स्थिति सारखी करून असा हा विलक्षण रीतीनें आमचा योग घडवून आणला. महाराज ! माझाही याच्याच एवढा अस्साच मुलगा भगवानाकडे गेला, त्याच्या पाठोपाठ त्याची आईही त्याला भेटण्यास गेली. याचप्रमाणें या पोराचीं आईबापें दोघेंही गेलीं. त्यास नाहीं आईबाप, व मला नाहीं बायकोपोर. तेव्हां जणुं काय या पोराचें संगोपन करण्यास देवानें मजसारख्यास येथें ठेविलें व माझ्या लाडक्या एकुलत्याएका **माधवप्रसादाला** व त्याच्या आईला आपल्यापाशी नेलें. मर्जी त्याची !! असें ह्मणून **गयादीन** दिसण्यांत एवढा गंभीर पण तो खळखळून रडूं लागला. त्यानें आपल्याकडून रडें दाबण्याची पराकाष्ठा केली

पण तें ह्मणून कांहीं केल्या थांबेना. त्यानें आपल्या धोतरानें कांहीं वेळ तोंड झांकून घेतलें. कांहीं केल्या त्याचें रडूं त्याला आवरेचना.

त्याची ती दुःखाची उसळी गेल्यावर **मथुरादास** शेटजींनीं **आनंदास** आपल्या पेढीवर चाकरीस ठेवण्याचें कबूल केलें.

शेटजींच्या घरीं **आनंदा** चाकरीस राहिल्यावर त्याच्या रूपांत पुष्कळ फरक पडला. तो अगदीं काळाकुट्ट शिद्द्यासारखा दिसत असे, तो आतां चांगला उजळत चालला. त्याचे डोळे मूळचेच पाणीदार होते व नाक सरळ होतें. आतां त्याच्या गालांवर मांस येऊं लागल्यानें त्याचा चेहरा ज्यास्तीच चांगला दिसत चालला; त्याचा बांधाही चांगला मजबूत होता.

**आनंदा** शेटजींच्या घरीं व पेढीवर प्रत्येक माणसाचें काम मोठ्या आस्थेनें व काळजीनें करी. त्यामुळें त्यांची व त्यांच्याएथल्या एकूणएक माणसांची त्याच्यावर मर्जी बसली. **मथुरादासाचा** एक लहान चारपांच वर्षांचा मुलगा होता. त्याला **आनंदाशिवाय** एक पळभर होत नसे. रात्रीं झोंपेंतून उठला तरी देखील तो **आनंदाला** हाक मारी, व **आनंदाही जम्नादासाला** ( मुलाचें नांव ) मनापासून खेळवी.

शेटजींची बायको **साखरबाई** इचें तर पोटच्या मुलाप्रमाणें त्याजवर प्रेम बसलें. सर्वांच्याकडून चांगलें ह्मणवून घेतलेलें कपटी अंतःकरणास खपत नाहीं, व प्रत्येक चांगल्या मागें एखादें वाईट असतेंच. त्यांतून आपल्या अंगीं चांगला गुण नसला तर दुसऱ्याचा चांगला गुण कोठून सहन होणार ? असा मनुष्यस्वभावच आहे. त्याप्रमाणेंच **आनंदाचा** विनाकारण मनांतल्या मनांत द्वेष करणारा माणूस **आनंदाच्या** दुर्दैवानें शेटजींच्या घरांतच भेटला.

एकंदर सगळ्यांचेकडून **आनंदा** चांगलें ह्मणवून घेऊं लागला; त्यांत मुख्य शेट, शेटाणी व छोटेशेट यांना तर तो फारच आवडता झाला. हें तेथें असलेल्या एका त्याच्याच बरोबरच्या चाकराला खपत नसे. मनांतून तो **आनंदाचा** भारी द्वेष करी व मनांतल्या मनांत जळफळे. प्रत्यक्ष **आनंदाशीं** बाह्यात्कारी त्याचें वर्तन फारच प्रेमाचें असे. त्यामुळें बिचारा **आनंदाही** त्याच्याशीं सरळपणानें व प्रेमानें वागे. पण तो दुसरा माणूस ( त्याचें नांव तुळशीराम ) **आनंदावर** कांहीं तरी किचाट आणून केव्हां एकदां त्यास खड्यांत घालीन ह्मणून संधि पहात होता.

तुळशीराम हा शेटजींच्या एका जुन्या चाकराचा मुलगा होता. बापाला काम होईनासें झालें ह्मणून त्यानें मुलाला कामावर ठेवला व आपण घरीं बसला.

बारीकसारीक गोष्टींत एक दोन वेळां **तुळशीरामाची** लबाडी **आनंदाच्या** लक्षांत आली, व तो **गयादिनाला** भेटावयास गेला, तेव्हां त्यानें त्याजवळ तें सांगितलें. पण **गयादिनानें** त्याला उलट असा उपदेश केला कीं, असल्या बारीकसारीक गोष्टींकडे तूं लक्ष देतोस हें चांगलें नाहीं. कदाचित् ती गोष्ट त्याचेकडून चुकून झाली असेल. आपण आपलें अंतःकरण चांगलें स्वच्छ गंगोदकाप्रमाणें ठेविलें ह्मणजे त्यांत कांटेऱ्या निवडुंगाचेंही प्रतिबिंब सुंदर दिसतें; व आपलें अंतःकरण गढूळ नाल्यासारखें असलें तर सुंदर आम्रवृक्षाचें प्रतिबिंबही हिडीस दिसतें. तुला त्याची लबाडी वाटली, हा तुझ्या मनाचा वाईटपणा आहे; व त्यामुळें तुला त्याचें कृत्य वाईट दिसलें.

असें गयादिनाचें बोलणें ऐकून आनंदा निरुत्तर झाला. एकदां जम्नादास आनंदाबरोबर बाहेर हिंडायाला गेला होता. परत येतांना आनंदाचे खांद्यावर त्याला झोंप लागली. आनंदानें घरीं आणून त्याला बिछान्यावर निजविलें व तो आपल्या कामास गेला.

जम्नादास जागा झाल्यावर साखरबाईकडे गेला. तिनें त्याचे कपडे काढिले तेव्हां त्याच्या गळ्यांत कंठी नाहीं असें तिला आढळलें. तिनें अंथरुणांत वगैरे पाहिली, दुसरीकडे शोधली, पण कंठीचा पत्ता लागेना. शेवटीं आनंदाला विचारिलें. त्यानें सरळपणानें आपल्याला ठाऊक नसल्याचें सांगितलें व तोही शोधूं लागला. तुळशीरामाला विचारिलें, तों तो ह्मणाला 'मी कशाला पाहूं ? आनंदा त्यांना बाहेर घेऊन गेला होता. तोच त्यांना खेळवतो, त्याला विचारा.'

पुष्कळ शोध केला पण कंठीचा कांहीं पत्ता लागेना. घरांतील सर्व चाकरमाणसें जुनींच होतीं. फक्त आनंदा मात्र नवीन राहिलेला. शेट व शेटाणी यांशिवाय सगळ्यांना आनंदाचा वहीम येऊं लागला.

एक दिवस संध्याकाळीं मेथाजी आपल्या पेटीच्या किल्ल्या विसरून घरीं आले. त्या आणण्याकरितां त्यांनीं आनंदाला पाठविलें. तो अर्ध्या वाटेंत गेला न गेला तोंच कंठीचा वहीम आनंदावर असल्याचें त्यांना स्मरण झालें. तेव्हां आपण होऊन असल्या माणसावर जोखमीचें काम सांगूं नये, असें मेथाजींना वाटून त्याचे पाठोपाठ तेही दुकानाकडे वळले.

आनंदा जाऊन पोहोंचण्याच्या अगोदर तुळशीराम तिकडे कशाला गेला होता कोण जाणे. पण तो दुकान उघडून मेथाजीच्या गादीवर बसून कांहीं तरी करतो आहे असें त्याला आढळून आलें. आतां काय करावें ?

या विचारांत आनंदा मागें वळला. तों मेथाजी त्याचे दृष्टीस पडले. मेथाजीस पाहातांच आनंदाला समाधान झालें. मेथाजी जवळ येतांच त्यानें अगदीं हळूच दुकानांतील प्रकार सांगितला. मेथाजींनींही तो प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिला. तों तुळशीराम पेटींतून रुपये काढून खिशांत टाकतांना त्यांच्या दृष्टीस पडला. नंतर थोडावेळ जाऊं दिल्यावर मेथाजी सहज गेल्यासारखे दुकानांत गेले. तुळशीराम दुकान व बैठक झाडण्याचे मिषानें केरसुणी इकडे तिकडे मारूं लागला. मेथाजींनीं व आनंदानें पेटी उघडलेली पाहिल्याची ओळख तुळशीरामास दिली नाहीं. पुढें त्या रुपयांची चौकशी होतेवेळीं हा काय ह्मणतो हें पहाण्यासाठीं ते दोघेही गप्प राहिले.

त्यावेळीं मेथाजीची तुळशीरामावर सारखी नजर होती. तिन्हीसांजा मंडळीच्या गडबडींत तुळशीरामानें दुकानांतून आणलेले रुपये आनंदाचा कोट खुंटीवर होता त्याच्या खिशांत हळूच टाकले. मेथाजींनीं झालेला सर्व प्रकार शेटच्या कानावर घातला. दुसरे दिवशीं सकाळीं शेटजी आनंदास व तुळशीरामास बोलावून पेटीवरचे रुपये गेले कसे, हें विचारूं लागले. तुळशीरामानें, "मला नाहीं ठाऊक—मला नाहीं ठाऊक ! मी बाळपणापासून येथें वाढलेला. आपल्याला माझें वर्तन ठाऊक आहेच. आजपर्यंत कधीं सुपारीचें खांड उचलून घेण्याचें देखील माझे मनांत आलें नाहीं. आपण नवीं नवीं माणसें घरांत आणतां व त्यांच्यामुळें आह्मां जुन्यालोकांना खालीं पहावें लागतें. तुह्मी पाहिजे तर माझा झाडा घ्या." यासारखें

तुळशीराम बराच बडबडत सुटला. त्याच्या मनांत आनंदाचें नांव पटकन् घ्यावयाचें शेंकडोवेळां आलें, व त्या अर्थानें तो पुष्कळ बोललाही. पण प्रत्यक्ष त्याचें नांव घेण्याचें धैर्य त्याला होईना. शेटजींच्या समक्ष तर आनंदाकडे बघण्याचें सुद्धां त्याच्यानें होईना. तुळशीराम याप्रमाणें बडबडत असतां एकदां शेटजींनीं दरडावला, व सर्वांचे कपडे घेऊन येण्यास त्यास सांगितलें. तुळशीरामास तेंच पाहिजे होतें. तो पळत पळत गेला व दोघांतिघांचे कोट घेऊन आला. त्यांत आनंदाचाही कोट त्यानें आणला व लगबगीनें तोच कोट मेथाजीपुढें टाकिला. टाकतांच त्यांत रुपये खुळ्कन् वाजले. तेव्हां चेहरा थोडा आश्चर्ययुक्त करून मेथाजीकडे त्यानें पाहिलें. मेथाजी काय काय चमत्कार होत आहेत ते सारखे बघतच होते.

तुळशीरामानें आनंदाच्या खिशांत हात घालून त्यांतील रुपये काढून मेथाजीपुढें केले, व ह्मणाला ' हा पहा महाराज तुमचा भरंवशाचा आनंदा ! ' तुळशीरामाचें बोलणें एवढावेळ मेथाजी मुकाट्यानें ऐकून घेत होते. पण आपणच होऊन आनंदाच्या खिशांत ठेविलेले रुपये मोठ्या इमानीपणाच्या डौलानें बाहेर काढून, बिचाऱ्या आनंदावर आळ आणण्याकरितांच एवढें कपटजाळ पसरून त्यांत त्याला धरण्याची युक्ति आपणास साध्य झाली अशा घमेंडींत तुळशीराम आहे—तोंच त्यास ते एकदम दरडावून ह्मणाले: " बस्स झालें. तुझी जीभ फार लांबवूं नको गुलामा ! तुझें सर्व कृत्य मला माहीत आहे. मी तुझ्या पाठीवर परवांपासून आहें. तूं नाहीं हे रुपये या कोटाच्या खिशांत टाकलेस ? " असें ह्मणून त्यांनीं तुळशीरामाचें दुकानांतील कृत्य शेटजींना पुनः सांगितलें. नंतर तुळशीरामानें सांगितल्यावरून आनंदाचें गांठोडें आणलें, तों त्यांत कंठीही पण सांपडली. बिचाऱ्या आनंदानें आपलें गांठोडें कित्येक दिवसांत सोडलें नव्हतें. त्याच्या गांठोड्यांत जन्नादासाची कंठी कशी आली, हें त्याला कांहीं सुद्धां माहित नव्हतें. तेंही कृत्य आपलेंच होतें ह्मणून तुळशीरामानें कबूल केलें. शेटजींना तर तुळशीरामाचा अतोनात संताप आला. त्यांनीं त्याच्या बापास बोलावून त्यास मुलाचें हें सर्व कारस्थान सांगितलें, व त्यास काढून टाकलें. बाप बिचारा काय करणार ? ' एकवेळ क्षमा करा—पुन्हा असा गुन्हा झाला तर काढा—मजकडे बघा ' इत्यादि बोलून त्यानें आपल्या धन्याचे पायावर डोकें ठेविलें. आनंदालाही तें बरें वाटेना. तोही तुळशीरामाबद्दल शेटजींस विनवूं लागला. शेवटीं आनंदाकरितांच, त्याचा भलेपणा पाहून, त्यांनीं तुळशीरामास राहूं दिलें. आनंदाचे हातून इमानाचीं अशीं दुसरी कितीतरी कामें झालीं तीं कोठवर सांगावीं ?

आनंदा आतां आपल्या शेटजींचा मुंबईच्या पेढीवरचा मुनीम झाला. त्याचें लग्न होऊन त्याला दोन लहान लहान मुलें झालीं होतीं. मुंबईस त्यानें आपल्या कमाईचें एक लहानसें टुमदार घर बांधलें होतें. त्याचा उपकारकर्ता गयादीन हाही आतां मुंबईस आपल्या नातवंडांचें कौतुक करण्यास आजोबाच्या जागीं होता. आनंदाचे आनंदराव झाले. पण तो गयादिनाला कधीं विसरला नाहीं. एवढेंच नव्हे, तर पितृभक्त मुलाप्रमाणें त्यानें त्याची वृद्धापकाळीं योग्य सेवाचाकरी केली व त्याच्या माधवप्रसाद मुलाची त्याला यत्किंचितही आठवण होऊं दिली नाहीं.

पौष शुद्ध द्वितीयेचा दिवस. त्या दिवशीं मकारसंक्रान्त होती. सकाळचे पांच वाजले होते. सागरगडाच्या डोक्यावर शुक्र चांदणी नुक्तीच वर आली होती. ती पाहून असें वाटे कीं, जणुं काय एखाद्या भव्य स्त्रीनें वेणीफणी करून आपल्या काळ्या भोर केशकलापांत हा हिरेजडित सुंदर दागिनाच घातला आहे. पलीकडचा पूर्वेकडील भाग अरूणप्रभेमुळें तांबडा लाल झाला आहे;–जणुं ती स्त्री कुंकूं लावीत असतां लगबगींत पिंजरेचा करंडा खालीं लवंडला व त्यामुळें तो भाग लाल भडक झाला! अथवा, नैष्ठिकांनीं रक्तचंदन व तांबडीं फुलें घेऊन भगवान् दिनमणीला अर्घ्य दिलें व त्यामुळेंच ती दिशा लाल झाली. पश्चिमेकडे सर्व नक्षत्रगण खालीं सरकला होता, जणुं काय हा नवरत्नांचा हार तुटून त्यांतील रत्नें खालीं ओघळत आहेत! वृक्ष जणुं स्नान करून शुचिर्भूत होऊन नुकतेच ध्यान धरून बसले आहेत; ओढ्याचे लहान लहान झरे जणुं आनंदानें भगवन्नाम गात गात चालले आहेत; पक्षी एकमेकांना उजाडल्याची इशारत देण्याकरितां मधून-मधून किलबिल शब्द करीत आहेत; रात्रभर चालण्याचे श्रम झाल्यामुळें बैलगाड्या रेंगाळत रेंगाळत मार्ग क्रमित आहेत; मारूतीच्या देवळाभोंवतालचीं माणसें नित्यकृत्य करण्यास उठलीं आहेत, व त्यामुळें गजबज झाली आहे; गाई हंबरून वासरांना भेटण्याची उत्सुकता दाखवीत आहेत; माळणी, कोळणी व आगरिणी डोकीवर पांट्या घेऊन तोंडानें मंजुळ गाणीं गात गात पोयनाडच्या बाजाराला चालल्या आहेत. अशा वेळीं मारूतीच्या देवळापुढें घोड्यांचे दोन तीन तांगे येऊन थडकले. एवढ्या सकाळीं घोड्यांचे तांगे कोणाचे हे पाहण्यास उत्सुक झालेल्या माणसांची सभोंवती गर्दी झाली. आनंदरावाची बायको, दोन मुलें, गडीमाणसें व स्वतः आनंदराव इतकी मंडळी तांग्यांतून उतरून देवळांत शिरली. देवदर्शन घेऊन बिऱ्हाडीं गेली.

त्या दिवशीं आनंदरावाचे बायकोनें संक्रांतीचा वाणवसा जो केला तो त्या खेडेगांवच्या लोकांना अद्याप स्मरत आहे. आनंदरावांनीं आपल्या बायकोकडून नारळ, खारका, सुपाऱ्या वगैरे पदार्थ लुटविले. त्याचप्रमाणें गरीबांच्या मुलांना आंगडीं टोपडीं, बायकांना लुगडीं चोळ्या, व पुरूषांना धोतरें, घोंगड्या वांटल्या. आनंदराव आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांना "केरोबा विठाबाईचा मी आनंदा बरें का!" असें सांगे. ज्यांच्या घरीं तो जेवी खाई त्यांचे उपकार त्यानें आपल्या शक्तीप्रमाणें देणग्या देऊन फेडले; व ज्या मारूतीच्या पुढचे जिन्नस तो चोरून खात असे त्या देवाच्या देवळास त्यानें सुरेखसा सभामंडप बांधण्याकरितां गांवच्या संभावित लोकांजवळ रक्कम ठेविली.

इतकी गोष्ट सांगितल्यावर 'आतां रात्र फार झाली व उद्यां सकाळींच कचेरींत शिलकी पडलेलें काम करण्यास जावयाचें आहे' असें ह्मणून, व एकदा तंबाकूचा शेवटचा बार भरून आजची गोष्ट सांगणारे आमचे धोंडोपंत उठले, व आह्मीही आपापल्या झोंपडींत निजावयास निघून गेलों.



[ पुस्तकपरीक्षा. ]

## संगीत शारदा नाटक.

[ लि. आ. वि. ]

रा. रा. गोविंद बल्लाळ देवल यांजकडे प्रस्तुत संगीत नाटकाचें कर्तृत्व आहे. नाटकाचें स्वरूप आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या संगीत नाटकांहून फार भिन्न आहे. केव्हां महाभारतांतील एखाद्या सुरस कथाश्रवणानें, केव्हां रामायणांतील धीरोदात्त नायकाच्या चरित्रवाचनानें, केव्हां कविकुलगुरूच्या हृदयंगम कृतींच्या आस्वादानें, केव्हां शूद्रकाच्या हास्यकारक व आनंददायक नाटकाच्या आधारानें, केव्हां भवभूतीच्या गंभीर व सुश्राव्य वाणीच्या प्रसादानें, केव्हां बाणभट्टाच्या सर्वोत्कृष्ट कल्पनासमुद्राच्या उल्लासजनक व प्रसन्न तरंगानें, व केव्हां जगद्विख्यात महाकवि शेक्सपीअरच्या मानवीस्वभावाच्या रमणीय चित्रपटानें-आतांपर्यंतच्या संगीत नाट्याचार्यांच्या प्रतिभेचें उद्दीपन होत होतें. एकंदरींत स्वतंत्र व स्वकपोलकल्पित अशीं संगीत नाटकें आजपर्यंत फारच थोडीं झालीं; व त्यांपैकींच **शारदा** हें एक होय. मागील नाटकांपेक्षां शारदेमध्यें दुसरा एक भेद आहे. प्रस्तुत नाटक लौकिकी किंवा व्यावहारिक आहे. अमानुषशक्तीचें साहाय्य, केवळ कल्पनेंतच संभवणाऱ्या गुणांचा समुच्चय, व निरनिराळ्या रसांचें योग्य संमिश्रण, व एखाद्या रसविशेषाचा उत्कृष्ट परिपाक,–या विविध साधनांनीं, किंवा **भवभूतीनें** ह्मटल्याप्रमाणें–

"भूम्ना रसानां गहनाः प्रयोगाः
सौहार्दहृद्यानि विचेष्टितानि ।
औद्धत्यमायोजितकामसूत्रं
चित्राः कथा वाचि विदग्धता च ॥"

इत्यादि गोष्टींच्या साहाय्यानें संगीत नाटककार लोकचित्तानुरंजन करीत असत. केवळ काल्पनिक किंवा अद्भुत गोष्टींनींच मनुष्यमात्राचें रंजन होतें असा प्रकार नाहीं. नित्य प्रत्ययास येणाऱ्या सत्य प्रसंगांचें योग्य वर्णन ऐकूनही मनाला सारखाच आनंद होतो. किंबहुना मनुष्यस्वभावाचा हा एक धर्मच आहे. चित्रकलेच्या योगानें आपली हुबेहुब काढलेली प्रतिकृति पाहून मन प्रसन्न होतें, कुशल शिल्पकारानें घडविलेला पुतळा पाहून अंतःकरणांत आनंद उत्पन्न होतो, त्याचप्रमाणें नित्य व्यवहारांत घडणाऱ्या व पदोपदीं अनुभवास येणाऱ्या संविधानकानेंही आनंद झाल्यावांचून राहत नाहीं. शारदा नाटकाच्या संविधानकाचा उपक्रमही व्यावहारिकच आहे. तथापि प्रस्तुत नाटकाचें हेंच व्यावहारिक स्वरूप शेवटपर्यंत जसें टिकावयास पाहिजे तसें टिकलेलें दिसत नाहीं.

शारदा नाटकाचा विषय सामाजिक सुधारणेचा आहे. समाजाच्या नियमनाचें काम तीन तऱ्हांच्या सत्तेवर अवलंबून असतें:— व्यक्तिव्यक्तींमधील हक्कांचें संरक्षण व त्यांचा उपभोग, व्यक्तींचीं समाजाशीं असलेलीं कर्तव्यें, व समाजाचा व्यक्तिस्वातंत्र्याशीं संबंध,–या गोष्टींचें नियमन कायद्यानें स्थापन केलेल्या न्यायाच्या सभांकडून होतें. मनुष्याचीं पारमार्थिक कर्तव्यें, या जगताचा आधारभूत जो परमेश्वर त्याच्या प्राप्तीविषयीं योग्य मार्ग, व तत्संबंधी अवश्य लागणारें सात्विक व श्रेष्ठतम वर्तन, या सर्वांची दिशा धर्माज्ञेनें दाखविली जाते. बाकी राहिलेल्या सर्व सामाजिक व्यवहा-

रास लोकमतानें आळा घातला जातो; व ह्मणू-नच समाजांत ज्या अप्रशस्त चाली रूढ असतात, ज्या चालींमुळें अनीतीच्या वर्तनाकडे डोळेझांक केली जाते, व ज्या चाली देशकालवर्तमानाप्रमाणें अवजड व अप्रासंगिक वाटतात, त्या सर्वांची सुधारणा करण्याचें काम "धुरंधर देशभक्तांकडे" व विद्वान् लेखकांकडे आहे; व त्यांनींच या बाबतींत आपली लेखणी शिणविली पाहिजे. तेव्हां या दृष्टीनें पाहिलें असतां प्रस्तुत नाटकाचा विषय अभिनंदनीय होय.

इंग्लंडच्या इतिहासाकडे पाहिलें तर अशा प्रकारचे प्रयत्न तिकडील वाङ्मयांत झालेले आढळून येतील. १८ व्या शतकाचे प्रारंभीं इंग्लिश समाजाची स्थिति पुष्कळ गर्हणीय होती. सभ्य गृहस्थ ह्मणविणाऱ्यांमध्यें मदिरेचें स्वैर सेवन; द्यूतक्रीडनाची हौस; अहोरात्र निर्जीव व शुष्क अशा पत्त्यांच्या खेळांत जाणारें आयुष्य; स्त्रीपुरुषांच्या वैवाहिकबंधनाची शिथिलता; स्त्रियांच्या व पुरुषांच्या नीतिमत्तेविषयीं अगदीं हलक्या व क्षुद्र कल्पना; नाच, रंग व तमाशे यांमध्यें वाटणारें आयुष्याचें साफल्य; व केवळ स्वार्थाकरितां अब्रूकडे व कीर्तीकडे होत असलेलें दुर्लक्ष्य; हे सर्व अवगुण त्यावेळच्या समाजांत परिपूर्ण होते. परंतु अशा निंद्य स्थितीपासून सर्व समाजाला पराङ्मुख करण्याचें श्रेय **ॲडिसन**च्या जोरदार लेखांसच आहे. केव्हां सौम्य उपहासानें तर केव्हां योग्य विनोदानें, केव्हां निर्भर्त्सनेनें तर केव्हां श्रवणकटु परंतु कळकळीच्या उपदेशानें, क्वचित् तिरस्कारानें तर क्वचित् लडिवाळपणानें, ॲडिसननें आपलें ज्ञानामृत 'स्पेक्टेटर'च्या वाचकांच्या मनांत सतत ओतण्याचा क्रम चालविला होता; व केव्हांही कुणाची निष्कारण टवाळी किंवा अपशब्दांनीं कुचेष्टा किंवा मत्सरयुक्त टीका न करितां ॲडिसननें आपल्या लेखांनीं इष्टकार्य साध्य केलें. आज जवळ जवळ दोन शतकें होत आलीं तरी इंग्लिश भाषाभिज्ञ ॲडिसनचा जो गौरव करितात तो केवळ त्यानें आपल्या लेखानें घडवून आणलेल्या सामाजिक सुधारणेबद्दल होय. आमच्या सामाजिक सुधारणेबद्दल वरील तऱ्हेचा प्रयत्न करणाऱ्या लेखकांनीं ॲडिसनचा कित्ता समोर ठेविला पाहिजे. मेकॉले साहेबांनीं या बाबतींत काढलेले उद्गार लक्ष्यांत ठेवण्याजोगे आहेत.

"So effectually indeed did he retort on vice the mockery which had recently been directed against virtue, that since his time the open violation of decency has always been considered as the mark of a fool; and this resolution he accomplished without writing one personal lampoon."

अशाच तऱ्हेचे तत्कालीन दुसरे लेखक ह्मणजे **स्मॉलेट, फील्डिंग** हे होत. या ग्रंथकारांच्या कादंबऱ्या ह्मणजे त्यावेळच्या समाजस्थितीचीं चित्रें होत. या कादंबऱ्यांच्या वाचनानें तत्कालीन समाजावर इतका कांहीं प्रशंसनीय परिणाम झाला कीं त्यांस एका मार्मिक टीकाकारानें महाकाव्यें (Epic poems) असें ह्मटलें आहे.

शारदा नाटकाचा हेतुही सध्याच्या आमच्या समाजांत दिसणाऱ्या जरठकुमारीविवाहाच्या निंद्य चालीचा प्रतीकार करण्याचा आहे. रा० देवल यांनीं या विषयाकडे आपलें लक्ष्य देऊन तो लोकांपुढें आणला याबद्दल आह्मी त्यांचें सप्रेम अभिनंदन करितों. काव्या-

चा उपयोग व्यावहारिक लोकांना उपदेश करण्याकरितां करावा; व तो उपदेशही एखाद्या प्रेमळ स्त्रीच्या कळकळीच्या विनवणी प्रमाणें सौम्य असावा, हा जो साहित्यशास्त्राचा नियम, तो लक्षांत ठेवून लोकशिक्षणाचे कामीं आपल्या कवित्वाचा उपयोग करण्यास रा. देवल यांनीं आरंभ केला, हें पाहून आह्मांस समाधान वाटतें.

या नाटकांतील संविधानक येणेंप्रमाणें आहे:- भुजंगनाथ नांवाचा एक श्रीमान् वृद्ध गृहस्थ होता. त्याची बायको निवर्तली होती हें पाहून भद्रेश्वर दीक्षित नांवाच्या एका लग्नें जमविणाऱ्या मध्यस्थानें त्याच्या डोक्यांत द्वितीय विवाहाची कल्पना भरवून, द्रव्यप्राप्तीच्या लोभानें त्यानें त्यास-तुह्मी श्रीमंतीचा भपका करून सरदारी थाटांत कोठें दूरवर जावयास कबूल व्हाल तर तुमच्या लग्नाचें जुळवून देऊं. असें सांगून त्यास चढीला घातलें; व त्याला सरदार बनवून त्याच्या तैनातींत कांहीं नवी मंडळी पैदा करून ठेविली. कोदंड या नावांचा एक अविवाहित ब्रह्मचारी श्रीमज्जगद्गुरूंच्या आज्ञेवरून तीन वर्षेंपर्यंत जरठकुमारीविवाहापासून लोकांना पराङ्मुख करण्याकरितां उपदेश करीत हिंडत होता. याचा हिरण्यगर्भ ऊर्फ श्यामसुंदर नांवाचा एक स्नेही होता. या दोघांस भद्रेश्वर दीक्षिताचें कपटजाळ समजून आलें व दीक्षिताचा हेतु विफल करण्यासाठीं त्या दोघांनीं श्रीमंतांच्या तैनातींत नोकरी पत्करिली. कोदंड श्रीमंतांचा पुराणीक बनला; श्यामसुंदर एक नोकर होऊन भद्रेश्वर दीक्षिताच्या विश्वासांतला होऊन बसला. ही सर्व मंडळी गंगापुर नामक क्षेत्रीं गेली. तेथें कांचनभट्ट नांवाच्या एका द्रव्यलोभी मनुष्याची चवदा वर्षांची मुलगी शारदा लग्नाला अगदीं उपवर झाली होती. भद्रेश्वर दीक्षितांनीं तेथील सुवर्ण शास्त्री नांवाच्या मध्यस्थाचे मार्फत मुलीचे बापाला रोख ९००० रुपये, व शिवाय वंशपरंपरेची तैनात द्यावयाची, अशी आशा लावून शारदेचा व भुजंगनाथाचा विवाह जुळविला. वधूवर सगोत्र असल्याचें छपवून ठेविलें. कोदंडाला हें लग्न जुळलेलें पाहून फार संताप आला. त्यानें श्रीमंतांस लग्न न करण्याबद्दल विनंति केली. आपलें न ऐकिल्यास, खोट्या श्रीमंतीचें सर्व कारस्थान फोडून तुमचे धिंडवडे काढीन, ह्मणून त्यानें श्रीमंतांस धमकी दिली; तों भद्रेश्वर दीक्षितानें त्याला हे ज्या हेरंबमहालांत उतरले होते त्याच वाड्याच्या तळघरांत चतुर्भुज करून टाकिलें. हा प्रकार झाल्यावर तिथिनिश्चय होऊन लग्न ठरलें. दरम्यान श्रीमंतांकडे मुलीला दाखवायास वगैरे नेतात. वृद्ध नवरदेव व त्यांचे मूर्ख चाळे पाहून शारदेचें मन फार दुःखी, कष्टी व चिंताग्रस्त होतें; तो आपल्या आईस असल्या ह्मातार्‍याशीं लग्न करण्यापेक्षां सुरी घे आणि माझी मान चिरून टाक ह्मणून सांगते. कांचनभटासही ती पुष्कळ निर्भिडपणें बोलते. तो तर तिला फारच अनिवार बोलतो. तेव्हां ती निराश होऊन, माझी हवी तशी वाट लावा, ह्मणून बापास सांगते. इतक्यांत शारदेचा मामा येतो. तो तिला आपल्या बरोबर घेऊन जाऊन एखादें चांगलें स्थळ पाहून लग्न करण्याचा आपला बेत तिला कळवितो; पण शारदेला हें आवडत नाहीं. ती "आईबापांना न कळवितां तुझ्याबरोबर आलें असतां लोक मला नावें ठेवतील, बाबाच मला विकोत अथवा विहिरींत लोटोत. मी तुझ्या ह्मणण्यास कबूल होणार नाहीं" असें सांगते; तेव्हां मामा निरु-

पाय होऊन निघून जातो. पुढें शारदेचें व भुजंगनाथाचें लग्न होत आहे–दोघेंही बोहल्याजवळ उभीं आहेत–भिक्षुक मंडळी सुमुहूर्त सावधान ह्मणून अक्षता टाकीत आहे–इतक्यांत कैदेंतून सुटका करून घेऊन कोदंड तेथें येतो; आणि वधू व वर सगोत्री असल्याचें सांगून एकच धांदल उडवून देतो. इतक्यांत गांवचे कोतवाल तेथें येतात. भद्रेश्वर दीक्षित कोदंड आपल्यावर खोटेंच बालंट घेत आहे व तुरुंगांत टाकल्याबद्दल सूड घेत आहे असें सांगून कोतवालाची मूठ दाबूं पाहतो; पण तो कोतवाल लांच खाणारा नसल्यामुळें दीक्षिताची मसलत फसून तो तोंडघशीं पडतो. इतक्यांत कोदंड श्रीमंतांच्या पुतण्याला पुढें करितो, भुजंगनाथाची लुच्चेगिरी बाहेर पडते, व लग्न अर्ध्यावरच फेटाळतें. कांचनभट "माझा हुंडा, माझी तैनात" ह्मणून चित्तभ्रंश होऊन वेडा होतो; श्रीमंत अर्धांग वायूचा झटका होऊन पडतात. इकडे कोदंड श्रीशंकराचार्यांकडून भुजंगनाथाचा व शारदेचा विवाह सप्तपदी न झाल्यामुळें पूर्ण झालेला नाहीं अशा आशयाचें आज्ञापत्र आणून गंगापुरीच्या ब्रह्मवृंदापुढें ठेवितो. दरम्यान शारदा वयमानाप्रमाणें ऋतुमती होते व यामुळें तिला फार दुःख होतें. तिची आई इंदिरा हिलाही फार दुःख होतें व ती, कोदंड शारदेचें पाणिग्रहण करील काय, ह्मणून हिरण्यगर्भास विचारिते. दुःखानें पोळलेली शारदा रात्रींची घरून निघून जीव देण्याकरितां डोहावर जाते. ती डोहांत उडी टाकणार इतक्यांत कोदंड तेथें स्नानाकरितां येतो, व तिचा हात धरून, आत्महत्येपासून तिला परावृत्त करूं पाहतो. ती कोदंडास "स्वप्नांत मी नदीवर जीव देण्याकरितां आलें असतां आपण येऊन माझें असेंच पाणिग्रहण केलेंत" असें सांगते. प्रथमतः तिचें पाणिग्रहण करण्यास तो तयार होत नाहीं; पण जेव्हां तो तिचा जीव देण्याचा निश्चय पाहतो तेव्हां तिचें पाणिग्रहण करण्याचें तिला आश्वासन देतो, व ती आत्महत्येपासून परांगमुख होते. शेवटीं **देशस्थ शारदा** व **कोंकणस्थ कोदंड** यांचा जगद्गुरु यांचे आज्ञेवरून विवाह होतो. जगद्गुरु कोदंडास त्या प्रांताचा धर्माध्यक्ष नेमून हिरण्यगर्भास त्याचे साहाय्यास देतात. भुजंगनाथ चतुर्थाश्रम घेऊन काशीवास करण्याची इच्छा दर्शवितो व कोदंड आपल्या भरतवाक्यांत जगद्गुरूंजवळ "जरठें न विवाह करावा" इत्यादि विनंति करितो. येणेंप्रमाणें या नाटकांतील कथाभाग आहे.

रा. देवल यांच्या प्रस्तुतच्या कृतीस "नाटक" हें नांव कितपत देतां येईल याचा प्रथम विचार करूं. नाटकाचें जीवन ह्मणजे त्यांतील मुख्य रस होय. या नाटकांत असा कोणता रस साधला आहे? ह्मणजे शास्त्रीय पद्धतीनें विचार केल्यास, यांतील **स्थायीभाव** कोणता व **विभावअनुभव** कोणते? या नाटकाच्या अवलोकनानें प्रेक्षकांच्या मनावर कोणता परिणाम होतो किंवा त्यांच्या कोणच्या मनोवृत्ति उचंबळून जातात? या नाटकांतील प्रतिनायक जे **श्रीमंत** त्यांची नवी बायको घरीं आणण्याची अनावर उत्कंठा, चतुर्भुज होऊन गालबोट लावून घेण्याची आतुरता, नवे नवरोजी दिसण्याबद्दल चाललेली उल्लूपणाची हास्यास्पद तयारी, या सर्व गोष्टींनीं जो अनावर हास्यरस उत्पन्न होतो त्यासच वरील प्रश्नांचें उत्तर देतांना प्रधानत्व दिलें पाहिजे; संगीताच्या मिश्रणानें त्यांतच मौज वाटते, व प्रेक्षकांस आपण एखादें प्रहसन

( Farce ) पहात आहों कीं काय असा भास होतो. कारण चवथ्या अंकापर्यंत " भवेत् प्रहसनं वृत्तं निंद्यानां कविकल्पितम् " ही व्याख्या रा. देवल ह्यांच्या ह्या कृतीस पूर्णपणें लागू पडते. शिवाय असल्या अननुरूप वराच्या प्रसादानें ज्या हतभाग्य मुलीवर स्वाभाविकपणें संकटें कोसळलीं, तिच्या कष्टमय स्थितीच्या आलोकनानें वाटणारा विषाद व उत्पन्न होणारी सहानुभूति वाचकांच्या किंवा प्रेक्षकांच्या अंतःकरणांत व्हावी तितकी उत्पन्न होत नाहीं व वरील अनावर हास्यास्पद रसामुळें मुख्य रसाची सर्वथैव हानि होते. निवळ संगीतामुळेंही शारदानाटकास opera अशी संज्ञा देतां येत नाहीं. बरें, प्रहसन किंवा फार्स ह्मणावें तर शारदा व कोदंड यांच्या सारख्या भूमिकांमुळें तसेंही ह्मणतां येत नाहीं. व त्यामुळेंच संगीताचें मिश्रण असलें तरी त्यास संगीत प्रहसन किंवा " Burletto " ही संज्ञा देतां येत नाहीं.

हें नाटक व्यावहारिक किंवा लौकिकी आहे असें देवलांच्या तर्फेनें वकीलपत्र घेतलेले प्रस्तावनाकार सांगतात. पण शेवटल्या अंकांत शारदेनें आपल्या मामास केलेला उपदेश व आत्महत्या करण्याचा तिचा निश्चय हीं फारच अलौकीक उदात्त (Romantic) आहेत. व्यावहारिक नाटकाचा उपसंहार उदात्तपणांत कां केला असा आमचा ग्रंथकारांस प्रश्न आहे. " सौंदर्याची परिसीमा उदात्तपणांतच आहे असें नाहीं. तर ती सौम्यपणांतही आहे " असा बाणा मिरवून शारदेला उदात्तपणा देण्याची उठाठेव रा. देवल यांनीं कां केली हें समजत नाहीं. जगद्गुरूंनीं निश्चित केलेला तरुण, विद्वान व श्रीमंत वर सोडून, " ना घर ना दार " अशा अवधूत कोदंडालाच वरण्याचा शारदेचा अत्यंत निग्रह पाहून " वस्तुस्थितीला " सोडून " कल्पनासुंदरीला " ग्रंथकार बळी पडले असें कोण ह्मणणार नाहीं ? बरें, शारदेला उदात्त स्वरूपच द्यावयाचें, तर तिला आत्मघात करूं देऊन झालें नसतें काय ? अगर कोदंडाप्रमाणेंच अविवाहित राहून, प्रि. गोळे यांच्या " लीलावती-" प्रमाणें आपलें आयुष्य तिला स्वदेशकार्यास अर्पण करतां आलें नसतें काय ? या तऱ्हेचें स्वरूप कोदंडविवाहापेक्षां खचित जास्त उदात्त झालें असतें. तसेंच कोदंड, हिरण्यगर्भ, भुजंगनाथ, भद्रेश्वर, शारदा, इंदिरा, वल्लरी, मंदाकिनी, त्रिवेणी, शरयू, जान्हवी, हीं केवळ नाटकी व कादंबरींतच शोभणारीं अद्भुत नांवें कोणत्या " व्यावहारिक " समाजांत, महाराष्ट्रांतील कोणत्या " आजकालच्या स्थितींत " रूढ आहेत, हें ग्रंथकारांचे गुणानुवादी प्रस्तावनाकार सांगूं शकतील काय ? व्यावहारिक नाटकाला हीं नांवें अगदीं विसदृश आहेत; " पण हें लक्षांत कोण घेतो ? " ग्रंथकारांना आपल्या कल्पनाप्रेमामुळें व प्रस्तावनाकारांना अव्यापारेषु व्यापार करून त्यांची पाठ थोपटण्याच्या अनावर उत्कंठेमुळें वरील दोषाकडे लक्ष देतां आलें नाहीं.

शिवाय स्वभावविकासाच्या (Developement of character ) दृष्टीनें प्रस्तुत पुस्तकांत एक मोठी चूक झाली आहे, व ती शारदाकोदंडविवाह ही होय. जगद्गुरूंनीं ठरविल्याप्रमाणें शारदेचा विवाह झाला असता तर नाटकाचें पर्यवसानही लौकिकी होऊन ' कोदंडा 'चे स्वभावास अनुरूप झालें असतें, कोदंडाचा श्रेष्ठ व प्रशंसनीय हेतु साध्य झाला असता, व जगद्गुरूंच्यावर सोंग घेऊन रंगभूमी-

वर येण्याचें कठिण व मोठेपणाला विद्रूप असें संकट ओढवलें नसतें. कोदंडाला आपलें व्रत चालविण्यास अविवाहितच ठेवून त्याच्या हस्तें शारदेचा व जगद्गुरूंनीं निश्चित केलेल्या वराचा संबंध झाला असता तर कोणतें महत्पाप घडलें असतें हें आह्मांस समजत नाहीं, किंवा "तारुण्यं गतमेव निष्फलमहो शून्यालये दीपवत्" असें वाटून कोदंडाच्या ब्रह्मचर्याची कींव येऊन रा. देवलांच्या कोंवळ्या मनास धक्का बसला असल्यास नकळे! का अविवाहित राहणें शक्यच नाहीं असा त्यांचा समज आहे? असें असल्यास त्यांस इतिहासाची माहिती नाहीं असें दिलगिरीनें ह्मणावें लागतें. जगाच्या इतिहासांत अविवाहित राहून देशकार्य करणारे पुरुष व बायका यांचीं शेंकडों चरित्रें दृष्टीस पडतात. पाश्चिमात्य राष्ट्रांत अशा तऱ्हेचे समाज आजकाल निरपेक्षपणानें देशकार्य करीत आहेत. पण लांब कशाला, या आर्यदेशांतच ज्या "ऐहिक व पारमार्थिक सौख्याचा आधारस्तंभ शुद्ध आर्यधर्मा"ची महती रा. देवल यांनीं आपल्या पुस्तकांत गाइली आहे, त्याचेंच तेजोबलधन, विहितविवेकी व विमलशील पुरस्कर्ते श्रीमज्जगद्गुरूपाद श्रीमच्छंकराचार्य यांनींच मठस्थापनेच्या संस्थेला अस्तित्वांत आणलें नाहीं काय? बुद्धधर्माचा ऱ्हास होऊन, आर्यधर्माचें शुद्ध व सात्विक स्वरूप आजपर्यंत चिरस्थायि राहण्याला या संस्थेपासून मदत झाली नाहीं काय? अशा तऱ्हेचीं उदाहरणें डोळ्यांसमोर असून रा. देवल यांचें नाजुक मन कोदंड लोककल्याणाकरितां आजन्म अविवाहित कसा राहील या भीतीनें दडपून गेलें याबद्दल आह्मांस त्यांची कींव येते. शिवाय नाटकांतील पात्रांची उठावणी अशा तऱ्हेनें झाली पाहिजे व त्यांतील रसाचा परिपोष असा झाला पाहिजे कीं, मार्मिक श्रोत्यांच्या व नाटककर्त्यांच्या कल्पनाशक्तीचें तादात्म्य झालें पाहिजे. संविधानकाच्या एकंदर धोरणावरून नाटकाचें अमुक एक पर्यवसान होईल अशी रसिक प्रेक्षकांची अटकळ होते; त्याविरुद्ध नाटकाचा शेवट झाल्यास फारच रसभंग होऊन प्रेक्षकांचा हिरमोड होतो. तशाच तऱ्हेची स्थिति या नाटकाच्या अखेरीस होते. "यागो"चें कृष्ण कारस्थान अगदीं शेवटल्या घटकेला अथेल्लोस कळून त्याच्या हस्तें "डेस्डिमोने"चा खून झाला नसता, किंवा "रोमिओ"नें आत्मघात करण्यापूर्वी "जूलिअट" सावध झाली असती, व अशा रीतीनें या दोन नाटकांचा आनंदपर्यवसायी शेवट झाला असता तर तीं नाटकें आज जितकीं लोकप्रिय आहेत तितकीं झालीं नसतीं. रसाची परमावधि पर्यवसानांतच (Catastrophy) होते. आपल्या अनावर कल्पनेमुळें किंवा आपल्या लाडक्या मताकरितां, एखाद्या गोष्टीनें नाटकांतील पर्यवसानाचें परिवर्तन केल्यास रसहानि होऊन नाटकाचें मातेरें होतें. हें देवलांसारख्या नाटककारास कळूं नये ही खेदाची गोष्ट होय. कोदंड अविवाहित राहिल्यानेंच त्याच्या स्वभावांतील सौंदर्याची परिसीमा झाली असती. तात्पर्य, या नाटकास व्यावहारिक किंवा लौकिकी ह्मणतां येत नाहीं; व यांतील शेवटल्या अंकांतील नायिकेचें उदात्त स्वरूप (Romantic Sentiment) व तिच्यावरील हृदयद्रावक प्रसंग (Agonizing Situation) यांमुळें यास अद्भुत किंवा उदात्त (Melo-dramatic) स्वरूप आलें आहे.

याप्रमाणें ही कृति, ना धड नाटक ना धड फार्स, असें झालें आहे. यास

नांवच देणें झाल्यास, ही एक सर्व प्रकारची खिचडी आहे, व "नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधा ह्येकं समाराधनम्" या नियमाप्रमाणें निरानिराळ्या आवडनिवड असलेल्या प्रेक्षकांस खुष करण्याकरितां रा. देवल यांनीं ही बनविली, असें ह्मणावें लागतें.

या नाटकास संगीताचें अवजड स्वरूप दिलें नसतें तर रसभंग वगैरे वरील दोष ग्रंथकाराच्या सहज लक्षांत आले असते. हें नाटक लिहिण्याचा हेतु लोकरंजन करण्याचा नसून लोकशिक्षण करण्याचा आहे. या दृष्टीनें विचार करितांना ॲडीसन, स्मॉलेट, फील्डिंग यांच्या लेखांसारखा आपल्या कृतीचा परिणाम व्हावा असा ग्रंथकाराचा हेतु असल्यास ( व तो आहेही ) प्रस्तुत विषय संगीतास योग्य आहे कीं नाहीं हा महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होतो. संगीत व कवित्व ही एकच होत असा चुकीचा समज रा. देवलांच्या विनंतीवरून प्रस्तावना लिहिणाऱ्या गृहस्थांचा झालेला दिसतो. कविप्रतिभेला अमक्या प्रांतांत जाण्यास पूर्ण मुभा व अमक्या प्रदेशांत जाण्यास मज्जाव आहे, असा प्रकार मुळींच नाहीं, हें आह्मांसही मान्य आहे. परंतु तालसुराच्या ठेक्यावर प्रतिभासुंदरीचें आगमन कोणत्या ठिकाणीं मोहक होईल व कोणत्या ठिकाणीं विद्रूप दिसेल हें प्रत्येक रसिक मनुष्यानें ठरविलें पाहिजे. मेकॉले साहेबांनीं कवितेची जी व्याख्या केली आहे ती आमच्या संगीतास बरीच लागू पडते. सुस्वर आणि मधुर अशा स्वराच्या एकतानतेनें चित्तवृत्ति तल्लीन करण्याचा संगीताचा मुख्य हेतु आहे. श्रवणेंद्रिय तल्लीन झाल्यावर अंतःकरणांत आनंद उत्पन्न होतो. मनोरंजन हाच संगीताचा प्रधान हेतु आहे. विचारशक्ति प्रदीप्त करण्याला किंवा मनोवृत्ति उचंबळून त्यायोगें वर्तनावर परिणाम करण्याचे कामीं संगीताचा ( प्रस्तुत संगीताचा ) कांहीं तादृश उपयोग होत नाहीं असें ह्मटलें पाहिजे. व लोकशिक्षणाचा उदात्त व प्रधान हेतु ज्या नाटककारांचा आहे त्यांनीं संगीतापेक्षां गद्य नाटकांचाच उपयोग करावा अशी आमची त्यांस सूचना आहे. 'यागोच्या नीच व कुटिल कारस्थानानें परवश झालेल्या अथेल्लोचे आत्मगत विचार ठुंबरीच्या रूपानें ऐकतांना, किंवा पितृवधाच्या सुडाकरितां तळमळणाऱ्या हॅमलेटनें आपल्या आईची उच्छृंखळ व अत्यंत स्वैर वर्तनाबद्दल केलेली कानउघाडणी दिंडीच्या रूपानें श्रवण करून, किंवा लेडी मॅक्बेथसारख्या मूर्तिमंत कृत्यैनें खुनासारखें भयंकर कृत्य करण्यास आपल्या नवऱ्याची केलेली उठावणी साकीच्यारूपानें श्रवणपथावर येऊन, वाचकांच्या किंवा श्रोत्यांच्या मनावर कितपत परिणाम होईल हें प्रत्येकानें आपल्या मनाशींच ताडून पहावें. विचारशक्तीची जागृति व मनोवृत्तीची उठावणी करितांना मनोरंजनाचा हेतु गौण असून, लोकशिक्षणाच्या हेतूला प्राधान्य दिलें जावें असें आमचें मत आहे; व ह्मणूनच दुर्गा किंवा झुंझारराव यांप्रमाणें हें नाटक गद्य झालें असतें, किंवा मिसेस हेनरीवुडच्या 'क्यांटरबरीज वुइल' या धर्तीवर कादंबरीच्या रूपानें हें संविधानक लिहिलें गेलें असतें, तर फारच उपयुक्त झालें असतें, असें आह्मांस वाटतें.

शारदा नाटकांत जी हकीकत घडली आहे ती कोणत्या काळीं घडली हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे.

> "अन्यधर्मी भूपाल आर्यभूचा ।
> आर्यधर्मा अनुकूल नसायाचा ॥
> धर्मगुरु ते निःसत्वदंडधारी ।
> वर्णगुरु हे मनसोक्त कर्मकारी ॥—"

ही कोदंडाची उक्ति हल्लींच्या काळास अगदीं यथार्थ लागू पडते. परंतु दुसरीकडे पाहिलें तर, राजसत्तेचें पाठबळ नसल्यामुळें निःसत्त्व दंडधारी झालेले व अर्थात् प्रगतीविषयीं उदासीन असलेले आमचे धर्मगुरू जरठोद्वाहाच्या दुष्ट चालीचा बींमोड करण्याचा संकल्प करीत आहेत, व आपले कल्याण शिष्य निरनिराळ्या ठिकाणीं पाठवून त्यांच्या उपदेशानें लोकांस या चालीपासून पराङ्मुख करण्याच्या तयारींत आहेत; व कोदंडासारखे अढळ निश्चयाचे तरुण गृहस्थ या कार्याकरितां स्वदेह वाहण्यास तत्पर आहेत. हल्लींच्या आमच्या समाजांतील धर्मबंधनाच्या शिथिलतेकडे लक्ष्य पोंचविलें व वर्णगुरूंच्या अवनतीकडे दृष्टि गेली तर शारदानाटकामध्यें ज्या इष्ट स्थितीचें **काल्पनिक** चित्र काढलें आहे ती मुळींच दृग्गोचर होत नाहीं. उलटपक्षीं धार्मिक उन्नतीच्या बाबतींतील लोकांचें व जगद्गुरूंचें औदासीन्य पाहून तीव्र नैराश्य उत्पन्न होतें. सामाजिक सुधारणेची एक दिशा सुचविण्याचा रा. देवल यांचा प्रयत्न आहे खरा, तथापि त्यांनीं आपल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत सामाजिक सुधारणेच्या बाबतींत धर्मगुरूंचें साहाय्य कोणत्या उपायांनीं घ्यावें याबद्दल आपले विचार विस्तारानें प्रदर्शित केले असते; व प्रस्तावनालेखकाच्या करवीं आपलाच गौरव करून घेण्याचा अमोघ प्रयत्न केला नसता, तर पुस्तकाची उपयुक्तता खचित वाढली असती.

शारदा नाटक सामाजिक सुधारणेबद्दल आहे. या नाटकाच्या द्वारें ग्रंथकर्त्यांनीं कोणत्या सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न केला आहे हें पाहूंः (१) सप्तपदी झाल्यावांचून विवाह पूर्ण होत नाहीं; (२) सगोत्र वधूवरांचा विवाह अशास्त्र आहे; (३) जरठोद्वाह अत्यंत घातुक आहे; (४) देशस्थ कोंकणस्थांच्यामध्यें शरीरसंबंध होणें इष्ट आहे; (५) रजोदर्शन प्राप्त झाल्यानंतर व मुलीला पूर्ण प्रौढावस्था आल्यावर तिनें अनुरूप वराशीं आपल्या पसंतीप्रमाणें विवाह करावा;—सारांश प्रौढविवाह (स्वच्छंदः स्वयंवर करणें) अत्यंत इष्ट आहे,—याप्रमाणें या सुधारणापंचकानें रा. देवल यांनीं सुधारकवर्गाच्या आजपर्यंतच्या एकंदर सुधारणा एका झटक्यासरशी अमलांत आणल्या; व याबद्दल सुधारकांनीं त्यांचे आभार मानावे तितके थोडेच. कारण ज्या गोष्टी घडवून आणण्याबद्दल आज सतत २५ वर्षें कंठशोष चालला आहे त्या इतक्या शिताफीनें, व त्याही सुधारणेचे कट्टे शत्रु जे धर्माभिमानी ह्मणविणारे गृहस्थ त्यांच्याच पुढाऱ्याच्या—ह्मणजे धर्मगुरूंच्या-हस्तें बेमालुमपणें घडवून आणणाऱ्या कलमबहादराचें कौतुक करावें तितकें थोडेंच! वरील तऱ्हेचे विचार नाटक वाचतांना मनांत येऊन सुधारणेच्या अभिमान्यांस गुदगुल्या व्हाव्या हें ठीकच आहे. पण नाटक वाचल्यानंतर सभोंवतालच्या परिस्थितीकडे त्यांची दृष्टि गेल्यास व कल्पनासृष्टीचा हृदयंगम प्रदेश सोडून समाजाच्या प्रत्यक्ष स्थितीचें त्यांनीं मनन केल्यास त्यांस ग्रंथकाराच्या सुधारणेच्या अनावर आतुरतेबद्दल भुजंगनाथाच्या उतावळीपणाइतकीच कींव येईल. वृद्धतरुणविवाहाचें भेसुर स्वरूप वर्णन करितांना बाकीच्या सुधारणाही हातासरशा उरकून घ्याव्यात, असें रा. देवल यांस वाटलें असावें! व नाटकाची लोकप्रियता 'वन्समोअर' ह्मणून लोकांनीं व्यक्त करितांच या सर्व सुधारणा अस्तित्वांत येतीलच असा भोळसर परंतु अगदीं अनुभवशून्य समज रा. देवल यांचा झालेला दिसतो. ग्रंथकारांच्या या हास्या-

स्पद प्रयत्नाकडे पाहून आम्हांस एका जुन्या गोष्टीची आठवण होते. राष्ट्रीय सभेच्याविषयीं लोकमत जागृत करण्याकरितां एका ठिकाणीं एक पुण्याचे नामांकित वक्ते पाठविले होते. तेथील शेतकरी वगैरे भोळसर लोकांस त्यांनीं सभा भरवून आपले हेतु कळविले, व सरकारानें निदान तीस वर्षांपर्यंत तरी धारे कायम ठेवावे असा ठराव सभेपुढें मांडला. या वक्त्याचें भाषण झाल्यावर ग्रामस्थांची अनुकूल संमति मिळावी ह्मणून सदर ठरावास अनुमोदन देण्यास तत्रस्थ एका जाडया अशा पाटीलबोवांस विनंती करण्यांत आली. आधींच खेडेगांव, तेथें सरकारास अर्ज करण्याचा प्रकार मुळीं स्वप्नीं सुद्धां नाहीं; आणि त्यांतून पुण्यासारख्या ठिकाणाहून आलेल्या गृहस्थांमुळें पाटीलबोवांस वाटलें कीं, आपला अर्ज सरकारांत जाण्याचीच खोटी आहे. गेला कीं आपली विनंती हां हां ह्मणतां मान्य होईल. अशा भोळसट कल्पनेवरून त्यांनीं उठून एकदम मोठ्या आवेशांत सूचना केली कीं– "तीस वर्षांचीच का मागता ? अक्षी कायम धाऱ्याविशीच मागन कराव." सदर पाटीलबोवाप्रमाणेंच रा. देवलांनींही आपल्या नाटकांत सुधारणेच्या बऱ्याच बाबींविषयीं एकदम रेटून व मुग्ध आवेशानें मागण्या केलेल्या दिसतात.

( पुढील अंकांत समाप्त. )



## तान्हाजी मालसुरे
### अथवा
## सिंहगडची मोहिम.

### प्रकरण पांचवें.

( २२४ पृष्ठावरून पुढें चालू. )

भेकरें बुजिर, धीट सांबरें,  
देखुनी दुरुनि सैनिकां बरें  
धांवती, थबकती मधें पुन्हा,  
पाहती मुरडुनी क्षणक्षणा. ५१

हरिणींसह काळवीट काळा  
कवळ्या चाटित पाडसां स्वबाळां  
फिरतो शुचिवृत्ति साधु जैसा,–  
व्रत ज्याचें पर धर्म जी अहिंसा. ५२

कोठें शिखी, कोकिल, कीर ते कुठें,  
लांवे, कुठें ढोंक, दिसे, हि कुंकुटें,  
साळुंखिया, चाष, सुतार, लाहुऱ्या,  
दृष्टीस येती द्विज–जाति साजिऱ्या. ५३

स्वतनुज नव बालकां फिराया  
शिकविति पक्षि तसे तयां चराया;  
मृदुल रुचिर पल्लवां फळांतें  
चरविति कीटहि चंचुनें पिलांतें. ५४

स्वपृष्ठिसीं धरुनि पिलां शिरीं उरीं  
सुरक्षिती, लुचविति त्यांसि वानरी;  
पिलांसवें तरुवरि नीळ, माकडें,  
परोपरी विचरति खेळ रोकडे. ५५

१ महान, श्रेष्ठ. २ रान–कोंबडीं.

वात्सल्य देखुनि असें पशुपक्षियांचें–
जें प्रेक्षकां अमित दे सुख लोचनांचें–
सूर्याजिला उलट खेदचि फार झाला,
तान्हाजिला स्मरुनि आणि तदंगजाला[1]. ५६

---

कुसुमित पळसांहीं रंग ये लाल रानीं,
मधुन भडक भारी लाल हो सांवरींनीं;
हरितें[2] मधुन आंबे, पिंपरी, नांदरूख,
पसरुनि पथिकां दे काननश्री हरूख[3]. ५७

कोठें कोठें झळकति मधें उक्षिचे पुष्प–पुंजें[4];
कोठें कुंदां–सह कुसरिचे शुभ्र पुष्पाढ्य कुंजें[5];
पांगाऱ्याचीं कुपित–तरुणी–नेत्रशीं रक्त पुष्पें;
ठांईं ठांईं खुलति विटपीं[6] पुष्प[7]–वृंदीं अमूपें. ५८

बाकाळि आणि खुरट्या करवंदि, बोरी
भू-मातृ[8]–पृष्ठि बसल्या जणुं सान[9] पोरी;
तीं तांबडीं, हिरविं, पीत फळें धरून
जाणारियां टुकटुकाविति त्या दुरून. ५९

वसंता भर्त्यातें बघुनि गृहिं येतां बहु दिनीं,
वनश्री–स्त्री हर्षें त्यजुनि वसनें जर्जर जुनीं
असे ल्याली साडी जहर हिरवे पल्लव[10] जिला;
तसा नाना पुष्पीं[11] रचित कशिला कंचुक भला. ६०

येतो कांत गृहा अजी बहु दिनीं
देशांतराहूनियां–
येतां हें मनिं केवि त्या विरहिणी
आल्हादती सुस्त्रिया !
त्याचें चित्र वनांतही दिसुनि तो
सूर्याजि भारी रडे.–

ज्याचें ध्यान जयास तेंच दिसतें
त्यालागिं चोंहींकडे. ६१

साळुंख्या आणि खारी झटति
मधुपही[1] सांवरीच्या फुलांतें–
तेणें जी होय सौख्यप्रद किलबिल
ती कर्षिते[2] दृक्श्रुतीतें[3];
ऐशा वृक्षासि एक्या निरखुनि
करितो थोर सूर्याजि चिंता–
कीं बंधु[4]स्वाश्रितांची गति तशि सतिची
सूनुची काय आतां ! ६२

चुकून निजवत्स गाय वनि एक तैं हंबरे,
तिला बघुनि मातृदुःख निज त्याजलाही स्मरे;
सवें जननि शोक–मूर्छित दिसोन हो घाबरा;
रडे, रडवि बंधुदुःख करुनी जनांतें खरा. ६३

नेत्रांत पूर हृदयांतरिं शोक चाले;
चाले स्वतां पथ जरी पद मंद झाले;
सूर्याजिचा सकल मार्ग असाच गेला–
केव्हां, कसा, कुठुन, हें नुमजोनि त्याला. ६४

---

आला राव गडावरोनि पुढतीं
भेटावया सैनिकां;
बोले स्वागत आदरें सकळिकां
संबोखुनी तैं निका;
बोलेना परि एकही; दळ नृपा
सारें उदासी दिसे;
सूर्याजी तंव एकटाच दिसला
मृद्बंधुचें ज्या पिसें. ६५

कळला सहजींच भाव[5] राया
दाळिं केला जरि यत्न आंवराया;
भिजला नयनोदकांत शेला
नृपतीचा, न कधींच ज्या दशेला. ६६

[ पुढें चालेल. ]

---

१ तान्हाजीच्या मुलाला. २ हिरवे ( गार ) ३ हर्ष. ४ झुबके. ५ लतामंडप. ६ रानांत. ७ झुबके ( फुलांचे ). ८ भू=भूमि हीच कोणी आई, तिच्या पृष्ठीं=पाठीवर. ९ लहान. १० पालवी; पर्क्षी, पदर. ११ फुलांनीं, पक्षीं, वेलबुट्टी काढलेला असा ( कंचुक )

१ भ्रमर. २ आकर्षिते; ओढिते. ३ दृष्टि आणि कर्ण यांस. ४ आपल्या भावाच्या आश्रितांची. ५ इंगित.

# आईची थोरवी व तिचीं कर्तव्यें.

## भाग पहिला.

[ मागील अंकावरून पुढें चालू. ]

**म्याडम् कांपन्** नांवाच्या विदुषीबरोबर **नेपोलियन** बादशाहा संभाषण करीत असतां त्यानें तिला विचारिलें कीं, ' लोकांस यथायोग्य शिक्षण मिळण्याच्या कामांत कोणत्या गोष्टींची उणीव आहे ? ' ' सुशिक्षित आयांची ' ह्मणून तिनें पोक्त उत्तर दिलें. त्या बादशाहास ही गोष्ट बरोबर पटली. तो ह्मणाला—' सर्व शिक्षणपद्धतीचें बीज यांतच आहे; तर मग मुलांचें संगोपन उत्तमरीतीनें करून त्यांस उत्तम वळण लावण्याचें सामर्थ्य जेणेंकरून आयांमध्यें येईल, अशा प्रकारचें शिक्षण त्यांस देणें हें आपलें प्रथम कर्तव्य होय. ' फ्रान्सचें राज्य हातीं लागल्यावर त्या देशाच्या उन्नतीसाठीं त्यानें जे अनेक यत्न केले, त्यांत त्यानें स्त्रीशिक्षणास आदिस्थान दिलें व तत्प्रसारार्थ शाळा घालून बराच खर्च केला. एका विद्वान् ग्रंथकाराचें असें मत आहे कीं, पृथ्वीप्रदक्षिणा करणाऱ्याच्या मनावर निरनिराळीं राष्ट्रें पाहूनही जो ठसा उमटत नाहीं, तो ठसा आईला सहज वठवितां येईल. ही गोष्ट अगदीं खरी आहे. असें असूनही आईचीं कर्तव्यें तिजकडून यथायोग्य बजावलीं जाण्यास तिला शिक्षणाची आवश्यकता आहे, असा विचार सुद्धां आपले लोक मनांत आणित नाहींत, मग तें देण्याची तर गोष्ट लांबच ! मुलांप्रमाणें मुलींच्याही शिक्षणाची तरतूद झाली पाहिजे. जितकी मुलांच्या शिक्षणाबद्दल आपण काळजी वाहतों तितकी मुलींच्याही शिक्षणाकरितां आपण काळजी वाहिली पाहिजे, असें समजणारे लोक आपणांत किती आहेत ? देशांतील एकंदर लोकसंख्येच्या मानानें पाहतां अशा समजुतीचीं माणसें फारच कमी, ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. जो थोडाबहुत प्रयत्न सध्या सुरू आहे त्यापासून कितीसा फायदा होणार ? दहा अकरा वर्षांच्या आंतच मुली गृहिणी बनतात व लागलीच त्यांचा अभ्यास बंद पडतो. नऊ किंवा वर्षांच्या वयापर्यंत शाळेंत जाऊन त्या जें ' र ट फ ' शिकतात, त्याची वाढ पुढें होत नाहीं. संसाराच्या नानाप्रकारच्या काळज्यांचें दडपण लवकरच त्यांच्यावर येऊन पडतें; त्यामुळें त्यांचीं मनें संस्कृत होऊन प्रगल्भ दशेस येऊन पोहोंचत नाहींत; इतकेंच नाहीं तर त्यांच्या मूळच्या बुद्धीचा अंकुर सुद्धां जागच्या जागींच करपून जातो. **हर्बर्ट स्पेन्सरनें** ह्मटलें आहेः ' मुलांचें जगणें किंवा मरणें, त्यांच्या मानसिकशक्तींची प्रगल्भता किंवा त्यांचा ऱ्हास, या गोष्टी ज्या प्रकारानें त्यांचें संवर्धन होतें त्यांवर अवलंबून असतात. ' तर मग ज्यांच्यावर ही जबाबदारी कांहीं काळानें येणार, ज्यांच्यावर त्यांच्या संगोपनाचा बोजा पडणार, त्यांच्या कानावर शिशुसंवर्धनाबद्दल एक शब्दही पडूं नये, त्या बाबतींत त्यांस यत्किंचित्सुद्धां शिक्षण मिळूं नये, ही आश्चर्याची गोष्ट नव्हे काय ? आपल्या पोटीं येणाऱ्या कोमल अर्भकांचीं मनें प्रफुल्लित ठेवून त्यांस योग्य वळण लावणें व त्यांचें योग्य संवर्धन करणें वगैरे नाजूक व जबाबदारीच्या कामांची अवघड कला तिला साधली पाहिजे, व ह्या बाबतींत चार दोन शब्द तिच्या कानीं पडले पाहिजेत, व याचा विचार करण्यास तिला अवकाश सांपडला पाहिजे, असा विचार कोणाच्या तरी मनांत येतो

काय? किंवा नुसता विचार येऊन तरी काय उपयोग? त्या बाबतींत विशेष कळकळीनें जोंपर्यंत यत्न होत नाहींत तोंपर्यंत हे विचार व्यर्थ होत. आईचें कर्तव्य योग्य रीतीनें बजावण्याच्या कामांत ती लायक होण्यास तिच्या अंगीं पुष्कळ चांगले गुण असले पाहिजेत. ती जितकी सभ्य, तितकीच निश्चयीही असली पाहिजे. कोणत्या गोष्टींकडे केव्हां कानाडोळा करावा, केव्हां न करावा, वर्तनांत कडकपणा केव्हां दाखवावा, केव्हां त्यांत ढिलाई असावी, हें तिला चांगलें समजलें पाहिजे. तसेंच कोणत्या प्रसंगीं काय शिकवावें व आपण स्वतः काय शिकावें, हें तिनें जाणिलें पाहिजे. आपल्या अपत्यांच्या मनांत स्वतःबद्दल जितकें प्रेम तितकीच पूज्यबुद्धि तिला उत्पन्न करितां आली पाहिजे. तिचा स्वभाव गोड असून जितका शांत व गंभीर, तितकाच निश्चयीही असला पाहिजे. तिची अभिरुचि चांगली असून तिच्या रीतीभाती आवडण्याजोग्या असाव्या. आपल्या मुलांबाळांबद्दल तिला फार कळकळ वाटली पाहिजे. असें नसेल तर तिच्यावर त्यांचा पूर्ण विश्वास कधींच बसावयाचा नाहीं. तसेंच, रास्त गोष्ट कोणती आहे हें अति बारकाईनें निवडून काढून त्या गोष्टीस अनुसरून तंतोतंत वर्तन ठेवण्याची खबरदारी तिनें घेतली पाहिजे. तिनें उदार असावें, पण उधळपट्टी करूं नये. कोणतीही गोष्ट पुढें आली तरी तिजबद्दल पोक्तरीतीनें विचार करून तिचा योग्य निर्णय टरविण्याची बुद्धि तिच्यांत असली पाहिजे. मुलांस उपदेश करतांना तिला सर्व धोरण कळलें पाहिजे. व सर्वांत मोठा गुण तिच्यांत हा पाहिजे कीं, परमेश्वराच्या ठिकाणीं तिची फार भक्ति पाहिजे; कारण, तिचीं कामें इतकीं नाजूक तऱ्हेचीं आहेत व तिच्यावरची जबाबदारीही इतकी मोठी आहे कीं, संसाराच्या चिंतांच्याओझ्याखालीं ती दडपून जाण्याचा संभव फार असतो; असें होऊं नये ह्मणून तिनें आपल्या कर्तव्यास यथाशक्ति जपावें व त्यांत यश मिळण्याचा हवाला परमेश्वरावर ठेवून त्याची प्रार्थना व भक्ति करीत असावें, ह्मणजे चित्ताला समाधान वाटेल. त्याचप्रमाणें तिनें आपली जबाबदारी जाणिली पाहिजे, व आपल्या कामाचें महत्त्व किती आहे, हेंही तिला चांगलें समजलें पाहिजे. आपण स्वतः नानातऱ्हेच्या यातना व कष्ट सोसून ज्या लेकरांस जन्म दिला, त्यांची ज्या मानानें आपण काळजी घेऊं किंवा उपेक्षा करूं, त्या मानानें तीं या जगांत भरभराटीला चढतील किंवा त्यांचें सर्वस्वी नुकसान होऊन तीं नाश पावतील—ही गोष्ट तिच्या मनावर चांगलीच बिंबली पाहिजे. लहानपणीं मुलामुलींस सर्वच जग सुखमय वाटत असतें; तेव्हां तीं संसारांत पडून कालक्रमणा करूं लागण्यापूर्वीं त्यांची योग्य तयारी जर आईकडून झाली नाहीं, तर तिला त्याबद्दल किती पश्चात्ताप वाटेल व तिचें मन तिला किती खाईल? संसारास आरंभ झाल्यावर जीवनार्थकलहामध्यें आपल्या मुलाचा पराभव होऊन तो हतवीर्य होऊन पडला आहे व अशावेळीं चिंतातुर मुद्रेनें आपल्याकडे पाहून जर त्यानें असे उद्गार काढिले की–'आई, या जीवनार्थकलहांत अवश्य लागणारीं आयुधें तूं मला दिलीं नाहींस; संसारसमरांगणांत माझ्याशीं झुंजणारे शत्रु मला कोणकोणते भेटतील, त्यांना चीत करण्याचे उपाय कोणते, मजवर कोणतीं संकटें येऊन मला कसकसे हाल काढावे लागतील, व त्यांतून सुटण्याचे मार्ग कोणते, यांबद्दल तं

मला एक शब्दही सांगितला नाहींस; मला कधींच उपदेश केला नाहींस; ह्मणून आतां मी हा येथें हताश होऊन पडलों आहें–' तर तिच्या काळजास भोंकें पडल्याशिवाय राहतील काय? किंवा एखाद्या आईची मुलगी लहानपणापासून चांगलें वळण न लागल्यामुळें बहकून कुसंगतीनें वाईट मार्गास लागली, व खरा आणि योग्य मार्ग आपल्या आईनें आपणास दाखविण्याचा यत्न वेळींच केला असता तर आपणाकडून भलत्याच चुक्या झाल्या नसत्या–अशा विचारानें विव्हल होऊन तिनें डोळ्यांवाटे पाणी काढिलें, तर तें पाहून तिच्या आईला वर्मी घाव लागल्यासारखें होऊन 'दे माय धरणी ठाय' असें होणार नाहीं काय?

मनुष्यास बऱ्या वाईट संवयी प्रथम घरींच लागतात. जसजसें मनुष्य वयानें वाढत जातें, तसतशा या प्रथम लागलेल्या संवयी वयाबरोबर बळावत जातात. तसेंच, बरें वाईट वळण जें त्यास लागतें, तेंही घरींच लागतें. हें वळण ज्या मानानें चांगलें किंवा वाईट असेल, त्या मानानें पुढें मनुष्य चांगलें किंवा वाईट निपजतें. प्रथम लहानपणीं लागलेल्या संवयींनीं मनुष्य पुढें इतकें जखडलें जातें, कीं त्या संवयी त्याच्या जन्माच्या सोबतिणी होऊन बसतात. त्या संवयी बदलण्याचा कोणीही यत्न केला तर त्या सुटतां सुटत नाहींत. त्या केवळ त्याचा प्रतिस्वभाव होऊन बसतात. बाळपणीं मुलांच्या कोमल मनांवर जे संस्कार घडतात, तेच पुढें दृढ होत जातात व तीं मुलें मोठीं झाल्यावर, कर्तीसवर्ती बनल्यावर, त्या संस्कारांप्रमाणें त्यांच्याकडून वर्तन घडत जातें. घरीं मुलांच्या मनांत लहानसहान विचारांचें व कल्पनांचें बीं रुजून जो मतांकुर फुटतो त्यापासूनच पुढें सार्वजनिक मताचा वृक्ष बनतो. कारण, एकंदर जनसमूह प्रायः घरांतूनच तयार होऊन बाहेर येतो. ह्मणून, एकंदर जनसमूहास ह्मणजे राष्ट्रास चांगलें वळण लावण्याचें सामर्थ्य घरांतल्या प्रमुख माणसांच्या अंगीं जितकें असतें तितकें त्यावर राज्य चालविणाऱ्या राजांच्याही अंगीं नसतें, असें सिद्ध होतें. याप्रमाणें सर्व प्रकारें वळण लागण्याचें, चालचलणूक, रीतीभाती, व एकंदर वर्तन ठाम करण्याचें मुख्य उगमस्थान 'गृह' होय. या गृहांत जसें वळण लागेल, जसें शिक्षण मिळेल, तसा त्याचा परिणाम सर्व जनतेवर होणारा आहे. ह्मणून 'गृहशिक्षण' हा विषय इतक्या महत्त्वाच्या आहे कीं, त्याबद्दल लिहावें तितकें थोडेंच. या गृहांत जर नेहमीं परस्परांबद्दल प्रेम, कर्तव्यदक्षता, प्रामाणिकपणा, वगैरे सद्गुणांचा वास असला; गृह चालविणारीं प्रमुख माणसें जर समजुतदार, प्रेमळ व सदाचारसंपन्न असलीं; तरच त्यांतून आरोग्यसंपन्न, स्वतःचें व जवळच्या मनुष्याचें बरें करण्यास समर्थ, व वाडवडिलांचा सन्मार्गदर्शक कित्ता गिरविणारीं, अशीं माणसें निपजण्याची आशा असते. तेव्हां सर्व गृहाचें सूत्र ज्यांच्या हातांत आहे त्या आईबापांवर आपल्या भावी मुलांचें सुख-दुःख, त्यांचें बरें वाईट निघणें, त्यांची भरभराट किंवा त्यांची विपत्ति, ज्ञान किंवा अज्ञान, इत्यादि बऱ्या वाईट गोष्टी पुष्कळ अंशीं अवलंबून असतात. आणि त्यांतही बापापेक्षांही आईवरच त्या विशेषतः अवलंबून असतात. कारण, अगदीं बाल्यावस्थेपासून मुलांचा संबंध तिच्याशींच जास्ती असतो. घरांतल्या व्यवस्थेंत तिचाच हात जास्ती असतो. एका विद्वान् ग्रंथकारानें एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं, 'गृहसंस्थेची मालकीण स्त्री आहे. सर्व मुलांबाळांवर तिचाच पूर्ण

अंमल असतो. त्यांस कांहीं लागलेंसवरलें तर दाद मागण्याकरितां तीं आईकडेच धांव घेतात. तिचें उदाहरण रात्रंदिवस त्यांच्या डोळ्यांसमोर असतें. ह्मणून तिचें सर्वथैव अनुकरण त्यांच्याकडून जाणूनबुजून नव्हे, तर साहजिक होतें.'

लहानपणीं मुलांची अनुकरण करण्याची शक्ति फार प्रबळ असते. मोठीं माणसें घरांत कांहींतरी काम करीत असलीं ह्मणजे लहान मुलें त्यांची हुबेहुब नक्कल वठवितात, हें बहुतेकांच्या पाहण्यांत आहे. अनुकरणाकडे त्यांच्या मनाची साहजिक प्रवृत्ति असल्यामुळें सभोंवतालच्या नेहमीं दृष्टीसमोर असणाऱ्या माणसांची उठण्याबसण्याची, बोलण्याचालण्याची व विचार करण्याची ढब त्यांस लागावी यांत नवल काय? असें होणें अपरिहार्य आहे. ह्मणून त्यांच्या मनावर नानाप्रकारचे उत्तम संस्कार वठवावयास हा बाल्यावस्थेचाच काल फार महत्त्वाचा आहे. या अवस्थेंत मूल असतां त्याच्या मनास कोंवळ्या रोपाची उपमा देतात, तें योग्य आहे. कारण, कोंवळें रोपटें जसें वांकवावें तसें वांकतें. तेंच दिवसानुदिवस कठीण होत गेलें ह्मणजे आपल्या इच्छेनुरूप वांकविण्याचें काम कठीण जातें. ह्मणून मुलें सद्गुणी निपजावीं अशी आपली इच्छा असल्यास त्यांच्यापुढें वागणुकीचे उत्तम नमुने अवश्य ठेविले पाहिजेत. हें जर खरें आहे तर मग मुलांच्या नजरेसमोर सदासर्वकाळ आईचाच नमुना असतो. ह्मणून एका महा विद्वानानें जें ह्मटलें आहे, कीं 'आई ही शंभर शिक्षकांबरोबर आहे' तें यथार्थ आहे.

नुसत्या उपदेशापेक्षां उदाहरणानें जास्ती फायदा होतो असा सर्वत्र अनुभव आहे. नुसत्या बोलण्यापेक्षां कृतीची किंमत जास्त आहे. उपदेश फक्त बोलण्यानें करितां येतो, पण उदाहरणाला कृति करून दाखवावी लागते. एखाद्याच्या बोलण्यांत व कृतींत फरक दिसला तर तो कोणाच्याच मानास पात्र होत नाहीं व त्याचा बोजही राहत नाहीं. केवळ उपदेश करणारांची स्थिति **इसाबनीतीं**तील वांकडें तिकडें चालण्याबद्दल आपल्या पिलांस रागें भरणाऱ्या **खेकडी**प्रमाणें होते, हें सर्व शहाणी आई मनांत समजून असते. आपलीं वडील माणसें आपणास उपदेश करितात, त्याप्रमाणें तीं स्वतः आचरण करितात किंवा नाहीं, हें मुलें मोठ्या बारकाईनें पहात असतात. मुलांच्या लक्ष्यांत ह्या गोष्टी येत नाहींत असें वडील माणसांस वाटण्याचा संभव असतो; पण ती समजूत चुकीची आहे. ह्या गोष्टी त्यांच्या चटकन् लक्ष्यांत येतात. ह्मणून आपल्या उपदेशाप्रमाणें मुलांनीं चालावें अशी आपली इच्छा असल्यास आपलें बोलणें व कृति यांत नेहमीं मेळ ठेवला पाहिजे. उपदेशापेक्षां स्वतःच्या कृतीनेंच—उदाहरणानेंच—इष्ट कार्य घडतें. ह्मणूनच चांगल्या समजुतदार आईच्या उदाहरणाची आवश्यकता फार आहे. कारण तिचें उदाहरण—तिचा नमुना—रात्रंदिवस मुलांच्या समोर असतो. ह्मणून वर जें सांगितलें तें चांगल्या शहाण्या आया विसरत नाहींत. एका विद्वान् ग्रंथकारानें एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं, उदाहरणाचें महत्त्व इतकें आहे व त्यामुळें होणारा परिणामही इतका दीर्घकाल टिकणारा आहे कीं, त्याचें वर्णन करणें शक्यच नाहीं. उदाहरण हें प्रत्येक गोष्ट शिकण्याचें एक साधन आहे. असें जर आहे तर आईच्या उदाहरणापेक्षां जास्ती जोरदार उदाहरण कोणाचें आहे? असो.

[ पुढें चालेल. ]

Printed at the "Ganpat Krishnaji" Press, Bombay, 22-11-99

अवलोकिता व बुद्धरक्षिता निघून गेल्या. थोड्या वेळानें मालती ह्मणाली, ' गडे मदयंतिके, लवंगिकेला परत यायाला इतका वेळ कां बरें लागला ? ही वेळ बाई कशी जाईल ती जावो. मी लवंगिकेचा शोध करितें. ' असें ह्मणून ती एकटीच इकडे तिकडे फिरते तोंच कपालकुंडला तिच्याकरितां टपत बसलेली होती ती एकदम पुढें होऊन तिला ह्मणाली–' हाः पापिणी! थांब ! ' हें ऐकतांच मालतीची गाळण झाली, व ' हे आर्यपुत्रा !–' हे शब्द कसे तरी तिच्या तोंडून निघाले, व तिची दांतखिळी बसली. तिला कपालकुंडला ह्मणाली, ' हं ओरड ! ओरड ! त्या तपस्व्याचा वध करणारा तो तुझा प्रियकर आतां कोठें आहे ? तो तुझा धगड येऊंदे तुला राखावयाला आतां ! आतां अशी कां घाबरतेस ? ससाण्याच्या झडपेमुळें चकित झालेल्या रानचिमणीसारखी तडफडतेस कशाला ? फार वेळानें तूं पुनः माझ्या तावडींत सांपडली आहेस ! थांब, आतां तुला श्रीपर्वतावर नेऊन, तुकडे तुकडे करून, तुझे हाल हाल करून प्राण घेतें. ' असें ह्मणून मालतीला उचलून घेऊन ती निघून गेली.

हा सर्व प्रकार होत आहे, तों मदयंतिकेचा उजवा डोळा लवल्यामुळें तिच्या मनाला चमत्कारिकसें झालें होतें. ती थोडया वेळानें मालतीचा शोध करीत तिला हाका मारूं लागली. तोंच लवंगिका आली. तिला तिनें, ' कां, तो महाभाग तुला भेटला का ? ' असें विचारिलें. तेव्हां ती ह्मणाली, ' छेः तो बागेंतून बाहेर पडला तोंच मोठ्या शौर्यानें व आवेशानें त्या लोकांवर चालून गेला व तेव्हांच त्यांच्यांत मिसळला. तेव्हां मी अभागीण परत आलें. वाटेंत जागजागीं घरोघर त्याच्या गुणावर लुब्ध झालेल्या नगरवासी जनांचे दुःखोद्गार–' हाय माधवा ! हाय मकरंदा ! कसे तरी साहसिक आहेत हे !'–अशा अर्थाचे माझ्या कानीं आले. तसेंच हा मंत्रिकन्यांना पळवून नेण्याचा प्रकार ऐकून महाराजांनाही फारच राग व विषाद वाटला आहे. व यांत आपला अपमान झाला असें पाहून त्यांनीं वाडयांतून चौकीदारांच्या साहाय्याला दुसरी पुष्कळशी पायदळ फौज पाठविली आहे. ते स्वतः राजवाडयाच्या गच्चीवर उभे राहून चांदण्यांच्या प्रकाशानें हा सर्व चाललेला तमाशा पहात आहेत, असेंही लोक बोलताहेत. '

हें ऐकून मदयंतिकेला फारच वाईट वाटलें, व ' आपण मोठ्या अभागी आहों, ' असेंही ती ह्मणाली. तिला लवंगिकेनें, ' पण मालती कोठें आहे ? ' असें विचारिलें. तेव्हां मदयंतिका ह्मणाली, ' ती पूर्वीच तुला पाहायाला ह्मणून गेली, नंतर मी निघालें; ती पुनः मला कोठें दिसली नाहीं. कदाचित् ती बागेंतील दाट झाडींत कोठें तरी असेल. ' त्यावर, ' मदयंतिके, चल, तिला लवकर शोधून काढूं. ती फार भित्री आहे, भलतेंच कांहीं तरी करायाची. चल–मालती–अगे मालती–ए–मालती '–असें ह्मणत लवंगिका व मदयंतिका दोघीही तिचा शोध करीत फिरूं लागल्या.

इतक्यांत कलहंस त्या युद्धाच्या गर्दींतून तेथें परत आला. येतां येतां तो ह्मणाला, ' वाः वाः त्या भयंकर युद्धाच्या गर्दींतून आपण सर्व उत्तम तऱ्हेनें पार पडलों, हें फार चांगलें झालें. त्या चौकीदारांशीं व त्यांच्या साहाय्यार्थ आलेल्या राजाच्या फौजेंतील लोकांशीं मकरंद किती तरी आवेशानें व शौर्यानें लढला पण ! त्यांची कशी हबेलंडी उडाली ! कितीतरी लोक

[१] याच्यांत व मकरंदाच्या साहाव्या अंकाच्या शेवटच्या भाषणांत विरोध येतो.

मकरंदाच्या तरवारीच्या सपाट्यांत बळी पडले. माधवानें तरी कोण पराक्रम केला तो ! त्याच्या तडाख्यापुढें एकाचा तरी टिकाव लागाचा होता ! इतकें थोरलें सैन्य, पण त्यानें कसें कस्पटासारखें उडवून दिलें व तो राजमार्ग पार मोकळा केला ! शाबास आहे त्यांची ! महाराजांच्या मोठेपणाचें तरी कोठवर वर्णन करावें ! ते राजवाड्याच्या गच्चीवरून हा सर्व प्रकार पहात होते. त्यांना या उभयतांचें अप्रतिम शौर्य व आवेश पाहून अतिशय विस्मय व आनंद वाटला. त्यांनीं प्रतिहारीला खालीं पाठवून हें भांडण थांबविलें, व माधव आणि मकरंद या दोघांनाही जवळ वर बोलावून घेतलें; फार वेळपर्यंत मोठ्या आनंदानें माधवाच्या मुखाकडे टक लावून पाहिलें. पुढें अस्मादिकांच्या मुखानें त्यांचें कुलवृत्त ऐकिलें, तेव्हां त्यांना मोठा आनंद झाला. त्यावेळीं भूरिवसु व नंदन यांचीं मुखें हर्ष व विषाद यांच्या योगानें अनुक्रमें प्रफुल्लित व काळीं ठिक्कर झालीं. 'तुह्मांला असे त्रिभुवनभुषणभूत योग्य व गुणी जांवई मिळाले, तेव्हां तुमच्या आनंदास आतां काय विचारावयाचें ?' असें खुबीदार भाषण करून महाराज अंतःपुरांत गेले. हे पहा माधव व मकरंद इकडेच आले. चला हा सर्व वृत्तांत भगवती कामंदकीला सांगूं.' असें बोलत बोलत तो निघून गेला. तोंच माधव व मकरंद आले. ते आपसांत नुकत्याच झालेल्या युद्धाचें वगैरे वर्णन करीत होते.

[ हें कलहंसाचें व याच्या मागील लवंगिकेचें भाषण अप्रस्तुत वर्णनानें भरलेलें असून त्यांना मुळींच शोभण्यासारखें नाहीं. शिवाय नाटकांत बरा रंग येणारे असे हे सर्व प्रवेश केवळ वर्णनानेंच प्रेक्षकांपुढें आणिले आहेत हें ठीक नाहीं. हा कलहंसाचा प्रवेश कथेच्या अनुसंधानाला अवश्य असला तरी चमत्कारिक आहे. याच गोष्टीचें वर्णन पुढें माधव व मकरंद यांच्या भाषणांत आलेलें आहे. ]

मकरंद ह्मणाला, 'खऱ्या शूर वीराच्या तेजाची गोष्ट काय सांगावी ! त्या वेळ आवेशानें लढत असतांना अनेक परवीरांच्या शरीरांचे क्षणार्धांत तुकडे तुकडे उड[वि]... भुजबळाच्या सपाट्यापुढें कोणाचाच टिका[व] लागेना; व तो सर्व सैन्यरूपी महापूराचा प्रवा[ह] दुभागून जाऊन मधील रस्ता अगदीं मोकळ[ा] पडला.'

माधव ह्मणाला, 'तें सर्व खरें, पण बिचा[रे] कित्येक लोक नुकतेच आपापल्या प्रियेच्या मुख[ा]तून आनंदानें मधु गंडूष सेवन करीत असतां[ना] तसेच लढण्यास आले असतील, व ते तुझ्या आजच्या अप्रतिम शौर्याच्या सपाट्यांत परलो[कीं] पोहोंचले असतील. या अवचित घडलेल्या त्यांच्या स्थित्यंतरावरून संसारी लोकांची स्थि[ति] किती अशाश्वत आहे याबद्दल सर्वांची खा[त्री] होईल.'

'तसेंच, आमच्या हातून अपराध घडलेल [ते] सर्व विसरून आह्मी अगदीं निरपराधी आहों अशा तऱ्हेचेंच महाराजांनीं आमच्याशीं वर्त[न] केलें, याबद्दल त्यांच्या सौजन्याची प्रशंसा क[रा]वी तितकी थोडीच. चल मालतीसम[वेत] मदयंतिकेला कलहंसानें सांगितलेला युद्धवृत्तां[त] ऐकूं. तो ऐकतांना मालती वरचेवर तिच्याक[डे] उत्कंठेनें व विनोदानें पाहून तुजविषयीं तिल[ा] खुणावील, तेव्हां ती मोठ्या आनंदानें मुरक[त] ठुमकत तुजकडे पाहील, व तुझी दृष्टादृष्ट होत[ांच] च लाजेल, तेव्हां मोठीच बहार होईल—अ[सो.] ही पहा उद्यानवाट. आपण आलों

येथें.' असें बोलत दोघेही बागेंत आले. तेथें कांहींच गडबड दिसली नाहीं. तेव्हां माधवाला शंका आली. हें पाहून मकरंद ह्मणाला, 'आपण आलों नाहीं ह्मणून त्या येथेंच कोठें तरी बागेंत गमतीनें फिरत असतील, चल जाऊन पाहूं.'—असें ह्मणून ते थोडेसे फिरतात, तोंच लवंगिका व मदयंतिका मालतीला शोधीत व हाका मारीत तेथें आल्या. लवंगिकेनें त्यांना पाहतांच, आनंदानें, 'बरें झालें एकदाचें! हे दोघेही पुनः सुखरूप परत आले-' असें ह्मटलें. त्यांना दोघांनींही-'पण मालती कोठें आहे?' असें विचारिलें. तेव्हां त्या ह्मणाल्या, 'अहो, कुठली मालती! आह्मी हतभागिनी पावलांच्या शब्दावरून फसलों-दुसरें काय?' हें ऐकून माधव ह्मणाला, 'माझें हृदय पहा कसें फुटल्यासारखें होतें आहे. काय तें नीट स्पष्टपणें सांगा. त्या कुवलयाक्षीला कांहीं तरी भलतेंच झालें, असें मला खास वाटतें. माझें काळीज चरकलें आहे व माझे प्राण कासावीस झाले आहेत. हा डावा डोळाही लवतो आहे, आणि हें तुमचें भाषण, यावरून सर्व कांहीं स्पष्टच आहे. हाय हाय! सर्वथा घात झाला *!'

त्यावर मदयंतिका ह्मणाली, 'आपणाला सावधपणानें वागण्याला सांगण्याकरितां मालतीनें लवंगिकेला व मागून हा सर्व वृत्तांत भगवतीला सांगण्याकरितां अवलोकिता व बुद्धरक्षिता ह्यांना धाडिलें. नंतर ती लवंगिकेच्या शोधाला गेली, ती पुनः दृष्टीस पडली नाहीं. आह्मीं तिलाच बागेंत शोधीत होतों, इतक्यांत आपली भेट झाली.'

हें ऐकून माधव ह्मणाला, 'हे प्रिये मालती! माझ्या मनांत भलतीच अमंगळ शंका येते. प्रिये, थट्टा पुरे झाली. मी फारच उत्सुक झालों आहें. निदान मजशीं एकवेळ बोल! तूं फार निर्दय आहेस. माझें अंतःकरण अगदीं विव्हळ झालें आहे व हृदय भ्रमण करूं लागलें आहे. मला कांहींच सुचत नाहीं.'

त्याच्या बरोबरच लवंगिका व मयंतिकाही— 'हा प्रियसखी! कोठें गे गेलीस!' असें ह्मणून शोक करूं लागल्या. हें पाहून मकरंद ह्मणाला, 'मित्रा माधवा, पक्कें कांहीं कळल्यावांचून वेड्यासारखा शोक काय करितोस?' त्याला माधवानें उत्तर दिलें, 'मकरंदा, मजविषयींच्या प्रेमातिशयानें दुःखित व भयभीत होऊन ती कांहीं भलतेंच करील, हें तूं जाणत नाहींस का?' मकरंद ह्मणाला, 'हो तें खरें. पण ती कदाचित् भगवतीकडेही गेली असेल, चल तिकडे जाऊन पाहूं.' त्या दोघींचेंही तेंच मत पडलें. तेव्हां माधव ह्मणाला, 'बरें, तसें तरी असो, चला.'

जातां जातां मकरंद आपणाशीं ह्मणाला, 'आमची सखी भगवतीच्या घरीं गेली असली तर तेथें खुशाल असेल. असें नसलें तर मात्र मोठीच काळजी आहे. बहुधा बांधवजन, प्रिय सुहृद् इत्यादिकांच्या समागमाचें सौख्य सौदामिनीसारखें चंचल व अस्थिर असतें.' असें बोलून सर्वजण निघून गेले.

[ हा अंक मागील अंकाचाच पुढें चालू भाग आहे. निराळा अंक करण्याची विशेष आवश्यकता होती असें नाहीं. यांत मालतीच्या मिषानें तिच्या स्थितींतील कुलीन मुलीचें खरें चित्र फारच खुबीदार दिलें आहे. अवलोकितेचेंही भाषण झोंकदार व योग्य आहे. माधवाची उ-

* हा एकदम झालेला शोकावेग माधवाला तरी निदान अगदींच बावळटपणासारखा दिसतो.

त्कंठा, प्रेमालाप, शौर्याविर्भाव, व मागाहून मालती नाहींशी झाल्याचें कळतांच आलेलें औदासीन्य व निराशा यांचें फार चांगलें वर्णन केलें आहे. राजा भूरिवसु व नंदन यांचा संबंध थोडक्यांत पाहिजे तितकाच गौणरीतीनें परभारें आणिला आहे. शुभाशुभ शकुनावर भवभूतीच्यावेळीं विशेष भर होता असें दिसतें. एकंदरींत नाटक या नात्यानें हा अंक चांगला साधला आहे.

दोघां ब्राह्मणाच्या मुलांनीं राजाचे सर्व चौकीदार व बरीचशी फौज यांची दाणादाण करून दिली ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. नाटकांतील खऱ्या संविधानकाच्या मानानें पाहतां हें प्रकरण याच अंकांत सर्वांच्या भेटी होऊन संपविलें असतें तर कांहीं वावगें नव्हतें. पुढील भाग फाजील व असंभाव्य आहे. ]

## अंक नववा.

मागील अंकाच्या शेवटीं सौदामिनीचें नांव उपोद्घातादाखल द्व्यर्थानें मकरंदानें घेतलें होतें. या अंकांत कपालकुंडलेनें मालतीला मारण्याकरितां श्रीपर्वतावर नेलें होतें, तिला सौदामिनीनें सोडविलें, व तिच्या तोंडून माधव व मकरंद यांच्याविषयीं सर्व हकीकत समजून घेतली. मालतीच्या विरहानें माधवानें भलतेंच कांहीं आरंभिलें असेल, त्याचा प्रतीकार करण्याकरितां म्हणून मालतीकडून खुणेकरितां बकुलमाला घेऊन ती प्रथम पद्मावतीस आली. मालतीचा संबंध असलेल्या प्रदेशाचें माधवाला दर्शनसुद्धां असह्य झालें असल्यानें तो आणि त्याचे सर्व सुहृद्वर्ग जवळच्या निबिड अरण्यांत भटकत असल्याचें तिला कळलें. तेव्हां ती त्यांचा शोध करीत तिकडेच चालली. वाटेंत श्रीपर्वताहून योगसामर्थ्यानें आकाशमार्गानें येत असतांना आपली स्थिति कशी झाली व आपल्याला काय काय दृष्टीस पडलें याचें तिनें वर्णन केलें आहे. या वर्णनांत आलेल्या गोष्टींवरून पद्मावतीचा पक्का स्थलनिर्देश होण्याला उत्तम साधन आहे. ती इतक्या वेगानें आकाशमार्गानें चालली होती कीं, गिरि, नगर, ग्राम, नद्या, अरण्यें इत्यादिकांनीं व्याप्त असलेला खालचा सर्व प्रदेश एकदमच तिच्या डोळ्यांपुढें उभा राहिला होता. ती मागें पाहून म्हणाली–' स्वच्छ जलानें पूर्ण व विशाल अशा सिंधु[1] व पारा[2] या नद्यांच्या पात्रांनीं जसा या पद्मावतीला घेरा दिला आहे. उंच उंच राजवाडे, मंदिरें, गोपुरें आणि अटाऱ्या यांनीं आकाश भेदून जाऊन नदीजलरूपानें खालीं पडलें आहे असें दिसतें. तसेंच या लवणानदीच्या जलाला किती सुंदर लाटा येत आहेत. हल्लीं अभ्रें येऊं लागलीं आहेत ! अशावेळीं तिच्या तीरावरील हिरव्याचार जमिनीवर आनंदानें व हळू हळू च-

१ सिंधुनदी सिरोज जिल्ह्यांत निघून उत्तरवाहिनी होऊन पुढें कांहींशी पूर्ववाहिनी झाली आहे. व ती शेवटीं चंबळनदीस पंचनद गांवाजवळ मिळाली आहे. इच्या किनाऱ्यावर मोठासा गांव नाहीं. ती बहुतेक डोंगर व पहाड यांच्यांतून वाहते. इची लांबी सुमारें २५० मैल आहे.

२ पारा (पार्वती–छोटीपार्वती ). ही नदी सिप्रीच्या पश्चिमेस पोहोरी जाहगिरींत भटनागर गांवाजवळ निघाली आहे. व पूर्व आणि उत्तर वाहिनी होऊन पदमपूर पवायाजवळ सिंधुनदीस मिळाली आहे. इला मोहना गांवाजवळ एक मोठासा पूल मुंबई-आग्रा सडकेवर बांधलेला आहे, व जवळच उमेदगडाजवळ एक चांगला धबधबा आहे. लांबी सुमारें ७५ मैल आहे.

रत असलेल्या गाभण्या गायी किती तरी सुरेख शोभताहेत.' तसेंच पुढें पाहून ती ह्मणाली, 'हा पहा, जणुं पाताळाचा भेद करणारा, सिंधुनदीचा धबधबा. नव्या व भारावलेल्या मेघांच्या गर्जनेप्रमाणें सजल व प्रचंड असा हा त्याच्यापासून निघणारा आवाज आसपासच्या पर्वतांच्या निकुंजांतून प्रतिध्वनित होत्साता हेरंबाच्या कंठापासून निघणाऱ्या गंभीर गर्जनेचें अनुकरण करीत आहे.'

[ पद्मावतीजवळ सिंधुनदी दक्षिणेकडून उत्तरेकडे वाहते. गांवाखालींच पारा—पार्वती—नदी पश्चिमेकडून येऊन मिळाली आहे. तिच्यापलीकडे सुमारें ३ मैल उत्तरेस लवणा—नोन—नदी पश्चिमेकडून येऊन मिळाली आहे. नोन नदीला जागजागीं लहान लहान धबधबे आहेत. पद्मावतीच्या दक्षिणेस सुमारें २॥ मैलांवर सिंधुनदीचा धबधबा आहे. यावरून सौदामिनी पद्मावतीवरील आकाशभागांत दक्षिणेकडे धबधब्याकडे तोंड करून चालली होती असें दिसतें. या मानानें 'पश्चात् व अग्रतो—अवलोक्य' असें लिहिलें आहे तें वस्तुस्थितीशीं उत्तम जुळतें. तसेंच पुढें मधुमतीसिंधुसंगमावर असलेल्या सुवर्णबिंदु नांवाच्या शिवलिंगाचाही उल्लेख आहे. ही मधुमती—महोवर—नदी धबधब्या जवळच पूर्वेकडून येऊन मिळाली आहे. या सर्व नैसर्गिक गोष्टी हल्लीं जशाच्यातशाच कायम आहेत. ]

आसपासच्या अरण्यांत, चंदन, अश्वकर्ण, सरल व पाटल व मालूर इत्यादि वृक्षांची गर्दी असून त्यावेळीं मालूराला (रानबोरें?) बहार आला होता, व त्याचा घमघमाट सुटला होता. यांतील चंदनवृक्ष मात्र हल्लीं या जंगलांत नाहींत. हें नांव कदाचित् कवीनें अतिशयोक्तीनें घातलें असेल; किंवा त्यावेळीं ते वृक्ष तेथें असतील. हा सर्व प्रदेश व तेथील सर्व प्रकार पाहून सौदामिनीला कदंब, जंबू वगैरेच्या निबिड वनांनीं युक्त व गोदावरीच्या भयंकर पात्रानें व्याप्त आणि निनादित अशा दक्षिणारण्य पर्वताच्या प्रदेशाचें स्मरण झालें. ( तिकडील व इकडील पर्वतप्रदेशांत फरक वृक्षविशेषांचा आहेच. शिवाय तिकडील दगड काळा व जमीन सुपीक व हवेंत गरमी कमी, व इकडे जमीन कमकस, रेताड, व पिंवळट हलकी असून गरमी फार, हा आहे. सिंधु व मधुमती यांच्या संगमावर सुवर्णबिंदु नांवाचें स्वयंभू शिवलिंग होतें व त्याची भवभूतीच्यावेळीं फार प्रसिद्धी होती असें दिसतें. हल्लीं त्याचें तितकें माहात्म्य नाहीं. त्याचें सौदामिनीनें फार सुरेख व थोडक्यांत स्तवन केलें आहे. तेथून थोडेंसें पुढें एक उंच पर्वतशिखर होतें, त्याच्यावर व आसपास मयूर नृत्य करीत होते, व शकुनि आणि शर्वल इत्यादिकांनीं घरटीं केलीं होतीं, यामुळें तें पर्वतशिखर फारच सुरेख दिसत होतें. तसेंच त्या सर्व प्रदेशांतील गुहेंत मत्त आश्वल बसून जो भयंकर शब्द करीत होते तो मेघनादाप्रमाणें वाटत होता, व इभ हत्तींनीं खाऊन चावून टाकलेल्या शल्लकीचा शीतकर, कडवट व तुरट असा उग्र वास सुटलेला

३ लवणा—लोण—ही लहानशी नदी मुंबई—आग्रा सडकेवरील पन्यावर गांवाजवळून निघून पूर्ववाहिनी होऊन पवायाजवळ विजेपूर येथें सिंधुनदीस मिळाली आहे. लोहागडाजवळ एक धबधबा आहे.

४ मधुमती—महोवर, ही लहानशी नदी रणोद परगण्यांतील महुवा तेरई गांवाजवळून निघून उत्तर व पश्चिम वाहिनी होऊन धोमेश्वराजवळ सिंधु नदीस मिळाली आहे. इच्या आसपास उथडीस रमणीय अरण्य आहे, व पुष्कळशीं प्राचीन व जीर्ण देवालयेंही आहेत.

होता. * ( प्राचीनकाळीं या भागांतील वनप्रदेशांत हत्ती असत. सुमारें ३०० वर्षांपूर्वी देखील अकबर बादशाहानें याच्याजवळच नरवर व सिप्रीच्या जंगलांत हत्तीची शिकार केल्याविषयीं अकबरनाम्यांत वर्णन आहे. ) यावेळीं भर दुपार झाली होती. नदीतीरावरील वनप्रदेशांतील पक्षिविशेषांच्या कृतीचें फार सुरेख वर्णन केलें आहे. ( हें सर्व वर्णन याठिकाणीं नाटकाच्या संविधानकाच्या मानानें अनावश्यक व गौण आहे. या भाषणांतील पहिला गद्यात्मक भाग व शेवटचें वाक्य इतकेंच पुढील संबंध जुळविण्याला पुरे होतें. पण मोठमोठीं अप्रस्तुत वर्णनें करण्याची भवभूतीला मोठी हौस व ती करण्याची त्याची शैलीही अप्रतिम आहे. हें वर्णन स्थलनिर्देश होण्याला फार उपयोगाचें आहे. यामुळें अप्रस्तुत असलें तरी एक दृष्टीनें तें फार महत्त्वाचें आहे. ) इतकें सर्व वर्णन करून सौदामिनी माधव व मकरंद यांचा शोध करून त्यांचें सांत्वन करण्याला निघून गेली. ( या सौदामिनीच्या पात्राची कल्पना तरी शाकुंतलांतील साहाव्या अंकांतील सौदामिनीवरूनच कांहींशी घेतली असावी. )

यानंतर शोकाकुल व कांहींसे मोहित झालेले असे माधव व मकरंद तेथें आले. मकरंद आपल्या त्यावेळच्या स्थितीचें वर्णन करीत ह्मणाला, ' आमची अवस्था विलक्षण झाली आहे. आमची आशा सफल होत नाहीं व नष्टही होत नाहीं. चित्त क्षुब्ध होत्सातें मोह व निबिड अंधकारांत निमग्न होतें. हल्लीं कांहीं एक करितां येत नाहीं. या संकटावस्थेंत आह्मी केवळ पशूसारखे विधीच्या उलट्या फेऱ्यांत सांपडून भ्रमण करीत आहों. '

माधव ह्मणाला, ' प्रिये मालती, तूं आहेस तरी कोठें ? अशी एकाएकीं कोठें नाहींशी झालीस ? हे निष्ठुरहृदये, कृपा कर ! मला एकदां भेट ! या तुझ्या प्रिय माधवावर अशी रुष्ट कां झालीस ? अगे, तुझ्या कंकणयुक्त करग्रहणानें पूर्वी आनंदित झालेला तोच मी. ‡ गड्या मकरंदा, तिच्यासारखा खरा व निस्सीम स्नेह खरोखर पुन: या जगांत कसचा दृष्टीस पडतो ! तिनें अत्यंत दारुण असा मदनाचा दाह मुकाट्यानें सोसला व शेवटीं आपला प्राण तृणासारखा समजून तोही देण्याला तयार झाली, आणि करार्पणाचें साहसही केलें. याहून अधिक कोण काय करणार ! ' ( अशा तऱ्हेनें पूर्व कृति व स्थिति आठवून माधवानें पुष्कळ शोक केला. तो उत्तररामचरित व विक्रमोर्वशी यांतील राम व पुरूरवा यांच्याच शोकासारखा बहुतेक आहे. बरेचसे श्लोक या नाटकांत एकसारखे मिळतात. कांहीं ठिकाणीं दोन किंवा एकेक चरण सारखे मिळतात व बऱ्याच ठिकाणीं कल्पना सारख्या आहेत. पण कांहीं कांहीं शब्द भिन्न आहेत. मालतीमाधव व उत्तररामचरित यांतून प्रथम कोणचें नाटक कवीनें रचिलें याविषयीं विचार करून पाहतां, मालतीमाधव पूर्वावस्थेंत रचिलेलें दिसतें. पण श्लोक किंवा श्लोकार्ध सारखे आहेत, ते प्रथम मालतीमाधवाच्या वेळीं रचले किंवा उत्तररामचरिताच्या वेळीं रचिले, याविषयीं विचार करितां, ते उत्तररामचरिताच्या

* हे दोन्ही श्लोक उत्तररामचरित, अंक २, व महावीरचरित अंक ५ यांतही आहेत.

‡ अशाच अर्थाचे चरण उत्तररामचरित अं० ३ यांत आहेत.

वेळीं रचून, मालतीमाधवांत प्रसंगविशेषीं कवीनेंच सामिल केले असावेत.)

त्यावेळीं ऐन दुपार झालेली होती, व ऊन्ह फार प्रखर पडलें होतें. माधवाची तशी ती अवस्था पाहून मकरंदानें त्याला पद्मसराच्या तीरावर थंडशा जागीं थोडावेळ बसावयास सांगितलें. त्या सरोवरांत पुष्कळशीं कमळें फुललेलीं होतीं व त्यांच्यावरून सुगंध व शीतल वारा वहात होता. (हें पद्मसर हल्लींच्या पवाया गांवाहून धुमेश्वरास जातांना उजव्या बाजूस एक बराच मोठा तलाव लागतो, तेंच असावें. कारण दुसरा कोणचाही तलाव आसपास दिसत नाहीं. हल्लीं या तळावांत नेहमीं पाणी असतें असें नाहीं. त्याची कित्येक वर्षांत मुळींच दागदुजी झालेली नाहीं, तरी हा गांव चांगला आबाद असतांना व सुमारें २५०।३०० वर्षांपूर्वींही, हा तलाव चांगल्या रमणीय स्थितींत असावा, असें हल्लीं त्याच्या तीरावर चारपांच मोठ्या व प्राचीन मुसलमानी कबरी आहेत, त्यांवरून वाटतें.) त्या थंडगार वाऱ्यानें तरी माधवाला कांहींसें समाधान होईल असें समजून मकरंदानें त्याला तेथें नेऊन बसविलें. त्याचें मन दुसरीकडे लागावें ह्मणून त्यानें त्या तलावाच्या आसपासच्या प्रदेशाच्या सौंदर्याचें वर्णन चालविलें—(हा श्लोक उ. रा. च. अं. १ यांत आहे.) हें ऐकतांच माधव झट्कन् उठून त्याच्याकडे मुळींच लक्ष न देतां निघाला; तेव्हां मकरंदाला आश्चर्य व वाईट वाटलें व तो त्याच्या मागें गेला. त्यानें पुनः एकंदर वनाच्या निरनिराळ्या शोभेचें बरेंचसें वर्णन केलें. तें सर्व ऐकून घेऊन माधव ह्मणाला, 'मित्रा, हें सर्व मी पाहतों आहें. पण यावेळीं तें पाहून आनंद व्हावयाच्या ऐवजीं अधिक शोक मात्र होतो. हल्लीं ऐन पावसाळा सुरू होण्याचे दिवस, सर्व दिशा फारच रमणीय दिसताहेत. थंडसा वारा सुटला आहे, व मयूर मत्त होत्सातें नृत्य करित आहेत. ही वेळ माझ्या प्रिय मालतीच्या विरहांत मी कशीबरें काढूं? हाय हाय! आतां मी काय करूं?'

त्याची ती अत्यंत शोकाकुल स्थिति पाहून, त्याच्याशीं विनोद करण्याचा यत्न केल्याबद्दल मकरंदाला वाईट वाटलें. व तो 'आतां हा माधव आपल्या कसचा हातीं लागतो? ती आशाच सुटली ह्मणावयाचें!'—इतकें बोलतो तोंच माधव मूर्छित झालेला पाहून तो पुनः ह्मणाला, 'मालती, हा काय तुझा निष्ठुरपणा! तूं याच्या करितां केवढें साहस करण्याला तयार झालीस! पण आतां त्याचा कांहींच अपराध नसतांना त्याच्याशीं हें असें निष्ठुरपणाचें वर्तन? याला काय ह्मणावें?' माधव सावध होत नाहीं असें पाहून तर तो फारच घाबरला व मोठ्यानें विलाप करूं लागला. त्याचे सर्व गुण आठवून-'असा चांगला मित्र मला कोठून मिळणार? माधवा, पुनः मला एकदांतरी भेट! सावध हो!' असें अतिशय करुणस्वरानें ह्मणूं लागला. (यांतील दोन श्लोक उत्तररामचरित अंक ३ यांत आहेत.) त्यानें माधवाला स्पर्श केला तेव्हां माधव थोडासा शुद्धीवर आला. हें पाहून मकरंदाला मोठा आनंद झाला (शीतवायूच्या स्पर्शानें तो शुद्धीवर आला याचें वर्णन अप्रस्तुत, दीर्घ, समासयुक्त, मोठ्या थोरल्या प्रौढशब्दप्रचुर वाक्यानें केलें आहे.) 'वाः हा शुद्धीवर आला यामुळें सर्व जग पुनः निर्वंत झालें असें मला वाटतें—' असें तो ह्मणाला.

माधवानें शुद्धीवर येतांच, मालतीकडे निरोप घेऊन दूत कोण पाठवावा असें ह्मणून, समोरच एक गिरिशिखरावर घन व कृष्णवर्ण असा

त होता, त्याचें वर्णन करून त्यालाच
न व त्याला उद्देशून 'मालतीला माझी
या जाऊन कळीव' या अर्थाचे दोन
मेघदूतांतील श्लोकांसारखेच, ह्मटले
पहिला श्लोक ह्मटल्यावर मेघगर्जना
आपली विनंती मान्य केल्याबद्दल
हुकार भरला, असें समजून माधवानें
श्लोक ह्मटला. तो मेघदूतांतीलच
तो मेघ दिसेनासा झाला, तेव्हां मा-
गा नादाला लागला.

ाची अवस्था पाहून त्याला खास ढ-
ा असें मकरंदाला वाटलें, व 'हे
अहो बाबा-आई! कसें तरी याचें रक्ष-
असें ह्मणून तो पुन: शोक करूं लागला.
पुन:, 'या वनप्रदेशांत सर्व वन्य-
ाणी यांनीं मालतीचे विभाग करून
निरनिराळे गुण स्वत: हवे तसे वांटून
तिला मारून टाकिलें! आतां ती क-
स पडते! हाय हाय!' असें ह्म-
पुन: मूर्छित झाला. (ही कल्पना
न करण्याचा प्रकार विक्रमोर्वशीतून
आहे.)

बालमित्र अशा प्रकारें नष्ट झालेला
ापलें कठीण व हतभागी हृदय फाटत
वें मकरंदाला फार दुःख वाटलें.

त माधव पुन: शुद्धीवर आला व
यानें ह्मणाला, 'या जगांत एकसा-
अनेक वस्तु उत्पन्न करणें विधात्या-
कठीण नाहीं. हे पर्वत व अरण्यवासी
हो! माझी तुह्मांला हात जोडून विनं-
ी कृपा करून ऐका. तुह्मी माझी प्रिया,
र कोणी पाहिली असली किंवा
झालें तें तुह्मांला ठाऊक असलें, तर
कृपा करून सांगा. तिचें वय व अवस्था वि-
चाराल तर तिच्या सर्वांगांत मुग्ध व हृदयांत
प्रगल्भ असा मदन मुसमुसतो आहे.'
त्याच्या बोलण्याकडे अर्थातच कोणीही लक्ष
दिलें नाहीं. मोर आपल्याच ऐटींत नाचत व
ओरडत होता; मत्त चकोर आनंदित चकोरीच्या
मागें लागलेला होता; व वानर कौतुकानें आपल्या
प्रियेच्या गालावर फुलांचा पराग लावीत-फेकीत-
होता. असे सर्व आपापल्या उद्योगांत होते.
अशा वेळीं त्यांच्याजवळ प्रार्थना करून व्यर्थ;
पण हें स्वार्थी पुरुषाच्या लक्षांत येणार कोठून?
याचप्रमाणें माकड व हत्ती आपापल्या प्रियां-
शीं निरनिराळे विहार करीत होते. त्यांचेंही
वर्णन केलें आहे. (हा सर्व भाग विक्रमोर्वशी
मधून घेतलेला आहे. श्लोकांचा बराचसा भाग
व बहुतेक कल्पना अगदीं त्यांतून घेतलेल्या
आहेत.) त्यांना सोडून माधव दुसरीकडे वळ-
ला. तों एक महागज पुष्कळशा हत्तिणींसहित
तळावांत स्नान करीत होता. त्याला पाहून त्याचें
त्यानें चांगलें पण नाटकांत न शोभणारें असें
लांबलचक वर्णन केलें आहे; व त्याला आप-
ल्या प्रियेच्या प्रेमप्रसाधनाविषयीं कांहीं कांहीं
उपदेश केला. पण त्याचें आपल्या बोलण्याकडे
मुळींच लक्ष नाहीं असें पाहून आपण वेड्या-
सारखें या पशूला प्रियसखा समजून भाषण
करितों हें काय? असें भाषण मकरंदाशीं कर-
णेंच योग्य.' असें ह्मणून तो शुद्धीवर आला.
व त्याला उद्देशून ह्मणाला, 'मित्रा मकरंदा,
तुझ्या व त्या प्रिय मालतीच्या सुखकर सहवासा-
शिवाय जाणारा दिवस व ती शोभा व सर्व
कांहीं यांना धि:कार असो!'

आपण समक्ष उभा असूनही माधव कसा
तरी शुद्धीवर येऊन आपल्याला उद्देशून, पण

## ' मोहिनी. '

प्रसिद्ध चित्रकार रविवर्मा यांच्या हातचें व त्यांच्याच छापखान्यांत छापलेलें हें सुबक रंगीत चित्र आहे. याची लांबी रुंदी ३६ × २४ इंची आहे. श्री रविवर्मा यांचें नांव आजकाल चित्रकलेच्या नैपुण्याविषयीं प्रख्यात आहे. यांच्या देखरेखीखालीं छापलेलीं सर्वच चित्रें फार सुबक असून रमणीय आहेत. मुळीं चित्रकलाच रमणीय; त्यांत कारागीर निपुण असून मार्मिक व रसिक असला ह्मणजे चित्रांच्या रमणीयत्वाची कमाल व्हावी व प्रस्तुतच्या श्री रविवर्मा यांच्या रमणीय चित्रांसारखीं चित्रें उदयास यावीं यांत नवल नाहीं. हें चित्र प्रत्येक धनिकानें तरी आपल्या संग्रहीं ठेवण्यासारखें आहे.

प्रस्तुत चित्र–मोहिनी–हें आपल्या नांवाप्रमाणेंच द्रष्ट्याचें मन मोहित करणारें आहे. समुद्रमंथनाच्या वेळीं श्रीविष्णूंनीं मोहिनीरूप धारण केलें, त्यास अनुलक्षून एका सुंदर स्त्रीची आंदोलनक्रीडा येथें खुबीनें वर्णिली आहे.

वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी यांनीं या चित्राचा हक्क विकत घेतला आहे. त्यांत त्यांचा कांहीं व्यापारी उद्देश असेल; परंतु या गोष्टींत त्यांची मार्मिकता आणि रसिकताही व्यक्त होते असें ह्मणणें वावगें होणार नाहीं. वैद्य मणिशंकरजी हे स्वतः चांगले रसिक कवि असून त्यांच्या, काव्यालंकारप्रचुर ' मुक्ता ' नामक कादंबरीची आह्मी पूर्वींच वाचकांस ओळख करून दिली आहे. अशा मार्मिक व रसिक गृहस्थांनीं श्री रविवर्मा यांच्या चित्रकलेविषयीं अभिरुचि प्रकट केलेली पाहून

**कविः करोति काव्यानि पोषको रसिको जनः ।**

याची कोणासही आठवण झाल्यावांचून राहणार नाहीं.

प्रस्तुत चित्राची किंमत ४ रुपये आहे. परंतु वैद्य मणिशंकरजी यांचीं ४ रुपयांचीं औषधें घेणारांस किंवा ४ रुपये किमतीची **मुक्ता** कादंबरी घेणारांस तें बक्षिसादाखल मिळतें. यामुळें रुग्ण आणि कादंबरीप्रियजनांस, ते साधारण गरीब स्थितींत असले तरी, या निर्दोष करमणुकीचा लाभ घेतां येईल असें आह्मांस वाटतें. दुसरींही लोको पयोगी पुस्तकें प्रसिद्ध करून ते स्वल्प किमतींत लोकांस देत असतात. स्वार्थ साधून परार्थ साधण्याचा मणिशंकरजी यांचा हा उद्योग स्तुत्य आहे. मोहिनी हें चित्र आह्मांस नजर पाठविल्याबद्दल मणिशंकरजींचे आह्मी आभारी आहों.

---

## " बंगाल्यांतील जमीनदारी वहिवाट. "

**ग्रंथकार—रावसाहेब विष्णु मोरेश्वर महाजनी, एम्. ए.**

"ही जमीनदारी वहिवाट सर्व हिंदुस्थान देशांत चालू व्हावी ह्मणून एतद्देशीय वर्तमानपत्रांत व राष्ट्रीय परिषदेंत वारंवार प्रतिपादन केलें जातें. परंतु त्याबद्दल यथार्थ सविस्तर माहिती फारच थोड्यांस असल्यामुळें या प्रतिपादनाचा व्हावा तसा उपयोग होत नाहीं. ही उणीव हल्लींच्या पुस्तकानें दूर होईल.—" नामदार **माधवराव गोविंद रानडे, जज्ज,** मुंबई हायकोर्ट.

पृष्ठसंख्या डेमी द्वादशपत्री ३५०; किंमत रु० १। ; टपाल खर्च २ आणे.

पुस्तकें काळबादेवी रस्त्यावर **विविधज्ञानविस्तार** पुस्तकालयांत विकत मिळतात.

॥ श्रीः ॥

# विविधज्ञानविस्तार.

## A MONTHLY MAGAZINE

OF

## MARATHI LITERATURE

FOR

Ladies and Gentlemen.

कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरितां.

पुस्तक ३०. आक्टोबर १८९९. अंक १०.

| विषय. | अनुक्रमणिका. | पृष्ठ. |
|---|---|---|



मुंबईंत

गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत छापिलें.

वर्षाची वर्गणी रुपये ३; टपालखर्च आणे ६

## वर्गणीदारांस सूचना.

आपल्याकडील आश्रयाची रक्कम लौकर पाठवून देण्याविषयीं लैब्ररींचे सेक्रेटरी आणि इतर आश्रयदाते यांस विनंती आहे. पुस्तकाच्या छपाईसंबंधानें वगैरे किती खर्च येतो याचा जर आमचे आश्रयदाते विचार करितील तर वारंवार सूचना करण्याचें आह्मांस कारण पडणार नाहीं.

---

# पोंच.

१. राजकन्या लुप्सुंज हिचा वृत्तांत व धर्म—या राजकन्येचा जन्म मध्य एशिया पलीकडील डोंगराळ प्रदेशांत झाला, आणि त्याच्या आजूबाजूसच इच्या धर्मांचे अनुयायी आहेत. इचें चरित्र व तत्प्रणीत धर्मांचा या पुस्तकांत दिलेला इतिहास हीं वाचल्यानें ज्ञान आणि मनोरंजन हीं प्राप्त होतील. हें पुस्तक रा. रा. **भगवंत हरी खरे** यांनीं लिहिलें.

---

२. गीता–ज्ञानेश्वरी–रहस्य––या पुस्तकांत ज्ञानेश्वरीच्या ९ अध्यायांतील वेंचे दिले आहेत आणि 'प्रत्येक पानावर डाव्या बाजूला मूळ ज्ञानेश्वरींतील ओंवी दिली असून उजव्या बाजूस साधतां आला तितका अर्थसंबंध राखून प्रस्तुत पद्धतीला रुचेल अशा प्रकारची भाषारचना करण्याचा यत्न केला आहे.' रा. रा. **नारायण हरि भागवत** यांच्याकडे या पुस्तकाचें कर्तृत्व आहे. ज्ञानेश्वरी समजून घेण्यास या पुस्तकापासून बराच उपयोग होईल.

---

३ निर्णयसागर छापखान्यांतून सालाबादप्रमाणें १९०० सालची रोजनिशी आह्मांस नजर आली आहे, आणि दरवर्षाप्रमाणेंच ती सुरेख आणि टिकाऊ आहे. आरंभी व्यवहारांत उपयोगी पडणारी माहिती दिली आहे. उपयुक्त आहे.

---

४. प्लेग हें काय आहे व त्याची बाधा न होण्यास उपायः—हें छोटेखानी पुस्तक रा. रा. **वामन बाबाजी** महाजन–प्रवास गृहवैद्य पेटीचे कर्ते, याणीं फुकट वांटण्यासाठीं छापविलें आहे. एक वेळ वाचून पाहावें.

---

५. **मोहनेची आंगठी**––Merchant of Venice या शेक्सपियरच्या नाटकाच्या आधारानें रा. रा. **द. गो. लिमये** यांनीं लिहिलें आहे.

---

६. भगिनीप्रेम अथवा कामांध राजपुत्र नाटक––हें नाटक मूळ इंग्रजी कादंबरीवरून रा. रा. **भास्कर हरी पटवर्धन,** मिरज, यांनीं लिहिलें.

हीं पुस्तकें पाठविल्याबद्दल पाठविणारांचे आह्मी आभार मानितों.

---

श्री.

विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ३०. अंक १०.

## बेकन्‌चे निबंध.

### धूर्तपणा.

धूर्तपणा ह्मणजे कुत्सित किंवा कुटिल शहाणपण असें आह्मी समजतों. आणि खरो-खर, धूर्त मनुष्य व शहाणा मनुष्य यांच्यांत मोठा भेद आहे तो प्रामाणिकपणाच्या संबधानेंच आहे असें नाहीं, तर हुशारीच्या संबंधानेंही आहे. कांहीं लोक असे असतात कीं, त्यांना गंजिफा लावतां येतात, पण चां-गलें खेळतां येत नाहीं; त्याचप्रमाणें कित्येक असे असतात कीं, आपल्या तर्फेचीं मतें जमविण्यांत व दुही करण्यांत ते पटाईत असतात, पण इतर कामीं ते कमकुवत अस-तात. पुनः, मनुष्यांची पारख असणें ही गोष्ट वेगळी व कामाची पारख असणें ही वेगळी; कारण पुष्कळ लोक मनुष्यांच्या स्वभावा-विषयीं निष्णात असतात, पण कामाचा खरा भाग समजण्यांत फारसे हुशार नसतात. ज्यानें पुस्तकांपेक्षां मनुष्यांचें अध्ययन अधिक केलेलें असतें तो अशा तऱ्हेचा मनुष्य असतो. असले लोक मसलती देण्यापेक्षां राबण्याला अधिक योग्य असतात. आणि ते आपल्या रींव बाबतींत काय ते चांगले असतात; नवी-न मनुष्यांशीं त्यांची गांठ पडली कीं त्यांचें निशाण चुकलें. ह्मणजे असें कीं, मूर्ख व शहाणा ओळखण्याचा जो जुना नियम कीं "अपरिचित लोकांमध्यें उभयतांना नग्न धाडा, ह्मणजे पहाल" तो त्यांना क्वचितच लागू पडतो. आणि ज्या अर्थीं हीं धूर्त माणसें किरकोळ जिनसा विकणाऱ्या बोहोऱ्यांप्रमाणें असतात त्याअर्थीं त्यांचें दुकान उघड करून दाखविण्यांत कांहीं गैर नाहीं.

ज्याच्याशीं तुह्मी बोलत आहां त्याच्या चेहऱ्यावर नजर ठेवणें ही धूर्तपणाची एक खुबी आहे; जेझुइट* लोक असेंच सांगत असतात. कारण पुष्कळ शहाणे पुरुष असे असतात कीं, त्यांचीं अंतःकरणें गुप्त अस-तात, पण त्यांचे चेहेरे पारदर्शक असतात. पण तुह्मी असें करतांना कधीं कधीं आपले डोळे मिस्किनपणानें खालीं लावा; जेझुइटही असेंच करतात.

दुसरी खुबी अशी कीं, जेव्हां तुह्मांला कां-हीं तरी तावडतोब पाहिजे, तेव्हां ज्यापासून तें मिळवायाचें असतें, त्याला दुसरीच एकादी गोष्ट काढून रंजवावें व खुष करावें; अशा-करतां कीं तुह्मी इष्ट गोष्ट काढिली ह्मणजे

* खिस्ती मठवाशांचा एक पंथ.

हरकती घेण्याला त्यानें देहभानावर फारसें असूं नये. माझ्या माहितीचा एक मंत्री व चिटणवीस होता. तो इंग्लन्डच्या एलिझाबेथ राणीच्या सह्या बिलांवर घ्यायाला आला ह्मणजे नेहमीं राज्यकारभाराची कांहीं तरी गोष्ट प्रथम काढून तिला भाषणांत गुंतवी; अशा करितां कीं, तिनें बिलांकडे फारसें लक्ष न पुरवितां सह्या कराव्या.

त्याचप्रमाणें मनुष्य घाईंत असला ह्मणजे कामाचा उपक्रम काढावाः कारण त्यावेळीं कामाचा पुरासा विचार करण्याची त्याला फुरसत नसते व तो बेफाम असतो.

एकादें काम दुसरा एकादा मनुष्य चांगल्या रीतीनें मनाप्रमाणें पार पाडील असा अंदेशा एखाद्याला असल्यास व तें हाणून पाडावें असें त्याच्या मनांत असल्यास, त्यानें असा बहाणा करावा कीं "असें होईल तर बरें;" आणि त्यानें त्या कामाचा स्वतःच उपक्रम काढावा, तो अशा रीतीनें कीं काम सिद्धीस जाऊंच नये.

तुह्मी एकाद्याशीं बोलत असलां आणि ऐन रंगांत आल्यावर, जणुं काय आपण सावध झालों असें दर्शवून तुह्मीं पुढचें भाषण एकदम बंद केलें, तर त्यामुळें अधिक जाणण्याची त्याची जिज्ञासा वाढते.

तुह्मी आपण होऊन एकादी गोष्ट सांगण्यापेक्षां, तुमच्याकडून ती प्रश्न करून काढून घेतली तर लोकांना बरें वाटतें; याकरतां तुमचा नेहमींचा जो चेहरा व चर्या असेल त्याहून निराळाच दाखवून प्रश्न करण्याला तुह्मी आमिष दाखवावें; अशाकरतां कीं, फरक होण्याचें कारण विचारण्याला दुसऱ्याला संधि मिळावी. याप्रमाणें नेहेमियास * यानें केलेंः "आणि त्यापूर्वीं राजापुढें मी इतका दुःखी कधीं झालों नव्हतों."

नाजूक व अप्रिय गोष्टींत कोणा तरी दुसऱ्या मनुष्याकडून, ह्मणजे ज्याचा शब्द कमी वजनाचा आहे अशाकडून, उपक्रम काढवावा, आणि ज्याचा शब्द अधिक वजनदारीचा आहे त्यानें मागें राहावें व थोड्या अवकाशानें यावें; जणुं काय तो अकस्मात् आला; अशा करतां कीं, पहिल्या गृहस्थानें जें सांगितलें त्याजबद्दल त्यास प्रश्न विचारण्यांत यावे. मेसालीना व सिलियस यांच्या लग्नाची बातमी क्लॉदियसाला सांगतांना नारसिससनें असेंच केलें.

ज्या गोष्टींत मनुष्याला आपलें अंग दिसूं नये असें वाटतें त्यांत जगावर हवाला द्यावा, ही एक धूर्तपणाची खुबी आहे; ह्मणजे असें ह्मणावें कीं "जग असें ह्मणतें" अथवा "चार चौघांच्या तोंडीं असें असें आहे."

माझ्या माहितीचा एक गृहस्थ होता, तो जेव्हां पत्र लिही तेव्हां महत्त्वाचा मजकूर ताजाकलमांत लिही; जणुं काय तो मजकूर किरकोळ होता!

---

* नेहेमियास हा एक ज्यू होता. तो पर्शियाच्या राजा आर्टाझरसेस याला मद्य देण्याच्या कामावर होता. यरूशालेम शहराच्या भिंती पडल्या व लोक मोठ्या विपत्तींत आहेत, हें ऐकून त्याला फार दुःख झालें. एके दिवशीं तो राजाला मद्य देण्याला गेला असतां, त्याचा चेहरा दुःखी पाहून राजानें त्याला कारण विचारलें. त्यानें सर्व हकीगत सांगितली. तेव्हां यरूशालेम येथें जाण्यास राजानें त्यास परवानगी दिली.

माझ्या ओळखीचा दुसरा एक गृहस्थ होता तो कांहीं बोलायाला आला ह्मणजे मनांतील मुख्य गोष्ट अजीबात गाळी, आणि निघून जाई, आणि पुन्हा परत येऊन ती गोष्ट सांगे; जणुं काय ती तो अगदीं विसरून गेला होता! कांहीं लोक अशी तजवीज करतात कीं, ज्याच्याशीं त्यांचें काम असतें त्यानें यांना आकस्मिक गांठावें; आणि तें अशा वेळीं कीं जेव्हां त्यांच्या हातांत एकादें पत्र असेल, किंवा नेहमींच्या परिपाठाबाहेरील कांहीं काम हे करीत असतील; अशाकरतां कीं, ज्या गोष्टी सांगायाला ते स्वतः उत्सुक असतात त्यांविषयीं त्यांना प्रश्न विचारण्यांत यावे.

धूर्तपणाची आणखी एक खुबी अशी आहे कीं, जे शब्द दुसऱ्यानें ऐकावे व उपयोगांत आणावे अशी इच्छा असेल ते मनुष्यानें स्वतःच बोलून दाखवावे; व ते दुसऱ्यानें उपयोगांत आणले ह्मणजे त्याचा फायदा घ्यावा. माझ्या माहितीचे दोन गृहस्थ होते, ते एलिझाबेथ राणीच्या वेळीं चिटण-विसाच्या जागेला उमेदवार होते; तथापि आपसांत ते सलोख्यानेंच असत, आणि कामाच्या संबंधानें एकमेकांशीं बोलत; त्यांपैकीं एक जण ह्मणाला कीं, राज्याच्या उतरत्या काळीं चिटणवीस होणें हें धोक्याचें काम आहे, व तें आपल्याला नको; दुसऱ्यानें लगेच ते शब्द उचलले; आणि तो आपल्या कित्येक मित्रांशीं असें बोलला कीं, राज्याच्या उतरत्या काळीं चिटणवीस होण्याची इच्छा धरण्याचें आपल्याला कारण नाहीं. पहिल्या गृहस्थानें तेंच पकडलें आणि तें राणीच्या कानावर जाईल अशी तजवीज केली; "राज्याचा उतरता काळ" हे शब्द राणीनें ऐकले तेव्हां तिला इतकें वाईट वाटलें कीं, ती त्या दुसऱ्या गृहस्थाची विनंती पुन्हा ऐकूनच घेईना.

धूर्तपणाचा एक प्रकार आहे त्याला आह्मी इंग्लन्डांत "तव्यावरची पोळी परतविणें" ह्मणतों. तो प्रकार असा कीं, जें एक मनुष्य दुसऱ्याला ह्मणतो, तें दुसऱ्यानें आपल्याला ह्मटलें असें तो करून दाखवितो. आणि खरें ह्मटलें तर जेव्हां असा प्रकार दोघांमध्येंच घडतो, तेव्हां पहिल्यानें कोण कोणाला बोलला हें ठरविणें सोपें नाहीं.

कित्येकांपाशीं इतक्या गोष्टी व कथा तयार असतात कीं त्यांना कांहीं जरी सांगायाचें असलें तरी तें ते गोष्टींत गुंफून देतात; यामुळें दोन हेतु साधतातः ते स्वतः सावध राहतात, व दुसरे त्यांचें ह्मणणें आनंदानें कबूल करतात. आपल्याला जें उत्तर पाहिजे तें मनुष्यानें आपल्याच शब्दांनीं व विधानांनीं बनवावें, ही धूर्तपणाची एक चांगली खुबी आहेः कारण त्यायोगानें दुसरा मनुष्य कमी घोंटाळ्यांत पडतो.

कित्येक मनुष्य आपल्या मनांतील हेतु बोलून दाखविण्याकरतां कितीवेळ तरी वाट पहातात; आणि संधि आली ह्मणजे इच्छित गोष्ट सोडून ते कितीतरी लांब जातात; आणि तिच्याकडे वळण्यापूर्वी दुसरे किती तरी विषय काढतात! हें पाहून नवल वाटतें. असें करणें मोठ्या दमाचें काम आहे, तथापि तें फार उपयोगी आहे.

एकादा आकस्मिक, धिट्टाईचा, व अकल्पित प्रश्न विचारल्यानें मनुष्य अनेकदा भान

विसरतो आणि त्याचें खरें स्वरूप बाहेर पडतें. एक मनुष्य आपलें नांव बदलून सेंटपॉल्स मधून चालला होता; दुसरा एक त्याच्यां पाठीमागून अकस्मात् आला आणि त्यानें त्याला त्याच्या खऱ्या नांवानें हाक मारली; त्यासरशी त्यानें झटकन् मागें फिरून पाहिलें.

पण धूर्तपणाचे हे लहानसहान प्रकार व अल्प खुब्या असंख्य आहेत; त्यांची एक यादी केली तर चांगलें होईलः कारण धूर्त लोक शहाण्यांत गणले जावे, यापेक्षां राज्यांत अधिक अहितकर दुसरें कांहीं नाहीं

पण खरोखर कित्येक असे असतात कीं कामाचे डावपेंच त्यांना माहित असतात, पण मुख्य भागांत त्यांचा शिरकाव होऊं शकत नाहीं. जसें, एकादें घर असतें, त्याला सोईस्कर जिने व दरवाजे असतात, पण आंत चांगलीशी एकही खोली नसते, त्याप्रमाणें. ह्मणून तुह्मांला असें आढळेल कीं, सिद्धांतामध्यें ते छानदारशा पळवाटा शोधून काढतील, पण विषयांचें परीक्षण करण्यास किंवा ऊहापोह करण्यास ते बिलकुल समर्थ नाहींत. तथापि सामान्यतः ते आपल्या असमर्थपणाचाच फायदा घेतात व आपण वाट दाखविण्याच्या कामीं पटाईत आहों असें भासवितात. कित्येक लोक स्वतःच्या कृतीच्या निकोपपणापेक्षां दुसऱ्याचे दोष काढण्यांत व ( आपण हल्लीं ह्मणतों तसें ) त्यांच्या खोड्या काढण्यांत कर्तबगारी समजतात; पण सालोमन ह्मणतो—; "शाहणा आपल्या पावलांकडे लक्ष देतो; मूर्ख लबाड्यांकडे वळतो."

## राज्यें व संस्थानें यांचा खरा मोठेपणा.

आथेन्सचा रहिवासी थेमिस्टोक्लीस याचें भाषण उद्धटपणाचें व गर्वाचें होतें; कारण त्यांत त्याची स्वतःची फुशारकी होती. पण तें सामान्यपणें दुसऱ्यांस लागू केलें असतें तर गंभीर व शहाणपणाचें झालें असतें. एका मेजवानीच्या प्रसंगीं त्याला किनरी वाजविण्याविषयीं विनंती करण्यांत आली. तेव्हां तो ह्मणाला कीं, आपल्याला किनरी वाजवितां येत नाहीं, तरी पण लहान गांवाचें मोठें शहर बनवितां येतें. ह्या शब्दांवरून ( रूपकाच्या थोड्याशा साह्यानें ) राज्यकारभारांत राबणाऱ्या लोकांच्या अंगीं दोन भिन्न गुण असतात हें दर्शवितां येतें. कारण मंत्री व राजकार्यधुरंधर पुरुष यांचें जर खरें निरीक्षण केलें तर त्यांच्यांत असे सांपडतील ( पण क्वचित् ) कीं, त्यांना लहान संस्थान मोठें करतां येतें, पण किनरी वाजवितां येत नाहीं. आणि दुसऱ्यापक्षीं पुष्कळ असे आढळतील कीं, त्यांना किनरी मोठ्या कुशलपणानें वाजवितां येते, परंतु लहान संस्थान मोठें करण्याचें कसब त्यांच्यांत नसतें; इतकेंच नाहीं तर त्यांचा गुण उलट बाजूचा असतो; ह्मणजे त्यांना मोठ्या व भरभराटीच्या संस्थानाची धुळधाणी व मातेरें करतां येतें. आणि खरोखर, ज्या अधम युक्त्यांच्या व हिकमतींच्या योगानें पुष्कळ मंत्री व सुभेदार आपल्या धन्यांची मर्जी मिळवितात व बाजारबुणग्यांमध्यें मान्यता पावतात त्यांना "किनरी वाजविणें" यापेक्षां चांगलें नांव देतां येत नाहीं.

कारण त्या तितक्या वेळेपुर्त्या मनोरम वाटतात व त्या फक्त त्यांच्या स्वतःपुर्त्या साजऱ्या दिसतात. परंतु ज्या संस्थानची ते नौकरी करतात त्या संस्थानचें हित किंवा बढती त्यांपासून होत नाहीं. त्याचप्रमाणें असेही मंत्री व सुभेदार ( निःसंशय ) असतात कीं, ते कामांत हुशार असतात; कारभार चालविण्यास व धोक्यांपासून व उघड गैरसोईपासून बचाव करण्यास ते समर्थ असतात; तरी पण सत्ता, साधनें, व संपत्ति यांसंबंधानें राज्याची वाढ व वृद्धि करण्याची हुशारी त्यांच्यांत नसते. पण कारागीर कसेही असोत, आपण कामाच्या संबंधानें बोलूं. तें काम हें कीं "राज्यांचा व संस्थानांचा खरा मोठेपणा," व त्या मोठेपणाचे उपाय. हा विषय मोठ्या व बलिष्ठ राजांनीं हातांत घेण्यासारखा आहे: अशाकरतां कीं, आपल्या सैन्याची फाजील महति मानून त्यांनीं निरर्थक साहसकर्मांत शिरूं नये. किंवा दुसऱ्या पक्षीं त्यांची कमी योग्यता समजून त्यांनीं भित्रेपणाच्या व भागूबाईपणाच्या मसलती अंगीकारूं नयेत.

आकार व विस्तार यांसंबंधानें राज्याचा मोठेपणा मापतां येण्यासारखा आहे; आणि वसूल व जमा यासंबंधाचा मोठेपणा गणतां येण्यासारखा आहे. प्रजागणती हजिरीपटांवरून दिसेल; आणि शहरें व गांवें यांची संख्या व मोठेपणा नकाशांवरून दिसेल. तथापि राज्याचें सामर्थ्य व राज्याचें सैन्य यांची खरी किंमत ठरविणें व त्यांविषयीं बिनचूक अभिप्राय देणें, याच्या इतकें मुलकी कारभारांत दुसरें कोणतेंही काम कठिण नाहीं. आकाशाच्या राज्याची* तुलना एकाद्या मोठ्या गिराच्या अथवा कवठीच्या फळाशीं केलेली नाहीं, तर मोहरीच्या एका दाण्याशीं केलेली आहे. मोहरी ही धान्यांमध्यें अगदीं लहान आहे, पण जलद उगवण्याचा व पसरण्याचा तिच्यांत गुण व प्रवृत्ति आहे. याचप्रमाणें कांहीं राज्यें विस्तारानें मोठीं असतात; पण तीं वाढण्यासारखीं किंवा दुसऱ्यांवर अंमल करण्यासारखीं नसतात. आणि कांहीं कमी विस्ताराचीं असतात; पण तीं मोठमोठ्या राज्यांचे पाये होण्याच्या लायकीचीं असतात.

लोकांचें कूळ व अंगस्वभाव खंबीर व लढाऊ नसलीं तर तटबंदी शहरें, संपन्न युद्धद्रव्यागार व शिलेखाने, चांगले जातवंत घोडे, लढाईचे रथ, हत्ती, तोफा, तोफखाने, इत्यादि हें सर्व सिंहाचें कातडें पांघरलेल्या मेंढ्याप्रमाणें आहे. इतकेंच नाहीं तर जेथें लोक कमी शूर आहेत तेथें सैन्याच्या नुस्त्या संख्येंत कांहीं अर्थ नसतो. कारण ( व्हर्जिल ह्मणतो त्याप्रमाणें ) "मेंढे कितीही असले तरी लांडग्याला कधींही खातर वाटत नाहीं." आरबेलाच्या मैदानांत पर्शियन लोकांचें सैन्य ह्मणजे माणसांचा एवढा महान सागर होता कीं, आलेक्झांडरच्या सैन्यांतील सेनापति कांहींसे चकित झाले. ह्मणून ते त्याजपाशीं गेले आणि रात्रीच्या वेळीं त्यांजवर हल्ला करावा असें त्यास सुचविलें. पण त्यानें उत्तर केलें कीं, आपण चोरीनें जय मिळविणार नाहीं. आणि त्यांचा पराभव सहज झाला. आर्मीनियाचा तिग्रानीस ४००००० लोकां-

* ज्या स्थितींत सदाचरण व पुण्य व स्वर्गसुख असतें तिला बैबलांत 'आकाशाचें राज्य' असें ह्मटलें आहे.

निर्शी एका टेंकडीवर तळ देऊन राहिला असतां जेव्हां त्यानें रोमन लोकांचें १४००० सैन्य आपल्यावर चाल करून येत आहे असें पाहिलें, तेव्हां त्यानें थट्टा केली आणि ह्मणाला कीं, " हे समोर लोक दिसताहेत ते वकिलीकरतां येत आहेत ह्मणावें तर फारच अधिक आहेत; व लढाईला येत आहेत ह्मणावें तर फारच थोडे आहेत." पण सूर्य मावळण्यापूर्वींच अतिशय कत्तल करून त्याला पळ काढायाला लावण्याला ते पुरेसे होते, असें त्याला आढळून आलें. संख्या व शौर्य यांमध्यें मेळ नसल्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत; यावरून असें ठरवितां येईल कीं, कोणत्याही राज्यामध्यें मोठेपणाचा मुख्य मुद्दा ह्मटला ह्मणजे लोक लढाऊ असावे हा होय. ( पैसा हा लढाईचें बळ आहे असें सामान्यतः ह्मणतात ) पण जेथें लोक हीन व नामर्द असल्यामुळें त्यांच्या दंडांत बळ नसतें तेथें पैसा हा लढाईचें बळ नाहीं. कारण ( जेव्हां क्रीससनें बढाईनें आपलें सुवर्ण दाखविलें तेव्हां ) सोलननें क्रीससला चांगलें उत्तर दिलें कीं, " महाराज, जर आपल्याहून बलाढ्य असा दुसरा कोणी आला तर ह्या सर्व सुवर्णाचा तो धनी होईल." ह्मणून कोणत्याही राजानें किंवा संस्थानानें, आपल्या राज्यांतील लोक चांगले व शूर शिपाई नसल्यास, आपल्या सैन्यावर बाताबेताचाच भरंवसा ठेवावा. आणि दुसऱ्यापक्षीं ज्या राजांच्या प्रजा लढाऊ स्वभावाच्या आहेत त्यांनीं आपलें सामर्थ्य जाणून असावें; नाहीं तर स्वतःला अयोग्य असें वर्तन त्यांच्या हातून घडेल. भाड्याच्या सैन्यासंबंधानें इतकेंच सांगायाचें कीं, सर्व उदाहरणांवरून असें दिसतें कीं, जें कोणी संस्थान किंवा जो कोणी राजा त्यांच्यावर अवलंबून राहतो, त्यानें आपले पंख कांहीं काळपर्यंत पसरले तरी लवकरच ते गळून पडतील.

जूडा व इसाकर यांच्या धन्यता एका ठिकाणीं कधींही जुळणार नाहींत; ह्मणजे एकच राष्ट्र अथवा जनपद, सिंहाचा छावा व ओझीं वहाणारा गाढव, असें दोन्ही होणार नाहीं. किंवा, करांखालीं दडपून गेलेले लोक कधीं तरी शूर व लढाऊ होतील असें कधींही होणार नाहीं. हें खरें कीं, राष्ट्राच्या संमतीनें बसविलेले कर लोकांचें धैर्य कमी खचवितात: हें खालांटींतील * देशांच्या जकातींवरून चांगलें दिसतें; व इंग्लन्डांतील राजांना पार्लमेन्टकडून पैशाची कुमक मिळते तिजवरून कांहीं अंशीं दिसतें. कारण तुह्मीं हें लक्षांत ठेवा कीं, आह्मीं आतां अंतःकरणाच्या संबंधानें बोलत आहों; द्रव्यासंबंधानें नाहीं. ह्मणजे असें कीं, द्रव्याच्या संबंधानें पाहिलें तर खंडणी किंवा कर संमतीनें बसविला असला अथवा अधिकाराच्या जोरावर लादला असला, तरी अर्थ सारखाच; पण धैर्यावर त्याचा परिणाम वेगवेगळा होतो. यावरून तुह्मी असा सिद्धांत ठरवा की, ज्या लोकांवर करांचें ओझें वाजवीपेक्षां फाजील आहे ते राज्य करण्यास लायक नाहींत. ज्या राजांना मोठेपणाची हांव आहे त्यांनीं आपले उमराव व गृहस्थ यांची संख्या अतिशय जलद वाढूं न देण्याविषयीं खबरदारी ठेवावी. कारण ते

* बेलज्यम व हॉलंड यांना ' खालांटींतील देश ' ह्मणतात.

वाढले तर सामान्य प्रजाजन फक्त नांगऱ्या व नीच शेतखण्या होतो; त्याच्या अंतः-करणांत उत्साह राहत नाहीं; व तो खरोखर गृहस्थाचा मजूर होतो. जसें कृत्रिमवनामध्यें तुह्मीं आपले माच फार दाट ठेवले तर तुह्मांला स्वच्छ झुडपें कधींही मिळणार नाहींतः झांकर व जाळ्या मात्र मिळतील. तसें देशमध्यें जर गृहस्थ फार झाले तर सामान्य-लोक हीन होतील; व अशी स्थिति होईल कीं, शंभरांत एक देखील सैन्यांत शिरण्यास लायक होणार नाहीं; विशेषेंकरून पायदळांतः व पायदळ तर सैन्याचा जीवप्राण आहे. आणि या रीतीनें लोकसंख्या पुष्कळ पण बळ कमी, असें होईल. मी जें हें ह्मणतों तें इंग्लन्ड व फ्रान्स यांची तुलना केल्यानें चांगलें दिसेल; तसें इतरत्र दिसणार नाहीं. यांपैकीं इंग्लन्ड जरी विस्ताराच्या व लोकसंख्येच्या मानानें लहान आहे तरी फ्रान्सला पुरून उरलें आहे; याचें कारण इंग्लन्डांतील मध्यम वर्गांतील लोक चांगले शिपाई होतात, तसे फ्रान्समधील शेतकरी होत नाहींत. आणि यासंबंधानें सातव्या हेन्‍री राजाची युक्ति खोल व वर्णनीय होतीः त्यानें मळे व कृषिकर्माचीं घरें नमुनेदार केलीं होतीं; ह्मणजे शेतकऱ्यांना प्रजा उत्पन्न करण्यास व दासस्थितींत न राहातां सुखसमृद्धीनें राहण्यास जितकी जमीन पाहिजे तितकी त्यांना दिली होती; आणि मालकांच्या हातांत नांगर राहील, तो केवळ भाड्यानें आणलेल्या मजुरांकडे जाणार नाहीं अशी तजवीज केली होती. असें केलें तरच व्हर्जिलनें प्राचीन इताली़चें जें वर्णन केलें आहे तशी स्थिति प्राप्त होईल. (तो ह्मणतो कीं त्यावेळीं इतालीची)" जमीन शस्त्रधर व सुबत्ता प्रसवण्यास समर्थ होती." दुसरी एक स्थिति आहे तीही वगळतां नये. (ती माझ्या माहितीप्रमाणें फक्त इंग्लन्डांत काय ती आहे. ती इतर ठिकाणीं क्वचितच दृष्टीस पडते. कदाचित् पोलांडांत मात्र असली तर असेल.) ह्मणजे स्वतंत्र नोकर, व उमराव गृहस्थ यांचे परिचारक. शस्त्रांच्या संबंधानें हे शेतकरी शिपायांहून कोणत्याही रीतीनें कमी नाहींत. आणि ह्मणून उमराव व गृहस्थ यांचा थाटमाट, डामडौल, मोठे लवाजमे, व पाहुणचार हे वहिवाटींत आले, तर त्यांपासून वीरश्रीला उत्तेजन येतें यांत संशय नाहीं; आणि याच्या उलट उमराव व गृहस्थ जर चिकूपणानें व बाताबेतानें राहूं लागले तर लष्करी मंडळीची वाण होते.

नेबुकाडनेझारच्या राज्यवृक्षाचा बुंधा, फांद्या व डाहळ्या यांचा भार सहन करण्या-इतका मोठा असावा अशी हर प्रयत्नानें तजवीज ठेविली पाहिजे; ह्मणजे राजाच्या किंवा संस्थानाच्या देशी प्रजा ह्या, ज्यांच्यावर त्या राज्य करतात, त्यांच्या योग्य प्रमाणानें असाव्या. ह्मणून जीं जीं राज्यें परकी लोकांना सढळपणानें स्वदेशीय करतात तीं तीं सार्वभौमत्वाला योग्य होत. कारण मुठभर माणसें, त्यांचें शौर्य व राज्यनयनपटुत्व जगांत अत्यंत मोठें असलें तरी, अफाट विस्ताराचें राज्य आकळण्यास समर्थ होतील असें मानणें ह्मणजे तें कांहीं काळपर्यंत खरें होईल; पण तें अकस्मात् घसरेल. स्पार्टन लोक परकीयांना आपल्यांत घेण्याच्या संबंधानें कडक होते; यामुळें जोंपर्यंत ते आपल्या मर्यादेंत

होते तोंपर्यंत अढळ होते; पण जेव्हां ते पसरले आणि त्यांच्या फांद्या बुंध्यापेक्षां मोठ्या झाल्या, तेव्हां वाऱ्यानें झाड पडावें तसें, ते एकाएकीं खालीं आले. या संबंधानें परकीयांना आपल्यांत घेण्यास जसे रोमन लोक तयार असत, तसें दुसरें कोणतेंच राष्ट्र नसे. ह्मणून त्यांना फळही तसेंच मिळालें: कारण त्यांना अत्यंत मोठें साम्राज्य प्राप्त झालें. त्यांची चाल अशी होती कीं, परकी लोकांना स्वदेशीयत्व द्यावें ( याला ते राजकीय हक्क ह्मणत ) आणि तेंही पूर्णत्वानें द्यावें; ह्मणजे त्यांना रोमन लोकांशीं व्यापार करण्याचा हक्क, लग्न करण्याचा हक्क, वारशाचा हक्क देत: इतकेंच नाहीं तर ( राज्यकारभारांत ) मत देण्याचा हक्क व प्रतिष्ठेच्या जागा मिळण्याचाही हक्क देत; आणि तो व्यक्तिमात्रांनाच नव्हे, तर सबंध कुटुंबांना; हेंचसें काय पण शहरांना व कधीं कधीं राष्ट्रांना देखील. शिवाय त्यांची वसाहती करण्याची चाल होती, तिजमुळें रोमन रोप दुसऱ्या राष्ट्रांच्या भूमींत लावण्यांत येत असे. आणि ह्या दोन्ही संस्था एकत्र करून, तुह्मी ह्मणाल कीं, रोमनलोक जगावर पसरले असें नाहीं, तर जगच रोमन लोकांवर पसरलें. व मोठेपणाचा खातरीचा मार्ग तोच. मला कधीं कधीं स्पेनचें नवल वाटतें: कीं इतक्या थोड्या देशी स्पानियर्डांनिशीं ते एवढीं मोठीं राज्यें कवटाळून धरतात तरी कशीं ? पण हें खचित कीं, स्पेनचा सगळा विस्तार ह्मणजे वृक्षाचा एक अति मोठा बुंधा आहे; प्रथम रोमचा व स्पार्टाचा होता त्याहून कितीपट तरी मोठा. आणि शिवाय, परकीयांना सढळपणें आपल्यांत घेण्याची चाल जरी त्यांच्यांत नाहीं, तरी तिच्या खालोखाल दुसरी चाल त्यांच्यांत आहे. ह्मणजे ते आपल्या साधारण सैन्यांत सरसकट सर्व राष्ट्रांचे लोक ठेवतात; इतकेंच नाहीं तर कधीं कधीं अगदीं वरच्या प्रतीच्या सेनापतींच्या जाग्यांवरही त्यांना ठेवतात. ही स्वदेशीयांची वाण त्यांची त्यांना ह्याक्षणीं वाटूं लागली आहे असें दिसतें; हल्लीं ' प्रागम्याटिकल् * सांक्शन ' प्रसिद्ध झालें आहे त्यावरून असें दिसतें.

हें खचित आहे कीं, बैठीं व घरांत बसून करण्याचीं कसबें व नाजूक धंदे ( ज्यांना दंडापेक्षां बोटांची आवश्यकता अधिक असते ) हीं स्वभावतःच लष्करी प्रवृत्तीच्या विरुद्ध असतात. आणि सामान्यतः सर्व लढाऊ लोक कांहींसे आळशी असतात; व त्यांना काबाडकष्टांपेक्षां संकटांची आवड अधिक असते. त्यांची कुवत जर कायम ठेवायाची असली, तर ही त्यांची संवई फारशी मोडतां नये. स्पार्टा, आथेन्स, रोम, व इतर प्राचीन राज्यांना हा एक फायदा होता कीं, त्यांच्यांत गुलाम असत ते बहुधा असले उद्योगधंदे उरकीत. परंतु, गुलामगिरी ही ख्रिस्ती शास्त्रानें बहुतांशीं रद्द केली आहे. तिच्या जवळ जवळचा प्रकार ह्मटला ह्मणजे तसलीं कसबें विशेषेंकरून परकी लोकांकडे सोंपवावीं ( व याकरतां त्यांना आपल्या देशांत अधिक सवलतीनें घ्यावें ) व स्वदेशांतील खालच्या प्रतीच्या लोकांच्या मुख्य भागांत हे तीन धंदेवाले ठेवावे: जमीन खेडणारे, स्वतंत्र नोकर, आणि बळकट व पौरुष कसबांचे कारागीर;

* स्पेनच्या राजांनीं प्रसिद्ध केलेल्या कायद्यांस हें नांव आहे.

जसें, घडकाम्ये, गंवडी, सुतार इत्यादि. शिपाईगिरीचा धंदा करणारे यांत धरलेले नाहींत.

पण सार्वभौमत्व व मोठेपणा यांकरतां राष्ट्रानें शिपाईगिरीचा पेषा हाच मुख्य मान, अभ्यास व धंदा समजावा, हें अत्यंत आवश्यक आहे. कारण वर ज्या गोष्टी आह्मी सांगितल्या त्या शस्त्र धरण्याच्या लायकीच्या संबंधानें सांगितल्याः आणि हेतु व कृति यांशिवाय लायकीचा काय उपयोग? रोमुलुसनें* आपल्या मरणानंतर (असें सांगतात, मग तें खरें असो अगर काल्पनिक असो) रोमन लोकांना असा आदेश पाठविला कीं, तुह्मीं इतर सर्व गोष्टी टाकून शिपाईगिरीकडे अधिक लक्ष द्या, ह्मणजे तुह्मांला पृथ्वीवर अत्यंत मोठें राज्य प्राप्त होईल. स्पार्टाच्या राज्याची इमारत सर्वथैव (पण शहाणपणानें नव्हे) याच धोरणावर व आशयावर रचलेली व उभारलेली होती. पर्शियन व मासेदोनियन लोकांमध्यें ती प्रवृत्ति क्षणिक होती. गॉल, जर्मन, गॉथ, साक्सन, नार्मन—या व दुसऱ्या लोकांत ती कांहीं काळपर्यंत होती. तुर्क लोकांत ती आज दिवसाला आहे; पण फार निकृष्ट स्थितींत आहे. ख्रिस्ती यूरोपांत ती स्पानियर्ड लोकांत कायती आहे. ज्या धंद्यांत मनुष्य अधिक मन घालतो त्यांत त्याचा फायदा होतो, ही गोष्ट इतकी उघड आहे कीं ती सिद्ध करण्याची आवश्यकता नाहीं. इतकाच निर्देश केला ह्मणजे पुरे कीं, जें राष्ट्र प्रत्यक्ष रीतीनें शिपाईगिरीचा पेषा बाळगीत नाहीं, त्यानें मोठेपणा आपल्या तोंडांत येऊन पडेल ही आशा कधींही करूं नये. आणि दुसऱ्यापक्षीं, काळाची अचूक उक्ति अशी आहे कीं, जीं राज्यें त्या धंद्यांत फार दिवस असतात (जसे रोमन व तुर्क लोक मुख्यत्वेंकरून होते) तीं अलौकिक कृत्यें करतात. आणि ज्यांनीं शस्त्रधारणाचा धंदा फक्त कांहीं काळपर्यंत केला, त्यांना त्या काळीं बहुधा मोठेपणा प्राप्त झाला आहे, आणि त्यांचा तो धंदा व शस्त्रांचा सराव हे नष्ट झाल्यावरही तो मोठेपणा फार वर्षें कायम राहिला आहे.

ह्याच मुद्याच्या अंगभूत असें आहे कीं, लढाईचीं न्याय्य कारणें त्यांस आणून देतील असे कायदे व चाली राज्यांत असाव्या. कारण मनुष्यांच्या स्वभावांत असा न्यायीपणा बिंबलेला आहे कीं कांहीं तरी कारणांवांचून—मग तीं कितीही फुसकीं असोत—व भांडणावांचून लढाईला जाऊं नये (ज्या लढाईपासून इतके अनर्थ उद्भवतात). आपल्या धर्माचा व पंथाचा प्रसार करणें हें कारण लढाईला तुर्क लोकांपाशीं तयार असतें. हें कारण त्यांना पाहिजे तेव्हां पुढें करतां येतें. जरी रोमन लोक आपल्या राज्याच्या मर्यादा वाढविणें हें आपल्या सेनापतींना, त्यांनीं तसें केल्यावर, भूषणावह मानीत, तरी, लढाई सुरू करण्याला तेवढेंच कारण ते लावीत नसत. ह्मणून प्रथम ज्या राष्ट्रांना मोठेपणा पाहिजे त्यांनीं असें करावें कीं, आपल्या सरहद्दीवरील लोकांना, व्यापाऱ्यांना अथवा राजकीय वकिलांना जी इजा होईल ती आपल्या अंगीं लावून घ्यावी; आणि लढाईला कारण झाल्यावर फार वेळ स्वस्थ बसूं नये. दुसरें, आपल्या कटांतील राजांना मदत व कुमक करण्यास त्यांनीं उत्सुक व

* रोमचा पहिला बादशाहा.

तयार असावें. रोमन लोक असेच असत. ते इतके कीं, कटांतल्या एखाद्या संस्थानानें दुसऱ्या वेगवेगळ्या संस्थानांशीं जरी संरक्षक कट केलेले असले आणि परचक्र आल्यास त्यांची पृथक्पणें मदत मागितलेली असली, तरी रोमन लोक सर्वांच्या अगोदर मदतीस जात; पहिल्यानें गेल्याचा मान ते दुसऱ्यांना घेऊं देत नसत. प्राचीनकालीं ज्या लढाया विवक्षित पक्षाच्या तर्फेनें अथवा राज्यपद्धतीची समानरूपता करण्याकरितां केल्या जात असत, त्यांसंबंधानें पाहिलें तर त्यांचें समर्थन कसें करावें हें मला कळत नाहीं. उदाहरणार्थ, रोमन लोकांनीं ग्रेसियाच्या स्वातंत्र्याकरतां जी लढाई केली; अथवा लासेदेमोनियन व आथेनियन लोकांनीं प्रजासत्तात्मक व अल्पजनसत्तात्मक राज्यें स्थापण्याकरतां किंवा मोडण्याकरितां ज्या लढाया केल्या; अथवा न्यायाच्या व संरक्षणाच्या निमित्यानें, दुसऱ्या राज्याच्या प्रजांना जुलमापासून व जबरदस्तीपासून मुक्त करण्याकरितां परकीयांनीं ज्या लढाया केल्या त्या; इत्यादि. इतकें सांगितलें म्हणजे पुरे कीं, शस्त्र धरण्याचा न्याय्य प्रसंग आला असतां जें राज्य जागें होत नाहीं त्यानें मोठें होण्याची आशा करूं नये.

व्यायामावांचून कोणतेंही शरीर निरोगी होऊं शकत नाहीं: जी गोष्ट हाडामांसाच्या शरीराची तीच राजकीय शरीराची; आणि राज्याला किंवा संस्थानाला न्याय्य व प्रतिष्ठादायक लढाई हा खरा व्यायाम, हें खचित आहे. आपसांतील लढाई ज्वराच्या उष्णतेप्रमाणें आहे; पण परक्यांशीं लढाई व्यायामाच्या उष्णतेप्रमाणें आहे, व शरीर निरोगी ठेवण्यास ती उपयोगी पडते. कारण आलस्यमय शांततेमध्यें धैर्यही नामर्द होतात व चालीरीतीही भ्रष्ट होतात. सौख्याच्या संबंधानें कसेंही असलें तरी मोठेपणाच्या संबंधानें हें निःसंशय खरें आहे कीं, नेहमीं सज्ज असणें यांत हित आहेः आणि ज्यापाशीं घटलेलें असें बलाढ्य सैन्य नेहमीं तयार असतें (जरी हें खर्चाचें काम आहे) तोच बहुधा दुसऱ्यांना कायदा घालून देतो; निदान शेजारच्या सर्व राज्यांत तशी त्याची कीर्ति तरी असते. हें स्पेनमध्यें चांगलें दिसून येतें; स्पेननें आज एकशेंवीस वर्षेंपावेतों घटलेलें सैन्य एकना दुसऱ्या भागांत सतत ठेवलें आहे.

समुद्राचें प्रभुत्व असणें हा सार्वभौमत्वाचा संक्षेप होय. पॉम्पीनें सीझरच्याविरुद्ध जी तयारी चालविली होती तिजविषयीं आटिकसला लिहितांना सिसरो म्हणतो—" पॉम्पीची मसलत बहुतेक थेमिस्टोक्लीसप्रमाणेंच आहे. कारण त्याला असें वाटतें कीं ज्याच्या ताब्यांत समुद्र आहे त्याच्या ताब्यांत यश आहे; " आणि पॉम्पीनें वृथाभिमानानें जर तो मार्ग सोडला नसता तर त्यानें सीझरला जेरीस आणलें असतें. समुद्रावर ज्या लढाया झाल्या आहेत त्यांचे मोठे परिणाम आपण पहातों. आक्तियमच्या लढाईनें पृथ्वीच्या सार्वभौमत्वाचा निकाल लावला. लेपान्तोच्या लढाईनें तुर्कलोकांच्या चढतीस अवरोध केला. सागरयुद्धांनीं लढाईचा शेवट केला, अशीं पुष्कळ उदाहरणें आहेत. पण अशावेळीं राजांनीं किंवा संस्थानांनीं आपलें सर्वस्व त्या युद्धांवर ठेविलें होतें. पण इतकें खचित कीं ज्याच्या स्वाधीन समुद्र आहे त्याला

पुष्कळ स्वातंत्र्य आहे, आणि लढाईचा भाग वाटेल तितका अधिक उणा घेण्याचें त्याचे हातीं असतें. पण जमिनीवर जे प्रबलतर असतात ते अनेक वेळां मोठ्या कचाटांत सांपडतात. खरेंच तर, आज दिवसाला आह्मां यूरोपस्थांना समुद्रावरील प्राबल्य (हें ह्या ग्रेट-ब्रिटनच्या राज्याच्या मुख्य देणग्यांपैकीं एक आहे) मोठें फायदेशीर आहे. कारण, यूरोपांतील बहुतेक राज्यें निखालस भूमिमध्यस्थ नसून, पुष्कळ भागीं समुद्रवेष्टित आहेत; आणि दुसरें कारण, ज्याच्या हातीं समुद्राचें प्रभुत्व आहे त्याला दोन्ही इंडीजची* संपत्ति पुष्कळ अंशीं सांपडते.

प्राचीन कालच्या लढायांपासून लोकांना जें गौरव व जी प्रतिष्ठा प्राप्त होत असे त्यांविषयीं अर्वाचीन लढायांत अज्ञानपणा दिसतो. आतां लष्करी उत्तेजनार्थ कांहीं पदव्या व किताब आहेत. पण ते शिपाई व बिनशिपाई यांना सरसकट देण्यांत येतात. आणि कदाचित् ढालीवर कांहीं यादगिरी व छिन्नांग शिपायांकरतां कांहीं दवाखाने व असेंच कांहीं तरी असतें. पण प्राचीनकाळीं, जयाच्या कांहीं ठिकाणीं उभारलेलीं स्मारकें; लढायांत पडलेल्या लोकांप्रीत्यर्थ उत्तरक्रियेच्या वेळीं केलेले स्तुतिवाद व बांधलेल्या छत्र्या; व्यक्तींना मिळणारे मुकुट व हार; "एम्परर†" ही पदवी, जी पुढें जगांतील मोठमोठ्या राजांनीं घेतली; सेनापती परत आले ह्मणजे त्यांच्या मिरवणुकी; सैन्याला फांटा देतेवेळीं शिपायांना मिळणाऱ्या मोठमोठ्या देणग्या व बक्षिसें; ह्या गोष्टी सर्व मनुष्यांचें शौर्य उद्दीपन करणाऱ्या होत्या. विशेषेंकरून, रोमन लोकांतील सेनापतींची मिरवणूक ही केवळ कांहींतरी तमाशा व मौज होती असें नाहीं; तर ती एक अत्यंत शहाणपणाची व थोरपणाची संस्था होती. कारण तींत तीन गोष्टी होत्या. सेनापतीला सन्मान, लुटींतून कोशाला द्रव्य, आणि सैन्याला देणग्या. पण तसला मान कदाचित्, एकराजसत्तात्मक राज्यांत, स्वतः राजा किंवा त्याचे पुत्र यांखेरीज कोणाला योग्य नाहीं. रोमन बादशहांचे वेळीं असेंच होत असे; ज्या लढाया ते जातीनें मारीत त्यांसंबंधाच्या मिरवणुकी ते आपल्या स्वतःला घेत किंवा आपल्या पुत्रांना देत; व ज्या लढाया त्यांचे प्रजाजन मारीत त्यांबद्दल सेनापतींना कांहीं विजयशाली वस्त्रें व चिन्हें देत.

आतां आटपूं: ह्या लहानशा मनुष्य देहामध्यें कोणीही, काळजी करून, (धर्मशास्त्र ह्मणतें त्याप्रमाणें) आपली उंची आहे त्याहून हातभर जास्त करूं शकत नाहीं. पण राज्यें व रयासती यांच्या बृहत्कायेमध्यें, राज्याचा विस्तार व मोठेपणा वाढविणें हें राजांच्या किंवा संस्थानांच्या स्वाधीन असतें. कारण जे कायदे, ज्या संस्था व ज्या चाली आह्मी आतां निर्दिष्ट केल्या आहेत त्या आपल्या राज्यांत सुरू करून त्यांनीं आपल्या वंशजांकरतां व वारसांकरतां मोठेपणाचें बीज पेरावें; पण ह्या गोष्टींकडे बहुधा कोणी लक्ष पुरवीत नाहीं, त्या दैवाच्या हवालीं करण्यांत येतात.

---

* हिंदुस्थान व अमेरिका.

† "एम्परर" हा शब्द लातीन भाषेंतील "इम्परातोर" शब्दापासून झालेला आहे. इम्परातोर ह्मणजे सेनापति. विजयशाली होऊन आलेल्या सरदाराला "इम्परातोर" असा किताब रोमन लोक देत असत.

[ पुस्तकपरीक्षा. ]

## संगीत शारदा नाटक.

[ मागिल अंकावरून पुढें चालू. ]

आतां या सुधारणापंचकाचा थोडासा विचार करूं. पहिल्या दोन सुधारणा सर्वसम्मत आहेत, तेव्हां त्यांबद्दल विशेष विचार करावयास नको. तिसरी सुधारणा घडवून आणणें हा या नाटकाचा मुख्य हेतु आहे, व तो पुष्कळ अंशीं साध्य झाला आहे हें आह्मी मोठ्या आनंदानें कबूल करितों. चवथी सुधारणा देशस्थकोंकणस्थांतील विवाह ही होय. या गंगाजमनी विवाहाची वार्ता श्रोत्यांस अखेरीला कळविली आहे–व तिची द्वाही बिंबाचार्यांच्या मुखकमलाच्या द्वारें दिली आहे ! तोंपर्यंत शारदा देशस्थ असेल अशी कल्पना ऐकणारास एकदांसुद्धां होत नाहीं. आधीं मुळीं देशस्थांमध्यें मुली वाढविण्याचा सांप्रदाय आहे. मुलीच्या चवदा वर्षांच्या वयानें आईबापांचें अंत:करण मुळींच दडपून जात नाहीं. त्यांतून देशस्थ यजुर्वेदी लोकांत ज्या थोड्यांमध्यें मुलीचे पैसे घेण्याची चाल आहे त्यांच्या मुलींस किंवा बायकांस मुली वाढल्याबद्दल कांहींच वाटत नाहीं. परंतु प्रस्तुत नाटकांत तर अगदीं उलट प्रकार दिसतो. लग्नाच्या पूर्वीं शारदेची जी स्थिति वर्णन केली आहे ती पाहून लग्नाला उपवर झालेल्या कोंकणस्थ मुलीची आठवण होते. जे थोडे सुशिक्षित आईबाप आपल्या मुलींचीं लग्नें प्रौढ वयांत व्हावीं ह्मणून त्यांस वाढवितात त्यांच्या घरीं ही स्थिति नित्य प्रत्ययास येते. व ती इतक्या मार्मिकपणें व कुशलपणें रा. देवल यांनीं वर्णन केली आहे कीं त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तितकें थोडेंच. "मुग्धत्वस्य च यौवनस्य च सखे सीमानमालंबते" यांत वर्णिलेल्या आयुष्याच्या अत्यंत मधुर व स्पृहणीय अशा कालांत आपल्याला योग्य वर मिळेल का ह्मणून वाटणारी काळजी; बुद्धिमान, हुषार व "पालखीपदस्थ"–निदान खाऊन पिऊन सुखी असा–जांवई पाहण्याची आईबापांची खटपट व तन्निमित्त त्यांस पडणारा त्रास व आयास;–या कारणांनीं मुलीला वाटणारी स्वाभाविक खिन्नता, इष्ट मित्रांच्या घरीं जाण्यांत वाटणारी लाज, परकी बायकांनीं आपल्या अविवाहितपणाबद्दल टोंचून खोंचून काढलेले उद्गार, व पुष्कळ प्रसंगीं अंतःकरणास झोंबणारी त्यांची, तिरस्कारयुक्त वागणूक–या गोष्टींमुळें समंजस आणि मोठ्या मुलींना अपरिहार्य कारणांनीं मुग्ध शैशवांतील लडिवाळपणाची व पूर्णानंदाची आठवण होऊन त्यांच्या तोंडून–

बाळपणींचा काळ सुखाचा आठवतो घडि घडीं ।
तशी नये फिरून कधिं घडी ॥
किति हौसेनें टाकिलि असती त्यांत मागुतीं उडी ।
परि बुबळी मानव कुडी ॥
चाल—मनिं नव्हती कशाची चिंता ।
आनंद अखंडित होता ।
आक्रोश कारणापुरता ।
जें ब्रह्म काय तें मायबाप ही जोडी ।
खेळांत काय ती गोडी ॥ १ ॥

हे शारदेचे फार मार्मिक उद्गार बाहेर पडतांना पुष्कळांनीं ऐकिले असतील. परंतु देशस्थ भिक्षुकी कुटुंबांत मात्र आह्मीं ही स्थिति कधीं पाहिली नाहीं. लग्नाबद्दल शारदेची विवंचना, या आंचीनें तिचा उत्साहभंग होऊन नित्य येणारी शारीरिक दुर्बलता, शारदेस लिहितां वाचतां येऊन पोथी वाचण्यापर्यंत गेलेली तिची

मजल, कांचनभटजींच्या देशस्थी कुटुंबाची 'विद्वानांत हिरा, चकाकत विद्वानांत हिरा' व 'मायेची शाल घाली' असला जामात असण्याबद्दलची हांव, मुलगी मोठी झाल्याबद्दल इंदिराबाईस वाटणारी काळजी, भटजींची कळशी घेऊन संध्या करण्याकरितां घाटावर जाण्याची "घाटाखालील" चुटपुट,– या सर्व गोष्टी देशस्थ कुटुंबाला अत्यंत विसदृश आहेत; व एका वाक्यासरशी एवढी सुधारणा अमलांत आणण्याच्या अनावर उच्छृंखलपणामुळे "सृष्टिसुंदरीला"( Realistic या अर्थी प्रस्तावनाकारांचा हा शब्द अगदीं अयोग्य आहे.) ह्मणजे वस्तुस्थितीला झिटकारून सुधारणादेवीच्या प्रेमानें ग्रंथकार अंध झाले, याबद्दल खेद वाटतो.

आतां राहिलेल्या पांचव्या व अत्यंत महत्त्वाच्या सुधारणेबद्दल विचार करूं. "वयमानाप्रमाणें घडून येणाऱ्या गोष्टी" घडल्यानंतर शारदेनें पसंत केलेल्या कोदंडाशीं तिचा विवाह श्रीमज्जगद्गुरूंच्या आज्ञेनें झाला आहे. परंतु यासंबंधीं जगद्गुरूंनीं प्रायश्चित्त दिलें, किंवा शास्त्राधार दाखविला, किंवा एखाद्या स्मृतीवर भिस्त ठेविली, कीं आपद्धर्म ह्मणून यास आपली सम्मति दिली, याचा कांहींच उल्लेख नाहीं. अशा तऱ्हेच्या विवाहाच्या योग्यायोग्यतेबद्दल विचार करण्याचें हें स्थळ नव्हे. परंतु कोदंडाच्या ब्रह्मचर्याची जणुं काय कींव करून त्याला चतुर्भुज करण्याकरितां जगद्गुरूंना रंगभूमीवर खेंचून आणण्याच्या गडबडींत ग्रंथकारांस या गोष्टीकडे लक्ष देण्यास फावलें नसल्यास, अथवा कोदंडशारदाविवाहांतच या सुधारणेचा ( कायद्यांत ज्याप्रमाणें मोठ्या गुन्ह्यांत लहान गुन्ह्याचा, अगर मोठ्या जामीनगतींत लहान जामीनगतीचा अंतर्भाव Merger होतो त्याप्रमाणें ) अंतर्भाव झाला असें गृहीत धरून सामाजिक सुधारणेच्या बाबतींत मिळालेल्या या महत्त्वाच्या यशःप्राप्तीच्या आनंदांत ते तल्लीन झाले असल्यास नकळे. आमच्या मतें पुष्कळशा सुधारणा एका गोळीसरशी घडवून आणण्याच्या सुधारकी हातचलाखीचा अंगीकार न करितां एकच इष्ट सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न ग्रंथकारांनीं केला असता तर त्यांची कृति इतकी उपहासास्पद झाली नसती.

रा. देवल यांनीं सुधारणा घडवून आणण्याचा जो मार्ग या नाटकानें ध्वनित केला आहे तो मात्र फार विचार करण्याजोगा आहे. सामाजिक सुधारणा ही समाजाच्या नायकाच्या हस्तेंच घडवून आणली पाहिजे; व जगद्गुरूंना या बाबतींत मोठेपणा देऊन पुढाकार घेण्यास लावणें हें खऱ्या सुधारकाचें काम आहे. आतां विधर्मी राजांच्या मुळें आमच्या धर्मगुरूंची सत्ता केवळ नामशेषच झाली आहे; व ती त्यांना लोकांच्याकडून दिली जाईल अशी तजवीज करणें इष्ट आहे. समाजोन्नतीची कळकळ जगद्गुरूंच्या मठांत ज्या दिवशीं उत्पन्न होईल तो सुदिन समजावयाचा. या तत्वाला अनुसरून या नाटकांतील ईशप्रार्थना "आर्यधर्मा अननुकूल" अशा सार्वभौमिनीचे अप्रासंगिक गोडवे गाण्यास्तव न करितां जगद्गुरूंची सत्ता खऱ्या देशहिताच्या कामीं पडावी ह्मणून अनन्यभावानें केली असती, तर ती फारच समयोचित झाली असती. आपल्या राजनिष्ठपणाचें प्रदर्शन रा. देवल यांनीं इतक्या आगंतुकपणें कां केलें याचें आह्मांस फार आश्चर्य वाटतें.

असो. या नाटकांतील पात्रांच्या स्वभावाचा विकास कसा झाला आहे हें पाहूं. यांतील मुख्य पात्र ह्मणजे वृद्ध नवरदेव **श्रीमंत** होत.

श्रीमंतांचें चित्र मध्यमवर्गांतील सधन गृहस्थाचें आहे कीं एखाद्या जहागीरदाराचें अगर संस्थानिकाचें आहे याची सबळ शंका पुस्तक वाचतांना येते. मंडलेश्वरकरांचे सापत्नबंधु **जयधुंडिराज** यांची **सरकारी** हेरंबमहालांत झालेली संभावना, कांचनभट्टासारख्या लोभी कृपणाला श्रीमंतांचे श्वशुर ह्मणून दिली जाणारी वंशपरंपरेच्या तैनातीची आशा, **कृष्णातटसन्निकट** असलेल्या **श्रीमंतांच्या अंतर्महालांत** लग्नापूर्वीं कांचनभटजींच्या मुलीचें पहाण्याकरितां आगमन ( ही चाल मध्यमस्थितींतील कुटुंबांत कोठेंही रूढ नाहीं )—या सर्व गोष्टींवरून या नाटकांत ज्यांचें चित्र काढलें आहे ते श्रीमंत कोणी जहागीरदार असावेत अगर संस्थानिक असावेत असा भास होतो, व ग्रंथकारांच्या कल्पनेसमोर अशा तऱ्हेच्या गृहस्थाचें चित्र असावें अशी शंका येते. संस्थानिकांच्या आयुष्यक्रमाचें चित्र काढण्याचा रा. देवल यांचा प्रयत्न असल्यास तो अगदीं गैरशिस्त व टवाळकीचा ह्मटला पाहिजे. संस्थानिकांना ह्मणजे मूर्खपणा करण्याला कोणी सनद दिली आहे असा अर्थ नाहीं. दुसरें असें कीं, सामान्य व्यवहारांतील माणसांपेक्षां त्यांच्या दोषांकडे फारच निराळ्या दृष्टीनें पाहिलें पाहिजे. अनुपम संपत्ति व कर्तव्यशून्यता या दोन कारणांनीं संस्थानिक आळशी व विषयलंपट झाले तर त्यांस फारसा दोष देतां येणार नाहीं. हा मनुष्यतेचाच अवगुण होय. यासंबंधीं **थ्याकरे** साहेबांनीं जे उद्गार काढले आहेत ते प्रत्येक मनुष्यानें लक्षांत ठेविले पाहिजेत:

" If in looking at the lives of princes and courtiers, men of rank and fashion, we must perforce depict them as idle, profligate and criminal, we must make all allowances for the rich men's failings and recollect that we too were very likely indolent and voluptuous had we no motive for work—a mortal's natural taste for pleasure and the daily temptation of a large income. "

दुसरी गोष्ट: अशा श्रीमंतांना आपली कुलपरंपरा चालावी ही प्रबळ इच्छा असावयाची व ती वार्धक्यांत अतिशय वाटावी हें साहजिक आहे. सध्यांच्या रशियाच्या बादशहाला औरस संततीच्या अभावानें किती निराशा उत्पन्न झाली आहे हें वर्तमानपत्रांच्या वाचकांस सांगावयास नको. आमच्या इकडे तर " निपुत्रिकांना नरकवास शास्त्रांत ठरविला " असल्यामुळें या बाबतींतील शक्य त्या मार्गांनीं या भयंकर संकटापासून सुटका करून घेण्याचे प्रयत्न अशा गृहस्थांकडून होणें विशेष वावगें नव्हे. तिसरी गोष्ट: संस्थानिकासारख्यांना आपली मुलगी देऊन कुटुंबाचें वंशपरंपरेनें स्वास्थ्य होत असल्यामुळें सामान्य लोकांची तिकडे प्रवृत्ति असणें स्वाभाविक आहे. आपल्या मुलीला राज्यलक्ष्मीनें मंडित करण्याची हांव पुष्कळ समंजस आईबापांच्या अंतःकरणांत वसत असते; मग कवडीचुंबक कांचनभटाची काय कथा! स्वयंवराची पद्धत ज्या ठिकाणीं अप्रतिहत आहे अशा अत्यंत सुधारलेल्या इंग्लंडच्या राजघराण्याकडे लक्ष दिल्यास आमच्या वरील विधानाची सत्यता दिसून येईल. एकत्र कुटुंबांत ज्याप्रमाणें एक भाऊ मेला तर दुसरा भाऊ संपत्तीचा तात्काळ मालक होतो त्याप्रमाणें, आपला भावि-पति निधन पावतांच एक महिन्याच्या आंत त्याच्या कनिष्ठ बंधूशीं विवाह उरकून घेणा-

न्या स्त्रीच्या सुसंस्कृत अंतःकरणांत "सार्वभौमिनी" ह्मणवून घेण्याची अनावर राज्यतृष्णा प्रबल होती कीं स्वयंवरापासून उत्पन्न होणारें निष्कलंक प्रेम बलवत्तर होतें, याचा विचार वाचकांनींच करावा. राज्यलक्ष्मीचा लोभ फारच दुस्तर आहे व तो बाजूला सारण्यास असामान्य धैर्य पाहिजे; सामान्य जनतेकडून या लोभासाठीं वयाकडे किंवा एखाद्या शारीरिक सुखाकडे दुर्लक्ष्य झाल्यास त्याबद्दल त्यास सर्वथैव दोष न देतां तो अशा बिकट मोहाचा परिणाम समजला पाहिजे.

या एका महत्त्वाच्या बाबतीखेरीज रा. देवल यांनीं "जरठ व पोक्त" वराचें चित्र फारच बहारीचें काढलें आहे. भुजंगनाथासारख्या जखडखड नवरोजींना "ह्मातारा" ह्मणण्याबरोबर येणारी चीड; लहान मुलीच्या सौभाग्याला दंश करण्याची नांवाप्रमाणें अन्वर्थक हांव; पत्नीवियोगामुळें त्यांना सोसावा लागणारा त्रास; मुंडावळ्या बांधून घेण्याची त्यांची आतुरता; "बोधाचे वैरी" होण्याइतकी त्यांच्या मनाची उच्छृ वृत्ति; सृष्टिक्रमाप्रमाणें होणारी शारीरिक हानि कृत्रिम कलापांनीं व दातांच्या कवळीनें भरून काढण्याची हांव; नटण्या मुरडण्याची हास्यास्पद खोड; तारूण्याची बतावणी करितांना उडणारी तारांबळ; उसनवार पौरुषाची ऐट; व संकटसमयीं अंगीं भरलेल्या भेकडपणाचें प्रदर्शन;—या सर्व गोष्टी फारच कुशलपणें रा. देवलांनीं आपल्या नाटकांत वर्णन केल्या आहेत. व नाटक पाहतांना श्रीमंतांकडे पाहून एकसारखें हंसूं आल्यावांचून राहत नाहीं. श्रीमंतांची फजिती उडाल्यानंतर जगद्गुरूंच्या उपदेशानें त्यांच्या उतावीळ मनाची वैराग्याकडे व चतुर्थाश्रमाकडे झालेली प्रवृत्ति ग्रंथकारांनीं जास्ती सविस्तर दिली असती तर श्रीमंतांच्या सारख्या प्रकृतीपासून शिकण्याचा धडा श्रोत्यांच्या मनावर जास्त ठसला असता.

या नाटकांतील नायिका **शारदा** होय. शारदेवर केलेल्या देशस्थपणाचा उल्लेख आह्मीं मागें केलाच आहे. याबद्दलचा मतभेद बाजूस ठेविल्यास शारदेसारख्या कांहीं विशेष परिस्थितींतील अविवाहित मोठ्या मुलींचे आत्मगतविचार इतक्या कांहीं बारकाईनें व कुशलपणें दिले आहेत कीं, त्याबद्दल ग्रंथकाराचें वर्णन करावें तितकें थोडेंच. आपल्याला द्रव्याकरितां जरठाला देण्याची जनकाला इच्छा होऊं नये ह्मणून 'लक्ष वाति वरसाला' लावण्याचा शारदेचा 'संगमनाथा'ला नवस; "यमपाश गळ्याशीं ज्यास लागला" अशा वृद्ध कपीला आपल्याला देण्याबद्दल झालेल्या मातापितरांच्या निश्चयाला उद्देशून 'कां मांस विकुनि धर्मास वांकडे जातां' असा आईजवळ काढलेला शारदेचा हृदयभेदक उद्गार; बापाच्या निष्ठुरपणामुळें निराशेनें 'तूं टाक चिरुनि ही मान। नको अनमान' ह्मणून केलेली आईला विनंती; आपल्या स्वार्थपरायण बापाला 'मागिल जन्मींचें, अतांचें, मी ऋण देणें असेल तितकें फेडुन घ्या तुमचें ॥' अशी निर्वाणीची केलेली विनवणी; अक्षता पडल्या न पडल्या तों झालेल्या गोंधळामुळें "मी समजुं तरि काय भुले मन" ह्मणून भांबावलेले विचार;—या सर्व गोष्टींचें चित्र सुंदर वठलें आहे. 'शारदे'चा स्वभावविकास अखेरीस बरोबर साधला नाहीं याविषयीं पूर्वीं विवेचन केलेंच आहे.

या नाटकांतील तिसरें पात्र नायक **कोदंड** हें होय. कोदंडाचा अविवाहित राहून लोककल्याण करण्याचा निश्चय; जरठकुमारीविवाहासारख्या घातुक चालीबद्दल वाटणारा उद्वेग; निरपेक्ष

बुद्धीनें परहित करण्याची तत्परता; ढोंगी आणि कपटी लोकांबद्दल वाटणारा द्वेष; श्रीमंतांना लग्न न करण्याबद्दल केलेली निर्भीड विनंती; श्रीमंतांना नरनंदी करण्याकरितां जमलेल्या स्वार्थसाधूंच्या कोल्हेकुईकडे दुर्लक्ष करून द्रव्यावर लाथ मारण्याची तयारी; दीक्षितांनीं संकटांत घातलें असतांही त्यास न डगमगतां—

"जो लोककल्याण। साधावया जाण।
देई करीं प्राण। त्या सौख्य कैचें ॥
बहु कष्ट जीवास। दुष्टान्न उपवास।
कारागृहीं वास। हे भोग त्याचे ॥
निंदा जनीं त्रास। अपमान उपहास।
अर्थी विपर्यास। हें व्हावयाचें ॥"

याप्रकारचें व्रत चालविण्याची निःसीम कळकळ, या सर्व कारणांनीं श्रोत्यांचे मनांत कोदंडाबद्दल स्पृहणीय भाव उत्पन्न होतो. परंतु अशा तऱ्हेच्या नेकीच्या ब्रह्मचर्याचा शेवट कसा केला आहे याबद्दल आह्मीं पूर्वींच लिहिलें आहे.

या नाटकांतील चवथें पात्र **भद्रेश्वर दीक्षित.** याची उठावणी सर्वोत्कृष्ट झाली आहे. दीक्षितांच्या मध्यस्थ धंद्याचें प्रदर्शन; श्रीमंतांना नवरोजी करून त्यांस हरभऱ्याच्या झाडावर चढविण्याची युक्ति; श्रीमंतीची बतावणी कशी करावी याबद्दलचा त्यांचा उपदेश; श्रीमंतांच्या सोंगाचा परिस्फोट न होण्याविषयींची त्याची दक्षता; प्रसंगीं परपक्षाशीं कोलाहल करण्याची शिताफी; लोभी कांचनभटाला मधाचें बोट लावून फसविण्याचें कौशल्य; नवरा मरो वा नवरी मरो, आपली तुंबडी भरण्याची स्वार्थैकपरायणता;—या सर्व गोष्टी अगदीं बिनमोल साधल्या आहेत. 'यागो' इतका अत्यंत दुष्ट व कुटिल नव्हे, पण वाटेल तें करून स्वार्थ साधण्याला तत्पर अशा नीच कोटींतील हलक्या माणसाची व धूर्त दांभिकाची हुबेहुब प्रतिमा भद्रेश्वर दीक्षिताच्या पात्रावरून येते.

द्रव्यांध, अत्यंत लोभी व कवडीचुंबक असा निष्ठुर कांचनभट; लोभी परंतु कोमल अंतःकरणाच्या इंदिराबाई; वल्लरी, जान्हवी वगैरे शारदेच्या ठसकेदार मैत्रिणी; या सर्व गौण पात्रांची रचना बऱ्यापैकीं आहे.

आतां नाटकांतील भाषेच्या, अलंकाराच्या व कवितेच्या वगैरे दोषांकडे वळूं. अलीकडे संगीत ह्मणजे अत्यंत सुलभ झालें आहे. एका विनोदी टीकाकारानें या काव्याचे तीन प्रकार नुकतेच प्रसिद्ध केले आहेत. रा. देवलांसारख्या कसलेल्या कवीच्या कृतींत असले प्रकार आढळावे हें फार अप्रशस्त होय. काव्यामध्यें अलंकार असोत वा नसोत; निदान "तददोषौ शब्दार्थौ सगुणौ अनलंकृती पुनः क्वापि" ही **मम्मटा**ची व्याख्या प्रत्येक कवीनें लक्षांत ठेविली पाहिजे. कवितेंतील शब्दांत रमणीयत्व, मधुरपणा, प्रसाद, ओजस् व पदलालित्य असणें जरूर आहे; व अर्थगौरवासंबंधानें लक्षणा व व्यंजना या गुणांकडे लक्ष्य देऊन चित्रकाव्याचे मासले होतील तितके कमी असण्याची आवश्यकता रा. देवलांस आह्मीं सांगितली पाहिजे असें नाहीं. बाणभट्टाच्या शब्दभांडारांतून यदृच्छेनें सहल करणाऱ्या देवलांनीं जे अमोलिक रत्नांचे हार महाश्वेतेच्या, पुंडरीकाच्या व कादंबरीच्या गळ्यांत घातले आहेत; शापसंभ्रमामध्यें जें मार्दव आणि पदलालित्य आहे; अथवा मृच्छकटिकामध्यें जी मोहक कर्णमधुर पदरचना आहे; तिचा प्रत्यय प्रस्तुत नाटकांत मुळींच येत नाहीं. आधीं हा विषय अगदीं व्यावहारिक ( Commonplace ); आणि तशांत त्यांतील पदरचना अगदीं प्राकृत करण्याचा

ग्रंथकारांनीं प्रयत्न केल्यामुळें त्यांत कांहींच आल्हादकारक वाटत नाहीं. वरील विधानाची सत्यता खालील उदाहरणांवरून दिसून येईल.

या नाटकांत विषयाखेरीज स्वतंत्रपणें कवित्वाचें प्रदर्शन करण्याचीं स्थळें ह्मणजे नान्दी, मंगलाष्टकें व गौरीहराची पूजा हीं होत. नान्दीची व्याख्या—'श्लोकः काव्यार्थसूचकः' अशी आहे. भावि कथानकाचें सामान्य स्वरूप श्रोत्यांस थोडक्यांत निवेदन करण्याचा प्रयत्न नान्दीच्या द्वारें केला जातो. प्रस्तुत नान्दींत गिरिजेचा कांत आपल्या प्रिय पत्नीला, माझे कैंस वार्धक्यानें धवल झाले नसून विधुकांतीनें किंवा भस्मलेपानें झाले आहेत, असें सांगत आहे. हा दृष्टांत प्रस्तुत नाटकांतील विषयास मुळींच लागू पडत नाहीं. शारदाभुजंगविवाह व पार्वतीशंकराचा विवाह यांत साम्यच असल्यास तें एकाच गुणांत आहे. तो गुण ह्मणजे वरपक्षाचें वार्धक्य होय. परंतु पौराणिक कथेमध्यें पार्वतीनें अत्यंत प्रेमानें शंकरास वरिलें; व सध्यांच्या नाटकांत शारदेला भुजंगनाथ वैऱ्याप्रमाणें वाटत होता. पार्वतीला आपल्या पतीस वृद्ध ह्मणण्याबरोबर किती संताप येत होता हें "कुमारसंभवा"च्या वाचकांस सांगावयास नको. आपल्या इच्छित पतीला जरठ तपस्वी ह्मणण्याबरोबर संतप्त झालेल्या पार्वतीचे—

> "न केवलं यो महतोपभाषते
> शृणोति यः केवलमेव पापभुक् ॥

हे उद्गार कोणीकडे व

> "वाटुं न द्यावा विषाद चित्ता।
> सत्य दिसे तें वदतें आतां।
> वयें आजोबा माझे दिसतां।
> नात दिसें मी ही।"

हें शारदेचें सणसणीत उत्तर कोणीकडे! पार्वतीनें **तपश्चर्या** करून शंकराची प्राप्ति करून घेतली; व शारदेचा **तपश्चर्या** करून भुजंगनाथापासून मुक्तता करून घेण्याचा हेतु होता. रा. देवल यांनीं असला अप्रासंगिक पौराणिक दृष्टांत सोडून देऊन एखादा समयोचित पौराणिक दृष्टांत आपल्या नाटकांत घातला असता तर फार उत्कृष्ट झालें असतें.

आतां गौरीहराच्या संबंधानें जीं दोन पदें पुस्तकांत घातलीं आहेत त्यांपैकीं "हिमनग जो पाषाणहृदय तो प्रसवे कन्या गौरीला" या पदांतील कार्यकारणसंबंध अगदीं अपूर्व आहे. पाषाणहृदयी हिमालयाच्या कन्येच्या अंगीं निष्ठुरपणा आला हा संबंध अगदीं विहित आहे. पण या निष्ठुरपणामुळें तिनें ह्मातारा "शिव" पति केला असें जें विधान आहे त्याचा हेतु काय? वृद्धप्रेम आणि निष्ठुरपण यांत आह्मांस तर येथें लाविलेला कार्यकारणसंबंध मुळींच दिसत नाहीं. उलट निष्ठुर अशा स्त्रीनें धडधाकट तरुण अशा वरालाच पसंत केलें असतें. ग्रंथकारांना पाषाणहृदयी जनकाची कन्या सहृदय नसेल असें विधान करावयाचें होतें किंवा कसें हें नकळे.

आतां राहिलीं मंगलाष्टकें. दक्षणेकरितां जमलेल्या शास्त्री, वैदिक, भिक्षुक मंडळीच्या तोंडून जीं मंगलाष्टकें कवींनीं ह्मणविलीं आहेत त्यांत वधूचें कल्याण होऊन वराचें निसंतान व्हावें अशी स्पष्ट इच्छा प्रदर्शित केली आहे. या परस्परविरोधी कल्पना भिक्षुकांच्या तोंडीं घालतांना त्यांना वधूवर सगोत्र असल्याचें माहित होतें असें गृहीत धरिलें पाहिजे, किंवा ग्रंथकारांप्रमाणें टवाळकी

करण्याकरितांच ते ' शुभमंगल सावधान ' ह्मणण्यास लग्नमंडपांत आले होते असें समजलें पाहिजे. संविधानकावरून पाहतां हीं दोन्ही अनुमानें शक्य नाहींत. शिवाय मंगलाष्टकांच्या शेवटीं " लावी जोड कुलाल तोचि वधुचें कुर्यात् सदा मंगलम् " असें ह्मटलें आहे. अननुरूप स्त्रीपुरुषांची घटना ब्रह्मदेव नेहमीं करितो असा त्याजवर कवींचा आरोप आहे, व तशी स्थिति या पदांत वर्णन केली आहे. असें असतां पुनः वधूचें मगल करण्याला ( वराचें नव्हे हो ) त्याच कुलालाला कां आव्हान केलें आहे ? प्रस्तुतचा विवाह अगदीं अयोग्य होता व तो ब्रह्मदेवाच्या नेहमींच्या रीतीला अनुसरूनच होता. उलट पक्षीं, असें झालें नसतें तर कालिदासांनीं " चिरस्य वाच्यन्न गतः प्रजापतिः " असें जें ह्मटलें आहे त्याचा योग्य उपयोग करतां आला असता.

वरील कारणांमुळें या तीन्ही प्रसंगीं दर्शविलेलें कवित्व सदोष आहे.

आतां इतर पदांकडे वळूं. " वड्याच्या " कवितेचे मासले पहावयाचे असल्यास खालील स्थळें पहावीं:--

जरी कुणा श्रीमंताची सून होय शारदा
तरि त्यास साजे ऐशी तिची रूपसंपदा ॥

× × ×

रडसि काय ह्मणुनि अशी सांग शारदे
कोण बोललें किं काय मजसि समजुंदे ॥

वाचक हो, घ्या या दोन वाक्यांमध्यें एकेक रेघ आणि उचला एकेक कवितेची वडी !

बघुनि त्या भयंकर भूता फोडिली तिनें किंकाळी ।

× × ×

तरि मोट बांधुनी माझी बिहिरींत नेऊन ढकला. ।

× × ×

आली पोटीं एक पोरटी तीही विकितां कां ।

× × ×

पोरेंटोरें लागति पाठीं हांसति चिडवीती ।
ऐकवेनसें बोलति भलतें अति चेष्टा करिती ॥

वरील कवितेंत किती तरी ओतप्रोत प्रसादगुण भरला आहे ! वरील उतारे वाचून वाचकांना वीट येईल ह्मणून येथेंच थांबतों.

संस्कृतप्राकृतमिश्रित अशा कथेचीं उदाहरणें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

सौख्य संतति सौभाग्य देव देई ।
आह्मां हातीं त्यांतील कांहिं नाहीं ॥

× × ×

ज्यां लोटिली संकटीं । निष्कारण शारदा बिचारी
मानिल मजसि महा कपटी ॥

× × ×

बालमृगी वृकमुखिची ओढुनि टाकियली दावाग्नित हातीं ।

वरील चरणांत संस्कृत प्राकृताचें मिश्रण किती तरी खुमारीनें केलें आहे ! शालजोडीला ठिगळ लावल्यास तिची शोभा याहून जास्तो खचित दिसणार नाहीं.

" टाकी मारलेली आंबोळी " हा द्विरुक्तीचा दोष होय. मुखाला कमळाची उपमा न देतां मुखकमळाच्या पाकळ्या ह्मणण्यानें कोणता रस साधला हें रा. देवलांसच माहीत.

" माया जळली कां " हें रूपक अप्रयोजक दिसतें. तसेंच--

केव्हां पुनरपि बधिन गांव । त्यावरि केव्हां करिन डाव ।
कां रडुं हें मस्तक पिटुनी । कैसें खट आले ।
घोड थेरड्यांना ऐशा ।

वगैरे शब्द कवितेंत फार ग्राम्य दिसतात. तसेंच नायकाच्या तोंडीं " जठरानल शमवाया नीचा कां न भक्षिसी गोमय ताजें "--ह्मणजे निवळ

प्राकृतांत 'पोट जाळायला शेण कां खात नाहींस'? अशा अर्थाचे शब्द घालणें हें व्रीडोत्पादक अश्लीलाचें दर्शक आहे. त्यांतून ताज्या गोमयाची रुचि ग्रंथकारांसच माहीत. "दोषाचें त्रिकुट" (त्रिदोष ?) "गोव्यांतील पारडी" "खायीत" "खेकसायला" ही योजना कर्णकटु आहे. "रूपवन्ती" हें रूप चुकीचें आहे.

आतां अर्थगौरवाचा मासला खालीं लिहिल्याप्रमाणें आहेः म्हातारा नवरा आपल्या तरूण बायकोच्या वर्तनाकडे कसें दुर्लक्ष करितो, या संबंधानें कवि लिहितात;

> त्या व्यंग ढाळकें अंगिचें
>
> × ×
>
> मन धरुनि तिचें बहुपरी ।
>
> राखितो लौकिक घरच्याघरीं

श्रोत्यांवर ही मेहरबानीच आहे कीं यावर ग्रंथकारांनीं "मल्लिनाथी" टीका केली नाहीं. नाहींतर "थोडी उरला कळ सोसावी" या स्वतःच्या सूत्रावर कवीनें "भुजंगमहाराजां"चे तोंडून "फुकट उपदेश करायाला यांचें काय" अशा आशयाचें जें बीभत्स भाष्य केलें आहे तसलेंच ऐकण्याचा प्रसंग यावयाचा.

> परि उगीचचि आइचें आंधळें हें खुळें मन तळमळें ।

हें पदलालित्य किती तरी सुंदर आहे !

अमंगलव्यंजक अश्लीलाचा प्रकार—

> दिल्या तरुणां तरि होति किती रंडा ।
>
> जरठ पतिही किती बघति नातवंडा ॥

"नातवंडा" या अनुप्रासाची जुळणी करण्याकरितां "रंडा" शब्दाची योजना किती तरी समयोचित आहे, याचा विचार वाचकांनींच करावा.

या नाटकांतील गद्य उत्तम प्रकारचें साधलें आहे; यांतील भाषा कसलेली व जोरदार अशी वापरली आहे. मधून मधून नित्य व्यवहारांतील समयोचित मर्मवाक्यें ( wit ) घातल्यामुळें तिला फारच सौंदर्य आलें आहे.

आतां या नाटकांतील उत्तम प्रसंगांचें व पदांचें दिग्दर्शन करून या विषयाचा उपसंहार करूं. शारदा वगैरे सर्व मुलींची शंकराच्या देवालयांत गांठ पडल्याचा प्रसंग फारच उत्कृष्ट साधला आहे. श्रीमंतांना लग्न न करण्याचा उपदेश, व दीक्षित आणि सुवर्णदीक्षित यांचा वाद; जल्प, वितंडा, छल, जाति इत्यादी वाग्युद्धांतील अस्त्रांचा उपयोग; "शेषं कोपेन पूरयेत्" व कोलाहल करून प्रतिपक्षास जर्जर करण्याची हातोटी—हें सर्व पाहून आपण एखाद्या ग्रामण्यासारख्या वादाचें अवलोकन करीत आहों कीं काय असा भास होतो. हळदीकुंकवाचा प्रसंग अत्यंत मनोहर आहे. गम्मतच, पण गमतीगमतीनें वल्लरी व जान्हवी यांनीं सांगितलेली पाहून व शारदेच्या मैत्रिणींनीं केलेला विनोद ऐकून कोणत्या रसिक मनुष्याच्या मनास आल्हाद होणार नाहीं ? नाटकशास्त्रदृष्ट्या या प्रवेशांत नायिका पुष्कळ वेळ स्तब्ध राहते, हा दोष आहे. तथापि "म्हातारा इतका न अवघें पाउणशें वयमान" म्हणून वल्लरीनें केलेलें शारदेच्या भावी पतीचें बहारीचें वर्णन, व "तूं श्रीमंतीण खरी शोभशिल" इत्यादि प्रकारची थट्टा, या गुणांनीं यांतील दोषांकडे लक्ष जात नाहीं. श्रीमंतांनीं शारदेला पाहण्याकरितां आपल्या महालांत आणल्यावर त्यांच्या विकल गात्रांचें झालेलें प्रदर्शन, व त्यांच्या कृत्रिम बत्तिशीनें आयत्यावेळीं त्यांचा विश्वासघात करून त्यांच्या

बोळक्यांतून करून घेतलेली आपली सुटका पाहून एकसारखें हसूं आल्यावांचून रहात नाहीं.

खालील अलंकार उत्तम प्रकारचे साधले आहेत.

"कारण दुष्काळा मानिल कोण कोकिळेला" हा दृष्टांत फार फार समयोचित आहे. "सांवळा वर बरा गौर वधुला" यांतील अर्थांतरन्यास फारच कल्पकतेचा असून गोड आहे.

"मीनाक्षी सुरस वधू वर रडांवांचूनि मंदाक्ष हा।"

× × ×

जरि वरुनि धुवट सोंवळा घालिसी गळां माळा
रुद्राक्षांच्या खळा। तरि तूं आंत मलिन ओंवळा।

यांमधील अनुप्रास सुरेख आहे. वाग्युद्धाचें हिरण्यगर्भानें "जेव्हां वाद भरा आला। चढलें स्फुरण अधिक त्याला" या पदांत केलेलें वर्णन रूपकाच्या दृष्टीनें अप्रतिम आहे. "सदय शांत असती मरणा। भीति तुझी वाटेना" या पदांत केलेलें मृत्यूचें वर्णन शांत रसाचें उत्तम उदाहरण आहे. तसेंच–

"बल ज्याचें त्यास तें–"
"जो भेद विधीनें स्त्री पुरुषीं केला"
"नका करूं अविचार"
"नागिण चपला खलजिव्हा–"

या पदांमधील कल्पना मार्मिक आहेत. त्याचप्रमाणें भुजंगमहाराजांचा कटाव–

"श्रीमंत पतीची राणी मग काय थाट तो पुसतां

× × ×

"बाळपणींचा काळ सुखाचा आठवतो घडि घडीं।

श्रीमंतांना पाठविलेला प्रासादिक फटका,

"तूं टाक चिरुनि ही मान। नको अनमान

× × +

जी मला जन्म दे आई तीहि या काळीं"

वगैरे पदें उत्तमांपैकीं आहेत.

या पुस्तकांतील लेखनपद्धतीबद्दल दोन शब्द लिहिणें अवश्य आहे. बायकांची वगैरे भाषा त्या जशी बोलतात तशी छापण्याचा यत्न केला आहे. परंतु हा नियम गद्याला मात्र लागू केलेला आढळतो, पद्यांमध्यें व्याकरणशुद्ध भाषाच वापरली आहे. हा असा भेद कां असावा हें कळत नाहीं. ग्रंथकारांनी सर्वत्र व्याकरणशुद्ध भाषा छापली ह्मणून कांहीं नुकसान होईल असें नाहीं; उलट त्यापासून फायदाच होईल असा आमचा ग्रह आहे. कारण व्याकरणशुद्ध भाषा छापल्यानें वाचकांस तिचें खरें स्वरूप समजून, हे कृत्रिम पद्धतीचे लेख वाचतांना जो कित्येकांस अडखळण्याचा प्रसंग येतो, तोही टळेल. शिवाय गातांना व्याकरणशुद्ध आणि बोलतांना अशुद्ध भाषा वापरण्याचा जो हास्यास्पद प्रकार करण्यांत येतो, त्यालाही यामुळें फांटा मिळेल. यासाठीं, दोहों प्रसंगीं भाषा लिहिण्याची पद्धति एकच येईल तर बरी; पण त्यांत पुनः दोहों प्रसंगीं ती व्याकरणशुद्धच येईल, तर फार उत्तम, असें आह्मांस वाटतें.

या पुस्तकांतील भाषाविषयक दुसरा ठळक दोष ह्मणजे अनुस्वारांची रेलचेल हा होय. याचे कांहीं नमुने वर या पुस्तकांतून दिलेल्या उताऱ्यांवरूनही दिसून येतील. याबद्दल ग्रंथकारांस अथवा या पुस्तकाच्या संशोधनाचें काम ज्यांनीं केलें त्यांस जबाबदार धरावयाचें कळत नाहीं. या मुद्यासंबंधानें अन्य ठिकाणीं यथायोग्य चर्चा झालेली आहे, तेव्हां येथें चर्वित चर्वण करण्याची आमची इच्छा नाहीं.

रा. देवल यांनीं या बाबतींत आपली लेख-

णी उचलली याबद्दल आह्मीं त्यांचें वर अभिनंदन केलें आहे. सामाजिक विषयाची चर्चा पुष्कळ वेळां विनोदानें, सौम्य उपहासानें, कळकळीच्या उपदेशानें, व राग, द्वेष, दुःख इत्यादि मनोविकार जागृत करून करावी लागते. करितां योग्य प्रसंगीं पद्याची किंवा गद्याची मदत घेऊन रा. देवलांनीं आपला प्रयत्न अव्याहत चालविल्यास सामाजिक सुधारणेकडे अनुकूल लोकमत जागृत होईल; व आपल्या सुधारणा समाजावर कायद्यानें न लादतां, अगर लोकांची अवहेलना न करितां, अगर सुधारकांचा स्वतंत्र वर्ग न बनवितां, समाजामध्येंच जागृति उत्पन्न होऊन अशा सुधारणेस त्याचें पाठबळ मिळेल. मात्र या बाबतींत भुजंग महाराजांसारखी गुडघ्याला बाशिंग बांधण्याची घाई किंवा अप्रयोजकपणा करून उपयोग नाहीं. तेव्हां हें तत्त्व लक्षांत बाळगून जर रा. देवल आपल्या अनुभवाचा, विद्वत्तेचा आणि कवित्वाचा उपयोग या दिशेनें करतील तर ज्या सुधारक पक्षाच्या वतीनें ते खटपट करीत आहेत त्यास पुष्कळ साहाय्य होऊन रा. देवलांच्या श्रमाचें सार्थक होईल. असो. तेव्हां रा. देवल यांस “ गम्यतां तावत् पुनर्दर्शनाय ” अशी सप्रेम विनंती करून त्यांची आह्मी रजा घेतों.



# फिरंग्यांची इकडील हकीकत.

( १९२ पृष्ठावरून पुढें चालू. )

ज्या घडीस अल्बुकर्क कनानूर मुक्कामीं आला, त्या घडीस जशी अल्मीदाच्या तशी अल्बुकर्काच्याही मनाची घडी बरीच बिघडली, यांत नवल नाहीं. दीव मुक्कामीं जो मुलगा पडला, त्याचा सूड उगवण्याची तयारी चालली आहे, इतक्यांतच नवीन गव्हर्नरानें येऊन हजर रहावें, हें अल्मीदास मध्येंच विघ्न आल्यासारखें भासलें. सूडाची मनीषा पूर्ण होण्यापूर्वीं राजमुख्त्यारकी अल्बुकर्काच्या पदरीं टाकण्याचा प्रसंग कोसळल्यामुळें, अल्मीदाच्या कपाळास आंठी पडणें साहजीक होतें. अल्बुकर्क येऊन पहातो, तों तिघेही बंडखोर कप्तान अल्मीदाचे मसलती बनून गेलेले आढळले; ह्मणून अल्बुकर्काच्याही पायांची आग मस्तकीं गेल्यास नवल नाहीं. याप्रमाणें दोघेही एकमेकांस पाण्यांत पाहूं लागले.

कांहीं दिवसांनीं अल्बुकर्कानें खांसा जाऊन खांसा अल्मीदाची भेट घेतली. तेव्हां एक महिन्याची मुदत अजून राहिलेली आहे, ती पुरी होतांच आपण राजमुख्त्यारकी हवालीं करूं, असें अल्मीदा ह्मणाला. कांहीं दिवसांनीं आपला चिटणीस सिन्त्रा यास अल्बुकर्कानें अल्मीदाकडे पाठविलें व बरोबर दिलेले दस्तैवज गव्हर्नरास दाखवण्यास सांगितलें. “दीवहून परत येईपर्यंत हे दस्तैवज असेच गुंडाळून ठेवावे ” असें अल्मीदा सिन्त्रास ह्मणाला. “ आतां राजमुख्त्यारकी माझी लागल्यामुळें दीववर स्वारी करणें माझें काम आहे ” असा उलट निरोप पुन्हा अल्बुकर्कानें सिन्त्राबरोबर अल्मी-

दाकडे पाठविला. आणखींही उलटे सुलटे निरोप दोहोंनीं दिले घेतले. पण सगळे कप्तान अल्मीदानें वश करून घेतलेले जेव्हां दिसले, तेव्हां अल्बुकर्क कनानूरहून कोचीन मुक्कामीं गेला. कोचीन मुक्कामच्या फिरंग्यांनीं एकदम राजमुख्त्यारकी स्वीकारण्याची त्यास सल्ला दिली; पण ती अल्बुकर्कानें मंजूर केली नाहीं, हें ठीक केलें. जरी दाखवावा तितका व तसा शान्तपणा व गंभीरपणा अल्बुकर्कानें कित्येक प्रसंगीं दाखविला नाहीं, तरी लष्करी वळण लागलेला अल्बुकर्क एकंदरींत घसरला नाहीं, तें कबूल केल्याशिवाय सुटका नाहीं. अल्मीदा मात्र—जसा उगाळलेला कोळसा, तसा—अधिकाधिक काळा दिसतो. असल्यास योग्य शिक्षा ह्मटली ह्मणजे बऱ्याच लांब मुदतीच्या सख्त मजुरीची किंवा काळ्या पाण्याची; हलक्या शिक्षेनें असलें हट्टी व खुनशी माणूस वठणीस येण्यासारखें नसतें.

पुढें लौकरच अल्मीदानें दीववर मोहीम केली. अल्मीदाबरोबर १९ मन्वारें असून, शिपाई व खलाशी मिळून १९०० लोक होते. या १९०० पैकीं ४०० मलबारी होते. हें आर्मार पहिल्यानें अंजदीव मुक्कामीं आलें; तेथून निघालें तें डिसेंबर ३० वीस दाभोळ बंदरीं लागलें. दाभोळ जाळून खाक व लुटून फन्ना करून, इ. १५०९ मध्यें जानेवारीचे ५ वे तारखेस या फिरंगी वेताळाची स्वारी निघाली, ती २१ वे तारिखेस माहीम बंदरीं लागली. दाभोळची हकीकत कानीं पडल्यामुळें माहीमकरांनीं पूर्वींच पोबारा केला होता; ह्मणून लांकडें व दुसरीही सामग्री फिरंग्यांचे हातीं मनमुराद लागली. पुढें फेब्रेवारीच्या दुसरे तारखेस फिरंगी दीवपुढें आले. लढाईंत मुसलमानांचा पुरा मोड झाला, फिरंग्यांस लूट पुष्कळ मिळाली, व किल्ला मजबूत दिसल्यामुळें हल्ला करण्याचें सोडून देऊन अल्मीदा पाठीमागें वळला. चौल मुक्कामीं लागून अल्मीदानें निजामापासून खंडणी घेतली, असें फिरंगी ह्मणतात. या काळीं चौलावर अहमदनगरच्या निजामशाहीचा अंमल असून इ. १५०९ हें अहमदशहा वारल्याचें किंवा बुऱ्हाण गादीवर बसल्याचें वर्ष ह्मणतात; त्यापक्षीं हा निजाम अहमदशहाचा प्रसिद्ध बाप निजामुल्मुल्क असण्याचा संभव नाहीं, हें उघड आहे. निजाम हें चौलच्या सुभेदाराचें नांव असल्यास न कळे. जर हें सुभेदाराचें नांव नसलें, तर अज्ञानामुळें "निजामशाही" शब्दाबद्दल "निजामुल्मुल्क" शब्दाचा प्रयोग फिरंग्यांकडून झालेला दिसतो. तरी देखील फिरंग्यांनीं निजामशाहीस खंडणी देऊं लावलें, असें समजणें बरोबर होणार नाहीं. या काळीं फिरंगी हे पाण्यांतले दरोडेखोर दिसतात. एकाएकीं एकाद्या बंदरीं लागून, तें जाळून खाक करावें व लुटून फन्ना करावें, सांपडेल तो माल लांबवावा, जे आड येतील त्यांस कापून काढावें व लौकरच गलबतांतून पळून जावें—अशी फिरंग्यांची पद्धत होती. असें दिसतें कीं, अल्मीदानें सुभेदाराजवळ ३०००० क्रुझेदो पहिल्या हप्त्याचे ह्मणून मागून, पुढें सालिना १०००० क्रुझेदोंची सालिना खंडणी मागितली. पण सुभेदारानें फक्त २००० क्रुझेदो जवळ असल्याचें कळवलें. तितकेच गट्ट करून अल्मीदानें चौलबंदरास रामराम ठोकला. या सगळ्या वागणुकीचा विचार केल्यास फिरंग्यांस "पाण्यांतले दरोडेखोर" हेंच नांव शोभतें, नव्हे काय ? जे पैसे दपटशा देऊन अल्मीदास उपटतां आले, त्यांस फिरंग्यांनीं "खंडणी" नांव दिलें; ती खरी "खंडणी" नसून "नि-

जामुल्मुल्क " हेंही नांव राजाचें नसतां केवळ सुभेदाराचें होतें व सुभेदाराचें नसल्यास निजामशाहीस चुकीनें फिरंग्यांकडून लावण्यांत आलें, अशी मूळची हकीकत दिसते. पुढें मार्च ८ रोजीं अल्मीदा कोचीन मुक्कामीं लागला. लौकरच अल्बुकर्कानें आपला अधिकार आपणास देण्याचा अर्ज केला. या प्रसंगीं अल्मीदानें आपल्या दांडगाईची कमाल केली. आणि " जो कोणी अल्बुकर्काच्या पक्षास मिळेल, तो कितीही मोठा असला, तरी कैद केला जाईल " अशी पुष्कळांस त्यानें धमकी दिली. तरी गास्पर पेरेरा ह्मणून कारकून अल्बुकर्कास मन्वेल राजानें दिला होता, त्यानें अल्बुकर्काची तरफदारी उघड चालवली. याप्रकारें आपला अधिकार मागितला यांत अल्बुकर्कानें किंवा अल्बुकर्काची तरफदारी उघड चालवली यांत गास्परनें कांहींच गैर केलें नाहीं. उलट असें न केलें असतें, तर मात्र दोहोंचेंही पदरीं बराच दोष टाकावा लागता. येथून अल्मीदाच्या खऱ्या दुष्टपणास आरंभ झाला. हा दुष्टपणा झाला, इतकेंच नव्हे, तर राजद्रोहही झाला. मुलाच्या मरणाचा सूड उगवण्याचें निमित्त तरी पूर्वी सांगण्यास होतें. पण या प्रसंगीं तेंही राहिलें नव्हतें. परत आल्यानंतर अल्मीदाचें पहिलें काम अल्बुकर्काचा अधिकार अल्बुकर्काचे पदरीं टाकण्याचें होतें, तें पहिल्यानें करावयाचें काम न करतां अल्मीदा अल्बुकर्कावरच उलट खार काढूं पहातो, हा धडधडीत राजद्रोह होतो.

येथेंच अल्मीदाची धांव संपली, असें समजूं नये. एका चुकीचे समर्थनासाठीं दुसरी, दुसरीचे समर्थनासाठीं तिसरी, तिसरीचे समर्थनासाठीं चवथी—अशी चुक्यांची परंपरा एका चुकीमुळें लागण्याचे प्रसंग येतात. कोचीनच्या राजास ही स्थिति पसंत पडली नाहीं, त्यांत नवल नाहीं. कोणाही व्यवस्थेच्या कैवाऱ्यास ही स्थिती नापसंतच व्हावयाची. पुर्तुगालच्या राजास ही स्थिति कळविण्याचें कोचीनच्या दर्बारीं घाटत होतें, तें अल्मीदास कळलें. यांत अल्बुकर्काचा हात असल्यास त्याच्यावर दोष बिलकुल येत नाहीं. पुर्तुगालच्या राजास राजद्रोहाची खबर कळवण्यासाठीं जर अल्बुकर्क खटपट करीत आहे, तर तो उजू वाटेनें जात आहे. पण अल्बुकर्कास घराच्या बाहेर न पडण्याबद्दल व दुसऱ्या कोणासही आपले घरीं न येऊं देण्याबद्दल, जे दोन हुकूम अल्मीदानें सोडले व लगेच अमलांतही आणले, ती मात्र अगदीं आडवाट व दांडगाईची शिकस्त ठरते.

इतकेंही करून अल्मीदाची तृप्ति झाली नाहीं. मन्वेल राजानें मलाक्का शोधण्यासाटीं चार मन्वारांनिशीं पाठविलेला सिक्विरा याच समयीं कोचीन मुक्कामीं आला. " अल्मीदानें अल्बुकर्कच्या हुरमुझ मुक्कामींच्या गैरवर्तनाची चौकशी मन्वेलराजाकडून होईपर्यंत आपण राजमुखत्यारकीचा राजीनामा देऊं नये " अशा अर्थाचा एक अर्ज आपल्या बगलबच्चांकडून लिहिवला व चौघांच्या समक्ष व नव्या पाहुण्यादेखत तो आपणास भर दरबारांत सादर करूं लावला. पुढें कोचीनच्या राजाची सही इष्ट होती, ह्मणून त्याच्याकडे हा अर्ज धाडण्यांत आला आणि " अल्बुकर्क कलिकतकरांशीं सन्धान बांधून कोचीनचा व्यापार बुडवूं पहात आहे " अशा अर्थाचा निरोपही अर्जाबरोबर देण्यांत आला ! ! ! कोचीनच्या राजानें सही न करतां अर्ज परत पाठविला; इतकेंच नव्हे, तर " राजाच्या आज्ञेनुरूप अल्बुकर्काच्या पदरीं राज-

मुखत्यारकी टाकण्यांत येत नाहीं, ही बरीच दांडगी चूक अल्मीदाकडून होत आहे" असा उलट निरोपही बरोबर दिला.

तरीही अल्मीदाचे किंवा अल्मीदानें डोळे उघडले नाहींत. अल्बुकर्काकडून झालेल्या गुन्ह्यांची नांवनिशी व पुरावा लिहून, एखाद्या विश्वासू माणसाबरोर तीं रवाना करण्यांत यावीं अशा अभिप्रायाचें पत्र अल्मीदाकडून अत्तरखोजास गेलें. जाव नांवाचा अल्बुकर्काचा स्नेही होता त्यास पकडलें, तेव्हां मात्र अल्बुकर्क अल्मीदाकडे खासा गेला. पण अल्मीदा कांहीं शब्द टाकून बोलला आणि अल्बुकर्काच्या घरा सभोंवतीं खडा पहारा बसून, गास्परच्या कपाळीं बेड्यांनिशीं तुरुंग आला ! ! ! फ्रान्सिस्को नांवाचा "फ्रायर"—म्हणजे क्याथोलिक सन्यासी—अल्बुकर्काजवळ क्याथोलिकांच्या शिरस्त्याप्रमाणें होता त्यास व दुमार्त नांवाचा अल्बुकर्काचा वाढप्या होता त्यास—मिळून या दोघांजणांस फितवायासाठीं दांडगा यत्न अल्मीदाकडून झाला, पण तो सगळा वायां गेला. तेव्हां अन्तोनियो नांवाचा फिरंगी मलबारी भाषा जाणणार होता, त्याच्या जवळून—कलिकतकरांकडून अल्बुकर्कास एक पत्र व त्या पत्राचा अल्बुकर्काकडचा जबाब, असे—दोन दस्तैवज लिहविले व आपले हातीं अल्मीदानें एके दिवशीं टाकविले !! ! सारांश, खोट्या दस्तैवजापर्यंतही राजद्रोही राजमुखत्याराची मजल आली ! ! ! या खोट्या दस्तैवजांच्या जोरावर कनानूरच्या किल्यांत कैदीप्रमाणें अल्बुकर्कास ठेवण्याचा हुकुम सोडला, आणि लगेच त्यास गलबतावर चढवून तो दुष्टपणाचा हुकूम अमलांत आणण्याचेंही काम अल्मीदानें चालवलें ! ! !

याप्रमाणें अल्मीदाचें मन भरधांव धांवत चाललें होतें. पण "मिथ्या धांव मनाची" हेंच एकंदरींत या संसारांतलें तत्त्व दिसतें. "मर्जी देवाची देवाची" हेंच सत्य, त्रिवार सत्य आहे. मनुष्य जरी बोलून चालून अल्पज्ञ ठरलेला आहे, तरी तो बेटा कधीं कधीं सर्वज्ञाशींही झगडा करूं पहातो आणि विडा उचलतो !

"मीं अल्पज्ञ कोठें, जगन्नियन्ता सर्वज्ञ कोठें" हा विचार दुरभिमानानें सर्वतोपरी फुगलेल्या मनुष्याचे स्वप्नींही येत नाहीं. असलीं माणसें ख्रिस्ती असलीं, मुसलमान असलीं, ब्राह्मण असलीं, तरीं सगळीं सोंगाडीं होत; हें अस्सल नाणें नव्हे, हे सगळे ढबू मानावे लागतात. दैवाशीं झगडण्याचा भाग निराळा, देवाशीं झगडण्याचा भाग निराळा. दैव कितीही प्रतिकूल असलें तरी त्याच्याशीं धीर धरून एकसारखें झगडणें व देवावर पूर्ण भरंवसा ठेवून न डगमगतां जीव बाहेर पडून कुडी थंड होईपर्यंत कर्तव्य करणें हें दैवाशीं झगडणें होय; यांत अपयश आलेलें पुरवतें, यांत आलेलें अपयश विचारांतीं यशच ठरतें. असलें माणूस सोंग नव्हे, ढबू नव्हे; तें अस्सल नाणें, तें दरोबस्त मानवी जातीचें मंदील होय. अल्बुकर्काचा झगडा उघड दैवाशीं चाललेला होता, देवाशीं चाललेला नव्हता. पण अल्मीदाचा झगडा दैवाशीं चाललेला नसून, देवाशीं चाललेला होता. अल्मीदानें दीवमुक्कामीं शेंकडों मुसलमानांचे बळी जलदेवतेस दिल्यानन्तर त्याचा दैवाशीं झगडा संपला आणि देवाशीं झगडा सुरू झाला; अर्थातच अल्मीदा सोंगाड्या ठरतो, ढबू ठरतो; अस्सल नाणें ठरत नाहीं. अल्बुकर्क जितका खरा ख्रिस्ती येथपर्यंत दिसतो तितकाच दीवहून परत आल्या दिवसापासून

राजमुख्त्यार अल्मीदा हा सोंगाड्या ख्रिस्ती बनलेला मानावा लागतो. अल्बुकर्काचा हा झगडा दैवाशीं होता, देवाशीं नव्हता, ह्मणून अल्बुकर्क शेवटीं तरला; अल्मीदानें झगडा चालवला होता, तो देवाशीं चालवला होता, दैवाशीं चालवलेला नव्हता, ह्मणून अल्मीदा सरतेशेवटीं साफ बुडाला. अल्बुकर्क तरला व अल्मीदा बुडाला, या दोन्ही गोष्टी या सृष्टीमध्यें जशा घडून आल्या पाहिजेत, तशाच घडून आल्या.

अल्मीदानें मनांत पुष्कळ मांडे खाल्ले, पण शेवटीं त्यास पदरीं धोंडे घ्यावे लागले. कुतिन्हो नांवाचा अल्बुकर्काचा भाचा आक्टोबरच्या २९ तारखेस कनानूर बंदरीं लागला. याच्या आज्ञेंत १९ मन्वारें होतीं व मन्वारांतला सगळा माल आणि रोकड अल्बुकर्क राजमुख्त्याराच्या पदरीं टाकण्याची आज्ञा त्यास राजानें केली होती. बंदरीं लागतांच अल्बुकर्क किल्ल्यांत कैदी आहे ही वार्ता कानीं पडल्यामुळें कुतिन्होस मोठें नवल वाटलें. अल्बुकर्कास कैदेंतून सोडवून लगेच कुतिन्होनें आपणाबरोबर घेतलें आणि कोचीनकडे सुकाणूं फिरवलें. नोवेंबरच्या ४ थीस कुतिन्हो कोचीन मुक्कामीं लागला, आणि अल्मीदानें तंटा मिटवावा ह्मणून यत्न करूं लागला. पण अल्मीदा खट्टू झाला होता; संतापलाही होता. त्यानें ५ वे तारखेस आदितवारीं राजमुख्त्यारकी अल्बुकर्काच्या पदरीं घातली व १० वे तारिखेस गलबतांत बसून कनानूरची दिशा धरली. १९ तारखेस अल्मीदा कनानूरहून आफ्रिकेकडे वळला. "गुडहोप"च्या "केप"ला वळसा घालून साल्दान्हाच्या उपसागरांत पाणी घेण्यासाठीं अल्मीदानें वरवा केला. या प्रसंगीं किनाऱ्यावर देशी लोकांशीं मालाची अदलाबदल चालली असतां, अल्मीदाच्या एका माणसानें इतका फाजिलपणा केला कीं दोघांकडून दोन्ही थोबाडांत बसून शेवटीं त्यास आपल्या बत्तिशीचा बळी द्यावा लागला. बत्तिशी पाडणाऱ्या लोकांस शासन करण्याचें पदरच्यांनीं सुचवलें, तें मानवून अल्मीदा १५० गोऱ्यांनिशीं शिद्यांच्या पाठीस लागला. पाठलाग करतां करतां बरींच गुरें व मुलें पकडून घेतल्यानंतर एका गांवढ्याहून अल्मीदा पुन्हा किनाऱ्याकडे वळला. वाटेवर १७० शिद्यांनीं एका डोंगरावरून मोठ्या वेगानें उतरून इतक्या नेटानें फिरंग्यांवर हल्ला केला कीं ५० फिरंगी ठार केले. या ५० मध्यें राजमुख्त्यार अल्मीदा याच्याही तोंडास किनाऱ्यावरची वाळू खावी लागली. बाकीचे फिरंगी आपलें गोरें तोंड काळें करून गलबतांत धांदलीनें पळाले. पुढें शिद्दी नजरेच्या पलीकडे गेलेले पाहून फिरंग्यांनीं पुन्हा किनाऱ्यावर पाऊल ठेवलें आणि अल्मीदास ख्रिस्ती रिवाजाप्रमाणें मूठमाती दिली. याप्रमाणें अल्मीदाचा अंत झाला. इकडच्या कुकर्मांचें कडू फळ त्यास इकडच्या इकडेसच मिळण्याची योजना जगन्नियंत्याकडून झाली, ती ठीक झाली.

अल्बुकर्कानें पहिल्यापासून हार घेतली, त्याबद्दल त्याची तारीफ करावी तितकी थोडी. पदरीं माणसें अल्बुकर्कासारखीं हवींत, अल्मीदासारखीं नकोत. अल्बुकर्कासारखीं माणसें घरांत फाटत असल्यास न फाटावें ह्मणून झटतील, फाटलें असल्यास ठिगळ तरी नीट लावतील; अल्मीदासारखीं माणसें फाटत नसल्यास फाडण्यास यत्न करतील, फाटलेलें दिसल्यास ठिगळ लावण्याचें एकेबाजूस ठेवून पहिल्योन जास्त फाडण्याचें काम चालवतील. गोऱ्या अल्बुकर्काची

जशी व जितकी तारीफ केली पाहिजे तितकी, किंबहुना त्याहून प्रसंगीं कांकणभर जास्त, काळ्या कोचीनकराची केली पाहिजे. अल्बुकर्कानें सचोटी ठेवली ती स्वार्थासाठीं ठेवली, असें क्षणभर ह्मणतां येईल. पण तसा आक्षेप कोचीनकरावर आणतां येत नाहीं. जर कोचीनकर अल्मीदाच्या बाजूस वळता व अर्जावर सही करता, तर अल्मीदानें कोचीनकराचा कमजास्त फायदाच करून दिला असता. अशा प्रकारें जगिक फायदा करून घेण्याची सवड सांपडली असतां ती घालवावी आणि निव्वळ सचोटीसाठीं अल्बुकर्काची बाजू शेवटपर्यंत न सोडतां स्वतःसही बरेंच धोक्यांत घालून घ्यावें, यांत कोचीनकराचा किती तरी थोरपणा दिसून येत आहे. कवडीचाही स्वार्थ साधण्याचा संभव नसतां व उलट जीव धोक्यांत पडण्याचा योग उघड दिसत असतां, खऱ्याची बाजू सोडीत नाहीं, ह्मणून कोचीनकर कांकणभर जास्त; आपला जीव धोक्यांत घालतो आणि कैदही निमूटपणें सोसतो, हें सगळें कडू फळ पहिल्यानें खातो; कां, तर आपला मोठा स्वार्थ साधून घेण्यासाठीं; ह्मणून अल्बुकर्क कांकणभर कमी. जर कोचीनकराची किंवा अल्बुकर्काची या प्रसंगीं चलबिचल झाली असती, जर दोघांनींही दाखवलेला निश्चय या प्रसंगीं दाखविला नसता, तर फिरंगी अम्मल कदाचित् बुडालाही असता. जर फिरंगी अम्मल या काळीं टिकाव धरून राहिला, तर त्याचें श्रेय अल्बुकर्क व कोचीनकर या दोहोंसही दिलें पाहिजे; इतकेंच कीं कोचीनकरांच्या पदरीं जितका मोठा वांटा घालावा लागेल, तितका मोठा अल्बुकर्काचे पदरीं पडणें नाहीं.

मन्वेल राजाचें धोरण दांडगें दिसतें. मन्वेलासारखा धोरणी राजा गादीवर असला, ह्मणजे भोंवतालच्या राजांनीं फारच खबरदारी ठेवली पाहिजे; जर ती तशी न ठेवली, तर धोरणी राजा आपल्या धोरणानें कित्येकांस चालूं लावून शेवटीं आपला पगडा सर्वांच्यावर ठेवण्यास चुकणार नाहीं. कलिकतकर बराच बलाढ्य आहे, हें मन्वेलाच्या लक्षांत येऊन चुकलें होतें. त्यास बुडवल्याशिवाय फिरंग्यांस आपली डाळ हवी तशी शिजवतां येण्याचा संभव उघड नव्हता. कलिकतकरास बुडविण्याच्या कामीं अल्बुकर्काची योजना मन्वेलास कर्तव्य होती. अर्थातच मन्वेल राजा गुणाचाही मोठा पारखी दिसतो. गुणांची पारख असून, त्या पारखीच्या अनुरोधानें वडाची साल वडास व पिंपळाची साल पिंपळास लावण्यांत आली, ह्मणजे काम सुरेख वठतें. पण गाजरपारखीपणा असून त्याच्या अनुरोधानें वडाची साल पिंपळास व पिंपळाची साल वडास लाविली, ह्मणजे काम कुरेख झालें आणि रसातळीं जाण्याची तयारी उघड चालली. मन्वेल गाजरपारखी नव्हता, तर रत्नपारखी होता; ह्मणून या रत्नाची योजना योग्य कामीं करण्याचा संकल्प त्यानें पूर्वींच करून ठेवला होता. इतकेंच कीं हा संकल्प दोन कानांच्या मसलतीप्रमाणें त्यानें—आपल्या मनाच्या मंजूषेमध्यें ह्मणा—अगदीं गुप्त राखून ठेवला होता. अल्मीदाचीं ३ वर्षें भरून अल्बुकर्काचे हातीं राजमुख्त्यारकी पडली, अशा विचारानें हें आपलें मनोगत अल्बुकर्कास कळण्यास ह्मणून कुतिन्होची रवानगी बऱ्याच मालानिशीं व रोकडीनिशीं मलबारप्रांतीं मन्वेल राजाकडून करण्यांत आली होती. ह्मणून राजमुख्त्यारकी पदरांत टाकल्या-

नंतर लौकरच गास्पर चिटणिसास कुतिन्होनें एकांतीं बोलाविलें आणि मन्वेलचा मनोदय अल्बुकर्कास कळविण्यास सांगितलें. ही राजाची इच्छा कळल्यानें अल्बुकर्कास दुधांत साखर पडल्यासारखें झालें आणि तो लगेच तयारीस लागला. पण मसलत अगदीं गुप्त ठेवण्यासाठीं ह्मणून गोंवें सर करण्याच्या गोष्टी फिरंग्यांनीं चालविल्या आणि फिरंगी बोलींत " तिमोजा " बनलेल्या तिमाजीबरोबर बोलणें सुरू केलें.

हें खलबत कोचीनकरास कळविण्यांत आलें होतें; ह्मणून त्यानें फौजेची वगैरे इत्थंभूत माहिती मिळविण्यासाठीं ह्मणून दोन ब्राह्मण कलिकत मुक्कामीं पाठविले होते; इतकेंच नाहीं, तर जशा स्वतंत्र तशा करभार देणाऱ्याही बऱ्याच रजवाड्यांस व पाळेगारांस कलिकतकरांच्या विरूद्ध पुंडाई माजविण्याची सूचना करण्यांत आली होती, आणि २० पडाव सामग्री व फौज नेण्या आणण्यासाठीं फिरंग्यांच्या तैनातीस लावण्यांत आले होते. जे दोन ब्राह्मण जासूद कोचीनकरानें पाठवले होते, त्यांनीं कलिकतकर बऱ्याच लांबच्या स्वारीवर गेल्याची आणि कांहीं दिवस त्या स्वारींत गुंतलेला रहाण्याचा खबर आणली. दुसरीही कच्ची हकीकत बरीच आणली होती, ती सगळी कोचीनकराच्या आणि फिरंग्यांच्या पुढें मांडली. तेव्हां डिसेम्बरच्या शेवटच्या दिवशीं कलिकतवर स्वारी करण्याचा ठराव लष्करी कामगारांच्या मिजलशींत करण्यांत आला. २० मन्वारें व पडावांतून आणखीं २००० फिरंगी—इतकी लष्करी सामग्री कलिकतवर योजण्यांत आली.

ठरावाप्रमाणें नेमलेल्या दिवशीं लष्करानें प्रस्थान ठेवलें. इ० १५१० च्या जानेवारीच्या ३ ऱ्या तारखेस फिरंगी कलिकतच्या पुढें येऊन थडकले, व ४ थ्या तारखेस सकाळींच बंदरावर उतरले. या प्रसंगीं आघाडी कुतिन्होच्या हवालीं होती. कुतिन्हो लगेच पुढें सरसावला, कलिकतकर कांहीं पाठी हटले. फिरंग्यांनीं त्यांच्या शिरस्त्याप्रमाणें एक मशीद किंवा देऊळ वाटेवर लागलें त्यास आग लावली, आणि कलिकत सर करून टाकल्याचा मांडा मनांत खाल्ला. लौकरच राजवाड्यापुढें फिरंगी आले, आणि फळ हातीं लागल्याचा भास होऊन तें तोंडांत टाकण्याची जंगी तयारी चालविली. पण जे कलिकतकर पूर्वीं पळाल्यासारखे वाटले होते, तेच आतां चाऱ्ही बाजूंनीं जमूं लागले; अर्थातच कलिकतकर पुढून पाठीमागून दाबीत जाणारसा भास झाला, आणि राजवाड्यास आग लावण्याचें काम पहिल्यानें करून कुतिन्होनें व फिरंग्यांनीं लगेच बंदरची दिशा धरली. फिरंगी हटतोसा दिसतांच नाईर नेटानें पाठलाग करूं लागला आणि तुंबळ रण माजलें. कुतिन्हो ठार झाला, बरेच लष्करी सरदारही जिवास मुकले; अल्बुकर्कास खांद्यावर दोन जखमा लागल्यामुळें फिरंग्यांनीं पहिल्यानेंच लांबवलें तें ठीक केलें. फिरंगी जीव घेऊन हरिणांच्या किंवा सशांच्या पायांनीं गलबतावर पळाले ह्मणून ह्मणा, अगर, फिरंगी ग्रंथकारांवर भरंवसा ठेवणें असल्यास, जास्त फिरंग्यांची कुमक आली होती तिची तलवारबहादुरी दिसली ह्मणून ह्मणा—कलिकतकरांनीं दिलेलें उसनें जागच्या जागेवर फिटलेलें दिसतांच विसांवा खाल्ला. असली हकीकत वाचली, ह्मणजे काळे अगदीं कोल्हीं नव्हत, आणि गोरे अगदीं सिंहें नव्हत—ही एक दांडगी गोष्ट सहज सिद्ध होते. एकंदरींत शिस्त नसल्यामुळें काळ्यांनीं गमावलें, एकंदरींत शिस्त असल्यामुळें गोऱ्यांनीं कमावलें—

हाच इत्यर्थ ठरतो. शिस्तीशिवाय जूट होणें नाहीं, व जुटाशिवाय अवसान येणें किंवा वाढणें नाहीं. गोरे आज शेंकडो वर्षांपासून शिस्तीनें रहाण्यास शिकले आहेत; शिस्त ह्मणजे काय तें काळ्यांच्या स्वप्नींही येण्याचें किंवा दिसण्याचें बंद पडून, आज मितीस शेंकडो वर्षें झालीं आहेत.

पुढें एके बाजूनें कलिकतकरास बुडवतां येत नाहींसें पाहून अल्बुकर्कानें, प्रसंगीं दुसरे बाजूनही मार मिळावा या हेतूनें, विजयनगरच्या नरसिंगरायाशीं बोलणें चालवलें, आणि बोलणें कबूल केल्यास हुर्मुझहून येणारे सगळे घोडे दुसरे बंदरीं न लावतां भटकल बंदरीं लावण्याचें आंगावर घेतलें. भटकलपासून मंगळूरपर्यंत जी कोंकणपट्टीची पट्टी विजयनगरकराच्या ताब्यांत होती, तिच्यामध्यें वखारीसाठीं जागाही अल्बुकर्कानें विजयनगरकराजवळ मागितली.

कलिकतकरास बुडवण्याचा मुत्सद्दीपणा मन्वेलचा दिसतो, अल्बुकर्काचा दिसत नाहीं; पण गोंवें सर करून तेथें स्वतंत्रपणें फिरंग्यांची सत्ता स्थापण्याचा मुत्सद्दीपणा अल्बुकर्काचाच दिसतो. अल्मीदा कोचीन मुक्कामीं रहात होता; पण कोचीनमध्यें मुख्य सत्ता कोचीनकराची असल्यामुळें, फिरंग्यांकडे गौणपणा आला होता. जसा कोचीनकर होता, जसा विजयनगरकर किंवा विजापुरकर होता, तसा फिरंगी मलबारांत व्हावा, अशी बळकट इच्छा अल्बुकर्काची दिसते. फिरंग्यांची राजधानी स्वतंत्र असली, ह्मणजे राजेरजवाड्यांशीं बरोबरीचें नातें राहिलें असें अल्बुकर्कानें ताडलें होतें, तें अगदीं बरोबर होतें. सारांश, फिरंगी राजसत्तेचीं मुळें मलबाराच्या जमिनींत जितकीं खोल शिरतील, तितकीं खोल अल्बुकर्क शिरवूं पहात होता. ह्मणूनच तिमाजीबरोबर अल्बुकर्कानें बराच स्नेह ठेवला होता. तिमाजी हा होनावर महालाचा महालकरी दिसतो. भटकलपासून मंगळूरपर्यंत पट्टी फिरंग्यांच्या ह्मणण्याप्रमाणें विजयनगरकराच्या ताब्यांत होती. होनावरचा छोटा महाल या पट्टीच्या उत्तरेस असून होनावरास वर जो गोमंतक प्रांत लागून होता, तो अदिलशाहीच्या ताब्यांत होता. गोमंतक प्रांतीं मुसलमानांचा अंमल होऊन ४० वर्षें झालीं होतीं व पूर्वी या प्रांतीं अंमल विजयनगरकराचा होता, असें फिरंग्यांच्या लेखांत येतें. इ. १३४० मधला विजयनगरकराचा ताम्रपट आहे, त्यावरून त्याकाळीं गोंव्यावर अंमल विजयनगरकराचा होता, याविषयीं शंका रहात नाहीं. सुमारें इ. १३७० पर्यंत विजयनगरकराचा अंमल गोमंतक प्रांतीं असून, त्या इसवी सालीं किंवा त्या इसवी सालाच्या सुमारास तो प्रांत मुसलमानांच्या ह्मणजे ब्राह्मणी बादशाहीच्या अमलांत गेला. इ० १४८९ च्या सुमारास यूसफ अदिलशहानें विजापूरची अदिलशाही स्थापिली, तेव्हांपासून गोमन्तक महाल अदिलशाहीमध्यें दाखल झाला. होनावर महाल हा विजापुरकरास खंडणी देणारा होता, अशी बळकट शंका येते. मलिक नांवाचा अदिलशाही कामगार कांहीं गुन्हा करून गोमंतकांतून पळाला होता, त्याच्या मसलतीनें गोमंतक व होनावर या दोहोंच्या हद्दीवर शिंताकोर नांवाचा गड होता त्यांतला गडकरी तिमाजीनें फितवून ठेवला होता. फेब्रेवारीच्या २९ वीस हा शिन्ताकोर गड ताब्यांत घेऊन फेब्रेवारीच्या २८ वीस फिरंगी मन्वेलचा मुख्त्यार अल्बुकर्क आमच्या तिमाजी होनावरकरानिशीं गोंव्यापुढें येऊन खडा राहिला. गोंव्याच्या गडकऱ्यासह

तिमाजी होनावरकरानें फितवून ठेवलें होतें. ह्मणून आपल्या कप्तानांनिशीं १००० गोरे व २०० मलबारी घेऊन आलेला अल्बुकर्क दिसतांच बोलणें सुरू होऊन मार्चच्या ४ थीस गोंव्याच्या गडकऱ्यानें गडाच्या किल्ल्या अल्बुकर्कीच्या पदरीं टाकल्या ! ! ! याप्रमाणें हिंदू तिमाजी होनावरकरानें शिन्ताकोरचा व गोंव्याचा या दोन मुसलमान गडकऱ्यांस फितवल्यामुळें, गोंवे फिरंग्यांच्या हातीं आलें; तें त्यांनीं सर केलेलें नव्हे.

---

# आईची थोरवी व तिचीं कर्तव्यें.

## भाग पहिला.

[ मागील अंकावरून पुढें चालू. ]

मुलांच्या खस्ता खाऊन त्यांस लहानाचें मोठें करणें हें काम वाटतें तितकें सोपें नाहीं. हें काम करितांना ज्या शेंकडो लहानसहान गोष्टी कराव्या लागतात, त्या दिसायाला फार क्षुल्लक दिसतात; परंतु त्या यथास्थित व बरोबर व्हायाला आईच्याच हाताची गरज लागते. इतर दुसऱ्या कोणाकडूनही तें काम योग्य रीतीनें होत नाहीं. मुलांस त्रास न वाटूं देतां, प्रेमळ व नाजूक रीतीनें त्यांचें संगोपन करून, त्यांस वाढविण्याची हातोटी आईसच साधली असते. आपल्या बाळाबद्दल स्वाभाविकपणें जें अतोनात प्रेम आईस वाटत असतें, त्या प्रेमामुळेंच हें बिकट व नाजूक काम तिच्याकडून चांगलें होतें. आईचें प्रेम कोणती गोष्ट तडीस नेणार नाहीं ? पितृप्रेमापेक्षां मातृप्रेमाची थोरवी फार मोठी आहे. कितीही वर्षें लोटून गेलीं तरी या प्रेमांत कमीपणा व्हावयाचा नाहीं. जे अपराध घडले असतां कोणीही क्षमा करणार नाहीं असे अपराध मुलाकडून घडले व त्याबद्दल आईला अतिशय वाईट वाटलें, तरी ते अपराध, मुलाच्याठायीं असलेल्या नैसर्गिक प्रेमातिरेकानें, ती सहज विसरून जाते. ती आपल्या मनांतलें दुःख व राग एकीकडे ठेवून मुलांस क्षमा करते. घर सोडून मुलगा कितीही लांब गेला, व मुलीचें लग्न होऊन ती सासरीं गेली, तरी आईचें प्रेम त्यांच्या मागोमाग जावयाचेंच. तिला जळीं, तळीं, काष्ठीं, पाषाणीं सर्वत्र अपत्यप्रेमच दिसत असतें. अपत्यांच्या कोणत्याच मागणीला या प्रेमास ना ह्मणतां येत नाहीं. **मातृप्रेम** काय सहन करणार नाहीं ?–कसली क्षमा करणार नाहीं ? कोणती गोष्ट गोड करून सोडणार नाहीं ? कोणत्या कष्टमय व दुःखप्रद गोष्टीचें स्वरूप पालटून तिला आनंदाचें स्वरूप आणणार नाहीं ? याच प्रेमामुळें बाल्यावस्था सुखावह होते. बाल्यावस्थेंतील त्या त्या आनंददायक गोष्टींच्या स्मरणानें संसारांतील अनेक उपाधींनीं व यातायातींनीं क्षुब्ध झालेल्या मनुष्याच्या चित्तवृत्ति, तो मोठा झाल्यावरही, याच प्रेमाच्या स्मरणानें शांत होतात आणि कांहींवेळ तरी तो आनंदानुभव घेतो. मातृप्रेमाची थोरवी वर्णावी तितकी थोडीच. जो धडा शिकत असतांना अति कंटाळवाणा वाटतो, तोच आईजवळ शिकला असतां मनोरंजक वाटूं लागतो. मातृप्रेमाचा हा केवढा प्रभाव ! संसारांत कशाही अडचणी आल्या तरी आईच्या तोंडांतून उत्तेजनाचे शब्द ऐकल्याबरोबर त्या बोलतांबोलतां नाहींतशा होतील, असें वाटूं लागतें. बापानें कांहीं हिताच्या सूचना केल्या तर त्या रुचाव्या तशा न

सूचतां मुलांस उलटया केव्हां केव्हां कटकटी-सारख्या वाटूं लागतात व त्यांस रागही येतो; परंतु त्याच सूचना आईच्या कर्णमधुर शब्दांनीं बाहेर आल्या असतां उपदेशपर वाटूं लागतात. मुलांचे खेळ; तरुणावस्थेंतील त्यांच्या महत्त्वाकांक्षा; त्यांच्या उमेदी; व मोठे झाल्यावर त्यांनीं केलेलीं महत्कृत्यें; त्यांस मिळालेलें यशापयश; त्यांच्या आशा निराशा; त्यांचें सुखदुःख वगैरे त्यांच्या संबंधानें त्या त्या गोष्टींत आईच्या प्रेमाचा जणूं काय प्रवेश होऊनच ती त्यांच्याशीं एकचित्त होते; व प्रसंग येईल त्याप्रमाणें त्यांचें सांत्वन करण्यास, त्यांस धीर देण्यास, त्यांला उपदेश करण्यास, त्यांचें ह्मणणें शांतपणें ऐकून घेण्यास व त्यांचें अभिनंदन करण्यास नेहमीं तयार असते. ज्या गुह्य व भरंवशाच्या गोष्टी मुलाच्यानें आपल्या अतिशय प्रेमळ बापास सांगवत नाहींत, किंवा सांगण्याची त्यास इच्छा होत नाहीं, त्याच तो आईच्या कानांत निःशंक व साफदिलानें सांगतो. ह्मणूनच—

“ उपाध्यायान् दशाचार्य आचार्याणां शतं पिता
“ सहस्रंतु पितॄन्माता गौरवेणातिरिच्यते ”

असें स्मृतिकारांनीं आयांची योग्यता वर्णितांना ह्मटलें आहे तें अगदीं यथार्थ आहे.

हें सर्व अमर्यादित व निरभिलाष प्रेम आईमध्यें पाहिजेच आहे. त्यावांचून चालावयाचेंच नाहीं. कारण, कधीं कधीं असें घडून येतें कीं, ज्या अपत्यांवर आई प्राणापलीकडे प्रीति करते, तींच अपत्यें तिची अगदीं निराशा करून सोडितात. त्यांचें लालनपालन करून त्यांस योग्य वळण लावण्यासाठीं तिनें जी अंग मोडून खटपट केली असते, ती सर्व व्यर्थ जाऊन तीं अगदींच बेघोरणी निघतात. इतकेंच नाहीं, तर कांहीं कांहीं दिग्विजयी मंडळी तर

‘ पलंगीं बैसवूनि राणी,
माते हातीं आणवी पाणी ।
स्त्रिये पाटवाची चोळी,
माता अंखड चिंध्या गाळी ॥

या **नामदेवाच्या** उक्तीप्रमाणें बरोबर वर्तन करून स्वतःस धन्य ह्मणवून घेतात ! ! अशा वेळीं या अतोनात प्रेमाचा फार उपयोग होतो. तिची निराशा झाली तरी, आज नाहीं उद्यां केव्हां तरी, आपलें मूल ताळ्यावर येईल असें या प्रेमामुळें तिच्या मनांत येतें व रात्रंदिवस त्याच्या बऱ्याकरितां ती झटतच असते. त्यांच्या कृतघ्नतेनें तिचा निश्चय कमी होत नाहीं, व ती निरुत्साह होत नाहीं. मुलांस ताळ्यावर आणण्याच्या व त्यांस योग्य वळण लावण्याच्या कामीं तिला तात्काल यश आलें नाहीं तरी तिची ती खटपट सर्वस्वी व्यर्थ जाते असें नाहीं. त्या खटपटपटीचा केव्हां ना केव्हां तरी उपयोग होतोच. आई जिवंत असतां मुलानें केलेल्या दुर्वर्तनाबद्दल जरी त्यास फारसें वाईट वाटत नाहीं तरी तिच्या मरणोत्तर आपण सुधारण्यासाठीं तिनें केलेल्या यत्नांबद्दल त्यास वाईट वाटतें; व अशा मुलास मागून पश्चात्ताप होऊन तीं वाटेवर आल्याचींही बरींच उदाहरणें आढळून येतात.

मातृप्रेमाचा महिमा मोठा ह्मणून त्याचें वर्णन जितकें करावें तितकें थोडें होणार आहे असें जरी आहे, तरी या प्रेमाला विचाराचें साहाय्य नसलें तर परिणाम चांगला होत नाहीं. आपणास आईचें **विचारयुक्त प्रेम** पाहिजे; **आंधळें प्रेम** नको. जीं मानवरत्नें आपल्या कृतींनीं या जगतीतलास केवळ भूषणभूत झालीं, तीं तरी थोर व विचारवंत आयांच्या वि-

चारयुक्त प्रेमाचींच फळें होत. केवढेंही प्रेम त्या आयांच्या अंगीं असून त्यांत जर विचाराची भर पडली नसती, तर **शिवाजी, बोनापार्ट**प्रभृति मंडळीच्या हातून मोठमोठे पराक्रम झाले असते किंवा नाहीं याची शंका आहे. मुलगा कितीही बुद्धिवान् असला, तरी त्याचा उत्साह कमी न करितां व तो फुकट न दवडतां त्यास योग्य तऱ्हेनें वळवावयास शहाणीच आई पाहिजे. तीच मूर्ख असली तर त्या मुलाच्या बुद्धीचा व उल्हासवृत्तीचा फारसा उपयोग न होतां तो भलतीकडे वहकून वाईट परिणाम घडून येण्याचा संभव असतो.

एका विद्वान शारीरशास्त्रज्ञाचें असें ह्मणणें आहे कीं, मुलामध्यें जे कांहीं गुण किंवा दुर्गुण आढळून येतात, ते विशेषेंकरून त्याच्या आईपासून आलेले असतात. मूल ह्मणजे केवळ आईचीच प्रतिमा असते. **नेपोलियन बोनापार्ट** नेहमीं ह्मणत असे कीं, मुलांचें भावी सद्वर्तन किंवा दुर्वर्तन सर्वस्वी त्यांच्या आयांवर अवलंबून असतें. त्याच्या चरित्रकारांपैकीं एकानें त्याजबद्दल असें ह्मटलें आहे कीं, **नेपोलियनास** फक्त त्याच्या आईचा धाक वाटत असे. तिच्यावांचून इतर कोणासही तो दाद देत नसे. त्याची आईही अशी चतुर होती, कीं केव्हां गोड, तर केव्हां कडक, असें त्या त्या समयास योग्य वर्तन त्याच्याशीं ठेवून त्याजमध्यें आपल्याबद्दल प्रेम व पूज्यभाव उत्पन्न करी व त्यास आपली आज्ञाही पाळावयास लावी.

आईच्या वळणावर मुलें किती जातात हें एका शाळेच्या रिपोर्टांत लिहिलेल्या एका गोष्टीवरून चांगलें लक्षांत येईल. त्यांत एक गृहस्थ लिहितो कीं ' मी एकदां एक मोठा कारखाना पहावयास गेलों होतों. तेथें कामावर पुष्कळ मुलें लाविलीं जात असत. कोणत्याह मुलास कामावर रुजू करण्याच्यापूर्वीं तेथील व्यवस्थापक त्या मुलाच्या आईच्या वर्तनाचा शोध करीत; आईचें वर्तन चांगलें असल्याबद्दल जर त्यांची खात्री झाली, तर मग त्या मुलांच्या वर्तनाची चौकशी मुळींच करीत नसत. कारण, त्यांची बहुतेक अशी खात्री झाली होती कीं, जिचें वर्तन चांगलें शुद्ध आहे, अशा आईचीं मुलें चांगल्या रीतीनें वागावयाचींच. व्यवस्थापक लोक मुलांच्या बापाच्या वर्तनाकडे मुळींच लक्ष पुरवीत नसत.

असेंही पाहण्यांत आलें आहे कीं, बाप वाईट व दुर्व्यसनी निघाला, पण आई शहाणी, सच्छील, सात्विकवृत्तीची असली तरी देखील तें कुटुंब सुव्यवस्थित राहून मुलें बहुतेक चांगलीं निघून नांवालौकिकास येतात. तोच प्रकार उलट असला, ह्मणजे बाप कितीही सज्जन असून आई वाईट असली, तर मुलें चांगलीं निपजलीं अशीं उदाहरणें वरच्या मानानें फारच थोडीं सांपडतील. लहानपणीं ज्या संवयी मुलास लागतात त्या त्यास मोठा झाल्यावरही सोडीत नाहींत, हें वर सांगण्यांत आलेंच आहे. हा नियम येथेंच काय, पण सर्व जगांतील लोकांस लागू पडतो. लहानपणीं मुलांस ज्या प्रकारचें वळण लागलें असेल त्यावर त्याचें वर्तन सर्वस्वी अवलंबून असतें. जेथें मुलगा ५।६ वर्षांचा होऊन शाळेंत जाऊं लागेपर्यंत त्यास कोणत्याही प्रकारचें वळण लावण्याचा यत्न ज्यांच्याकडून व्हावयास पाहिजे, त्यांच्याकडून होत नाहीं; किंवा तो करण्यास त्या आया समर्थ केल्या जात नाहींत, तेथें मुलांचें सद्वर्तन ठाम होणें कितपत शक्य आहे याचा विचार प्रत्येकानें आपल्याशींच करावा. चांगली गोष्ट

कोणती, वाईट गोष्ट कोणती, खऱ्याखोट्याचें स्वरूप कोणतें, कर्तव्य ह्मणजे काय, तें किती पवित्र व महत्त्वाचें असतें, स्वतःवरची जबाबदारी ह्मणजे काय, इत्यादि गोष्टींच्या स्पष्ट कल्पनांचा प्रवेश लहानपणापासून मुलांच्या डोक्यांत हळू हळू व्हावयास लागला पाहिजे. हें नाजुक काम करण्यास आया स्वभावतःच योग्य असतात. परंतु त्या सुशिक्षित नसल्यास तें काम करण्यास त्या अयोग्य होतात. कोमळ अर्भकांचें नाजुक शरीर व हवें तसें वळणारें मन हें **परमेश्वरानें** आईच्या दिमतीस दिलें असतें. 'मानवी जातीच्या उन्नतीचें किंवा अवनतीचें प्रत्येक मूळ घटक असतें.' तेव्हां या दिवसानुदिवस उमलत जाणाऱ्या कोमल कलिकेंत बऱ्यावाइटाचे, कल्याण अकल्याणाचे, अभ्युदय विपत्तीचे किती जोरदार अंकुर भरलेले असतात? त्या त्या उत्तम अंकुरांचा पूर्ण विकास करून त्यांस प्रगल्भता आणणें हें काम आईचें आहे. तेव्हां हें काम जर इतकें महत्त्वाचें, इतकें जबाबदारीचें आहे, तर तें जिच्या हातीं यावयाचें ती आई किती शहाणी, किती पोक्त, किती अनुभवी, असली पाहिजे? ती स्वतःच पोरकट, अप्रबुद्ध व अज्ञान असल्यास, मुलांच्या मनावर प्रथम संस्कार घडण्याच्यावेळीं त्यांच्या संगोपनाची दिशा चुकली असतां त्यापासून कसे व किती अनर्थ होण्याचा संभव आहे हें वेगळें सांगण्याची गरज नाहीं.

एखादी बाग किंवा तींतील जमिनीचा कांहीं भाग कांहीं काळपावेतों लागवड केल्यावांचून राहिला, तर त्यांत किती कांटे, बारटे किंवा इतर निरुपयोगी झाडेंझुडपें उगवतात? तसेंच, मुलांचें मन व त्यांचा अंतरात्मा कांहीं काळपावेतों शिक्षणावांचून राहिल्यास त्यांत दुर्बुद्धि व दुष्ट संवयींचे अंकुर जोरावत जाऊन इतके अनावर होतात कीं, त्यांचें मूळ चांगलें रुजल्यावर मग तें काढून टाकण्याचा कसाही यत्न झाला तरी त्याचें पूर्ण निर्दालन करणें फार कठीण पडतें.

मोठा नामांकित मुत्सद्दी व्हावयाला जे गुण अवश्य लागतात, त्यांपैकीं बहुतेक गुण आईला आपलीं कर्तव्यें योग्य रीतीनें बजावतां येण्यास तिच्या अंगीं असावे लागतात, असें ह्मटलें असतां अतिशयोक्तीचा दोष येईल असें वाटत नाहीं. कसाही प्रसंग आला तरी न गडबडतां तिची चित्तवृत्ति स्थिर व शांत राहिली पाहिजे. तात्पर्य, तिला तिचा स्वभाव आवरण्याची शक्ति पाहिजे. गृहकृत्यांच्या हरएक बाबतींत व्यवस्था करण्याची बुद्धि तिला पाहिजे व ती राखण्याचें तिच्या अंगीं सामर्थ्य पाहिजे. कोण कशा प्रकारचें माणूस आहे व कोणाचें वर्तन कसें आहे हें तिच्या तावडतोब लक्षांत आलें पाहिजे, व त्यांतील भेदाभेद मार्मिक रीतीनें जाणण्याच्या कामीं तिची नजर मोठी तीव्र पाहिजे. तिला विचार करण्याची संवय लागली पाहिजे व तिची विचारसरणि पोक्तपणाची पाहिजे. कोणतेंही काम भिजत न ठेवितां त्याचा निकाल लागलीच्या लागलीच लावीत जाण्याची संवय तिनें केली पाहिजे. कोणत्याही बाबतींत काय करावयाचें, काय न करावयाचें, याचा शांतपणें विचार तिनें ठरविला पाहिजे. व मग विचारपूर्वक निकाल ठरविल्यावर, ठरल्याप्रमाणें तो अमलांत आणण्याचें व तदनुरूप वर्तन करण्याचें सामर्थ्य तिच्या अंगीं पाहिजे. त्या बाबतींत ढिलाई होऊं देतां कामा नये.

[ पुढें चालेल. ]

Printed at the "Ganpat Krishnaji" Press, Bombay, 27-12-99

आपण जवळ नाहीं असें समजून बोलतो आहे हें पाहून मकरंदाला आश्चर्य वाटलें, व तो त्याच्यापुढें जाऊन त्याला ह्मणाला, 'मित्रा माधवा, हा हतभागी मकरंद तुजपुढेंच उभा आहे पहा.' त्याला पाहतांच माधवाला गहिंवर आला, व तो ह्मणाला, 'मकरंदा, मला एकदांचा भेट. मालतीविषयीं माझी निराशाच झाली आहे. मी फारच थकलों आहें.' असें ह्मणून तो पुनः मूर्छित झाला. मकरंदानें त्याला मोठ्या प्रेमानें भेटून सांवरलें. पण तो मूर्छित झालेला पाहून मकरंद अगदीं निराश झाला, व आतां मात्र माधव आपल्या हातीं जिवंत लागत नाहीं अशी त्याची खात्री झाली, व आतां त्याच्या विषयीं जरा सुद्धां आशा बाळगणें नको असें त्याला वाटलें. 'माधवाचा समागम झाला तितकाच आपला काळ सार्थकीं लागला. आतां हा देह केवळ भारभूत, जीवित वज्रकीलाप्रमाणें, सर्व इंद्रियें निष्फल, दाही दिशा शून्य, व सर्व जीवलोक निस्सत्व व दुष्प्रेक्ष्य असा वाटूं लागला आहे. आतां मला जगून काय करावयाचें आहे ? याच जवळच्या पर्वताच्या कड्यावरून खालीं पाटलावर्तीत उडी मारून माधवापूर्वींच मरावें हेंच योग्य.' असें ह्मणून तो माधवाला तेथेंच सोडून निघाला. पुनः येऊन त्याला त्यानें डोळे भरून पाहिलें व त्याचे सर्व अद्वितीय गुण व रूप आठवून त्यांचें सुरेखसें वर्णन केलें. त्याचें अप्रतिम रूप पाहून मालतीला जो अतिशय आनंद झाला होता त्याचें व एवढ्या लहान वयांत सर्व उत्तमोत्तम गुण त्याच्या अंगीं वसत होते त्यांचें त्याला स्मरण होऊन फार खेद व विस्मय वाटला. 'पूर्ण कलावान् चंद्राचा राहूनें ग्रास करावा, किंवा ऐन वृष्टि करण्यास सज्ज असलेल्या नवजलद मेघमंडळाचा झंझावातानें एकदम फडशा उडावा, किंवा ऐन फळाला आलेला सुंदर वृक्ष एकदम दावाग्नीनें दग्ध व्हावा त्याप्रमाणें–इतक्या सर्व गोष्टी नाहींशा होऊन माधव सर्व जगांत चूडामणिपदाला पोहोंचतो न पोहोंचतो तोंच मरण पावला, ही दैवगति विचित्र होय.' असें ह्मणून त्यानें त्याला पुनः एकदां कवटाळिलें व 'तुझ्यामागें मी क्षणभर देखील जिवंत राहीन असें समजूं नको. जन्मापासून आपण दोघेही सारखे एकत्र वाढलों, खेळलों, तेव्हां तूं आतां एकटाच पुढें जाऊन तिळांजळी ग्रहण करशील, असें कसें होईल ?' असें ह्मणून तो त्याला सोडून निघाला व त्या पर्वताच्या कड्यावर जाऊन त्यानें श्रीशंकराची प्रार्थना केली:–'हे त्रिभुवनगुरो, पुढील जन्मींही माधवाचा जन्म होईल तेथेंच माझाही होवो व मला त्याच्या मैत्रीचा असाच लाभ मिळो एवढें मला वरदान दे.' तो खालीं डोहांत उडी मारणार इतक्यांत सौदामिनीनें येऊन त्याला सांवरलें व त्याचें निवारण केलें.

[ जागजागीं मालती, माधव, मकरंद, कामंदकी व भूरिवसू वगैरे मंडळीनें आत्मघात करून हल्लींच्या दुःखांतून सुटण्याचा यत्न केला आहे, यावरून भवभूतीच्या वेळीं आत्मघात करण्यांत फारसा दोष आहे असें मानलें जात नव्हतें, असें दिसतें. हा विषय विचारार्ह आहे. ]

मकरंदानें सौदामिनीला पाहून ह्मटलें, 'मातोश्री, आपण कोण, व माझें कां निवारण करितां ?' त्यावर तिनें 'तू मकरंद का ?' असें त्याला विचारिलें. तेव्हां 'होय, तोच हतभागी मी, सोड मला' असें त्यानें उत्तर दिलें. 'अरे बाळा,

मी योगिनी आहें. मालतीची कांहीं खूण मजजवळ आहे.' असें ह्मणून सौदामिनीनें त्याला बकुलमाला दाखविली. ती पाहून त्यानें तिला मोठ्या उत्कंठेनें व दीनपणानें, 'मालती जिवंत आहे का?' असें विचारिलें. तिनें, 'होय, पण तूं हें साहस करण्यास प्रवृत्त कां झालास? माधवाचें भलतेंच कांहीं झालें तर नाहीं? तो कोठें आहे?' असें घाईघाईनें विचारिलें. त्यावर, 'त्याला मूर्छितच सोडून मी वैतागून येथें आलों होतों. चला लौकर, त्याला जाऊन पाहूं–' असें बोलून तो तिला माधवाकडे घेऊन गेला.

इकडे माधव शुद्धीवर येऊन, 'आपण पुनः शुद्धीवर कशानें बरें आलों? हां, या थंडगार वाऱ्यानेंच मला विनाकारण पुनः या जीवलोकीं आणिलें–' असें ह्मणत होता. त्याला पाहून मकरंदाला आनंद झाला, व त्या दोघांचीही आकृति मालतीनें सांगितली तशीच ठीक जुळते असें सौदामिनीला दिसून आलें.

वायूनें आपल्याला व्यर्थ शुद्धीवर आणिल्याबद्दल माधवानें त्याला बरींच दूषणें दिलीं. (हा श्लोकही कालिदासाचेंच अनुकरण आहे. वर्णन फार चांगलें आहे.) वायूनें हा मोठा उपकार केला असें मकरंदाला वाटलें. माधवानें पुनः ह्मटलें, 'हे वायो, मला माझी प्रिया असेल तेथें तरी ने, किंवा निदान ती असेल तेथून माझ्या जीवाचें समाधान होण्याकरितां कांहीं वस्तु तरी आणून दे.' असें ह्मणून तो अंजलि जोडून प्रणाम करून उभा होता. खुणेची वस्तु टाकण्याला ही फार उत्तम संधि आहे असें पाहून सौदामिनीनें ती बकुलमाला हळूच त्याच्या ओंजळींत टाकिली. (हा प्रसंग फार सुरेख साधला आहे.) ती माळा पाहतांच माधवाला मोठा विस्मय, चमत्कार व हर्ष वाटला. 'अनंगमंदिरांत बकुलवृक्षाखालीं गुंफलेली, व आपल्या प्रियेच्या स्तनमंडलाच्या स्पर्शाचा लाभ पावलेली ही बकुलमाला दिसते. हो, संशय कशाला? मालतीला पाहिल्यामुळें चित्त व्यग्र होऊन तिच्यांतील एक भाग थोडासा वेडावांकडा गुंफला गेला होता व त्यामुळें ती लवंगिकेला विशेष आवडली होती, तो हा पहा यांत आहे.' असें ह्मणून आनंदानें, उन्मत्ताप्रमाणें उभा राहून, मालतीला उद्देशून रागारागानें तो ह्मणाला, 'प्रिये मालती, आतां मी तुजकडे पाहतों तरी का! माझी काय अवस्था झाली आहे तुला ठाऊक तरी आहे? यावेळीं माझे प्राण जाऊं पहाताहेत, हृदय जसें फुटतें आहे, सर्वांग जसें जळतें आहे, व चोहोंकडून गाढ अंधकारसा पसरतो आहे. ही वेळ त्वरा करून येण्याची आहे, थट्टेची नव्हे याकरितां कृपा करून एकदांची मला दर्शन देऊन माझ्या नेत्रांना आनंदित कर.'

मालती जवळच कोठें असेल, असें समजून त्यानें चोहोंकडे पाहिलें. ती कोठें दिसली नाहीं तेव्हां त्याला अधिकच खेद झाला व बकुलमालेला उद्देशून तो ह्मणाला, 'हे बकुलमाले, तूं माझ्या प्रियेला फार प्रिय होतीस–मजवरही तुझे मोठ उपकार आहेत–तुझें स्वागत असो. माझ्या विरहदुःखानें अगदीं निराश झालेल्या मालतीला मन्मथोन्माथाचे वेग सहन होईनात, तेव्हां तिला तुझा स्पर्शच माझ्या आलिंगनाच्या ऐवजीं प्राणत्राण करण्याला साधन झाला. तसेंच माझी प्रिया तुला फार आनंदानें, उत्कंठेनें व प्रेमानें गळ्यांत घालीत असे. तुझ्यामुळें तिच्या मदनसंतप्त शरीराला व मनाला मोठें समाधान होत असे, हें मला माहीत

आहे.' असें ह्मणतां ह्मणतां त्याला मूर्छा आली. तेव्हां मकरंदानें त्याला सांवरलें व सावध केलें. मकरंदाला पाहून माधव ह्मणाला, 'मकरंदा, हा पहा मालतीच्या हातचा स्नेहाचा प्रत्यक्ष लाभ कोठूनसा झाला आहे. हें काय बरें असावें?' मकरंदानें उत्तर दिलें, 'हा लाभ करून देणारी ही योगेश्वरी, तिचेच हे उपकार आहेत.' माधवानें तिला हात जोडून ह्मटलें, 'भगवति, कृपा करा—माझी प्रिया जिवंत आहे ना?' तिनें ह्मटलें, 'होय, स्वस्थ हो, ती कल्याणी जिवंत आहे बरें.' हें ऐकून दोघांनाही मोठा भार उतरल्यासारखें झालें व तिला दोघांनींही ह्मटलें—'भगवती, हें कसें काय झालें?' सौदामिनी ह्मणाली, 'पूर्वी कराला देवीच्या मंदिरांत मालतीला बळी देत असतांना माधवानें अघोरघंटाला मारिलें होतें'—इतकें ऐकतांच माधव ह्मणाला, 'हो आलें सर्व लक्षांत, भगवती, पुरें आतां.' मकरंद ह्मणाला—'काय, काय झालें?' त्याला माधव ह्मणाला 'अरे, दुसरें काय? कपालकुंडलेनें सूड उगविण्याकरितां हें सर्व केलें.' मकरंद ह्मणाला, 'भगवती, असें खरें का?' तेव्हां ती ह्मणाली, 'होय, होय, हा ह्मणतो तेंच खरें.' एवढ्याच बोलण्यावरून त्या दोघांनाही, कपालकुंडलेनें मालतीचे हाल हाल केले असतील, असें वाटून फार खेद झाला; व मकरंद ह्मणाला, 'अरेरे, फारच वाईट झालें. हाय हाय! शरत्कालच्या कौमुदीचा व कुमुदाकाराचा संयोग झाला हें यथायोग्यच झालें; पण इतक्यांत एकाएकीं अकालीं मेघडंबर येऊन त्यांचा वियोग व्हावा या दैवगतीला काय ह्मणावें?'

माधव ह्मणाला, 'हा प्रिये मालती! त्या कपालकुंडलेच्या तावडींत तुझी कशी दशा झाली असेल! उत्पात धूमकेतूनें ग्रासलेल्या चंद्रकलेसारखे तुझे फार हाल हाल झाले असतील!!

'हे कपालकुंडले, तूं तरी कांहीं विचार करायाचा होतास! मालतीसारखें अप्रतिम स्त्रीरत्न निर्माण होणेंच स्वभावतः आदरास पात्र आहे. तूं तिच्याशीं पूतनेसारखें आचरण करूं नको. स्वभावतःच पुष्पांची शिरावर वाहण्याची योग्यता असते, पायाखालीं तुडविण्याची नव्हे' (हे चरण उत्तर रामचरित, अंक १ यांत आहेत.)

हा सर्व प्रकार पाहून सौदामिनी ह्मणाली, 'अरे असे घाबरूं नका—ती कपालकुंडला मोठी दुष्ट, मी आड आलें नसतें तर ती खचित असेंच करिती.'

यावर तिला दोघांनींही ह्मटलें—'भगवती, आपले आमच्यावर फारच मोठे उपकार झाले. आपला याच्यांत संबंध काय तो तर सांगा.' ती ह्मणाली, 'हें सर्व तुह्मांला कळेलच. ही पहा गुरूची सेवा, तप, तंत्र, मंत्र, व योगाभियोग इत्यादिकांपासून प्राप्त झालेली ही आक्षेपिणीसिद्धि तुमच्याच हिताकरितां मी आतां प्रगट करितें.' असें ह्मणून ती माधवासह एकदम उडून गेली.

हें पाहून मकरंदाला मोठेंच आश्चर्य वाटलें. तो ह्मणाला, 'हा काय चमत्कार आहे! हा तम आणि विद्युत् यांचा प्रचंड लोळ एकदम डोळे दिपवून पुनः नाहींसा झाला.—काय! माधवही येथें नाहीं! हें काय बरें असावें?—अथवा दुसरें काय, ही योगेश्वरी आपल्या अलौकिक शक्तीनेंच हा चमत्कार दाखवीत आहे.' पुनः विचार करून तो ह्मणाला, 'पण हा कांहीं अनर्थाचा तर प्रकार नाहींना?

कांहींच कळत नाहीं. याच्या योगानें आनंद व भय दोन्ही वृत्ति मनांत उभ्या राहून चित्ताची फारच चत्कारिक स्थिति झाली आहे. आपल्या मंडळीसह भगवती कामंदकी याच वनांत प्रविष्ट झाली आहे तिला गांठून हा सर्व वृत्तांत कथन करावा हें बरें, असें ह्मणून तो निघून गेला.

[ नाटकाच्या संविधानकाच्या मानानें पाहतां, हा नववा अंक व पुढील दाहावा अंक दोन्ही विनाकारण वाढविलेले दिसतात. राजानें माधव व मकरंद यांचें शौर्य पाहून त्यांना झालेल्या गोष्टीबद्दल क्षमा केली, व माधव आणि मालती यांच्या विवाहाला संमति दिली. मदयंतिका व मकरंद यांच्या विवाहालाही अडचण नव्हतीच, तेव्हां कपालकुंडलेच्या हातून मालतीला उचलून नेववून, हें परस्परवियोगाचें वर्णन करण्याकरितां बुद्ध्या भवभूतीनें दोन अंक वाढविले आहेत. हे प्रयोगाच्यावेळीं तर कंटाळवाणे होतातच, कारण त्यांत प्रवेश व कार्यवैचित्र्य मुळींच नाहीं; केवळ रडगाणें भरलेलें आहे. व तेंही अप्रस्तुत व अनवश्यक, व माधवादिक पात्रांच्या स्थितीला व अवस्थेला न शोभणारें असें आहे. यामुळें नुसते वाचण्याला देखील हे भाग कंटाळवाणे वाटतात. तशांत यांतील सृष्टिसौंदर्य व विरहावस्था यांच्या वर्णनपर बहुतेक श्लोक उत्तररामचरित, मेघदूत व विक्रमोर्वशी इत्यादिकांवरून घेतलेले व पुनरुक्त आहेत. या प्रकरणासंबंधानें अवश्य तितका फेरफार मात्र केलेला आहे. वरील तीन्ही ग्रंथांत विप्रलंभशृंगारवर्णनपर श्लोक आलेले आहेत, ते सहजगत्या प्रकरणाच्या संविधानकाला अनुलक्षून व सरळ प्रकारानें आलेले आहेत; पण या नाटकांत ते बुद्ध्या ओढूनताणून आणलेले व विसंगत दिसतात. जो शोक करण्याचा प्रकार रामचंद्र किंवा पुरूरवा यांच्या सारख्या प्रौढ व अनुभविक रसिक पुरुषांना साहजिक व योग्य दिसतो, तो माधव व मकरंद यांच्यासारख्या विशी न उलटलेल्या व व्यवहाराचा व जगाचा मुळींच अनुभव नसलेल्या पोरांना शोभत नाहीं. भवभूतीच्या तीन्ही नाटकांतून त्यानें प्रथम हें मालतीमाधव नाटक रचिलें असें दिसतें व नंतर पुढें रामकथा विषयक दोन्ही नाटकें लिहिलीं असावीं. पण मालतीमाधवाचे शेवटचे दोन्ही अंक उत्तररामचरित लिहिल्यावर त्यांतील करुणपर भाग विशेष लोकप्रिय झालेला पाहून नंतर पुनः लिहिले असावे.

हे दोन्ही अंक काव्य या नात्यानें लिहिले असते तर फारच अप्रतिम झाले असते. पण नाटकांत ते मुळींच शोभत नाहींत. यांतील बहुतेक श्लोक करुणरसवर्णनाच्या संबंधानें अद्वितीय आहेत, तरी त्यांत प्रत्येक गोष्टीचा व मनोविकाराचा ठसा शब्दांनीं मूर्तिमंत वठविण्याचा यत्न केलेला आहे. सामान्य वर्णन करून त्याची योग्य व अप्रतिम कल्पना मनांत उभी करण्याचें कालिदासाप्रमाणें भवभूतीला मुळींच साधलेलें नाहीं. कालिदासाच्या सर्व ग्रंथांवरून भवभूतीनें या अंकांत बरींच अवतरणें घेतलीं आहेत. फक्त ऋतुसंहारांतील श्लोकांचा मात्र उल्लेख दिसत नाहीं. यावरून त्याच्यावेळीं हें काव्य कालिदासाच्या नांवावर मोडत नसावें असें ठरतें. कालिदासासारखा उत्तम नमुना जवळ असूनही भवभूतीसारख्याला त्याच्या तोडीचें एकही नाटक—नाटक या नात्यानें—लिहितां आलें नाहीं हें आश्चर्य आहे. अथवा आश्चर्य कशाचें?—या फरकावरूनच दोन्ही कवींच्या वेळच्या देशस्थितींत पुष्कळसा फरक

व तोही निकृष्ट दशेकडे झालेला दिसतो. कालिदासाचें सर्व काव्य स्वतःसिद्ध, सहज बोध होण्याजोगें, उदात्त, व वर्णितवस्तूपेक्षां व्यंग्य अर्थाच्या द्वारानें विशेष रमणीय दिसतें. भवभूतीच्या नाटकांत सर्व प्रकार ओढूनताणून आणलेला व पुनरुक्त दोषानें भरलेला दिसतो, व त्याच्या ग्रंथरचनेंत क्लिष्टपणा हा दोष अधिक आढळतो. तरी कालिदासाचें भवभूतीइतपतही अनुकरण करणारा कवि दुसरा कोणी आढळत नाहीं हें कांहीं कमी नाहीं.

या अंकांत एके जागीं 'मापूतनात्वमगाः' असें लिहिलें आहे. याचा विशेष अर्थ घेतला तर त्यावरून भागवतांतर्गत पूतनावधाच्या कथेचा कांहीं उल्लेख आहे असें दिसून येतें. यावरून त्यावेळीं भागवत ग्रंथ हल्लींच्या रूपानें उपलब्ध नव्हता असें दिसत नाहीं. सातव्या अंकांत बुद्धरक्षितेच्या मकरंदाच्या संबंधाच्या भाषणांत एक असाच उल्लेख रुक्मिणीस्वयंवरासंबंधें आलेला आहे. कदाचित् हे दोन्ही उल्लेख हरिवंशावरून घेतलेले असावेत, असेंही ह्मणतां येईल.

या अंकांत गोदावरीच्या उगमाजवळील दक्षिणारण्य भागाचा उल्लेख आहे. पण तो पारा, सिंधू, लवणा, या नद्यांच्या आसपासच्या वनप्रदेशाच्या इतका विशेष स्पष्ट नाहीं. यावरून भवभूतीला पद्मावतीच्या आसपासचा प्रदेश फार चांगला, तेथें पुष्कळ दिवस राहिल्यासारखा, माहीत होता असें दिसतें. याविषयीं उत्तररामचरितसार व विचार यांत विशेष विचार येईलच. ]

---

## अंक दाहावा.

मागील अंकांत माधव व मकरंद यांच्या मालती नाहींशी झाल्याबद्दलच्या शोकाचें वर्णन केलें आहे. तसें या अंकांत, कामंदकी लवंगिका व मदयंतिका यांच्या शोकाचें प्रत्यक्ष व भूरिवसूच्या शोकाचें परोक्ष वर्णन करून, एकंदर संविधानकाचा समारोप केला आहे. या सर्व शोकाचें पर्यवसान शोक करणारी मंडळी प्राण देण्यावर करितात, हें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

या कामंदकी, लवंगिका व मदयंतिका सिंधूनदीच्याच तीराच्या आसपासच्या वनप्रदेशांत मालतीचा शोध करीत, शोक करीत, फिरत होत्या. त्या सर्व मालतीचे निरनिराळे गुण व तिचें आपल्यावरील प्रेम व आपल्याशीं वर्तन आठवून दीन व विव्हल होत्सात्या शोक करीत होत्या. भवभूतीच्या नाटकांत हर्ष शोकादिक विकार मुख्य, मध्यम व गौण या सर्व पात्रांना बहुतेक त्यांच्या त्यांच्या परीनें सारखेच होतात, व त्यांचें वर्णन कवीनें सारखेंच पाल्हाळानें केलें आहे. यामुळें योग्य तारतम्य न राहून नाटकाची योग्यता तितकी कमी झाली आहे. असा प्रकार कालिदासाच्या नाटकांत मुळींच आढळत नाहीं.

कामंदकी ह्मणाली, 'वत्से मालती, तुझ्यामुळें मला मोठें भूषण होतें. तूं कोठें तरी गेलीस? मला एकदां तरी ओ दे ! जन्मापासून क्षणोक्षणीं तूं अधिकाधिक रम्य होत गेलीस. तुझीं तीं बोबडीं व गोड भाषणें व त्या मनोहर बाललीला यांचें स्मरण होतांच माझ्या सर्वांगाचा दाह होतो व हृदय फाटूं लागतें. तसेंच उगीच्या उगीच रडत रडत व हंसत हंसत

बोबडे बोबडे बोल बोलतांना तुझें तें कोमल, किंचित् विकसित झालेलें व दांताच्या कळ्या थोडथोडक्या दिसत असलेलें सुंदर मुखकमल नेहमीं माझ्या डोळ्यांपुढें दिसतें. ( उत्तररामचरित, अ. ४ )

लवंगिका व मदयंतिका ह्मणाल्या.–'हे प्रियसखी पूर्णचंद्रानने मालती! तूं आह्मांला टाकून कोठें गेलीस ? तुझ्या त्या शिरीष कुसुमाहून कोमल शरीराचा कसा तरी अवन्चित व अयोग्य परिणाम झाला असेल ! हे माधवा ! असा महोत्सव दृष्टीस पडून व एकदम नाहींसा होऊन तुझा जन्म व्यर्थ गेला ना ! हाय हाय ! '

कामंदकी पुनः ह्मणाली, 'हे माधवा ! हे मालती ! हा तुमचा अभिनव प्रेमरस नुकताच कोठें फळाला येत होता तोंच, लवली व लवंग यांचा समागम होत असतांना एखाद्या वावटळीनें दोघांचाही नाश व्हावा तद्वत् दुर्दैवानें तो एकदम नाहींसा केला ना ? '

लवंगिका ह्मणाली, 'हा मेल्या निर्दया हृदया ! फुटतही नाहींस !–' असें ह्मणून जोरानें उर बडवून घेऊन ती खालीं पडली. तिला मदयंतिका ह्मणाली, 'गडे लवंगिके, अगे लवंगिके, क्षणभर तरी सावध हो. धीर धर.' हें ऐकून लवंगिका ह्मणाली, 'अगे इतकें माझें मेलें नशीब कोठें आहे ? हा दगडाहूनही कठीण व घट्ट झालेला माझा जीव एकदांचा जातही नाहीं. मी करूं तरी काय आतां ? '

कामंदकी ह्मणाली, 'मालती, ही लवंगिका तुला जन्मापासून प्रिय होती ना ? ही पहा बिचारी जीव द्यायाला तयार झाली आहे, तिची तुला दया कशी येत नाहीं ? दिव्याची ज्योति नष्ट झालेल्या वातीसारखी तुझ्याविना इची गति झाली आहे !

'अगे, या कामंदकीला कशी बरें सोडून गेलीस ? तूं अंगावर पीत होतीस तेव्हांपासून एखाद्या हस्तिदंती बाहुलीप्रमाणें मीं तुला खेळविलें व वाढवून शाहणी केली. शेवटीं सर्व लोकांत श्रेष्ठ अशा वराशीं मींच तुझी गांठ घालून दिली, व यामुळें तुझा व तुझ्या आईचाही मजवर अधिकाधिकच स्नेह जडला. तुझें शरीर वाढलें पोसलें तें या चोवराच्याच उबेनें नव्हे का ? मग अशी निष्ठुर कां बरें झालीस !

'तुझ्या ओटींत खेळत असलेला तुझा ताळवेवर पांढऱ्या मोहऱ्या लावलेला गोंडस मुलगा केव्हां पाहीन, अशी मला फार आशा होती. ती सर्व आतां निष्फळ झाली ना ?'

[ पूर्वीं लहान मुलाच्या ताळवेवर व कपाळावर गौर सर्षप पांढऱ्या मोहरीचे दाणे लावण्याची चाल होती. याचा उल्लेख इतर ग्रंथांतही अनेक जागीं आलेला आहे. पण त्याचा उपयोग व हेतु काय होता तें मात्र कळत नाहीं.

श्रीमंतांच्या घरीं मुलामुलींना खेळावयाला हस्तिदंती बाहुल्या असत. आलीकडे त्या दिसत नाहींत. तसेंच वडील बायांना आपल्या मुलींना मूल–त्यांतही विशेषतः मुलगा झालेला कधीं पाहूं असें वाटत असे. तें यापूर्वीं व त्यानंतर आजपर्यंत सारखें वाटतें आहे. याविषयीं बायकांच्या मनोवृत्तींत इतक्या दीर्घ काळांत मुळींच फरक पडला नाहीं हें विशेष आहे. ]

लवंगिका ह्मणाली, 'भगवती, आतां माझ्यानें धीर धरवत नाहीं. मी या कड्यावरून उडी मारून प्राण देणार. आपण मला परवानगी द्या, व जन्मांतरीं तरी मालतीचें मला दर्शन व्हावें, असा आशीर्वाद द्या. '

तिला कामंदकी ह्मणाली, 'अगे लवंगिके मालतीच्या वियोगांत ही कामंदकी तरी जिवंत

राहून काय करणार? दोघींचीही अवस्था व शोकावेग सारखाच, समजलीस? तसेंच आपापल्या कर्मांच्या भेदामुळें संगम व वियोग व्हावयाचे, व पुनर्जन्म येणार किंवा न येणार. परंतु तूर्त प्राणपरित्यागाचें फळ ह्मटलें ह्मणजे हल्लींचा होत असलेला संताप तरी नाहींसा होईल.'

हें ऐकून लवंगिका ह्मणाली-' बरें तर, आपण ह्मणतां तसेंच. चला, उठा.'

कामंदकी ह्मणाली, ' वत्से मदयंतिके-' तेवढ्यावरच तिनें उत्तर दिलें, ' भगवती, काय ह्मणतां ' चल पुढें हो ' ह्मणून? ही पहा मी तयारच आहें.' तिला लवंगिका ह्मणाली ' मदयंतिके, कृपा कर, व्यर्थ प्राण देऊं नकोस. मला विसरूं नको अँ.' त्यावर मदयंतिका रागावून ह्मणाली, ' चल जा, मी कां तुझी बांधलेली आहें?' तिचें हें बोलणें ऐकून कामंदकी ह्मणाली, ' अग बाई! या बिचारीनेंही असाच निश्चय केला!' मदयंतिका मनांत ह्मणाली, ' प्राणप्रिया मकरंदा, तुह्मांला नमस्कार असो.' असें ह्मणत तिघीही थोड्याशा पुढें गेल्यावर लवंगिका ह्मणाली, ' भगवती, मधुमतीच्या पात्रानें वेष्टित असा हा पहा पर्वताचा कडा.' तिघीही तेथें पोहोंचल्यावर कामंदकी ह्मणाली, ' एवढा वेळ अंतराय झाला तेवढा पुरे; चला उडी मारूंया.' असें ह्मणून त्या उड्या मारणार तोंच, ' अंधकार व विद्युत् यांचा एकत्र संबंध झालेला असा हा भयंकर प्रकार क्षणमात्र डोळ्यापुढें दिसून पुनः नाहींसा झाला-हें मोठें आश्चर्य हो आश्चर्य!' असा शब्द त्यांच्या कानीं आला. तेव्हां कामंदकी आश्चर्यानें व हर्षानें इतडे तिकडे पाहूं लागली. तोंच पुनः ' अरे, इथें प्रिय मित्र माधव नाहीं हें काय?-अथवा दुसरें काय? ही योगेश्वरी आपल्या स्वतःच्या अतर्क्य महिम्यानें वाटेल तसें करीत आहे.' असें ह्मणत मकरंद तेथें येऊन पोहोंचला. तसेंच-' अरे, हें काय? ही इतकी लोकांची गर्दी व हलकल्लोळ कशाचा बरें? हो-मालतीला अपाय झाल्याचें ऐकून विरक्त होत्साता अमात्य भूरिवसु संसार व जिवित्वाची इच्छा यांचा त्याग करून वन्हिप्रवेश करण्याच्या निश्चयानें सुवर्णबिंदूजवळ चालला आहे! हाय हाय!' असा शब्द त्यांच्या कानीं आला.

हें ऐकून मदयंतिका व लवंगिका ह्मणाल्याः ' हाय हाय! मालती व माधव यांच्या पुनर्दर्शनाचा महोत्सव प्राप्त होणार तोंच हा काय भलताच प्रकार!' तसेंच मकरंद व कामंदकी यांनीं हर्षानें ह्मटलें, ' हाय हाय! काय आश्चर्य हें! हा काय चमत्कार! तलवार व चंदनरसाची छटा, थंडगार वायु व आगीच्या ठिणग्या, अनभ्र आकाशांतून सुधावर्षाव, संजीवनी औषधी व जालिम विष, प्रकाश व अंधकार, भयंकर विद्युत्पात व शीतल चंद्रकिरण, या सर्वांचा एकदम अकल्पित वर्षाव व्हावा तशांतलाच हा प्रकार होत आहे!' ( याठिकाणीं मालती व माधव यांची व आपली पुनः भेट होईल ही गोष्ट त्या तिघींनाही कशी कळली याचा खुलासा नाहीं. सर्वच मोघम ठेविलें आहे.)

इतक्यांत दुरून पुनः मालती रडत रडत बोलत आहे असें त्यांना ऐकूं आलें. मालती ह्मणाली, ' अहो बाबा! थांबा हो थांबा! तुमच्या दर्शनाची मला किती तरी उत्कंठा लागली आहे! कृपा करून मला भेटा. मज हतभागिनीसाठीं आपण आपलें सर्व लोकांत अलंकारभूत झालेलें शरीर अग्नींत अर्पण

करणार हें काय! आणि मी तरी कशी निर्दय आपणांला माझी मुळींच काळजी नाहीं असें समजलें होतें!'

हें ऐकून कामंदकी ह्मणाली, 'हा वत्से मालती! जन्मांत राहून पुनः कशी तरी हातीं लागावीस तशी तूं दृष्टीस पडतेस, तोंच चंद्रबिंबाला ग्रहण लागावें तशांतला हा अवचित प्रकार होतो आहे.' इतक्यांत मूर्छित झालेल्या मालतीला घेऊन माधव तेथें आला व तिची अवस्था पाहून ह्मणाला, 'ही कशी तरी हा मोठा प्रवास करून येथवर पोहोंचली, तोंच तिला हें भलतेंच दुसरें संकट प्राप्त होऊन तिचा जीव संशयांत पडला आहे. दैवच एखाद्याचा निकाल लावायाला तयार झाल्यावर त्याचीं द्वारें बंद करण्याला कोण समर्थ होणार?' त्याला पाहतांच मकरंद गडबडीनें त्याच्याजवळ जाऊन त्याला ह्मणाला, 'मित्रा, ती योगिनी कोठें आहे?' त्याला माधवानें उत्तर दिलें, 'मी तिच्याबरोबरच श्रीपर्वताहून येथवर सपाट्यानें येतों तोंच वनचरांच्या तोंडून हें दुःखकारक वर्तमान ऐकिलें. तेव्हांपासून ती कोठें दिसत नाहीं.' त्यावर दोघांनींही दीनपणानें आकाशाकडे पाहून ह्मटलें–'हे भगवती, पुनः एकवार आमचें रक्षण कर. अशावेळीं अंतर्धान कां पावलीस?' मालती मूर्छितच आहे असें पाहून लवंगिका व मदयंतिका ह्मणाल्या, 'मालती! अगे मालती! गडे मालती'–तरी ती शुद्धीवर येत नाहीं असें पाहून दुःखानें व उत्कंठेनें त्या पुनः ह्मणाल्या, 'भगवती! तुह्मी तरी पहा हो, इला सावध करा, पुष्कळ वेळ श्वास कोंडून गेल्यानें इचें काळीजही स्पष्ट उडत नाहीं. अगे बाई! हाय हाय! अमात्या, प्रियसखी, तुह्मी दोघेंही परस्परांच्या मरणाला कारण होत आहां ओं?' हें पाहून कामंदकी, माधव व मकरंद यांनीं पाळीपाळीनें–'हाय हाय' असें मोठ्या कष्टानें ह्मटलें, व सर्वांना मूर्छा आली व सर्व थोड्या वेळानें पुनः शुद्धीवर आलीं. (ही शोक करण्याची पुरी कवायत झाली ह्मणावयाचें!)

पुनः थोड्या वेळानें कामंदकी वर पाहून ह्मणाली, 'हा काय चमत्कार! एकाएकीं अभ्रें येऊन जलवृष्टि झाल्यामुळें सर्वत्र आनंदीआनंद होतो तसा हा आपल्याला आनंद कशानें बरें होत आहे?'

इतक्यांत मालती हळूहळू शुद्धीवर येत होती. तिला पाहून माधवाच्या जिवांतजीव आला व तो ह्मणाला, 'अरे, ही पहा मालती पुनः शुद्धीवर येत आहे. इच्या नाकपुड्या श्वासानें फुलल्या आहेत. तिचें हृदय व स्तन यांना टवटवी आली आहे. डोळ्यांतही तेज व पाणी पूर्ववत आलें आहे, व मूर्छा कमी होत गेल्यानें तिचें मुखही प्रफुल्लित दिसूं लागलें आहे. सकाळच्या प्रहरीं कमलयुक्त सरोवराला हळू हळू शोभा येत जावी तशी हिची स्थिति होत चालली आहे. (हें शुद्धीवर येत चाललेल्या सुंदर स्त्रीचें फारच सुरेख वर्णन आहे.) इकडे हा प्रकार चालला आहे तोंच 'नंदनासह राजा पायां पडत असतांनाही पर्वा न करितां भूरिवसू अग्निप्रवेश करीत होता त्याला माझ्या वाणीनें तेथून परतविलें. याचा सर्व जमलेल्या जनसमूहाला मोठाच विस्मय झाला आहे.'–असें सौदामिनीचें भाषण त्यांच्या कानीं आलें. तें माधव व मकरंद यांनीं ओळखिलें. व त्यांनीं वर पाहून मोठ्या हर्षानें कामंदकीला ह्मटलें, 'भगवती! वाः वा! फार उत्तम गोष्ट झाली! ती योगिनी पहा आकाशमार्गानें नवजलदाप्रमाणें दर्शनानें व शब्दानें सर्वांना आनंदवीत इकडेच

॥ श्रीः ॥

# विविधज्ञानविस्तार.

## A MONTHLY MAGAZINE

OF

## MARATHI LITERATURE

FOR

Ladies and Gentlemen.

कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरितां.

पुस्तक ३०. नवंबर १८९९. अंक ११.

विषय. अनुक्रमणिका. पृष्ठ.



मुंबईत

गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत छापिलें.

वर्षाची वर्गणी रुपये ३; टपालखर्च आणे ६

## वर्गणीदारांस सूचना.

आपल्याकडील आश्रयाची रक्कम लौकर पाठवून देण्याविषयीं लैब्ररींचे सेक्रेटरी आणि इतर आश्रयदाते यांस विनंती आहे. पुस्तकाच्या छपाईसंबंधानें वगैरे किती खर्च येतो याचा जर आमचे आश्रयदाते विचार करितील तर वारंवार सूचना करण्याचें आह्मांस कारण पडणार नाहीं.

## पोंच.

१. **शतशब्दरत्नमाला**—हें ईश्वरादि शत शब्दांच्या व्याख्या दाखविणारें पुस्तक 'श्रीयुत' **पंढरीनाथ श्रीधर जोशी** यांनीं निरनिराळ्या वृत्तांत लिहून वेदधर्मप्रचारकसभेमार्फत छापून प्रसिद्ध केलें आहे.

२. **अशोक**—आर्यावर्तांतील पहिला चक्रवर्ती राजा याचें चरित्र. रा. रा. **वासुदेव गोविंद आपटे**, बी. ए. यांनीं प्राचीन शिलालेख, पाली भाषेंतले बौद्ध ग्रंथ आणि इंग्रजी व बंगाली भाषेंतले ग्रंथ, यांच्या साह्यानें लिहून कोल्हापुरच्या **ग्रंथमालेमधून** प्रसिद्ध केलें. त्याच्या वाचकांच्या सोईसाठीं थोडया निराळ्याही प्रती काढल्या आहेत. त्यांपैकीं एक आह्मांस पाठविल्याबद्दल ग्रंथकाराचे आह्मी आभारी आहों. स्वत्वाचा अभिमान असणाऱ्या आर्यावर्तांतील प्रत्येक असामीनें हें पुस्तक एकवार तरी वाचून पहावें. आणि त्यापासून ज्ञान आणि करमणूक हीं प्राप्त करून घ्यावीं.

३. **भारतवर्षीय युवतिरत्नमाला**—राणी संयोगिता, पद्मिनी, अहल्याबाई इत्यादि युवतिरत्नें जीं हिंदुस्थानच्या इतिहासांत चमकत आहेत त्यांचीं त्रोकट चरित्रें या पुस्तकांत दिलीं आहेत. स्त्रीवाचकांसाठीं जीं थोडीं चांगलीं पुस्तकें आहेत त्यांत या पुस्तकाची गणना करण्यास हरकत नाहीं. हें पुस्तक मुख्यत: " Heroines of Ind " आणि "भारत वर्षकी विख्यात रानियोंके चरित्र" या पुस्तकांच्या आधारानें रा. रा. **अनंत केशव चितळे**, वाईकर, यांनीं लिहिलें आहे.

4. Hoe & Co's Handy Pocket Diary for 1900. ही मद्रास येथून आह्मांकडे आली आहे. यांत उपयुक्त माहिती दिलेली आहे. मद्रास इलाख्यांतील राजकीय वगैरे माहिती यांत दिल्यामुळें ही रोजनिशी विशेषत: तिकडील लोकांस विशेष उपयुक्त होईल. तथापि इकडील लोकांसही तिचा कमी उपयोग होईल असें नाहीं. सोबत रोजनिशीप्रमाणेंच एक चांगली पेनसिलही दिली असते.

५. श्रीवेंकटेश्वर समाचार—हें जंगी वर्तमानपत्र हिंदी भाषेमध्यें रा. रा. **खेमराज श्रीकृष्णदास** हे मुंबईंत प्रति शुक्रवारीं प्रसिद्ध करीत असतात. वर्षाची वर्गणी २॥ रुपये आहे ती आंतील विषययोजना आणि पत्राचा आकार पहातां फार नाहीं. हिंदी भाषेचें ज्ञान करून घेण्यास आणि प्रचलित विषयांची माहिती करून घेण्यास मराठी वाचकांस या पत्राचा चांगलाच उपयोग होईल. मधून मधून सुंदर चित्रेंही दिलीं असतात.

६. निरनिराळ्या रंगाच्या शाईंनीं छापलेलें मधुमक्षिकेचें १९०० सालचें सुंदर क्यालेंडर पोंचलें.

श्री.

# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ३०. अंक ११.

रावसाहेब

## विश्वनाथ नारायण मंडलिक.

### भाग सहावा.

स्वतंत्र व्यवसाय.

(१८७२—१८८०)

रावसाहेबांना जो कौन्सलदारीचा मान मिळाला त्याविषयीं मागें उल्लेख करण्यांत आला आहे. तत्संबन्धीं कथानकाचा उपक्रम करितांना प्रकृत कालांत रावसाहेबांच्या गुणांची सरकारांत फारच चहा होऊं लागली असें ह्मटलें आहे. आतां या कालांत दुसऱ्या कोणत्या प्रकारांनीं रावसाहेबांची संभावना झाली त्याचा निर्देश करून नंतर सार्वजनिक संस्यासंबंधानें त्यांनीं केलेल्या उद्योगाकडे वळूं.

मुंबईंत व इतरत्र जे गिरण्या वगैरे यंत्राचे कारखाने आहेत त्यांच्या व्यवस्थेकडे १८७५ सालीं सरकारचें लक्ष गेलें. तेव्हां तत्संबंधीं चौकशी करून सर्व माहिती एकत्र करण्यासाठीं त्याच वर्षी एक कमिशन नेमण्यांत आलें. रावसाहेबांची लोककल्याणाविषयींची आस्था विश्रुत असल्यामुळें त्यांची दुसऱ्या कांहीं गृहस्थांबरोबर या महत्त्वाच्या कामावर नेमणूक करण्यांत आली होती. १८७६ सालीं लार्ड लिटन यांच्या कारकीर्दींत एकंदर हिंदुस्थान देशांत चालू असलेल्या शिक्षणपद्धतीसंबन्धानें भिन्नभिन्न विषयांत अध्ययन करण्यास योग्य पुस्तकें कोणतीं हें ठरविण्यासाठीं एक कमिटी नेमण्यांत आली. या कमिटीचें काम सिमला मुक्कामीं चालावयाचें होतें. निरनिराळ्या इलाख्याचे माहितगार गृहस्थांची या कमिटींत योजना करण्याचा विचार असल्यामुळें मुंबई इलाख्याच्या तर्फेनें रावसाहेबांस निमंत्रण करण्यांत आलें; परंतु प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें आणि पूर्वस्वीकृत कार्यांच्या बाहुल्यामुळें रावसाहेबांना या निमंत्रणास मान देतां आला नाहीं. १८७७ सालीं दिल्ली मुक्कामीं लार्ड लिटन साहेबांनीं जंगी दरबार भरविला. तो प्रसंग बहुतेक वाचकांच्या स्मरणांत असेलच. लॉर्ड बीकन्सफील्ड यांच्या राजकारणपटुत्वाची कमाल ह्मणून नांवाजलेली ‘ केसरहिंद ’ हें पद महाराणी साहेबांना अर्पण करण्याची कृति अमलांत आणण्यासाठीं जो दिल्ली मुक्कामीं अपूर्व समारंभ झाला त्यांत एतद्देशीय राजेरजवाड्यांना व संमाननीय आणि विद्वान् अशा सद्गृहस्थांनाही योग्य पदव्या देण्याचा पूर्वींच संकेत ठरला होता. या प्रसंगीं रावसाहेबांस निमंत्रण करण्यांत आलें होतें व त्यांस ‘ रावबहादुर ’ हा किताब देण्याचें ठरलें होतें. परंतु रावसाहेबांनीं तो मान नाकारिला.

त्याचा स्वीकार करून सदर अमीन व डेप्युटि कलेक्टर यांच्या पंक्तींत आपला समावेश करून घेण्याची आपली इच्छा नाहीं असें रावसाहेबांनीं कळविलें. त्यावेळीं रावसाहेबांची जी योग्यता मानिली जात होती तिच्या अनुरूप हा मान नव्हता असें त्यांस वाटलें व ह्मणूनच त्यांनीं त्याचा इनकार केला. सरकार जो मान देऊं इच्छितें तो अल्पस्वल्प असला तरी त्याचा अंगीकार न करणें ह्मणजे एक प्रकारचा सरकारचा अपमान गणला जातो, व अशा प्रकारच्या धृष्टतेचें अवलंबन करणारास प्रायश्चित्तही भोगावें लागतें: ह्मणजे सरकार पुन्हा त्यास कोणत्याही प्रकारचा मान देत नाहीं. निदान ज्या अधिकाऱ्यांच्या कारकीर्दींत असा प्रकार घडला असेल ते अधिकारापन्न असत तोंपर्यंत तरी त्या गृहस्थाची संभावना सरकाराकडून होत नाहीं. परंतु रावसाहेबांच्या संबंधानें अगदींच निराळा प्रकार घडून आला. दिल्लीच्या दरबारांत त्या प्रसंगाचें स्मारक ह्मणून एक पदक त्यांस देण्यांत आलें इतकेंच नव्हे तर सी. एस. आय ( **कंप्यानियन ऑफ ध स्टार ऑफ इंडिया** ) हा किताबही त्यांस देण्यांत आला. या किताबाची उच्च प्रतीच्या पदव्यांत गणना होत असते व विशेष प्रकारची योग्यता असल्याशिवाय हा किताब देण्यांत येत नाहीं. या किताबाचें लक्षण ह्मणून जें तारकारूप पदक देण्यांत येतें तें रावसाहेबांना समर्पण करण्यासाठीं १८७८ च्या जानेवारी महिन्यांत मुंबई मुक्कामीं सेक्रेटारियटमध्यें एक दरबार भरण्यांत आला होता. या प्रसंगीं अध्यक्षस्थान नामदार गिब्स साहेबांनीं अलंकृत केलें होतें. गिब्स साहेबांस रावसाहेबांची माहिती फारच पूर्वींपासून असल्यामुळें रावसाहेबांचें गौरव करण्याचा प्रसंग त्यांस विशेष आनंदप्रद झाला. त्या समयीं त्यांनीं जें भाषण केलें त्यांतील आशय येणेंप्रमाणें:--

" सिंधप्रांतांत सर बार्टल फ्रियर यांजपाशीं " रावसाहेब कारकुनीच्या कामावर होते तेव्हां- " पासून ह्मणजे आज पंचवीस वर्षें मी त्यांना " ओळखतों, व त्यांचाच सन्मान करण्याचा प्रसंग " मला प्राप्त झाला याबद्दल मला विशेष आ- " नंद वाटतो. रावसाहेब सिंधप्रांतांत होते त्या- " नंतर शिक्षणखात्यांत व न्यायखात्यांत " त्यांनीं सरकारची उत्तम प्रकारें नोकरी ब- " जाविली. पुढें मुंबईशहरांत उत्पन्नावरच्या " कराची व्यवस्था ठेवण्यासाठीं कमिशनरच्या " जागीं जेव्हां माझी नेमणूक झाली तेव्हां " माझ्या मदतनिसाच्या जागीं रावसाहेबांची " योजना करण्यांत आली होती. त्या समयाचें " आतां स्मरण होऊन मला विशेषच समाधान " वाटतें. रावसाहेबांकडे जो कार्यभाग नेमून " दिला होता तो मोठा महत्त्वाचा व जोखिमी- " चा होता. त्याचा त्यांनीं यथायोग्य निर्वाह " केल्याबद्दल त्यांची फारच वाखाणणी झाली " व सरकाराकडे त्यांची मी शिफारस केली. " नंतर रावसाहेबांनीं नोकरी सोडून वकिलीचा " व्यवसाय पत्करला. त्यांतही त्यांनीं चांगला " नांवलौकिक मिळविला आहे. शिवाय नाग- " रिक या नात्यानें अनेक कर्तव्यांचा भार " स्वीकारून अश्रांत परिश्रम करून त्यांनीं " कीर्ति संपादन केली आहे. "

याप्रमाणें प्रकृत कालांत रावसाहेबांना जो विशेष मान मिळाला त्याची हकीकत आहे. आतां पुढील कथाभागाचा उपक्रम करण्यापूर्वीं वरील प्रकरणाशीं संबद्ध अशा एका गोष्टीविषयीं येथें उल्लेख केला असतां सोईचें

होणार आहे. ती गोष्ट ' रावसाहेब ' या किताबाची होय.

सरकारी नोकरींत असलेल्या कांहीं अधिकाऱ्यांस अधिकारपरत्वें ' रावसाहेब ' हा किताब असतो. विद्याखात्यांतील डेप्युटि इन्स्पेक्टर व न्यायखात्यांतील मुन्सफ हे अधिकारी या वर्गांतले होत. या दोन्ही हुद्यांवर सरकाराकडून रावसाहेबांची योजना करण्यांत आली होती हें मागें सांगितलेंच आहे; व त्या हुद्यांवर ते होते तोंपर्यंत त्यांच्या नांवास ' रावसाहेब ' हें उपपद लावणें योग्यच होतें. पुढें क्युरेटर झाल्यावरही त्यांचा रावसाहेब हा किताब सुटला नाहीं. नंतर इन्कमटयाक्स खात्यांत गेल्यावर मात्र सरकारी अधिकाराच्या नात्यानें त्यांस 'रावसाहेब' हें उपपद लावण्याचें कारण राहिलें नाहीं. नोकरी सोडल्यावर तर तो संबंध अगदींच सुटला. समाजाची रीति ह्मटली ह्मणजे एकदां एकाद्याच्या नांवाचा विशेष प्रकारानें निर्देश करण्याचा प्रघात पडला कीं तोच बहुधा कायम होतो, व तीच तऱ्हा रावसाहेबांच्या संबंधानेंही अमलांत आली असावी अशी लोकांची समजूत आहे. परंतु खरा प्रकार काय आहे हें मात्र निश्चयेंकरून सांगतां येत नाहीं. ' मंडलिकांचे लेख व त्यांचीं भाषणें ' या नांवानें रावसाहेबांच्या चिरंजिवांनीं जें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे त्याच्या आरंभीं रा. पाध्ये यांनीं लिहिलेलें एक अल्प परंतु सुंदर चरित्र दिलेलें आहे. त्यामध्यें असें स्पष्ट लिहिलें आहे कीं डेप्युटि इन्स्पेक्टर असतांना जो किताब केवळ अधिकारान्वयें प्राप्त झाला होता तोच किताब पुढें कायम रहावा असा सरकारानें ठराव केला. याचेंच समर्थन करणारा दैनिकवृत्तांतही एक उल्लेख आढळतो तो पुढें लिहिल्याप्रमाणेः—

" २-४-१८६४--डन्बार साहेबांना शांत-
" पणानें सांगितलें कीं सरकारानें मला ' राव-
" साहेब ' ही पदवी दिली आहे. ही पदवी
" इंग्रजींतील ' इस्क्वायर ' पदवीबरोबर आहे.
" ते ह्मणाले ' या पुढें मी हा किताब तुमच्या
" नांवाला जोडीत जाईन. ' मी ह्मटलें ' अशा
" किताबांची मला स्वतःला ह्मणाल तर मोठी-
" शी आवड आहे असें नाहीं. परंतु ते सरका-
" रानें दिले असले ह्मणजे त्यांचा उपयोग
" केलाच पाहिजे "

वरील उताऱ्यावरून ' रावसाहेब ' हा किताब सरकारांतून मिळाला असला पाहिजे असें अनुमान स्पष्ट निघतें. परंतु तत्संबंधीं सरकारचा ठराव उपलब्ध नाहीं. एका सरकारी अधिकाऱ्याकडून असें समजण्यांत आलें आहे कीं एका प्रसंगीं मंडलिकांना ' रावसाहेब ' हा किताब केव्हां व कोणत्या निमित्तानें देण्यांत आला याविषयीं सरकारांत प्रश्न निघाला, परंतु त्याविषयीं कांहींच आधार मिळाला नाहीं; तेव्हां सरकारानें असा ठराव केला कीं ' रावसाहेब ' पदवी कायम असावी. ही माहिती प्रमाणभूत मानण्यालाही आह्मांस सबल कारण आहे. या दोन हकीकती विसंवादक आहेत हें स्पष्ट आहे. परंतु त्यांचा मेळ घालण्याचें साधन उपलब्ध होईपर्यंत हा विसंवाद तसाच राहणार. असो.

आतां आपण प्रकृत कालामध्यें रावसाहेबांनीं सार्वजनिक संस्थांसंबंधानें केलेल्या उद्योगाकडे वळूं. ' स्टूडन्ट्स सोसायटी ' प्रीत्यर्थ त्यांनीं पूर्वीं पुष्कळ श्रम घेतले होत. नंतर कार्यभार उचलण्यास दुसरी मंडळी तयार झाली तेव्हां त्यांना तितके श्रम करण्याची जरूर राहिली नाहीं. तथापि त्यांचा त्या संस्थेशीं संबंध पूर्ववत् होता. त्याचप्रमाणें इतरसंस्थां-

शींही त्यांचा संबंध कायम होता. मुंबई असोसियेशन व ईस्ट इंडिया असोसियेशन या सभांच्या संबंधानेंही प्रकृत कालांत रावसाहेबांनीं विशेष श्रम घेतले.

युनिव्हर्सिटीसंबंधानेंही रावसाहेबांचा उद्योग अव्याहत चालू होता. फेलो व परीक्षक या नात्यानें जो पूर्वी या संस्थेशीं त्यांचा संबंध होता तो १८७३ सालीं त्यांस सिंडिक नेमल्यामुळें अधिक निकट झाला. युनिव्हर्सिटी या संस्थेचे घटकावयव ह्मटले ह्मणजे 'फेलो' नेमलेले गृहस्थ होत. या सर्वांच्या सभेला सेनेट ह्मणतात व या सेनेटकडून निवडली गेलेली जो व्यवस्थापक मंडळी तिला सिंडिकेट अशी संज्ञा आहे. या मंडळीच्या सभासदांस सिंडिक ह्मणतात. युनिव्हर्सिटीचा सर्व कारभार वस्तुतः या मंडळीकडेच असतो.

आतां शेवटीं म्युनिसिपालिटीसंबंधानें रावसाहेबांनीं प्रकृत कालांत काय काय केलें हें सांगावयाचें. मागील भागांत म्युनिसिपालिटीमध्यें क्राफर्ड साहेबांच्या कारकीर्दींत जो घोटाळा झाला होता त्याचा निर्देश करून त्या संस्थेस सम्यक् आणि व्यवस्थित रूप देण्याच्या कामीं रावसाहेबांनीं कसे परिश्रम केले याविषयीं उल्लेख करण्यांत आला आहे. सर सीमोर फिट्झरल्ड गव्हरनर असतांनाच नवा कायदा करण्याचा विचार उद्भूत झाला होता व त्यांच्याच कारकीर्दींत कायद्यास अखेरची मंजुरी मिळाली. दरम्यान जेव्हां जेव्हां प्रसंग येई तेव्हां तेव्हां म्युनिसिपालिटींत असलेल्या अव्यवस्थेबद्दल व अपेक्षित सुधारणांबद्दल वाटाघाट करण्यास रावसाहेब चुकले नाहींत. १८७१ सालीं या विषयाची चर्चा करण्यासाठीं एक जाहिरसभा भरली होती. त्या प्रसंगीं विस्तृत भाषण करून रावसाहेबांनीं फॉर्ब्स साहेबांच्या सूचनेस अनुमोदन दिलें. अर्धवट सुधारणा न करितां अवश्यक तितक्या सर्व गोष्टींची एकदमच तजवीज व्हावी असें त्यांनीं आग्रहपूर्वक सांगितलें. १८७१ सालीं एका महत्त्वाच्या मुद्यावर वाद उपस्थित झाला. म्युनिसिपालिटीच्या अधिकाऱ्यांनीं बेंच्याचा विरुद्ध ठराव असतांही दहा महिनेपर्यंत सतत पोलिस खर्चाची रक्कम दिली, ह्मणून त्या अधिकाऱ्यांना दोष द्यावा अशी एका युरोपियन सभासदानें सूचना केली. या सूचनेसंबन्धानें रावसाहेबांनीं मुद्देसूद व निर्भीडपणाचें भाषण केलें. त्याचा आशय येणेंप्रमाणें:—

"केवळ म्युनिसिपालिटींतील अधिकाऱ्यां-
"ना दोष देऊन स्वस्थ बसणें हा उपाय यथा-
"योग्य नव्हे. अव्यवस्थेचें मूळ याहून अधिक खो-
"ल आहे, आणि कायद्या अन्वयें जे आपल्यास
"हक्क आहेत ते हक्क बजाविण्याचा आपला
"पक्का निर्धार आहे असें आपण या प्रसंगीं
"दाखविल्याखेरीज आपण आपलें कर्तव्य
"केलें असें होणार नाहीं. सरकारपक्षाचें जेवढें
"ह्मणून समर्थन होणें शक्य आहे तेवढें एका
"सभासदाकडून नुकतेंच करण्यांत आलें
"आहे. आपली ही सभा कायद्या अन्वयें
"स्थापिली गेली आहे आणि त्या कायद्याला
"हिंदुस्थानसरकार आणि स्टेट सेक्रेटरी यांची
"मंजुरी मिळाली आहे. हा कायदा जोंपर्यंत
"अमलांत आहे तोंपर्यंत आपले हक्क काय
"आहेत हें स्पष्ट समजण्यासारखें आहे.
"आतांच म्याक्लीन साहेबांनीं बोलून दाखवि-
"ल्याप्रमाणें सरकारचें वर्तन जसें कांहीं
"त्यांचा एखादा खासगी नोकर असावा
"आणि त्याला अमूक एक रकम देण्यास

" सांगावी तसें झालें. ज्या अधिकाऱ्यांची
" बहाली बडतर्फी सरकारचे हातांत आहे
" त्या अधिकाऱ्यांनीं सरकारचा हुकुम मानिला
" ह्मणून त्यांस दूषण देऊन स्वस्थ बसावें
" हें या प्रसंगीं मला उचित वाटत नाहीं
" कायद्याप्रमाणें आपल्या हक्कांची व्याप्ति किती
" आहे याविषयीं आपल्या वकिलांची आपण
" सल्ला घेऊं या व अशा रीतीनें सरकाराकडून
" मर्यादेचें उल्लंघन होऊं नये ह्मणून कोणत्या
" उपायांची योजना करावी याचा विचार
" करूं या. जर तसे उपाय नाहींत असें ठरलें
" तर माझ्यामतें अशा थराला गोष्टी येऊन
" पोंचल्या आहेत कीं आपण सर्वांनीं खर्चाचें
" अंदाजपत्रक मंजूर करण्यास नाकबूल व्हावें
" व म्युनिसिपालिटीच्या व्यवस्थेचें सर्व जोखी-
" म सरकारावर टाकावें. पोलिसचा खर्च चाल-
" विला पाहिजे हें सर्वांस मदशूरच आहे. परंतु
" सरकाराला हेंही माहीत असलें पाहिजे कीं
" बजेट एकदां मंजूर झालें ह्मणजे तें पुन्हां
" बदलतां येत नाहीं. कायदा बदलण्याचें
" सरकारच्या हातीं होतें व एक नवाच
" लहानसा कायदा त्यांना करितां आला
" असता. परंतु तसें त्यांनीं केलें नाहीं. मामूल
" वहिवाटीप्रमाणें पोलिसच्या खर्चाबद्दल कांहीं
" रकम देणें सरकाराला भाग आहे. ही वहिवाट
" ह्मणजे एक प्रकारचा करारच होऊन बसला
" आहे. हा करार रास्त असो किंवा चुकीचा
" असो त्याप्रमाणें सरकार आजपर्यंत चाललें
" आणि तो जमेस धरूनच सरकारानें म्युनि-
" सिपालिटीची व्यवस्था ठरविली आहे. तेव्हां
" त्या करारापासून वर्जित जाण्याची सोय
" नाहीं. अशा स्थितींत असा प्रकार पुन्हा न
" घडण्याची काय तजवीज करावयाची याचा
" विचार केल्याशिवाय गत्यंतर नाहीं."

१८७२ सालीं नवीन कायदा मंजूर होऊन प्रसिद्ध झाला. त्या अन्वयें म्युनिसिपालिटीला नवेंच रूप आलें. म्युनिसिपालिटीच्या कारभारांत लोकांना पूर्वीं प्रत्यक्ष रीतीचा अधिकार मुळींच नसे तो या कायद्यानें मिळाला. कार्पोरेशन नांवाची एक नवी सभा नेमण्यांत आली. या सभेंत ६४ सभासद असत. पैकीं १६ 'जस्टिस ऑफ ध पीस' हा अधिकार धारण करणाऱ्या लोकांनीं निवडावयाचे; ३२ म्युनिसिपालिटीला ज्यांच्यापासून विवक्षित कर प्राप्त होत असेल अशा लोकांनीं निवडावयाचे, व राहिलेले १६ सरकारानें नेमावयाचे. कार्पोरेशन सभेच्या सभासदांपैकीं १२ जणांची एक व्यवस्थापक सभा असे, तिला 'टौन कौन्सिल' ही संज्ञा होती. नव्या कायद्याप्रमाणें पहिली निवडणूक १८७३ सालीं झाली. तेव्हां रावसाहेबांस दोन्ही सभांचे सभासद निवडण्यांत आलें. हा मान त्यांना एकसारखा आमरण देण्यांत येत होता. या दोन्ही सभांचें काम रावसाहेबांनीं फारच लक्ष्य लावून व श्रम घेऊन केलें. त्यांच्या कार्यनिष्ठेविषयीं आतां ह्मणजे नवीन प्रमाण पाहिजे होतें असें नाहीं. सार्वजनिक कृत्यांत सतत परिश्रम करून त्यांनीं आपली कार्यक्षमता यापूर्वींच व्यक्त केली होती, व तसाच क्रम त्यांनीं या नव्या संस्थासंबन्धानें चालू ठेविला. १८७९ सालीं कार्पोरेशनच्या सभासदांनीं रावसाहेबांना आपले अध्यक्ष नेमिलें व अशा रीतीनें त्यांनीं केलेल्या लोकसेवेचा मान व गौरव केला. १८८० सालीं पुन्हा रावसाहेबांना तोच मान देण्यांत आला. यावरून त्यांच्या विषयींची मानबुद्धि सहज

समजण्यासारखी आहे. पौरजनांकडून नागरिकाग्रणीला जे मान मिळण्यासारखे असतात त्यांमध्यें हा मान अग्रगण्य होय. या दोन वर्षांच्या मुदतीमध्यें रावसाहेबांनीं काम फारच चोख केलें. यावेळीं कांहीं भानगडीचे व महत्त्वाचे विषय सभेंत निघाले होते. सभेंत कोणत्याही विषयाची चर्चा होत असतां सभासदांकडून ठरींव नियमांचें व शिष्टाचारांचें उल्लंघन न होऊं देणें हें अध्यक्षाचें काम आहे. युरोपियन व नेटिव सभासदांस सारखेंच लेखणें व त्यांस मर्यादेचा अतिक्रम करूं न देणें हें काम सोपें नाहीं. तें फारच खुबीनें करावें लागतें. कोणालाही न दुखवतां व पक्षपाताच्या दोषास पात्र न होतां सर्व व्यवस्था सुयंत्रितपणें चालू ठेवणें दुष्कर आहे व अशा दुष्कर कार्याचा निर्वाह होण्यास विशेष चतुरता लागते. अशा प्रकारची चतुरता, सुजनता व समता या गुणांचा प्रत्यय या दोन वर्षांच्या कारकीर्दींत रावसाहेबांनीं सर्वांना चांगल्या रीतीनें दिला.

रावसाहेब कार्पोरेशनचे अध्यक्ष असतांनाच तुळशी तलावांतून मुंबई शहरांत पाणी आणण्याचें काम पुरें होऊन नळामध्यें पाणी सोडण्याचा जाहिर समारंभ झाला. हा विधि त्यावेळचे गव्हरनर सर रिचर्ड टेंपल यांचे हातून व्हावा असें ठरलें होतें. त्या प्रसंगीं रावसाहेबांनीं आरंभींच जें भाषण केलें त्यांत शहरांतील पाण्याच्या पुरवठ्याची अव्वलपासून थोडक्यांत हकीकत सांगितली आहे. ही हकीकत फार मनोरंजक आहे. शिवाय तुळशी येथील तलाव बांधण्याची आवश्यकता, त्यापासून सिद्धीस जाणारे हेतु, व त्या कामावर झालेला खर्च, याविषयींही या भाषणांत थोडक्यांत माहिती दिलेली आहे. या प्रसंगाचें स्मारक ह्मणून एक रुपेरी व एक हस्तिदंती हातोडी रावसाहेबांस नजर करण्यांत आली होती.

रावसाहेब कार्पोरेशनचे अध्यक्ष असतांना जे अनेक वादविषय उपस्थित झाले त्यांमध्यें उपदंश रोगानें पीडित असलेल्या वेश्यांच्या शुश्रूषेसाठीं म्युनिसिपालिटीनें खर्च करावा किंवा नाहीं या विषयावर मोठा कडाक्याचा विवाद झाला. शिवाय मलबार टेंकडीवर पाणी सांठवण्यासाठीं तलाव बांधण्याच्या कामांत पैशाची अफरातफर झाली त्यासंबंधानेंही वाक्प्रहारांचा बराच विनिमय झाला.

पहिल्या विषयासंबंधानें प्रथम टौन कौन्सिल सभेंत चर्चा झाली. त्या सभेंत रावसाहेबांनीं प्रसिद्ध आंग्ल मुत्सद्यांचीं व चिकित्सकांचीं भाषणें व लेख यांचा आधार घेऊन असें दाखविलें कीं अशा प्रकारची व्यवस्था कोणत्याही दृष्टीनें प्रशस्त नाहीं. या प्रसंगीं त्यांनीं सर्व प्रकारच्या आक्षेपांचें निवारण करून आपल्या मताचें फारच समर्पक रीतीनें समर्थन केलें. प्रकृत विषयाचें यथार्थ ज्ञान होण्यासाठीं त्यांनीं पुष्कळ ग्रन्थांचें अवलोकन केलें व त्यांतील मुद्देशीर विवेचनांचें त्यांच्या भाषणांत एकीकरण झालेलें दिसतें. या वादांत त्यांच्या विरुद्ध केवळ युरोपियनच होते असें नाहीं तर कांहीं मुसलमान व पारशी गृहस्थ सुद्धां त्यांचे प्रतिपक्षी होते. सर्वांच्या आक्षेपांस रावसाहेबांनीं यथार्थ उत्तरें दिलीं. शिवाय हिंदुस्त्रियांच्या नीतिमत्तेविषयीं जीं कांहीं निराधार अशीं सामान्य विधानें कांहीं युरोपियन गृहस्थांनीं केलीं होतीं, तींही त्यांनीं खोडून काढिलीं. उपदंशासारख्या स्पर्शजन्य

रोगाच्या उपशमासाठीं कायदे केल्यानें एकंदर जनसमाजाच्या मनावर वाईट संस्कार होण्याचा संभव आहे हेंही रावसाहेबांनीं दाखविलें. शेवटीं वर्तमानपत्रकार व सार्वजनिक हिताचे लेख लिहिणारे गृहस्थ, लोकांपासून कर घेऊन वसूल केलेला पैसा अशा कामांत खर्च न होऊं देण्याविषयीं आरंभिलेल्या उद्योगास मदत करतील अशी आशा दर्शवून त्यांनीं आपलें भाषण समाप्त केलें.

मागाहून हें प्रकरण कार्पोरेशन सभेपुढें आलें, तेव्हां रावसाहेबांनीं त्याची पूर्वपीठिका सांगितली व म्युनिसिपालिटीनें त्या कामीं मदत करूं नये अशी सूचना केली. नंतर त्या विषयावर सभेंत वादविवाद झाला. अखेरीस वादांत उद्भूत झालेल्या मुद्यांचें स्पष्टीकरण करून त्यांनीं आपलें मत सविस्तर विदित केलें. वादविवादाचे वेळीं डाक्टर कुक नांवाच्या गृहस्थांनीं असें बोलून दाखविलें होतें कीं, वेश्यावृत्तीला हिंदुधर्मशास्त्राचें अनुमोदन आहे. या मुद्यावर रावसाहेबांनीं जें भाषण केलें तें फारच महत्त्वाचें असल्यामुळें त्यांतील कांहीं भागाचा उतारा पुढें दिला आहे:—

" हिंदुधर्मशास्त्राचें वेश्यावृत्तीस अनुमोदन " आहे असें जें डाक्टर कुक यांनीं प्रतिपादन " केलें त्या संबंधानें पहिली गोष्ट ही सांगाव- " याची कीं, ' हिंदु ' या शब्दाची व्याप्ति अनि- " श्चित आहे. शिवाय ' हिंदुराष्ट्र ' या संज्ञेनें " ओळखल्या जाणाऱ्या लोकांपैकीं, असलीच " तर, फारच थोड्या भागाची माहिती डाक्टर " कुक यांना असण्याचा संभव आहे. असें " असूनही त्यांनीं हिंदुधर्मशास्त्रासंबंधीं अशा " प्रकारचीं विधानें प्रसिद्धपणें भरसभेंत करावीं " याचें मला आश्चर्य वाटतें. डाक्टर साहेबांच्या " बोलण्याचें जें धोरण माझ्या समजण्यांत " आलें तें हें कीं, जेजुरीच्या मुरळ्या व कोंकण " प्रांतांतील भाविणी यांचें जें व्यभिचाराचें " वर्तन दिसण्यांत येतें त्यास धर्मशास्त्राचें " स्पष्टरीतीचें अनुमोदन आहे. पृथ्वीवरील प्र- " त्येक समाजांत कांहींना कांहीं तरी " व्यंगें असतातच, आणि त्यांपैकीं " कांहीं अशीं असतात कीं कोणत्याही उ- " पायांनीं त्यांचा प्रतीकार होत नाहीं. आम- " च्या देशांत बालहत्येचा प्रचार आहे तसाच " प्रचार, भिन्न कारणांमुळें कां होईना, पाश्चा- " त्य देशांतही आढळण्यांत येतो. या गोष्टीचा " उल्लेख करण्यांत माझा हेतु इतकाच कीं, ज्या " मुद्यांचें मिस्तर मेहता यांनीं मोठ्या आवेशानें " प्रतिपादन केलें त्याचें विशेष स्पष्टीकरण " व्हावें. जेजुरीच्या मुरळ्या व दक्षिण तीरावरील " प्रदेशांतील भाविणी व तशाच प्रकारच्या " इतर स्त्रिया यांच्या आचरणाचा हिंदुधर्माशीं " तिलमात्र संबंध नसून त्याचा उद्भव केवळ " समाजविशेषांच्या आचारापासून झाला आहे. " पृथ्वीवरील दुसऱ्या एखाद्या सुधारलेल्या रा- " ष्ट्रांत प्रचारांत आलेल्या सामाजिक आचा- " रांचा जितका तत्रत्य धर्माशीं संबंध अस- " ण्याचा संभव आहे तितकाच प्रकृत आचा- " रांचा हिंदुधर्माशीं संबंध आहे. हिंदुधर्माचें " वेश्यावृत्तीस अनुमोदन आहे या विधानास " आधारभूत असा लेख किंवा वचन माझ्या " लेखांपैकीं कोणी दाखवूं शकेल तर तो लेख " किंवा तें वचन चुकीचें आहे असें मला म्ह- " णावें लागेल. तीस वर्षांचा धर्मशास्त्राचा व्या- " संग व नामांकित शास्त्रविशारदांच्या सहवा- " सानें प्राप्त झालेलें ज्ञान यांच्या आधारानें " मला असें म्हणतां येतें कीं प्रकृत वादास

" विषय झालेल्या आचारांस शास्त्राची संमति
" कोणत्याही काळीं देण्यांत आली नव्हती. "

याप्रमाणें या आगंतुक विषयाची व्यवस्था लावून मुख्य विषयाचा समारोप करण्यापूर्वी रावसाहेबांनीं वैद्यकांत निष्णात असलेल्या कांहीं युरोपियन गृहस्थांच्या मतांचा उल्लेख करून असें प्रतिपादन केलें कीं, ज्या विषया-संबंधानें युरोपांत सुद्धां ऐकमत्य नाहीं त्या संबंधानें एकच पक्ष स्वीकारून त्यापासून लोकांचें अहित होण्याचा संभव असतांही तत्प्रीत्यर्थ म्युनिसिपालिटीनें सार्वजनिक द्रव्याचा व्यय करावा हें प्रशस्त नाहीं. रावसाहेबांच्या भाषणाचा उपसंहार पुढें लिहिल्याप्रमाणें होता:—

" नवीन झालेला कायदा परिणामीं हितावह
" आहे व त्यापासून कोणत्याही प्रकारचें
" नुकसान नाहीं अशी आपली खात्री झाल्या-
" शिवाय, जीं मनुष्यें केवळ आपल्या दुर्गु-
" णामुळेंच रोगग्रस्त होतात त्यांच्या रोगाचा
" उपशम करण्याप्रीत्यर्थ, सार्वजनिक द्रव्याचा
" व्यय करण्यास आपण सहसा प्रवृत्त होऊं
" नये. व्यक्तिविशेषांच्या दुर्गुणास उत्तेजन
" मिळावें ह्मणून कर भरणाऱ्या गरीबांना दंड
" काय ह्मणून व्हावा? आपल्या दुर्वर्तनानें
" अवनत स्थितीप्रत पोंचलेल्यांची सुधारणा
" व्हावी असा कायद्याचा हेतु दिसत नाहीं.
" तसा प्रकार असता तर गोष्ट निराळी होती.
" कायद्याचा हेतु केवळ वेश्यांना तपासून त्या दू-
" षित असल्यास त्यांच्या पापवृत्तीस त्या योग्य
" होतील अशी व्यवस्था करावयाची. या काय-
" द्याचा पुरस्कार करणाऱ्यांची अवहेलना कर-
" ण्याचा माझा हेतु नाहीं, परंतु अशा रीतीनें
" अशुद्ध तत्वांच्या धोरणावर केलेल्या कायद्या-
" ची अंमलबजावणी होण्याकरितां म्युनिपा-
" लिटीच्या पैशांतून एक पैसुद्धां देण्यास मी
" राजी होणार नाहीं. "

[ पुढें चालेल. ]

# बेकन्चे निबंध.

## महत्त्वाकांक्षा.

महत्त्वाकांक्षा ही पित्तासारखी आहे; पित्त एक दोष* आहे; तो बंद केला नाहीं तर तो मनुष्यांना सुटसुटीत, आस्थेवाईक, उत्साह-भरित व खटपटी करतो. पण तो जर बंद केला व मनाप्रमाणें वर्तन करायाला त्याला मिळालें नाहीं, तर तो उग्र व त्यामुळें दुष्ट व विषारी होतो. त्याचप्रमाणें महत्त्वाकांक्षी माणसांना जर चढतीचा मार्ग खुला सांपडला व नेहमीं त्यांचें पाऊल पुढेंच असलें, तर ते उद्योगशील असतात; भयकर नसतात. पण त्यांच्या हव्यासांना जर प्रतिबंध झाला, तर ते आंतल्याआंत असंतुष्ट होतात, आणि मनुष्यांकडे व वृत्तांकडे दुष्ट दृष्टीनें पहातात; आणि वस्तुस्थिति मागें जात असला ह्मणजे त्यांना मोठा आनंद होतो. हा गुण राजाच्या किंवा संस्थानाच्या नोकरांमध्यें अत्यंत वाईट आहे. ह्मणून जर राजांनीं महत्त्वाकांक्षी मनुष्यांचा उपयोग केला तर त्यांचा उत्तरोत्तर उत्कर्ष व्हावा, अपकर्ष होऊं नये, अशी तजवीज करावी हें चांगलें. परंतु असें करणें अडचणीचें आहे; ह्मणून असल्या स्वभा-

* कफ, वात, पित्त, हे शरीरांतील तीन दोष.

वाच्या माणसांचा उपयोग मुळींच करूं नये हें चांगलें. कारण ते जर आपल्या चाकरी बरोबर वर चढले नाहींत, तर चाकरी त्यांचेबरोबर खालीं पडेल अशी व्यवस्था ते करतील. पण ज्या अर्थीं महत्त्वाकांक्षी स्वभावांच्या माणसांचा, आवश्यकतेवांचून, उपयोग करूं नये हें चांगलें असें आह्मी सांगितलें, त्याअर्थीं कोणत्या प्रकरणीं त्यांची आवश्यकता आहे हें सांगणें जरूर आहे. लढायांमध्यें चांगले सेनापति घेतले पाहिजेत, मग ते कितीही महत्त्वाकांक्षी असोत; कारण त्यांच्या चाकरीपासून जो उपयोग होतो त्यामुळें बाकीचें सर्व झांकलें जातें; आणि महत्त्वाकांक्षा नसलेला शिपाई ठेवणें ह्मणजे त्याचे ( बुटाचे ) कांटे उपटून काढण्याप्रमाणें आहे. संकटाच्या व मत्सराच्या कामीं राजांना महत्त्वाकांक्षी मनुष्यांचा आडपडद्यांप्रमाणेंही मोठा उपयोग होतो. कारण कोणीही मनुष्य, डोळे बांधलेल्या कबुतरासारखा असल्यावांचून, तसलें काम पत्करणार नाहीं; डोळे बांधलेलें कबूतर एकसारखें वर वर चढत जातें. कारण भोंवतालचें त्याला कांहीं दिसत नाहीं. एकादा प्रजाजन वरचढ झाला तर त्याचा मोठेपणा खालीं ओढण्यासही महत्त्वाकांक्षी मनुष्यांचा उपयोग होतो. जसा **टैबेरियसानें सेयानसाला** खालीं ओढण्याच्या कामीं **माक्रोचा** उपयोग केला. ह्मणून ज्या अर्थीं असल्या बाबतींत त्यांचा उपयोग करणें अवश्य आहे, त्या अर्थीं ते कमी भयंकर होतील अशा रीतीनें त्यांना कसें लगामीं ठेवावें हें सांगण्याचें काम उरलें. ते जर हलक्या कुळांतले असले तर त्यांची भीति कमी; ते थोर कुळांतले असल्यास त्यांची भीति जास्त. ते स्वभावानें करडे असले तर त्यांची भीति कमी, कृपाळू व लोकप्रिय असले तर त्यांची भीति अधिक. ते नवथर चढले असले तर त्यांची भीति कमी, पण ते आपल्या वर्चस्वामध्यें वहिवाटलेले व मजबूत बनलेले असले तर त्यांची भीति जास्त. राजांच्या पदरीं प्यारींतले लोक असणें हें कित्येकांच्या मतें नेभळेपणाचें चिन्ह आहे. पण महत्त्वाकांक्षी मोठे लोकांविरुद्ध सर्वांत तोच उत्तम उपाय आहे. कारण राजाला खूष किंवा नाखुष करण्याचा मार्ग प्यारींतल्या माणसाच्या द्वारानें असला, ह्मणजे दुसरा एकादा डोईजड होईल हें अशक्य आहे. त्यांना आळ्यांत ठेवण्याचा दुसरा उपाय ह्मटला ह्मणजे, त्यांच्या इतकेच दिमाखी दुसरे मनुष्य ठेवून समतोलपणा करावा. पण असें करायाचें असलें तर स्थीरता राखण्याकरतां कांहीं मधले मंत्री मात्र असले पाहिजेत; कारण त्यांची भरताड असल्यावांचून ( राज्यरूपी ) तारूं फार हालेल. निदान राजानें कांहीं हलक्या लोकांना उत्तेजन देऊन, त्यांचा अशा रीतीनें उपयोग करावा कीं, ते महत्त्वाकांक्षी लोकांना जणुं काय चाबूक होतील. त्यांना ( महत्त्वाकांक्षी लोकांना ) विनाशाची दहशत घालण्याच्या संबंधानें इतकेंच सांगायाचें कीं, ते भित्र्या स्वभावाचे असल्यास तसें करणें ठीक होईल; पण ते जर धीट व साहसी असले तर तें भयंकर होईल. कारण त्यामुळें त्यांचे बेत घायतावले जाऊन उद्यांचे आजवर येतील. त्यांना खालीं ओढायाच्या संबंधानें, तसें करणें जर अवश्य असलें व तें निर्भयपणें एकदम करतां येत नसलें, तर हाच एक मार्ग आहे कीं, त्यांच्यावर कृपा व अवकृपा यांची नेहमीं आ-

लट पालट करीत असावें: ह्मणजे कोणत्या वेळीं कशाची अपेक्षा करावी हें त्यांना समजणार नाहीं; आणि त्यांस जणुं काय अरण्यांत पडल्यासारखें होईल. महत्त्वाकांक्षांमध्यें मोठ्या कार्यांत यशस्वी होण्याची महत्त्वाकांक्षा कमी घातक आहे. प्रत्येक गोष्टींत आपलें अंग असावें ही महत्त्वाकांक्षा घातक आहे; कारण तिच्यामुळें गोंधळ उत्पन्न होतो व कामाचा बिघाड होतो. तथापि महत्त्वाकांक्षी मनुष्याच्या पदरीं मोठा परिवार असण्यापेक्षां तो कामांत गुंतलेला असला तर भीति कमी. जो हुषार मनुष्यांमध्यें श्रेष्ठ होण्याची हांव धरतो, त्याच्या माथीं मोठें काम असतें; पण ही गोष्ट नेहमीं सार्वजनिक हिताची असते. पण जो शून्यांमध्यें आपण एकटाच कायतो आंकडा होण्याचें कारस्थान करितो तो सबंध युगाचा सत्यानाश वळतो.

प्रतिष्ठेमध्यें तीन गोष्टी असतात; चांगलें करण्यांत वर्चस्व; राजे व प्रमुख पुरुष यांची भेट; व स्वतःच्या संपत्तीची वृद्धि. ज्या महत्त्वापेक्षी मनुष्याच्या ठायीं ह्यांपैकीं उत्तम हेतु आहे तो प्रामाणिक माणूसः व जो राजा महत्त्वापेक्षी पुरुषामध्यें हे हेतु उमगून काढण्यास समर्थ आहे तो शहाणा राजा. सामान्यतः राजांनीं व संस्थानांनीं असे मंत्री निवडावे कीं जे स्वतःच्या उदयापेक्षां कर्तव्याविषयीं अधिक दक्ष आहेत; व जे कामाची आवड मनापासून धरतात, केवळ वरवर धरीत नाहींत. आणि त्यांनीं उद्योगी स्वभावाचा कोण व उत्सुक मनाचा कोण हें ओळखावें.

## भाग्य.

भाग्य उदयाला येण्यास बाह्य योग पुष्कळ अंशीं कारणीभूत होतात, हें नाकबूल करतां येत नाहीं; ( ते बाह्य योग ह्मणजे ) कृपा, संधि, दुसऱ्यांचा मृत्यु, सद्गुणाजोगता काळ. पण मुख्यत्वेंकरून ज्याच्या भाग्याची मूस त्याच्याच हातांत आहे. कवि ह्मणतो, ‘ जो तो आपल्या भाग्याचा शिल्पकार आहे. ’ आणि बाह्य कारणांमध्यें वारंवार येणारें कारण ह्मटलें ह्मणजे हें होय कीं, एकाचा मूर्खपणा तें दुसऱ्याचें भाग्य. कारण कोणीही मनुष्य दुसऱ्यांच्या चुकांनीं जसा त्वरित भरभराटीस येतो तसा दुसऱ्या कोणत्याही कारणांनीं येत नाहीं. “ सर्पानें सर्प खाल्लेले असल्याशिवाय तो ड्रागन * होत नाहीं. ” उघड व दृष्टोत्पत्तीस येणारे सद्गुण स्तुति संपादन करून देतातः पण गुप्त व प्रच्छन्न असे कांहीं सद्गुण असतात ते भाग्य आणून देतात. ते मनुष्याच्या आचरणांत दिसतात; त्यांना नांव नाहीं. त्यांना स्पॅनिश भाषेंत जें नांव आहे त्यावरून त्यांचा कांहींसा बोध होतोः जेव्हां मनुष्याच्या स्वभावांत स्तब्धता नसते किंवा चंचलताही नसतेः तर, त्याच्या मनाचीं चाकें त्याच्या भाग्याच्या चाकांबरोबर चालतात; ( तेव्हां तो असल्या गुणांचा मनुष्य असतो ). कारण लिव्ही ( त्यानें थोरल्या केटोचें वर्णन असें केलें आहे; “ त्या पुरुषाच्या ठायीं शरीराचें व मनाचें बळ इतकें होतें कीं तो कोणत्याही ठिकाणीं जरी जन्मला असता तरी त्यानें आपल्याला भाग्याला चढविलें असतें, ” हें सांगून त्या नंतर ) शे-

* सपक्ष महासर्प.

वर्टी असें ह्मणतो कीं, तो अष्टपैलू बुद्धीचा होता. ह्मणून मनुष्य जर तीव्र दृष्टीनें व लक्षपूर्वक पाहील तर त्याला भाग्य दिसेल. कारण तें जरी आंधळें* असलें तरी अदृश्य नाहीं. भाग्याचा मार्ग आकाशगंगेप्रमाणें आहे. आकाशगंगा ही अनेक लहान लहान तारे एकत्र जमून झाली आहे; ते तारे निरनिराळे दिसत नाहींत, पण समुच्चयानें प्रकाश देतात; याचप्रमाणें असे अनेक लहान लहान सद्गुण—अथवा त्यांना बुद्धि व संवई ह्मटलें तरी चालेल—असतात कीं ते दिसण्यांत क्वचित् येतात, पण मनुष्यांना भाग्यशाली करतात. इतालियन लोक त्यांपैकीं कांहीं नमूद करतात; ते कोणाच्या मनांत देखील यावयाचे नाहींत: जो कधीं चुका करीत नाहीं त्याविषयीं बोलतांना व त्याजकडून चुका न होण्याचीं कारणें सांगतांना ते असें ह्मणतात कीं, त्याच्यांत "थोडासा मूर्खपणा" आहे. आणि खरोखर पाहिले तर थोडासा मूर्खपणा असणें, व फाजील प्रामाणिकपणा नसणें, या सारखे दुसरे दोन सुभग गुण नाहींत. ह्मणून, आपल्या देशावर अथवा धन्यांवर अत्यंत प्रीति करणारे कधीं भाग्यशाली झाले नाहींत, व कधीं व्हावयाचे नाहींत. कारण जेव्हां एकादा मनुष्य आपले विचार आपल्याहून अन्य ठिकाणीं ठेवतो तेव्हां तो स्वहिताचा मार्ग धरीत नाहीं. घाईनें संपादन केलेलें भाग्य मनुष्याला साहसी व चंचलवृत्ति करतें; पण वहिवाटलेलें भाग्य मनुष्याला हुषार करतें. भाग्याला मान द्यायाचा व तें पूज्य मानायाचें तें केवळ त्याच्या मुलींकरतां; श्रद्धा व सुकीर्ति ह्या त्याच्या मुली आहेत. कारण ह्या दोघी सुभाग्यापासून उत्पन्न होतात. पहिली खुद्द मनुष्याच्या ठिकाणीं उत्पन्न होते; दुसरी त्याजविषयीं इतर मनुष्यांमध्यें उत्पन्न होते. सर्व शहाणीं माणसें, आपल्या सद्गुणांचा मत्सर न व्हावा ह्मणून, ते ईश्वराकडून किंवा सुदैवानें मिळाले आहेत असें ह्मणत असतात: कारण असें केल्यानें ते आपल्या अंगीं वागविण्यास त्यांना अधिक भूषण येतें; आणि शिवाय श्रेष्ठतर देवतांचा चिंताविषय असणें हें मनुष्याला मोठेपण आहे. ह्मणून तुफानामध्यें सीझर नाविकाला ह्मणाला "तूं सीझरला व त्याच्या भाग्याला नेत आहेस." याच कारणामुळें सिलानें आपल्याला "भाग्यशाली" हें उपनांव घेतलें; "महान्" असें घेतलें नाहीं. आणि असें पहाण्यांत आलें आहे कीं जे लोक उघडपणें आपल्या शहाणपणाचा किंवा कुशलतेचा वाजवीपेक्षां फाजील डौल मिरवितात ते अखेरीस दुर्भागी होतात. असें लिहिलें आहे कीं, आथेन्सवासी तिमोथियसानें आपल्या कारभाराचा हिशेब राज्यास दिला त्यावेळीं तो आपल्या भाषणांत मधून मधून असें ह्मणाला कीं, "आणि या कामीं दैवाचें कांहीं अंग नव्हतें." पण त्यापुढें जीं कामें त्यानें पत्करलीं त्यांत त्याला कधींही यश आलें नाहीं. खरोखर कांहीं लोक असे असतात कीं त्यांचीं भाग्यें होमरच्या काव्यांप्रमाणें असतात; त्या काव्यांत दुसऱ्या कवींच्या कवितेपेक्षां मार्दव व सुलभता हीं अधिक असतात. प्लूतार्कनें तिमोलियन व आजेसिलौस किंवा एपामिनोन्दास यांच्या भाग्यांची तुलना

* भाग्याची देवता आंधळी आहे, असें रोमन लोक समजत.

करतांना हीच उपमा दिली आहे. आणि असें असणें हें निःसंशय पुष्कळ अंशीं मनुष्याच्या स्वतःकडेच आहे.

---

## व्याजबट्टा.

व्याजबट्ट्याविरुद्ध पुष्कळांनीं विनोदी निंदोक्ति केल्या आहेत. ते ह्मणतात कीं, मत्तीचा दशांश देवाला मिळायाचा तो सैतानाला मिळावा ही दुःखाची गोष्ट आहे; कीं, व्याजबट्टा करणारा हा मोठाच साबाथ मोडणारा आहे, कारण त्याचा नांगर दर रविवारीं चालूच असतो; कीं, व्याजबट्टा करणारा हा व्हर्जिलनें सांगितलेला मधुमक्षिकानर होय; कीं, व्याजबट्टा करणारा हा, पतनानंतर, × मानवजातीकरतां केलेल्या नियमांपैकीं पहिला नियम मोडतो; तो नियम असाः "तूं आपली भाकर आपल्या निढळाच्या घामानें खावी," दुसऱ्याच्या निढळाच्या घामानें नव्हे; कीं, व्याजबट्टा करणारांना मळकट नारंगी रंगाच्या टोप्या घालाव्या, कारण ते यहुद्यांचा धंदा करतात; कीं पैशानें पैसा निर्माण करावा हें सृष्टिविरुद्ध आहे; इत्यादि. मी इतकेंच ह्मणतों कीं, व्याजबट्टा हा अंतःकरणाच्या कठीणपणामुळें एक सवलत आहे. कारण ऋण काढणें व कर्ज देणें हे व्यवहार व्हावयाचेच; आणि ज्या अर्थीं मनुष्यें इतक्या कठीण ह्रदयाचीं आहेत कीं, तीं मोफत कर्ज देणार नाहींत, त्या अर्थीं व्याजबट्टा करण्याची मोकळीक दिली पाहिजे. दुसऱ्या कित्येकांनीं पेढ्या, लोकांच्या मिळकतीचे शोध व दुसऱ्या युक्त्या, यांविषयीं संशयी व चतुर सूचना केल्या आहेत. पण व्याजबट्ट्याच्या उपयुक्ततेविषयीं भाषण थोडक्यांनींच केलें आहे. व्याजबट्ट्याचे तोटे व फायदे आह्मी आपल्यापुढें मांडावे हें चांगलें. ह्मणजे त्यांत जें चांगलें असेल तें तोलून किंवा निवडून घेतां येईल; व चांगल्याकडे जातांना वाइटाची गांठ पडूं नये ह्मणून खबरदारीनें बंदोबस्त करतां येईल.

× ५६ पृष्ठावरील टीप पहा.

व्याजबट्ट्याचे तोटे असे आहेतः पहिला, त्यामुळें व्यापारी थोडे होतात. कारण व्याजबट्ट्याचा हा आळशी धंदा नसता, तर पैसा स्थिर राहिला नसता; तो पुष्कळ अंशीं व्यापारांत लागला असता; व व्यापार हा राज्यामध्यें संपत्ति येण्याचा राजमार्ग होय. दुसरा, त्याच्यामुळें व्यापारी गरीब होतात. कारण ज्याप्रमाणें शेतकरी मोठा हुंडा धरून बसला तर त्याच्या जमिनीची चांगली मशागत होणार नाहीं, त्याप्रमाणें व्यापारी मोठा व्याजबट्टा धरून बसल्यास त्याचा व्यापार चांगला चालणार नाहीं. तिसरा, हा पहिल्या दोहोंच्या अंगभूत आहे; ह्मणजे त्यामुळें राजांच्या किंवा राज्यांच्या जकाती कमी होतात; ह्या जकातींना व्यापाराच्या स्थितीप्रमाणें भरती ओहोटी असते. चवथा, त्यामुळें राज्यांतील अगर संस्थानांतील संपत्ति थोड्याशा हातांत येते. कारण व्याजबट्टा करणाराला निश्चितपणा असतो, व दुसऱ्यांना अनिश्चितपणा असतो; त्यामुळें बहुतेक पैसा पेटींतच राहील; आणि पैसा समान रीतीनें पसरलेला असतो तेव्हांच राज्याची भरभराट होते. पांचवा, त्यामुळें जमिनीची किंमत कमी होते; कारण पैशाचा विनियोग व्यापारांत किंवा जमिनी विकत घेण्यांत होतो; व

व्यापाराचा धंदा अतिशय फायदेशीर असल्यामुळें भारी दराचें व्याज देणें व्यापाऱ्याला सहज आहे; दुसऱ्या करारांची तशी गोष्ट नाहीं.

दोन्ही हेतु साधण्याकरतां, थोडक्यांत, हा मार्ग असावाः कीं व्याजाचे दोन दर असावे. एक अप्रतिबंध व सर्वांना लागू असा; दुसरा, फक्त ( सरकारी ) परवान्यानें मंजूर केलेला, व तो विवक्षित माणसांना व व्यापाराच्या विवक्षित स्थानीं लागू पडेल असा. ह्मणून प्रथमतः व्याजाचा दर साधारणपणें शेंकडा पांच करावा; व तो दर अप्रतिबंध व चालू आहे असें प्रसिद्ध करावें; व त्या दराबद्दल राजानें कांहीं दंड घेऊं नये. * असें केल्यानें कर्ज काढणें हें साधारणपणें बंद होणार नाहीं; ह्यामुळें देशांतील असंख्य कर्ज काढणारांचें ओझें कमी होईल; ह्यामुळें पुष्कळ अंशीं जमिनीची किंमत वाढेल. कारण सोळा वर्षांच्या उत्पन्नाइतकी किंमत देऊन जमीन घेतली तर शेंकडा सहा व कांहीं अधिक व्याज सुटेल; पण ह्या दरानें फक्त पांचच सुटतें. ह्यामुळें, त्याच कारणास्तव, उद्योगधंद्यांना व फायदेशीर सुधारणांना उत्तेजन येऊन तीं तीव्र होतील; कारण पुष्कळ लोक, शेंकडा पांच घेण्यापेक्षां, आपला पैसा तसल्या धंद्यांत घालतीलः विशेषेंकरून ते अधिक नफ्याला संवकले असले तर. दुसरें, प्रसिद्ध व्यापाऱ्यांना अधिक दराच्या व्याजानें कर्ज देण्याकरतां विवक्षित माणसांना परवाने द्यावे. हे दरही पूर्वी व्यापारी देत असत त्यांहून कांहींसे हलकेच असावे. कारण अशा रीतीनें ही सुधारणा केल्यानें सर्वच ऋणकोंना कांहींसें सुख होईल, मग तो व्यापारी असो अगर दुसरा कोणी असो. पेढी किंवा संयुक्त भांडवल नसावें: तर प्रत्येक मनुष्य आपल्या पैशाचा मालक असावा. पेढ्या मला अगदींच आवडत नाहींत असें नाहीं; पण त्यांच्याविषयीं जे कांहीं संशय आहेत त्यांच्यामुळें त्या क्वचितच चालतील. परवान्याकरतां राज्याला लहानशी रक्कम मिळावी, व बाकीचें धनकोच्या हातांत ठेवावें. कारण व्याजाचा दर जर थोडा कमी केला तर धनको कोणत्याही रीतीनें निरुत्साह होणार नाहीं. उदाहरणार्थ, जो पूर्वी शेंकडा दहा किंवा नऊ घेत होता तो, व्याजबट्ट्याचा धंदा अजिबात सोडून देण्यापेक्षां व हातचें सोडून अनिश्चिताच्या मागें लागण्यापेक्षां शेंकडा आठ घेण्यास तयार होईल. हे परवानेवाले धनको संख्येनें अमर्याद असावे; पण ते व्यापाराच्या मुख्य मुख्य गांवांत व शहरांत मात्र असावे; ह्मणजे खेड्यांतील लोकांच्या पैशावर त्यांचा कांहीं परिणाम होणार नाहीं. व नवांचा परवाना पांचांचा दर शोषून टाकणार नाहीं. कारण कोणीही मनुष्य आपला पैसा दूरच्या ठिकाणीं देणार नाहीं; अथवा अनोळखी माणसांच्या हातीं देणार नाहीं.

जर कोणी अशी शंका घेतील कीं व्याजबट्ट्याचा व्यापार पूर्वी कित्येक ठिकाणीं फक्त सरकारची मना नसल्यानें चालत होता, तो असें केल्यानें कांहींसा कायद्यानें स्थापित केल्याप्रमाणें होईल; तर त्याला उत्तर हें आहे कीं, त्या व्यापाराकडे कानाडोळा

* पूर्वी इंग्लन्डांत व्याजबट्ट्याविरुद्ध कायदे केलेले असत, व त्यांचें उल्लंघन करणाराला दंड होत असे.

करून त्याचा प्रखर अम्मल होऊं देण्यापेक्षां, तो जाहीर रीतीनें नरम करणें चांगलें.

## सौंदर्य.

सद्गुण हा मोलवान रत्नाप्रमाणें आहे; तें साध्या कोंदणांत बसविलेलें असलें ह्मणजे उत्तम. आणि खरोखर सद्गुण हा सुबक शरीरांत उत्तम शोभतो; तें शरीर नाजूक मात्र नसावें व त्यांत चेहऱ्याच्या सौंदर्यापेक्षां सलाबतपणा अधिक असावा. फार सुंदर माणसें अति सद्गुणसंपन्न असतातच असें नेहमीं पहाण्यांत येत नाहीं. जणुं काय निसर्ग उत्तमपणा निर्माण करण्याच्या खटपटींत पडण्यापेक्षां चुका न करण्यांत अधिक गुंतला आहे! ह्मणून सुंदर पुरुष गुणसंपन्न निपजतात, पण त्यांच्यांत फारसें तेज नसतें; व ते सद्गुण संपादन करण्यापेक्षां ढब साधण्याकडे अधिक लक्ष पुरवितात. पण हें नेहमींच खरें नसतें. कारण, **आगस्तस सीझर**, **तैतस व्हेस्पेशियानस**, फ्रान्सचा **फिलिप ल बेल**, इंग्लंडचा चौथा **एड्वर्ड**, आथेन्सचा **आलसिबियादीस**, इराणचा सोफी **इस्माएल**, हे सर्व थोर व पाणीदार पुरुष होते. असें असूनही ते त्या त्या काळचे अत्यंत सुंदर पुरुष होते. सौंदर्यामध्यें–वर्णसौंदर्यापेक्षां मुखसौंदर्य अधिक; व मुखसौंदर्यापेक्षां शोभादायक व छबीदार असें गतिसौंदर्य अधिक. सौंदर्याचा जो भाग चित्रांत दाखवितां येत नाहीं, किंवा प्रत्यक्ष मनुष्य पाहिला तरी जो पहातांक्षणींच डोळ्यांत भरत नाहीं, तो भाग उत्तम. प्रमाणांमध्यें कमजास्तपणा नाहीं इतकें उत्तमोत्तम सौंदर्य नाहींच. **आपेलेस** हा रिकामा कारभारी अधिक किंवा **आल्बर्ट ड्यूरर** अधिक हें कोणाच्यानें सांगवणार नाहीं. पहिला भूमितीच्या प्रमाणांत चित्र काढी; दुसरा निरनिराळ्या चेहऱ्यांचे उत्तम उत्तम भाग घेऊन त्यांचें एक उत्तमोत्तम चित्र रेखी. असलीं हीं चित्रें, चित्र काढणाऱ्या चिताऱ्याशिवाय कोणाला आवडणार नाहींत. चिताऱ्याला सुंदर चेहरा बनवितां येणार नाहीं असें माझें ह्मणणें नाहीं; पण तें एक प्रकारच्या सुदैवानें झालें पाहिजे ( जसें गायनामध्यें गवई एकादा उत्तर राग बनवितो तसें ); नियमानें होणार नाहीं. मनुष्याच्या दृष्टीस जे चेहरे पडतात त्यांचा एक एक भाग तपासून पाहिला तर त्यांत एकही चांगला सांपडणार नाहीं; तथापि एकंदरीनें पाहिलें तर ते चांगले दिसतील. सौंदर्याचा मुख्य भाग शोभादायक गतीमध्यें आहे हें जर खरें आहे, तर, वयोवृद्ध माणसें अनेक वेळां परितोषक दिसतात यांत कांहीं नवल नाहीं. " सुंदरांमध्यें शरद्तु सुंदर. " तारुण्याला मेहरबानीनें पाहिजे तर साजरें ह्मणावें, व साजरेपणांत उणें आहे ते तारुण्यानें भरून काढावें; पण वास्तविक कोणतेंही तारुण्य साजरें नाहीं. सौंदर्य हें उष्णकाळच्या फळांप्रमाणें आहे; तीं सहज सडतात व टिकत नाहींत; तसेंच तें. आणि बहुशा त्या ( सौंदर्या )च्या पायीं, तारुण्य दुराचारांत जातें व वार्धक्य थोडेंसें लज्जायमान होतें. पण पुनः, तें जर चांगल्या ठिकाणीं पडलें तर सद्गुणांना तेजस्वी करतें व दुर्गुणांना खालीं पाहायाला लावतें.

## कुरूपता.

कुरूप माणसें बहुधा निसर्गाशीं नशास तर्शी वागतात; कारण जसें निसर्गानें त्यांचें

वाईट केलेलें असतें, तसें तीं निसर्गाचें करतात; तीं बहुतकरून ( शास्त्र ह्मणतें तसें ) नैसर्गिक प्रीतिरहित असतात; आणि याप्रमाणें निसर्गाचा सूड घेतात. शरीर व मन यांमध्यें मिलाफ आहे हें खचित. आणि ज्याठिकाणीं निसर्ग एकामध्यें चुकी करतो त्या ठिकाणीं तो दुसऱ्यामध्यें कांहीं तरी अधिक ठेवतो. पण मनुष्यांमध्यें, मनाच्या सांच्याच्या संबंधानें स्वातंत्र्य आहे, व शरीराच्या सांच्याच्या संबंधानें पराधीनता आहे; ह्मणूनच नैसर्गिक प्रवृत्तिरूप तारे शिक्षणरूपी व सद्गुणरूपी सूर्यामुळें हतप्रभ होतात. याकरतां कुरूपता हें ( कशाचें तरी ) कारण आहे असें मानावें हें चांगलें. तें कारण आपलें कार्य केल्यावांचून राहणार नाहीं. ती ( कशाचें तरी ) लक्षण आहे असें मानूं नये; तसें मानलें तर आह्मी फसूं. ज्या कोणाच्या शरीरांत असें एकादें कायमचें व्यंग आहे कीं तें तिरस्कार उत्पन्न करतें, त्याच्याच ठिकाणीं आपल्याला तिरस्कारांतून सोडवावें व मुक्त करावें अशी निरंतर हांव असते. ह्मणून सर्व कुरूप माणसें अतिशय धीट असतात. पहिल्या पहिल्यानें तिरस्कारापासून बचाव करण्याकरतां तीं धीट होतात. पण कालगतीनें तीं संवईनें धीट बनतात. त्यामुळें त्यांच्यांत उद्योगीपणाही उत्पन्न होतो; विशेषेंकरून ह्या प्रकारचा उद्योगीपणा कीं, टपत बसून दुसऱ्यांचें उणें पहावें—अशाकरतां कीं उसनें फेडायाला कांहीं तरी मिळावें. पुनः, त्या कुरूपतेमुळें त्यांच्या वरिष्ठांच्या ठायीं त्यांजविषयीं मत्सर नाहींसा होतो; कारण त्या ( वरिष्ठां )ना वाटतें कीं वाटेल तेव्हां आपण यांना तुच्छ मानूं. आणि त्यांच्याशीं चढाओढ व स्पर्धा करणारे त्यामुळें झोपीं जातात; या कुरूप माणसांना वर चढणें शक्य आहे हें त्यांना कधीं खरें वाटत नाहीं: ते चढले ह्मणजे त्यांचे डोळे उघडतात. सारांश, मोठ्या शहाणपणाच्या माणसाला कुरूपता हें वर येण्याला एक साधनच होतें. प्राचीनकाळीं ( आणि सांप्रतकाळीं कांहीं देशांत ) राजे क्लीबांवर मोठा विश्वास ठेवीत; कारण जे सर्वांचा मत्सर करितात ते एकाची चाकरी इमानेंइतबारें करितात. पण त्यांचा विश्वास बहुधा त्यांनीं चांगले हेर व गुजगुज्ये व्हावें ह्मणून असे; चांगले अंमलदार व कामगार व्हावें ह्मणून नसे. कुरूप मनुष्यांचीही बहुधा तशीच गोष्ट. तथापि ते जर पाणीदार असले तर आपल्याला तिरस्कारांतून सोडविण्याचा यत्न करतील; व हें ते सद्गुणांनीं किंवा वैरानें करतील. ह्मणून ते कधीं कधीं उत्तम पुरुष निवटले तर आश्चर्य करूं नये. **आजेसिलौस**, सुलेमानाचा पुत्र **झांगर**, ईसाप, पेरूचा अध्यक्ष **गास्का**, हे याच प्रकारचे होते; आणि साक्रेतीस व दुसरे यांनाही त्यांच्यांतच घातलें तरी चालेल.

---

## प्लेटो.

[ ४ ]

**साक्रेटिस**—तर मग न्याय ह्मणजे काय ? साक्रेटिसनें हे शब्द उच्चारल्याबरोबर पुढें सरून.

**थ्रासिमाकस**—साक्रेटिस, माझें असें मत आहे कीं, बलिष्ठ मनुष्याला जें हितावह तें न्याय्य होय.

**साक्रेटिस**—मला तुमचें मत चांगलें समजलें नाहीं. तुह्मी असें ह्मणतां काय कीं पोलिडिमस

हा आपल्या सर्वांपेक्षां मजबूत आहे, आणि मांस खाणें हें त्याला हितकारक असलें, ह्मणून मांस खाणें हें न्याय्य, किंवा त्याच्यापेक्षां आह्मी जे अशक्त आहों त्यांस हितकर होईल काय ?

**थ्रासिमाकस**—असें मी मुळींच ह्मणत नाहीं.

**साक्रेटिस**—तर मग तुमचें मत जरा स्पष्ट करून सांगा.

**थ्रासिमाकस**—तुह्मांला माहित असेलच कीं, एकव्यक्तिसत्ताक, विशिष्टजनसत्ताक, आणि सर्वजनसत्ताक असे राज्यव्यवस्थेचे तीन निरनिराळे प्रकार आहेत ?

**साक्रेटिस**—हें मला ठाऊक आहे.

**थ्रासिमाकस**—आणि ज्यांच्या ताब्यांत राज्यव्यवस्था असते ते कायदे करितात ?

**साक्रेटिस**—होय.

**थ्रासिमाकस**—आतां एकव्यक्तिसत्ताक राज्यामध्यें राज्यव्यवस्था एका मनुष्याच्या हातांत असते; विशिष्टजनसत्ताक राज्यामध्यें एका वर्गाच्या, आणि सर्वजनसत्ताक राज्यामध्यें सर्व लोकांच्या हातांत राज्यव्यवस्था असते. अर्थात् एकव्यक्तिसत्ताक राज्यामध्यें एक मनुष्य आपणाला हितावह असे कायदे करितो; विशिष्टजनसत्ताक राज्यामध्यें एका वर्गाचे लोक आपणांला हितावह असे कायदे करितात; आणि सर्वजनसत्ताक राज्यामध्यें सर्व लोक आपणांला हितावह असे कायदे करितात. आणि त्यांप्रमाणें न वागणारांस ते दंडार्ह ठरवितात. आणखी, जे सर्वांत बलिष्ठ असतात त्यांच्या हातांत राज्यव्यवस्था असते; व प्रत्येक प्रकारच्या राज्यांत न्याय ह्मणजे कायद्याप्रमाणें वर्तन करणें, अन्याय ह्मणजे बेकायदेशीर रीतीनें वागणें; या दोन गोष्टी लक्षांत ठेविल्या ह्मणजे, बलिष्ठांचें जें हित तो न्याय असें जें मी ह्मणतों तें खरें आहे असें दिसून येईल.



**साक्रेटिस**—आतां तुमचें मत मला समजलें. परंतु तें बरोबर आहे किंवा नाहीं याचा विचार केला पाहिजे. तुह्मांला ही गोष्ट कबूल असेलच कीं, प्रजांनीं राज्यव्यवस्थापकांची आज्ञा नेहमीं पाळिली पाहिजे ?

**थ्रासिमाकस**—हें मला कबूल आहे.

**साक्रेटिस**—परंतु राज्यव्यवस्थापकांच्या हातून चुक्या होणें संभवनीय आहे किंवा नाहीं ?

**थ्रासिमाकस**—आहे.

**साक्रेटिस**—तर मग कायदे करण्याच्या कामांत ते कदाचित् चुक्या करितील ?

**थ्रासिमाकस**—अर्थात्.

**साक्रेटिस**—ह्मणजे राज्यव्यवस्थापक कायदे करितात ते आपल्या हिताकरितां, असें गृहीत घेतलें तरी, कांहीं कायदे चुकानें त्यांना अहितकारक होतील ?

**थ्रासिमाकस**—होय.

**साक्रेटिस**—पण प्रजांनीं कायदे पाळिलेच पाहिजेत, मग ते कायदे कसेही असोत ?

**थ्रासिमाकस**—हें मी पूर्वींच कबूल केलें आहे.

**साक्रेटिस**—तुह्मीं असेंही कबूल केलें आहे कीं, कायदे पाळणें ह्मणजे न्याय ?

**थ्रासिमाकस**—होय.

**साक्रेटिस**—तर जेव्हां चुकीचे कायदे आपण पाळितों तेव्हां न्याय-ह्मणजे बलिष्ठ जे राज्यव्यवस्थापक त्यांचें अहित करणें असें सिद्ध झालें. बरें असो. तुह्मी ह्मणतां कीं, राज्यव्यवस्थापक आपल्या हिताकरितां कायदे करितात ?

ना फसवून कर देण्याचें चुकवील; कांहीं तरी थापा मारून मोठमोठीं हुद्यांचीं कामें व मानाच्या पदव्या मिळवील; लोकांना अयोग्य व बेकायदेशीर कामांत मदत करून त्यांची प्रीति संपादील. परंतु तुह्मी ज्याला न्यायी ह्मणतां अशा मनुष्याच्या हातून यांपैकीं एकही कृत्य होणार नाहीं; व तो नेहमीं दरिद्री, दुर्बल, व लोकांना अप्रिय असा होऊन राहील. अशी स्थिती समजून उमजून कोणी तरी पत्करील काय ? आतां ही गोष्ट खरी आहे कीं, जोंपर्यंत एखादा मनुष्य आत्महिताचीं कामें लहान प्रमाणावर करितो, तोंपर्यंत तुह्मीं ह्मणतां त्याप्रमाणें लोक त्याला अन्यायी ह्मणतात व शिक्षाही करितात; परंतु तींच कृत्यें तो मोठ्या प्रमाणावर करूं लागला, व हळू हळू राज्यांतील सत्ता त्याच्या हातांत येऊन तो सर्वांत बलिष्ठ झाला, ह्मणजे तो जो जो कायदा करील, तो तो सर्वांना मानावा लागतो. वरील प्रकारचा मनुष्य सर्व कायदे केवळ आपल्या हितासाठीं करील हें सांगण्याची गरज नाहींच.

**साक्रेटिस**--तुमच्या ह्या ह्मणण्यांत मला कांहींच सत्य दिसत नाहीं. तुह्मीं आरंभींच चुकी करीत आहां. कारण, तुह्मीं असें गृहीत घेऊन चाललां आहां कीं, खऱ्या मेंढक्याचें कर्तव्य ह्मणजे त्या मारून खाणें किंवा विकून पैसा मिळविणें. पण आह्मीं सर्वांनीं ही गोष्ट पूर्वींच कबूल केली आहे कीं, प्रत्येक कलेचा एक विषय असतो व त्या विषयाचें हित करणें हा त्या कलेचा उद्देश. आतां मेंढ्यांचें पोषण करणें ही एक कला आहे, व मेंढ्या हा त्या कलेचा विषय; यावरून मेंढ्यांचें हित करणें हें मेंढक्याचें कर्तव्य असें सिद्ध झालें. आणि त्याप्रमाणेंच प्रजांचें हित करणें हा राज्यव्यवस्थेचा उद्देश किंवा राज्यव्यवस्थापकांचें कर्तव्य. बरें असो. राज्यव्यवस्था करण्याला जो मनुष्य खरोखर लायक असतो, तो राज्यव्यवस्था आपल्याकडे घेण्याला फार उत्सुक असतो काय ?

**थ्रासिमाकस**--उत्सुक असतो असें मला वाटतें.

**साक्रेटिस**—पण राज्यव्यवस्था आपल्या हातांत असणें हें जर आपणाला हितकारक आहे, तर ज्यांच्या हातांत राज्यव्यवस्था असते त्यांना वेतन कां द्यावें लागतें ? तुह्मांला हें माहित असेलच कीं, निरनिराळ्या कलांचे उद्देश परस्पर भिन्न असतात ?

**थ्रासिमाकस**--होय.

**साक्रेटिस**--ह्मणजे प्रत्येक कलेपासून विशेष कांहीं हित होतें ?

**थ्रासिमाकस**--होय.

**साक्रेटिस**—उदाहरणार्थ, वैद्यकीपासून आरोग्य, नौकागमनविद्येपासून सुरक्षित जलप्रवास ?

**थ्रासिमाकस**--होय.

**साक्रेटिस**—तसेंच वेतन देणें ही एक कला आहे व वेतन मिळणें हा या कलेचा उद्देश ?

**थ्रासिमाकस**—उघडच आहे.

**साक्रेटिस**—परंतु पूर्वीं कबूल केल्याप्रमाणें, प्रत्येक कलेचा उद्देश, इतर कलांच्या उद्देशांपेक्षां भिन्न असल्यामुळें, वेतन मिळणें हा वेतन देणें या कलेपेक्षां इतर कोणत्याही कलेचा उद्देश होऊं शकणार नाहीं ?

**थ्रासिमाकस**—हें आतां कबूल केलेंच पाहिजे.

**साक्रेटिस**—तर मग एखाद्या कलावानाला जें वेतन मिळतें तें त्या कलेपेक्षां भिन्न जी वेतन देण्याची कला तिचा परिणाम असला पाहिजे ?

**थ्रासिमाकस**—असें दिसतें खरें.

**साक्रेटिस**–ह्मणजे निरनिराळ्या कलावानांला जें वेतन मिळतें तें त्या त्या कलेचा परिणाम नव्हे काय ? वास्तवीक पाहतां वैद्यकीचा परिणाम आरोग्य, शिल्पकलेचा घर बांधणें; परंतु वैद्याला किंवा घर बांधणाऱ्याला जें वेतन मिळतें तें वरील दोन कलांहून भिन्न जी वेतन देण्याची कला तिचा परिणाम ?

**थ्रासिमाकस**—होय.

**साक्रेटिस**—हें जर त्यांना वेतन मिळालें नाहीं, तर वैद्यकीपासून किंवा शिल्पापासून वैद्याचें किंवा शिल्पकाराचें कांहीं तरी हित होईल काय ?

**थ्रासिमाकस**—नाहीं.

**साक्रेटिस**—परंतु एखाद्या कलावानानें आपल्या कामाबद्दल वेतन घेतलें नाहीं, ह्मणजे त्या कलेपासून त्याचें स्वतःचें कांहीं हित झालें नाहीं, ह्मणून त्यानें जें काम केलें त्यापासून कोणाचेंच कांहीं हित झालें नाहीं असें ह्मणतां येईल काय ?

**थ्रासिमाकस**—असें कसें ह्मणतां येईल ?

**साक्रेटिस**—तर मग असें सिद्ध झालें कीं, कोणतीही कला अथवा राज्यव्यवस्था आपलेंच हित करीत नाहीं. अर्थात् जे राज्यव्यवस्था करितात, ते ती प्रजांच्या हिताकरितां करितात, आपल्या स्वतःच्या हिताकरितां नव्हे. आणि जे राज्याची व्यवस्था करण्याचें पत्करून दुसऱ्यांचें हित करितात त्यांस त्यांच्या श्रमाबद्दल मोबदला मिळणें अवश्य आहे–मग तो द्रव्याच्या रूपानें असो अगर मानपदांच्या रूपानें असो.

**ग्लाकन**—हें खरें आहे.

**साक्रेटिस**—आणि कित्येक राज्यकर्ते पुरुष आपणांला शिक्षा होईल या भीतीनें राज्यव्यवस्था आपल्या हातांत घेतात.

**ग्लाकन**—काय, कोणत्याही मनुष्यानें राज्यव्यवस्था करण्याचें कबूल करावें ह्मणून त्याला शिक्षेची भीति दाखवावी लागते ? द्रव्य व मानपदें यांच्या योगानें ज्याचें कोणतेंही काम करण्याला मन वळणार नाहीं असा एक तरी मनुष्य आढळेल काय ?

**साक्रेटिस**—द्रव्यलोभ व महत्त्वाकांक्षा हीं निंदास्पद आहेत असें समजतात, आणि वास्तविक तीं तशीं आहेत, हें आपणास माहीत असेलच ?

**ग्लाकन**—होय.

**साक्रेटिस**–याकरितां जे खरे सुजन आहेत, त्यांना द्रव्य व मान यांचें महत्त्व वाटत नाहीं; ह्मणून ते केवळ शिक्षेच्या भीतीनें राज्यव्यवस्था करण्याचें कबूल करितात. आणि सर्वांत मोठी शिक्षा ह्मटली ह्मणजे, कमी प्रतीच्या लोकांच्या हातांत राज्यव्यवस्था असणें. ज्या अर्थीं राज्यव्यवस्था कोणी तरी केलीच पाहिजे, त्या अर्थीं लायक मनुष्य जर ती करण्याचें कबूल करणार नाहींत, तर अर्थातच ती अयोग्य मनुष्यांच्या हातीं जाऊन वर सांगितल्याप्रमाणें खऱ्या चांगल्या लोकांना त्यापासून शिक्षा होण्याचा संभव आहे. आणि या शिक्षेच्या भीतीनें चांगले लोक राज्यव्यवस्था करण्याचें कबूल करितात. जर एखादें राज्य असें असेल कीं, त्या-ठिकाणचे सर्वच लोक सुवृत्त असले, तर त्या राज्यांत राज्यव्यवस्था करण्याचें कोणीही कबूल करणार नाहीं. कारण अशा राज्यामध्यें वर सांगितलेली शिक्षा होण्याची भीति नसल्यामुळें, आपणांला अहितकारक–केवळ प्रजेला हितकारक—असें राज्यव्यवस्थेचें काम करण्याला जो तो नाकबूल करील. असो. ग्लाकन, तुमचें

मत काय आहे, न्यायानें वागण्यापासून अधिक फायदा किंवा अन्यायानें वागण्यापासून ?

ग्लाकन—मला असें वाटतें कीं, न्यायानें वागण्यांत अधिक फायदा आहे.

साक्रेटिस—परंतु अन्यायापासून होणारे जे नानाप्रकारचे फायदे थ्रासिमाकसांनीं आह्मांला सांगितले ते तुह्मीं ऐकिले काय ?

ग्लाकन—होय. तरी त्यांचें मत मला चुकीचें वाटतें.

साक्रेटिस—जर तुह्मांला माझें मत बरोबर आहे असें वाटतें, तर थ्रासिमाकसांचीही खात्री करण्याचा मी आणखीं एकवेळ प्रयत्न करितों. ( थ्रासिमाकसाकडे वळून ) तुह्मांला अजून असें वाटतें काय कीं अन्याय्य वर्तनापासून अधिक फायदा होतो ?

थ्रासिमाकस—होय.

साक्रेटिस—लोक न्यायाला सुकृत व अन्यायाला दुष्कृत असें समजतात हें तुम्हाला माहित असेलच ?

थ्रासिमाकस—होय.

साक्रेटिस—तुमचेंही मत तसेंच आहे काय ?

थ्रासिमाकस—नाहीं. माझें मत अगदीं त्याच्या उलट आहे.

साक्रेटिस—ह्मणजे तुम्हीं न्याय म्हणजे दुष्कृत असें समजतां काय ?

थ्रासिमाकस—माझ्या मतें न्याय म्हणजे उन्नतमूढता.

साक्रेटिस—आणि अन्याय म्हणजे ?

थ्रासिमाकस—व्यवहारविज्ञता.

साक्रेटिस—तर मग अन्यायानें वागणारे लोक शहाणे व प्रशस्य असें तुम्हांला वाटतें ?

थ्रासिमाकस—होय. विशेषतः जे सर्व प्रकारें अन्यायानें वागून राज्यांतील सर्व सत्ता काबीज करितात.

साक्रेटिस—बरें एक न्यायी मनुष्य दुसऱ्या न्यायी मनुष्याचें नुकसान करून आपला फायदा करण्याचा कधीं प्रयत्न करितो काय ?

थ्रासिमाकस—नाहीं. असें असतें, तर मी न्याय म्हणजे मूढता असें कधींच म्हटलें नसतें.

साक्रेटिस—आणि न्यायी मनुष्य कधीं तरी अन्याय करील काय ?

थ्रासिमाकस—नाहीं.

साक्रेटिस—अन्यायी मनुष्याचें नुकसान करून आपला फायदा करणें हें न्यायी मनुष्याला न्याय्य वाटेल काय ?

थ्रासिमाकस—असें करणें त्याला न्याय्य वाटेल परंतु त्याला तें करितां मात्र येणार नाहीं.

साक्रेटिस—आणि न्यायी मनुष्याचें नुकसान करून आपला फायदा करावा असें अन्यायी मनुष्याला वाटतें किंवा नाहीं ?

थ्रासिमाकस—इतकेंच नव्हे, तर इतर सर्व लोकांचें नुकसान करून आपला फायदा करावा असें त्याला वाटतें.

साक्रेटिस—म्हणजे आपल्या फायद्याकरितां इतर अन्यायी मनुष्यांचें सुद्धां नुकसान करण्याला तो तयार असतो ?

थ्रासिमाकस—होय.

साक्रेटिस—म्हणजे तुम्हीं असें कबूल करितां कीं, न्यायी मनुष्य आपला फायदा व्हावा म्हणून इतर न्यायी मनुष्यांचें नुकसान करीत नाहीं, तर फक्त अन्यायी मनुष्यांचें करितो; परंतु अन्यायी मनुष्य आपल्या फायद्याकरितां इतर सर्वांचें—मग ते न्यायी असोत किंवा अन्यायी असोत—नुकसान करितो ?

**थ्रासिमाकस**--बरोबर आहे.

**साक्रेटिस**--आणि तुम्हीं म्हणतां कीं, अन्यायी मनुष्य शहाणा व प्रशस्य, न्यायी तसा नाहीं?

**थ्रासिमाकस**--होय.

**साक्रेटिस**--म्हणजे अन्यायी मनुष्य व शहाणा मनुष्य यांच्यामध्यें सादृश्य असतें, न्यायी व शहाणा यांच्या मध्यें तें नसतें?

**थ्रासिमाकस**--उघडच आहे.

**साक्रेटिस**--तुम्हांला हें माहित असेलच कीं, कांहीं मनुष्य संगीतज्ञ असतात व कांहीं नसतात?

**थ्रासिमाकस**--होय.

**साक्रेटिस**--त्यांच्यामध्यें शहाणे कोण व मूर्ख कोण?

**थ्रासिमाकस**--संगीतज्ञ ते शहाणे, संगीतज्ञ नाहींत ते मूर्ख.

**साक्रेटिस**--आणि संगीतज्ञ मनुष्य ज्या प्रमाणानें शहाणा असतो त्या प्रमाणानें तो प्रशस्य असतो?

**थ्रासिमाकस**--होय.

**साक्रेटिस**--हीच गोष्ट वैद्याच्या संबंधानें?

**थ्रासिमाकस**--होय.

**साक्रेटिस**--एक संगीतज्ञ मनुष्य जेव्हां विण्याच्या तारा लावितो, तेव्हां तो त्या इतर संगीतज्ञ करितील त्यापेक्षां अधिक घट्ट किंवा ढील करितो काय?

**थ्रासिमाकस**--नाहीं.

**साक्रेटिस**--परंतु ज्याला ती कला माहित नाहीं असा मनुष्य करील त्यापेक्षां?

**थ्रासिमाकस**--अर्थात्.

**साक्रेटिस**--तसेंच एक वैद्य रोग्याला जे खाण्यापिण्याचे नियम घालून देईल ते इतर वैद्य त्याच स्थितीमध्यें जे नियम घालतील त्यापेक्षां भिन्न असतील काय?

**थ्रासिमाकस**--नाहीं.

**साक्रेटिस**--तर मग सूज्ञ मनुष्यांविषयीं असें सामान्यतः म्हणतां येईल कीं, एक सुज्ञ मनुष्य विवक्षित गोष्टीसंबंधानें किंवा स्थितीमध्यें इतर सुज्ञ मनुष्य जें बोलतील किंवा करितील, त्यापेक्षां भिन्न रीतीनें बोलण्याची किंवा वागण्याची इच्छा करणार नाहीं?

**थ्रासिमाकस**--नाहीं.

**साक्रेटिस**--परंतु अज्ञ मनुष्य?

**थ्रासिमाकस**--सुज्ञ मनुष्याच्या उलट.

**साक्रेटिस**--आणि सुज्ञ मनुष्यांनाच आपण शहाणे व प्रशस्य म्हणतों?

**थ्रासिमाकस**--होय.

**साक्रेटिस**--तर मग वरील सामान्य नियमावरून असा उपसिद्धांत झाला कीं, एक शहाणा मनुष्य इतर शहाण्या मनुष्यांपेक्षां अधिक फायदा मिळविण्याची इच्छा करणार नाहीं?

**थ्रासिमाकस**--असें आतां कबूल केलेंच पाहिजे.

**साक्रेटिस**--आणि शहाण्याच्या उलट जो मूर्ख मनुष्य, तो इतर सर्वांपेक्षां--मग ते शहाणे असोत किंवा मूर्ख असोत--आपला अधिक फायदा व्हावा अशी इच्छा करील?

**थ्रासिमाकस**--हा तर वरील उपसिद्धांताचा उपसिद्धांत.

**साक्रेटिस**--पण तुह्मीं पूर्वींच कबूल केलें आहे कीं, अन्यायी मनुष्य इतर सर्व मनुष्यांपेक्षां--मग ते न्यायी असोत किंवा अन्यायी असोत--आपणाला अधिक फायदा व्हावा अशी इच्छा करितो?

आसिमाकस--ही गोष्ट मी कबूल केली आहे.

साक्रेटिस--आणि तुह्मीं असेंही ह्मणालां कीं, एक न्यायी मनुष्य इतर न्यायी मनुष्यांपेक्षां नाहीं, तर फक्त अन्यायी मनुष्यांपेक्षां आपला फायदा व्हावा अशी इच्छा करितो?

आसिमाकस—होय.

साक्रेटिस—तर मग न्यायी मनुष्य व शहाणा मनुष्य, आणि अन्यायी मनुष्य व मूर्ख मनुष्य, यांच्यामध्यें साम्य आहे?

आसिमाकस--असें आतां दिसतें खरें.

साक्रेटिस—ह्मणजे न्यायी मनुष्य शहाणा (व ह्मणून प्रशस्य), आणि अन्यायी मनुष्य मूर्ख?

आसिमाकस—होय.

साक्रेटिस—परंतु शहाणपणा हें सुकृत, मूर्खपणा हें दुष्कृत?

आसिमाकस—(मोठ्या नाखुषीनें) होय.

साक्रेटिस--तर मग न्याय हें सुकृत आणि अन्याय हें दुष्कृत असें आतां आपल्या सर्वांच्या मतें सिद्ध झालें.

---

## तान्हाजी मालसुरे
### अथवा
## सिंहगडची मोहिम.

### प्रकरण पांचवें.

( २८४ पृष्ठावरून पुढें चालू. )

सूर्याजीप्रति हृदयीं धरोनि भूप
प्रेमानें वदत तया वचें अमूपः
"गा मित्रा! बघ कुलशीलवंत शूरा!
"शोकातें त्यज, झिजवूं नको शरीरा! ६७

"आहे तुझा बंधु तुझ्या पुढें हा–
"गेला असे टाकुनि मात्र देहा!
"हा मी शिवाजी नच, सत्य तान्हा;
"होते चुकी केवळ देखतांनां. ६८

"गड्या, सकळ राज्य जाउनहि वांचता तान्हया.
"तरीहि तिळमात्रही खचित खेद होता न या.
"लयास मम जाय सिंह; गड हाय! ये हा करीं!
"अहो खचित त्यास सिंहगड हीच संज्ञा खरी. ६९

"होणार तें घडुन ये. बहु शोक आतां
"माता तुझी करिल आणिक बंधुकांता;
"त्यांची करी तुजविणें समजूत कोण?
"आधार तूंच अजि सत्य तयांस जाण. ७०

"त्यांहीं जगावें मनिं वांछिसी जरी,
"बाळें सुखें तेविं वसोत गोजिरीं,
"'रक्षीं' स्वतांला तरि सांगणें तुला;–
"संरक्षिती सुज्ञ सुखैक[1]–हेतुला." ७१

---

मृदु मधु वचें तें सैन्येशा सुबोध करोनियां
हळु हळु नृपें नेलें त्यातें ससैन्य निजालया;
दल सकल तें सत्कारोनी परोपरि तोषवी–
मुकुटमणि जो मालोजीच्या[2] कुळास विभूषवी. ७२

वीरां त्या विजयी नृपें कडिं, तुरे,
कंठ्या, पहूंच्या, वळीं,
शेले, मंदिल, पागड्या भरजरी
शाली, सुवस्त्रें दिलीं;
तैसे सिंहगडार्थ वीर पडले
त्यांच्या कुटुंबाप्रती
रायें वेतन देणग्या किती दिल्या
वर्षासनेंही किती! ७३

---

१ सुख+एक+हेतु=कारण, बीज. २ शाहाजीचा बाप.

संग्रामीं या प्रबळ पडलीं स्वाश्रितांलागिं शल्यें,
खड्गें तैशीं पतिसुतसुहृन्मृत्युनें मृत्युतुल्यें—
तीं तीं सारीं निववुनि शिवें स्नेहभावें नृपाळें,
गेले जेते परिजन सुखें स्वस्थळा आपुलाले.७४

मृत प्रियसख्याचिया करिं धरोनियां बंधुला
तदीय गृहिं त्याचियी जननिला, स्त्रियेला, मुला,
पदींच नृप भेटण्यास्तव निघोनि ये नंतरीं;
सवेंचि परिसे सशोक-रव तो गृहाभीतरीं. ७५

"देसी ऐश्वर्यवंता मृति तरुणपणीं,
निर्धना पूर्ण वर्षे;
"मूढां नीचांसि लक्ष्मी, गुण-निधि सुधिला
दैन्य-ताप प्रकर्षें;
"साध्वी स्त्रीला पतीचा विरह; सुकृपणा
भाग्य; दुर्भाग्य दात्या;
"हा हा रे! कुंभकारा! जड-मति जरठा!
धिक् तुला! धिक् विधात्या! ७६

"रे काळ्या काळसर्पा! भिवभिवुनि तुला
जो लपे अर्धमेला,
"निर्लज्जा! नाहीं त्याचा कधिंहि घडत कीं
नीं तुवां घात केला!
"जो कोणी तूज बाहे हटकुनि, पळसी
त्याजपासोनि दूर;
"भ्याडा! धिक्कार तूतें! सम-विषम तुझें
कर्म, नाहींस शूर! ७७

"हा देवा! हा कपाळा! अवचित हरिला
हार कां बा गळ्याचा!—
"आधारस्तंभ आह्मां, प्रिय निज सतिचा,
मित्र जो पांगळ्यांचा!

"झाली कैशी यमा रे तुज कटु रुचि ही
लेंकरा न्यावयातें—
"सत्कार्यीं प्रेम ज्यातें, कृति सतत तशी
धन्य त्या तान्हयातें? ७८

"जेणें या मर्त्यलोकीं निपजुनि पृथिवी-
भार-भूतांसि दीक्षा;
"द्याया, ध्याया यशातें विमल सुचरितें,
वांछिली सन्निरीक्षा
"सेवी जो देशमातें, नृपतिस, जनित्यां,
सज्जनां, बांधवांतें,
"सत्कार्यीं प्रेम ज्यातें, कृति सतत तशी
धन्य त्या तान्हयातें! ७९

"तुला तरि कसें मुला, सदय सुंदरा तान्हया
"मनासि रुचलें बरें त्यजुनि बापुडीं जावया?
"जरार्णवें निमग्न ही रडत दीन माता अतां!
"रडे ढळढळां तुझ्यास्तव तुझी प्रिया तत्वतां!८०

"घडोघडि कडेवरी रिझविला तरी धाबरे
"तुझ्या स्मरुनि मृत्युला खचित रायबा हा बरें!
"अशा सुतनु पाडसा त्यजिसि हाय आह्मां जनां!
"नव्हे खरि मुला तुझी शपथ ही बरी योजना! ८१

"गेलास तूं आटपुनी स्वकृत्यें!
"भार्या तुझी येत तुझ्याच पंथें!
"येतें सवें भेटिस मीहि मागें!—
"बाळा तुझ्या रक्षिल कोण सांगें? ८२

"काका असे पोरच, पोर काकी;
"हा रायबा केवळ पोरका कीं!
"याची पुरी दुर्गति हाय हाय!
"रक्षो तया देव किं राय राय!" ८३

(पुढें चालेल.)

१तान्हाजीच्या. २ त्यानंतर. ३ मृत्यु. ४ दारिद्र्य-ताप. ५ अतिशयेंकरून. ६ साध्वी-सती. ७ कुंभार. ८ ह्यातान्या. ९ ब्रह्मदेव. १० नाहीं. ११ बोलावितो.

१ उत्तमप्रकारची आशा-इच्छा. २ ह्यातारपण हाच कोणी समुद्र. ३ तान्हाजीचा मुलगा.

# आईची थोरवी व तिचीं कर्तव्यें.

## भाग पहिला.

[ मागील अंकावरून पुढें चालू. ]

असें चोख वर्तन नेहमीं ठेवतां येण्यास हरकत येऊं नये ह्मणून हरएक कामाचा निकाल लावण्याच्या पूर्वीं घाई न करितां पोक्तपणानें व योग्य रीतीनें काय तो निर्णय ठरविण्याची बुद्धि तिला असली पाहिजे. मुलांस आवरून त्यांचा बंदोबस्त नीट रीतीनें राखण्याचें काम राज्यकारभाराच्या कामाइतकेंच कठीण आहे. ज्याप्रमाणें शाहाणा राजा आपल्या प्रजेला आपला अमल अति कडक भासूं देत नाहीं, व तो चालवितांना अति ढिलाईही दाखवीत नाहीं, त्याचप्रमाणें शाहाणी आई आपल्या मुलाबाळांस आपलें वर्तन अति कडक वाटूं देत नाहीं, व त्यांत अति ढिलाईही दाखवीत नाहीं. ती या दोन प्रकारच्या वर्तनांपैकीं मधलें वर्तन ठेविते. तसेंच जें वचन स्वतःस राखतां येणार नाहीं, असें वचन ती तोंडावाटे कधींच काढीत नाहीं. सगळ्यांत विशेष गोष्ट ही कीं, ती सत्यास अतिशय जपत असते. मुलांच्या नजरेस लबाडी ताबडतोब येते. त्यांस फसविण्याचा थोडासा जरी प्रयत्न झाला तरी आपणावरचा त्याचा विश्वास अगदीं साफ उडून जातो. ह्मणून मुलांशीं लबाडी करणें ह्मणजे त्याच्यांत असत्याचें बीजारोपण करणें होय, हें शाहाणी आई पक्कें लक्ष्यांत ठेविते. परंतु आई विचारशून्य व मूर्ख असली तर, लहानसहान व क्षुल्लक बाबतींत मुलांशीं लबाडी केली असतां कांहीं चिंता नाहीं असें मनांत आणून, थोड्या वेळेपुरती कटकट चुकविण्याकरितां मुलांशीं लबाडी करण्यास ती बिलकुल मागेंपुढें पाहत नाहीं. असें केल्यानें आपण केवढें पातक करितें व त्यांस पातकाचा धडा गिरविण्यास कशी प्रवृत्त करितें हें अज्ञानामुळें तिच्या लक्ष्यांत सुद्धां येत नाहीं. पुष्कळवेळां असें घडून येतें कीं, मुलें कांहीं चमत्कारिक प्रश्न विचारितात व त्यांच्या त्या सर्व प्रश्नांस उत्तरें देणें कठीण पडतें; किंवा तसें करणें योग्य नसतें. अशावेळीं कांहीं तरी लबाडीचें उत्तर देण्यापेक्षां त्यांस मुळींच उत्तर न देणें बरें. मग बेहेत्तर आहे त्यांची निराशा झाली तरी. कधीं कधीं मुलांशीं खरें बोलणें सोयीचें नसतें. अशावेळीं कांहींच न बोलणें बरें, पण खोटें बोलणें उपयोगी नाहीं. कारण, खोटें बोलण्यानें कांहींएक फायदा न होतां मुलांस मात्र खोटयाचें स्वरूप चांगलें स्पष्ट कळूं लागतें. आईनें मुलांशीं खोटें बोलून जर त्यांस फसविलें तर मुलें सुद्धां तसेंच करून तिला निःसंशय फसवूं लागतील. तसेंच, शिव्या देण्याची कित्येक मुलांस लहानपणापासूनच संवय लागते. इकडेहो आयांनीं फार लक्ष पुरविलें पाहिजे. कित्येक मूर्ख आया तर स्वतःच मुलामुलींस शिव्या देतात, त्यामुळें त्यांस शिव्यांचा अनायासें धडाच मिळत जातो. ही फार खेदाची गोष्ट आहे. एका शाहाण्या आईची अशी एक गोष्ट सांगतात कीं, तिच्या एका मुलानें दुसऱ्या एका मुलास शिवी दिली. ती त्या आईनें ऐकिली, तेव्हां ती लागलीच त्याच्या जवळ जाऊन ह्मणाली, 'इश्श, किती वाईट, किती घाणेरडे शब्द त्वां तोंडावाटे काढिलेस हे! या ओंगळ शब्दांनीं तुझ्याच तोंडास घाण लागली.' असें ह्मणून तिनें त्याचें तोंड पाण्यानें

साफ धुवून टाकिलें व निर्मल कपड्यानें पुसून स्वच्छ केलें; व असे घाणेरडे शब्द उच्चारून पुन्हा तोंड ओंगळवाणें करूं नको ह्मणून त्यास तिनें सांगितलें. तात्पर्य इतकेंच कीं, स्वतः आयांनीं नेहमीं तोंडावाटे चांगले शब्द काढिले व वाईट शब्दांबद्दल मुलांस अत्यंत तिरस्कार दाखविला, तर त्यांस अमंगळ शब्द काढण्याची वाईट संवय कधींच लागणार नाहीं. असो.

शाहाण्या आईला आपल्या अपत्यांबद्दल शाहाण्या मुत्सद्याप्रमाणें कळकळ वाटते. कोणत्या गोष्टींत त्यांचें चित्त वेधलें जातें; त्यांला कोणकोणते खेळ आवडतात व कोणते आवडणें इष्ट आहे; तसेंच त्यांचा अभ्यास कसा काय चालला आहे; त्यांत त्यांची गति कशी काय आहे; कोणता विषय त्यांला कठीण जातो; कोणता शिकण्याची त्यांला हौस वाटते -वगैरे त्यांच्या संबंधाच्या गोष्टींची चौकशी करणें तिला आवडतें. तसेंच गणितासारख्या एखाद्या कठीण विषयांतल्या एखाद्या प्रश्नाबद्दल त्याला फारवेळ गोंधळांत पडावें लागून तो सरतेशेवटीं त्याच्याकडून सुटला, परिक्षेंत तो एकाद्या विषयांत उत्तम ठरला, एकाद्या मुलाशीं त्याचें फार दिवसांपासून नीटसें जुळत नसून कांहीं दिवसांनीं त्याचें त्याच्याशीं सख्य झालें, किंवा एखाद्या मुलाशीं त्याची नवीनच मैत्री जुळली, (अशा प्रकारें मैत्री जुळविणें थोरल्या माणसांपेक्षां मुलांस लवकर साधतें.) तर अशा निरनिराळ्या प्रसंगीं त्याच्याशीं गोडीगुलाबीनें बोलून, त्याचें सर्व म्हणणें शांतपणें ऐकून घेऊन, त्याच्याशीं हांसून बोलून, त्याला जेणेंकरून उत्तेजन येईल तें तें करण्यास नेहमीं तत्पर असते. अशा या वर्तनामुळें आईच्या ठिकाणीं मुलांचा प्रेमभाव व पूज्यबुद्धि सतत जागृत राहून कांहीं झालें तरी तें आईला केव्हां सांगूं असें त्यांस वाटतें. परंतु उलटपक्षीं, आपल्या उमेदीच्या गोष्टी, आपले विचार, आपल्या मनोवृत्ति, आपल्या इच्छा, आपले हेतु वगैरे गोष्टी आपल्या आईस सांगण्याची सोय नाहीं, व त्या सांगितल्या असतां त्या ती शांतपणानें, आनंदानें व गंभीरतेनें ऐकून घेणार नाहीं, म्हणून आपणास हिरमुसलें तोंड करून परत यावें लागेल, असें आईनें आपल्या वर्तनामुळें त्यांस कधींच वाटूं देऊं नये. आईच्या मूर्खपणामुळें दुर्दैवेंकरून असा प्रकार घडून आलाच, तर त्यापासून उभयतांसही सुख होत नाहीं हें सांगावयास नकोच. गायनास आरंभ झाल्यावर लागलीच एकाद्या वाद्याची तार तुटली, किंवा त्यांत कांहीं बिघाड झाला ह्मणजे ज्याप्रमाणें त्या गायनाचा विरस होऊन केव्हांच रंग येत नाहीं, त्याचप्रमाणें आपल्या अंतःकरणांतील गोष्टी साफदिलानें आपणास आपल्या आईस सांगतां येत नाहींत, आपण लडिवाळपणानें आपली हरएक प्रकारची हकीकत तिजजवळ सांगितली असतां ती त्यांत फारसें चित्त घालीत नाहीं, असें वारंवार वाटून जर त्यांचें मन खट्टू होत गेलें, तर दररोजच्या समागमसुखापासून जो आनंद व्हावयाचा त्यास तीं दोघेंही अंतरतात. प्रथमारंभीं असा प्रकार जरी अगदीं थोडथोडा व बहुतेक न भासणारा असला, तरी दिवसेंदिवस तो जोरावत जातो व सरते शेवटीं स्वाभाविक प्रेमाच्यानें सुद्धां त्यास आळा घालितां येत नाहीं. एथपर्यंत स्थिति येऊन पोंहचली ह्मणजे आईला सुद्धां असें वाटूं लागण्याचा संभव आहे कीं, आपला मुलगा आपल्या गुह्य गोष्टी आपल्यापासून चोरितो, त्याचा आपणावर विश्वास नाहीं, व तो आपणापासून अलग राह-

ण्याचा यत्न करीत असतो.-असे विचार आई-च्या मनांत आल्यावर तिला काय वाटावें याची कोणीही कल्पना करील.

कवि व साधुलोक वर्णितात त्याप्रमाणें जग बहुतेक दुःखमय कांटेरी रान असेल, तर त्यांत कांहीं रमणीय भाग असल्यास तो पूर्ववयांतच आपल्या दृष्टीस पडला पाहिजे. या संसाराटवीमध्यें भ्रमण करीत असतां, कोठें खड्डे आहेत, कोठें दऱ्या आहेत, कोठें धिप्पाड कडे आहेत, कोणत्या मार्गानें गेलें असतां संकटें व अडचणी ज्यास्ती, व कोणत्या मार्गानें गेलें असतां सुख व सोयी ज्यास्ती, हा अनुभव ज्यांस आला असेल, त्यांनीं नवीन पिढीचे हाल आपल्या अनुभवजन्य ज्ञानानें टाळण्याचा यथाशक्ति यत्न केला पाहिजे; व तसें करणें त्यांचें कर्तव्य आहे. आपल्या मुलांच्या बाल्यावस्थेचा काल जितका आनंदजनक करून सोडितां येईल, तितका करून सोडण्यास प्रत्येकानें झटलें पाहिजे. कारण, या कष्टमय संसारयात्रेस मुलांनीं आरंभ केल्यावर, त्या त्या संकटाशीं तोंड देण्यास समर्थ होण्यासाठीं व ते ते प्रसंग सहन करण्याची ताकद त्यांच्या अंगीं यावी म्हणून, बाळपणीं उपभोगिलेल्या आनंदजनक गोष्टींचें त्यांस वारंवार स्मरण होत गेलें पाहिजे. तसें झालें असतां त्या संकटाचा व त्या प्रसंगाचा तीव्रपणा बऱ्याच अंशीं कमी होईल. संसारांत सर्वच गोष्टी मनाप्रमाणें घडणें असंभाव्य असतें. एखादेवेळीं आपला जिवलग व विश्वासू मित्र आपणाशीं वंचना करितो, किंवा ज्या गोष्टीची आपण फार आशा धरून बसतों त्या गोष्टीबद्दल आपली अगदींच निराशा होते; अशा निराशेच्या प्रसंगीं चिंतातुर होऊन जेव्हां आपण एकांतीं आपणाशींच विचार करीत बसतों तेव्हां लहानपणांतल्या मजेदार गोष्टींची साहजिक आठवण होऊन त्यापासून मनाला किती बरें सुख वाटतें? तो काळ अशा मजेचा असतो कीं, त्यावेळीं मित्र आपणाशीं वंचना करील किंवा कांहीं गोष्टींत निराश होण्याचे प्रसंग पुढें आपणावर येतील, अशा प्रकारचा यत्किंचितही विचार मनांत येत नाहीं. अशा समयीं मनाची जी तंद्री लागते तिची बहार कांहीं निराळीच असते. आपला हिरमोड होत जाईल, केव्हां केव्हां तर आपणास अगदींच हताश होण्याचा प्रसंग येईल, आपणाला नाना तऱ्हेच्या अडचणी सोसाव्या लागतील-तात्पर्य, आपल्या मनाप्रमाणें सर्वच घडून येण्याचा संभव अगदींच कमी, अशा कल्पनांचा लवलेशही आपल्या मनांत लहानपणीं न येतां चोहोंकडे आनंदीआनंद भासत होता-इत्यादि विचार मनांत आले म्हणजे आपणास समाधान वाटून चित्तवृत्तींस उल्हास वाटूं लागतो. लहानपणीं मनोवृत्तींस आनंदानें तल्लीन करून सोडणाऱ्या गोष्टी प्रौढवयांत ती बहार देत नाहींत. तीं हिरवीं चार शेतें, व त्यांत आपल्या सवंगड्यांबरोबर आनंदानें नाचणें, बागडणें, झाडांवरचा तो मोहोर व त्याचा घमघमाट, खळखळ वाहणारा तो स्वच्छ ओढा, आकाशांतील ढगांचे ते निरनिराळे रंग, इत्यादि गोष्टींपासून जो आनंद होई व जी मजा वाटे ती अपूर्वच-तसा सुखानुभव इतःपर नाहींच. एखादेवेळीं जगाच्या कटकटीस त्रासून डोकें भणभणलें असतां एखाद्या शांत व एकांत स्थळीं स्वतःशींच विचार करीत बसलें असतां तंद्री लागली म्हणजे लहानपणीं घडलेल्या गोष्टींचीं एकामागून एक अशीं स्पष्ट चित्रें दृष्टीसमोर येऊं लागतात: एकाद्या एकांत सरोवराच्या कांठीं सभोंवतालच्या देखाव्याकडे पहात विचार करीत बसणें; टेकडीवरून पाण्याचा

प्रवाह खालीं जोरानें पडल्यामुळें उत्पन्न झालेले सहस्रावधि तुषार पाहण्यांत गर्क होणें; एकाद्या प्रचंड वृक्षाच्या गर्द छायेखालीं बसून उमेदी बांधणें व बेत करणें;-वगैरे गोष्टी आपण प्रत्यक्ष पाहत आहों किंवा अनुभवीत आहों असें वाटूं लागतें. ज्यांच्याबरोबर आपण बोललों, हांसलों, खेळलों अशा आपल्या अति सलगीच्या मित्रांबरोबर पुनः हातांत हात घालून आपण मजेनें हिंडत आहों कीं काय असा भास होतो. आईनें सांगितलेल्या चमत्कारिक जुन्या गोष्टी, किंवा तिचें मधुर गाणें, आपलें झोंपी जाणें, किंवा एखादे वेळीं प्रेमभरित अंतःकरणानें आपणास कुरवाळून तिनें आपले मुके घेणें, इत्यादि गोष्टींची आठवण होऊन ती ती स्थिति आज आपण प्रत्यक्ष अनुभवीत आहों असें मनांत येऊन मन त्यांत तल्लीन होऊन जातें. निद्रासुख पूर्ण अनुभवून जागे झाल्यावर, सर्व प्रकारचे श्रम नाहींतसे झाल्यामुळें मन जसें प्रफुल्लित होतें व उमेद वाटूं लागते, तद्वतच असे विचार मनांत येऊन घोळूं लागले म्हणजे नाना चिन्तांनीं भरलेलें आपलें डोकें हलकें होऊन संसारांतील त्या त्या मनस्तापांशीं झुंजण्यास मन पुन्हा तयार होतें. अहो आयांनो! तुमच्या बाळांची बाल्यावस्था आपल्या प्रेमभरित, मृदु पण विचारवंत वर्तनानें व आपल्या सर्वगामी कनवाळूपणानें अशा आल्हादकारक व उमेद देणाऱ्या स्मृतींनीं समृद्ध करून सोडणें तुमचें कर्तव्य आहे; व तसें करणें तुमच्या स्वाधीन आहे. सुखसंपत्तीची जी देणगी त्यांस जन्मभर पुरणारी आहे, तिचा पुरवठा त्यांस त्यांच्या अजाण वयांत करून देणें हें तुमचें अति महत्वाचें काम आहे. त्यांच्या करमणुकींत मन घालून, त्यांच्या त्रासाचें कारण जाणून, त्यांस दुःख झालें असतां त्यांचें सांत्वन करून, त्यांच्या उमेदीच्या त्या त्या गोष्टींस प्रोत्साहन देऊन,-सारांश, त्यांच्या सर्व बाबती आपल्याच आहेत असें समजून त्यांच्याशीं वर्तन ठेवाल, तर तुमच्या हातून हें सहज होण्यासारखें आहे. हें काम कठीण नाहीं. मात्र ज्या आयांस आपल्या अपत्याबद्दल वाटावी तितकी कळकळ वाटत नाहीं त्यांना हें काम कठीण वाटेल; इतकेंच नाहीं, तर त्यांना तें साधणें सुद्धां शक्य नाहीं. पण खरी कळकळ व प्रेम वाटणाऱ्या आयांस तें अगदींच सोपें आहे. अपत्याबद्दल अशी कळकळ, असें प्रेम, असा उत्साह व इतका स्वार्थत्याग आईच्या अंगीं असल्यावर आणखीं ज्यास्ती तें काय पाहिजे?

कोणी कदाचित् असें विचारतील कीं, स्त्रियांची इतकी थोरवी गाण्यांत काय अर्थ आहे? आजपर्यंत त्यांच्या हातून नांव घेण्यासारखें या जगांत काय झालें आहे? विद्येंत, कलांत, शास्त्रांत किंवा इतर कोणत्याही कामांत प्रशंसनीय असें त्यांनीं काय केलें आहे? **भारत भागवता**सारखे ग्रंथ, **शाकुंतल** नाटकासारखीं नाटकें, किंवा कांहीं शास्त्रीय शोध-वगैरे ज्या ज्या नावाजण्यासारख्या गोष्टी झाल्या आहेत, त्या त्या सर्व पुरुषांच्याच कर्तीचीं व श्रमांचीं फळें आहेत. होय, ठीक आहे; पण **पाणिनी, कालिदास**-प्रभृति मंडळीप्रमाणें कृति करून स्त्रियांनीं आपलें नांव अजरामर केलें नाहीं, येवढ्यावरून तशा कृति करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं नाहीं असें निःसंशय ठरत नाहीं. व पुढें तशा स्त्रिया होतील किंवा नाहीं हा प्रश्न जरी मानसिक शास्त्रांतल्या वादाचा आहे, तरी ही गोष्ट निर्विवाद आहे कीं,

त्यांना *अहिल्याबाई होळकरीण किंवा ×राणी भवानी होतां येईल, व राज्यप्रकरणीं कामें मोठ्या शिताफीनें पार पाडतां येतील; मिराबाई बनून वाङ्मयास उत्तम भर पाडितां येईल. एलिझाबेथ फ्रॉय प्रमाणें अनाथांचें रक्षण व दुःखग्रस्तांस दुःखमुक्त करतां येऊन परोपकारापासून उत्पन्न होणाऱ्या अप्रतिम समाधानाचा आस्वाद त्यांस घेतां येईल; स्त्रियांस अत्यंत उपयुक्त व साहजिक साधणाऱ्या वैद्यकीच्या धंद्यास स्त्रिया शिकवून तयार करणें, हजारों-लाखों-रोग्यांची व्यवस्था हातीं घेऊन मी मी ह्मणून छातीस हात लावून पुढें येणाऱ्या धन्वंतरींस जें काम साधलें नाहीं तें स्वतः तडीस नेणें, व आरोग्यनियमांच्या ज्ञानांचा प्रसार करणें, मजुरांची स्थिति सुधारणें, ह्या व अशाच इतर कृति करून आपणास अजरामर करून सोडणारी फ्लारेन्स नाइटिंगेलही त्यांस होतां येईल. कारण, हा केवळ अजमास नसून ह्या घडलेल्या गोष्टी आहेत. यावरून इतकें स्पष्ट होतें कीं, घरांतलीं केवळ हलकींसलकीं कामें करण्यापुरतीच सरासरी बुद्धिमत्ता त्यांना आहे असें नाहीं, तर पुरुषांप्रमाणें त्यांच्यांतही शिक्षणाचा प्रसार होऊन त्यांच्या बुद्धीचा योग्य विकास होऊं लागला ह्मणजे त्यांचे यत्न फलद्रूप झाल्यावांचून राहणार नाहींत.

* ऐन तारुण्याच्या भरांत हातीं अमर्यादित सत्ता असतांही व अशा वेळीं वैधव्याची गदा येऊन धाडकन् आदळली असतांही, मन इकडे तिकडे बहकूं न देतां, निश्चयानें, नेटानें, व न्यायान्यायाचें पूर्ण धोरण जाणून या राणीनें राज्यशकट कसा बाणीनें हाकिला हें इतिहास वाचणारांस विदित आहेच. हिचा चरित्रक्रम विशेष लक्षांत ठेवण्यासारखा असल्यामुळें हिची थोडी हकीकत येथें देतों.

संपत्ति, कीर्ति, किंवा अधिकार या गोष्टी मिळविण्याकरितां जरी त्यांच्याकडून यत्न झाला नाहीं, तरी पण दिवसेंदिवस मुकाट्यानें उमलत जाणाऱ्या फुलाप्रमाणें या जगतीतलास

अहिल्याबाई तीस वर्षांच्या वयाची असतां तिच्या हातीं राज्यसूत्र आलें. तेव्हां ती भर दरबारांत बसून राज्यकारभाराचें काम पाहत असे. आपल्या प्रजेच्या उत्कर्ष होऊन त्यांची सुखवृद्धि व्हावी ह्मणून तिनें जे अविश्रांत श्रम केले, जी लोकोत्तर गंभीरता दाखविली, व न्यायाच्या कामांत जी अलौकिक सत्यनिष्ठा प्रकट केली, त्यांमुळें इतिहासप्रसिद्ध मानवरत्नांत ही नेहमीं गणली जाईल यांत शंका नाहीं. ती दररोज मोठ्या सकाळीं उठून स्तोत्रपाठ करण्यांत कांहीं काळ घालवी; नंतर दानधर्म झाल्यावर अल्पाहार करी; व श्वेतवस्त्र परिधान करून, स्वतःस गळ्यांतल्या एका माळेशिवाय दुसऱ्या कोणत्याही अलंकारानें न शोभवितां, ती दुपारचे दोन वाजेपासून तों ६ वाजेपावेतों दरबारांत काम करीत बसे. नंतर संध्याकाळीं पुराण वाची. पुराणांतल्या कथा वाचण्याचा तर तिला भारी नाद असे; त्या वाचून त्यांत वर्णिलेल्या व्यक्तींच्या कृत्यांपासून कोणता बोध घेण्यासारखा आहे, याचें ती फार मनन करीत असे. तिचा मनोनिग्रह पक्का असल्यामुळें तिच्या विचारांत व आचारांत धर्माची झांक नेहमीं दिसून येत असे. राज्यकर्त्री या नात्यानें नित्याचीं कामें करीत असतां, अधिकार चालवून केलेल्या प्रत्येक कामाबद्दल परमेश्वरापुढें आपणास जाब द्यावा लागेल, असें पक्कें मनांत समजून ती आपलें वर्तन ठेवी. सत्यावर तिची निष्ठा अतिशय असे. आपली मर्जी संपादण्याकरितां एकाद्यानें आपली हांजीहांजी करावी हें तर तिला बिलकुल पसंत नव्हतें. एकदां एका ब्राह्मणानें एक ग्रंथ लिहून तिला अर्पण केला. त्यांत त्यानें तिची अतिशय स्तुति केली होती. तो स्तुतिपर ग्रंथ तिनें नर्मदा नदींत

स्वर्गाची शोभा आणण्याचा यत्न त्यांच्या हातून होत आहे ही गोष्ट कमी महत्त्वाची आहे काय? पण हेंही असो; ज्या नरपुङ्गवांनीं व स्त्रीरत्नांनीं आपल्या स्तुत्य कृत्यांनीं या जगांत नांव गाजविलें आहे, अशा नरवीरांस व अशा सतींस प्रामाणिकपणा व सत्यनिष्ठा ह्या सद्गुणांचें जें प्रशंसनीय वळण लागलें तें तरी त्यांच्याकडूनच लागलें ना? तेव्हां त्यांच्याकडून झालेल्या महत्कृत्यांस स्त्रियाच कारणीभूत झाल्या असें म्हणतां येत नाहीं काय? अशा प्रकारचीं स्त्रीपुरूषें तयार करणें लहानसान काम नव्हे. मोठमोठे कवी, ग्रंथकार व मुत्सद्दी यांच्या

---

टाकून देण्याचा हुकूम फर्माविला. ती हुद्द्याचीं कामें करण्यास जीं माणसें निवडी, तीं फार विचारानें निवडी. ती आपल्या प्रांतांतला राज्यकारभार उत्तमरीतीनें चालवीत असे, इतकेंच नाहीं, तर तिजमध्यें मुत्सद्दीपणा चांगलाच वसत असल्यामुळें ती राज्य चालवीत होती तोंपर्यंत राज्यांत सर्वत्र शांतता राहून प्रजाजन समाधानांत यथेच्छ नांदत होते. तिनें तीस वर्षे राज्य केलें. तितक्या अवसरांत तिनें असंख्य देवालयें, धर्मशाळा, किल्ले, विहिरी व विंध्याद्रीवर एक सडकेचा रस्ता वगैरे करून आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे. मनुष्यमात्रावरच ती दया करीत असे, असें नाहीं; तर तिच्या दयेचा पल्ला पश्वादिकांपर्यंत सुद्धां पोहोंचत असे. शेतें नांगरणारे बैल, मासे, पक्षादिप्राणी यांच्याकरितांही दाणापाण्याची व्यवस्था तिजकडून होत असे. हिचा एकंदर वर्तनक्रम लक्षांत आणून **माल्कम्** साहेबांसारख्या परद्वीपस्थ गृहस्थानें हिजबद्दल असे उद्गार काढिले आहेतः "**अहिल्याबाईच्या** वर्तनाचा शांतपणें व निःपक्षपातानें विचार केला असतां असें वाटतें कीं, तिच्यासारख्या राज्य करणाऱ्या स्त्रियांच्या मंडळांत ज्या अतिशय निष्कलंक व अनुकरणीय राज्य करणाऱ्या स्त्रिया होऊन गेल्या, त्यांमध्यें हिची गणना निःसंशय केली पाहिजे. **जगन्नियंत्या परमेश्वरापुढें** आपणास आपल्या कृत्यांबद्दल जाब द्यावा लागेल, असा पक्का समज मनांत बाळगून ऐहिक कर्तव्यें करीत असतां परिणामीं हितकर असें वळण मनाला कसें लागतें हें हिच्या चकित करून सोडणाऱ्या उदाहरणावरून चांगलें शिकण्यासारखें आहे." असें स्त्रीरत्न कोणत्याही देशास खरोखर भूषण होय.

× **महाराणी भवानी** हिनें गेल्या शतकाच्या शेवटीं नाटोर संस्थानांत राज्य केलें. आपल्या आंगची अलौकिक कर्तबगारी दाखवून ह्या पराक्रमी स्त्रीनें कसें यश संपादिलें हें सुप्रसिद्धच आहे. जमीनदारी कामाची व्यवस्था लावण्यांत हिची जी कुशाग्रबुद्धि दिसून आली ती खरोखर वाखाणण्यासारखी आहे. या व्यवस्थेमुळें असें झालें कीं कांहीं वतनवाडीचें उत्पन्न पुष्कळ वाढून ज्या इतर वतनाच्या जमिनी अगदीं रसातळास पोहोंचूं पाहत होत्या त्या कायम राहिल्या. या सुव्यवस्थेमुळें **नाटोर** घराण्यांत संपत्ति अतिशय वाढून त्याचें वजन फारच वाढलें. **राणी भवानी**च्या वेळीं त्या घराण्याच्या वैभवाचा कळस झाला असें म्हटलें तरी चालेल. मागचें पुढचें सर्व धोरण मनांत आणून ती आपले विचार ठाम करीत असे; व विचार निश्चित झाल्यानंतर तदनुसार चोख वर्तन ठेवी. याप्रमाणें जरी तिचा दृढ निश्चय ठरला तरी पोक्त व विश्वासनीय माणसांची सल्लामसलत शांतपणें ऐकून घेऊन त्यांत घेण्यासारखा भाग असल्यास ती तो अवश्य ग्रहण करीत असे. ती अभिमानी स्त्री असे. पण तिच्या अभिमानास मर्यादा असल्यामुळें तो वाजवी टप्प्याच्या बाहेर भलतीकडे वाहत जात नसे. ती आपल्या हाताखालच्या माणसांशीं व आश्रितांशीं बोलतचालत असे, परंतु प्रसंग ओळखून त्यांच्याशीं बेताबाताचें वर्तन ठेवी. त्यामुळें ते तिला वचकून असत.

अंगची जोरदार बुद्धिमत्ता व सचोटीचें वर्तन इत्यादि सद्गुणांचा प्रादुर्भाव त्यांजमध्यें त्यांच्या आयांकडून कसकसा होत गेला हें त्यांच्या चरित्रक्रमाचा विचार केला असतां कळून येतें. एका नामांकित कवीच्या आईची हकीकत बरीच मजेदार असल्यामुळें ती येथें देतों.

या बाईचा आनंदी स्वभाव,त्या त्या समयास साजेसा विनोद करण्याची तिची हातोटी, आल्या-गेल्यांचें योग्य आदरातिथ्य करण्याची तिची तत्परता, हे व असेच तिचे इतर सद्गुण तिच्या मुलामध्यें अगदीं हुबेहूब उतरले होते. या कवीशीं अति परिचीत अशा एका गृहस्थाची व या थोर स्त्रीची ओळख झाल्यावर तो गृहस्थ तीस म्हणाला, 'आमचे कविराज इतक्या योग्यतेस चढले व त्यांच्या अंगीं बरेच सद्गुण दिसून येतात, यांचे इंगित आतां मला चांगलें कळून आलें. जशा त्यांची आई आहे तसेच ते हुबेहूब आहेत.' ही स्त्री साधी, आनंदी व ममताळू असे. तिच्या मुलांचा तर ती केवळ आनंदच होती. चांगली समजूत व पोक्त विचार व दूरदृष्टि हे गुण तर तिजमध्यें स्वभावतःच वसत होते. तिच्या आंगचा सर्वांत विशेष गुण हा कीं, तिला वाचण्याचा व गोष्टी सांगण्याचा भारी नाद असे. तिचा एके ठिकाणीं असा लेख आहे कीं 'माझ्या वागण्याचें मुख्य तत्त्व म्हटलें म्हणजे व्यवस्था व शांतता हें होय. म्हणून जें जें काम मी हातीं घेतें, तें तें अगदीं हातावेगळें करून टाकितें. जें काम फार कठीण व जास्ती त्रासाचें असतें, तें तर अगोदरच उरकून टाकितें. सर्व कामाची जिकडे तिकडे नीट व्यवस्था लागली म्हणजे मला कितीही काम पडलें, तरी त्यापासून मला कंटाळा न वाटतां माझी वृत्ति नेहमीं आनंदी राहते. आबालवृद्ध सर्व लोक मला आवडतात. त्यांच्याशीं वागतांना, मी मोठी व इतर लोक मजपेक्षां नीच, अशी आढ्यता माझ्या ठिकाणीं मी कधींच आणीत नाहीं. असें माझें वर्तन सर्वांस पसंत असल्यामुळें मीही त्यांस आवडूं लागतें. प्रत्येक मनुष्यामध्यें काय काय चांगले गुण आहेत, हें शोधून काढण्याकरितां मी नेहमीं तत्पर असतें; व त्यांच्यांत जें कांहीं वाईटसाईट असेल, त्याकडे फारसें लक्ष न देतां, ज्यानें त्यांना उत्पन्न केलें व ज्याला त्यांच्यांतलें वाईट कसें काढून टाकावें हें सर्व मनुष्यांपेक्षां चांगलें समजतें त्या परमेश्वराकडे त्या वाइटाचा हवाला सोंपवितें. असा माझा वर्तनक्रम असल्यामुळें माझें मन नेहमींच आनंदांत राहतें.' निरनिराळ्या गोष्टींना उत्तम स्वरूप देऊन, ऐकणारांचें चित्त वेधतील अशा रीतीनें त्या सांगण्याची उत्तम हातोटी तिला साधली होती. म्हणून नीतीचा, सत्याचा व इतर इष्ट गोष्टींचा ठसा मुलांच्या मनावर बठविण्यांत तिचा हातखंडा असे. अशा मनोवेधक रीतीनें गोष्टी सांगण्याचें चातुर्य आयांस साधणें अत्यंत इष्ट आहे. कारण, निरनिराळ्या तऱ्हेच्या उपदेशाचा चिरस्थायी परिणाम व्हावयास हें एक उत्तम साधन आहे. असो. हवा, पाणी, पृथ्वी, तेज, आकाश यांपैकीं कशाचेंही वर्णन करणें झाल्यास तें तिनें अशा मोहक व चटकदार रीतीनें करावें कीं, तें इत्थंभूत ऐकिल्याखेरीज तिच्या मुलांस चैन पडूं नये. गोष्ट सांगण्याचें काम सुरू असतां तींतील निरनिराळ्या रसांचा परिणाम मुलांच्या चेहऱ्यावर उघड उघड दिसून येत असे. गोष्टींतील ज्या कथानायकाबद्दल मुलांच्या मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न झाली असेल, त्याच्यावर कोणी दुष्टानें अतोनात संकटें आणून त्याचा सर्वस्वी नाश केला असें

सांगण्यांत आलें असतां त्या दुष्टाबद्दल त्यांच्या मनांत मोठा द्वेष उत्पन्न व्हावा; व केव्हां केव्हां तर त्यांस अति वाईट वाटून त्यांच्या डोळ्यांतून पाणी यावें. परंतु त्यांच्याच जयजयकाराची गोष्ट कळली ह्मणजे त्यांस उत्साह वाटून आनंदाश्रूंचे भरतें यावें. एखादेवेळीं एखादी गोष्ट अर्धीच राहिली ह्मणजे ती त्यांच्या मनांत सारखी घोळत रहावी. अशा स्थितींत एखाद्या मुलानें विचारावें–' काय आई, त्या गोष्टींतल्या अमक्या मनुष्याचा असा असा परिणाम झाला असेल, नाहीं बरें ?' अशा रीतीनें त्यांनीं आपापली कल्पना लढवावी. आई व तिचें अपत्य यांचें हें मनोवेधक चित्र नव्हे काय ? अशा रीतीनें निरनिराळ्या गोष्टी मुलांस सांगून सुनीतीकडे त्यांच्या मनाचा ळळा लावणाऱ्या व अशा प्रकारें त्यांची कल्पनाशक्ति वाढवून त्यांस योग्य वळण लावणाऱ्या आया असल्यास त्यांचीं बाळें नीतिमान्, दृढनिश्चयी, व देशभक्त निघतील असें समजण्यास हरकत आहे काय ? असें झालें असतां यापेक्षां आणखी महत्कृत्य काय पाहिजे आहे ? अशा रीतीनें धन्य ह्मणवून घेणाऱ्या मातांची थोरवी गावी तितकी थोडीच.

कुटुंबामध्यें आई किती वजनदार माणूस आहे व तिच्या उदाहरणाचा जोर किती असतो हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. नवीन पिढीला उत्तम वळण लावून तयार करण्याची जबाबदारी जर तिच्यावर आहे तर मग तिला मानसिक, शारीरिक, नैतिक इत्यादि प्रकारचें योग्य शिक्षण मिळणें किती जरूरीचें व किती न्याय्य आहे हें वेगळें सांगणें नको. आईचें काम कधींच न संपणारें आहे. नाजुक अर्भकांपासून मनानें व शरीरानें सदृढ असे पुरुष व अशा स्त्रिया तयार करण्याची कठीण व नाजुक कला त्यांस साधावयाची असते. व ही कला पूर्ण अमलांत आणण्याकरितां त्यांना आपला नाजुक मुत्सद्दीपणाच अमलांत आणावा लागतो.

मुलांबाळांस काळजीनें वाढविण्याच्या कामीं लागणारे श्रम हलके कसे करावे, त्यांस कंटाळा न वाटू देतां इतकेंच नव्हे तर त्यांचें बरेंच मनोरंजन होईल अशा रीतीनें त्यांस कसें गुंतवून ठेवावें, हें तिलाच चांगलें समजतें. सत्कृत्यें करण्यास त्यांस तीच शिकविते. कालान्तरानें हा सच्छिष्य नांवलौकिकास आला, तर त्याचें अर्धें श्रेय आईकडे येतें. आपण घेतलेल्या श्रमाच्या फलप्राप्तीबद्दल ती निरिच्छ असते, तरी आपलें अपत्य सद्गुणसंपन्न आहे अशी तिची खातरी होतांच तिला मोठी धन्यता वाटून आपल्या श्रमांचें पूर्ण सार्थक झालें असें तिला वाटूं लागतें.

आपली जबाबदारी नीट समजून व आपलें कर्तव्य ओळखून तें मनापासून योग्य रीतीनें बजावण्याचा ज्या यत्न करितात; कुटुंबांत उत्तम व्यवस्था राखण्याकरितां ज्या रात्रंदिवस झटतात; मुलें बाळें शहाणीं सुर्ती निपजावीं म्हणून त्यांस अमृततुल्यवाणीनें ज्या सदुपदेश करितात; अशा शाहाण्या व पोक्त आयांचें आतांपर्यंत वर्णन झालें.

( पुढें चालेल. )



# भारतीय नाट्यकलेचा इतिहास.

[ १. ]

**हिंदु नाटकपद्धतीवरील आधारभूत ग्रंथ.**

नाटकाचा उपक्रम पौराणिक कालापासूनचा आहे. त्याच्या साहाय्यानें चित्तरंजन करण्याची मूळ कल्पना **भरत**मुनि ह्यांनीं काढिली असावी असें बहुतेक हिंदु ग्रंथकारांचें मत आहे. परंतु कांहीं ग्रंथांवरून असेंही दिसून येतें कीं, ही ललितकला **ब्रह्म**देवानें वेदांमधून घेतली असून ती त्यानें **भरत**मुनीस निवेदन केली, व त्यानें तिचा इंद्रलोकीं प्रसार केला. ह्या कलेचे प्रारंभीं तीन प्रकार होते. **नाट्य, नृत्य** आणि **नृत्त**. ह्यांचे प्रयोग **भरत**मुनीनें **गंधर्व** व **अप्सरा** ह्यांच्याकडून **इंद्र**सभेमध्यें करविले. ते पाहून सर्व देव संतुष्ट झाले. तेव्हांपासून **इंद्र**लोकीं ह्या कलेचा फार उत्कर्ष झाला. ह्या तीन प्रकारच्या अभिनयांमध्यें **शिवांनीं तांडव** व **लास्य** असे दोन नवीन प्रकार संमिश्रित केले. ह्या सर्वांमध्यें **नाट्य** हाच प्रकार नाटकास अनुरूप असा आहे. कारण त्यामध्यें वाणीसह अभिनय असतो. **नृत्या**मध्यें फक्त अंगविक्षेपच असतो. त्यामध्यें भाषण मुळींच नसतें. **तांडव** आणि **लास्य** हे मूळच्याच नर्तनपद्धतींतील सुधारलेले दोन नवीन प्रकार आहेत. **तांडव** हें नृत्य **शंकरांनीं** आपला प्रिय गण जो **तंडू** त्यास शिकविलें, ह्मणून त्यास " **तांडव** " असें नांव पडलें. **लास्य** हें नृत्य **पार्वतीनें बाणासुराची** कन्या राज्ञी **उषा** हिला शिकविलें व तिनें त्याची **द्वारके**तील सर्व गोपांगनांना माहिती करून दिली. त्यामुळें ह्या नृत्याचा **सौराष्ट्रा**मध्यें प्रसार झाला व हळू हळू तें इतर प्रांतांतील स्त्रियांनाही अवगत झालें. ह्या दोन नर्तनपद्धतींतही त्यांच्या उत्पादकांच्या लिंगभेदास अनुसरून भिन्न रस उत्पन्न झाले आहेत. तांडव नृत्यामध्यें पौरुष्य व वीररस अधिक आहे, व लास्यामध्यें कोमलता, कामोत्तेजकता आणि सौम्यता हे गुण अधिक आहेत.

वरील पुराणकथेवरून व **नाट्य, नृत्य** आणि **नृत्त** ह्या तीन शब्दांच्या मूलार्थावरून इतकें दिसून येतें कीं, नर्तनाची कल्पना व नाट्यप्रयोग ह्यांमध्यें सन्निकट संबंध असून तो सर्व उत्तम उत्तम संस्कृत नाटकांत निःसंशय दृष्टिगोचर होतो. **आंग्ल** नाटकांतील '**कोरसा**'मध्यें गायन व नर्तन ह्यांचें संमिश्रण असून, त्यामध्यें नर्तनालाही गायनाप्रमाणेंच महत्त्व दिलेलें असतें. त्यामध्यें नाटककारास संविधानक रचण्याचे कामीं ज्याप्रमाणें परिश्रम घ्यावे लागतात त्याप्रमाणेंच त्यांतील नर्तनक्रम जमविण्याची काळजी घ्यावी लागते. असो.

नाटकप्रयोगाचा आद्याचार्य किंवा आद्योत्पादक **भरत**मुनि हा होय असा जो सार्वत्रिक समज आहे तो यथायोग्य आहे कारण, तो अत्यंत प्राचीन ग्रंथकारांपैकीं एक असून त्यानें ह्या कलेस एक विशिष्ट पद्धति लावून दिली. त्याचीं सूत्रें निरनिराळ्या नाटक ग्रंथांवरील टीकाकारांनीं आपापल्या ग्रंथांमध्यें वेळोवेळीं अवतरणादाखल घेतलेलीं सांपडतात; व त्यांवरून अर्वाचीन ग्रंथकारांनीं जीं तत्वें पुढें प्रतिपादन केलीं तीं सूचित होतात. परंतु आजपर्यंत जेवढा शोध लागला आहे तेवढ्यावरून **भरता**चा समग्र ग्रंथ कोठेंही आढळून येत नाहीं. एवढेंच नव्हे तर कित्येक ठिकाणीं त्याचीं ह्मणून जीं सूत्रें दिलेलीं आहेत तीं नवीन क-

लिपलेलीं असावींत असाही संशय घेण्यास जागा सांपडते. तथापि ह्या संबंधानें विशेष चर्चा करण्यांत कांहीं महत्व नाहीं. कारण ह्यामुळें नाटकाच्या परिभाषेमध्यें विरोध दाखवून वाद उत्पन्न करणारे असे मुद्दे मुळींच निदर्शनास येत नाहींत. तीं सूत्रें खरीं असोत अथवा खोटीं असोत, तीं सर्वमान्य ग्रंथकारांस संमत असलेल्या तत्वांस अनुरूप अशींच आहेत. ह्या ग्रंथकारांच्या ग्रंथांची थोडीशी माहिती येथें दिली असतां ती अप्रयोजक होणार नाहीं अशी आशा आहे.

नाटयविषयक वाङ्मयामध्यें अति प्राचीन व उत्तम असा प्रबंध ह्मटला ह्मणजे **दशरूपक** हा होय. ह्यामध्यें नाटकाचे दहा प्रकार वर्णिले आहेत. त्याचें ' रूपक ' हें नांव फारच यथार्थ आहे. ह्या ग्रंथांत फक्त नाटकाचेंच गुणदोषविवेचन केलेलें आहे. त्यांत मूळ संस्कृत श्लोक दिला असून उदाहरणांसह उत्तम टीकाही दिलेली आहे. मूळ ग्रंथाचा कर्ता **मुंजराजाचा** आश्रित जो **विष्णुदेव** त्याचा मुलगा **धनंजय** हा होय. त्यावरून हा ग्रंथ ११ व्या शतकामध्यें तयार झाला असावा, व त्यावेळीं भारतवर्षांतील नाटयकला पूर्णत्वाप्रत पोहोंचून पुन: विलयाप्रत जात चालली असावी असें दिसतें. ह्या ग्रंथावराल टीकाही त्याच ग्रंथकाराच्या लेखणींतून उतरली असावी असें मानतां आलें असतें. कारण, तिचाही कर्त्ता **मुंजनृपतीचा** आश्रित जो **विष्णु** त्याचाच मुलगा आहे. पण दोघांच्या नांवांमध्यें मात्र अंतर आहे. मूळ ग्रंथकाराचें नांव **धनंजय** असें आहे व टीकाकाराचें नांव **धनिक** असें आहे! परंतु ह्या टीकेमध्यें **रत्नावलि** नाटकांतील पुष्कळ उतारे घेतले असल्यामुळें हा टीकाकार व मूळग्रंथकार एकच असावे असें मानितां येत नाहीं. कारण **रत्नावलि** नाटक हें १२ व्या शतकाच्या प्रारंभीं लिहिलेलें असल्यामुळें त्यांतील उतारे ११ व्या शतकांत लिहिलेल्या ग्रंथामध्यें यावेत हें असंबद्ध दिसतें! त्यावरून तो टीकाकार वेगळा असावा असें अनुमान करणें भाग आहे. शिवाय, ह्या टीकाकारानें आपल्या नांवापुढें जें पद जोडिलें आहे त्यांतही बरीच संदिग्धता आहे. तो स्वत:स " **महाराज श्रीमदुत्पलराज महासाध्यपाल** " ह्याचा एक कामदार ह्मणवितो. परंतु ' **उत्पल** ' हें राजाचें अभिधान आहे किंवा देशाचें अभिधान आहे हें निश्चयानें समजत नाहीं. त्यामुळें तें कोणत्याही अर्थानें **मुंज** किंवा **भोज** ह्या राजांस लावितां येत नाहीं. ह्या कारणास्तव ह्या टीकेचा काल अनिश्चितच ठेविला पाहिजे. आतां हा ग्रंथ फार दुर्मिळ असल्यामुळें तो बराच प्राचीन असावा ह्यांत शंका नाहीं. **विक्रमोर्वशीय** नाटकाचा टीकाकार **रंगनाथ** ह्यानें ' **पाणि**विरचित दशरूपकातिकाव्यम् ' ह्मणून एक उल्लेख केला आहे. त्या काव्याचा शोध लागला तर कदाचित् ह्या टीकेसंबंधानें अधिक माहिती मिळण्यास त्याचा उपयोग होईल.

**दशरूपकाच्या** खालोखाल नाटयविषयाची माहिती देणारा दुसरा ग्रंथ **सरस्वतिकंठाभरण** हा होय. हा **भोजराजानें** लिहिला आहे असें मानितात. ह्यामध्यें पांच खंडें असून त्यांत अलंकारशास्त्राविषयीं सोपपत्तिक विवेचन केलेलें आहे. त्याच्या शेवटच्या खंडामध्यें नाटक ग्रंथास आवश्यक अशा कित्येक गोष्टींचें विवरण समाविष्ट आहे. त्यांत जीं उदाहरणें दिलीं आहेत तीं अनेक काव्यें व नाटकें ह्यांमधून घेतलेलीं आहेत. त्यामुळें **रत्नावलीमधील**

वेंचे **दशरूपकांत** घेतल्यामुळें त्याच्या ग्रंथकाराविषयीं जसा घोंटाळा झाला आहे तशी ह्याही ग्रंथाची स्थिति झाली आहे! **कालिदास** व **भवभूति** ह्यांच्या ग्रंथांतील उतारे ह्यांत आले असते तरी चालले असते; आणि **मुद्राराक्षस** व **वेणिसंहार** ह्यांतील उदाहरणें दिल्यानें कालगणनेमध्यें कांहीं प्रमाद झाला नसता, परंतु मग भोजराजाची कारकीर्द कित्येक वर्षें पुढें ढकलली पाहिजे आणि **हर्ष** राजाची कारकीर्द पुष्कळ मागें घेतली पाहिजे. कारण एकाच्या ग्रंथांत दुसऱ्याचीं उदाहरणें जर आढळून आलीं तर तसा प्रकार होणें साहजिक आहे. **भोज** व **हर्ष** ह्यांचे काल बहुतेक चांगल्या आधारांवरून ठरलेले असून त्यांसंबंधानें आतां वाद राहिलेला नाहीं. ह्या ग्रंथावर **रत्नेश्वर महामहोपाध्याय** ह्याची एक टीका आहे. पण तींत ग्रंथकाराचा नामनिर्देश मुळींच केलेला नाहीं.

**सरस्वतिकंठाभरणा**प्रमाणेंच दुसरा नामांकित ग्रंथ '**काव्यप्रकाश**' हा होय. हा मुख्यत: अलंकारशास्त्रावर असून त्याचे दहा भाग केलेले आहेत. ह्यांत मधून मधून नाटकासंबंधानें बरीच माहिती दिलेली आहे. त्यांत मोठमोठ्या प्रख्यात कवींचीं वचनें देऊन नाट्यविषयाचें विवेचन फार चांगलें केलें आहे. कवींचीं नांवें मात्र दिलेलीं नाहींत. कवींचा नामनिर्देश न करणें हा ह्या ग्रंथाचाच काय पण अशा प्रकारच्या बहुतेक ग्रंथांचा संप्रदायच दिसतो. संस्कृत वाङ्मयाचा इतिहास शोधण्यास ह्या ग्रंथांतील उतारे व मागील ग्रंथांतील उतारे हे चांगले ओळखतां येणें अत्यंत अवश्य आहे. **काव्यप्रकाशाचा** कर्ता **काश्मीर**देशीय कोणी **मम्मथ भट्ट** हा असून हा ग्रंथ **रत्नावली**नंतरचा व **साहित्यदर्पणा**च्या अगोदरचा असावा. तथापि तो पांच शतकांपेक्षां अधिक जुना असावा.

**साहित्यदर्पण** हाही ग्रंथ फार मूल्यवान् व लोकप्रसिद्ध आहे. ह्यामध्यें साहित्यशास्त्राची फार चांगली माहिती दिली असून त्याचे दहा भाग केले आहेत. त्यांतील ६ व्या भागामध्यें नाटकास लागणाऱ्या गुणांचें विवेचन केलेलें आहे. ह्यांत निरनिराळ्या नाटकांतून घेतलेले उतारे स्पष्ट दिले असून त्यांतील मुख्य मुख्य वेंच्यांचीं ( ज्यांच्या प्रति दुर्मिळ आहेत त्याखेरीज करून ) नांवें दिलीं आहेत. ह्या ग्रंथाची काल निश्चित नाहीं. तथापि तो अर्वाचीन असून **काव्यप्रकाशा**नंतरचा असावा. ह्या ग्रंथाचा एक हस्तलिखित प्रत उपलब्ध झाली आहे. ती मूळ प्रतीची नक्कल असून ती शके १४२६ ह्मणजे इ. स. १५०४ मध्यें तयार केली, असा तींत उल्लेख आहे. हा ग्रंथ **विश्वनाथ कविराज** नामक एका बंगाली पंडिताचा आहे. ह्याच्या बापाचें नांव **चंद्रशेखर** असें होतें. हा ग्रंथ **बंगाल**प्रांतामध्यें अद्यापिही मोठा प्रमाणभूत मानितात. ह्या ग्रंथकाराचें निवासस्थल **डाका** जिल्ह्यामध्यें **ब्रह्मपुत्रा**च्या पलीकडे होतें अशी एक आख्यायिका प्रचलित आहे.

**संगीत–रत्नाकर** ह्या ग्रंथामध्यें त्याच्या नांवास अनुसरून नाटकापेक्षां संगीत शास्त्राचें ह्मणजे गायन व नर्तन ह्यांचेंच विशेष विवेचन केलेलें आहे. तथापि त्यांत नाट्यप्रयोगासंबंधानें व अभिनयासंबंधानें अपूर्व माहिती दिली आहे. हाही ग्रंथ एका **काश्मिरी** पंडिताचाच असून त्याचें नांव **शार्ङ्गदेव** असें आहे. त्याच्या बापाचें नांव **सोरहल** व आजाचें नांव **भास्कर** असेंही दिलेलें आहे. **भास्कर** हा दक्षिणेंत

येऊन उदय पावला. त्याच्या नातवास **सिंहल-देव** नामक राजाचा आश्रय होता. पण तो राजा कोणत्या प्रांतांतला व कोणत्या कालांतला होता तें मात्र निश्चयानें समजत नाहीं! ह्या ग्रंथकारानें आपल्या ग्रंथांत पूर्वीच्या **भोज**-प्रभृति ग्रंथकारांचीं नांवें दिलीं आहेत, त्यावरून तो ग्रंथ १२ व १५ ह्या शतकांच्या दरम्यान लिहिलेला आहे असें दिसून येतें. ह्या ग्रंथावर **विजयनगर**च्या **प्रौढ** अथवा **प्रतापदेव** नामक राजाच्या आज्ञेवरून **कालिनाथ** ह्यानें इ. स. १४५६ ते १४७७ ह्यांच्या मध्यंतरीं एक टीका लिहिली आहे. ह्यामुळें ह्या ग्रंथाच्या सनाविषयीं शंका बाळगण्याचें फारसें कारण नाहीं.

साहित्यशास्त्रावर जे अनेक ग्रंथ आहेत त्यांमध्यें पुढील ग्रंथही प्रसिद्ध आहेत. '**काव्यादर्श**' हा **दशकुमारचरिता**चा कर्ता व **भोज**-राजाचा समकालीन जो सुप्रसिद्ध **दंडि** कवि त्यानें लिहिलेला आहे. **काव्यालंकारवृत्ति** हा **वामनाचार्य** ह्यांनीं लिहिलेला आहे. **कुवलयानंद**, हा **जयदेव**कृत **चंद्रालोका**चेंच स्पष्टीकरण असून तें **विजयानगर**च्या रसिक व गुणग्रहणपटु **कृष्णराय** नामक राजाचा आश्रित (किंवा प्रधान) **अपय्या दीक्षित** ह्यांनीं लिहिलेला आहे. **कृष्णराव** देव हा इ. स. १५२० मध्यें **विजयनगर**च्या गादीवर होता. '**अलंकारसर्वस्व**' हा **भीम** कवीनें लिहिलेला आहे. '**रसगंगाधर**' हा पंडितवर **जगन्नाथराय** ह्यांनीं लिहिलेला आहे. आणि '**अलंकारसर्वस्व**' हा कवि **कर्णपूरक** नामक एका वैष्णव गोसाव्यानें लिहिलेला आहे. त्यांत त्यानें स्वतांच्या कवितेंत साहित्यशास्त्राचे नियम सांगून त्यांमध्यें राधाकृष्णांचा प्रेमविहार व वृंदावनांतील गोपींच्या लीला ह्यांचें मनोहर वर्णन केलें आहे.

ह्या मुख्य ग्रंथांखेरीज कवितेच्या साहाय्यानें जे मनोविकार व हृदयतरंग उत्तमप्रकारें चित्रित किंवा उल्लसित करितां येतात त्यांच्यावरही **रुद्रभट्ट**विरचित **शृंगारतिलक** आणि **भानुदत्त**-विरचित **रसमंजरी** व **रसतरंगिणी** ह्यांसारखेही कांहीं ग्रंथ आहेत. ह्यांपैकीं शेवटच्या ग्रंथामध्यें **भरतमुनी**नें प्रतिपादिलेले ह्मणून जे कित्येक नियम आहेत त्यांपैकीं पुष्कळ अंतर्भूत झालेले दिसतात.

ह्या सर्व ग्रंथांमधून हिंदु नाट्यकलेच्या इतिहासाची माहिती मिळण्यासारखी आहे. त्याखेरीज कित्येक नाटकांसमवेत ज्या टीका दिल्या आहेत त्याही ह्या विषयाचें व ह्या विषयावरील ग्रंथांचें ज्ञान करून देण्यास फार उपयुक्त आहेत. **भोजप्रबंध** आणि **सारंगधरपद्धति** ह्या दोन ग्रंथांच्या ज्या टीका आहेत त्या दोन्ही ग्रंथांच्या पूर्वकालीन कवींचें सत्यापन करण्यास फार चांगल्या मार्गदर्शिका आहेत असें ह्मटलें तरी चालेल. **भोजप्रबंध** हा ग्रंथ सुप्रसिद्धच आहे. **सारंगधरपद्धतींत भोजप्रबंधा**प्रमाणेंच पूर्वीच्या ग्रंथकारांची परिगणना केलेली आहे. ह्याच्या कर्त्याचें नांव **सारंगधर** असें असून तो **शाकंबरी**च्या विख्यात **हम्मीर** राजाचा कुलगुरु जो **राघवदेव** त्याचा नातु होता. हा राजा १४ व्या शतकाच्या आरंभीं राज्यारूढ होता, त्या अर्थीं हा ग्रंथ १४ व्या शतकाच्या शेवटीं किंवा १५ व्या शतकाच्या आरंभास निर्माण झाला असावा असें सिद्ध होतें. व त्यावरून त्यांत निर्दिष्ट केलेल्या अनेक नाट्यग्रंथकारांचा काल मर्यादित होतो.

ह्या निरनिराळ्या ग्रंथांच्या आधारांवरून भारतीय नाट्यवाङ्मयाची बरोबर कल्पना करितां येण्यासारखी माहिती मिळेल व प्रकृत उद्देशास त्याचा पुरेसा उपयोग होईल असें मानण्यास हरकत नाहीं.

येत आहे.' हें ऐकून व पाहून सर्वांनाच आनंद झाला. मालती चांगली शुद्धीवर आली. तिचें सर्वांनीं अभिनंदन केलें. तिनें उठून कामंदकीला नमस्कार केला. तिनें तिला उचलून पोटाशीं धरून ह्मटलें–' ये ये, मला कडकडून भेट व आपल्या शीतल शरीरस्पर्शानें माझें अंग निवीव, आणि या सर्वांनाही आलिंगन देऊन हर्षित कर.' माधव ह्मणाला, ' गड्या मकरंदा, आतां हा जीवलोक कांहींसा बरा वाटूं लागला नव्हे ?' मकरंद ह्मणाला, ' यांत काय संशय ?' नंतर मालती दोघींनाही भेटली.

कामंदकी ह्मणाली, ' मुलांनों, हें झालें तरी काय ?' त्यांनीं सांगितलें, ' हा सर्व कपालकुंडलेच्या कोपाचा सपाटा; त्या तडाक्यांतून आपणा सर्वांना या आर्येनें वांचविलें.' तेव्हां कामंदकी ह्मणाली, ' अघोरघंटाच्या वधाचा सूड उगविण्याचें हें सर्व कौटाळ तर मग ?' त्यावर मदयंतिका ह्मणाली, ' वरचेवर अनर्थपरंपरा येऊनही अखेर शेवट गोड झाला ही दैवी कृपाच ह्मणावयाची.' इतक्यांत सौदामिनी येऊन पोहोंचली व तिनें कामंदकीला नमस्कार करून ह्मटलें, ' भगवती कामंदकी, ही आपली पूर्व शिष्यीण–आपल्याला नमस्कार करिते बरें.' कामंदकी तिला पाहून ह्मणाली, ' अग बाई, ही तर आपली सौदामिनी !'

हें ऐकून माधव व मकरंद ह्मणाले, ' काय या भगवतीची प्रिय शिष्या भगवती सौदामिनी !' तरीच–आतां सर्व कांहीं ठीक जुळलें.'

कामंदकी ह्मणाली, ' भूरिवसूला जीवदान देण्याचें पुण्य सांठविणारे प्रियसखी, ये मला भेट. फार दिवसांनीं पुनः दृष्टीस पडलीस. मला मोठा आनंद झाला–तरी आलिंगन देऊन माझ्या शरीराला सुख दे, तुझे नमस्कार पुरेत.

बोधिसत्वाहूनही अधिक अद्भुत व विलक्षण सिद्धि प्राप्त करून. घेणारी तूंच खरोखर वंद्य. तुझ्या पूर्वपरिचयरूपी बीजाचें आज हें किती उत्तम फल निदर्शनास आलें !'

तिला पाहून मदयंतिका व लवंगिका यांनीं ह्मटलें, ' अग बाई ! त्या आर्या सौदामिनी याच का ? '

त्यांना मालतीनें उत्तर दिलें, ' होय. यांनींच भगवतीच्या स्नेहानें कपालकुंडलेची निर्भत्सना करून मला आपल्या मठांत नेलें व तेथें माझें त्यांच्याहूनही अधिक प्रेमानें संगोपन केलें, आणि ती बकुलमाला खुणेसाठीं घेऊन ऐन वेळेवर येऊन सर्वांचे प्राण वांचविले. त्याच या सर्वांना जीवदान देणाऱ्या सौदामिनी !' यावर त्या दोघींनीही–' वाः यांचे आह्मां सर्वांवर मोठेच उपकार झाले ' असें ह्मटलें.

नंतर माधव व मकरंद ह्मणाले, ' काय चमत्कार आहे–प्रत्यक्ष चिंतामणिरत्नापासून फल प्राप्त होण्याला चिंतारूपी परिश्रम पडतात, पण हें तर केवळ अकल्पित काम झालें.'

याप्रमाणें सर्वांनीं अनुक्रमें सौदामिनीचे आभार मानिले. हें पाहून ती मनांत ह्मणाली ' हें या सर्वांचें सौजन्य पाहून मला तर लाज वाटते.' ती कामंदकीला ह्मणाली, ' पद्मावतीच्या राजानें आनंदानें नंदनाच्या प्रार्थनेला मान देऊन भूरिवसूच्या समक्ष हें माधवाच्या नांवाचें पत्र लिहून दिलें आहे.

तें पत्र कामंदकीनें घेऊन वाचलें. त्यांत लिहिलें होतें कीं, ' हे माधवा, तू श्लाघ्य व गुणीजनांमध्यें श्रेष्ठ व कुलीन आहेस. तुजवर आलेली

१ बुद्धाचें पूर्वरूप–ही एक बौद्ध धर्मांतील अवतारासंबंधें कल्पना आहे.

मोठमोठीं संकटें नाहींशीं झालीं. तुजसारखा जांवई मिळाल्यानें मला मोठा आनंद झाला. याकरितां आह्मी मदयंतिका–जिनें प्रेमानें प्रथमच त्याला वरिलें आहे अशा तुझ्या प्रिय मित्रा मकरंदाला देतों. ही आमची आज्ञा आहे.' हें ऐकून माधव उल्हासानें ह्मणाला, 'मित्रा ऐक!' त्यानें उत्तर दिलें, 'हो ऐकिलें; आज मी सर्वतऱ्हेनें कृतार्थ झालों.' त्यावर मालती ह्मणाली, 'वा: फार चांगलें झालें. मनांत मोठी भीति होती ती नाहींशी झाली.' लवंगिका ह्मणाली, 'आतां तर श्रीमाधव व मालती यांच्या मनोरथवृक्षाला अधिकच बहार आली.' हें बोलणें चाललें आहे तों अवलोकिता, बुद्धरक्षिता व कलहंस आनंदानें नाचत बागडत तिकडेच आले. त्यांनीं बरेच वेळ आनंदानें नृत्य करून कामंदकीला प्रणाम केला व बाकीच्यांचें अभिनंदन केलें.

त्यांची ती स्थिति पाहून लवंगिका ह्मणाली, 'अशा रीतीनें सर्व मनोरथ परिपूर्ण झालेल्या आनंदमहोत्सवाच्या वेळीं कोणाला नाचावें बागडावें असें वाटणार नाहीं!' त्यावर कामंदकी ह्मणाली, 'खरेंच, असें विचित्र, रमणीय व उज्ज्वल प्रकरण दुसरें कोठें असेल का?!' हें ऐकून सौदामिनी ह्मणाली, 'यांत विशेष रमणीय हें कीं, अमात्य भूरिवसू व देवरात यांनीं पूर्वीं केलेली अपत्यसंबंधाविषयींची प्रतिज्ञा शेवटास गेली.' हें तिचें बोलणें मालती, माधव, व मकरंद यांच्या लक्षांत येईना. ते ह्मणाले, 'वास्तविक प्रकार निराळाच झाला आणि या असें ह्मणतात, हें कसें?' तसेंच लवंगिकेनें कामंदकीला हळूच ह्मटलें, 'कांहो, हें कसें.?'

त्यांचे ते प्रश्न ऐकून कामंदकीला कौतुक वाटलें. आतां मदयंतिका व मकरंद यांच्या लग्नाविषयीं कांहीं शंका राहिली नाहीं. तेव्हां खरा प्रकार सांगण्याला कांहीं हरकत नाहीं असें पाहून ती ह्मणाली, 'अरे, सौदामिनी ह्मणते तें खोटें नाहीं. आह्मी श्रावकावस्थेंत असतांना, आह्मां दोघींच्या समक्ष भूरिवसू व देवरात यांनीं अपत्यसंबंध करण्याची प्रतिज्ञा केली होती. मोठ्या लोकांच्या नाराजीच्या भीतीनें त्याला अडथळा आला होता. तो या अशा प्रकारानें नाहींसा केला.'

हें ऐकून सर्वांना चमत्कार व आनंद वाटला, व माधव व मकरंद यांनीं कामंदकीच्या या विलक्षण कुटिल पण कुशलपरिणामी नीतीची व शहाणपणाची मोठी तारीफ केली.

त्यांना कामंदकी ह्मणाली, 'वत्सांनो, पूर्वींच तुह्मी मनानें एकमेकांस वरिलें होतें. त्यांत बरींच संकटें आलीं. तीं सर्व तुमच्या पुण्याईनें व आमच्या प्रयत्नानें निवारण होऊन तुमचे मनोरथ सफल झाले. व तुह्मांला प्रियकर वधू वर प्राप्त झाले. शिवाय राजा व नंदन हेही प्रसन्न झाले. आतां तुमचें आणखी कोणचें प्रिय व्हावें?'

त्यावर त्यांनीं सर्वांच्या तर्फेनें ह्मटलें, 'याहूनही अधिक प्रिय तें काय असणार? तरी—

संतलोक सर्व पापांपासून मुक्त होत्साते निरंतर पुण्यवान असोत; राजे नेहमीं धर्मन्यायानें वागून पृथ्वीचें पालन करोत; मेघ वेळेवर व विपुल पर्जन्यवृष्टि करोत, व व्यापाराच्या वस्तु पुष्कळ आणि चांगल्या उत्पन्न करोत; व सर्व प्रजाजन, आप्त, इष्ट व बांधवजन यांच्याशीं उत्तम प्रेमानें व आनंदानें नांदोत'–असें शास्त्रोक्त भरतवाक्याच्या रूपानें सर्वांविषयीं आशीर्वाद मागि-

तले. त्यावर, ' बरें तथास्तु ' असें ह्मणून सर्व निघून गेले.

या अंकांत पाल्हाळाची व द्विरुक्तीची कमाल आहे. थोडक्यांत चमत्कारिक व आनंददायक अशा रीतीनें पात्रांचीं भाषणें व भाषणांची सांगड घालण्याची हातोटी भवभूतीला मुळींच साधली नव्हती असें स्पष्ट दिसतें. हें नाटक जितकें पाल्हाळिक लिहिलें आहे त्याच स्थितींत प्रत्यक्ष भवभूतीच्या हयातींत तरी त्याचा कधीं प्रयोग झाला होता किंवा नाहीं याची शंकाच आहे. रंगभूमीवर प्रयोग करण्याला हें नाटक फारच कंटाळवाणें आहे. तें ज्या मानानें लांबलचक आहे त्या मानानें त्याच्यांत संविधानकाचें वैचित्र्य किंवा प्रेक्षकांचीं मनें आकर्षण करून ठेवण्याचा गुण मुळींच नाहीं. या संबंधानें मृच्छकटिक नाटक याच्यापेक्षां कितीतरी चांगलें आहे. कालिदासाच्या नाटकांशीं याची मुळींच तुलना करितां येत नाहीं. त्या नाटकांतील तीं मार्मिक, गंभीर, नीटनेटकीं, लहान लहान व मुद्देसूद भाषणें कोणीकडे; आणि यांतील दूरान्वित, समासयुक्त, एकाही पात्रास न शोभणारीं, द्विरुक्तिप्रचुर व फाजील वर्णनपर भाषणें किंबहुना परिष्कार कोणीकडे ! कथानक किंवा संविधानक पुढें कसें काय आहे याविषयीं कालिदासाच्या नाटकांत फारच थोडा पत्ता लागतो व तें जाणण्याविषयीं क्षणोक्षणीं उत्कंठा व कौतुक वाढत जातें. या नाटकांत तसा प्रकार मुळींच नाहीं. प्रत्येक पात्र रंगभूमीवर येतांच जणों प्रस्तुत व अप्रस्तुत भागांविषयीं जसें व्याख्यान देत सुटतें ! यामुळें पुढील भाग केवळ द्विरुक्तीसारखा वाटूं लागतो व त्यांतही अर्थगांभिर्यादिक गुणांचा बहुतेक अभावच असल्यानें पुष्कळसा भाग गाळावा-निदान भरा भरा वाचून टाकून पुढें जावें-अशी मनाची साहजिक प्रवृत्ति होते. कालिदासाच्या नाटकांतील एखादें पान, किंवा एखादें भाषण, किंवा एखादा श्लोक, किंबहुना दोन चार शब्द गाळतां येतील असा भाग क्वचितच सांपडेल. पण या नाटकांतील अंकाचे अंक व पानाचीं पानें गाळलीं तरी वावगें होणार नाहीं इतकेंच नाहीं, तर असें केल्यानें उलटें विशेष चांगलें होणार नाहीं, असें कोण ह्मणेल ?

या नाटकाची विशेष ख्याती झाली आहे ती त्याच्यांत जागजागीं सृष्टिचमत्कारांचें किंवा सृष्टिसौंदर्याचें व मनोविकारांचें वर्णन केलेलें आहे त्यावरूनच झाली असावी असें दिसतें. पण हें वर्णनही विशेष वर्णनीय नाहीं. शाब्दिक वर्णनापेक्षां शब्दाच्या योजनेपासून मनांत येणारी त्या त्या विषयाची कल्पना जितके पटीनें अधिक असेल, तितकें तें वर्णन अधिक चांगलें. या कसोटीनें पाहतां हें वर्णन कमी योग्यतेचें ठरतें. व्यवहारज्ञान, लोकसमाजांतील सामान्य भाषणप्रकाराची खुबी व वैचित्र्य, या सर्व गोष्टींच्या संबंधाचें ज्ञान भवभूतीला निदान मालतीमाधव लिहिलें त्या वेळीं तरी कालिदासाहून फार कमी होतें. या मुळेंच त्याचें हें नाटक तितकें लोकप्रिय झालेलें नाहीं. त्याच्यांत कृत्रिमपणा अधिक असून ओढून ताणून चांगुलपणा आणण्याचा प्रयत्न केलेला आहे.

भवभूतीच्या कालनिर्णयासंबंधानें पूर्वी बरेंच वर्णन केलेलें आहे. त्याशिवाय राजतरंगिणीवरून आणखी माहिती उपलब्ध झालेली आहे. ती अशी कीं, कनोजचा राजा यशोवर्मा याच्या पदरीं भवभूति हा होता व काश्मीरचा राजा ललितादित्य यानें यशोवर्म्याचा पराभव केल्यावर भव-

भूति ललितादित्याबरोबर काश्मीरास गेला होता. ललितादित्याचा काळ इसवी सनाच्या आठव्या शतकाच्या आरंभी निर्णित झालेला आहे. तसेंच आमच्या संग्रहीं मालतीमाधवाची फार प्राचीन हस्तलिखित प्रत सुमारें ४०० वर्षांची होती. तिच्यांत, साहाव्या अंकाच्या शेवटीं, 'इतिश्री, भट्टकुमारिल शिष्य भट्ट भवभूति कृते मालतीमाधवे षष्ठोंकः, असें लिहिलें होतें. कुमारिल भट्ट शंकराचार्यांच्या पूर्वीं थोडीं वर्षें होऊन गेले. शंकराचार्य आठव्या शतकांत होऊन गेले, असें ठरलें आहे. यावरूनही भवभूति सातव्या शतकाच्या अखेरीस व आठव्या शतकाच्या आरंभीं होता असें ह्मणतां येतें. ग्रंथरचनेच्या मानानें व कथेंतील वर्णन केलेल्या सामाजिक निकृष्टस्थितीच्या मानानें, दंडी भवभूतीपेक्षां मागून झाला असावा असें मागें ह्मटलें आहे; पण दंडी बाणभट्टाच्याही पूर्वीं झाल्याचें व बाणभट्ट साहव्या शतकाच्या सुमारास होऊन गेल्याचें स्वतंत्र परदेशस्थ ग्रंथकारांच्या लेखांवरून ठरलें आहे. भवभूतीनें दंडी, बाण किंवा भारवी यांच्या विषयीं उल्लेख कोठेंही केलेला नाहीं याचें आश्चर्य वाटतें. कालिदासकृत ग्रंथांचें चांगलें परिशीलन करून त्यानें मालतीमाधव लिहिलें यांत मुळींच शंका नाहीं, पण त्याच्या नांवाचा त्यानें कोठेंही उल्लेख केलेला नाहीं.

भवभूति कनोज येथें राहत होता हें खरें धरलें तर, पहिल्या अंकांत व पुढेंही दर्शविल्याप्रमाणें कालप्रियनाथाचें स्थान ह्मणजे काल्पी यथील्च एखादें शिवालय असावें असें ह्मटलें आहे त्याला बरीच बळकटी येते. काल्पी कनोजहून जवळच आहे. तेथें पूर्वीं मोठी यात्रा भरत असावी. भवभूतीनें सिंधू, पारा, लवणा, मधुमती, सुवर्णबिंदू व पद्मावती वगैरेचें जसें तपशीलवार वर्णन केलें आहे तसें त्याचें गोदावरीच्या प्रांतभागाचें वर्णन विशेष तपशीलवार व वास्तविक नाहीं. यावरून त्यानें गोदावरीच्या आसमंतातचा प्रदेश प्रत्यक्ष पाहिलेला नव्हता, व पद्मावतीच्या आसपासचा प्रदेश उत्तम तऱ्हेनें पाहिलेला होता, असें दिसतें. विदर्भदेशांत पद्मावती असल्याचें वर्णन केलेलें आहे त्यासंबंधानें मात्र थोडासा विचार आहे—पण कांहीं कांहीं प्रतींत 'अस्ति दक्षिणापथे पद्मपुरं नाम नगरं' एवढेंच लिहिलें आहे. 'विदर्भेषु' हें पद मुळींच नाहीं. तसेंच महावीरचरिताच्या कांहीं प्रतींतही असाच पाठ आढळतो. यावरून कदाचित् हें पद प्रक्षिप्त असावें असेंही ह्मणतां येईल. विदर्भ ह्मणजे वऱ्हाड देश धरला तर त्यांत पद्मपुर, सिंधु, पारा, लवणा, मधुमती वगैरेचा आजवर मुळींच पत्ता लागला नाहीं, व लागेल असा संभवही नाहीं.

पद्मपूर व पद्मावती हीं दोन निराळीं शहरें, एक वऱ्हाडांत व दुसरें नरवरा जवळ, अशीं होतीं, असें मानून या शंकेचें समाधान बऱ्याच अंशानें होऊं शकतें.

या नाटकाच्या कथेचें संविधानक गुणाढ्याच्या बृहत्कथेवरून किंवा सोमदेवाच्या कथासरित्सागरांतील ३६ व्या उच्छ्वासांतील कथेवरून भवभूतीनें घेतलें असावें असें संभवतें. बहुतेक संस्कृत नाटकें व प्रकरणें यांना मूळ पौराणिक किंवा कथासरित्सागराचा—निदान संविधानकापुरता तरी आधार असल्याचें आढळून येतें. बृहत्कथेचा कर्ता गुणाढ्य भवभूतीच्या पूर्वीं पुष्कळ वर्षें होऊन गेला होता.

Printed at the "Ganpat Krishnaji" Press, Bombay, 8-2-1900

# विविधज्ञानविस्तार.

हें पुस्तक प्रतिमासास एकदां निघतें. यांत शास्त्रीय विषय; स्त्रियांकरितां मनोरंजक व सन्मार्गवर्ती गोष्टी; रूपकें; कविता; विद्यार्थ्यांकरितां अन्यभाषांची माहिती, व भाषान्तरें; इतिहास; देशज्ञान; विख्यात पुरुषांचीं चरित्रें; आरोग्यरक्षणार्थ सूचना; नवीन पुस्तकांवर टीका; नीतिवादाचे निबंध; इत्यादिक विषयांचा संग्रह अवकाशानुसार होत असतो.

या पुस्तकांत प्रसिद्ध करण्याकरितां सदरील विषयांवर कोणी लेख पाठविले तर, पसंत पडल्यास, त्यांस अवश्य स्थळ मिळेल.

**या पुस्तकाची किंमत.**

वर्षाची आगाऊ..........रुपये ३.
सहामाही आगाऊ........रुपये २.
फुटकळ दर प्रतीस........आणे ६.
टपाल हांशील वर्षाचें......आणे ६.

वर्गणीदारांनीं आगाऊ वर्गणी आरंभापासून दोन महिन्यांचे आंतच पाठविण्याची मेहरबानी [illegible] नतर दरसाल साडेचार रुपयांप्रमाणें त्यांकडे किंमत मागावी लागेल.

या पुस्तकाविषयीं हरएक प्रकरणीं पत्रव्यवहार, मुंबईत फणसवाडींत अग्निहोत्र्यांच्या वाड्यासमोर, अथवा काळबादेवीचे रस्त्यावर नंबर १ च्या घरांत "**म्यानेजर, विविधज्ञानविस्तार**" या पत्त्यावर ठेवावा. **नाटपेड** पत्र घेतले जाणार नाहीं.

॥ श्रीः ॥

# विविधज्ञानविस्तार.

A MONTHLY MAGAZINE

OF

MARATHI LITERATURE

FOR

Ladies and Gentlemen.

कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरितां.

पुस्तक ३०. डिसेंबर १८९९. अंक १२.

अनुक्रमणिका.



मुंबईत

गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत छापिलें.

वर्षाची वर्गणी रुपये ३; टपालखर्च आणे ६.

# साल-अखेर.



विविधज्ञानविस्ताराची नवीन व्यवस्था सुरू झाल्यास दोन वर्षें झालीं. दुसऱ्या वर्षाचा हा शेवटला अंक आश्रयदात्यांच्या हातीं जात आहे. ही लोकसेवा निर्विघ्नपणें करण्यास ज्या सर्वसमर्थ प्रभूनें आह्मांस सामर्थ्य दिलें त्याचे अनन्यभावें उपकार स्मरून, सालाबादप्रमाणें येथें दोन शब्द लिहिण्याची परवानगी घेतों.

विविधज्ञानविस्तारास अनियमितपणाचा जो बरेच वर्षांपासून डाग लागला आहे तो अझून आमच्या हातून साफ पुसून जात नाहीं, याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करणें अवश्य आहे. परंतु प्लेगमुळें मुंबईंत जी धांदल उडून गेली आहे ती लक्षांत आणून, तसेंच पूर्वीपेक्षां या पुस्तकास १६ पृष्ठांची भर पडली आहे या गोष्टीकडेही किंचित् नजर दिल्यास, या वेलातिक्रमाबद्दल आमच्यावर आमचे आश्रयदाते विशेष रुष्ट होणार नाहींत अशी आशा आहे.

या वर्षीं रा० रा० माधवराव व्यंकटेश लेले, बी. ए. एल्. सी. ई. यांचा "मालतीमाधवसार व विचार" हा विषय पुरा झाला. येत्या वर्षीं त्याच धर्तीवर त्यांनीं महावीरचरिताचें सार आणि त्यावर विचार लिहिले आहेत, त्यांस स्थल दिलें जाईल. अर्थात् गेल्या सालीं ८ पृष्ठांची जी अल्पकालिक ह्मणून या पुस्तकास भर घातली ती या सालींही कायम असणार. याबद्दल आमच्या वाचकवर्गावरच रा० लेले यांचे बहुतांशीं उपकार आहेत. विविधज्ञानविस्ताराच्या अभिमानी मंडळानें मनांत आणल्यास, आह्मास अधिक वर्गणीदार मिळून, ही अल्पकालिक व्यवस्था चिरकालिक होण्याचा संभव आहे हें सांगावयास नकोच.

या सालांत प्रसिद्ध झालेल्या विषयांची अनुक्रमणिका आणि लेखकांची नांवनिशी येत्या अंकानंतर रवाना करण्यांत येईल; त्यावरून प्रस्तुत पुस्तकाची उपयुक्तता वाढविण्यासाठीं संपादकांकडून जे प्रयत्न झाले त्यांची वाचकांस कल्पना होईल. "फिरंग्यांची आलीकडील हकीगत" हा मोठा उपयुक्त ऐतिहासिक विषय आहे. तथापि तो लौकर संपणारा नसल्यामुळें, फिरंग्यांस गोव्यांपर्यंत आणून सोडून तूर्त त्या विषयास मोठ्या दिलगिरीनें रजा दिली आहे. रावसाहेब मंडलिक यांचें चरित्र येत्या सालीं पुरें होईल. त्याचप्रमाणें दुसरेही अपुरे असलेले विषय येत्यासालीं पुरे करण्यासाठीं होण्यासारखा असेल तो प्रयत्न करण्यांत येईल. कित्येक लेखकांचा, विषय सुरू करतेवेळीं जो उत्साह असतो तो जर अखेरपर्यंत टिकेल तर मोठी बहारीची गोष्ट होईल.

कुलस्त्रियांस हें पुस्तक ज्यास्त प्रिय होण्यासारखी या वर्षापासून व्यवस्था केली आहे हें सांगण्याची गरज आहे असें नाहीं. या कामीं आह्मांस श्री० सौभाग्यवती काशीबाई कानिटकर यांच्याकडून जें साह्य मिळालें त्याचा येथें आभारपूर्वक उल्लेख करणें योग्य आहे. येत्या अंकांत त्यांची "चांदण्यांतील गप्पा" या सदराखालील तिसरी गोष्ट "वनवास" ही प्रसिद्ध होईल.

येत्या सालची एक विशेष व्यवस्था येथें कळविणें अवश्य आहे. लोकांची संगीत नाटकांवर

श्री.

# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ३०. अंक १२.

## आईची थोरवी व तिचीं कर्तव्यें.

### भाग पहिला.

[ मागील अंकावरून समाप्त. ]

परंतु सारासार विचार न करितां मूल मागेल तें फाजील लडिवाळपणानें देत सुटणाऱ्या, किंवा मुलानें त्यांच्यापाशीं योग्य अथवा साजेशीच वस्तु मागितली असतां त्यांच्या पुढें नन्नाचा पाढा वाचून त्यांस वारंवार हिरमुसलें तोंड करण्यास लावणाऱ्या आयांस काय म्हणावें? अति लाड किंवा अति धाक हे दोन्ही सारखेच अनर्थकारक आहेत. दुसऱ्या कांहीं आया अशा असतात कीं मुलांची प्रकृति कशामुळें बिघडते याचें धोरण मनांत न आणितां व त्याबद्दल नीटसा विचार न करितां, या देवास नवस कर, त्या देवास नवस कर, अमूक काशीचा कापडी भूत भविष्य जाणतो असें भोळसरपणानें मानून त्याच्या भजनीं लाग, असा क्रम त्या सुरू ठेवितात; त्यामुळें बिचाऱ्या फसतात. दुसऱ्या कांहीं अशा असतात कीं, घरांतील संसारसंबंधीं काम आटोपलें न आटोपलें इतक्यांतच याच्या घरून त्याच्या घरीं, त्याच्या घरून याच्या घरीं, विनाकारण भटकत असतात; व ज्या वेळांत पुष्कळ उपयुक्त गोष्टी करितां येतील, त्या करण्याचा यत्न न करितां वेळेचा व्यर्थ दुरुपयोग करितात. तसेंच, बरेंच वय झाल्यावरही आपण पोक्त न दिसतां नेहमीं नवयौवनसंपन्नच दिसावें, म्हणून नटण्याथटण्यांतच व्यर्थ काळाची हानि करितात. त्याचप्रमाणें कित्येक आया अशा लहरी व तब्यतखोर असतात कीं, एखाद वेळ मुलांचे अति लाड करून त्यास डोक्यावर बसवितात, व एखादवेळीं ती लहर गेल्यावर त्यांच्याकडून थोडासा अपराध होतांच त्यास बडवून बडवून बेदम करितात. कित्येक आयांची समजूत तर अशी असते कीं, मुलांच्या मनावर नीतितत्त्व बिंबविणें किंवा धर्मांकडे त्यांच्या मनाचा लय लावणें हें आपलें कर्तव्य नाहीं; ह्मणून या बाबतींत त्या अतिशयच बेफिकीर असतात. वेळ व प्रसंग कोणताही असो, तिकडे लक्ष न देतां व कोणाचीही सोय न बघतां, घरांतील शांतता नाहींशी झाली तरी हरकत नाहीं, पण आपल्या तब्यतीप्रमाणें किंवा आपण घालून दिलेल्या शिस्तीप्रमाणें गृहकृत्यें झालींच पाहिजेत, नाहींतर, सर्व धाबें दणाणलेंच,—अशा हेकेखोर आईपासून कोणत्याही घरांतील माणसांस कधींही सुख

व्हावयाचें नाहीं. आपणास व इतरांस त्रास झाला तरी तिकडे लक्ष न देतां व सारासार विचार न पाहतां घरांतली सर्व वस्तुस्थिति घड्याळाच्या नियमितपणानें सारखी चाललीच पाहिजे, त्यांत यत्किंचित् फेरफार होतां कामा नये, ह्मणून दुराग्रह धरून बसणारी आई कुटुंबप्रेम व गृहसौख्य यांची कट्टी शत्रु होय. उलटपक्षीं, जेणेंकरून घरांतलीं सर्व कामें यथास्थित चालून सर्वांस सुख होईल व गृहशोभा वाढेल अशी सुव्यवस्था न ठेवतां जी आई प्रत्येक गोष्ट अवेळीं करिते, जिच्या व्यवस्थेंत प्रत्येक वस्तूस नेमलेलें ठिकाण कधींच नसतें, व कशास कांहींच मेळ न दिसतां सर्वत्र गोंधळ व घोंटाळा दिसतो, अशी आईसुद्धां वर निर्दिष्ट केलेल्या वर्गांतच गणली जाते.

कित्येकांची अशी समजूत असते कीं, स्त्रियांना कलाकौशल्य, शास्त्रीय विषय किंवा विद्येच्या कोणत्याही इतर शाखा यांसंबंधीं शिक्षण मिळून त्यांत त्या निपुण झाल्या असतां आईचीं कामें यथायोग्य रीतीनें त्यांस करितां येणार नाहींत. परंतु हें मत बरोबर दिसत नाहीं. मातृत्व व सुशिक्षण या न जुळणाऱ्या किंवा विरोधी गोष्टी नाहींत. इतकेंच नाहीं, तर सारख्या स्थितींतील स्त्रियांपैकीं सुशिक्षित स्त्रीलाच आईचीं कामें अडाणी स्त्रीपेक्षां चांगल्या रीतीनें करितां येतील. कारण, मातृवात्सल्यानें बुद्धिमत्ता ऱ्हास न पावतां ती उलटी वृद्धिंगत होते, हें ज्या देशांत स्त्रीशिक्षणाचा बराच प्रसार झाला आहे, त्या देशांतल्या कांहीं स्त्रियांच्या उदाहरणांनीं दाखवितां येईल. ज्याप्रमाणें मातृपद प्राप्त झाल्यावर स्त्रियांचा भेकडपणा नाहींसा होऊन त्यांच्या अंगीं बरेंच धैर्य येतें, त्याचप्रमाणें तें पद प्राप्त झाल्यावर त्यांच्या मानसिक शक्तींचा सांठा बाहेर पडूं लागतो. आपल्या मुलांस स्वतः शिकवितां यावें ह्मणून ज्या आयांनीं निरनिराळ्या भाषांचें अध्ययन केलें व निरनिराळ्या शास्त्रांत प्राविण्य संपादून आपला इष्ट हेतु तडीस नेला, अशा आयांचीं उदाहरणें पाश्चिमात्य देशांत किती तरी सांपडतील ! व अशा सुशिक्षित आयांच्या निरीक्षणाखालीं तयार झालेल्या मंडळींतून किती तरी कवि, तसेच चितारी, शिल्पशास्त्रवेत्ते, व संगीतकलापटु निर्माण झाले आहेत !

अपत्यांविषयीं आईबापाला मनापासून वाटणाऱ्या कळकळीपासून किती इष्ट परिणाम होतो हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. स्वापत्यांबद्दल त्यांच्या अंतर्यामीं ज्या मानानें कळकळ वाटत असेल, त्या मानानें त्यांचें हृद्गत त्यांस कळतें. अशी कळकळ नसेल तर मुलांचें हृद्गत त्यांस कधींच कळावयाचें नाहीं व त्यांस त्यांच्यासंबंधीं खरें ज्ञानही व्हावयाचें नाहीं. मुलांचें असें हृद्गत कळल्यावांचून व खरें ज्ञान झाल्यावांचून, त्यांस नीटसें शिक्षण देतां येण्याचा किंवा त्यांचें संगोपन व्हावयास पाहिजे आहे तसें होण्याचा संभव नसतो. वनस्पतिशास्त्रवेत्ता त्या त्या वनस्पतीचे गुणधर्म फार काळजीपूर्वक पूर्णपणें लक्षांत आणितो व नंतर तीस कोणती जमीन, किती ओलावा, किती हवा, किती उजेड पाहिजे हें त्या मानानें ठरवितो; तोच नियम मुलांच्या शिक्षणास व संगोपनास लागू आहे. त्यांच्या मनांच्या कलांचें व त्यांच्या स्वभावाचें बारिक रीतीनें व पूर्णपणें निरीक्षण करून त्यांचा कशांत कमीपणा आहे व ते कशांत जास्ती आहेत हें पूर्ण लक्षांत आणिलें, व कोणत्या गोष्टींत त्यांना मदत लागते व कोणत्या गोष्टींत मदतीवांचून त्यांचें चालेल

याचा विचार नीट ठरविला, तरच त्यांना योग्य शिक्षण आपणास देतां येईल. एरव्हीं देतां येणार नाहीं. अशा रीतीनें त्यांचा शिक्षणक्रम सुरू झाला असतां त्यांच्या बुद्धीचा अपव्यय होण्याची व उत्साहवृत्ति भलत्याच मार्गाकडे वळून तिचा व्यर्थ खर्च होण्याची भीति रहात नाहीं.

बाल्यावस्थेंत मुलांबद्दल आईची कळकळ कमी असली तर त्यांचा आयुष्यक्रम कष्टप्रद होतो. एकदां एका मुलानें आपल्या पाटीवर एक ओबडधोबड चित्र काढिलें व तें नेऊन आपल्या आईस दाखविलें. वर वर पाहणारास यांत कांहींच खुबी दिसण्यासारखी नव्हती, पण मार्मिकतेनें पाहणारास त्यांत प्रत्येक प्रकारची खुबी दिसून येण्यासारखी होती. आईनें तें पाहतांच ती पाटी एकीकडे टाकून दिली, व कपाळास आंठ्या घालून तिरस्कारानें त्याच्यावर रागावून त्यास ह्मटलें—'कायरे, असें चिरखडण्यांत वेळ कां घालवितोस ?' मुलानें हलकेंच उत्तर दिलें, " आई मी हा एका मोठ्या टेंकडीवरचा एक किल्ला काढला आहे. त्याच्या निरनिराळ्या बुरूजांवर पताका व निशाणें फडकताहेत हें तूं पाहिलेंस काय ? तसेंच, त्यावर सरदारलोक कसे उभे आहेत, हें तुला दिसलेंच नाहीं वाटतें. " " मला चिरखडण्यावांचून नाहीं कांहीं त्यांत दिसत ! जा पाटी घेऊन आणि धडा करीत बस आपला ! " असें आईनें मोठ्या त्वेषानें त्यास सांगितलें. बिचारें मूल ! तोंड हिरमुसलें करून व अति कष्टी होऊन लांब कोपऱ्यांत जाऊन अगदीं निरुत्साह होऊन बसलें ! त्याच्या मनांतील विचारतरंग व कल्पनाशक्ति त्या आईला ( बुद्धि नसल्यामुळें नव्हे, तर केवळ कळकळीचा कमीपणा असल्यामुळें ) जाणतां आली नाहीं. त्या मुलानें आपल्या मनांत कल्पिलेला तो किल्ला, त्याचे ते निरनिराळे बुरूज, ते दरवाजे, त्यावरील तें सरदारमंडळ, त्यावरचीं तीं फडकणारीं निशाणें, ते अश्वारूढ स्वार, इत्यादि गोष्टींचा चट सारा देखावा त्या आईच्या नीरस डोळ्यांस केवळ ओबड धोबड दिसला !! त्या आईनें त्या मुलास न दडवितां, त्यास निराश न करितां, तें चित्र नीट पाहून त्यांत कळकळीनें मन घातलें असतें, तर त्या मुलास जास्ती चांगलें चित्र काढून आईस केव्हां दाखवूं व शाबासकी केव्हां मिळवूं असें वाटून जास्त उमेद आली असती, व त्याच्या आंगच्या उत्साहाचा अंकूर जागच्या जागींच चिरडून गेला नसता.

प्रत्येक कुटुंबांत चांगलें वळण, सुव्यवस्था व पद्धत ह्या गोष्टी असल्याच पाहिजेत. त्याचप्रमाणें प्रत्येक गोष्ट करण्याची वेळ व वस्तु ठेवण्याची जागाही ठरलेली पाहिजे. तसेंच त्यांत आज्ञाही होत गेल्या पाहिजेत, व त्या पाळल्याही गेल्या पाहिजेत. परंतु हा सर्व प्रकार यथास्थित घडून येण्यास एका महत्वाच्या गोष्टीची फार फार जरूरी असते. ती नसली तर सर्वच फिक्कें पडतें व मनाप्रमाणें कांहींच घडून येत नाहीं. ही गोष्ट कोणती ह्मणाल तर कळकळ होय. आईबापांनीं व मुलांनीं एकमेकांच्या अंत:करणांतील वृत्तींचा आदर करण्यास शिकलें पाहिजे. मुलांनीं आईबापांवर नि:सीम विश्वास ठेवण्यास शिकलें पाहिजे, व आईबापांनीं त्यांच्या विश्वासास स्वतां पूर्णपणें पात्र होण्यास झटलें पाहिजे. लहान मुलांचा विश्वास बसवून घेणें; त्यांच्या लहानपणच्या इच्छा व उमेदी यांचें निरीक्षण करून त्या लक्षांत आणणें; त्यांच्या

मनांतील आशा, त्यांच्या चिंता, त्यांचीं सुख-दुःखें जाणणें; दिवसानुदिवस उमलत जाणाऱ्या व आपलें निर्मल स्वरूप प्रकट करणाऱ्या या बाल-पुष्पाच्या नूतन पाकळ्यांचा विकास कसकसा होत चालला आहे हें पाहत जाणें;–ह्या गोष्टी कमी महत्वाच्या नाहींत. हे आई ! तुझ्या मनांत अपत्यांबद्दल खरी कळकळ व आस्था नसेल, तर त्यांच्या विचारांस चांगलें वळण तुला कसें लावितां येईल ? त्यांच्या उमेदींस व इच्छांस योग्य दिशा लावून त्या दृढ कशा करितां येतील ? तारुण्यांतील पाहिजे तिकडे जोरानें वाहत जाणाऱ्या त्यांच्या मनोवृत्ति मर्यादित करून त्यांचा ओघ योग्य दिशेकडे कसा वळवितां येईल ? व त्यांच्या मनांत थोर हेतूंची प्रेरणा कशी करितां येईल ?

सरते शेवटीं "आनुवंशिक संस्कार आणि हिंदुस्थानची पुनर्धारणा* " या विषयावर एका विद्वान् गृहस्थानें दिलेल्या व्याख्यानांतील कांहीं ठळक ठळक गोष्टी वाचकांच्या मननासाठीं त्यांच्या पुढें ठेवून व त्यांत किती ग्राह्यांश आहे हें विचारानें ठरविण्याचें काम त्यांच्यावरच सोंपवून हा भाग संपवितों:–

कित्येक शारीरशास्त्रज्ञांचें असें मत आहे कीं, मुलीमध्यें बापाची प्रकृति जास्त उतरते, व मुलामध्यें आईची प्रकृति जास्त येते. पुष्कळ मोठमोठ्या नामांकित गृहस्थांचे मुलगे त्यांच्या तोडीचे न बनतां अगदींच साधारण निपजतात. ही गोष्ट वर प्रदर्शित केलेल्या मतास बळकटी आणणारी आहे. कित्येक शास्त्रज्ञांचें मत या मताच्या अगदीं उलट आहे. पण या शास्त्रीय वादाच्या गोंधळांत न पडतां या गोष्टीचा निःपक्षपातानें विचार केला तर, वंशपरंपरा मनुष्याच्या अंगीं अर्धे गुणावगुण त्याच्या आईकडून व अर्धे बापाकडून आलेले असतात, हें अगदीं निर्विवाद ठरेल. तर मग एका मागून एक जन्मास येणाऱ्या पिढीच्या आईबापांपैकीं अर्धा भाग ( आई ) जर पिढ्यानपिढ्या शिक्षणाचा संस्कार न होतां केवळ अज्ञानांधकारांत घोरत राहिला, तर त्याचा दुष्परिणाम तदुत्पन्न संततीवर घडून आल्यावांचून राहील काय ? कित्येक ठिकाणीं स्त्रियांस अज्ञान ठेवण्याचीच नव्हे तर त्यांस गोषांत ठेवण्याची घातक चाल आहे. या गोषाच्या पद्धतीनें त्यांची अवनति तर इतकी होत जाते कीं, त्या केवळ नीच गुलामाच्या स्थितीस येऊन पोंचतात. त्यांची स्वतांची इतकी निकृष्टावस्था झाल्यावर त्यांपासून होणाऱ्या मुलाबाळांची त्याहून वेगळी स्थिति होईल, हें मनांत सुद्धां आणावयास नको. मनास व शरीरास आलेला थकवा नाहींसा करून त्यांस ताजा दम आणणारी, त्यांचे निरनिराळे व्यापार यथास्थित चालवून प्रकृति निकोप ठेवणारी व एकंदर जीवनास अत्यंत उपयुक्त,– अशा शुद्ध हवेस बिचाऱ्या निरंतर नागविल्या जातात. गोषांतील दूषित हवेंत काल कंठणाऱ्यांच्या पोटीं येणाऱ्या संततीवर अनिष्ट परिणाम कालान्तरानें तरी होतील हें सांगावयास नकोच. त्यांची अवनति ह्मणजे सगळ्या जातीची अवनति होय. ही अनिष्ट चाल या देशांत प्राचीनकाळीं नव्हती असें दिसतें. या बाबतींत लोकांनीं केवळ मुसलमानांचें अनुकरण केलें आहे. प्राचीन आर्य लोकांमध्यें ही चाल नव्हती, हें उदाहरणांनीं दाखवितां येईल. सारांश, ईश्वराच्या

* "Heredity and Regeneration of India."

अत्यंत अमोल व जीवनास अत्यंत अवश्य अशा देणगीचा–हवेचा–यथेच्छ उपभोग न घेतां आल्यामुळें व ज्ञानरवीची आनंददायी उष्णता मेंदूस न मिळाल्यामुळें, कष्टमय बंदिवासांत जन्म काढणाऱ्या बिचाऱ्या अबलाजनांच्या मनाची व शरीरप्रकृतीची धुळधाण उडत आहे. व अशी स्थिति सुरू असल्यामुळें हजारों–लाखों–अनर्थ गुदरताहेत. पण रूढीच्या शृंखला तोडण्यापुरतें मानसिक धैर्य जोंपर्यंत लोकांच्या अंगांत येत नाहीं तोंपर्यंत हे सर्व विचार मनांत आले न आले सारखेच.

ज्या भरतभूमींत संस्कृत वाङ्मयाचा सर्वत्र प्रसार होऊन जी जगतांतील अत्यंत विद्याचारसंपन्न राष्ट्रांमध्यें अग्रगण्य ह्मणून सारखी गाजत होती, तीच भरतभूमि गेल्या हजार वर्षांत अगदीं गतप्रभ होऊन सारखी अवनतीस येत चालली आहे! इतर राष्ट्रांचा विचार मनांत आणितां असें कळून येतें कीं, तीं मोठ्या झपाट्यानें आपापला मार्ग पुढें काढीत आहेत, व अशा भयंकर चढाओढींत भरतभूमि फारच मागें पडत चालली आहे. हें सर्व कशामुळें? विद्याचारसंपन्नतेच्या शिखरास जाऊन पोंचलेल्या प्राचीन 'ग्रीस' देशास सुद्धां टक्कर देणारें जें राष्ट्र; व काव्य, तत्वज्ञान व अशाच इतर गहन विषयांत पारंगत झालेलीं मानवरत्नें जेथें चमकत होतीं ह्मणून ज्या राष्ट्रास अत्यंत गर्व वाटत असे; तेंच राष्ट्र मंदप्रभ होत होत इतकें खालीं येत चाललें आहे कीं नांव घेण्यासारखें त्यांत कांहींच व कधींच झालें नसेल, असें वाटण्याचा काल येत चालला आहे!! असा प्रकार तरी कशामुळें घडत आला आहे? या ऱ्हासाचें अमुक एक कारण आहे असें जरी कोणास खात्रीनें सांगतां येणार नाहीं, तरी जीं अनेक कारणें आहेत त्यांत स्त्रियांचा गोषा व त्यांची अज्ञान दशा हें एक कारण आहे असें कोणता समंजस मनुष्य ह्मणणार नाहीं? प्रकृतीचे धर्म वंशपरंपरा नवीन पिढींत उतरत जातात, हा नियम जर खरा धरला (व तसा न धरण्याला कांहीं बलवत्तर कारण दिसत नाहीं.) तर मग त्यांस अज्ञानदशेंत व गोषांत ठेवण्याची पद्धत भावी संततीच्या ह्मणजे एकंदर राष्ट्राच्या अवनतीस कारणीभूत झालीच पाहिजे. व त्यामुळें त्यांच्या शारीरिक, मानसिक व कदाचित् नैतिक शक्तीस सुद्धां कमीपणा येण्याचा संभव आहे. बुद्धिमत्ता व शरीरसामर्थ्य या दोन्ही गोष्टींची पूर्ण वाढ बाहेरील स्वच्छ, शुद्ध व मोकळ्या हवेच्या यथेच्छ उपभोगावर अवलंबून आहे. रात्रंदिवस घरांतल्या घरांत काल काढणाऱ्या स्त्रियांस गृहकृत्य कितीही करावें लागलें, तरी, त्यांच्या पतींच्या किंवा भावांच्या कामकाजासंबंधानें त्यांस यत्किंचितही माहिती झाली नाहीं, किंवा दररोजच्या संसारसंबंधीं कामापलीकडे त्यांस कधींच विचार करण्याचें सामर्थ्य आलें नाहीं, तर त्यांचीं मनें अगदींच संकुचित व संस्कारहीन राहतील. अशा तऱ्हेच्या चरित्रक्रमाचा परिणाम साहजिक असा होतो कीं, मुली जसजशा वाढूं लागतात, तसतशी त्यांच्या वयाबरोबर त्यांच्या शरीराची वाढ बरोबर रीतीनें होत नाहीं, व त्यांच्या मनाचाही विकास व्हावा तसा होत नाहीं. अशा रीतीनें त्यांच्या शरीराची व मनाची दुर्बलता त्यांच्या बालकांत उतरत जाते, व एकंदर राष्ट्रावर त्याचा दुष्परिणाम घडून तें ऱ्हास पावतें.

वर जें कांहीं ह्मटलें आहे त्यास इतिहासांतल्या गोष्टींवरून बरीच बळकटी येते. पूर्वेकडील राज्यांचे त्वरित रीतीनें झालेले अभ्युदय व ऱ्हास

ह्यांस तरी त्यांतील स्त्रियांस कोंडून ठेव-ल्यामुळें त्यांस आलेली अवनत दशाच कारण आहे, असें ह्मणतां येईल. पूर्वेकडील राज्यांची एकंदर हकीकत लक्षांत आणिली असतां असें कळून येतें कीं, कांहीं हीन लोकांची टोळी एकत्र जमावी व एक जूट करून तिनें एखाद्या सुसंपन्न राज्यास धक्का देऊन त्यास खालीं पाडावें, व त्या जागीं आपलें राज्य स्थापावें. अशा मंडळीनें कांहीं कालपावेतों राज्यलक्ष्मीचा उपभोग घेतल्यानंतर दुसऱ्या एखाद्या भिकार जातीनें त्या मंडळीवर उठून तीस पादाक्रांत करावें व आपण तिची जागा पटकवावी. या हीन जातीचा कालान्तरानें ऱ्हास व्हावयाचाच. सारांश, अभ्युदय होऊन कांहीं भरभराटीचा काल प्राप्त झाला ह्मणजे वर्तनक्रमांत फेर पडून व ऱ्हासाच्या मार्गास लागून थोडक्याच वेळांत तें सर्वस्वी नाश पावावें. परंतु युरोपीय इतिहासाकडे दृष्टि फेंकिली असतां असें दिसतें कीं, तिकडील राष्ट्रांस ऐश्वर्य, संपत्ति व अभ्युदय प्राप्त होऊन त्यांचा भरभराट झाला असतां हटकून त्यांस क्षीणता येतेच असें होत नाहीं. पूर्वेकडील राष्ट्रें ऐश्वर्यगिरीच्या शिखरीं चढून राज्यलक्ष्मीचा यथेच्छ उपभोग घेत असतां, तेथील स्त्रियांस गोषांत ठेवण्याची चाल पडते, व तीपासून सर्व राष्ट्रास स्वाभाविकच क्षीणता येते व तें राष्ट्र कितीही मोठें असलें, तरी अरण्यांतून इतस्ततः परिभ्रमण करणाऱ्या, व शुद्ध हवेचा यथेच्छ उपभोग घेतल्यामुळें धडधाकट बनलेल्या, इतर जंगली व आडदांड जातींशीं टक्कर देण्यास अर्थातूच तें असमर्थ होण्याचा संभव असतो. हिंदुस्थानांतल्या इतर लोकांप्रमाणें मराठे लोक आपल्या स्त्रियांस गोषांतील कोंदट हवेंत न ठेवितां घराबाहेर पडून खुशाल कामकाज करण्याची मोकळीक देत; आणि ह्मणूनच मोगल राज्याचा या टोंकापासून त्या टोंकापर्यंत अवाढव्य विस्तार वाढला होता, तरी त्यास हात दाखवून टक्कर देण्याचें सामर्थ्य त्यांस आलें होतें, असें वाटतें. अति प्राचीन काळीं ज्या आर्य लोकांनीं वायव्येकडून हिंदुस्थानांत प्रवेश करून येथील मूळच्या रहिवाशांस पादाक्रांत केलें व आपला अमल स्थापिला त्यांच्या इतिहासावरून तरी हीच गोष्ट स्पष्ट होते. आर्यांच्या ताब्यांत हिंदुस्थान होतें, त्या वेळच्या वस्तुस्थितीची माहिती जी संस्कृत ग्रंथांवरून उपलब्ध आहे, तीवरून सुद्धां असें स्पष्ट दिसतें कीं, अर्वाचीन हिंदु लोकांचे पूर्वज व वाडवडील आपल्या स्त्रियांस कोंडून ठेवीत नसत. सारांश, ज्या बुद्धिमान व तेजस्वी आर्यांनीं हिंदुस्थान जिंकून तेथें आपला अमल पूर्ण बसविला, व ज्यांनीं जगांत संस्कृत भाषा उदयास आणून तिचें स्वरूप अत्यंत प्रगल्भ करून सोडिलें, ते बंदिवासांत काल काढणाऱ्या अज्ञान आयांच्या पोटीं जन्मले नव्हते; तर, ज्या माता मनानें व शरीरानें चांगले सुदृढ मुलगे व तशाच मुली प्रसवत, व ज्या युद्धकला व संस्कृत वाङ्मयाचा जयजयकार करण्याचा मार्ग तयार करून ठेवीत, त्यांच्या पोटीं जन्मलेले असत.

कित्येकांचें असें ह्मणणें पडेल कीं, गोषाच्या पद्धतीनें व स्त्रियांच्या अज्ञानानें व्यक्तींच्या व राष्ट्राच्या शारीरिक व मानसिक शक्तीस जरी कमीपणा येतो, तरी स्त्रियांची नीतिमत्ता कायम राहण्यास ही पद्धति अत्यंत उपयोगी आहे. त्यांस गोषांत न ठेवितां बाहेर कामकाजासाठीं हिंडूं फिरूं दिलें असतां, त्यांस कोणत्याही गोष्टींचा मोह पडणार नाहीं, हें खरें. पण मोह पाडणाऱ्या गोष्टींपासून त्या अलग राहिल्या असतां

जरी वाईट कृत्यें कमी होण्याचा संभव आहे, तरी त्यामुळें सद्गुणाची प्रवृत्ति अधिक होईलच असें ह्मणतां येत नाहीं. खरा सद्गुण ह्मटला ह्मणजे तो मोह पाडणाऱ्या वस्तु पुढें असतां त्यांच्या तावडींत न जातां त्यांशीं सामना करून त्यां-च्याशीं टक्कर मारण्यांत आहे, त्यांपासून पळून जाण्यांत नाहीं, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

ज्या राष्ट्रांत ही घातक चाल आहे, त्यांची विद्येच्या कामांत, शास्त्रीय शोधांत, किंवा राजकीय हक्क संपादण्यांत इतर राष्ट्रांशीं चढाओढ ला-गली असतां, पहिल्या राष्ट्राची तुलना एक रिकामा हात पाठीमागें लपवून ठेवून फक्त दुसऱ्या एका हातानेंच लढाई मारणाऱ्या वीराशीं करितां येईल. अशा वीरास त्याच्या अंगच्या चातुर्यानें फारतर कांहीं काळपावेतों यशःप्राप्ति होईल; परंतु चिरस्थायी विजयश्री त्यास कधींच वरणार नाहीं.

---

## तान्हाजी मालसुरे
### अथवा
## सिंहगडची मोहिम.

### प्रकरण पांचवें.

( २८४ पृष्ठावरून पुढें चालू. )

निघत न वच ऐसें, धावुनी तोंचि त्यातें
हृदयि धरुनि रायें चुंबिलें लेंकरातें;
वदत " जननि ! आतां आंवरी पुत्रशोका !
"वहिनि ! तुह्मिहि थोडें हें मनाशीं विलोका: ८४
" मरति किति पडोनी व्याघ्र-नक्राननीं शें;
" बुडुनि पडुनि कोणी भाजुनी, सर्प-दंशें;
" ज्वर विविध कितीकां वात-कुष्टादि नेती;
" क्रिमि पडुनि झडोनी नीचसे मृत्यु येती. ८५

" ज्यांच्या मुळांत पर-दार-धनाभिलाष;
" निंद्यांत निंद्य बळि ते हरि काळ-पाश;
" धर्मार्थ देशहितसाधनिं देहदीप
" कुर्वंडिती विरळ ते नर सिंह-रूप. ८६

" आलें असें मरण त्या रणरंगधीरा
" जें उत्तमोत्तम सुशोभवि एक वीरा;
" ज्याची जनां स्मृति कधींहि न नष्ट होई;
" जों 'हिंदु'-शब्द जगिं शाश्वतिलागिं राही. ८७

" माझ्या बये, जंव वसेल जिवांत जीव
" तान्हा तुझा बघसि तोंवरि गे सजीव !
" सूर्याजि हाहि ससहोदर, रायबाही
" हा देखसी सपितृ संशय यांत नाहीं. ८८
" मोठी तुझी खचित हेहि बघेल सून
" सद्बंधु मी तिज सदाहि पहा कसून !
"माझे बये, भगिनि ह्या मज हें उगी व्हा!
" याऊपरी नच रडा, रडवा अहाहा! ८९
" गेला बाई, तुमचा पुत्र, नोहा !–
" गेला माझा प्राण तो पांचवा हो !
" आहें तुह्मां राहिलों पाठिराखा;
" नाहीं मातें राहिला एक देखा ! ९०
" वाटे बाई, तूं सती जाउं सिद्ध;
" झालों आहें मीच ज्या काज शुद्ध;
" बोलूं का हो, मी परी दोन बोल ?
" ध्यावे ध्यानीं वाटल्या ते न फोल ! ९१

" सूर्याला[1] ग्रह-मालिका विनटली;
देहास कीं सावली;
" किंवा आयस-चुंबकां[2]-प्रति सुई
ये पावलोपावलीं;
" मर्त्यांची पडसावली सहचरी
भार्या अशी गाइली;
" योषिद्रत्न[3] धरातळीं विरळ;
ती धन्या सती माउली. ९२

---

१ मवरा. २ लोहचुंबकाकडे. ३ स्त्रीरत्न.

" अशा स्त्रीरत्नांच्या शिरिं समयिं दुर्दैवशिखरीं
" पडे, तत्सौभाग्या यम सभय जैं चोरुनिहरी;
" न तैं लौकीकाची करित बसते शुष्क करणी–
" परी प्रेरी प्राणा सहज पतिसंगें शिखरिणी.९३

" सहगमन अशाला साजतें नाम सार्थ;
" भरिं भरवुनि भार्या भाजिती, तो अनर्थ.
" न च नृपति, न माता, तात वा आप्त, यांत
" करुं शकति न कोण्ही बंध तीतें जगांत. ९४

" पति–शिर धरी अंकीं, बैसे चितेवरि बावरी,
" बघुनि दुसरी संस्कारा त्या बघे पळण्या घरीं;
"रडत अबला 'जा, जा' बोधें सती कुणि चालल्या;
"अहह हरिणी दावीं जैशा शतावधि होमिल्या ! ९५

" काय असे फळ भाव सुनिर्मळ ज्यांत न?
केवळ सोंग नटाचें !
" तीस सती–पद देति तरी मग सेविति
अन्नहि विप्रचटांचे !
" कर्म न हें तिज शर्मद हो परि धर्म
यथोचित तारिल तीतें.
" राख धरील दिमाख फुकाफुकि,
राखच होय; सुवर्ण न होतें ! ९६

" सुशील कुलजे जरी फिरुनि दैव वैधव्य ये,
" सदाचरणिं जें तिला फल, न तें शरीर–व्ययें;
" अहो, नृ–तनु दुर्लभा प्रभुकृपें असे लाभली;
"भवार्णव–तितीर्षुला सुलभ हीच नौका भली.९७

१ डोंगर २ उत्तम स्त्री. ३ वणव्यांत ४ आढ्यांत दर्भ मांडून केलेले जे चटांचे ब्राह्मण तेही. ५ नर–तनु. ६ भवसमुद्र तरून जाऊं इच्छिणाऱ्याला.

" व्रत–नियम–निवापें–नीर–दानें
" कुपतिहि ती निज उत्तमा पदा नें;
" श्रुति तिज पद दे पतिव्रतेचें–
" कठिण जिचें व्रत फार तीव्रतेचें. ९८

" आधारस्तंभ भर्त्या–सह पतन जिचें
ते रमातुल्य साध्वी;
" बाला नाथानुरक्ता सहगमन करी
ते सती होय तन्वी;
" पातिव्रत्यास पाळी विधि–हत विधवा
ती क्षमा–रूप साचें;
" अग्नीनें क्षीण नोहे तरिच विमळ तें
हेम मोठ्या कसाचें." ९९

बोधुनी विनवुनी महामती,
राहवी व्रत–तपास ती सती.
बोधिते विपुल, अल्प वागते;–
वागणेंच जड फार लागतें. १००

जें सन्मित्रा उचित, सुनृपा जें प्रसंगानुरूप,
तें तें सारें करुनि नृपति–श्रेष्ठ तो घे निरोप.
सूर्याजी हो गडकरि; सवें रायबाचीहि माय
तैशी आजी सुनमुख बघे. सांगणें यांत काय? १०१

शिवाजीनें प्राणापरि जपुन ज्यांना सुखविलें
असे कामा आले पडतिल न कां भृत्य वहिले ?
प्रजावात्सल्याचे भगत कितिसे भूप? सगळे
प्रजा ज्यांची त्यांच्यास्तव समयिं देती गळि गळे? १०२

१ तिलोदक. २ वेद. ३ लहान, सामान्य ४ पृथ्वी; शांति. ५ लग्नांतला एक सोहळा. ६ खरोखर.

[ उपसंहार ]

" गावें श्रीजनकात्मजापतिकथे,
श्रीकृष्णलीलामृता,
कीं श्रीभारत—वीर—सच्चरित जें
तारील भर्त्यन्विता,
गाव्या श्रीगिरिजाधव—स्तव—कथा,
कीं संतलीलासुधा,—
तें सोडून वृथा गिरा शिणविली
कां वर्णनीं या बुधा ! " १

पृच्छों ही बहु उत्तमोत्तम;परी आहे अशी प्रार्थना-
कीं हिंदूंत असे जिहीं उरविला हा आज हिंदूपणा'
घेतेना अवतार जे तरी तधीं होतीच हे म्लेच्छ-भू
ते कोणी भलते असोत-परि ते आह्मांस वर्ण्यप्रभू. २

श्रीरामदास गुरुजी, शिवराय शिष्य,
राजा गमे जणुं विशेषण, तो विशेष्य;
दोघांसही सगुण शिष्यपरंपरा जे
धर्मोन्नतीस दृढ कारण पैं विराजे. ३

तान्हाजीचा दिगंतीं अति दुमदुमतो
कीर्तिचा भेरिनाद,
त्याची आतां पुढेंही स्मृति जिरविलची
शौर्य—गर्व—प्रमाद;
जों हा सद्धर्म राहे क्षितिवरि तंव तो
अक्षयी जीव—मान
गुंगो तत्कीर्तिगानीं मति, कमलदलाऽ
वर्ति भृंगासमान. ४

[ शुभंभूयात्. ]



१ भक्तियंताला. २ प्रभ. ३ नगारा.

२

# बेकनचे निबंध.

## अनुचर व मित्र.

फार मोलाचे अनुचर उपयोगी नाहींत; कारण मनुष्य जितका आपला घोळ वाढवितो, तितका तो आपले पंख आंखूड करतो. * फार मोलाचे ह्मणजे जे खर्चीक काळ आहेत तेच नव्हत; तर, जे मागणें मागण्यांत त्रासदायक व लोंचट आहेत तेही, असें मी समजतों. सामान्य अनुचरांनीं आश्रय, शिफारस व अन्यायापासून रक्षण, यांपेक्षां अधिकाची अपेक्षा करूं नये. दंगेखोर अनुचर फार वाईट; ते एखाद्याचा आश्रय करतात तो प्रेमामुळें नव्हे, तर दुसऱ्या कोणावर तरी ते नाराज झालेले असतात ह्मणून. व मोठ्या लोकांमध्यें जें वैमनस्य आपण पुष्कळ वेळां पाहतों तें बहुतकरून ह्याचमुळें होतें. त्याचप्रमाणें बढाईखोर अनुचरही गैरसोईचे आहेत; ते आपल्या यजमानाचे गुणानुवाद पुकारणाऱ्या तुताऱ्याच बनतात; व त्यांच्यांत गुप्तपणा नसल्यामुळें ते कामाचा विघाड करितात. ते यजमानाचा थोरपणा बाहेर नेतात, पण त्याऐवजीं त्यांना मत्सर परत आणून देतात. त्याचप्रमाणें दुसऱ्या एका प्रकारचे अनुचर भयंकर असतात. ते खरोखर हेर असतात; ते घरांतील गुह्यांचा तपास काढून तीं दुसऱ्यांना जाऊन सांगतात. पण असलीं माणसें, अनेकवेळां, फार मर्जींतलीं असतात: कारण तीं पुढें पुढें करणारीं असतात; व जशीं यजमानाच्या गोष्टी दुसऱ्यांना सांगतात, तशीं

* जितका परिवार अधिक तितकें स्वातंत्र्य कम

दुसऱ्यांच्या यजमानाला सांगतात. एखाद्या थोर पुरुषाचा जो पेषा असेल त्याच पेषाच्या लोकांनीं त्याचा आश्रय करणें ( उदाहरणार्थ ज्यानें लढाया मारल्या आहेत त्याचा शिपायांनीं ) हें योग्य आहे व एकसत्तात्मक राज्यांतही तें चांगलें गणलें आहेः मात्र तें फाजील डामडौलानें किंवा लोकप्रियतेनें नसावें. पण अत्यंत सन्मानकारक आनुचर्य ह्मटलें ह्मणजे, यजमान सर्व प्रकारच्या माणसांमध्यें सद्गुणांची व हुशारीची चहा व चीज करितात ह्मणून त्यांचा आश्रय करणें हें होय. तथापि जेथें अप्रतीम हुशारीचीं माणसें मिळत नाहींत तेथें साधारण हुशार चाकर ठेवण्यापेक्षां चालचलाऊ ठेवावे हें चांगलें. आणि शिवाय, खरें ह्मटलें तर, अवनतीच्या कालीं गुणी माणसांपेक्षां उद्योगी माणसें अधिक उपयोगाचीं आहेत. राज्यकारभारांत एका दर्जाचीं माणसें सारख्या कामावर ठेवावीं हें चांगलें. कारण, कित्येकांवर बेसुमार मेहरबानी केली तर ते शिरजोर होतात व बाकीचे असंतुष्ट होतात; कारण, त्यांना वाटतें कीं आमचाही हक्क आहे. पण उलटपक्षीं, मेहरबानी दाखवितांना मनुष्यांमधील फरक पाहून निवड करावी हें चांगलें; कारण त्या योगानें, ज्याची बढती होते तो अधिक उपकारी होतो, व बाकीचे उद्योगतत्पर होतात; कारण सर्व कांहीं मेहरबानीवर आहे. कोणत्याही मनुष्याची पहिल्या प्रथमच अतिशय वाखाणणी करूं नये हें शहाणपणाचें काम आहे; कारण ती पुढें तशीच टिकत नाहीं. एकाच्याच तंत्रानें असणें सुरक्षित नाहींः कारण त्यावरून मनाची नरमाई दिसते आणि अपवाद व दुर्लौकिक यांना मोकळीक मिळते. कारण जे एखाद्या मनुष्याला प्रत्यक्ष दोष देणार नाहींत किंवा त्याची निंदा करणार नाहींत, ते त्याच्या बड्या आश्रितांविषयीं अधिक धीटपणानें बोलतील आणि अशा रीतीनें त्याच्या लौकिकावर घाय घालतील. तथापि अनेकांच्या नादानें विक्षिप्तचित्त होणें हें त्याहून वाईट; कारण त्यामुळें मनुष्यें विमनस्क व चंचलवृत्ति होतात. कांहीं थोड्याशा मित्रांचा सल्ला घेणें हें नेहमी श्रेयस्कर आहे; " कारण खेळणारांपेक्षां प्रेक्षकांना, अनेकवेळां, अधिक दिसतें; व दरींतून डोंगर चांगला दिसतो. " पूर्वीं मैत्रीची थोरवी गाण्यांत येत असे. पण जगांत मैत्री थोडीच आहे, व बरोबरीच्यांत अत्यंत कमी. जी कांहीं आहे ती वरिष्ठ व कनिष्ठ यांच्यांत आहे.

---

## क्रोध.

क्रोध समूळ नाहींसा करण्याचा यत्न करणें ही फक्त स्टोईक लोकांची वल्गना होय; आमच्यांत त्यापेक्षां चांगलीं वचनें आहेतः " क्रोधाविष्ट व्हा, पण पाप करूं नका. " " तुमच्या क्रोधावर सूर्याला मावळूं देऊं नका." * क्रोध हा प्रसंगाच्या व वेळाच्या संबंधानें मर्यादेंत व बंधांत ठेवला पाहिजे. प्रथम क्रोध येण्याची नैसर्गिक प्रवृत्ति व संवई नरम व प्रशांत कशी करतां येईल हें सांगूं. दुसऱ्यानें,क्रोधाच्या विशेष वृत्ति कशा दाबून टाकाव्या, किंवा निदान त्यांपासून दुष्परिणाम न व्हावा अशा रीतीनें त्या कशा आवरून धराव्या, हें सांगूं. तिसऱ्यानें,

* क्रोध आला असतां तो सूर्य मावळण्यापूर्वींच शमन करावा; अर्थात् लागलाच.

दुसऱ्यामध्यें क्रोध कसा उत्पन्न करावा अथवा शमन करावा, हें सांगूं.

पहिल्या मुद्याच्यासंबंधानें; क्रोधाचे परिणाम काय आहेत व तो मनुष्याच्या जीवित्वाला कसा उपद्रव करतो याविषयीं मनन करावें व वारंवार विचार करावा, याशिवाय दुसरा उपाय नाहीं. व हें करण्याचा उत्तम काळ ह्मटला ह्मणजे रागाचा झटका अगदीं निघून गेल्यावर. रागाकडे सिंहावलोकनानें पहावें. सेनेका सुंदर रीतीनें ह्मणतो कीं "क्रोध हा नाशाप्रमाणें आहे; तो ज्या वस्तूवर पडतो तिच्यावर भंग होतो." "आत्म्याच्या ठिकाणीं दम धरून असावें" असा उपदेश आह्मांला धर्मशास्त्र करतें. जो कोणी दम सोडतो, तो आपला आत्मा गमावतो. मनुष्यांनीं मधमाशांसारखें होऊं नये; त्या "दंश करण्यांतच सार्थक मानतात."

क्रोध हा खरोखर एक प्रकारचा नीचपणा आहे, हें ज्यांच्यामध्यें तो राज्य करतो त्यांच्या दुर्बलतेवरून दिसतें; ते कोण, तर मुलें, स्त्रिया, ह्मातारे व व्याधिग्रस्त. मात्र मनुष्यांनीं अशी खबरदारी ठेवली पाहिजे कीं, रागाला न भितां त्यांनीं त्याची अवहेलनाच करावी; ह्मणजे असें दिसेल कीं ते रागाचे अंकित नसून त्याच्या वरचे आहेत: मनुष्य जर स्वतःला त्या कामीं नियम घालून देईल, तर असें करणें सोपें आहे.

दुसऱ्या मुद्याच्यासंबंधानें; क्रोधाचीं कारणें व प्रवर्तकें मुख्यत्वेंकरून तीन आहेत. पहिलें, अपकाराविषयीं अतिशय कोमल असणें; कारण ज्याला आपल्याला अपकार झाला असें वाटत नाहीं तो रागावणार नाहीं: आणि ह्मणून कोमल व नाजूक माणसें वारंवार रागावलींच पाहिजेत. त्यांना त्रास देणाऱ्या पुष्कळ गोष्टी असतात: अधिक जोरकस स्वभावाचीं माणसें त्या गोष्टी मनांत आणणार नाहींत. दुसरें, जो अपकार झाला असेल तो प्रसंगानुसार तिरस्कारयुक्त आहे असें मानणें व घेऊन चालणें. कारण प्रत्यक्ष-अपकारापेक्षां तिरस्कारामुळें रागाला अधिक आवेश येतो. ह्मणून जेव्हां मनुष्यें तिरस्कार-दर्शक गोष्टी शोधून काढण्यांत तरबेज असतात तेव्हां तीं राग अधिक पेटवितात. शेवटलें, मनुष्याच्या अब्रूला धक्का बसतो असें वाटल्यानें राग अधिक व तीव्र होतो; याला उपाय हाच कीं, अब्रूचें चिलखत जाड ठेवावें. पण राग आवरण्याच्या कामीं उत्तम उपाय ह्मटला ह्मणजे-वेळ घ्यावा-हा होय, आणि असें मानावें कीं सूड घेण्याची वेळ अजून आली नाहीं, ती पुढेंच आहे; आणि अशा रीतीनें दरम्यान आपल्याला शांत करावें व सूड घेण्याचें काम पुढें टाकावें.

रागानें जरी मनुष्याला पछाडलें तरी त्याच्या हातून दुष्परिणाम होऊं नये ह्मणून दोन गोष्टी आहेत; त्यांची तुह्मी विशेष खबरदारी घेतली पाहिजे. एक, अतिशय कडू शब्द न बोलणें; विशेषेंकरून ते खोंचीचे व झोंबतील असे असले तर; कारण सामान्य अपशब्द इतके लागत नाहींत. आणि पुनः रागामध्यें मनुष्यानें गुह्यें प्रगट करूं नयेत: कारण तसें केलें तर तो मनुष्य समाजाच्या लायक नाहीं. दुसरें, रागाच्या झटक्यांत तुह्मी एकादें काम निक्षून तोडून टाकूं नये; पण तुह्मी कितीही कडवेपणा दाखविला, तरी, पुनः रद्द करतां येणार नाहीं असें एकादें कृत्य करूं नये.

दुसऱ्यामध्यें राग उत्पन्न व शमन करण्याच्यासंबंधानें: संधि साधून, मनुष्यें जेव्हां फार हट्टी व विन्मुख असतील, तेव्हां त्यांना चिडवावें; पुन्हां (मागें सांगितल्याप्रमाणें) तिरस्कार दुःसह करण्याकरतां तुह्मांला जितक्या गोष्टी सांपडतील तितक्या गोळा कराव्या. आणि राग शमन करण्याचे दोन उपाय त्यांच्या उलट आहेतः पहिला, चांगली वेळ पाहून मनुष्याला रागाचें काम पहिल्यानें सांगावें. कारण पहिला ठसा पुष्कळ काम करतो. दुसरा, अपकार व तिरस्कार यांचा संबंध जितका तोडतां येईल तितका तोडावा; ह्मणजे, अपकार झाला त्याला गैरसमज, भीति, विकारवशता किंवा तुह्मांला वाटेल तें कारण लावून द्या. (तो तिरस्कारामुळें झाला असें मनांत भरून देऊं नका.)

## वस्तूंच्या उलटापालटी.

सालोमन ह्मणतो " पृथ्वीवर नवें असें कांहीं नाहीं." ह्मणजे प्लेटोची * जशी कल्पना होती कीं " सर्व प्रकारचें ज्ञान हें केवळ स्मृति होय, " तसें सालोमनाचें वाक्य आहे कीं " सर्व प्रकारचा नवीनपणा ह्मणजे केवळ विस्मृति होय." यावरून तुमच्या लक्षांत येईल कीं लेथे + नदी जशी पाताळांत तशी पृथ्वीवरही आहे. एक गहन ज्योतिषी ह्मणतो " दोन स्थिर गोष्टी नसत्या (एक ही कीं, नवग्रह नेहमीं एकमेकांपासून त्याच अंतरावर असतात, कधीं जवळ येत नाहींत, किंवा कधीं दूर जात नाहींत; दुसरी ही कीं, दैनिक गति निरंतर तितक्याच काळांत होते.) तर कोणतीही व्यक्ति एक क्षणही टिकली नसती." हें खचित आहे कीं, पृथ्वीचे जड परिमाणूंचा एकसारखा सतत प्रवाह चालला आहे, ते कधींही स्थिर नसतात. सर्व वस्तु विस्मृतींत गाडून टाकणारीं आवरणवस्त्रें दोन आहेत; जगबुडी व धरणीकंप. अग्निप्रलय व मोठीं अवर्षणें हीं निखालस जनसंहार व नाश करतात असें नाहीं. फाएतनचा * रथ फक्त एक दिवस चालला. व एलियासच्या वेळीं तीन वर्षांचें अवर्षण पडलें होतें तें केवळ एकदेशी होतें, व त्यांतून लोक जगले. विद्युत्पाताच्या मोठ्या आगी ज्या पश्चिम इंदीजमध्यें वारंवार होतात, त्या फक्त थोड्याशा भागावर होतात; पण दुसरे जे दोन नाश—जगबुडीनें व भूमीकंपानें—होतात त्यांत आणखी असें दिसतें कीं, जे शेषलोक त्यांतून बचतात, ते बहुधा अज्ञानी व पहाडी लोक असतात; त्यांना गतकालाविषयीं कांहीं हकीगत सांगतां येत नाहीं. ह्मणजे जर कोणीच

* प्लेटो पुनर्जन्म मानणारा होता. त्याचें असें ह्मणणें असे कीं, आह्मांला या जन्मीं जें ज्ञान प्राप्त होतें तें आह्मांला पूर्वजन्मीं झालें होतें. पण जन्मान्तरामुळें आह्मी तें विसरून गेलों होतों. त्याचीच आतां स्मृति होते.

+ ग्रीक व रोमन लोकांच्या समजाप्रमाणें लेथे ही नरकलोकची एक नदी होती. तिचें पाणी पिणारा मागील सर्व गोष्टी विसरून जात असे. " लेथे " शब्दाचा अर्थ विस्मरण.

* फाएतन हा सूर्याचा पुत्र. त्यानें पित्याकडून त्याचा रथ एक दिवस हांकण्याकरतां मागून घेतला. पण तो त्याला हांकतां येईना. त्याचे घोडे अनावर झाले. ते वरखालीं जाऊं लागले. त्यामुळें आकाश व पृथ्वी यांची एकसांच होळी होते कीं काय अशी भीति वाटूं लागली. शेवटीं ज्युपितरानें हें संकट पाहून आपल्या वज्रानें फाएतनला खालीं पाडलें.

बचले नसते तर जितकी विस्मृति झाली असती तितकीच होते. पश्चिम इंदीजच्या लोकांविषयीं जर तुह्मी चांगला विचार केला, ( तर तुह्मांला असें दिसून येईल कीं ) जुन्या जगांतील * लोकांपेक्षां ते बहुतकरून नूतन व कनिष्ठ आहेत. आणखी हें अधिक संभवनीय आहे कीं, तेथें आजवर जो संहार झाला आहे तो ( ईजिप्तियन भटजीनें सोलनला अतलान्तीस बेटाविषयीं जी माहिती सांगितली, कीं तें भूमिकंपानें गडप केलें, त्याप्रमाणें ) भूमिकंपानें नव्हे; तर स्थानिक जलप्रलयांनीं झाला असावा. कारण त्या भागांत भूकंप क्वचित् होतात. पण तेथें अशा प्रचंड नद्या आहेत कीं त्यांच्या मानानें आशिया, आफ्रिका, व यूरोप येथील नद्या केवळ ओहोळ होत. त्यांचे आन्दीज पर्वतही आमच्या पर्वतांपेक्षां अतिशयच उंच आहेत व त्याचमुळें अशा स्थानिक जलप्रलयांतून अवशिष्ट लोक वांचले असावे असें दिसतें. म्याकियाव्हेलीचें ह्मणणें आहे कीं, धर्मपंथांमध्यें परस्पर जी असूया असते ती वस्तूंची स्मृति नष्ट करण्यास पुष्कळ अशीं कारणीभूत होते; त्यानें ग्रेगरी धि ग्रेट याचें उदाहरण घेतलें आहे,–कीं त्यानें मूर्तिपूजकांच्या प्राचीन वस्तूंचा त्याच्यानें झाला तेवढा नाश केला. यासंबंधानें ( माझें ह्मणणें असें आहे कीं ) ते धर्मपिसे फारशी हानि करतात किंवा फार दिवस टिकतात असें आढळून येत नाहीं; हें मागून साबिनियन गादीवर आला त्यावेळीं दिसलें; त्यानें प्राचीन वस्तूंचें पुनरुज्जीवन केलें.

वरच्या गोलामध्यें ज्या उलटापालटी किंवा फेरफार होतात, त्या प्रस्तुत निबंधाला योग्य विषय नाहींत. प्लेटोचें *महान् वर्ष, तितके दिवस जग टिकलें तर, कदाचित् कांहीं तरी परिणाम करील; समान व्यक्तींची स्थिति नवसरण्याच्यासंबंधानें नव्हे ( कारण, आकाशस्थ गोलांचा अमल पृथ्वीवरील ह्या गोष्टींशीं वास्तविक आहे त्यापेक्षां तो अधिक होतो असें जे लोक मानतात, त्यांच्या मतें मात्र तसें होईल ) पण एकंदरीनें. धूमकेतु हे एकंदरीनें वस्तुसमुच्चयावर सत्ता चालवितात व अमल करतात याविषयीं शंका नाहीं. पण लोक त्यांच्याकडे पहातात मात्र, व ते कोठें जातात इतकेंच ठरवितात; त्यांचे काय परिणाम होतात इकडे कोणी लक्ष पुरवीत नाहीं.

एक क्षुल्लक गोष्ट माझ्या ऐकण्यांत आहे; तिचा जरा अधिक शोध झाला पाहिजे होता. असें ह्मणतात कीं, खालाटीच्या देशांत ( कोणत्या भागांत तें माहित नाहीं ) असें पहाण्यांत आलें आहे कीं, दर पस्तीस वर्षांनीं तींच तींच वर्षफळें व हवामानें पुनः पुनः येतात. जसें मोठीं हिमें, मोठ्या वृष्टि, मोठीं आवर्षणें, गरम हिंवाळे, उष्णतारहित उन्हाळे, इत्यादि. हें सांगण्याचें कारण इतकेंच कीं, मागें मोजन पाहून मला या गोष्टीचें थोडेंसें प्रत्यंतर सांपडलें आहे.

* आशिया, आफ्रिकेचा उत्तरभाग व यूरोप, यांना समुच्चयानें जुनें जग ह्मणतात.

* महान् वर्ष ह्मणजे एक कालप्रमाण आहे. इतक्या कालांत नवग्रह व त्यांचे उपग्रह हे सर्व आपआपले फेरे पुरे करून पुनः पूर्व ठिकाणीं, ह्मणजे जगाच्या आरंभीं ते ज्या स्थानीं होते त्या स्थानीं, परत येतात.

पण ह्या नैसर्गिक गोष्टी सोडून आपण मनुष्यांकडे वळूं. मनुष्यांमध्यें अतिशय फेरफाराला कारण ह्मटलें ह्मणजे पंथ व धर्म होय. कारण ह्या गोष्टी मनुष्यांच्या मनावर अत्यंत मोठा अमल करतात. खरा धर्म खडकावर स्थापलेला आहे. इतर धर्म काळाच्या लाटांवर आदळत आहेत. ह्मणून नवीन पंथ होण्याचीं कारणें सांगूं; आणि अशा महान् उलाढाली बंद करण्याकरतां मानवी विचारशक्तीच्या दुर्बलतेला सल्ला देणें जितकें शक्य आहे तितकी त्यांच्यासंबंधानें देऊं.

जेव्हां पूर्वीचा धर्म भांडणांनीं विदारला जातो; आणि जेव्हां धर्माध्यक्षांचा पवित्रपणा ऱ्हास पावतो व अपवादभरित होतो; आणखी त्यांत जेव्हां काळ मूढ, अज्ञान व रानटी असतो;-तेव्हां नवीन एकादा पंथ उत्पन्न होईल असें समजा. जर अशा वेळीं एकादा अलौकिक व विलक्षण पुरुष त्या पंथाचा उत्पादक ह्मणून निर्माण झाला तर नवा पंथ होईल हें खचित समजा. ह्या सर्व गोष्टी महंमदानें आपला धर्म प्रसिद्ध केला त्यावेळीं होत्या. नव्या पंथामध्यें जर दोन गुण नसले तर त्याला भिऊं नका, कारण तो पसरणार नाहीं. पहिला गुण हा कीं, प्रस्थापित अधिकाराला दूर सारून आपण त्याची जागा घेणें किंवा त्याशीं विरोध करणें; कारण त्यासारखें दुसरें कांहीं लोकप्रिय नाहीं. दुसरा, ऐषआरामाला व विषयासक्तीला मोकळीक देणें.

नवीन पंथ स्थापित करण्याचे तीन मार्ग आहेत: चमत्कार करण्याचें सामर्थ्य; दुसऱ्यांचीं मनें वळविण्याच्या कामीं वाणीचें वक्तृत्व व शहाणपण; व तरवार. स्वधर्माकरतां जीव देणें हें मी चमत्कारांतच गणतों; कारण तें मानवी स्वभावाच्या शक्तीपलीकडचें आहेसें दिसतें. त्याचप्रमाणें आत्यंतिक व प्रशंसनीय पवित्रपणाही त्यांतच गणतां येईल. नित्य प्रकार सुधारणें; लहानसान भेद मिटविणें; सौम्यपणानें चालणें व रक्तपाताचे छल न करणें: आणि मुख्य उत्पादकांना जबरदस्तीनें व कडवेपणानें खिजविण्यापेक्षां त्यांना आपलेंसे करणें व वाढविणें; यांपेक्षां, नवीन होणारे पंथ व तट बंद करण्याचा दुसरा चांगला उपाय नाहीं, हें खचित.

लढायांमध्यें फेरफार व उलटापालटी अनेक आहेत; पण मुख्यत्वेंकरून तीन गोष्टींत: लढायांच्या स्थलांत; शस्त्रांत, व लढाई करण्याच्या प्रकारांत. प्राचीन काळच्या लढाया पूर्वेकडून पश्चिमेकडे अधिक जात, असें दिसे. कारण पर्शियन, आसीरियन, आरब व तारतार लोक ( जे स्वाऱ्या करणारे होते ) हे सर्व प्राच्य होते. गाल लोक पाश्चिमात्य होते हें खरें: पण त्यांनीं फक्त दोन स्वाऱ्या केल्या असें आमच्या वाचण्यांत येतें; एक गालो-ग्रेशियावर व दुसरी रोमवर. पण पूर्व व पश्चिम ह्या दिशा निश्चित नाहींत. पण उत्तर व दक्षिण ह्या दिशा ठरींव आहेत; व दक्षिणेकडील लोकांनीं उत्तरेकडील लोकांवर स्वारी केली असें क्वचितच झालें आहे; मुळींच नाहीं असें ह्मणण्यासही हरकत नाहीं: पण याच्या उलट झालें आहे. यावरून असें होतें कीं उत्तरेकडील प्रदेश स्वभावतःच अधिक रणशूर आहे. हें त्या गोलार्धांतील ताऱ्यांमुळें असो, किंवा उत्तरेकडे मोठमोठीं खंडें आहेत ह्मणून असो; कारण दक्षिणे-

कडील प्रदेश जितका ज्ञात आहे तितका बहुतेक सागरमय आहे: किंवा ( हें अधिक उघड दिसतें ) उत्तरेकडील थंडीमुळें असो. ही थंडी, शिक्षणाच्या साह्यावांचून, शरीरें अत्यंत कठीण व शौर्य अत्यंत गरम करते.

मोठ्या संस्थानाचा किंवा राज्याचा भंग व चकाचूर झाल्यावर लढाया होतील हें खास समजा. कारण मोठीं राज्यें उभीं असतां, तीं मूळच्या पराजित लोकांच्या शक्ति हीनबल व नष्ट करितात; व स्वतःच्या संरक्षक शक्तींवर अवलंबून राहतात. व त्या का थकल्या ह्मणजे सर्व सत्यानाश होतो व मूळचे लोक [ कोणाच्या तरी ] भक्ष्यस्थानीं पडतात. रोमच्या राज्याचा नाश झाला तेव्हां असेंच झालें; व च्यार्लस धि ग्रेटनंतर आलमेनच्या राज्याचेंही तसेंच झालें; प्रत्येक पक्ष्यानें एक एक पीस घेतलें; आणि स्पेनचें राज्य डबघाईस आलें तर त्याचेंही तसेंच होइल. त्याचप्रमाणें राज्यें फार विस्तृत झालीं किंवा संयुक्त झालीं तर लढाया उत्पन्न होतात. कारण राज्य अतिशय बलाढ्य झालें ह्मणजे तें महापुरासारखें होतें; तें जलमय करीलच करील; हें रोम, तुर्कस्तान, स्पेन ह्या व दुसऱ्या राज्यांत दिसून आलें. जगांत जर थोडे रानटी लोक असले व उपजीविकेचें साधन असल्यावांचून ते लग्न किंवा प्रजोत्पत्ति करीत नसले (आजला तारतरीशिवाय बहुतेक सर्व ठिकाणीं असेंच आहे ) तर त्या लोकांचा पूर येईल ही भीति नाहीं; पण जेव्हां लोकांचे थव्यांचे थवे उत्पन्न होतात, व निर्वाहाचीं व उपजीवनाचीं साधनें काय आहेत हें न पाहतां प्रजोत्पत्ति करीत जातात तेव्हां ते एकाद्या किंवा दुसऱ्या युगांत आपल्या लोकांपैकीं कांहीं भाग दुसऱ्या राष्ट्रांवर सोडतीलच; तसें केल्यावांचून त्यांना गत्यंतर नाहीं. प्राचीन उत्तरेकडील लोकांत हें चिठ्यांनीं करीत असत. घरीं कोणी रहावें व बाहेर कोणी जावें, हें चिठ्या टाकून ठरवीत. जेव्हां एकादें रणशूर राज्य नेभळें व वीर्यहीन होतें तेव्हां लढाई खचित होईल असें समजावें; कारण असलीं राज्यें त्यांच्या अवनतीच्या काळीं श्रीमंत झालेलीं असतात. आणि ह्मणून लुटीची आशा लढाईला आमंत्रण देते, व त्यांची शौर्यहीनता उत्तेजन देते.

शस्त्रांच्या संबंधानें एकच नियम लागू नाहीं व तिकडे फारसें लक्ष पुरविलेलें नाहीं. तथापि त्यांत देखील आळीपाळी व उलथापालथी आहेत. कारण हें खचित कीं, हिंदुस्तानांत आक्सीड्रेक्स ( ? ) च्या शहरांत तोफांची माहिती होती; व त्यांनाच मासिदोनियन लोक मेघगर्जना, वीज व जादू ह्मणत; आणि चिनामध्यें तोफांचा उपयोग २००० वर्षांवर आहे हें सुप्रसिद्ध आहे. शस्त्रांची स्थिति व त्यांची सुधारणा तीन गोष्टींत आहे; पहिली, निशाण दूरवर जाणें; कारण त्यामुळें भीति कमी होते; हें तोफा व बंदुका यांत दिसतें. दुसरी, आघाताचा जोर; यांत देखील मेषाघात* व दुसऱ्या युक्ति यांत तोफांचीच सरशी आहे. तिसरी, त्यांचा सोईवार उपयोग; ह्मणजे सर्व प्रकारच्या हवेंत त्यांचा उपयोग करतां यावा; व तीं नेण्याला हलकीं व वापरण्याला सुलभ असावीं; इत्यादि.

* प्राचीन लोकांत तटांच्या भिंती पाडण्याकरितां यंत्र केलेलें असे. त्याच्या टोंकास मेंढ्याच्या डोक्याचा आकार केलेला असे, ह्मणून त्याला मारगिरी लावणारा मेंढा ह्मणत.

लढाई चालविण्याच्या संबंधानें—पहिल्यानें लोक संख्येवर अतिशय अवलंबून असत; त्याचप्रमाणें शारीरबल व शौर्य यांजवर लढाया चालत; निकराच्या युद्धाकरतां दिवस नेमीत व याप्रमाणें बरोबरीची लढाई करून कायतो निकाल लावण्याचा यत्न करीत; आपलीं सैन्यें रांगेनें व व्यवस्थेनें उभीं करणें हें त्यांना माहित नव्हतें. त्यानंतर अफाट संख्येपेक्षां बलिष्ठ संख्येवर ते अधिक अवलंबून राहूं लागले; त्यानंतर स्थळ, चतुर कवाइता इत्यादिकांचे फायदे त्यांना समजूं लागले; त्यानंतर युद्धाची रचना करण्यांत ते अधिक कुशल झाले.

राष्ट्राच्या तारुण्यांत शस्त्रांची भरभराट असते; मध्य वयांत विद्येची; नंतर कांहीं काळ उभयतांची; व राष्ट्राच्या अवनतीच्या काळीं, कलाकौशल्य व व्यापार यांची भरभराट असते. विद्येचा आरंभ असतो व ती बहुतेक पोरकट असते तेव्हां तिचें बालपण असतें; जेव्हां ती तरतरीत व नवतीची असते तेव्हां तिचें तारुण्य असतें; जेव्हां ती भारदस्त व मर्यादित असते तेव्हां तिची भरज्वानी असते; आणि शेवटीं जेव्हां ती शुष्क व निर्जीव होते तेव्हां तिचें वार्धक्य असतें. पण उलथापालथीच्या ह्या फिरत्या चक्रांकडे फार वेळ पहात राहणें चांगलें नाहीं; नाहीं तर आपल्याला चक्कर येईल.



## कवीची कविता.

" As the birds come in the spring."

——Longfellow.

[ दिंढ्या ]

जसे पक्षी येतात वसन्तांत,
कुठोनीयां ठाऊक ती न मात;
जशा येती तारका अंतराळीं
प्रदोषीं त्या घन—नील गगन—भालीं; १
ढगांतूनी पर्ज्यन्य पडे नीट,
झरा अथवा फोडून धरा—पीठ;
व्योमशून्यांतूनियां निघे नाद
सान भारी वा नसे ज्यास पाड; २
सुरभि जैशी झाडांस फुलें ताजीं,
फळें अथवा येतात मधुरशीं जीं;
अनिल येई, डोलवी वृक्षराजी,
उदधि भरती येऊन गगन मोजी; ३
क्षितिज—लग्ना हो दृष्ट जेविं नौका,
जलधि—रंगीं, आनंद जैं अनेका,
जसा क्षोभें वा फेन जलीं थाटे,
रुचिर ओष्ठीं वा मधुर हास्य लोटे: ४
कवन तेवीं तें घेत कवी—भेट,
उगम ज्याचा अज्ञातमण्डलांत;
असे त्याचें तें, नसे तेविं, गीत;
स्तुतीकीर्तिची होय तशी वाट. ५
सृष्टि—देवीचे शब्द गुंजतात
दिवस रजनीं कर्णांत जे नितान्त
कवीच्या, तैं होऊन चिन्तनांत
मग्न, आज्ञाधर काव्यलेखनांत ! ६

मणिमंजूषा, }
६ आगष्ट, १८९९ { "आधुनिक"

# प्लेटो.

[ ९ ]

**साक्रेटिस**--बरें, थ्रासिमाकस, तुह्मीं असें ह्मणालां कीं अन्यायी मनुष्य न्यायी मनुष्यापेक्षां अधिक बलवान् असतो ?

**थ्रासिमाकस**--होय, मला असें वाटतें.

**साक्रेटिस**--तुह्मांला ही गोष्ट माहित असेलच कीं, कांहीं राष्ट्रें अन्यायानें दुसऱ्या राष्ट्रांना जिंकून त्यांतील लोकांना आपले गुलाम करितात ?

**थ्रासिमाकस**--आहे.

**साक्रेटिस**--ही जी कांहीं राष्ट्रांना शक्ति असते, ती प्राप्त होण्याला किंवा तिचा उपयोग करण्याला न्यायाची आवश्यकता असते किंवा अन्यायाची ?

**थ्रासिमाकस**--तुमचें मत खरें असल्यास न्यायाची, माझ्या मताप्रमाणें अन्यायाची.

**साक्रेटिस**--तुह्मांला असें वाटतें काय, कीं जे लोक--मग ते एका राष्ट्रांतील असोत, एका सैन्यांतील असोत, किंवा एखाद्या दरवडेखोर टोळींतील असोत--एकमेकांशीं भांडतात, एकमेकांना इजा करितात व ज्यांचा एकमेकांवर विश्वास नाहीं, अशा लोकांना कोणतेंही काम संघानें करितां येईल ?

**थ्रासिमाकस**--नाहीं.

**साक्रेटिस**--पण जर ते एकमेकांना इजा न करितां एकोप्यानें वागतील, तर त्यांना तेंच काम करण्याची शक्ति अधिक असेल किंवा नाहीं ?

**थ्रासिमाकस**--होय.

**साक्रेटिस**--याचें कारण असें नाहीं काय, कीं अन्यायामुळें राष्ट्रामध्यें अनेक पक्ष होतात, ते एकमेकांचा द्वेष करूं लागतात, एकमेकांशीं लढतात, व सरते शेवटीं एकमेकांचा नाश करितात; परंतु न्यायाच्या योगानें राष्ट्रांतील सर्व लोकांमध्यें एकी व परस्परस्नेहभाव उत्पन्न होतो ?

**थ्रासिमाकस**--कबूल आहे.

**साक्रेटिस**--अर्थात् तुह्मांला कबूल आहे कीं, द्वेष हा अन्यायाचा परिणाम असल्यामुळें, ज्या लोकांमध्यें अन्याय असेल त्यांच्यामध्यें दुफळी व वैमनस्य उत्पन्न होऊन, ते एकोप्यानें वागण्याला असमर्थ होतील ?

**थ्रासिमाकस**--होय.

**साक्रेटिस**--इतकेंच नव्हे, तर तो जर दोन मनुष्यांमध्यें असला तर ते एकमेकांचे शत्रु बनतील ?

**थ्रासिमाकस**--होय.

**साक्रेटिस**--आणि कल्पना करा कीं, एकाच मनुष्यामध्यें अन्याय आहे. तुह्मांला असें वाटतें काय, कीं अन्यायानें वागण्याला आरंभ करण्यापूर्वीं जी त्याला शक्ति होती ती शक्ति त्याला नंतर राहील ?

**थ्रासिमाकस**--कां बरें राहणार नाहीं?

**साक्रेटिस**--कारण अन्यायाचा असा परिणाम नाहीं काय, कीं जेथें जेथें तो उत्पन्न होतो,--मग तो राष्ट्रांत असो, सैन्यांत असो, कुटुंबामध्यें असो, किंवा कोणत्याही इतर मनुष्यसमुदायांत असो,--त्या त्या ठिकाणीं दुफळी होऊन एकोप्यानें वागण्याची शक्ति नाहींशी होते; ह्मणजे तो समुदाय आपल्या स्वतःचा व इतरांचा शत्रु होतो ?

**थ्रासिमाकस**--हें मला कबूल आहे.

**साक्रेटिस**--याच नियमानें एकाच मनुष्यामध्यें जरी अन्याय असला तरी तो आपला

स्वभाव सोडीत नाहीं,-ह्मणजे अन्यायामुळें तो मनुष्य आपला व इतर मनुष्यांचा शत्रु होतो?

थ्रासिमाकस—हें उघड आहे.

साक्रेटिस-त्यामुळें अर्थात् त्याचें कोणतीही गोष्ट करण्याचें सामर्थ्य कमी होतें?

थ्रासिमाकस—खरें आहे.

साक्रेटिस—तर मग असें सिद्ध झालें कीं, न्यायी मनुष्य अन्यायी मनुष्यापेक्षां अधिक शहाणा, सदाचरणी व शक्तिमान्; अन्यायी मनुष्यांना किंवा राष्ट्रांला एकोप्यानें वागण्याची कधींच शक्ति असत नाहीं, आणि ह्मणूनच अशा प्रकारचीं सर्व राष्ट्रें ऱ्हास पावतात किंवा इतर राष्ट्रांकडून पराभूत होऊन दास्य भोगतात. जर आपणाला असें एखादें राष्ट्र आढळलें कीं, जें दिसण्यांत अन्यायी असून दुसऱ्या राष्ट्रांवर अमल करितें किंवा दुसऱ्या राष्ट्रांकडून पराभूत होत नाहीं, तर खात्रीनें असें समजावें कीं, त्याच्यामध्यें न्यायाचा कांहीं अंश अद्यापि शिल्लक राहिला आहे. ज्याक्षणीं न्याय पूर्णपणें नाहींसा होईल त्याक्षणीं त्याची सर्व सत्ता व सामर्थ्य नष्ट होऊन, ज्यांच्यामध्यें न्याय-अर्थात् एकोपा-आहे अशा लोकांकडून तें जिंकिलें जाऊन दास्यांत पडेल. असो, आपल्या संवादामध्यें असा एक प्रश्न निघाला होता कीं, न्यायी मनुष्य अधिक सुखी किंवा अन्यायी मनुष्य?

थ्रासिमाकस—मी ह्मणतों कीं, अन्यायी मनुष्य अधिक सुखी.

साक्रेटिस—बरें, पण घोड्याचा किंवा इतर कोणत्याही जनावराचा किंवा वस्तूचा विशेष कांहीं उपयोग आहे किंवा नाहीं?

थ्रासिमाकस—होय.

साक्रेटिस—आणि कोणत्याही प्राण्याचा किंवा वस्तूचा विशेष उपयोग ह्मणजे-जो उपयोग तो प्राणी किंवा ती वस्तु यांच्याशिवाय इतर कोणत्याही प्राणी किंवा वस्तु यांच्यापासून मुळींच किंवा तितका चांगला होणार नाहीं?

थ्रासिमाकस—होय.

साक्रेटिस—आणि ज्या ज्या प्राण्यापासून किंवा वस्तूपासून कांहीं विशेष उपयोग होतो त्या त्या प्राण्याच्या किंवा वस्तूच्या अंगीं कांहीं विशेष गुण असतो?

थ्रासिमाकस—होय.

साक्रेटिस—परंतु हा विशेष गुण जर एखाद्या वस्तूंतून नष्ट झाला तर तो नष्ट झाल्यानंतर त्या वस्तूचा विशेष उपयोग होईल?

थ्रासिमाकस—अर्थात् नाहीं.

साक्रेटिस—ह्मणजे तो गुण त्या उपयोगाचें कारण असल्यामुळें, कारण नाहींसें झाल्यामुळें त्याचें कार्यही नाहींसें होतें?

थ्रासिमाकस—बरोबर आहे.

साक्रेटिस-मनुष्याच्या आत्म्यापासून असा कांहीं विशेष उपयोग आहे काय, कीं तो दुसऱ्या कोणत्याही वस्तूपासून होणार नाहीं?

थ्रासिमाकस—होय, उदाहरणार्थ, विचार करणें, देखरेख करणें, अमल करणें.

साक्रेटिस—तसेंच आत्म्याशिवाय मनुष्याला जिवंत राहतां सुद्धां येणार नाहीं?

थ्रासिमाकस—नाहीं.

साक्रेटिस—आणि ज्याअर्थीं आत्म्यापासून हे विशेष उपयोग होतात त्याअर्थीं त्याच्यामध्यें कांहीं विशेष गुणही असले पाहिजेत?

थ्रासिमाकस—असलेच पाहिजेत.

साक्रेटिस-आणि हे गुण जर कांहीं कारणा-

नें नष्ट झालें अशी कल्पना केली तर आत्म्यापासून वरील उपयोग होणार नाहीं?

**थ्रासिमाकस**—उघडच आहे.

**साक्रेटिस**—आणि विपरीत गुण असले तर त्यांपासून परिणामही विपरीत होईल?—ह्मणजे अविचार, देखरेखीमध्यें अव्यवस्था, वाईट प्रकारचा अमल ?

**थ्रासिमाकस**—होय.

**साक्रेटिस**—पण न्याय हा आत्म्याचा विशेष गुण व अन्याय हा दुर्गुण असें आपण पूर्वींच कबूल केलें आहे?

**थ्रासिमाकस**—केलें आहे खरें.

**साक्रेटिस**—तर ज्याच्यामध्यें हा गुण—ह्मणजे न्याय—असेल तो मनुष्य योग्य रीतीनें आयुष्यक्रमण करूं शकेल, ज्याच्यामध्यें अन्याय असेल तो अयोग्य रीतीनें करील ?

**थ्रासिमाकस**—होय.

**साक्रेटिस**—परंतु जो योग्य रीतीनें आयुष्यक्रमण करितो तो सुखी असतो, अयोग्य रीतीनें करितो तो दुःखी?

**थ्रासिमाकस**—खरें आहे.

**साक्रेटिस**—ह्मणजे न्यायी मनुष्य सुखी व अन्यायी दुःखी ?

**थ्रासिमाकस**—कबूल आहे.

**साक्रेटिस**—आणि सुख ह्मणजे फायदा व दुःख ह्मणजे तोटा ?

**थ्रासिमाकस**—उघडच आहे.

**साक्रेटिस**—तर मग न्यायापेक्षां अन्यायानें कधींही अधिक फायदा होणार नाहीं ?

**थ्रासिमाकस**—तुह्मांला असें ह्मणणें आवडतें तर त्याला माझी हरकत नाहीं.

**ग्लाकन**—साक्रेटिस, तुमच्या मनांत निष्फळ संभाषण करावयाचें आहे, किंवा अन्यायापेक्षां न्याय अधिक फायदेशीर अशी आमची खात्री करावयाची आहे. ?

**साक्रेटिस**—तुमची खात्री करावी अशी माझी मनापासून इच्छा आहे.

**ग्लाकन**—तर मग तुमचा उद्देश अझून सिद्धीस गेला नाहीं. मी तुह्मांला असा प्रश्न विचारितों कीं, ज्यांना आपण इष्ट वस्तु ह्मणतों त्यांचा एक वर्ग असा आहे कीं, त्या स्वभावतःच इष्ट असतात, ह्मणजे परिणामाकडे न पाहतां त्यांची आपण इच्छा करितों,—उदाहरणार्थ, शुद्ध सुख ?

**साक्रेटिस**—होय.

**ग्लाकन**—इष्ट वस्तूंचा दुसरा असा एक वर्ग आहे कीं, त्या स्वभावतः इष्ट असतात, इतकेंच नाहीं, तर त्यांचा परिणामही इष्ट असतो; उदाहरणार्थ—आरोग्य, ज्ञान ?

**साक्रेटिस**—हेंही मला कबूल आहे.

**ग्लाकन**—इष्टवस्तूंचा आणखी एक असा वर्ग आहे कीं, त्या स्वभावतः इष्ट नसतात, तर त्यांचा परिणाम इष्ट असल्यामुळें, आपण त्यांची इच्छा करितों; उदाहरणार्थ, रोगी मनुष्याची निगा करणें, पैसा मिळविण्याकरितां श्रम करणें ?

**साक्रेटिस**—होय.

**ग्लाकन**—आतां तुमच्या मतें न्याय जर इष्ट आहे, तर तो या तीन वर्गांपैकीं कोणत्या वर्गांत येतो ?

**साक्रेटिस**—दुसऱ्या वर्गांत.

**ग्लाकन**—याविषयीं मतभेद आहे. पुष्कळ लोकांचें असें मत आहे कीं, न्याय वरीलपैकीं तिसऱ्या वर्गांत येतो. ह्मणजे ते असें ह्मणतात कीं, न्यायापासून जर आपणाला इतर इष्ट वस्तु प्राप्त होणार नाहींत, तर आपण न्यायाची मुळींच इच्छा करणार नाहीं.

**साक्रेटिस**—पुष्कळ लोक असें ह्मणतात हें मला माहित आहे, आणि थ्रासिमाकस सुद्धां याच मताचें प्रतिपादन करितात. परंतु मी इतका मंदमति आहें कीं, तें मत खरें आहे अशी अजून माझी खात्री होत नाहीं.

**ग्लाकन**—तर मग आपण जरा या गोष्टीचा विचार करूं. कारण, न्याय व अन्याय यांच्याविषयीं माझेंही अद्याप ठाम मत झालेलें नाहीं. तर पहिल्यानें न्याय व अन्याय यांच्यापासूनें होणारे परिणाम एकीकडेस ठेवून, केवळें न्यायीपणा व अन्यायीपणा यांचा आपणें विचार करूं. आतां ज्याअर्थीं कोणत्याही वादग्रस्त विषयासंबंधानें निर्णय करण्यालों दोन्ही पक्षांचें ह्मणणें प्रथम समजून घेतलें पाहिजे, त्याअर्थीं मी एका बाजूचें ह्मणणें काय आहे तें प्रथम सांगतों, नंतर तुह्मी दुसरी बाजू काय ह्मणते तें सांगा. आणि नंतर कोणत्या बाजूचें ह्मणणें खरें याचा आपण निर्णय करूं.

**साक्रेटिस**—ठीक आहे.

**ग्लाकन**—तर मग मी आरंभ करितों. लोक असें ह्मणतात कीं, अन्याय करणें हें हितकारक आहे, अन्याय सोसणें हें अहितकारक; आणि अन्याय सोसल्यापासून जें अहित होतें तें अन्याय करून जें हित होतें त्याच्यापेक्षां अधिक असतें. याकरितां जेव्हां जेव्हां आपण कांहीं अन्याय करूं, तेव्हां तेव्हां त्याच्याबद्दल आपणाला अन्याय सोसावा लागणार असें अनुभवास आलें ह्मणजे, सर्व लोक मिळून असें ठरवितात कीं, कोणीही अन्याय करूं नये, अर्थात् कोणाला अन्याय सोसावा लागूं नये. हा ठराव सर्व कायद्यांचा पाया आहे. आणि या ठरावाला अनुसरून केलेल्या कायद्यांचा हुकूम मानणें याला न्याय ह्मणतात. यावरून असें स्पष्ट झालें कीं, न्याय—ही अत्यंत इष्ट वस्तु जी, अन्याय सोसावा लागण्याच्या भीतीशिवाय अन्यायकरणें; व अत्यंत अनिष्ट वस्तु जी, अन्याय करण्याचें सामर्थ्य असल्याशिवाय अन्याय सोसावा लागणें; या दोन अतिशयांच्या मध्याचें अवलंबन आहे. आणि आपण जे न्याय करण्याला तयार असतों, त्याचें कारण असें नाहीं कीं न्याय स्वभावतः इष्ट आहे; तर इतकेंच कीं, न्याय जरी निसर्गतः अनिष्ट आहे, तरी न्यायानें वागणें हें त्याच्यापेक्षां मोठें अनिष्ट जें अन्याय सोसणें तें टाळण्याचें साधन आहे. अर्थात् ज्याला अन्याय सोसावा लागल्याशिवाय अन्याय करण्याचें सामर्थ्य आहे, असा समंजस मनुष्य कधींही न्यायानें वागणार नाहीं. आज सरकारानें असा कायदा केला कीं प्रत्येकानें आपल्या इच्छेप्रमाणें वागावें,—कोणी न्यायानें वागला ह्मणून त्याला बक्षीस मिळणार नाहीं, कोणी अन्यायानें वागला तरी त्याला शिक्षा होणार नाहीं,—तर तुह्मांला असें वाटतें काय कीं, आजपर्यंत जे मनुष्य न्यायानें वागतात ते पुढेंही न्यायानें वागतील? असें होणार नाहीं काय, कीं प्रत्येक मनुष्य जेणेंकरून आपलें हित होईल अशा प्रकारचें वर्तन करूं लागेल ? किंवा जर मनुष्याजवळ अशी एक जादू असती कीं, तिच्या योगानें दुसऱ्या कोणाला कळल्याशिवाय त्याला अन्याय करितां आला असता, तर तुह्मांला असें वाटतें काय, कीं ज्याच्या जवळ ही जादू असेल तो मनुष्य न्यायानें वागेल ? अर्थात् अशा स्थितीमध्यें कोणीही न्यायानें वागणार नाहीं. कारण जें अरिष्ट टाळण्याकरितां न्यायानें वागावें लागतें तें अरिष्टच वरील कल्पनेनें नाहींसें झालें. आणि हें जर खरें आहे, तर

निसर्गतः न्यायापेक्षां अन्याय अधिक हितकारक आहे असें ठरत नाहीं काय?

येथपर्यंत न्यायाचा व्यवहारांत प्रचार कसा झाला व लोक न्यायानें कां वागतात, या दोन मुद्यांवर एका पक्षाचें काय ह्मणणें आहे तें मीं सांगितलें. आतां या पक्षाच्या मतें अन्याय अधिक फायदेशीर कां तें सांगतों. या मताच्या स्पष्टीकरणार्थ अशी कल्पना करूं कीं, (१) एक सर्वथैव न्यायी मनुष्य आहे व दुसरा सर्वथैव अन्यायी आहे; (२) प्रत्येकास पाहिजे त्याप्रमाणें वागण्याची मोकळीक आहे; आणि (३) अन्यायी मनुष्याश आपला हेतु साधण्याची सर्व करामत माहित आहे. ही करामत असली ह्मणजे त्याला प्रसंगानुसार आपण वैद्य आहों, किंवा नौकाशास्त्रज्ञ आहों, किंवा कायदेपंडित आहों किंवा इतर कोणत्याही धंद्यामध्यें किंवा कलेमध्यें प्रवीण आहों असें लोकांना बेमालूम दाखवितां येईल:—अर्थात् या करामतीचा कळस ह्मणजे अन्याय करून आपण अगदीं न्यायी आहों असें दाखविणें, किंवा आपल्या हातून एखादी चुकी झाली तर ती दुसऱ्याला कळूं न देतां दुरुस्त करितां येणें. हें आपल्या सर्वथैव अन्यायी मनुष्याचें वर्णन झालें. आतां जो सर्वथैव न्यायी आहे तो अर्थात् केवळ साधेपणाची मूर्ति असला पाहिजे; ह्मणजे त्यानें फक्त न्यायीपणानें वागावयाचें, आपण न्यायी आहों असें लोकांना दाखविण्याचा प्रयत्न सुद्धां करितां नये—मग लोक त्याच्याविषयीं कांहींही ह्मणोत किंवा त्याच्या वर्तनाबद्दल कोणत्याही प्रकारच्या कंड्या पिकवोत. कारण जर तो आपल्या वर्तनाबद्दलचा चुकीचा समज घालविण्याचा प्रयत्न करील तर तो लोकमताला भितो असें झालें. आतां जर अशा वस्तुस्थितीमध्यें अन्यायी मनुष्यानें हा न्यायी मनुष्य अन्यायी आहे, असें एकदां लोकांचे मनांत भरून दिलें (आणि असें करणें कांहीं फारसें कठीण नाहीं), तर या दोघांपैकीं अधिक सुखी कोण होईल? हा (खरा न्यायी) मनुष्य अन्यायी आहे असें वाटल्याबरोबर लोक त्याचा अनेक प्रकारें छळ करणार नाहींत काय? ते त्याला मारितील, त्याचें द्रव्य हरण करितील त्याला तुरुंगांत कोंडतील. परंतु जो सर्वथैव अन्यायी मनुष्य आहे तो न्यायी दिसल्यामुळें लोक त्याला मान देतील, त्याला मोठमोठीं हुद्यांचीं कामें देतील, त्याचें आर्जव करितील त्याला हरएक प्रसंगीं मदत करितील; यामुळें त्याला कोणत्याही गोष्टीची वाण पडणार नाहीं; त्याला पाहिजे तितकें द्रव्य मिळेल. अर्थात् त्याच्या मित्रांची संख्या हळु हळु वाढेल व शत्रूंची कमी होईल. आणि त्याची सत्ता व सामर्थ्य हीं वाढत जातील. आणि कदाचित् शेवटीं त्याला राज्यपदही प्राप्त होईल. यावरून स्वभावतः अन्याय न्यायापेक्षां हजारों पटीनें अधिक, फायदेशीर आहे असें सिद्ध होत नाहीं काय?

**आडीमांटस**—ही गोष्ट खरी आहे कीं, आईबाप आपल्या मुलांना व शिक्षक आपल्या विद्यार्थ्यांना "तुह्मी नेहमीं न्यायानें वागा" असा उपदेश करितात. परंतु या उपदेशाचें खरें कारण हें नाहीं कीं, केवळ न्याय निसर्गतः हितकारक आहे; तर लोकांना आपण न्यायी आहों असें वाटलें पाहिजे. कारण एरवीं ते आपणावर विश्वास ठेवणार नाहींत; आणि लोकांचा आपणावर विश्वास नसला, ह्मणजे आपण नानातऱ्हेच्या संकटांत पडून त्यांतून पार पडण्याला आपणाला कोणाचें साहाय्य मिळत नाहीं. ह्मणजे आपणाला सुखानें आयुःक्रमण

करितां यावें ह्मणून आपण न्यायी आहों असें लोकांना दाखविलें पाहिजे, न्याय केलाच पाहिजे असें नाहीं; इतकेंच नव्हे, तर मोठमोठे साधु सुद्धां असा उपदेश करितात कीं "न्याय हें सुखाचें साधन आहे. जर तुह्मांला इहलोकीं व परलोकीं सुख पाहिजे तर तुह्मीं न्यायानें वागा." यावरून असें सिद्ध होत नाहीं काय, कीं उलट पक्षाच्यामतें सुद्धां न्याय हें केवळ सुखाचें साधन आहे. आणि वर सांगितल्याप्रमाणें सुखी होण्याला खरोखर न्यायी असण्याची अवश्यकता नाहीं, तर आपण न्यायी आहों असें लोकांना भासविलें पाहिजे, आणि असें करण्याचें सामर्थ्य न्यायी मनुष्यापेक्षां अन्यायी मनुष्याला अधिक असतें.

याप्रमाणें जर केवळ सुखाचें साधन ह्मणून न्याय इष्ट आहे, आणि अन्यायी असून न्यायी दिसणें हें सर्व सुखाचें साधन आहे, तर खरोखर न्यायी व्हा असा जो तुमच्यासारखे लोक उपदेश करितात तो कोणत्या आधारावर हें आतां तुह्मीं सांगा.

साक्रेटिस—अहो, पण आपण आपला मुख्य प्रश्न अगदीं विसरून गेलों. आपला पहिला प्रश्न "न्याय ह्मणजे काय" हा होता, आणि तो एकीकडे ठेऊन, "न्यायापासून अधिक फायदा किंवा अन्यायापासून अधिक फायदा" या प्रश्नाचा आपण विचार करीत बसलों आहों. परंतु "न्याय ह्मणजे काय" हेंच जर आपणाला माहित नाहीं, तर "न्यायापासून अधिक फायदा किंवा अन्यायापासून—" याचा आपणाला कसा निर्णय करितां येईल ? याकरितां आपण "न्याय ह्मणजे काय" या प्रश्नाचा प्रथम विचार करूं. आणि या प्रश्नाचा विचार करण्याचा एक सुलभ मार्ग सुचला आहे. तो तुह्मांला पसंत आहे कीं काय पहा.

आडीमांटस—तो कोणता ?

साक्रेटिस—एक मनुष्य रस्त्यानें चालला होता. जातां जातां त्याला एक पाटी दिसली. त्या पाटीवर कांहीं लिहिलें होतें. अर्थात् तें समजून घेण्याची त्याला इच्छा झाली. परंतु त्या बिचाऱ्याला वाचतां येत नव्हतें, तो त्या पाटीजवळ उभा आहे इतक्यांत दुसरा एक मनुष्य तेथें आला. या मनुष्याला त्यानें त्या पाटीवर काय लिहिलें आहे असा प्रश्न केला. या मनुष्याला वाचतां येत होतें, परंतु ती पाटी फार उंच होती व अक्षरें बारीक होतीं, त्यामुळें त्याला तीं वाचतां येईनात. आतां अशा स्थितीमध्यें जर त्यांना समजलें कीं, त्या पाटीवर जो मजकूर बारीक अक्षरांनीं लिहिला आहे, तोच मजकूर जवळच दुसऱ्या एका पाटीवर ठळक अक्षरांनीं लिहिलेला आहे, तर त्यांना हें समजण्यापासून मोठा उपयोग होईल किंवा नाहीं?

आडीमांटस—अर्थात् होईल. कारण त्या दुसऱ्या पाटीजवळ जाऊन तो मजकूर त्यांना समजून घेतां येईल. परंतु या तुमच्या गोष्टीचा "न्याय ह्मणजे काय" या प्रश्नाशीं कसा संबंध पोंचतो हें आह्मांला समजत नाहीं.

साक्रेटिस—या गोष्टीचा प्रस्तुत विषयाकडे संबंध असा कीं, न्याय मनुष्यव्यक्तीमध्यें जसा असतो तसाच तो समाजामध्यें किंवा राष्ट्रामध्यें असतो.

आडीमांटस—कबूल आहे.

साक्रेटिस—आणि समाज किंवा राष्ट्र व्यक्तीपेक्षां मोठें ?

आडीमांटस—अर्थात्.

साक्रेटिस—ह्मणून व्यक्तीपेक्षां राष्ट्रामध्यें न्याय व अन्याय अधिक ठळक रीतीनें व्यक्त असले पाहिजेत ?

आडीमांटस—होय.

साक्रेटिस—याकरितां आपण न्याय व अन्याय यांचा राष्ट्राच्या संबंधानें प्रथम विचार करून नंतर त्याचा व्यक्तींच्या संबन्धानें करूं ?

आडीमांटस—ठीक आहे.

साक्रेटिस—परंतु कोणतेंही विद्यमान राष्ट्र घेतलें, तर त्याचीं वेगवेगळीं अंगें कोणतीं, त्यांचा परस्पर संबंध काय, व त्यांचा उपयोग काय हें कदाचित् आपल्या चांगलें लक्षांत येणार नाहीं; व त्यामुळें न्याय व अन्याय यांचा राष्ट्राच्या संबंधानें विचार करण्यांत आपल्या कडून चुका होतील ?

आडीमांटस—खरें आहे.

साक्रेटिस—याकरितां एका नवीन राष्ट्राची वसाहत होत आहे अशी कल्पना करून त्याचीं निरनिराळीं अंगें कशीं व कां उत्पन्न होतात याविषयीं आपण प्रथम विचार करूं.

आडीमांटस—हा बेत फार उत्तम दिसतो.

## " दिवसधूसरशशी"स.

[ दिंड्या. ]

वदें चंद्रा कां म्लान वदन केलें ?
तेज सारें तव लुप्त काय झालें ?
किरणसंचय कां नष्ट सांग होई ?
धैर्यनिधि कां तव आज लया जाई? १

कोण संकट बा घोर तुला येत ?
छिन्नशक्ती तुज करुनि दुःख देत ?
काय चित्तीं उत्पन्न होय चिंता—
प्रभा कोमेजुनि जात जयें आतां ? २

मनीं वाटे कां सदा प्रकाशावें ?
सर्व सज्जन जन तुष्ट ते करावे ?
स्तुत्य इच्छा; जंव सूर्य थोर आहे,
इष्ट तृप्ती होईल कशी बा हे ? ३

नभीं तळपे हा सूर्य अमित तेजें;
स्वांशुबलयोगें श्रेष्ठसा विराजे;
अवन जगताचें करुनि, पुण्यवन्त,
सदय मानस, रक्षितो जन अनन्त. ४

जला शोषुनियां, जलद अंबरांत
स्वकरशक्तीनें नित्य खेळवीत;
वृष्टि तेणें हो भूवलीं सदा या;
विपुल धान्योद्भव होय; मिळे खाया. ५

किती वर्णूं ? निःशक्त गमे वाचा;
कसा गौरव अल्पधी करूं याचा ?
नको चंद्रा मात्सर्ययुक्त होऊं !
नको ईशाचा कोप करुनि घेऊं ! ६

नको स्पर्धा बा थोर जनांपाशीं !
व्यर्थ पडणें ना युक्त मोहपाशीं !
रवी तेजानें तुला लोपवील,
तुझे चंद्रा होतील तयीं हाल ! ७

"जलौघानें" शशि ! "वृक्ष थोर जाती,
"परी लोहाळें नम्र वांचताती."
संत संतत हें तत्व सांगताती;
योग्य तुजलाही हीच असे रीती. ८

अन्य देशीं जाईल तमोहंता,
निशा व्यापिल भू धरुनियां अहंता,

करीं शिक्षा तंव दुष्ट अंधकारा
नष्ट करुनीयां तद्गतां विकारा! ९
वसें रात्रीं या नभोमंडलांत
सर्व तारागण घेउनी समेत!
रवी येइल ना राज्य हरायाला,
तुझी सत्ता विच्छिन्न करायाला. १०
रमें रमणीसह रम्य निशाकालीं!
करीं वर्तन ना स्वेच्छ वा अकालीं!
ईश तुजवर होईल तुष्ट तेणें!
उणें नाहीं मग जगीं मुळीं जाणें! ११
जगज्जनकें कर्तव्य नेमियेलें;
तेंच करणें, सज्जनीं बोधियेलें;
नको आशा, हव्यास अणिक कांहीं;
सौख्य जगतीं यापरी दुजें नाहीं. १२

मणिमंजूषा. विहंग.

## मिसेस् कृपाबाई सत्यनाधन.

वरील विद्वान् व कुलीन महाराष्ट्र स्त्रीचें नांव मराठी वाचकांस फारसें माहीत असेल असें वाटत नाहीं. कारण तिच्याबद्दल मराठींत कांहीं लिहिलें गेलें असल्याचें कोठें आढळलें नाहीं. * ही गोष्ट योग्य नाहीं. कारण तिचा वृत्तांत फार मनोहर व बोधकारक असून तो प्रत्येक महाराष्ट्रीयास अभिमानास्पद वाटण्यासारखाही पण आहे. ज्या विद्वान स्त्रीस इंग्रजी भाषेंतल्या प्रसिद्ध कादंबरीकारांमध्यें स्थान मिळण्यास ती योग्य आहे असा दाखला इंग्रजींत निष्णात अशा परदेशस्थ विद्वान् गृहस्थांनीं बहुतेक बहुमतानें दिला आहे. एतद्देशीय इंग्रजी कादंबरीकारांत जिला पहिला मान प्राप्त झाला आहे, जिच्या कादंबरीविषयक ग्रंथांचा बहुमानपूर्वक स्वीकार आपल्या पूज्य व सर्वमान्य चक्रवर्तिनी महाराणी साहेबांनीं करून त्यांच्या वाचनानें आपल्यास फार आनंद झाला असे उद्गार काढले, मिसेस ग्रीग व चापमन अशा प्रसिद्ध विदुषींनीं जिचें चरित्र लिहिलें आहे, जिच्या स्मारकास मद्रासेस ७००० रुपये जमले व त्या प्रीत्यर्थ जमलेल्या सभेस लेडी वेनलाक, नामदार अरंडेल असे बडे लोक येऊन त्यांनीं या कामांत आपली सहानुभूति दाखवून त्यास मोठ्या उत्साहानें व उल्हासानें साह्य दिलें, अशा स्वराष्ट्रीय विदुषीच्या वृत्तांताबद्दल जिज्ञासा, आदर, व अभिमान, हीं उत्पन्न न झालीं तर जगांत वरील उदार मनोवृत्तींस उत्तेजक असा कांहींच विषय नाहीं असें होईल. तेव्हां तिच्या वृत्तांतानें वरील फायदा सहज होण्यासारखा आहे. परंतु याहूनही यापासून विशेष लाभ होण्यासारखा आहे. आमच्या सांप्रतच्या समाज—स्थितीवर, स्त्रीशिक्षणावर, व समाजबंधनावर त्यापासून फार बोधपर पण उदासवाणा असा प्रकाश पडतो, तो विशेष ध्यानांत धरण्यासारखा आहे. या महाराष्ट्र ब्राह्मण विदुषीस एवढा सार्वत्रिक नांवलौकिक कोणत्या साधनांनीं प्राप्त झाला, अनेक लोकोपयोगी कामांत साह्य करण्याची शक्ति तिला कशी प्राप्त झाली, आणि तिच्या स्वजातीच्या दुसऱ्या भगिनींची स्थिति याच्या अगदीं उलट व विपरीत अशी होण्याचीं कारणें कोणतीं आहेत, आणि त्यांचें निवारण कोणत्या उपायांनीं होण्यासारखें आहे

* या स्त्रीचें एक लहान चरित्र "स्त्रीशिक्षणचंद्रिका" नांवाचें सावंतवाडी येथें एक छोटें मासिकपुस्तक निघत असतें त्यांत प्रसिद्ध झालें आहे.—संपादक.

या गोष्टींचा विचार सर्वांस करण्यास या वृत्तापासून मोठें साह्य व अवकाश मिळतो. सध्याच्या आमच्या समाजस्थितींत या प्रश्नाहून अधिक महत्वाचा, अडचणीचा व घोटाळ्याचा असा दुसरा प्रश्न क्वचितच असेल. त्याच्या उकलण्यावर बहुतेक समाजाची प्रगति अवलंबून आहे. या कार्याकडे सर्वांचें लक्ष लागलेलें आहे. त्याबद्दल भवति न भवति सर्व वर्तमानपत्रांत, मासिकांत, सभेंत थोड्या बहुत अंशानें चालू आहे. प्रत्येक विचारी हृदयांत त्याचा खल रात्रंदिवस चालू आहे. तेव्हां या प्रधान प्रश्नाचा उलगडा करण्यास या लेखानें कशी मदत मिळते तें पाहण्यासारखें आहे. याशिवाय अन्य रीतींनींही हा वृत्तांत मनोरम वाटण्यासारखा आहे. त्यापासून मनुष्यस्वभावाचे अनेक प्रकार व मासले, त्यांचे परिणाम, परदेशस्थ समाजाचें चित्र, त्याच्या संसर्गानें आपल्या समाजस्थितीवर घडलेले परिणाम आणि फरक, वगैरे अनेक मनोरंजक व बोधकारक प्रकार कळून जिज्ञासावृत्तीस चांगलें खाद्य मिळण्यासारखें आहे. इतका उपोद्घात करून आतां मुख्य विषयास आरंभ करतों. कृपाबाईचीं चरित्रें, ग्रंथ व निबंध हीं मननपूर्वक वाचून, तिचें अल्प आयुर्वृत्त, तिचा कार्यभाग, मानसिक गुण, तिच्या लेखांचें महत्व, व त्यांचें यथातथ्य स्वरूप यांबद्दल दोन शब्द यथामति लिहून, नंतर त्यांपासून कोणता बोध घेण्यासारखा आहे त्याबद्दल कांहीं विचार प्रदर्शित करीन.

कृपाबाई ही दक्षणी ब्राह्मण आईबापापांसून जन्मलेली होती. तिचा जन्म सन १८६२ सालीं फेब्रुवारी महिन्याच्या १४ व्या तारखेस अहंमदनगर येथें झाला. तिच्या आईबापांचीं नांवें अनुक्रमें **राधाबाई** व **हरिपंत** अशीं असून त्यांचें उपनांव **खिस्ती** असें होतें. या उभयतांनीं पूर्ववयांतच ह्मणजे आपल्या १९ व्या वर्षीं धर्मांतर केलें होतें. त्यांचें हुबेहुब वर्णन चरित्रनायिकेनें आपल्या "सगुणा" नामक कादंबरींत फार हृदयद्रावक रीतीनें केलें आहे. तें बहुतेक सत्यास धरून आहे असें मान्य करावें लागतें. फक्त त्यांत दोन विधानें मात्र सत्य व वस्तुस्थिति यांस अनुरूप नाहींत असें निदान जो खिस्तीधर्माची दीक्षा पावला नाहीं त्यास सहज कळण्यासारखें आहे. तीं हीं:-प्रथम विधान-हरिपंतानें हिंदुधर्मांचे सर्व ग्रंथ ( ह्मणजे वेद, शास्त्रें, पुराणें, वगैरे ) यांचें **पूर्ण** पर्यालोचन करून, त्यांचें सार ग्रहण करून, त्यांतील मतमतांतरांची तुलना करून, खिस्ती धर्ममतांशीं त्यांस ताडून, दुसऱ्यांची श्रेष्ठता पहिल्याहून अनंतपटीनें अधिक आहे अशी खात्री झाल्यावर, पहिल्यापासून मुक्तिमार्ग केवळ अप्राप्य असून दुसऱ्यापासून तो न मिळणें केवळ असंभवनीय आहे, असें पाहून मग धर्मांतर केलें ! ही गोष्ट वस्तुस्थितीस अनुरूप असणें केवळ असंभवनीय आहे, इतकेंच नव्हे, तर ती केवळ अशक्य आहे. मला हिंदुधर्मांचा फाजील अभिमान नाहीं, व खिस्तीधर्माबद्दल माझ्या मनांत अनादर किंवा तिरस्कारही नाहीं. परंतु सत्यनिष्ठेनें वरील गोष्ट उघड करणें अवश्य दिसतें. कारण प्रथमतः धर्मांतर केलें तेव्हां हरिपंताचें वय केवळ १९ वर्षांचें होतें. त्यांस संस्कृत येत होतें असें मुळींच दिसत नाहीं, इतकेंच नव्हे, पण मराठीचें देखील त्यांचें ज्ञान फार मार्मिक, गहन किंवा व्यापक होतें असें ह्मणणें फार कठीण आहे. त्यांचा एक धर्मोपदेश जो त्यांच्या मराठी चरित्रांत त्यांच्या अमोलिक गुणांचा दर्श-

क ह्मणून मोठ्या आदरानें घातला आहे, त्याची भाषा इतकी विचित्र, हास्यास्पद, परकी वेषांतर झालेली, आणि इंग्रजी न येणारास बरीच दुर्बोध अशी आहे कीं, त्यावरून त्यांच्या स्वभाषाज्ञानाचा बराच ठाव निघण्यासारखा आहे. त्या उपदेशांत Self-denial या इंग्रजी शब्दाचें भाषांतर "स्व-नकार" या मराठी पर्यायशब्दानें केलें आहे ! अशा अगाध भाषाज्ञानसामुग्रीच्या साह्यानें त्यांच्या हातून संस्कृत व मराठी धर्मग्रंथांचा मथितार्थ कसा निघाला असेल, व त्यांचें सार त्यांच्या हृदयकुंडीं कितपत जाऊन भिनलें असेल, याची कल्पना सुज्ञांस होणें फारसें कठीण नाहीं. शुद्ध इंग्रजी वाचक मात्र त्यापासून फसतील. दुसरें विधान–हिंदुधर्ममतें व तत्त्वज्ञान अष्टपैलू आहे, त्यास अनंत दिशा आहेत, परंतु त्यांत "ईश्वर हा पिता व मनुष्यजीव हा त्याचें बालक" हा भाव मुळींच नाहीं. यांत पहिली गोष्ट सत्य मानतां येईल. ह्मणजे हें धर्मविषयक तत्त्वज्ञान अष्टपैलू आहे; त्यांत अनेक मतमतांतरें भरलेलीं आहेत; त्यास पाहिजे तिकडे ओढाताण करण्यास अवकाश सांपडतो. पण त्यांत ईश्वराविषयीं पितृभाव जागृत नाहीं, ही गोष्ट निवळ असत्य आहे हें जाणण्यास संस्कृत धर्मग्रंथांसारख्या खोल पाण्यांत देखील शिरण्याची गरज नाहीं. नुसते मराठी धार्मिक कवींचे ग्रंथ फक्त वरवर चाळले तरी देखील वरील गोष्ट सहज दिसून येते. आतां वरील असत्य गोष्टी विषयनायिकेनें जाणूनबुजून लिहिल्या आहेत असें मात्र मी ह्मणत नाहीं. या विषयांत तिची अनभिज्ञता, हेंच त्याचें कारण आहे. तिच्या सत्यनिष्ठेबद्दल मला शंका येत नाहीं.

कृपाबाईनें आपल्या "सगुणा" नामक कादंबरींत आपल्या आईच्या बालपणच्या वर्णनांत आमच्या गृहस्थितीचें चित्र फार हृदयवेधक व हुबेहुब रेखाटलें आहे. त्यापासून स्त्रीशिक्षणाचा पूर्ण अभाव, व त्याचे भयंकर, हानिप्रद, दुःखमूल व अनर्थावह परिणाम मनावर ठसण्यासारखे वठले आहेत; समाजसुधारणेस व प्रगतीस त्यामुळें कसे अडथळे पावलोपावलीं येतात हें उत्तम तऱ्हेनें व्यक्त होतें. ही स० १८३२|१८३३ या सालांतली स्थिति होय असें त्यांत वर्णन आहे. पण आज स० १८९९ मध्यें देखील त्यांत कांहीं फरक झाला आहे असें नाहीं. कारण सध्या चालू असलेलें स्त्रीशिक्षण केवळ नांवाचें मात्र आहे. त्यापासून स्त्रियांच्या मनांस कांहीं संस्कार झालेला नाहीं. त्यांचे वेडगळ, खुळकट, हास्यास्पद असे अनेक धर्माचार, धर्ममतें, दुराग्रह, इत्यादिकांत कांहीं फरक पडलेला नाहीं. त्यांची बालिशता, अयुक्तता, अनर्थावहता, निरर्थकता हीं जाणण्याचें स्त्रीसमाजास ज्ञान नाहीं. आपल्या निकृष्ट स्थितीची त्यांस कल्पना नाहीं. त्यामुळें आमचा अबलासमाज आपली गृहस्थिति अत्यंत दुःखदायक व बरीच दुःसह करून घेत आहे. परंतु त्याबद्दल त्यांवर दोष येत नाहीं. त्याची जबाबदारी पुरुषावर आहे. त्याबद्दल दुःखोद्गार काढून कृपाबाई सध्याच्या दिशाभूल पडलेल्या देशाभिमानावर कोरडा ओढतात तो वाचण्यासारखा आहे. ती ह्मणते:—

Poor girls ! what can we expect from such stunted, impoverished minds ? Their mothers are no better, and their fathers have very little to do with them. Their starved minds have nothing to feed

on except such vain silly thoughts + + + No wonder then that they grow vain, flippant, inordinately fond of money or stupidly pround of their hoarded gold & jewls. No wonder that they look upon the time when they display their jewels and make an unmeaning expressionless show, as the grandest moments of their lives. The refined civilized mind shudders or looks down with pity on the exhibition as a relic of savagery; and yet these are the daughters of India whose lot is considerd as not needing any improvment by many of my countrymen who are highly cultured and who are supposed to have benefited by western civilization.

यावरून सध्या दिशा चुकलेल्या स्वदेशभक्तांनीं जरा शुद्धीवर येऊन वस्तुस्थितीकडे लक्ष दिल्यास फायदा होईल. असो.

एकंदर परिस्थितीचा विचार करतां, ख्रिस्ताचा प्रसिद्ध सार्वलौकिक प्रायश्चित्तविधि, पाद्र्यांचा भपका, भुलथापी, मोहकपणा इत्यादिकांस वश होऊन हरिपंत आणि त्यांचा बंधु नारायणराव या उभयतांनीं अल्पवयांत, सन १८३९ सालांत, धर्मांतर केलें होतें असें दिसतें. त्यावेळीं आपला स्वधर्म व परधर्म यांचें तारतम्य पाहण्याचें त्यांचें वय नव्हतें, व त्यास लागणारी सामुग्रीही त्यांस अगम्य व अप्राप्य होती. पुढें स्वीकृत धर्मावरच त्यांचा व्यासंग राहिला, त्यावरच त्यांचा चरितार्थ चालत राहिला, व पूर्वधर्माचें रहस्य कळण्याचे मार्ग त्यांस बंद झाले. अशा स्थितींत या धर्मांतरानें पहिल्या धर्माची गौणता व दुसऱ्याचा मोठासा गौरव होतो असें भाविक ख्रिस्तभक्तांवाचून इतरांस वाटायाचें नाहीं. या संबंधांत त्यांच्या स्वार्थत्यागाची महती गाइली आहे तीही फारशी सत्य नाहीं. परधर्मांत गेल्यानें हरिपंतांस काय नुकसान सोसावें लागलें ? तर स्वसमाजापासून विभक्त होणें. पण त्याऐवजीं त्यांचा इंग्रजी समाजांत प्रवेश झाला, तेथें त्यांचा आदर झाला, त्यांचें महत्व वाढलें. हिंदुसुशिक्षितांनीं त्यांशीं संबंध ठेविला नसेल हीं गोष्ट अशक्य आहे. निळकंठशास्त्री गोरे, नारायण शेषाद्रि इत्यादिकांची मान्यता ख्रिस्ती लोकांप्रमाणेंच त्यांच्या स्वजातीयांत होती ही गोष्ट सर्वमान्य आहे. खुद्द ख्रिस्तीलोकही ही गोष्ट कबूल करतात. हरिपंतांची प्राप्ति आमच्या सामान्य सुशिक्षित लोकांपेक्षां कमी होती असें दिसत नाहीं. त्यांच्या धर्मविषयक देणग्यांवरून ही गोष्ट सहज कळते. मग त्यांचा स्वार्थत्याग कोठें पाहायाचा ? उपदेशकाच्या कामांत त्यांस दुराग्रही लोकांनीं त्रास दिला हें खरें, पण ही गोष्ट केवळ याच कामास लागू आहे असें नाहीं. सर्व मार्गांत कांहीं ना कांहीं तरी त्रास, संकटें व आफती असतातच. तीं त्यांच्याच आयुष्यक्रमास लागू होतीं असें नाहीं.

या मुद्यावर एक मोठी गोष्ट विचार करण्यासारखी आहे. कोणत्याही सर्वमान्य धर्मांतर केलेल्या एतद्देशीय ख्रिस्तभक्ताचें चरित्र पहा—त्यांत बहुतेक एक प्रकार आढळतो. स्वधर्मांत असतांना त्यांच्या हृदयांत स्वपातकांची असह्य जागृति उत्पन्न होऊन त्यापासून त्यांच्या मनास एकसारखी तळमळ लागली होती, आणि तिच्या शमनार्थ स्वधर्मांत त्यांस एकही मार्ग

सांपडेना. परंतु बाप्तिस्म्याचें उदकसिंचन होतांच त्यांचा दाह लागलीच शमला व त्यांस स्वर्गीय शांति मिळाली! ख्रिस्ताच्या सार्वजनिक प्रायश्चित्तविधीनें त्यांचा सर्व पापमळ धुऊन गेला!! येथून तेथून हाच प्रकार आढळतो. आणि पुन्हां हेच लोक ब्राह्मणांच्या पावन तीर्थोदकास हंसतात, व अन्य धर्मांत मुक्तिमार्ग नाहीं ह्मणून कंठशोष करतात! अशी परधर्मासहिष्णुता निदान हिंदुधर्मांत खास नाहीं. या संबंधांत कदाचित् इतर धर्मांवर त्याचा वरचढपणाच दिसून येईल. परधर्मांत मुक्तिमार्ग व आत्मिक शांति नाहीं हें मत कितो खरें आहे बरें? जसें कांहीं आमच्या साधुवर्यांस व महात्म्यांस आत्मिक शांति कधींच लाभली नव्हती, तिचा उगम पालेस्टाईनमधूनच झाला! कोण हें धर्मवेड! "पूर्वधर्मग्रंथांत निर्दिष्ट नाहीं असें एकही नवीन धर्मतत्त्व शुभवर्तमानांत सांपडत नाहीं" असें प्रांजळपणें सत्यनिष्ठ व सर्वमान्य इंग्रज ग्रंथकारांनीं देखील मान्य केलें आहे. परंतु आमच्या धर्मांतरवासी भक्तांस तें काय होय?

हरिपंतांची मान्यता ख्रिस्ती समाजांत फार होती, आणि आपलें उपदेशकाचें काम २६ वर्षें उत्तम प्रकारें करून त्यांनीं मोठा लौकिक मिळविला. असा चांगला कार्यभाग त्यांच्या हातून इतर व्यवसायांतही झाला असता. रामदास, तुकाराम, एकनाथ, अशांच्या भक्तमंडळांत त्यांस दीक्षा मिळती तरी त्यांचा इतकाच लौकिक स्वदेशबांधवांत झाला असता. ख्रिस्तीमंडळांत, पाद्रीमंडळींत मात्र त्यांचें नांव न सतें. पण या नवीन आयुष्यमार्गक्रमणांत त्यांस एक अलभ्य लाभ अनायासें घडून आला तो दासपंथांत किंवा नाथपंथांत राहिल्यानें त्यांस मोकळा राहिला नसता. या नव्या मार्गांत त्यांनीं महारांस आपली धर्मदीक्षा देऊन शुद्ध अशा ब्राह्मणांच्या संसर्गास देखील पात्र केलें, आणि सुशिक्षणाच्या द्वारें त्यांस बऱ्याच सुस्थितींत आणण्यास साह्य दिलें. ही गोष्ट त्यांस भूषणभूत होय. सन १८६९ सालीं आपल्या वयाच्या ४९ व्या वर्षीं त्यांस देवाज्ञा झाली. त्यांनीं आपलें काम फार उत्तम केलें. त्यांच्या चरित्रांत एक गोष्ट फार आश्चर्यकारक व विलक्षण आहे. त्यांची आई ताईबाई हिनें सन १८६८ सालीं आपल्या वयाच्या जवळ जवळ सत्तराव्या वर्षीं—तिच्या मुलांनीं धर्मांतर केल्यानंतर सुमारें २९ वर्षांनीं व हरिपंत वारल्यावर ३ वर्षांनीं—ख्रिस्तीधर्माची दीक्षा घेतली, व पुढें दोन वर्षें प्रभुभोजन घेऊन देहत्याग केला. याच ह्यातारीनें आपल्या मुलांचा धर्मत्यागाविषयींचा दुराग्रह पाहून त्यांस मारण्याकरितां वीष घातलें होतें, ही गोष्ट कृपाबाईनेंच लिहिली आहे. तिला लिहितां वाचतां येत नव्हतें. स्वधर्माभिमान व परधर्मद्वेष हे जातिवंत तिच्या अंगीं वसलेले होते. तिचें असें मतांतर होणें ह्मणजे फार चमत्कारिक होय. मानवस्वभावज्ञा—त्यांस असे प्रकार फार क्वचित् पाहण्यास मिळतील ह्मणून मुद्दाम ही गोष्ट येथें दिली आहे.

हरिपंत वारले तेव्हां विषयनायिकेचें वय ३ वर्षांचें होतें. तिचें पूर्व शिक्षण घरींच तिची एक बहीण व भाऊ यांच्या हस्तें सुरू झालें. पुढें दोघां मिशनरी बायांच्या द्वारें व मुंबईस मुलींच्या मिशनरी हायस्कुलांत तिचा इंग्रजी भाषेंतला शिक्षणक्रम पुरा होऊन, तिचा इंग्रजी वैद्यकांत प्रवेश झाला. पुढें तिची इंग्रजी वैद्यकांत बरीच गति होऊन तिच्या मनांत या शाखेंत परीक्षा देऊन पदवीधर होण्याची फार

इच्छा होती. हा तिचा विचार तिच्या आश्रयदात्यांस पसंत पडून त्यांनीं तिला या कामाकरतां विलायतेस पाठविण्याचा बेत केला; परंतु या कामांत डाक्तराची संमति मिळाली नाहीं. विलायतेची हवा तिच्या नाजुक शरीरप्रकृतीस मानवणार नाहीं, असा निकाल इंग्रजी वैद्यांनीं केल्यामुळें हा विलायतेस जाण्याचा बेत फसला. याच सुमारास मद्रास युनिव्हर्सिटीनें मेडिकलकॉलेजांत स्त्रियांस शिक्षण देण्याची परवानगी दिली होती. त्यामुळें या ठिकाणीं तिनें अभ्यास पुढें चालविण्याचा निश्चय करून त्या वर्गांत ती सामिल झाली. पुढें वार्षिक परीक्षेंत रसायनविद्येशिवाय इतर सर्व विषयांत तिचा पहिला नंबर आला. या समयीं तिनें आपला अभ्यास जिवाकडे न पाहतां फारच मेहनतीनें केल्यामुळें तिची शरीरप्रकृति फारच घसरली; ती इतकी, कीं पुनः सुधारून हा अभ्यास शेवटास नेण्याचें सामर्थ्य तिला मुळींच प्राप्त झालें नाहीं, व तिला तो क्रम सोडून द्यावा लागला.

सन १८८३ च्या जुलै महिन्यांत मि० सत्यनाधन, मद्रास प्रेसिडेंसी कॉलेजांतले लॉजिक व मॉरल फिलासफीचे प्रोफेसर, या विद्वान् पदवीधर व एतद्देशीय ख्रिस्ती कुलीन गृहस्थाशीं तिचा विवाह झाला. त्यांच्या संगतींत तिनें ११ वर्षें काढलीं. या अवधींत पतिसमागमें तिनें दोन वर्षें उटकमंड येथें काढलीं. त्या ठिकाणीं होबर्ट नामक मुलींच्या शाळेंत तिनें सुपरिंटेंडेंटचें काम पत्करलें आणि तेथल्या शिक्षणपद्धतींत पुष्कळ सुधारणा केल्या. याशिवाय या ठिकाणीं यवनांच्या मुलींकरितां तिनें एक दुसरी शाळा सुरू केली होती. ही शाळा सांप्रत मिशनरींच्या आश्रयाखालीं मोठ्या सुस्थितींत आहे.

याच सुमारास कृपाबाईनें आपले निबंधलेख लिहिण्यास प्रारंभ केला. प्रथम हे लेख "इंडियन लेडी" या सहीनें "सौथ इंडिया आब्झर्व्हर" या इंग्रजी पत्रांत प्रसिद्ध होत असत. त्यांची लवकरच चोहोंकडे वाहवा होऊं लागली. ते प्रथम प्रायः सृष्टिवर्णनात्मक असून त्यांत मध्यें मध्यें मनुष्यस्वभावाचें फार बहारीचें वर्णन आलें आहे. पुढें राजमंद्री नामक स्थळीं तिनें एक वर्ष काढलें. या ठिकाणीं तिच्या जिवावरचें एक दुखणें गेलें, आणि त्यामुळें तिला फार क्षीणता आली. तरी तिचें लिहिण्याचें काम अगदीं बंद पडलें नाहीं. यावेळीं तिनें "न्याशनल इंडियन जर्नल" नामक पत्रांत आणि दुसऱ्या कित्येक मासिकांत व वृत्तपत्रांत अनेक लेख लिहिले. त्यांची चोहोंकडे तारीफ व प्रशंसा झाली. यापुढें कुंभकोन येथें तिचें एक वर्ष गेलें. या ठिकाणींही ती स्वस्थ बसली नाहीं; तिचा लेखनक्रम अव्याहत सुरू होता याशिवाय यावेळीं इंग्रजींत कविता करण्याचा नवा व्यासंग तिनें आरंभिला. प्रथम प्रथम तिला ही नवीन पदरचनापद्धति फार जड जाऊं लागली व नीट साधेना. परंतु कांहीं वेळानें त्या कठीण कामांतही तिची बरीच गति झाली व तिला बरेंच यश मिळालें.

सन १८८६ च्या सुमारास तिच्या पतीस मद्रास प्रेसिडेन्सी कॉलेजांत प्रोफेसराची जागा मिळाली, तेव्हां ती मद्रासेंत येऊन राहिली. याठिकाणीं तिचीं आठ वर्षें गेलीं. या काळांत तिनें आपल्या "सगुणा" व "कमला" या दोन कादंबऱ्या लिहिल्या. त्या प्रथम वृत्तपत्रांत भागशः प्रसिद्ध होऊन पुढें पुस्तकरूपानें छापल्या गेल्या. त्यांची विलायतेंत फार प्रशंसा झाली, आणि पहिलीचें तर विलायतेंतल्या कांहीं दुसऱ्या भाषांत भाषांतरही झालें आहे. इंग्रज लोकांत त्यांची फार मान्यता आहे. पुष्कळ वि-

द्वानांनीं तर कृपाबाई ही उत्तम कादंबरीकारांत पद मिळण्यास पात्र आहे असें प्रांजळपणें मान्य केलें आहे. "सगुणें"त एतद्देशीय ख्रिस्ती लोकांच्या गृहस्थितीचें वर्णन फार मार्मिक असून, त्यांतला बराच भाग ग्रंथकर्त्रीचाच खुद्द स्वचरित्रमय आहे. "कमलें"त हिंदु गृहस्थितीचें वर्णन आहे. या दोन्ही गोष्टींत संविधानकाची मोठीशी करामत किंवा बहार आहे असा प्रकार नाहीं. परंतु त्यांत सृष्टिवर्णन, मनुष्यस्वभावाचे निरनिराळे मासले, आणि मध्यें मध्यें धर्म, नीति, जगाची रहाटी, सृष्टिरचना, इत्यादि अनेक विषयांवर फार मार्मिक, मनोहर, पोक्त आणि व्यापक असे विचार ग्रथित केले आहेत. ते वाचतांना मन फार तल्लीन होऊन जातें. आणि ग्रंथकर्त्रीची जी एवढी मान्यता झाली ती केवळ यथार्थ आहे असें कबूल करणें भाग पडतें. असो; पुढें विषयनायिकेच्या मानसिक गुणांचें विस्तारपूर्वक वर्णन द्यावयाचें योजिलें आहे, त्यांत या संबंधानें जास्त माहिती मिळेल. सध्या तिच्या चरित्रांतला राहिलेला थोडासा भाग सादर करतों.

कृपाबाई फार बुद्धिवान् होती, आणि बहुतेक बुद्धिवंतांप्रमाणें तिची शारीरप्रकृति फार नाजुक आणि अशक्त होती. अल्पवयांत तिला अनेक जिवावरचीं दुखणीं गेलीं. तिच्या लहानपणीं तिचा एक जिवलग वडील भाऊ भास्कर हा अल्पवयांतच क्षयानें मरण पावला. त्यामुळें तिला इतका मोठा धक्का बसला कीं, त्यापासून तिची प्रकृति पुष्कळ महिनेपर्यंत थाऱ्यावर आली नाहीं. तिचें बंधुवियोगाचें दुःख मरेपर्यंत पूर्ण बुजलें नाहीं; आणि त्याचें स्मरण झालें कीं, तिचें देहभान राहत नसे. तिचा स्वभाव पराकाष्ठेचा प्रेमळ, ऐहिक सुखदुःखांसंबंधानें आणि जगिक मानापमानाविषयीं फार कोमल असा होता. जगांतल्या विषमावस्थेला टक्कर देण्यासारखा मनाचा खंबीरपणा व दृढता हीं तिच्यांत मुळींच नव्हतीं. त्यामुळें ती मनांत फार झुरत राही. पुढें अभ्यासाच्या श्रमानें तिला इतकी क्षीणता प्राप्त झाली कीं, तिजमुळें तिला आपल्या वैद्यविद्येचा अभ्यासक्रम देखील सोडून द्यावा लागला. पुढें सुदैवानें तिचा जन्म सुखी करण्यासारखा जन्माचा सोबती तिला मिळाल्यावर ती आपलें दुःख कांहींसें विसरते न विसरते, तों कुंभकोण येथें असतां तिच्या कोठ्यांत कांहीं रोग झाला; त्यांत तिच्या दोन धमन्या फुटल्या. त्यामुळें तिची जीविताशा बहुतेक नष्ट झाल्यासारखीच होती. परंतु दैवयोगानें त्यांतून ती कांहींशी बरी झाली. पुढें तिला एक कन्या झाली, पण ती दुर्दैवानें कांहीं काळानें मरण पावली. त्यामुळें तर तिच्या दुःखास पारावार राहिला नाहीं. तिची वृत्ति अत्यंत उदासीन झाली, आणि तिला कांहींच गोड लागेना आणि चैन पडेना. हा दुःखभार कांहींसा हलका व्हावा ह्मणून तिनें यापुढें सतत लेख लिहिण्याचा क्रम सुरू ठेविला. तिच्या कोठ्यांतला रोग असाध्य आहे आणि त्यानें तिचा केव्हां अंत होईल याचा नेम नाहीं असें इंग्रजी वैद्यांनीं निदान केलें. हा निकाल तिनें मोठ्या गंभीरपणानें व शांतपणानें श्रवण केला; आणि त्यामुळें तिच्या बाह्य वृत्तींत कांहीं चलबिचल झाली नाहीं. ती आपला व्यवसाय बहुतेक शेवटपर्यंत करीत होती. "कमला" कादंबरी शेवटपर्यंत लिहिण्यास आपण जिवंत राहूं अशी तिला आशा नव्हती, ह्मणून शेवटीं शेवटीं—शरीरांतला ज्वर १०४ अंशांवर असतांही त्यांतला अखेरचा भाग लिहिण्यास कृपाबाई

आपल्या पतीस तोंडानें सांगत असे. "एतद्देशीय साधी गरीब अबला देखील कांहीं उपयुक्त काम करूं शकते असें मला जगास दाखवावयाचें आहे" असें ती नेहेमीं ह्मणे. ही तिची सदिच्छा परमेश्वरानें पूर्ण केली. तिची दुसरी कादंबरी तिच्या हस्तें संपूर्ण होऊन तिच्या हयातींत छापून प्रसिद्ध झालेली तिनें पाहिली. याच सुमारास आपल्या श्वशुराच्या धर्मांतरावर तिनें एक लेख लिहिला. तोही सर्वांस फार पसंत पडला. नंतर आपल्या सासूनें शिक्षणसंबंधांत केलेल्या कार्यभागाबद्दल तिनें आणखी एक निबंध लिहिला, त्याचीही बरीच प्रशंसा झाली. परंतु दिवसें दिवस ती जास्त जास्त खंगत चालली. तिच्या सर्व मानसिक शक्ति अखेरपर्यंत एकसारख्या तरतरीत होत्या. मरेपर्यंत तिची शांत वृत्ति नष्ट झाली नाहीं; उलट मानसिक कष्ट करण्याचा तिचा हव्यास वाढतच होता. "माझा कार्यभाग मला लवकर केला पाहिजे" असें ती नेहमी ह्मणे. तिला बरें वाटावें ह्मणून तिच्या पतीनें उपलब्ध होते ते सर्व उपाय केले. हवा बदलण्याकरितां अनेक स्थलांतरें केली, परंतु कशानें बरें ह्मणून वाटलें नाहीं. तिच्या अंतकाळीं तिची शुश्रूषा करण्यास तिची एक नणंद फार झटत असे, आणि तिजवर कृपाबाईचें फार प्रेम बसलें होतें. ही नणंद एकाएकीं वाख्यानें कृपाबाईच्या डोळ्यांसमोर वारली. या शेवटच्या धक्क्यानें तिनें फारच हाय खाल्ली. अगोदर तिचा आयुष्यदीप स्नेहहीन झालेला होता. त्यांत हा आकस्मिक मृत्युरूप वाताचा झटका लागला, त्यामुळें तो तात्काळ मावळला. त्याला वेळ लागला नाहीं. ती तारीख ८ माहे आगष्ट सन १८९४ रोजीं देवाधीन झाली. त्यावेळीं तिचें वय अवघें ३२ वर्षांचें होतें. अशा रीतीनें अल्प वयांत या विद्वान्, बुद्धिवान्, नीतिमान्, कुलीन महाराष्ट्र ब्राह्मणस्त्रीचा शेवट झाला. तिच्या अकालिक मृत्यूमुळें सर्व सुशिक्षित अशा हिंदुस्थानवासी व विलायतेंतल्या लोकांस फार दुःख झालें. सर्वांनीं तिच्या गुणांची, नीतिमत्तेची, कर्तृत्वाची, विद्वत्तेची आणि बुद्धिमत्वाची फार वाखाणणी केली. मद्रासेंत तिच्या स्मारकार्थ ७००० रुपये जमा झाले. आणि मद्रास युनिव्हर्सिटींत तिच्या नांवाची एक पंचवीस रुपये दरमहाची स्कालरशिप आणि एक बक्षीस हीं वैद्यशास्त्रेंत शिकणाऱ्या विद्यार्थिणीस देण्याकरितां स्थापिलीं गेलीं.

कृपाबाईस मरेपर्यंत आपले महाराष्ट्रपणाचा मोठा अभिमान वाटत असे. तिनें शेवटपर्यंत आपला दक्षणी पोषाख करणें सोडलें नाहीं: ( तिचे वडील हरिपंत यांनींही धर्मांतराबरोबर आपले मराठी रीतरिवाज व पोषाख वगैरे बदललें नव्हते. ) उलट तसें करणाऱ्या पुष्कळ नवीन माथेफिरू एतद्देशीय ख्रिस्ती व हिंदु विद्वानांस आपले जुने चांगले आचारविचार न सोडण्याबद्दलचा उपदेश तिनें आपल्या लेखांत केला आहे. आपले पहिले जुने सद्गुण टाकून इंग्रजांच्या दुर्गुणांचें मात्र अनुकरण करणाऱ्या नव्या अल्पदृष्टि व अल्पज्ञानी तरुण जनांचा तिनें जागोजाग उपहास केला आहे. आणि कधीं कधीं त्यांस बोधही केला आहे.

बाळपणापासून तिला ख्रिस्ती धर्माचेंच शिक्षण मिळालें होतें. आणि ह्मणून त्या धर्मावरच तिचा जो दृढ भाव बसला होता तो मरेपर्यंत लवमात्र देखील ढळला नाहीं. ख्रिस्ताचा आयुष्यक्रम नमुन्याकरतां पुढें ठेवून त्याचें अनुकरण करण्याचा ती नेहमी यत्न करीत असे.

आपल्या धर्मस्थापकाच्या सार्वजनिक प्रायश्चित्त-विधीवर तिचा पूर्ण भरंवसा होता. परंतु या धर्माचें शिक्षणही तिला फारसें गहन किंवा विस्तृत अशा तऱ्हेचें मिळालें नव्हतें. ख्रिस्ती-धर्माच्या मतमतांतरांबद्दल तिला फारशी माहिती नव्हती आणि अशा प्रकारांत महत्व मानणाऱ्या ख्रिस्त्यांचा तिनें नाजुकसा उपहास केला आहे. नास्तिक व अज्ञेयवादी लोकांवरही तिनें कोठें कोठें कटाक्ष दाखविला आहे. तिचें धर्मशिक्षण केवळ भाविकपणाचें होतें त्यांत मतभेदास थारा मिळाला नव्हता. विद्यार्जनाबरोबर तिची धर्मबुद्धि शिथिल किंवा नष्ट झाली नाहीं. हिंदुधर्माबद्दल तिला प्रत्यक्ष अशी कांहीं माहिती होती असें दिसत नाहीं. कोणत्याही हिंदु कुटुंबाचा सहवास तिला घडला असेल असें दिसत नाहीं. तिच्या लेखांच्या मननपूर्वक वाचनानें वरील ग्रह होतो. हिंदुधर्म व लोकस्थिति यांची तिची माहिती ऐकींव व इंग्रजी ग्रंथवाचनानें मिळालेली होती. हीं द्वारें सामान्यतः किती कलुषित, मलिन, आणि दुराग्रहांनीं भरलेलीं असतात हें सर्वांस ठाऊकच आहे. अशा दर्पणांतून दिसलेले देखावे किती यथारूप असण्याचा संभव आहे हें कोणीही सांगेल. मनुष्य कितीही शुद्धबुद्धीचा, निर्मत्सरी, निःपक्षपाती असला तरी त्यास मिळालेल्या माहितीवर त्याचें मत सर्वथैव अवलंबून राहील. तथापि अशा स्थितींतही कृपाबाईनें काढलेलें हिंदु लोकस्थितीचें चित्र फारसें अयथार्थ वठलेलें नाहीं असें कबूल करावें लागेल, आणि सर्वमान्य हिंदुविद्वानांनींही ही गोष्ट कबूल केली आहे. याचें मुख्य कारण आपल्या देशबांधवांवरचें व विशेषतः देशभगिनींवरचें तिचें प्रेम, सहृदयत्व, सहानुभति हींच मुख्यतः होत. धर्मांतरानें तिचा देशाभिमान आणि स्वदेशप्रेम हीं नष्ट झालीं नाहींत. देशभगिनींची सुधारणा व्हावी ह्मणून तिनें फार मेहनत घेतली. उटकमंड येथें दोन्ही मुलींच्या शाळेंत शिक्षणप्रसार करण्याकरितां तिनें फार परिश्रम केले. या कामांत तिला चांगलें यश आलें ही गोष्ट तिची कर्तबगारी, कौशल्य, मन वळवण्याची करामत, वगैरे गुणांचें दर्शक आहे. तिचा मूळचा स्वभाव अतिशय भिडस्त, लाजाळू, विनयशील आणि कांहीं अंशीं एकलकोंडा असा होता. तिला आपल्या योग्यतेबद्दल भरंवसा किंवा विश्वास ह्मणून शेवटपर्यंत कधींच आला नाहीं. हें लेख लिहिण्याचें काम तरी तिनें फार भीत भीत आपल्या पतीच्या आणि मिसेस ग्रीग—तिचें, इंग्रजी चरित्र लिहिणारी व तिची मोठी मैत्रीण—यांच्या अत्याग्रहास मान देऊन पत्करलें, आणि शेवटपर्यंत स्वतःच्या लेखावर आपलें नांव प्रसिद्ध करण्याचें धैर्य तिला आलें नाहीं. "इंडियन लेडी" या सहीनें तिचे लेख प्रथम वृत्तपत्रांत किंवा मासिकांत प्रसिद्ध झाले आहेत, यावरून तिचा स्वाभाविक मर्यादशीलपणा, विनय, नम्रता, स्तुतिविमुखता, भिडस्तपणा इत्यादि स्त्रीस्वभावास अत्यंत भूषणभूत अशा गुणांची कांहींशी कल्पना करतां येईल. मित्रमंडळींत व समाजांतही या विनयातिशयानें तिचें चांगलेंसें तेज कधीं पडलें नाहीं, आणि तिची अंतर्गत गूढ योग्यता तिच्या जिवलग मित्रांखेरीज व सुहृदांखेरीज तिच्या हयातींत इतरांस फारशी कळली नाहीं. घरच्या सलगीच्या मित्रमंडळींतही तिच्या भाषणाचा व्हावा तसा किंवा तिच्या लेखांस साजेसा परिणाम होत नसे. वाक्चातुर्य तिच्यांत फारसें नसे. वादविवादांतही तिचा कार्यभाग श्रोतेपणाहून फारसा ज्या-

स्त होत नसे. तिचे खरे आणि अमूल्य गुण फारच थोड्यांस अवगत झाले होते. तिच्या फार थोड्या मैत्रिणींच्या संगतींत मात्र तिची भीड चेपत असे; आणि मग अशा प्रसंगीं मात्र तिचा बालबोधपणा, सरळ स्वभाव, गहन विद्वत्ता, मनुष्यस्वभावाचें परिज्ञान, व्यवहारनिपुणता, थोर ग्रंथकारांच्या आणि कवींच्या कृतींशीं तिचा अत्यंत परिचय, तिचें विस्तृत ग्रंथवाचन, आणि त्यांतलें हृद्गत आणि सार शोधून काढण्याची अपूर्व करामत, धारणाशक्ति, मार्मिकता इत्यादि गोष्टी प्रसंगोपात्त बाहेर येत असत-विशेषत: एखाद्या बड्या इंग्रजी स्त्रीनें हिंदु स्त्रियांस फलोपहारार्थ मेजवानी दिली असतां अशा प्रसंगीं कृपाबाईचें साह्य त्यांस फार कामीं पडत असे–आणि अशा वेळीं तिला हटकून बोलावणें येई. त्यावेळीं दुभाष्याच्या कामीं तिचा फार उपयोग होत असे. आणि उभयपक्षांमध्यें सलूख्य पाडून मित्रभाव वृद्धिंगत करण्याच्या कामीं ती मनापासून झटत असे. त्यामुळें बड्या इंग्रज स्त्रियांमध्यें आणि मोठ्या एतद्देशीय स्त्रियांमध्यें तिचो बरीच मान्यता होती आणि मोठें वजन पडलें होतें. तिनें कांहीं वर्षें शिक्षकिणीचें काम केलें, त्यांतही तिचें तेज चांगलें पडलें आणि ती बरीच लोकप्रिय झाली होती. हा धंदा तिला फार आवडत असे; आणि कांहीं प्राप्तीची आशा न धरतां तिनें तो पत्करला होता, यावरून तिची निःस्वार्थबुद्धि व स्त्रीशिक्षणप्रसाराची आवड, हीं व्यक्त होतात. तिचें मातृप्रेम व बंधुप्रेम हीं अत्यंत प्रशंसनीय होतीं. त्यांचें मनोहर स्वरूप तिच्या "सगुणा" नामक ग्रंथांत उत्तम वठलें आहे. तिची ज्ञानार्जनतृष्णा कधींच शमली नाहीं. अंतकाळच्या दुखण्यांतही तिचें ग्रंथवाचन सुटलें नव्हतें. यावेळीं तिनें "रुडयार्ड किप्लिंग" याचे गद्य व पद्य ग्रंथ मोठ्या असोशीनें वाचले. त्याचप्रमाणें सृष्टिसौंदर्य पाहण्याचा तिचा हव्यासही अंतकाळपर्यंत कमी झाला नाहीं. वैद्याच्या उपदेशाकडे दुर्लक्ष करून, थोडेसें बरें वाटलें कीं तो बगीच्यांत जाऊन वनशोभा आणि पुष्पसौंदर्य पाहत बसत असे. लहानपणापासून पोरकट खेळांकडे तिचें मन लागत नसे, आणि त्यांची तिला आवड नसे. "बाळपणापासून ही मुलगी प्रौढ स्त्री बनलेली आहे. हिला शाळेंतल्या शिक्षणपद्धतीची गरज नाहीं" असे तिच्या संबंधानें उद्गार तिच्या आईपाशीं एका मिशनरी शिक्षकिणीनें काढले होते ते केवळ यथार्थ दिसतात.

आतां तिच्या लेखांवरून व्यक्त होणाऱ्या तिच्या मानसिक गुणांबद्दल दोन शब्द लिहितों. यावर विस्तृत टीका करणें व्यर्थ आहे. कारण, अगोदर तिचे लेखच फार थोड्या एतद्देशीय सुशिक्षितांच्या नजरेखालून गेले असतील. मूळग्रंथांचीच अगोदर ही दशा, मग त्यांवरची चर्चा ती वाचकांस कितीशी रुचणार आहे? आणि ती कितींस नीट समजेल? यास्तव या संबंधांत नुसते सामान्य विचार मात्र येथें सादर करतों.

कृपाबाईचें इंग्रजी भाषाज्ञान अत्यंत प्रशंसनीय आणि आश्चर्यकारक आहे. "ही अशी भाषेवरची प्रभुता, ज्यांची जन्मभाषा इंग्रजी आहे अशा सुशिक्षित आणि विद्वान् इंग्रज स्त्रीस देखील अत्यंत भूषणास्पद होय" असा शेरा खुद्द इंग्रज गृहस्थांनींच तिच्या लेखांवर दिला आहे. सबब या मुद्यावर याहून जास्त विस्तार करण्याची गरज दिसत नाहीं. इतकी सुरेख मराठी भाषा कृपाबाईस खास लिहितां आली नसती; कारण तीवर तिचा मुळींच व्यासंग नव्हता. तिचे सर्व परिश्रम इंग्रजी भाषेवरच झाले.

इंग्रजी ग्रंथकारांच्या कृतींशींच तिचा दृढ परिचय राहिला. वर्डस्वर्थ, टेनिसन, लॉंगफेलो, वगैरे अनेकांचे ग्रंथ तिनें फार मार्मिकतेनें वाचले होते. तरी त्यांतल्या एकाचेंही बुद्धिपुरःसर अनुकरण तिनें आपल्या लेखांत केल्याचा मागमूस सांपडत नाहीं. या विशाल मनांच्या ग्रंथकारांचे अंतर्गत विचार तिच्या हाडामासांत पूर्ण भिनून त्यांस तिचें स्वतःचेंच असें एक नवीन मनोहर रूप प्राप्त झालें होतें. " तिचे सर्व गद्यग्रंथ पद्यमय आहेत " असें मिसेस ग्रोगनें ह्मटलें आहे तें यथार्थ आहे, असें तिचे लेख वाचल्यावर मान्य करावें लागतें. " तिच्या लेखांत विशुद्ध भाव सर्वत्र जागृत आहे, इतकेंच नाहीं, परंतु त्यांतल्या प्रत्येक ओळींत आणि प्रत्येक शब्दांत त्याची ओळख पटते–" हा इंग्रजी टीकाकारांचाच ध्वनि आहे.

तिची कल्पनाशक्ति विशाळ आणि जाज्वल्य आहे; त्याचप्रमाणें तिची धारणाशक्तिही अपार आहे. त्यांच्या प्रेरणेनें तिचीं सृष्टिसौंदर्यवर्णनें फार मनोहर, हुबेहुब आणि हृदयद्रावक वठलीं आहेत. पुष्कळ इंग्रजी कादंबरीकारांच्या ग्रंथांत देखील असे सुरेख सृष्टिशोभेचे देखावे फारसे आढळत नाहींत. सृष्टिवर्णनांत तिचा हातखंडा असे. निसर्गशोभा अवलोकन करून तिचा अंतरात्मा गारेगार होत असे. आणि तिच्या सर्व हृदयवृत्ति उचंबळून येत असत, याचा प्रत्यय तिच्या वर्णनांत जागोजाग मिळतो.

मनुष्यस्वभावाचें अंतर्गत ज्ञान कृपाबाईचें फार गहन किंवा विस्तृत होतें असें नाहीं; तें बरेंच वरपंगी होतें असें दिसतें. त्यांत विविधमनोवृत्तींचे मासले फारसे आलेले नाहींत. त्याचप्रमाणें मनोविकारांचा उगम व यथाक्रम, तसेंच त्यांची कालगतीनें होणारी परिपक्वता आणि पूर्णावस्था ( Development ) हींही व्यक्त करण्याची हातोटी आणि घाटणी तिला नीटशी साधली होती असें दिसत नाहीं. तिचीं पात्रें तयार बनलेलींच रंगभूमीवर येऊन आपली कर्तबगारी दाखवितात, त्यांच्या वृत्तींत फेरबदल झालेला फारसा दिसत नाहीं. जगासंबंधानें तिचा ग्रह फार अनुकूल आणि आशामय असा होता. ती ऑप्टिमिस्ट ( optimist ) ह्मणजे प्रत्येक ऐहिक वस्तु सन्मार्गगामी आणि सदिच्छामय आहे असें मानणाऱ्या मतवाद्यांपैकीं ती होती. पेसिमिस्ट ( Pessimist ) ह्मणजे प्रत्येक वस्तु अधोगामी दुर्गत आहे अशा मतवाद्यांचा तिला गंधही लागला नव्हता, यामुळें तिचीं पात्रें तिच्या स्वतःच्या शुद्धभावाचें आवरण घेऊन येतात असें दिसतें. त्यांत हीन मनोवृत्तींचा प्रसार फार थोडा दृष्टीस पडतो; आणि यद्यपि त्यांचें थोडेंसें दिग्दर्शन कोठें कोठें आलें तरी तें फार अल्प आणि बाह्य दिसतें; त्यांचा प्रभाव यथारूप, जगाच्या ज्ञानास अनुरूप, असा भासत नाहीं. कांहीं स्थळीं मनुष्यस्वभावाचें विशदीकरण ( analysis ) फार नामी साधलें आहे. तिचे ग्रंथ वाचून वाचकांची जगाविषयीं उत्साहबुद्धि आणि उल्हासवृत्ति कायम राहते. ते निरुत्साह किंवा निराश होत नाहींत.

कृपाबाईचा स्वभाव जात्या फार धिमा व गंभीर होता, त्यामुळें तिच्या लेखांत गांभीर्यवृत्ति ओतप्रोत भरलेली आहे. परंतु जेव्हां जेव्हां तिनें हा नैसर्गिक भाव बाजूस ठेवून विनोदात्मक प्रकार कोठें कोठें केला आहे, तेव्हां तेव्हां तिचा यत्न पुष्कळ अंशीं फसल्यासारखा होऊन तिचा उद्देश सिद्धीस गेला नाहीं; तिचा विनोद निर्फळ झालेला आहे, त्यास यश आलेलें नाहीं. विनोदात्मक लेख लिहिणें तिच्या आटोक्याबाहेर आहे असें उघड सिद्ध झालें आहे. ओढून ताणून आणलेल्या चंद्रबळाप्रमाणें हा

प्रकार झाला आहे. त्या दिशेनें तिचा यत्न अस्थानीं होता असें तिच्या टीकाकारांनीही प्रांजळपणें कबूल केलें आहे.

धर्म, नीति, भक्ति, देशाभिमान, राष्ट्राभिमान देशसेवा, सुधारणा वगैरे अनेक महत्वाच्या विषयांवर प्रसंगविशेषीं तिनें सादर केलेले विचार फार प्रोक्त, प्रौढ, दूरदृष्टि, व्यापक, आणि मोठ्या कळकळ्याचे आहेत; आणि ते फार हृदयंगम वाटतात. या विषयाकडेच तिचा जात्या कल असे. आणि उदारधी ग्रंथकारांच्या सहवासानें त्यांस परिपक्वता प्राप्त झाल्यानें त्यांचा परिणाम वाचकांच्या मनावर उत्तम होतो. अशा वेळीं थोड्याशा शब्दांत गंभीर आणि भारदस्त अर्थ भरलेला असतो. एका कठोरहृदय वरानें एका सात्विकवृत्ति भोळ्या तरुणीस विवाहाची आशा लावून शेवटीं तोंडघशीं पाडल्यानें त्या भावी प्रेमहत वधूचा अंत झाला. या प्रसंगाचें वर्णन देतांना आमची चरित्रनायिका ह्मणते–" She was no more and the world is not the better for it. "

तिनें आपल्या लेखांत हिंदु धर्माची टवाळी कोठेंही केलेली नाहीं. ही तऱ्हा विशेषतः खिस्ती उपदेशकांनीं अनुसरण करण्यास योग्य आहे. दुसऱ्या धर्माची नालस्ती करून स्वधर्मास गौरव येत नाहीं, हें त्यांस कळत नसेल असें नाहीं. कृपाबाईचे ठायीं हिंदुस्त्रियांविषयीं मोठें प्रेम आणि आदर हीं वसत होतीं. तिची परधर्मसहिष्णुताही मोठी होती. "बहुधाप्यागमैर्भिन्नाः पंथानः सिद्धिहेतवः ॥ त्वय्येव निपतंत्योघा जान्हवीया इवाऽर्णवे ॥ " हें मत तिच्या लेखांत ध्वनित झालें आहे. ही गोष्ट तिच्या उदार बुद्धीचें दर्शक आहे. आमच्या कुलीन स्त्रियांचीं चित्रें तिनें बरींच यथारूप काढलीं असून त्यांच्या योग्य गुणांबद्दलची थोरवी त्यांस दिली आहे. एका महाराष्ट्र सासूबद्दल तिचे विचार पहाः "Stern and prejudiced as most mothers-in-law are, she was not wholly devoid of some of the principles that keep the ignorant and superstitious in the path of truth and virtue. She would never do what seemed wrong to her, in spite of all temptations. Her treatment of Radha( daughter–in–law ) from an outsider's point of view was indeed objectionable, but we must make allowance for the Hindu notion of a daughter-in-law who is regarded as a lying scheming wretch, stealing the affection of a good and dutiful son, trying to get the power which the mother-in-law wields and turning her out on getting the upperhand. " यांत सामान्यतः वस्तुस्थितीच्या वर्णनांत मोठीशी अतिशयोक्ति आहे असें ह्मणतां येणार नाहीं. एका हिंदुकुलस्त्रीचें पतिप्रेम व पुनर्विवाहाविषयीं परांङ्मुखता यथार्थरीतीनें वर्णून ती ह्मणते–" Her religion, crude as it was, had its victory "—स्वजातीय भगिनींविषयीं तिचें प्रेम अपार होतें यांत संशय नाहीं.

" सगुणा " या कादंबरींत सुशिक्षित एतद्देशीय खिस्ती लोकांच्या गृहस्थितीचें वर्णन केलें आहे, तें सर्व खिस्ती लोकांच्या गृहस्थितीस लागू नाहीं असें स्वतः तिनेंच स्पष्ट आणि मोकळ्या मनानें कबूल केलें आहे. अशिक्षित खिस्ती लोकांतही हिंदुगृहस्थितींत वर्णिलेले वेडगळ प्रकार, भुतेंखेतें, समंध, चेटकें, जादु टोणे, वगैरे अनेक खुळकटपणाचे

विश्वास, आचार इत्यादि नष्ट झाले आहेत असें नाहीं. याचा प्रत्यय ज्यास पाहणें असेल त्यानें " फुलमणी व करुणा " हें अशिक्षित ख्रिस्ती गृहस्थितीचें दर्शक असें पुस्तक वाचावें. तेव्हां या सर्व हास्यास्पद, मूर्ख-पणाच्या गोष्टींचें अपेश गरीब बिचाऱ्या हिंदु धर्मावर देणें अन्याय्य आहे. सुशिक्षित हिंदु गृह-स्थितींत हे प्रकार बऱ्याच अंशीं अस्त पावल्या-सारखे आहेत, असें ह्मटल्यास फारसा बाध येईल असें वाटत नाहीं. आतां एतद्देशीय ख्रि-स्तीसमाजांत स्त्रीशिक्षणाचा प्रसार बराच अ-धिक झाला आहे, आणि त्यांनीं कांहीं चांगल्या गोष्टींत इंग्रजांच्या रीतींभातींचें अनुकरण पत्क-रल्यामुळें, त्याचप्रमाणें त्यांच्यांत जातिभेद, बा-लविवाह, विचित्र समाजबंधनें, इत्यादि प्रकारांचें बंड फारसें नसल्यानें, त्यांच्या प्रगतीस आणि सुधारणेस बरेंच पाठबळ मिळालें आहे. या गोष्टी मान्य करणें न्याय्य आहे. यामुळें त्यांची सुस्थिति बरीच ठळकपणें नजरेस पडण्यासा-रखी आहे; तशी हिंदु समाजाची गोष्ट नाहीं. परंतु त्याचें सर्व श्रेय धर्मांतराकडे देणें मात्र वाजवी होणार नाहीं.

"कमला"नामक कादंबरींत हिंदु गृहस्थितीचें चित्र आहे. तें सामान्यत: फारसें अयथार्थ वठलें आहे असें ह्मणणें गैरवाजवी होईल. आमच्यांत स्त्रीशिक्षण अद्याप अगदींच बाल्यावस्थेंत आहे. त्यामुळें त्याचा प्रभाव गृहस्थितींत फारसा दृष्टीस पडत नाहीं. उलट शिक्षणप्रसाराच्या प्रारंभींचे पूर्वदशेंतले दोष-ह्मणजे फाजीलपणा, वरपंगी-पणा, दिखाऊपणा, डामडौल, इंग्रजी चोंचले, पोषाखाचें अनुकरण, अप्रस्तुत प्रलाप, घमेंडी, वगैरे- हे कांहीं स्थळीं पाहण्यास सांपडतात. परंतु असे परिणाम, इंग्लं-ड्डांत जेव्हां हा स्त्रीशिक्षणप्रसार सुरू झाला होता तेव्हां तेथेंही होत गेले, असें खुद्द सुशिक्षित इंग्र-ज स्त्रियांनीं स्पष्ट कबूल केलेलें या ग्रंथांत नमूद केलें आहे. तेव्हां या संबंधांत स्त्रिशिक्षणद्वेष्ट्यांस जें मोठें शस्त्र सांपडलें आहे तें निर्जीव आहे. अल्पविद्येचे हे दुष्परिणाम सर्वत्र असेच अनुभ-वास आले आहेत, ह्मणून पुढारी राष्ट्रांनीं स्त्रीशिक्षणास आडकाठी आणली नाहीं किंवा तें निरर्थक आणि निरुपयोगी ह्मणून सोडून दिलें नाहीं. उघडच आहे, पाण्यांत पडून गोते खाल्याशिवाय चांगलें पोहतां येणार कसें? सध्या पुरुषांच्या शिक्षणापेक्षां स्त्रियांच्या शिक्ष-णाची फार आवश्यकता आहे, असें सुज्ञ हिंदु पुढाऱ्यांनीं प्रतिपादिलेलें या पुस्तकांत दाखल केलें आहे, तें केवळ यथार्थ आहे. कारण स्त्रीशिक्षणा-च्या अभावीं पुरुषांचें शिक्षण निःसार झालें आहे आणि गृहसुधारणेस मुळींच यश येत नाहीं, हा सर्वत्र अनुभव आहे.

सांप्रतच्या नव्या विचारक्रांतीनें पुरुषांच्या शिक्षणाचीही विलक्षण तऱ्हा झाली आहे. लोकांस आपल्या व्यवस्थित आणि प्रगतीपर वर्तनक्रमानें सदुदाहरण दाखविण्याचें सोडून आमचे अलीकडचे बरेच लोक छंदानुवर्ती, रंगबदले सुशिक्षित पुढारी, शिंगें मोडून वासरांत शिरल्या-प्रमाणें, समाजाच्या मूर्खपणांत भर घालण्याचें दु-ष्ट काम पत्करून त्यांतच पुरुषार्थ मानूं लागले आहेत. त्यामुळें पुढें पाऊल पडणें तर एकीकडे-स राहिलें, पण आमची दु:स्थिति आणि दुर्दशाच आह्मास आवडून तिला आह्मी उराशीं धरून बसलों आहों. या दुर्दशेंतून सुटण्यास जेव्हां मार्ग मिळेल तेव्हां मग खऱ्या सुस्थितीस पुढें सरण्यास जागा मिळेल.

कृपाबाईनें हिंदु गृहस्थितीचें वर्णन दुराग्रहानें केलें आहे असें नाहीं. उलट पूर्ण

सहृदयतेनें, सहानुभूतीनें, आणि उदार बुद्धीनें, तिनें हिंदु गृहस्थिति वर्णिलेली आहे. अरण्यादय आणि नारायण संन्यासी, कमला आणि तिच्या मैत्रिणी, इत्यादिकांचीं वर्णनें तिनें पूर्ण प्रेमभावानें प्रेरित होऊन केलीं आहेत यांत संशय नाहीं. एका ठिकाणीं मात्र "आमचे देशबांधव नीतिधैर्यांत कच्चे आहेत ह्मणून ख्रिस्ती धर्म सत्य वाटून त्याचा स्वीकार ते करीत नाहींत; हा त्यांच्या धर्माचा दोष आहे-" असे उद्गार हरिपंताच्या मुखांत घालून ख्रिस्ती धर्माचें निर्दोषत्व आणि तारणशक्ति हीं गृहीत धरल्यासारखें प्रगट केलें आहे, तो प्रमाद आहे. सर्व सुशिक्षित जनांस त्या धर्माचीं निर्दोषपूर्णत्व आणि तारणक्षमता हीं मान्य आहेत असें मुळींच नाहीं. ख्रिस्ती समाजाची बरीच सुस्थिति केवळ अधिक शिक्षणप्रसाराचें फळ आहे. त्याचा धर्माशीं फारसा संबंध नाहीं, हें ज्यास कार्यकारणभावाचें तारतम्य पाहण्याची शक्ति आहे तो सहज ताडील. "हिंदुस्थानांतले मिशनरी हिंदु लोकांत त्यांचा धर्मप्रसार करण्यास सर्वथैव योग्य नाहींत" असें तिनें एका स्थळीं ध्वनित केलें आहे, त्याची मग वाट काय? त्यांच्यावर या निर्दोषत्वाचा आणि तारणशक्तीचा प्रभाव कां गाजत नाहीं? वरील विधान ज्याप्रमाणें कृपाबाईच्या विस्मयजनक निःपक्षपाताचें आणि स्पष्टवक्तेपणाचें द्योतक आहे, त्याप्रमाणें तें तिच्या धर्माच्या दुर्बलतेचें दर्शक नाहीं काय? ख्रिस्ती धर्मतत्वांत ह्मणजे असें जिवंत सुस्थितिपर बीज भरलें आहे असा प्रकार नाहीं. त्याच्या प्रगतीचीं कारणें दुसरींच आहेत.

ख्रिस्ती आणि हिंदु यांच्या गृहस्थितींतला दिसणारा ठळक भेद-पहिल्याची सुस्थिति आणि दुसऱ्याची दुर्गति-जो या दोन कादंबऱ्यांत मिसेस ग्रीग यांनीं स्पष्ट दाखविला आहे, त्याची उपपत्ति आणि कारणें हीं वरील विवरणावरून लक्षांत येतील.

आतां ज्याकरितां हा निबंध मुख्यतः लिहिण्याचें मनांत आणलें, त्या विषयाकडे वळूं. तो विषय ह्मणजे,-सुशिक्षित स्त्रीवर्गाची उन्नति आणि अशिक्षित स्त्रीवर्गाची दुर्गति; महाराष्ट्र ब्राह्मणस्त्री कृपाबाई आणि तिच्या हिंदु महाराष्ट्र देशभगिनी यांमध्यें पडलेला फरक; पहिलीची सर्वमान्यता, कर्तव्यशक्ति, लेखनचातुर्य, ज्ञानसंपन्नता, सुसंस्कृत मति, शिक्षणदानचातुर्य, सार्वजनिक संस्थांत कार्यभाग करण्याची आवड, हौस आणि शक्ति; आणि दुसऱ्यांची कर्तृत्वहीनता, अशरणता, परावलंबनप्रेम, पराधीनता, मानसिक श्रमांची नावड, अज्ञान, धर्मवेड, वस्तुस्थिती न समजणें, खऱ्या सुधारणांस आडकाठी आणणें, रूढिप्रियता, मतिभ्रम, वगैरे यांची मीमांसा करून दुसऱ्या वर्गास त्यांच्या खऱ्या स्थितीचा बोध करून पहिलीचें दिव्य उदाहरण दाखवून देणें-हा होय. कृपाबाईनें, दोन शाळेंतला शिक्षणक्रम सुधारला, व त्यांना भरभराटीस आणलें; तिच्या भगिनींस आपल्या स्वतःच्या मुलांस शिक्षण देतां येत नाहीं, त्याकरितां दुसरा शिक्षक ठेवणें भाग पडतें. तिनें दवाखान्यांत काम करून रोगग्रस्तांस उपचार केले, आणि वैद्यक विषयांत परीक्षा दिली; तिच्या भगिनींस स्वतःच्या मुलांचें नीट संगोपन करितां येत नाहीं, त्यांना आजार झाला तर योग्य उपचार करण्याचें टाकून गंडादोरा, मंत्रतंत्र, अरिष्टशमनार्थ जप, अनुष्ठानें, शांती अशा वेडगळ उपायांत त्यांचें मन जडतें. तिनें वैद्यकशिक्षणाच्या प्राप्त्यर्थ एकटीनें मद्रासचा प्रवास केला; तिच्या भगिनींस घराबाहेर एकटें पडलें तर रस्ता सांप-

इत नाहीं. तिनें सर्वमान्य लेख लिहिले; तिच्या भगिनींस दुसऱ्यांसमोर पुस्तकास शिवण्याची लाज वाटते, लिहिणें वाचणें आपल्या स्त्रीजातीस भूषणावह नाहीं असें त्यांस वाटतें, चुलीपाशीं तिवढा आपला व्यवहार असा त्यांचा दृढ ग्रह होऊन बसला आहे, त्यापलीकडे काडीइतकें देखील कर्तव्य नाहीं असें त्यांच्या मनानें घेतलें आहे. ज्ञानार्जन आणि भगिनीसेवा यांत आपला जन्म घालवून विवाहाबद्दल पूर्ण उदासीन रहायाचें असें तिचें पूर्ण मनोगत सोळा वर्षांच्या वयांतच झालें होतें; तिच्या भगिनींस कसें तरी दहाव्यांत चतुर्भुज होऊन काबाडकष्टांत, दुर्दशेंत, गरिबींत, सासुनणंदा यांच्या काचांत जन्म काढण्यांत मोठी हौस वाटते; याहून अधिक वरिष्ठ प्रतीच्या गृहस्थितीची त्यांस कल्पना नाहीं. तिनें मद्रासेंत परदेशस्थांच्या संगतींत राहून त्यांस आपले हितचिंतक आणि साह्यकर्ते बनविलें; तिच्या भगिनींस दुसऱ्याचा विटाळ सोसत नाहीं, त्यांस स्पर्श झाला तर त्यांना वस्त्रांतर किंवा सचैल स्नान केल्यावांचून शुद्ध वाटत नाहीं. आणि याप्रमाणें भ्रमिष्टपणांत काळ घालविण्यांतच आपल्या धर्माचें सार आहे असें त्यांस वाटतें. तिनें परदेशस्थ कुलीन, विद्वान्, आपल्या जन्मास सुखी करण्यासारखा योग्य वर पाहून त्याशीं विवाह स्वत: केला, त्याबद्दल आपल्या आप्तांवर भार घातला नाहीं; तिच्या भगिनींस स्वज्ञातीच्या पोटभेदांतला योग्य वर देखील भयंकर वाटतो, रूढीच्या बाहेर जरा पाऊल टाकण्यांत आपली सर्व हानि वाटते, टिपण, ग्रह, योग वगैरे अनेक अडचणी विवाहकार्यास नडतात त्यामुळें चांगला सुयोग जमून येत नाहीं. तिनें आपल्या मद्रासी सासू नणंदा यांचा प्रेमभाव थोर मनानें संपादला; तिच्या भगिनींचे या नात्यासंबंधानें प्रतिकूल आणि दुष्ट ग्रह होऊन बसले आहेत ते दूर करण्यास लागणारी उदार बुद्धि फार थोड्यांस अनुकूळ असते, त्यामुळें त्यांची गृहस्थिति बरीच असमाधानकारक होऊन त्यांस खरा विसावा फार थोडा मिळतो. तिला रूढीचें बंधन मुळींच भासलें नाहीं; तिच्या भगिनींस रूढीपलीकडे कांहींच दिसत नाहीं, तीच सर्वस्व वाटते. तिला दागदागिने, वस्त्रें, थाटमाट, डामडौल, संपत्ति, ऐश्वर्य, यांचें फाजील महत्व वाटलें नाहीं; तिच्या भगिनींस या गोष्टींतच सर्वस्व वाटतें, लग्नकार्यांत अतोनात थाटमाट, डामडौल, इत्यादि प्रकारांत व्यर्थ द्रव्य न खर्चण्याच्या सुधारणेस त्यांचें पाठबळ नसतें. तिनें आपलें बरेंच आयुष्य थोर ग्रंथकारांच्या कृतींशीं परिचय करून त्यांच्या मानसिक समागमांत घालविलें आणि विद्यानंदाचा उपभोग घेतला; तिच्या भगिनींस या आनंदाची कल्पनाही नसून, त्यांचें आयुष्य क्षुद्र विचारांत, पोरकटपणांत, जळफळींत आणि मत्सरांत जात आहे, आणि त्यांस हें वरिष्ठ मानसिक सौख्य लाभत नाहीं. तिनें हरएक इष्ट सुधारणेस मनापासून मदत केली; तिच्या भगिनी हरएक इष्ट सुधारणांस आडकाठी होत आहेत, आणि त्या प्रचारांत न येण्यास मनापासून झटत आहेत. सुशिक्षणानें तिच्या अमोल्य मानसिक गुणांस प्रगट होण्यास सुरेख अवकाश मिळाला; तिच्या भगिनींचे मानसिक गुण शिक्षणाभावानें जागच्या जागीं मुरून जात आहेत किंवा वनांत सुवास पसरविणाऱ्या पुष्पाप्रमाणें आपला परिमळ निरर्थक घालवीत आहेत. याप्रमाणें हरएक प्रकारें तिच्यांत आणि यांच्या स्थितींत जमीन अस्मानाची तफावत पडली आहे, याचें कारण काय? तर शिक्षणाभाव–दुसरें कांहीं नाहीं.

वरील शोचनीय स्थितीबद्दल आमच्या स्त्रीवर्गावर मुळींच जबाबदारी नाहीं. हें सर्व पाप पुरुषांच्या माथीं आहे. कृपाबाईनें आपल्या ग्रंथांत ह्मटलें आहे-" Blame not the Indian woman for her love of jewelry, show, or her low status in society......Such feelings are purely Hindu and are the outcome of wrongs committed for generations on the poor unprotected Hindu women:" हें किती यथार्थ आहे याचा प्रत्येकानें विचार करावा.

सध्या हरएक गृहसुधारणेस पहा, स्त्रीसमाजाचें साह्य नाहीं, आडकाठी आहे. त्यामुळें पुरुषांचा यत्न निर्फळ होत आहे. प्रत्येक सुशिक्षित पुरुषास आपल्या अत्यंत जिवलग स्त्रीवर्गाशीं झगडावें लागतें. बालविवाहाच्या दुष्ट चालीनें त्यांचें शिक्षण निःसार झाल्यासारखें आहे. वैधव्य स्थितींत त्यांच्या दुर्गतीस पारावार नाहीं. तरी रूढीच्या बाहेर पाऊल पडत नाहीं, कारण त्यांस मुख्य अंतस्थ अडचण घरचीच असायाची: तेव्हां हा गाडा पुढें जावा कसा? प्रत्येक सुशिक्षितानें आपल्या पत्नीचें शिक्षण वाढवावें ह्मटलें, तर त्यास फारसें यश येत नाहीं. कारण असा योग जमून येईपर्यंत बराच काळ निघून जातो. या वेळांत स्त्रीच्या ज्ञानेच्छेची हौस बरीच मंद होते. पुढें संसाराच्या दगदगींत आणि कामांत दिवसाचा बराच भाग जातो; अशा स्थितींत तिला लिहिण्यावाचण्याची कटकट वाटून त्याची आवड राहत नाहीं. ज्ञानतृष्णा जागृत होण्यास प्रथम बरेंच शिक्षण लागतें; पण ही पायरी येऊन पोहोंचण्याच्या आधींच त्यांच्या सर्व मानसिक वृत्ति उदासीन होतात. त्यांत लोकलज्जा हें एक जबर कारण होतें. त्यांस सुशिक्षणापासून मिळणारे फायदे कळत नाहींत. अशा स्थितींत सुशिक्षणाचें वरील ठळक सदुदाहरण मराठी वाचकांपुढें व विशेषतः सुशिक्षित भगिनींपुढें ठेवावें ह्मणून हा लेख लिहिला.

सांप्रत पुरुषवर्गाच्या शिक्षणापेक्षां देखील स्त्रीशिक्षणाची कांकणभर जास्त गरज सर्वत्र भासूं लागली आहे. कारण त्यामुळें सर्वच गाडा अडून राहिला आहे. परंतु या प्रसारास साधनें मुळींच नाहींत. बालविवाहाच्या घातक प्रघातामुळें मुलींच्या शाळा असून नसून सारख्याच अशा आहेत. मुलांच्या विवाहाचें वय बरेंच वाढलें आहे, पण मुलींच्या विवाहाच्या वयांत विशेष बदल झाला आहे असें दिसत नाहीं. गृहशिक्षणास सोई नाहींत. सोलापूरच्या सरस्वतीमंदिरासारख्या संस्थांची फार गरज आहे. बालविधवांच्या शिक्षणाची चांगली व्यवस्था झाली, तर त्यानें स्त्रीशिक्षणाचे कामास फार मदत होण्यासारखी आहे. शारदासदनासारख्या हिंदु संस्थांची फार जरूर आहे. प्रोफेसर कर्व्यांची विधवांच्या शिक्षणार्थ स्थापलेली संस्था लोकाश्रयास पात्र आहे. शारदासदनाच्या ख्रिस्तीपणाच्या नांवानें नुसते खडे फोडण्यांत पुरुषार्थ नाहीं, तशी हिंदु संस्था स्थापिली पाहिजे. विधवा धर्मांतर करतात ह्मणून पंडिता रमाबाईच्या नांवानें जळफळण्यांत कांहीं हांशील नाहीं; ख्रिस्ती धर्मांत त्यांच्या सुस्थितीस जितका अवकाश आहे, तितका त्यांच्या स्वधर्मांत नाहीं, ही गोष्ट कोणासही नाकबूल करतां येणार नाहीं. पण त्यांच्या सुस्थितीविषयीं पूर्ण उदासीन राहून उगीच त्यांच्या धर्मांतराबद्दल खेद करणें व्यर्थ आहे.

सध्याच्या देशकालस्थितींत कृपाबाईच्या चरित्रांत दिसून येणाऱ्या बहुतेक गोष्टींची जरूर आहे: तिची शिक्षणदानपात्रता हवी आहे; तिचें वैद्यकविषयांतलें शिक्षण हवें; तिची ज्ञानार्जनतृष्णा पाहिजे; तिचा शुद्ध धर्माचार पाहिजे;

तिचें परदेशगमन पाहिजे; तिचा परदेशस्थ कुलीन विद्वानांशीं संबंध पाहिजे; तिचें कवितामय लेखनकौशल्य सर्वांच्याच आटोक्यांतलें जरी नाहीं तरी तिचें विद्याव्यसन पाहिजे; तिचें धर्मांतर मात्र नको. पण हें धर्मांतर ह्मणजे तिनें स्वत: केलें होतें असें नाहीं. तिला बालपणापासून ख्रिस्ती धर्माचेंच शिक्षण मिळालें होतें; हेंच जर हिंदुधर्माचें मिळतें तर त्यांत तिचें समाधान राहिलें नसतें असें नाहीं. सुशिक्षणाच्या प्रकाशानें त्यांतलें रूढिजन्य वेडगळपण, मतिभ्रम, खुळकटपण, इत्यादिकांनीं तिच्या मतीस खास अपाय झाला नसता. परंतु धर्मभेदानें देखील तिचें स्वदेशभगिनीप्रेम कमी झालें नाहीं आणि त्याविषयींची तिची सहृदयता कायम राहिली हें तिच्या विशाल व उदार बुद्धीचें फल होय, ही गोष्ट विसरतां कामा नये.

सध्या कोणतीही इष्ट सुधारणा करूं जा, तिला स्त्रीवर्ग आपला आडकाठी आहेच. विश्वास नसला तरी, घरांतले खुळकट, वेडगळ, भ्रमिष्टपणाचे नामधारी धर्माचार—पण वस्तुत: रूढीजन्य आचार—त्यांच्याकरतां सोडतां येत नाहींत. त्यांच्यामुळें विवाहकार्यांत फेरबद्दल होत नाहीं. विवाहकाल त्यांच्यामुळें वाढवितां येणें दुष्कर झालें आहे. मुलगी दहा वर्षांची झाली नाहीं तोंच तिच्या लग्नाचा तगादा लागतो; मुलगा सोळा वर्षांचा झाला नाहीं तोंच त्याच्या लग्नाची टुमणी घरांतून लागलीच. अन्नव्यवहारास राजरोस परवानगी असणाऱ्या ब्राह्मणजातींतही बेटीव्यवहार या वर्गामुळें होऊं शकत नाहीं; मग मद्रासकर दक्षणीब्राह्मणांशीं विवाहसंबंध तर दूरच. अशा प्रकारच्या अनंत अडचणी या अशिक्षित स्त्रीवर्गामुळें नित्यश: थोडयाबहुत प्रमाणानें प्रत्येक सुशिक्षिताच्या वांटयास येत असतात याचा कोणास अनुभव नाहीं ? तथापि आमचे अलीकडचे लोकानुयायी पण लोकनायक ह्मणवणारे स्त्रीशिक्षणाचा अभाव मान्य करीत नाहींत; या शिक्षणाची अनवश्यकता प्रतिपादण्यांत आपल्या ज्ञानाचा दुरुपयोग करतात.

कांहीं वर्षांपूर्वीं " इंडियन म्यागेझिन " नामक विलायतेंतल्या मासिकांत प्रस्तुत चरित्रनायिकेबद्दल एक लेख मी पाहिला. त्यांत ती मूळ दक्षणी ब्राह्मणस्त्री असून तिच्या इंग्रजी कादंबरीचीं युरोपांतल्या कांहीं भाषांत भाषांतरें झाल्याचा उल्लेख वाचला. त्यावरून तिचे लेख वाचण्याची इच्छा झाली. ते काळजीपूर्वक वाचल्यावर मला ते फार मनोहर आणि बोधप्रद वाटले; आणि त्यांत तिचें चरित्र आणि स्मारकाच्या सभेचा वृत्तांत पाहिल्यावर तो तिच्या देशभगिनींस फार हितकारक होईल असें वाटून हा लेख लिहिला आहे. सध्या आमच्यांत सुशिक्षित भगिनी फारशा नाहींत. त्यांत आपल्या लेखांच्या द्वारें लोकांसमोर आलेल्या तर फारच थोडया आहेत. आनंदीबाई जोशी यांनीं वैद्यकाची परिक्षा दिली होती, पण अकालिक मृत्यूनें कांहीं कार्यभाग करण्यास त्यांस जागा मिळाली नाहीं. पंडिता रमाबाईच्या धर्मांतरानें त्यांच्या सदुदाहरणाची महती आह्मांस वाटेनाशी झाली, आणि त्यांच्या संस्थेचा लाभ घेण्यास आह्मी तयार नाहीं. काशीबाई कानिटकर यांचे कांहीं लेख लोकांसमोर आहेत, ते चांगले आहेत. त्यांच्या वर्गांतल्या इंग्रजी जाणणाऱ्या देशभगिनींनीं हें कृपाबाईचें सदुदाहरण पुढें ठेविलें, आणि तिचे लेख पाहिले, तर त्यांस फार उपयोग होऊन त्यांच्या विचारशक्तीस आणि लेखनकौशल्यास पुष्कळ मदत मिळेल अशी आशा आहे. धर्मभेदामुळें तिच्या लेखांचें चांगुलपण किंवा सदुदाहरणाचें महत्व कमी होतें असें नाहीं. तशांत परधर्मासहिष्णुत्व हा दोष आमच्या धर्मांत वास करीत नाहीं. हा लेख वाचून चरित्रनायिकेचे लेख वाचण्याची कोणा देशभगिनीस इच्छा झाली तर मी कृतार्थ झालों असें समजेन.

बा. ना. देव.

Printed at the " Ganpat Krishnaji' " Press, Bombay, 18-3-1900

जी विशेष अभिरुचि दृष्टीस पडते ती लक्षांत आणून "संगीत वीरतनयीं"चे कर्ते रा० रा० श्रीपाद कृष्ण कोल्हटकरें यांनीं नवीन रचिलेलें "संगीत मूकनायक" नाटक येत्या सालीं वाचकांस सादर करण्याचा विचार केला आहे. या नाटकाबद्दल आह्मी कांहीं लिहिण्यापेक्षां या मासिकपुस्तकाचे कितीक वर्षांचे मुख्य संपादक रा० रा० हरि महादेव पंडित यांचें या नाटकासंबंधानें जें मत झालें होतें तेंच येथें सादर करणें योग्य दिसतें. ते लिहितातः–

"रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर बी. ए. एल्. एल्. बी. यांनीं 'संगीत मूकनायक' नांवाचें नवीन
"रचिलेलें नाटक मी ग्रंथकर्त्यांच्या मेहरबानीनें दोन वेळां ऐकिलें, व स्वतःही वाचून पाहिलें.
"श्रवणप्रसंगीं माझे बरेचसे विद्वान् व गुणज्ञ मित्र होते, त्या सर्वांस हें नाटक मजप्रमाणेंच फार
"हृदयंगम व मनोहर वाटलें. यांतील भाषा उदात्त, सरस, व श्लिष्ट असून क्लिष्ट नाहीं, अशी आहे.
"यांतील विचारसरणी गंभीर, रुचिर, व सभ्य असून कुठेंही ग्राम्य नाहीं. अगदीं सोवळ्या मनुष्यास
"देखील नांवें ठेवितां येतील असे प्रसंग प्रस्तुत पुस्तकांत कोठेंही आढळ नाहींत. जरी प्रस्तुत पुस्तकां-
"तील कांहीं प्रसंग शृंगाररसपोषक आहेत तथापि त्यांतील शृंगार × × × × वर झणझणीत
"टीका करणाऱ्या ग्रंथकाराच्या मताला सर्वथैव साजेल असा निर्मल व उदात्त आहे. यांतील पद्यें
"सदर नाटककाराच्या 'वीरतनय' नाटकांतील पद्यांहून विशेष सुगम झालीं आहेत. अनुरावक शब्द-
"योजनेनें (ह्मणजे अनुप्रास, यमक वगैरे शब्दालंकारांनीं) पद्याला कर्णमधुरत्व येतें; परंतु तित-
"क्याच मानानें अर्थदुर्बोधत्वही येतें. व तसें झालें ह्मणजे प्रेक्षकांचा (अंशतः वाचकांचाही) मुख्य उद्दे-
"श सिद्धीस जात नाहीं. तसा प्रकार 'वीरतनयांत' जितका आहे त्या मानानें प्रस्तुत पुस्तकांत फारच
"थोडा आहे. व त्यामुळें श्रोतृवृंदास या कृतीची जास्ती गोडी लागून तीमधील उपयुक्त व हितकारी
"विषयांकडे त्यांचीं मनें अधिक आकृष्ट होतील असा माझा भरंसा आहे. मद्यप्राशननिषेध, स्त्रीशि-
"क्षण, प्रौढविवाह, स्वाभिमान व तदनुषंगिक अन्य विषय यांचा ठळठळीत ठसा सामान्य जनांवर
"चांगला वठेल अशी सुगम गद्यपद्ययोजना यांत झाली आहे."

---

## पोंच.

१. [illegible]—सवाई माधवराव पेशव्यांच्या मृत्युसंबंधाचें हें नाटक रा. रा. अनंत [illegible] [illegible] यांनीं लिहिलें आहे.

---

२. [illegible] होमोपाथिक चिकित्सा—हें पुस्तक रा. रा. विष्णु बळवंत [illegible] यांनीं लिहिलें.

---

३. अयोध्येचे नबाब (अयोध्या व लखनौ येथील स्थलवर्णनासह.) हें सुंदर ऐतिहासिक पुस्तक रा. रा. **दत्तात्रय बळवंत पारसनीस** यांनीं लिहिलें आहे. यांत अयोध्या संस्थानची स्थापना होऊन तें खालसा होईतोंपर्यंत तेथें झालेल्या सर्व नबाबांचीं सचित्र संक्षिप्त चरित्रें दिलीं आहेत.

---

या पुस्तकांवर सवडीप्रमाणें लौकरच अभिप्राय येईल.

# विविधज्ञानविस्तार.

हें पुस्तक प्रतिमासास एकदां निघतें. यांत शास्त्रीय विषय; स्त्रियांकरितां मनोरंजक व सन्मार्गावर्ती गोष्टी; नाटकें; कविता; विद्यार्थ्यांकरितां अन्यभाषांची माहिती, व भाषांतरें; इतिहास; देशाटन; विख्यात पुरुषांचीं चरित्रें; आरोग्य-रक्षणार्थ सूचना; नवीन पुस्तकांवर टीका; नीतिवादाचे निबंध; इत्यादिक विषयांचा संग्रह अवकाशानुसार होत असतो.

या पुस्तकांत प्रसिद्ध करण्याकरितां सदरील विषयांवर कोणी लेख पाठविले तर, पसंत पडल्यास, त्यांस अवश्य स्थळ मिळेल.

या पुस्तकाची किंमत.

वर्षाची आगाऊ............रुपये ३.
सहामाही आगाऊ.........रुपये २.
फुटकळ दर प्रतीस.........आणे ६.
टपाल हांशील वर्षाचें.......आणे ६.

वर्गणीदारांनीं आगाऊ वर्गणी आरंभापासून दोन महिन्यांचे आंतच पाठविण्याची मेहरबानी करावी. नाहींतर दरसाल साडेचार रुपयांप्रमाणें त्यांकडे किंमत मागावी

या पुस्तकाविषयीं हरएक प्रकरणीं पत्रव्यवहार, मुंबईत फणसवाडींत अग्निहोत्र्यांच्या वाड्यासमोर, अथवा काळबादेवी रस्त्यावर नंबर १ च्या घरांत " म्यानेजर, विविधज्ञानविस्तार " या पत्त्यावर ठेवावा. नाटपेड पत्र घेतलें जाणार नाहीं.